कर्में अर्पूनी । आशा ममता टाकुनी । युद्ध करीं । ८८ ॥ या सर्वही उत्तम गोष्टी । परि युद्ध ह्मणतां होतो कष्टी । कीं पाहतां धर्मदृष्टी । दोष हिंसादि युद्धांत ॥ ८९ ॥ स्वधर्म परी वाईट । यांत स्वजनवधदोष उत्कट । जो अहिंसात्मक चोखट । तो धर्म म्यां कां न करावा ॥ ५९०॥ भाव इत्यादिक । अर्जुनाचा उत्तमश्लोक । समजोनि बोले हा श्लोक । श्रीकृष्ण आतां ॥ ९१ ॥

॥ श्लोक ॥ श्रेयान् स्वधर्मो विगुणः परधर्मात्स्वनुष्ठितात् ।
स्वधर्मे निधनं श्रेयः परधर्मो भयावहः ॥ ३५ ॥

॥ टीका ॥ अर्जुना जो स्वधर्म । त्यांत असलें जरी गुणहीन कर्म । तरी त्याणेंचि कल्याण हें वर्म । रहस्य सर्वां वेदांचें ॥ ९२ ॥ इतरवर्णाचा धर्म। तो गुणयुक्त उत्तम । अनुष्ठानास बरा तरी स्वधर्म । तोचि श्रेय आपणा ॥ ९३ ॥ करितां स्वस्वधर्माचरण । त्या धर्मामुळें आपणा मरण । आलें तरी अगा शरण । असावें स्वधर्मासी ॥ ९४ ॥ इतर वर्णांचा कराही । धर्म करितां बरें नाहीं । त्याणें नरकादि भयच परी कांहीं । कल्याण न दिसे ॥ ९५ ॥ याकारणें स्वधर्म करूनी । सर्व कर्में मज अर्पूनी । युद्ध करणें हें धरीं मनीं । हा पूर्वोक्त अर्थ सिद्ध केला ॥ ९६ आतां या उपरी एक । अर्जुनाचा प्रश्नश्लोक । त्या प्रश्नाचें निमित्त सुश्लोक । परिसोत ॥ ९७ ॥ मागें बोलिला हरी । कीं ज्ञानी एके अवसरीं । प्रकृतीसारिखा चेष्टे अंतरीं । इंद्रियनिग्रहशीलही ॥ ९८॥ एथें वाटलें अर्जुना । कीं वाईट कर्म नावडे मना । ऐसें असोनि त्या जना । कोण वाईट कर्मीं योजितो ॥ ९९ ॥ कीं निग्रहशील ज्ञानी । भोगेच्छाही नसोनी । प्रारब्धें तरी कैसें मनीं । विषयभोग अपेक्षितो ॥ ६०० ॥ प्रारब्धही कोणे रीती । याची भोगीं उपजवी रती । या भावें श्रीपतीप्रती । प्रश्न करितो अर्जुन॥ १ ॥

॥ अर्जुन उवाच ॥ अथ केन प्रयुक्तोयं पापं चरति पुरुषः ।
अनिच्छन्नपि वार्ष्णेय बलादिव नियोजितः ॥ ३६ ॥

॥ टीका ॥ अथ यानंतर । ह्मणजे ज्ञानी होऊनि नर । इंद्रियनिग्रहतत्पर । असोनिही ॥ २॥ यानंतरही त्या नरा । ह्मणसी तूं जी वृष्णिवीरा । कीं भरोनि प्रकृतीचा वारा । प्रकृतीसारिखा तो चेष्टतो ॥ ३ ॥ तरी त्यासही अजी । कोण पापी विषयकर्मीं योजी । कीं नसोनि मनामाजीं । चेष्टतो प्रकृतीसारिखा ॥४॥ जैसा कोणी एक स्वयें निर्मळ । नातळे मळमूत्रादि ओंगळ । त्याहातें बळात्कारें प्रबळ । तें दाटूनि जैसा काढवी ॥५॥ तैसा असोनिही कुशळ । आणि

इंद्रियनिग्रहशील । तोही प्रकृतीसारिखा चेष्टतो ओंगळ । जाणों प्रारब्धें बळें योजिला ॥६॥ त्यास विषयाचें सेवन । पाप वाटे ऐसा प्रवीण । न इच्छितांही भोग कवण । पापीं योजी तें सांग ॥ ७ ॥ प्रकृतीसारिखा ज्ञानी । चेष्टे निग्रहशीळ ह्मणोनी । देव बोलिला ज्या भावेंकरूनी । तो न समजोनि हा प्रश्न ॥ ८ ॥ कीं तो जरी निष्काम । प्रारब्ध उपजवी त्यास काम । विषय निष्कामा करी सकाम । न समजला हा भाव अर्जुना ॥ ९ ॥ या प्रश्नाचें उत्तर । देतो आतां दामोदर । अध्याय संपे तों प्रकार । प्रसंगें कामाचा जयाच्या वांगला ॥६१०॥ त्यांत आधीं जो प्रश्न जाला । कीं हा न इच्छितां कोण याला । भोगीं योजितो हें पार्थ बोलिला । तें संजय ह्मणतो कीं ॥११॥

॥ श्रीभगवानुवाच ॥ काम एष क्रोध एष रजोगुणसमुद्भवः ।
महाशनो महापाप्मा विद्ध्येनमिह वैरिणम् ॥३७॥

॥ टीका ॥ ह्मणे भगवान् पूर्णकाम । कीं अनर्थासी मूळ हाचि काम । क्रोधही याचेंचि नाम । जो उपजे रजोगुणापासूनी ॥ १२ ॥ अगा एक ऋण देतो । एक ऋण घेतो । एक घेववितो आणि फेडवितो । धनी आपण उभयत्र ॥ १३ ॥ जीव कर्में करी । तें कर्म ऋण होय त्याचे शिरीं । फेडी भोगोनि अन्य शरीरीं । प्रारब्धाच्या ॥ १४ ॥ तें कर्म कामचि करवी । तें भोगें ऋणचि फेडवी । अज्ञानियांस पुढें जोडवी । अहंकारें भोगेच्छेंकरूनी ॥ १५ ॥ मी कर्ता मज हें प्रिय । मज तें नलगे जें मज अप्रिय । ऐसा रागद्वेषविषय । मीपणें भोगवी हा काम ॥ १६ ॥ ऐसा अज्ञानियांचा भोग । ज्ञानियांस नसे मीपणाचा रोग । परी भोगसमयीं त्याचा वियोग । प्रारब्ध करी कामबळें ॥ १७ ॥ त्यांत पुण्यवृक्षाचि फळती । तीं फळें अनायासें येती । तथापि भोगीं मीपणातें स्पर्शती । नव्हे भोग मीपणावांचूनी ॥ १८ ॥ अहंकारीं प्रतिबिंब मिळालें । तेव्हां पूर्वकर्म उपजलें । त्या दोघींही पाहिजे भोगिलें । जैसें केलें ते रीतीं ॥१९॥ कोणी निष्कामकर्म केलें । आणि ईश्वरीं नाहीं अर्पिलें । त्यासही ज्ञान जालें । पुढें अर्पितां ईश्वरीं ॥ ६२० ॥ परी पूर्वील निष्काम अनर्पित । तें बंधक जालें निश्चित । परी निष्कामत्वें न उपजला मनांत । काम ज्ञानियाच्या तया ॥ २१ ॥ ज्ञान जालियावरी । दैवयोगें अकस्मात् भोग शरीरीं । होय तत्पूर्वीं न शिरतां अंतरीं । तयांच्या काम ॥ २२ ॥ त्यांची गोष्टी एथें नाहीं । ते जनकादि नित्य विदेही । कीं भोग भोगूनिही देहीं । नसे वस्ती कामाची ॥ २३ ॥ एथें जो स्वयें ज्ञानी ।

प्रकृतीस घडी एक वश होउनी । तदनुरूप चेष्टे ह्मणोनि । जो मागें वर्णिला ॥२४॥ तो त्या जन्मांतरीं । सकाम पण्यकर्में करी । कांहीं पापही तदंतरीं । आचरे ॥ २५ ॥ त्यानंतर जन्म । एथें करितां ईश्वरार्पण कर्म । ज्ञान जालें परी प्रारब्धश्रम । कर्मानुरूप घडी एक उपजवी ॥ २६ ॥ त्याचा एथें प्रश्न । करीतसे अर्जुन । त्यास उत्तर दे मधुसूदन । कीं त्यास नाचवी हा काम ॥ २७ ॥ कीं या कामेंचि कर्म करविलें । एकें जैसें ऋण देवविलें । त्याणेंचि बलात्कारें फेडविलें । तो हा काम ॥२८॥ अगा काम उपजला । त्यास क्रोधही निश्चयें स्पर्शला । परंतु तो कामचि जाला । क्रोधरूप ॥२९॥ या भावें श्रीघनश्याम । ह्मणे क्रोधही हाचि काम । ज्या कामास जन्म । रजोगुणापासूनी ॥ ६३० ॥ त्या कामाचें लक्षण । सांगतो कमलेक्षण । कीं महाशन ह्मणजे महाभक्षण । पाहिजे जयासी ॥३१॥ याचेंचि रूप दुसरें । क्रोध तो पापी एकसरें । कीं वडे क्रोधाच्या भरें । परहिंसा निश्चयें ॥ ३२॥ कामरूपें महाशन । कीं दुर्भर जैसा हुताशन । तृप्त नव्हे त्रिभुवन । भोगितांही ॥ ३३ ॥ इच्छित पदार्थेंही तृप्त केला । तरी काम असेच भुकेला । घृतें अग्नी विझवितां देखिला । परी विषयें न विझे हा कामाग्नि ॥ ३४ ॥ कांहीं पडतां अंतर । खवळोनियां अति सत्वर । दावी तत्काळ क्रोधाकार । हाच काम॥३५॥तो मोठा पापी । ज्यास त्यास मारीनच ह्मणोनि दीपी । परपीडा न फावे कदापि । तरी हाणों लागे स्वदेहातेंचि॥३६॥ आपली डोई आपण । फोडूनि रक्ताचें शिंपण । करी ज्याच्या देहीं दारुण । क्रोधवारें संचरे ॥३७॥ तरी या क्रोधाचें रूप पहिलें । तो हा कामचि बोलिलें । काम नसतां कोणास आलें । फेंपरें क्रोधाचें॥३८॥ज्या पदार्थाची ज्या जना । मनीं नसेल कामना । त्याच्या प्राप्तीस विघ्न होतां मना । क्रोध चढेल हें न घडे ॥३९॥ षंढास एक कन्या देतो । त्यास एक देऊं नको ह्मणतो । क्रोध न करी षंढ तो । विघ्नकर्त्यावरी ॥ ६४० ॥ एक स्मार्तएकादशीचा व्रती । त्यास भागवत जातां आमंत्रणाप्रति । एक नको ह्मणतां चित्तीं । क्रोध कां व्रतस्था येईल ॥ ४१ ॥ व्रतस्था नलगे भोजन । त्याच्या आमंत्रणीं जो करी विघ्न । त्यावरी कां त्याचें मन । होईल तप्त ॥ ४२ ॥ शीतज्वरें कांपतो । त्यास एक चंदन लावूं पाहतो । एक नको ह्मणतां ज्वरित तो । क्रुद्ध कां परी होईल ॥ ४३ ॥ एवं नसतां काम । क्रोध नुपजे हा नेम । एवं कामचि पावला नाम । रूप

१ भय दाखवितो.

तें क्रोध ह्मणोनी ॥४४॥ दों रूपांचीं लक्षणें दोनी । "महाशनो महापाप्मा" ह्मणोनि । अतृप्त सर्व भक्षही होऊनि । तो महाशन काम पापी क्रोध॥४५॥ एवं क्रोध तोचि काम । जरी दोनी रूपें दोनी नामें । परंतु क्रोध तो तम । काम रजोगुण ॥ ४६ ॥ ऐसें असोन एथें । बोलिजेल कृष्णनाथें । कीं क्रोधही रजापासूनि तेथें । संदेह उपजेल शोधकांसी ॥ ४७ ॥ तरी काम ह्मणजे जल । त्यासच ह्मणावें गढूळ नितळ । थिल्लरीं उदक चंचळ । होतां गढूळ तें होतसे ॥ ४८ ॥ जलास आधार कर्दम । तैसा रजास आधार तम । रज खवळतां क्रोधभ्रम । तम करी रजासी ॥ ४९ ॥ चिखल विना उदका । वाळोनि होय मृत्तिका । काम नसतां क्रोधशंका । मग केंची ॥ ६५० ॥ एवं जोंवरी पाणी असे । तों तें नितळ गढूळही दिसे । नितळ काम क्रोध गढूळ ऐसे । दोनीही भेद उदकाचे ॥ ५१ ॥ या भावें श्रीघनश्याम । क्रोधही ह्मणे हाचि काम । गढूळ ह्मणणें जळाचेंचि नाम । तमयुक्त[1] कामही रजचि ॥ ५२ ॥ काम तोचि क्रोध । कैसा ह्मणोनि करितां शोध । कांहीं अत्यंत गूढार्थबोध । ये स्थळीं सूचवी श्रीकृष्ण ॥५३॥ कीं तम ते विषय । रजोगुण जो तें इंद्रिय । काम इंद्रियवासनामय । विषयाधारें ॥ ५४ ॥ जैसें भूमीवरी सलिलें[2] । सलिलयोगें भूमि चिखल । गढूळ जालें चिखलाचिवरील । होय तेंचि नितळ अन्यत्र ॥ ५५ ॥ तें भरतां पात्रांतरीं । गढूळता न दिसे तया नीरीं । काम भगवद्भक्तीत यापरी । न परिणाम पावे क्रोधाचा ॥ ५६ ॥ गोड चरित्र ऐकावें । तेंचि मधुरकंठीं गावें । तालमृदंगप्रभावें । कीर्तन करावें बहु गोड ॥ ५७ ॥ चांगलें रूप स्मरावें । कीं चांगलें भगवदर्चन[3] करावें । ऐशा अपेक्षेंत भरावें । हाही काम ॥ ५८ ॥ संसारवनातें तोडी । हरिभक्तीची कुऱ्हाडी । परी त्याच वनाच्या काष्टाची दांडी । घालावी तीस ॥ ५९ ॥ कीं कामावांचूनि मन । भलत्या गोष्टीचें न करी साधन । मनें मोक्ष मनेंचि बंधन । हा सिद्धांत ॥ ६६० ॥ संसार अरण्याचेंचि । काम काष्ट परी त्याची । करितां दांडी भक्तिकुऱ्हाडीची । मनचि तोडी वन संसाराचें ॥६१ ॥ एवं विषयवासनेवेगळा । तो काम मोक्षदायक मोकळा । पदक त्याचें बांधावें गळां । भक्ति नवरत्न जोडोनी ॥ ६२ ॥ मग त्यास न ह्मणावें काम । ज्यास इच्छिती आत्माराम । ज्यांत विषयवासनेचें धाम । तो वाईट ॥ ६३ ॥

१ तमोगुणासहित. २ पाणी. ३ भगवंताचें अर्चन.

काम निर्विषयें । तेथें रजोगुणाचा लय । शुद्ध सत्त्वांचा उदय । भक्ति ह्मणावी ॥ ६४ ॥ कामविषयाश्रित । तो वाईट अत्यंत । ह्मणूनि वर्णितो भगवंत । चतुर्थचरणीं या श्लोकाच्या ॥ ६५ ॥ अर्जुना काम ऐसे परी । या ज्ञानमार्गी जाण वैरी । याच्या बळें प्रारब्ध करी । विरक्तांसही घडी एक विषयासक्त ॥ ६६ ॥ इच्छा नसोनिही अर्जी । कोण वाईट कर्मी योजी । हा प्रश्न तुझ्या मनामाजीं । समज कीं योजितो काम ॥ ६७ ॥ आतां यानंतर श्लोक । तो कां बोले उत्तमश्लोक । त्याचें निमित्त सुज्ञ लोक । परिसोत ॥ ६८ ॥ निग्रहशीलही ज्ञानी । कोणे भोगीं योजिलें बळेंकरूनी । हा प्रश्न अर्जुनाचा ह्मणोनी । काम वर्णिला । ॥ ६९ ॥ हें ऐकोनि अर्जुना । वाटलें कीं ऐसें जिज्ञासुजना । घडों शके आत्मज्ञाना । पावला त्यास कैंचा काम ॥ ७० ॥ अनुतप्त विरक्त मन । गुरूनें देखोनि दीधलें ज्ञान । असतां तो ज्ञाननयन । कामें कैसा अंध होईल ॥ ७१ ॥ हा अर्जुनाचा भाव । जाणोनि सर्वसाक्षी देव । दृष्टांतमुखें देवाधिदेव । उत्तर देतो या श्लोकीं ॥ ७२ ॥

॥ श्लोक ॥ धूमेनाव्रियते वन्हिर्यथादर्शो मलेन च ।
यथोल्बेनावृतो गर्भस्तथा तेनेदमावृतम् ॥ ३८ ॥

॥ टीका ॥ अगा अग्नि वेष्टिजे धूमें । तैसें हें ज्ञान वेष्टिलें कामें । काष्ठ समग्र जळतां नेमें । विझे नासूनि तो धूम्र ॥ ७३ ॥ जों प्रारब्धभोग असे । तों भोगीं कामही दिसे । तें प्रारब्ध सरतां जें नासे । तें त्यास मोक्ष कैवल्य ॥ ७४ ॥ तेव्हां समुद्रचि केवळ । नसे ज्ञानाचाही कल्लोळ । कर्पूर जाळोनि अनळ । विझे उरे स्थळ मात्र ॥ ७५ ॥ जों काष्टांशाचें शेष । तोंवरी धूम्राचा असेच दोष । तैसें ज्याचे प्रारब्धीं पूर्वकल्मष । ज्ञान त्याचें ये रीती ॥ ७६ ॥ कीं प्रसंग त्याचाच असे । जनकादिकांचा प्रसंग न दिसे । सकाम कर्मपाकीं गवसे । भोगकाळीं काम हा ॥ ७७ ॥ एवं अग्नि वेष्टिला धूमें । तैसें ज्ञान वेष्टिलें कामें । परी संयमसमीरें साधकोत्तम । धूम शमवी अग्नी पेटवी ॥ ७८ ॥ ज्ञाता ज्ञानाग्नि पेटवितो । जरी धूमा बाधक मानितो । परी काष्ठांशशेष तोंपर्यंत तो । धूम दिसेच कांहींसा ॥ ७९ ॥ अग्नीस लागलाच असे धूम । ज्ञानास प्रारब्धें वेष्टीच काम । ज्ञानियास सर्व मिथ्या

१ विषयरहित. २ सत्त्व गुणाचा. ३ पूर्वील पाप. ४ विरुद्ध अशा वाऱ्यानें. ५ घुरास.

सर्व ब्रह्म । परी प्रारब्धयोगें काम लागला ॥ ६८० ॥ त्यांत ओलें काष्ट जाळी । धूम्र फार दिसे त्या अनळीं । शुष्क काष्ठ जाळितां ज्वाळीं । कांहीं दिसोनि लय पावे ॥ ८१ ॥ सनकाचा ज्ञानानल । होऊनि उरला इंगळ । जनकाचा पुण्यागरु केवळ । जळे तो धूम्र वाईट न दिसे ॥ ८२ ॥ ह्मणसी जिज्ञासु सभाग्य । जेव्हां जाला उपदेशयोग्य । कामत्यागें पूर्ण वैराग्य । होतें तया ॥ ८३ ॥ ज्ञान जालिया विशेष । काम जावा निःशेषें । हा मागुती त्याच्या ज्ञानास दोष । देखिला काम ॥ ८४ ॥ तरी अर्जुना हे गोष्टी खरी । ज्ञान जालिया कामवार्ताही दूरी । परंतु प्रारब्धाची दोरी । नाचवी ज्ञातया ॥ ८५ ॥ अगा ब्रह्मज्ञान । सदा निर्मळ । त्यास कोण बोलेल मळ । परी ज्या सत्त्वें कळे ज्ञान केवळ । तें प्रारब्धें मलिन क्षणें होय ॥ ८६ ॥ अगा शुद्ध सत्त्वाचा आरसा । त्यांत पुरुष आपणास जैसा । पाहे सत्त्वीं निजानुभव तो तैसा । प्रांजळ दिसे ॥ ८७ ॥ जो ज्ञानाचा आरसा । ह्मणावा निर्मळ आरसा जैसा । प्रारब्ध मलस्पर्शें ठसा । चढे मळाचा त्याहीवरी ॥८८॥ तथापि वैराग्याभ्यासबळ । करूनि घांसितां होय निर्मळ । परी भोगमात्राची वेळ । तोंवरी मळ चढेच कामाचा ॥ ८९ ॥ इंद्रियविषययोग । मना सत्त्वा त्याचें नांव भोग । विषयतम इंद्रियें राजसें याग । याचा सत्त्वास मळ तोची ॥ ६९० ॥ एवं जिज्ञासु निर्मळ । त्यास ज्ञान जालें केवळ । तरी प्रारब्ध प्रबळ । मलिन करी घडी एक॥९१॥ह्मणसी जें शुद्ध सत्त्व। ज्यास कळलें ब्रह्मात्मतत्त्व। जें टाकूनि त्रिगुणत्व । ब्रह्मीं उपरमों लागे ॥९२॥ येतां प्रारब्धभोगाचा काळ। अवलंबावें ब्रह्म केवळ। तेथें हा काम खळ । स्पर्शेल कैसा ॥९३॥ ऐसें असोनि त्याला । कां ह्मणावें काम लागला । तरी आईक अर्जुना माझे या बोला । दृष्टांतमुखें ॥ ९४ ॥ अगा गर्भाची खोळ । त्यास वेष्टी जैसा गर्भनाळ । तैसा येतां भोगकाळ । सत्त्वास काम वेष्टितो ॥ ९५ ॥ गर्भाचा उत्पत्तिकाळ । प्राप्त होतां स्वयेंचि तें नाळ । वेढे उकलतां जें बाळ । वेगळें पडे त्यांतूनी ॥ ९६ ॥ सरतां भोगाचा काळ । सत्त्व मोकळें होय तत्काळ । एवंच हा वैरी प्रबळ । अगा काम ॥९७ ॥ नाहीं सरला भोगकाळ । तों गर्भास जाणों वेष्टी नाळ । तेव्हां ब्रह्मीं केवलीं केवळ । सत्त्वास होणें हें कैचें ॥ ९८ ॥ परंतु सरतां भोगकाळ । नाहीं सात्र होय तत्काळ । आगळें ज्ञानाचें बळ । काय लेखा कामाचा ॥ ९९ ॥ जरी हा गोड वाटता । तरी ज्ञानियाचे मनीं नित्य

दाटता । कीं हा वैरीच तत्त्वतां । वाटे हें आईक या श्लोकीं ॥ ७०० ॥

॥ श्लोक ॥ आवृतं ज्ञानमेतेन ज्ञानिनो नित्यवैरिणा ।
कामरूपेण कौंतेय दुष्पूरेणानलेन च ॥ ३९ ॥

॥ टीका ॥ अगा ज्ञानियास हा नित्य वैरी । जो ज्ञानधनास नित्य चोरी । जो नाना विषयाकारीं । स्वयें रूपें दाखवी ॥ १ ॥ सर्वरूपीं ज्ञानी स्वरूप । पाहे तों हा विषयरूप । भासवी त्या रूपीं प्रकोप । करी मनीं जेव्हां हा काम । ॥ २ ॥ ऐसा हा काम पापरूपी । वासना उपजवी त्या रूपीं । विसर पाडी चित्स्वरूपीं । ज्ञानियांस ॥ ३ ॥ भोग भोगुनि मना । अधिकाधिक उपजवी कामना । आवरण करी ज्ञानियांच्या ज्ञाना । नित्य वैरी ॥ ४ ॥ हा न सोडी वैरी । म्हणोनि कोणी जरी भोगें तृप्त करी । तरी घृतबिंदु वैश्वानरीं । तैसा वाढे ॥ ५ ॥ ऐसा हा दुर्भर । पेटे जेवीं वैश्वानर । नित्य वैरीपणाचा प्रकार । याचा ऐसा ॥ ६ ॥ अज्ञानियांचाही काम तृप्त । नव्हे तरी ते मानितीं आप्त । परी कामामुळें दुःख प्राप्त । वैरी सकळांचाही ऐसा ॥ ७ ॥ परी ज्ञानियास नित्य वैरी । कीं आप्त न वाटे कोणेपरी । ज्ञानसूर्यास अस्तगिरी। भोगकाळीं जो होतो ॥८ ॥ आतां यापुढें श्लोक । तो कां बोलें उत्तमश्लोक । त्याचें निमित्त सुज्ञलोक । आइकोत ॥ ९ ॥ ज्ञानियास हा कामवैरी । जो घडी एक ज्ञानलोप करी । निग्रहशीलासही ऐशापरी । नित्य वैरी हा काम ॥ ७१० ॥ परंतु ज्ञानी निग्रहशील । भोगुनही भोग सकळ । भोग सरतांचि तत्काळ । आयताच योगी निष्काम तो ॥ ११ ॥ जीं जीं कामाचीं स्थळें । ज्यांच्या योगें प्रारब्धफळें । भोगणें तीं निष्कामें सकळें । क्षणक्षणें तो करी ॥ १२ ॥ इतरांकियास आत्मस्वरूप । सर्वत्र लक्षितां कामरूप । नाहींसाच होय जैसा दीप । प्रकाशतां तमा ठाव नुरे ॥ १३ ॥ कीं ज्ञानप्रकाश आड । प्रारब्ध लावी कामाचें वोड । तेव्हां उपजे त्यास चाड । विषयभोगाची ॥ १४ ॥ ईश्वरशक्तीकरूनी । प्रारब्ध असे तें वाड धरूनी । न निवे ज्ञानियास म्हणोनी । जों असे काळ भोगाचा ॥ १५ ॥ प्रारब्धभोग सरला । तरी तो आडपडदा उरला । परी त्याचा धनी तो झुरला । काढितां नलगती श्रम मग ॥ १६ ॥ हें ज्ञानियाचें लक्षण । तो आत्मसुखलाभेंचि निपुण । ज्याच्या आंगीं जिज्ञासूपण । यत्न लागती तयासी ॥१७॥ ज्ञानियाच्या ज्या ज्या स्थळीं । प्रारब्धबळें काम छळी । त्या त्या स्थळीं तो

१ ज्ञान. २ भरून पूर्ण करायास कठीण तो. ३ आवरण.

स्वयेंचि बळी । इतर जनांचिया ॥ १८ ॥ तैसाचि अद्यापि अर्जुन । त्याणें शुद्ध करूनि मन । जाणोनि आत्मा आनंदघन । त्या कामास नासावें ॥१९॥ मग प्रारब्ध क्षणभरी । त्या मृत कामा सजीव करी । तरी न दिसे जे अवसरीं । प्रारब्धभोग असेना ॥ ७२० ॥ यालागीं कामाचा जय । अर्जुनें करावा हा निश्चय । परंतु जाणोनि आत्मा अद्वय । काम मारावा ॥ २१ ॥ हें सांगणें अर्जुनाप्रति । ह्मणोनि आधीं श्रीपति । ज्ञानियांच्या प्रसंगें कामस्थिति ॥ सांगतो या श्लोकीं ॥ २२ ॥

॥ श्लोक ॥ इंद्रियाणि मनो बुद्धिरस्याधिष्ठानमुच्यते ।
एतैर्विमोहयत्येष ज्ञानमावृत्य देहिनम् ॥ ४० ॥

॥ टीका ॥ अगा इंद्रियें आणि मन । आणि बुद्धि या कामाचें अधिष्ठान । यांहींकरूनि वेष्टूनि ज्ञान । देहधारियातें मोहीतो ॥ २३ ॥ ज्ञानसूर्यास अस्ताचळ । मोहूनि इंद्रियमनबुद्धिस्थळ । करूनि कामतस्कर[1] प्रबळ । अनुभवधन[2] चोरूनि नेतसे ॥२४॥ एथें ह्मणे हरी । कीं जो देहधारी । त्यास[3] हा काम मोह करी । ज्ञानानुभव आच्छादुनी ॥ २५ ॥ एथें भाव गहन । सूचवीतसे जगज्जीवन । कीं ज्ञानियास सर्वदा चिंतन । सर्वगताचें ॥ २६ ॥ जो ऐसा त्यासही । कां श्रीकृष्ण ह्मणे एथें देही । ऐसें विचारील यास कांहीं । गहनत्व नुमजेल भोगाचें ॥ २७ ॥ कीं सुखदुःखभोक्तेपण जयाला । प्रतिबिंब देहधारी ह्मणावें तयाला । या प्रारब्धाचा पूर्वकर्मकर्ता बोलिला । तो जो बिंबैक्य आतां जयासी ॥ २८ ॥ मीच कर्ता ह्मणोनि । कर्म करी देहाभिमानी । तो त्याचें फळ भोगितां मानी । मी भोक्ता ह्मणोनि अविवेकें ॥ २९ ॥ ज्या मापें उसनें घ्यावें । त्याच मापें तें फेडावें । ज्ञानियासही घडावें । भोगीं घडी एक प्रतिबिंबत्व ॥७३० ॥ धार्मिक राजा त्याचा सुत । प्रजापुत्रास ताडण बहुत । करूनि निघे पोटापटांत । पितयाच्या ॥ ३१ ॥ तों अपराध सांगे प्रजा । तेव्हां वस्त्राबाहेर ढकली राजा । दंड करूनि पुन्हा आत्मजा । आलिंगितो ॥ ३२ ॥ तैसा प्राप्त होतां भोग । बुद्धीस घडे अहंकारयोग । चिदंश प्रतिबिंबोनि संयोग । त्यांत घडे सुखदुःखाचा ॥ ३३ ॥ तें प्रारब्धफळ । त्यास भोगणें समूळ । देहीं देहधारी केवळ । ह्मणावें त्याला ॥ ३४ ॥ तो पूर्व कर्मकर्ता ह्मणोनि । प्रारब्धबळें मनबुद्धिइंद्रियें करूनि । काम मोहितो वेष्टूनि । ज्ञान त्याचें ॥ ३५ ॥ कीं ज्ञानही त्याचें ।

१ काम हाच चोर. २ अनुभव हेंच धन. ३ रिवे.

ज्याणें ओळांखिलें बिंबैक्य साचें । बिंबास तों कर्म कैचें । कीं फळ-भोगणें लागे ॥ ३६ ॥ पावोनिही बिंबैक्यता । प्रतिबिंब कैंवी होतो मागुता । तरी दृष्टांतें प्रमाणें तत्त्वता । सिद्ध होतो हा अर्थ ॥ ३७ ॥ जरी अविद्यांश गेला । जळरूपें सत्त्वोपाधि असे उरला । त्यांत भोगकाळीं दिसों लागला । प्रतिबिंबत्वें चिदंश ॥ ३८ ॥ देहनदी कर्ममूळ । सत्त्वोपाधिजळ निर्मळ । उदकाबाहेरील तटस्थळ । प्रतिबिंबे जळीं नदीच्या ॥ ३९ ॥ नदीतट एक बाहेरी । एक त्याचें बिंब नीरीं । तें जळ चढतां तटावरी । बिंबचि असे जळीं नसे प्रतिबिंब ॥ ७४० ॥ नदीजळींही भूमि असे । परी बाह्यभूमीचें प्रतिबिंब दिसे । तटावरी जळ चढतां न गवसे । दृष्टीस पाहतां प्रतिबिंब ॥ ४१ ॥ जेव्हां ओहटोनि नदी वाहे । तेव्हां आंत तें प्रतिबिंब आहे । एवं अहंकारीं ज्ञानी पाहे । प्रतिबिंबास ॥ ४२ ॥ सात वितीच शरीर । सात वितीच अहंकार । देहाबाहेर तिळ अंतर । असतां न तुटे तें शत्रें ॥ ४३ ॥ पदांगुळीपुढें तिळभरी । अग्नि असला जरी । न पोळे मी पोळलों हा अंतरीं । न उपजे प्रत्यय ॥ ४४ ॥ मी जात होतों सोंवळा । तिळाच्या अंतरें गेला ओंवळा । ह्मणूनि विटाळ नाहीं जाला । ओंवळियाचा मज ॥ ४५ ॥ एवं देह जेवडा । अहंकारही तेवडा । सर्वत्र धांवे घोडा । मनाचाचि ॥ ४६ ॥ तें सर्वत्र बिंब पाहे । तो आत्मा तोचि आहे । परी मागुती येऊनि राहे । जेथें प्राण ॥ ४७ ॥ जैसा पक्षियास दोर । बांधोनि सोडिला बहु थोर । तो सर्वत्र उडोनि गगनचर । ये मागुती जेथे दोर बांधला ॥ ४८ ॥ तैसें मन भलते तेथें । फिरोनि ये प्राण जेथें । एवं प्राण देहींच येथें । मन ये मागुती त्या स्थळा ॥ ४९ ॥ श्रुति ॥ प्राणबंधनं हि सोम्य मन इति ॥ छांदो० ॥श्रुत्यर्थ॥ सामवेदाच्या शिरोभागीं । उद्दालक श्वेत केतूलागीं । ह्मणे मनास बंधन जगीं । प्राणप्रकारें पक्षियाच्या ॥७५०॥ एवं मन सत्त्वगुण । सर्वगत बिंबात्मयाची खूण । समजोनि विश्वात्मभावें निपुण । मन चढे जळ जैसें नदीचें ॥ ५१ ॥ तो स्वदेहीं आणि चराचरीं । एक चैतन्य जैसें भूमी नीरीं आणि बाहेरी । तेव्हां न दिसे सत्त्व जळांतरीं । अहंकार आणि प्रतिबिंब ॥ ५२ ॥ सत्त्वें स्फुरे अहंकार । तो अहंकार जितकेंचि शरीर । तितक्यांतचि प्रतिबिंबरूपें ईश्वर । डळमळूं लागे॥५३॥ तें पसरतां सत्त्वजळ । बिंबभूमिच केवळ । न स्फुरे अहंकार कीं त्याचें मूळ । सत्त्व पसरे बिंबावरी ॥ ५४ ॥ देखोनियां परिमित । त्यास मी ह्मणोनि

ज्ञानी चित्त । बिंब चैतन्य अनंत । मी ह्मणणें मग कैचें ॥ ५५ ॥ भोग-समयीं प्रतिबिंब । तेव्हां अहंकाराचा अवलंब । तेव्हां कुशळ बुद्धी स्मरे जरी बिंब[१] । घाबरा करी अहंकार प्रतिबिंबा ॥ ५६ ॥ सुखीं दुःखीं प्रतिबिंब । तेव्हां सत्त्वगुणीं अहंकारावलंब । सरतां भोग विलंब । न असे बिंबीं ऐक्याचा ॥ ५७ ॥ इत्यादि नाना दृष्टांत । लिहितां ग्रंथ वाढेल अत्यंत । हें विशद पंधराविंयांत । होईल ॥ ५८ ॥ पंचदशाध्यायश्लोक ॥ उत्क्रामंतं स्थितं वापि भुंजानं वा गुणान्वितम् । विमूढा नानुपश्यंति पश्यंति ज्ञानचक्षुषः ॥ ॥ टीका ॥ " ममैवांशो जीव " ह्मणोनी । जो निरूपिला स्ववाचेंकरूनि । त्यास पाहती बरे रीतीं ज्ञानी । न पाहती मूढ ॥ ५९ ॥ कीं बिंबीं ऐक्यपण । तेंचि ज्ञानियाच्या चिदंशाचें उत्क्रमण । भोगकाळीं मिळोनि असणें । गुणांमाजी ॥ १६० ॥ तरी कैसें याचें उत्क्रमणें । कैसें याचें गुणीं मिळोनि असणें । कैसें याचें भोगणें । पाहती ज्ञानी ज्ञानदृष्टी ॥ ६१ ॥ बिंब कळल्याविण । न सांपडे प्रतिबिंबाचें लक्षण । मुखाचें नाक धरितां आपण । नाक सांपडे प्रतिबिंबाचें ॥ ६२ ॥ यालागीं यातें ज्ञानी । तेंचि पाहती ह्मणोनी । बोले श्रीकृष्ण या वचनीं । पंधराविंयांत ॥ ६३ ॥ एवंच भोगणें यासी । भोगणें नसे बिंबात्मयासी । जड मनादिकां तो कैसी । वार्ता बोलेल भोगाची ॥ ६४ ॥ कलियुगीं कोणी अपक्व ज्ञानी । जड द्रष्टा मात्र समजोनी । प्रतिबिंबचि ब्रह्म ह्मणोनी । सांगती शिष्या ॥ ६५ ॥ न कळे ब्रह्म सर्वगत । कीं प्रतिबिंबास भोक्ता ह्मणावा निश्चित । भोक्ता पुसतां शिष्यात[२] संत । मन भोक्तें ह्मणूनि बोलती ॥ ६६ ॥ ज्यास भोग त्यास मोक्ष । तेव्हां मनासचि मोक्ष हा पक्ष । ऐसें पुसती जेव्हां दक्ष । तोंड वासिती ते तेव्हां ॥ ६७ ॥ मोक्ष ह्मणतां मना । जडास मोक्ष हें घडेना । युक्ति उदंड चाळिती त्या त्यांच्या वचना । खंडिजेल पुढें अध्याय पंधराविंयांत ॥ ६८ ॥ भोक्ता हाचि प्रतिबिंबांश । स्वयें बोले हृषीकेश । श्रुतींतही अर्थलेश । हाचि असे ॥ ६९ ॥ श्रुति ॥ आत्मानं रथिनं विद्धि शरीरं रथमेव च । बुद्धिं तु सारथिं विद्धि मनः प्रग्रहमेव च ॥ इंद्रियाणि हयानाहुर्विषयांस्तेषु गोचरान् । आत्मेंद्रियमनोयुक्तं भोक्तेत्याहुर्मनीषिणः ॥ कठ० ॥ श्रुत्यर्थ ॥ आत्मा रथी रथाचा धनी । शरीर जाण रथ ह्मणोनि । बुद्धि सारथि असे धरूनी । वाग्दोरे[३] मनाचे ॥ १७० ॥ वागोरे जेव्हां मन । इंद्रियें घोडे तदधीन । विषय तया गोचर

---

१ बिंबांत प्रतिबिंबाचें ऐक्य. २ शिष्यांत्यास. ३ लगाम.

ह्मणोन । इंद्रियाश्रवां मार्ग विषय ते ॥ ७१ ॥ आत्मा इंद्रियबुद्धीकरूनी । युक्त होऊनी भोक्ता होउनी । भोगितो विषय ह्मणोनि । श्रुति ह्मणे ह्मणती कीं बुद्धिमंत ॥ ७२ ॥ एवं ते नव्हती बुद्धिमंत । जे मन आदि जडा भोक्ता ह्मणती निश्चित । ऐसीं प्रमाणें पाहतां बहुत । भोक्ता ह्मणती आत्म-यासी ॥ ७३ ॥ तें बिंबास भोगणें नसे । जडास भोक्तेपण तों न दिसे । तेव्हां प्रतिबिंबांश भोक्ता गवसे । जो "ममैवांशो जीव" ऐसा पंचदशीं वर्णिला ॥ ७४ ॥ आतां प्रारब्धाचा क्षय । भोगेंचि ह्मणूनि निश्चय । वेदीं वेदांतीं त्याचा अन्वय । ये रीतीं समजावा ॥७५ ॥ कीं बिंबैक्य पावला ज्ञानी । बिंबास भोग न घडे नित्य अकर्तेपणेंकरूनी । भोगकाळीं प्रतिबिंबांश ह्मणोनी । बोलावा तो ऐशा अनुभवें ॥ ७६॥ "सदृशं चेष्टते स्वस्या" ह्मणोनी । मागें भगवंत या गीतावचनेंकरूनी । ज्ञानियांसही मोह बोलिला त्यापासुनी । हें प्रकरण चालिलें येविषयीं ॥७७॥ भोगकाळ होतां प्राप्त । ज्ञानी जरी अनुभवयुक्त । तरी अनुभव होतां गुप्त । नाचे प्रकृतीसारिखा ॥ ७८ ॥ त्यास मूळ हाचि काम । क्रोधही त्याचें दुसरें नाम । त्याचीं अधिष्ठानें सांगतो मेघश्याम । देहीं ह्मणे ज्ञानियास या भावें ॥ ७९ ॥ कीं भोगाकारणें । क्षण एक लागे प्रतिबिंब होणें । त्यास अहंकारयोगें भोगणें । जो कर्मकर्ता देहात्मपणें जन्मांतरीं ।।८०।। एवं इंद्रियें मन बुद्धि अधिष्ठान। या कामाचें इहींकरूनि ज्ञान । वेष्टून देही प्रतिबिंब यास मोही ह्मणोन । श्रीकृष्ण बोले या श्लोकीं ॥ ८१ ॥ आतां यापुढें तीन श्लोक । ते कां बोले उत्तमश्लोक । त्याचें निमित्तही सुज्ञलोक । परिसोत ॥ ८२ ॥ अर्जुन अद्यापि नसे ज्ञानी । परी सांगणेंचि असे ह्मणोनि । कामजयोपाय या श्लोकेंकरूनि । सांगों पाहे ॥ ८३ ॥ ज्यांस इंद्रियभोगीं वैराग्य । तेचि मुमुक्षु सभाग्य । अपरोक्षज्ञानास होती योग्य । हा सिद्धांत वेदांतीं ॥ ८४ ॥ इंद्रियांचा संयम । करितां स्ववश होय काम । तेव्हां मुमुक्षु निष्काम । योग्य गुरूच्या उपदेशा ॥ ८५ ॥ गुरुमुखें आत्मा वेगळा । इंद्रियें मन बुद्धि यांहूनि निराळा । कळतां मन बुद्धि इंद्रियांसहित जाला । आत्मरज्जूंत सर्प काम ॥ ८६ ॥ परंतु तो आत्मा कळाया । आधीं आवरावें इंद्रियां । आत्मा कळोनि कामा तया । नासावें समूळ ॥ ८७ ॥ मग प्रारब्धभोगकाळ । प्राप्त होतां रज्जु न कळोनि व्याळ । घडी एक जाला तरी फटकाळ । घात करूं

१ देह हाच आत्मा अशा भावानें. २ काम जिंकण्याचे उपाय.

शकेना ॥ ८८ ॥ कीं भोगकाळ सरला । मागुती आत्मा रज्जु स्मृतीस आला । तेचि क्षणीं पळाला । मन बुद्धि इंद्रियांसहित हा काम ॥ ८९ ॥ परंतु जरी ज्ञान उपदेशाहूनि आधीं । इंद्रियजयें निष्कामता साधी । तरी भोगक्षण सरतां नित्य समाधी । मागुती जोडे ॥ ७९० ॥ जरी आधीं इंद्रियें न जिंके । आणि निष्काम होऊं न शके । आणि ज्ञानमार्गेही शिके । तरी हा काम नाशी तें ज्ञानविज्ञानही ॥९१॥ ह्मणुनी एका श्लोकें करूनि। आधीं इंद्रियजय सांगोनी । मग दों श्लोकीं स्ववचनीं । आत्मज्ञानें कामनाश बोलेल ॥ ९२ ॥

॥ श्लोक ॥ तस्मात्त्वमिंद्रियाण्यादौ नियम्य भरतर्षभ ।
पाप्मानं प्रजहि ह्येनं ज्ञानविज्ञाननाशनम् ॥ ४१ ॥

॥ टीका ॥ अगा इंद्रियें मन बुद्धि अधिष्ठुनी । ज्ञानियाचेंही ज्ञान वेष्टुनी । क्षण एक मोह करी ह्मणोनी । पूर्वश्लोकीं बोलिलों तूतें ॥ ९३ ॥ त्याकारणें तूं अर्जुना । वीरा आइक भरतकुलोत्पन्ना । ज्ञानाहोनि आधीं लागें यत्ना । इंद्रियसंयमाच्या[1] ॥ ९४ ॥ आधीं जिंकोनि इंद्रियें । मन निष्काम करीं निश्चयें । कीं तूं पराक्रमी थोर स्वयें । या भरतकुळीं ॥ ९५ ॥ सर्वां क्षत्रियांत थोर । या भरतवंशाचे वीर । त्यांत तूं श्रेष्ठ अत्यंत धीर । तरी जिंकीं आधीं हीं इंद्रियें ॥ ९६ ॥ आधींच ह्मणजे ज्ञानाहुनी । पहिलाच इंद्रियांचा नियम करूनी । मग मारीं आत्मज्ञान पावोनी । या पापिया कामातें॥९७॥ कीं हा ज्ञान आणि विज्ञान दोहींसी । ज्ञान जालियाही नासी । जरी न जिंकिसी इंद्रियांसी । आधीं ज्ञानाहुनी ॥ ९८ ॥ ज्ञानव्यतिरेकें शुद्धात्मतत्त्व । विज्ञानविशिष्टज्ञानान्वयें सर्वात्मकत्व । दोहींस अनुभवी जें शुद्धसत्त्व । त्यास नाशील हा काम ॥ ९९ ॥ राजनीतीचा अभ्यास केला । मग जो सिंहासनीं बैसला । त्याचा नाहीं नासला । भोग राजकार्याचा ॥ ८०० ॥ सिंहासनीं आधीं बैसला । मग राजनीतीचा अभ्यास मांडिला । तो सिंहासनाखालीं लोटला । बहुतांहीं ॥ १ ॥ आधींच इंद्रियांचा जय । न करितां ज्ञानविज्ञाननिश्चय । कळला तरी नासूनि भय । उपजवी संसाराचें हा काम ॥ २ ॥ खाकेंस[2] घेउनियां श्वान । सोंवळा जाला करूनि स्नान । तैसा इंद्रिय भोगासक्त ज्ञान । पावला मुखें गुरूच्या ॥ ३ ॥ यालागीं अर्जुना आधीं । इंद्रियजयोपाय साधीं । मग प्रारब्धें काम उपजला कधिंकधीं । तरी आत्म रज्जु स्मरतां नुरे तो सर्प ॥ ४ ॥ पूर्वश्लोकानुसंधान । पाहतां इंद्रियें

१ इंद्रियमदनाच्या. २ काखेस.

बुद्धि मन । सांगीतलें कामाचें अधिष्ठान । या श्लोकीं जय इंद्रियांचा ।। ५ ।। तरी बुद्धि आणि मन । यांच्या जयाचा कां न करावा यत्न । ये स्थळीं करितील सुज्ञ जन । प्रश्न ऐसा ।। ६ ।। तरी अन्न आणि उदक । कोंडितां गडकोटाचे लोक । वश होती ऐसा विवेक । एथें सूचवी श्रीकृष्ण ।। ७ ।। सर्वदा भोगावे विषय । हा बुद्धींत कामांचा निश्चय । मग नाना संकल्परूप होय । मन बळें कामाच्या ।।८।। तथापि जो तो भोग । घडे होतां इंद्रियविषययोग । भोगीं वैराग्य होतां लागे रोग । कामास जो असे मनबुद्धींत।।९।। बुद्धींत भोगाचा निश्चय । त्यास साधन इंद्रियें आणि विषय । मनही इंद्रियविषयमय । करी संकल्प विकल्प ।। ८१० ।। त्या इंद्रियांचा करितां नियम[1] । न थारे[2] मनबुद्धींत काम । पाणी कोंडितां वाळोनि भस्म । होय विषांकुराच्या शेताचें ।। ११ ।। यालागीं कामाधिष्ठान[3] । पूर्वश्लोकीं बुद्धि इंद्रियें मन । सांगोनि कामजयसाधन । इंद्रिय नियम बोलिला या श्लोकीं ।। १२ ।। एवं ज्ञानियाच्याही मनीं । क्षण एक प्रारब्धबळें वेष्टुनी । काम मोह करी ह्मणोनी । बोलिलें प्रकरण ।। १३ ।। त्यास ज्ञानाहूनि आधीं । जरी निष्कामता साधी । तरी प्रारब्धभोग सरतां बोधीं । न थारे ठाणें या कामाचें ।। १४ ।। तरी ज्ञानाहूनि पूर्वीं मन । कामभोगेच्छेनें असेल मलिन । तरी तो काम ज्ञानविज्ञान । नाशील हा सिद्धांत ।। १५ ।। यालागीं या श्लोकीं हरी । ह्मणे अर्जुना आधीं इंद्रियनियम करीं । मग मारीं ज्ञान जालियावरी । रज्जू ओळखोनि कामसर्प ।। १६ ।। तें आत्मज्ञान कवणेपरी । होय हें या उपरी । अर्जुनास सांगे हरी । या श्लोकीं ।। १७ ।।

।। श्लोक ।। इंद्रियाणि पराण्याहुरिंद्रियेभ्यः परं मनः ।
मनसस्तु परा बुद्धिर्यो बुद्धेः परतस्तु सः ।। ४२ ।।

।।टीका।। अगा आत्मा ह्मणजे आपण । तें प्रतीतीस जें आत्मपण । तेंचि आधीं धरूनि खूण । होय कीं नव्हे हा करावा विचार ।। १८ ।। स्थूळ देह मी हा प्रत्यय । प्रथम आत्मत्त्वाचा निश्चय । त्याहोनि पलीकडे इंद्रियमय । लिंगदेह ।। १९ ।। देह मी ऐसें ह्मणे । तें जरी देहास देह जाणे । तरी शव कां रे नेणे । मी देह ह्मणोनि देहातें ।। २० ।। स्वप्नीं कल्पनेचा देह दिसे । तेव्हां तोचि मी ह्मणोनि वाटतसे । यावरूनि हाही लटिका भासे । आत्मत्वें मी देह ह्मणोनी ।। २१ ।। इत्यादि भाव पोटीं । तो मुखनेत्रसंकेतें

१ निग्रह, संयम. २ स्थिर होई. ३ कामाचें ठिकाण.

समजे किरीटी । कीं इंद्रियें पलीकडे ह्मणतांचि गोष्टी ।। कळलीं कीं इंद्रियें पलीकडे स्थूलाहुनी ।। २२ ।। स्थूल देहचि आपण । तरी इंद्रियग्रामें दर्शन श्रवण । तीं तरी लिंगदेहीं इंद्रियें ऐसी खूण । ठावकी अर्जुनातें ।। २३ ।। स्थूलदेहीं नेत्रकर्णादिकें । हीं तों इंद्रियांचीं गोलकें । जैसीं पात्रांत उदकें । इंद्रियीं गोलकें ये रीती ।। २४ ।। मी देखतों मी आइकतों । प्रत्यय लिंगदेहेंकरूनि हा होतो ।। तरी अहंकारयोगें प्रत्ययास येतो । आत्मत्वें लिंगदेह ।। २५ ।। इंद्रियें ह्मणतां पलीकडे । स्थूलापलीकडे लिंगदेह हा भाव जडे । आत्मप्रत्यय लिंगदेहीं घडे । उडे आत्मता स्थूलदेहाची ।। २६ ।। इंद्रियें ह्मणतां शब्दादिविषय । आत्मा नव्हे हा सूचविला निश्चय । कीं विषयास जाणे इंद्रिय । इंद्रियावीण आत्मा नेणे विषयांतें ।। २७ ।। आणि येथें देव । श्रुतिप्रमाण सूचवी स्वयमेव । कीं इंद्रियें पलीकडे हा भाव । बोलती ह्मणोनि ।। २८ ।। बोलती ह्मणजे बोलणार । वेद ऐसा शब्दचमत्कार । भाव कीं हा विशद प्रकार । श्रुतीही बोलती ।। २९ ।। त्या श्रुतीचा संक्षेप । बहुत अर्थाचा थोडियांत आटोप । ऐसा हा श्लोक वेदार्थरूप । स्वयें बोलोनिही श्रुति सूचवी ।।८३०।। श्रुति।। इंद्रियेभ्यः परा ह्यर्था अर्थेभ्यश्च परं मनः । मनसस्तु परा बुद्धिर्बुद्धेरात्मा महान्परः ।। महतः परमव्यक्तमव्यक्तात्पुरुषः परः। पुरुषान्न परं किंचित्सा काष्ठा सा परा गतिः।।कठ०।।श्रुत्यर्थ।। स्थूलापलीकडे इंद्रियें । हें सूचविलें श्रीकृष्णें निश्चयें । तीं इंद्रियें विषयमयें । तेव्हां विषयही आत्मा घडेना ।। ३१ ।। हा कृष्णाचा भावार्थ । कीं श्रुतींत इंद्रियांपलीकडे अर्थ । अर्थशब्दें पदार्थ । शब्द स्पर्श रूप रस गंध ।।३२।। अर्थ इंद्रियांपलीकडे । ते शब्दादि पांचही रोकडे । वर्णिले उरला श्रुत्यर्थ घडे । तरी मागें पडेल श्लोकार्थ ।। ३३ ।। श्लोकार्थ अवघा जाल्यावरी । श्रुतीही वाखाणिजेल बरी । आतां इंद्रियांहूनि पलीकडे हरी । मन ह्मणे ।। ३४ ।। स्थूल सूक्ष्म दोनीच देह । सर्व शास्त्रसिद्ध निःसंदेह । ते दोनी आत्मा हा मोह । निरसितां त्यापुढें मन आत्मा ।। ३५ ।। कीं मन असे जेथें । आत्मा स्फुरे तेथें । तेव्हां अज्ञानदेशांत येथें । मन आत्मा हें वाटे । ।। ३६ ।। कीं स्वप्नदेह मनोमय । तो मी ह्मणोनि आत्मत्वाचा निश्चय । तेव्हां होय मृतप्राय । स्थूल देह हा ।। ३७ ।। ओळखावें त्या मना । करितां नाना कल्पना । ते कल्पना कांहीं दिसेना सुषुप्तींत।।३८।। सुषुप्तींत मन तें न उरे । अथवा बुद्धीचें बोद्धव्यही न स्फुरे । परी जागा होतां सुख स्मरे । ते बुद्धि

॥ ३९ ॥ मी सुखें निजलों होतों । आणि कांहीं जाणत नव्हतों । बुद्धि जागी करितां हे तों । रूप करी दोहींचें ॥८४०॥ कीं सुख तें आत्मा आपण । आणि तेथें कांहीं न कळणें । हें आपलें जडपण । प्रगट करी बुद्धीच ॥ ४१ ॥ जैसें घडी एक मौन धरुनी । जिभेस घडी एक आवरूनी । मागुती बोलतां त्याच जिभेंकरूनि । रूपें होती दोहींचीं ॥ ४२ ॥ जीभन्नि ह्मणे राहिला होता शब्द । जिभेवीण आत्मा तो निःशब्द । परी जीभ नाहींशीच जाली स्तब्ध । आत्मा होतां स्वप्रकाश ॥ ४३ ॥ मौनी नव्हतें बोलणें । तें जिभेनेंचि वर्णिलें अबोलणें । तैसें सुषुप्तींत बुद्धीचें न जाणणें । बुद्धीच बोले ॥ ४४ ॥ एवं मन जेथें नसे । बुद्धीही तेथें सुषुप्तींत न दिसे । परी मनाची कल्पना नव्हती हें जाणतसे । बुद्धीच ते ॥ ४५ ॥ जेव्हां मनापलीकडे बुद्धि । मनास न घडे आत्मत्वसिद्धी । ह्मणोनि "मनसस्तु परा बुद्धि" । ऐसें बोले श्रीकृष्ण ॥ ४६ ॥ मनासही जाणे बुद्धि । एवं मनापलीकडे बुद्धीची सिद्धी । तेव्हां मन आत्मा या प्रत्ययाची प्रसिद्धी । उडोनि गेली ॥ ४७ ॥ आतां बुद्धिच आत्मा गमे । तरी तेही सुषुप्तींत उपरमे । बुद्धीचें बोद्धव्य उपशमे । उरे आनंद आत्मा सुषुप्तींत ॥ ४८ ॥ तेथें आत्माही नाहीं ह्मणावा । तरी आनंद कैसा गणावा । बुद्धीनें तेथील आनंद जाणावा । जागृतींत त्याच आत्मयाकरितां ॥ ४९ ॥ एवं आत्मयाचकरितां । बुद्धीस बोलावी सचेतनता । आणि बुद्धीनेंचि ते आत्मसत्ता । ओळखावी ॥ ८५० ॥ जिभेच्या चालकतेवीण । अबोलणा ही ऐसी खूण । जिभेनेंचि बोलावी ऐसें निपुण । बुद्धीपलीकडे आत्मा ओळखती बुद्धीनें ॥ ५१ ॥ ह्मणोनि जगद्गुरु बोलतो । कीं बुद्धीपलीकडे तो तो । हा व्यतिरेक आणि येथेंचि सिद्ध होतो । अन्वय उपदेशणें ॥ ५२ ॥ एका वेगळें एक । पाहणें याचें नांव व्यतिरेक । जैसें दूध आणि उदक । हंस करिती दो ठायीं ॥ ५३ ॥ दूध उदक मिळवणें । दोन्हींस एकत्र करणें । हे तों अन्वयाची खूण । लोकरीती ॥ ५४ ॥ कीं पाणी दूध वेगळें दिसे । दूध पाण्यावेगळें कळों येतसे । आत्मानात्मव्यतिरेक अन्वय तैसे । न वोलवती ॥ ५५ ॥ कीं आत्मा स्वप्रकाश तत्त्वतां । अनात्मयास ह्मावीण नसे सत्ता । सुषुप्तींत दोहींचा आयता । हा विचार ॥५६॥ मिसळती तमोगुणीं । इंद्रियें मन बुद्धि देहाची श्रेणी । जागे होतां अनात्मपणीं । नव्हता प्रत्यय कांहींच ॥ ५७ ॥ आनंद मात्र आत्मा होता । तेचि

१ स्तब्ध रहाते, नाहींशी होते. २ जाणण्यास योग्य. ३ पंक्ति.

ह्मणावी. आत्मसत्ता । इंद्रियें मन बुद्धि देहवार्ता । जागृतींत स्फुरे त्याकरितां ॥ ५८ ॥ कीं जें सुषुप्तीचें सुख । त्यावीण कोण जाणे त्या जडातें आणिक । यालागीं अर्जुना देख । आत्मसत्ता ते एकचि ॥ ५९ ॥ एवं असों शके जें इतराविण । त्यांत सत्ता आहे ह्मणती प्रवीण । एकाकरितां स्फुरे त्यास निपुण । ह्मणती सत्ताविवर्जित ॥ ८६० ॥ जैसें तरंगावीण । उदक असे आपण । उदकावांचूनि न कळे खूण । तरंगाची ॥ ६१ ॥ पटावांचूनि तंतु असे । परी तंतूवांचूनि पट न गवसे । तेव्हां सत्ता तंतूस दिसे । पट सत्ताविवर्जित ॥ ६२ ॥ अलंकारावीण । असों शके सुवर्ण । सुवर्णावीण खूण । न कळे अलंकाराची ॥ ६३ ॥ तेव्हां सोनेंचि असे । अलंकार नसोनि त्यांत दिसे । आत्मयावांचूनि जड कांहीं न गवसे । आत्मा जडावेगळाही स्वप्रकाश ॥ ६४ ॥ एवं हे जितके दृष्टांत । त्यांत स्वयें स्फुरे तें अधिष्ठान निश्चित । ज्याच्या आधारें भासे तो विवर्त । रज्जूआधारें सर्प जैसा॥६५॥ या श्लोकें इंद्रियें पलीकडे । ह्मणतां स्थूलदेह आलीकडे । स्थूल इंद्रियें मन बुद्धि यांचा प्रत्यय घडे । जो बुद्धीपलीकडे ह्मणूनि बोलिला ॥६६॥ एवं बुद्धीपलीकडे आत्मा तो तों दोर । तो अनंत थोराहूनि थोर । त्यावेगळा वांझेचा पोर । प्रपंच सर्प सकळही ॥ ६७ ॥ त्या आत्मरज्जुवीण । नये जडप्रपंचाची खूण । तो आत्मा सुवर्ण ह्मणती निपुण । प्रपंच अलंकार ॥ ६८ ॥ तो आत्मा तंतु देखती । तदाश्रयें प्रपंच पट लेखिती । प्रपंच तरंग ओळखतीं । आत्मसमुद्र तयाचा ॥ ६९ ॥ एवं सकळापलीकडे । त्यावीण हें सकळही न सांपडे । अन्वयज्ञान ठायीं पडे । अनुभवियास या श्लोकीं ॥ ८७० ॥ या श्लोकीं इंद्रियें मन बुद्धि । एकापलीकडे एकाची सिद्धी । सांगतां होते गणना सिद्धी । सकळ तत्त्वांची ॥ ७१ ॥ इंद्रियें ह्मणतां पलीकडे । स्थूल घातलें जें आलीकडे । स्थूल पंचभूतें त्यांतचि घडे । गणना शब्दस्पर्शरूपरसगंधांची ॥ ७२ ॥ आकाशादि पंचक । शब्दादिक गुण एकाचा एक । एवं पाहतां गणनाविवेक । दहा तत्त्वें गेलीं स्थूलांत ॥७३॥ स्थूल टाकितां आलीकडे । दहा इंद्रियें बोलिलीं पलीकडे । हें वीस इंद्रियांपुढें सांपडे । मन एकविसावें तें बोलिलें ॥ ७४ ॥ मन ह्मणतां मनाचें कारण । तो अहंकार अहंस्फुरण । कार्यांत कारण आटलें हे खूण । तत्त्वज्ञ समजती ॥ ७५ ॥ तरंग ह्मणतां जल । आलेंचि गणनेंत केवळ । हें बावीस उरलें तत्त्वयुगुळ । बुद्धि चित्त हीं दोनी ॥ ७६ ॥महतत्त्व तें बुद्धि । अव्य-

क्ततत्त्व चित्त ऐसी प्रसिद्धी । काय कारणाची सिद्धी । बुद्धि कार्य तिचें कारण अव्यक्त ।।७७।। मन ह्मणतां एकवीस । त्याच्या कारणासहित बावीस । बुद्धि तेवीस परी जाली चौविस । तिच्या कारणा अव्यक्तास लेखितां ।। ७८ ।। जो बुद्धीपलीकडे आत्मा तो तो । ऐसें श्रीकृष्ण ज्यास ह्मणतो । तो पंचविसावा ह्मणतां लेखा होतो । सव्विसावियाचा ,त्यांतचि ।। ७९ ।। पंचविसावा ज्याचें प्रतिबिंब । तो सर्वगत सव्विसावा त्याचें बिंब । प्रतिबिंबास कैंचा अवलंब । विना बिंब करितां उपाधीवेगळें ।। ८८० ।। या श्लोकें तत्त्वें राहिलीं । तीं कार्यकारणत्वें गणनेंत दाविलीं । श्रुतींत स्पष्ट बोलिलीं । जे श्रुति सूचवी येथें श्रीकृष्ण ।। ८१ ।। ते श्रुति मागें याच श्लोकीं । लिहोनि वाखाणिली नाहीं कीं । आदीं श्लोकार्थ अभिज्ञ लोकीं । आद्यंत अवलोकावा ।। ८२ ।। आतां तेचि श्रुति । पुन्हा दावूनि अर्थस्थिती । बोलिजेल संक्षेपें यथामती । याउपरी ।। ८३ ।। श्रुति ।। इंद्रियेभ्यःपरा० ।। महतः पर० ।। श्रुत्यर्थ ।। परमपुरुषापासूनि आदीं प्रकृती । तेथूनि जडतत्त्वें जों हे क्षिती । ऐसी तत्त्वांची उत्पत्ती । उफराटा यांचा संहार ।। ८४ ।। संहार ह्मणजे प्रलय । प्रलयाचें प्रकारद्वय । एक प्रलय दुसरा निश्चय । अद्वैतबोधाचा ।। ८५ ।। प्रलयीं ब्रह्म एकचि उरे । उपदेशीं ब्रह्मचि सर्वही स्फुरे । ज्यास प्रपंच ह्मणती निजसुरे । तो होय नाहींसाच ।। ८६ ।। प्रलयकालीं ब्रह्मचि काळ । तेथें काळाचाही नसे विटाळ । गिळोनियां मायामृगजळ । ब्रह्मसूर्यचि उरे तेव्हां ।। ८७ ।। तें ब्रह्म प्रलयशेष । ज्ञानें कळावें तें निषेधशेष । कीं त्यावेगळीं तत्त्वें निषेधितां अवशेष । तेंचि उरोनि गिळी तत्त्वें ।।८८।। एवं स्थूलापुढें जें तें इंद्रिय । हेंच कीं श्रुतितात्पर्य । श्रीकृष्णें सूचवूनि केला निर्णय । कीं इंद्रियें पलीकडे स्थूलाहुनी ।। ८९ ।। श्रुति इंद्रियांहूनी । ह्मणते विषय पलीकडे ह्मणोनी । तेव्हां इंद्रियांआलीकडे स्थूलदेह हें सज्जनीं । या गीताश्लोकेंही समजावें।। ८९० ।। स्थूलीं निषेधलीं पंचभूतें । इंद्रियें दहा लिंगदेहीं निश्चितें । तीं इंद्रियें विषय घेतां चित्तें । समजावीं कल्पनेकरितां मनाच्या ।। ९१ ।। यालागीं इंद्रियें आलीकडे । विषय त्याही पलीकडे । एवं वीस तत्त्वांची गणना घडे । येथवरी जीं निषेधिलीं ।। ९२ ।। पंचभूतें निषेधिलीं स्थूलदेहा । निषेधितां आणि इंद्रियें तीं दहा । एवं पंधरा विषयपंचक हा । एवं वीस तत्त्वें अनात्मत्वें निषेधिलीं ।। ९३ ।। विषयापलीकडे मन । तें एकाविसावें निषेधी

वेदवचन । मनापलीकडे बुद्धि ह्मणतां गहन । अर्थ या बुद्धिशब्दाचा ॥ ९४ ॥ कीं महत्तत्त्व बुद्धीपलीकडे । त्या महत्तत्त्वास बुद्धिपण घडे । तेव्हां बुद्धिशब्दें ठायीं पडे । अर्थ अहंबुद्धि ह्मणोनी ॥ ९५ ॥ कीं तेरावा अध्याय । येथें करितां तत्त्वनिश्चय । तेथें महत्तत्त्व न लेखितां निर्णय । बुद्धींत दावील महत्तत्त्वाचा ॥ ९६ ॥ महत्तत्त्व ह्मणतां आली बुद्धि । कीं ब्रह्मा बुद्ध्यमानी हे प्रसिद्धी । कीं महत्तत्त्वाचीच रूपबुद्धी । चतुर्मुख ब्रह्मा ॥ ९७ ॥ एवं मनापलीकडे बुद्धी । ते अहंबुद्धिसत्त्वास अहंकारप्रसिद्धी । एवं तत्त्वगणनासिद्धी । बावीस संख्या येथवरी ॥ ९८ ॥ बुद्धीपलीकडे आत्मा आणि महत्तत्त्व । आत्मा ह्मणजे सूत्रात्मा त्रिगुणत्व । महत्तत्वास सूत्रात्मयास एकत्व । ह्मणुनी त्यापलीकडे दोनी श्रुति ह्मणे ॥९९॥ सृष्टीची प्रथम इच्छा जाली । ते त्रिगुणसूत्ररूपें प्रगटली । सूत्रात्मा ह्मणवूनि पावली । ते त्रिगुणेच्छा हें नांव ॥ ९०० ॥ इच्छा कीं सृष्टीकरण । तेथें प्रबळ क्रियाशक्ति रजोगुण । त्यास सूत्रात्मा नांव हे खूण । त्रिगुण सूत्राची ॥ १ ॥ परी इच्छा सृष्टि करावयाची । हे ज्ञानशक्तीवांचूनि कैंची । ज्ञानशक्ति सत्त्वगुणाची । तेव्हांचि नांव त्याचें महत्तत्त्व ॥ २ ॥ तें महत्तत्त्व जालें ब्रह्मा । सृष्टी करावी हा त्याचा महिमा । बुद्धि जे स्थावरजंगमा । ते सर्व अंश त्या महत्तत्त्वाचे ॥ ३ ॥ एवं मनापलीकडे अहंबुद्धि । त्या अहंकारा एकवीस तत्त्वाची कारणत्वसिद्धी । त्याच्याही कारणत्वाची प्रसिद्धी । महत्तत्त्वास बुद्धि ते ॥ ४ ॥ एवं मनासहित एकवीस । त्याच्या कारणा अहंकारासहित बावीस । त्याच्याही कारणा महत्तत्त्वासहित तेवीस । संख्या जाली येथवरी ॥ ५ ॥ सृष्टि करावी इच्छा ऐशी । जाली ब्रह्मीं शुद्ध सत्त्वासी । ते ईश्वरोपाधि तयासी । जाणावें अव्यक्त ॥ ६ ॥ त्या अव्यक्तशुद्धसत्त्वाचे अंश । तें चित्त ज्यांत प्रतिबिंबपुरुषाचा प्रवेश । मूळ अव्यक्ततत्त्वीं हृषीकेश । बिंब त्या प्रतिबिंबचिदंशाचें ॥ ७ ॥ यालागीं अध्यायीं तेराविया । लेखन अव्यक्ता तत्त्वासि या । चित्तावेगळें धनंजया । न सांगेल कीं तेंचि तें ॥८ ॥ अव्यक्तोपाधीनें देव । सर्वभूतीं वसे तो वासुदेव । ह्मणोनि वासुदेव स्वयमेव । दैवत चिदंश चित्ताचा ॥ ९ ॥ एवं महत्तत्ववरी तत्त्वें तेवीस । त्यापलीकडे अव्यक्त नांव ज्यास । त्यासहित जालीं चोवीस । पंचविसावा पुरुष त्यापुढें ॥ ९१० ॥ ऐसा बोलोनि व्यतिरेक । त्या एकीं अन्वयेंही

अनेक । पहावीं हाही श्रुति कांहींएक । अर्थ सूचवी चरणीं शेवटिल्या ॥ ११ ॥ श्रुति ॥ पुरुषान्न० ॥ श्रुत्यर्थ ॥ श्रुति शेवटीं ह्मणे कांहीं । त्या पुरुषापरतें नाहीं । तोचि परमगति ही । जे समजती तत्त्वविचार हा तत्त्वाचा ॥ १२ ॥ तो सकळांपरता । त्यापरतें हें किमपि नाहीं सर्वथा । कीं रज्जु-वेगळी सत्ता । सर्पास नसे ॥ १३ ॥ श्लोकार्थी अन्वय । तदनुरूप श्रुतीचा निर्णय । एवं आत्मत्त्वाचा ऐसा निश्चय । श्रीकृष्ण ह्मणे अर्जुना ॥ १४ ॥ या मागिलिया श्लोकीं । श्रीकृष्ण ऐसें बोलिला कीं । ज्ञानाहूनि आदि इंद्रियें जिंकीं । मग ज्ञानें मारीं या कामातें ॥ १५ ॥ तो ज्ञानप्रकार कैसा । अर्जुन ह्मणेल तरी ऐसा । परंतु हा ज्ञानमार्ग परिसा । परोक्षरीतीचा दाखविला ॥ १६ ॥ कीं या पुढिलिया श्लोकीं । अर्जुनाप्रति ह्मणेल कीं । ऐसा आत्मा जाणोनि काम पातकी । मारीं हा ॥१७॥ एथेंचि अपरोक्ष आत्मा तयाला । जरी ह्मणावा उपदेशिला । पुढिल्या अध्यायीं बोलेल बोला । कीं "तद्वि-द्धि प्रणिपातेन" ह्मणोनी ॥ १८ ॥ ह्मणूनि "किं तद्ब्रह्म" ऐसा प्रश्न । अ-ष्टमाध्यायीं करील अर्जुन । तेव्हां "अक्षरं ब्रह्म" हें वचन । अपरोक्ष उ-पदेशाचें बोलेल ॥ १९ ॥ त्याउपरि ज्या त्या वचनीं । "पश्य मे योगमै-श्वरं" ह्मणोनी । पाहें पाहें ह्मणूनि नवमापासूनी । अपरोक्षभावें बोलेल ॥ ९२० ॥ या एथें ज्ञानरीति । अनुभवियास तों अपरोक्ष वाटती । परी या शब्दाच्याच गती । न कळती श्रीकृष्णकृपा नसे तयांसी ॥२१॥ ऐसेंचि अर्जुना । शब्दचि ऐकों आले काना । परी अनुभवकळा मना । समजली नाहीं ॥२२॥ या पुढिलिया श्लोकीं । उत्तमश्लोक ह्मणेल कीं । ऐसें समजोनि आत्मा मग हा पातकी । मारीं काम ॥ २३ ॥

॥ श्लोक ॥ एवं बुद्धेः परं बुद्ध्वा संस्तभ्यात्मानमात्मना ।
जहि शत्रुं महाबाहो कामरूपं दुरासदम् ॥ ४३ ॥

इति श्रीमद्भगवद्गीतासूपनिषत्सु ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे श्रीकृष्णार्जुनसंवादे अर्जुनविषादयोगो नाम तृतीयोऽध्यायः ॥

॥ टीका ॥ पूर्वश्लोकीं ज्या विचारें । आत्मा बोलिलों त्या या प्रकारें । तूं जाण आत्मतत्त्व निर्धारें । अर्जुना ॥ २४ ॥ जाणोनि मारीं हा काम । क्रोध याच पापियाचें नाम । परंतु कळोनिही आत्माराम । होसी तरी मरेल हा पापी ॥ २५ ॥ या भावें ह्मणतो अर्जुना । बुद्धि करूनि त्या आत्मस्व-रूपीं मना । निश्चल करूनि शत्रुदमना । मारीं या शत्रुकामातें ॥ २६ ॥

पूर्वश्लोकीं तुज आदीं । बोलिलों कीं इंद्रियजयातें साधीं । ह्मणूनि ज्ञान जालियावरी तधीं । ह्मणीं आळस करसी ॥ २७ ॥ राजनीति पहिली शिकली असावी । राज्यप्राप्तीउपरि तेचि चाळावी । तरीच राज्यपदवी । जतन होते ॥ २८ ॥ शास्त्र कळलें मनास । त्याउपरी सोडी अभ्यास । तरी तें शास्त्र तयास । अंतर देणार निश्चयें ॥ २९ ॥ एवं ज्ञान जालियावरी । बुद्धि निर्मळ विवेकें बरी । शुद्धि करूनि त्या बुद्धीनें स्थिर करीं । आत्मस्वरूपीं मन ॥ ९३० ॥ अगा देहरथाचे घोडे इंद्रियें । मन वागोरे बुद्धि सारथि स्वयें । कीं मन इंद्रियें वागवावीं निश्चयें । बुद्धीचिया ॥ ३१ ॥ तरी बुद्धीपरता आत्मा समजोनी । त्याच निश्चयात्मक बुद्धीकरूनी । मग त्या स्वरूपीं योजूनी । मारीं वैरी हा काम ॥ ३२ ॥ जों मन न योजिसी स्वरूपीं । तों हा काम नाना विषयरूपी । होऊनि नाश करील पापी । आत्मानुभवाचा ॥ ३३ ॥ ह्मणूनि कामरूपी ह्मणावा । ज्ञानावांचूनि हा असाध्य गणावा । ज्ञानें आत्मरज्जु कळतां यावा । होय जैसा मिथ्या सर्पाचा॥३४॥ मग जरी पूर्वकर्मफळें । हा उपजला प्रारब्धाच्या बळें । तों रज्जूविस्मरणें क्षणैक व्याळें । मुख दाखविजे तैसा दिसेल ॥ ३५ ॥ सरतां प्रारब्धभोग । मागुती चित्चैतन्ययोग । तेव्हां यथापूर्व त्याआही योग । तत्काळ होय ॥ ३६ ॥ जन्मांतरीं निःष्काम कर्म । करूनि ईश्वरीं न अर्पिला धर्म । त्याच्या बळें भोगी ब्रह्म । स्फुरे भोगकाळीं हा ॥ ३७ ॥ कीं न करितां ईश्वरार्पित । फळबंध उपजला निश्चित । तें प्रारब्ध न करी कामासक्त । निष्काम संस्कारें ॥ ३८ ॥ या जन्मीं ईश्वरार्पण । कर्म करितां ज्ञानें जाला निपुण । तो त्या कर्मफळीं नव्हे आपण । भोगूनि ही कामीं आसक्त ॥३९॥ तथापि भोगीं काम । जरी देखिला तरी तो आत्माराम । नव्हे भ्रष्ट हा नेम । अधिष्ठानीं असतां सावध ॥ ९४० ॥ याकारणें अर्जुना । बुद्धीकरूनि मना । स्वस्वरूपीं योजूनि शत्रुदमना । महाबाहो मारीं या शत्रूतें ॥ ४१ ॥ ऐसा अध्याय तिसरा । येथें कर्मकलापाचा पसारा । न बाधी निष्काम परमेश्वरा । अर्पितां हा अर्थ जेथें सिद्ध जाला ॥ ४२ ॥ येथें मागुती मागुतीं । कृष्णीं कर्म अर्पितां परम गती । ऐसें स्वयें सर्व संतांची सद्गती । बोलिला श्रीकृष्ण ॥ ४३ ॥ अर्थ गीतेचा पाहे । तो सद्य हे पदवी लाहे । कीं दैवत एक हरीच आहे । मोक्ष कर्मे अर्पितां तयास ॥ ४४ ॥ पुढें अध्याय चतुर्थ।

१ दूरीभवन; निवृत्ति. २ कर्मसमूह.

तेथें ज्ञान कर्म दोनी अर्थ । निरूपील परमसमर्थ । स्वयें श्रीकृष्ण ।। ४५ ।। हें अध्यायार्थनिरूपण । त्याचे चरणीं समर्पण । करूनि चतुर्थाध्यायनिरूपण । करूं आतां ।। ४६ ।। ऐसें ह्मणतांही मन । लाजलें कीं स्वयें [1]कर्ता गरुडगमन । यालागीं उगेंचि करावें नमन । वामन ह्मणे ।। ९४७ ।।

।। वामनकृत संस्कृत श्लोक ।।

स्तनविषमपि दत्वा पूतनाया मृतत्वं व्रजति कथमजेऽस्मिन्न्यस्तकर्मामृतत्वम् ।
तदितरकृतकर्मप्राणिनां क्षिप्रबंधं जनयति विदितं तत्प्राप्य गीताप्रबंधम् ।। १ ।।

इति श्रीमद्वामनपंडितविरचितायां यथार्थदीपिकायां तृतीयोऽध्यायः ।।

## अध्याय चवथा.

श्रीमते भगवते भगवत्तमाय श्रीयदूत्तमाय नमः ।। जय जय जगदीश्वर । जय जय सकलेश्वरेश्वर । जय जय विश्वेश्वर । लक्ष्मीपते ।। १ ।। जय जय जगन्निवास । जय जय निखिलजगदाभास । जय जय श्रीनिवास । मायापते ।। २ ।। जय जय सकलरूप । जय जय सकलरूपातीतारूप । जय जय सच्चिदानंदस्वरूप । जगद्गुरो ।।३।। जय जय शेषफणिगुण । जय जयानंत कल्याणगुण । जय जय सगुण निर्गुण । पार्थसारथे ।। ४ ।। वंदूनि तुझे श्रीचरण । गीताचतुर्थाध्यायविवरण । करीन ह्मणतो शरण । सर्वभावें ।। ५ ।। सर्वही तूंचि हा ठसा । ठसावला तुझ्या कृपारसें मानसा । तो तूं गीताकारचि कैसा । टीकाकार नव्हसी ह्मणों मी ।।६।। आतां देवाधिदेवा । या मिसें शरणागताची सेवा । अंगीकारितोसि वासुदेवा । कर्त्ता स्वयें अकर्ता तूंचि ।।७।। पूर्वाध्यायाचे अंतपर्यंत । जो उपदेश करितां जाला अनंत । तो अनादि परंपरागत । ऐसें कळावें शिष्यास ।। ८ ।। तथापि स्वयें गुरु अनादि । ज्यापासूनि मोक्षमार्ग ब्रह्मादि । प्रवर्तविते जाले जगदादी । काळापासूनी ।। ९ ।। तोचि मी या मार्गाचा [2]प्रवर्तक । ह्मणोनि संप्रदायकौतुक । सांगतो श्रद्धाहेतुक । या श्लोकें ।। १० ।।

।। श्रीभगवानुवाच ।। इमं विवस्वते योगं प्रोक्तवानहमव्ययम् ।
विवस्वान्मनवे प्राह मनुरिक्ष्वाकवेऽब्रवीत् ।।१।।

।। टीका ।। अगा हा योग अव्यय । कीं ज्याचा कदापि न घडे व्यय ।

१ गरुडवाहन कृष्ण. २ चालविणारा.

अव्ययशब्दें अविनाशी तेव्हां निश्चय । कीं योग हा अनादि ॥ ११ ॥ कीं अनादि अविद्यालिंगदेह । याचा ज्ञानें नाश निःसंदेह । अनादीस नाश परंतु निर्वाह । कीं अविनाशीस आदि ह्मणवेना ॥ १२ ॥ नाश नाहीं जयास । आदि नाहींच तयास । या भावें ह्मणे योगास यास । कीं हा अव्यय ह्मणिजे अविनाशी ॥ १३ ॥ एवं हा जो सूर्य । त्यास मी हा योग अव्यय । बोलता जालों स्वयें अद्वय । पूर्वकाळीं ॥ १४ ॥ तो आपुल्या पुत्रा मनूला । श्राद्धदेव ह्मणावें जयाला । तयास हा योग बोलता झाला । दिवाकर³ ॥ १५ ॥ त्या श्राद्धदेवा मनूचा पुत्र । इक्ष्वाकुनामें पवित्र । त्यास हा योग विचित्र । तो⁴ बोलिला ॥ १६ ॥ तो योग भूमंडळा । येऊनि भूतळीं खंडला । अव्ययत्वें कोठें कोठें राहिला । ह्मणूनि ह्मणतो या श्लोकीं ॥ १७ ॥

॥ श्लोक ॥ एवं परंपराप्राप्तमिमं राजर्षयो विदुः ।
स कालेनेह महता योगो नष्टः परंतप ॥२॥

॥ टीका ॥ ऐसा परंपरेनें प्राप्त जाला । राजर्षि जाणती जयाला । त्यास काळ बहुफार क्रमला । आलीकडे ॥१८॥ प्रस्तुत हा योग या लोकीं । अगा अर्जुना नाशला कीं । या योगाचे जाणते वक्ते विवेकी । न दिसती कोण्ही यास्तव ॥ १९ ॥ एथें परंतपा ह्मणोनी । अर्जुनातें या नांवें करूनी । आळवी कीं यावरूनी । युद्ध करावें अर्जुनें ॥२० ॥ पर जे शत्रु त्यांस ताप । उपजविसी ऐसा तुझा प्रताप । तो तूं मानिसी संताप । झगडों कैसा ह्मणोनी ॥ २१ ॥ तरी हे सूर्यवंशींचे राजे । इक्ष्वाकुआदि ज्यांस ऐसें जे जे । त्यांचें भूमंडळीं यश विराजे । कीं ज्ञाते होऊनिही महायोद्धे ॥ २२ ॥ ज्ञान आणि स्वकर्म । दोन्ही रक्षावीं हा तुझा स्वधर्म । झणीं जाणोनियां ब्रह्म । कर्म टाकिसी हें युद्ध ॥ २३ ॥ ह्मणोनि ह्मणतां परंतपा । ज्ञान देऊनि चेतवी त्याच्या प्रतापा । आतां तो योग तुज बोलिलों ऐसी कृपा । दावूनि बोलतो या श्लोकीं ॥ २४ ॥

॥ श्लोक ॥ स एवायं मया तेद्य योगः प्रोक्तः पुरातनः ।
भक्तोसि मे सखा चेति रहस्यं ह्येतदुत्तमम् ॥३ ॥

॥ टीका ॥ जो सूर्यास मी सांगता जालों । तोचि योग आजि तुजला बोलिलों । योगामृतातें वर्षलों । कृपामेघें ॥ २५ ॥ कीं हा योग पुरातन । कल्पांतीं मजमाजीं होता जतन । मी योगनिद्रेपासूनि उठतां वचन । हेंचि

१ या योगास. २ सूर्य. ३ श्राद्धदेव. ४ सत्वर; तत्काल.

बोलिलों आदीं ब्रह्मयासीं ॥ २६ ॥ हें रहस्य ऐसें परम । तुज बोलिलों उ-त्तम । याकारणेंचि अगा निगम । प्रवर्तले सकळ ॥ २७ ॥ तो योग आ-जि या श्लोकीं । अर्जुनाकारणें बोलिलों कीं । तूं भक्त आणि सखा विवेकी अगा अत्यंत ॥ २८ ॥ आतां यापुढें श्लोक । तो पांडुपुत्र पुण्यश्लोक । बो-लेल त्याचें सुजलोक । निमित्त परिसोत ॥ २९ ॥ हा श्रीकृष्ण परमेश्वर । हें जाणोनि अर्जुन सादर । आळविता जाला वारंवार । मधुसूदना जनार्दना इत्यादि ॥ ३० ॥ तों तृतीयाध्याय सरतां । कृष्ण बोलिला कीं बुद्धीपरता । तो आत्मा जाणोनि चित्तैकाग्रता । करूनि मारीं हा कामशत्रु ॥ ३१ ॥ जरी बुद्धीपरता आत्मा तो ज्ञेय । तरी ज्ञेय तोचि परमेश्वर होय । इत-कियानें उठाला निश्चय । जो होता कृष्ण परमात्मा ह्मणोनी ॥ ३२ ॥ जरी तो आत्मा अर्जुनास होता अपरोक्ष । तरी विश्व जितकें प्रत्यक्ष । तें हें कृ-ष्णरूप दिसतें परंतु परोक्ष । हा उपदेश जाला पूर्वोक्त ॥ ३३ ॥ अर्जुनास एक ठावें । कीं ज्ञेय त्यास परमेश्वर ह्मणावें । गुरुमुखें वेदीं जाणावें । त्याच परमेश्वरा ॥ ३४ ॥ कृष्णचि परमात्मा तो । ह्मणूनि मी मानीत हो-तों । आतां याच्याच मुखें आइकतों । कीं आत्मा तो जो बुद्धीपलीकडे ॥ ३५ ॥ कृष्ण नव्हे परमेश्वर । इतका बुद्धीचा पदर । सांपडतां प्रकटले डोंगर । असंभावनेचे ॥ ३६ ॥ गुरु नव्हे सर्वेश्वर । इतका उठतां बुद्धिसमीर । खवळे अविद्यासागर । मग संशयतरंगां काय वाणें ॥ ३७ ॥ तों कृष्ण आणि अर्जुन । दोघांचा एक जन्मदिन । त्यास आठवूनि अर्जुनाचें मन । ह्मणे पुरातन गोष्टी कां याला ॥ ३८ ॥ कीं इक्ष्वाकु सूर्यपुत्राचा सुत । त्यास मरोनि काळ लोटला बहुत । हा कंस बंदिशाळे प्रसूत । जे दिनीं ते दिनींच उपजलों मीही ॥ ३९ ॥ त्या इक्ष्वाकुहीहूनी । पूर्वी सूर्यास स्वमुखेंकरूनी । बोलिलों हा योग ह्मणोनी । हा काय ह्मणतो ॥ ४० ॥ तरी याची भीड कायसी । हें न पुसों कां यासी । ह्मणोनि हेंचि अनादिपुरुषासी । संजय ह्मणे पुसतो अर्जुन ॥ ४१ ॥

॥ अर्जुन उवाच ॥ अपरं भवतो जन्म परं जन्म विवस्वतः ।
कथमेतद्विजानीयां त्वमादौ प्रोक्तवानिति ॥ ४ ॥

॥ टीका ॥ तुझा जन्मकाळ अलीकडे । सूर्यवंशिया रायाचें जन्म पलीकडे । ऐसें असोनि कैसें घडे । कीं आदिकाळीं तूं बोलिलासि हें त्यातें ॥ ४२ ॥ पिता आपणाचि पुत्र ह्मणोनि । स्पष्ट बोलिलें वेदवचनीं । अर्जुन

१ पलीकडे. २ बुद्धि हाच वायु. ३ कमताई.

ह्मणतो या भावेंकरूनि । कीं सूर्यास जरी तूं हें बोलिलासी ॥ ४३ ॥ तुझा जन्मदिवस अलीकडे । सूर्यवंशराजांचा जन्म पलीकडे । या भावें हें बोलणें तुझें न घडे । ह्मणे अर्जुन ॥ ४४ ॥ अन्यथा सूर्याची उत्पत्ति पलीकडे । आणि कृष्णाचा संभव अलीकडे । जाला तरी कां न घडे । उपदेश धाकट्यांच्या मुखें वडिलांसी ॥ ४५ ॥ देवहूति जननी । तिचा पुत्र कपिल मुनी । तीस तो स्वमुखेंकरूनि । सांगे तत्त्वोपदेश ॥ ४६ ॥ सूर्य वडील ह्मणोनी । उपदेश अघटित यावरूनी । अर्जुन बोलिला ह्मणतां येणेंकरूनी । बोल लागतो ग्रंथासी ॥ ४७ ॥ हें न पाहतां दीर्घदृष्टीकरूनी । सूर्यास पलीकडे जन्म तुजहूनी । याकरितां त्यास तूं वदलासि हें न घडे ह्मणोनी । ऐसें वाखाणूं नये एथें ॥ ४८ ॥ सूर्यास्तवचि सूर्याचा वंश । त्या राजयांचा मृत्युमुखीं प्रवेश । जाला त्यांस न बोलवे तुझा उपदेश ।कीं जन्म अलीकडे तुझा हा भाव ॥ ४९ ॥ एथें ऐसेंचि वाखाणावें । कीं अर्जुन बोलिला या भावें । ह्मणोनि ह्मणतो आह्मीं केवीं जाणावें । कीं आदीं बोलिलासि हें सूर्यातें ॥ ५० ॥ आतां याचें उत्तर । देतसे कृष्ण सर्वेश्वर । आपलें ईश्वरत्व अनादि चतुर । सुचवूनि बोलतसे श्रीभगवान ॥ ५१ ॥

॥ श्रीभगवानुवाच ॥ बहूनि मे व्यतीतानि जन्मानि तव चार्जुन ।
तान्यहं वेद सर्वाणि न त्वं वेत्थ परंतप ॥ ५ ॥

॥ टीका ॥ संजय ह्मणे धृतराष्ट्रराया । पूर्ण षड्गुणाच्या उत्तरा या । आईक भवसिंधु तराया । मृगजळप्राय करूनी ॥५२॥ कृष्ण ह्मणे आईक या बोला । कीं बहुत जन्म लोटले मला । आणि बहुत जन्म लोटले तुजला । अगा अर्जुना ॥ ५३ ॥ भाव कां कोणे एके पूर्वील जन्मीं । सूर्यास हा योग बोलिलों मी । नव्हते पडले मृत्यूच्या संयमीं । वंशज त्याचे ते समयीं ॥ ५४ ॥ ह्मणसी जन्म तुज जैसे । बहुत जन्म मजही तैसे । लोटले तुजचि कैसे । ठाउके तुझे ते जन्म ॥ ५५ ॥ तरी ते मी जाणतों सारे । तूं नेणसी अर्जुना अरे । आपले तुझे अवघे बरे । मी जाणें ते जन्म ॥ ५६ ॥ भाव कीं मी ईश्वर । भूत भविष्य वर्तमान माझे व्यापार । मी जाणें अनादि तुज विसर । नेणसी तूं यास्तव ॥ ५७ ॥ हाचि भाव मनीं । अर्जुनास ह्मणे परंतपा ह्मणूनी । कीं तूं जीवकर्मे करूनी । जन्मलासि शत्रुसंहाराकारणें ॥ ५८ ॥ हा भाव अर्जुन । समजला यालागीं कृपेचा घन । वर्षला ऐसें हें

१ कारण कीं. २ बंधनांत. ३ पूर्ववत समज.

शब्दजीवन । कीं भाव बोलवला मागुती तत्काल ॥ ५९ ॥ यथापूर्व जाला भावें । समजला कीं हा देवाधिदेव । बुद्धि पलीकडे जाणावा तो स्वयमेव । हाचि सर्वात्मा आत्मत्वें ॥ ६० ॥ ऐसा यथापूर्व सावध जाला । परि पुन्हां संदेह कांहीं उपजला । कीं हा ईश्वर तरी कैसे याला । नाना जन्म ॥ ६१ ॥ कीं आह्मांस जन्ममरण । लागलें कर्मानुगुण । हा अविनाशी ईश्वर आपण । कर्मबंधातीत ॥ ६२ ॥ हा भाव साक्षी बुद्धीचा । जाणोनि अवतारप्रकार साचा । बोलतो निगमसार स्ववाचा । या श्लोकीं ॥६३॥

॥ श्लोक ॥ अजोऽपि सन्नव्ययात्मा भूतानामीश्वरोऽपि सन् ।
प्रकृतिं स्वामधिष्ठाय संभवाम्यात्ममायया ॥ ६ ॥

॥ टीका ॥ अर्जुना वाटलें तुज । कीं हा जन्मशून्य अज । अविनाशी ईश्वर सहज । कैसा जन्मतो नसतां कर्मबंध ह्मणोनि ॥ ६४ ॥ तरी मी होऊनिही अज । आणि नसोनिही नाश मज । भूतांचा ईश्वरही सहज । असोनि मी स्वयें अनादि ॥६५ ॥ कर्मबंध मज नसे ह्मणोनी । अगा लेशही लेप नसोनी । आत्ममाया शुद्ध विद्या ती करूनी । आपली मूर्ति अधिष्ठूनि जन्मतों ॥६६ ॥ आत्ममायेकरूनि । आपली प्रकृति अधिष्ठूनी । मी जन्मतों ह्मणोनी । ह्मणतो येथें श्रीकृष्ण ॥ ६७ ॥ आत्ममाया ह्मणिजे । नित्य आत्मानुभवरूपिणी जे । जे अनादि ब्रह्मविद्या विराजे । मज निर्गुणीं निर्गुणत्वें ॥ ६८ ॥ निर्गुणीं आपण निर्गुण । हेंही न सांपडे खूण । ब्रह्म ह्मणणें आपण । हेही माया ॥ ६९ ॥ ते आत्ममाया ह्मणावी । तिचा मीच एक धनी गोसावी । तीचेकरूनि मी जन्मतों ठावीं । मज नसे अविद्या ॥७०॥ तुह्मां जीवांस अविद्येकरूनी । जन्म होतो ह्मणोनी । तीचेकरूनी मीही जन्मत असेन ह्मणोनि मनीं । झणीं मानिसी ॥ ७१ ॥ अविद्येचे तीन गुण । विषय देह तम जाण । इंद्रियें रजोगुण ऐसी खूण । मन बुद्धि चित्त सत्त्व ॥ ७२॥ तें सत्त्व निर्मळ । जैसा आरसा उज्ज्वळ । उरला भागही लोखंड केवळ । परि प्रकाश दिसे निर्मळत्वींच ॥ ७३ ॥ तैसा सत्त्व गुण । ब्रह्मीं त्याकरितां आत्मत्वाची खूण । इंद्रियें देह रजतमलक्षण । ब्रह्मरज्जूवरी सर्प जैसा ॥ ७४ ॥ रज तम इंद्रियें विषय । हे मिथ्या सर्प ऐसा निर्णय । सत्त्वदृष्टी भ्रममय । रज्जूच भासे सर्प जिला ॥ ७५ ॥ परिदृष्टि स्पर्शे रज्जूस । तेव्हां सर्प भासे तीस । तैसें भ्रमयुक्त सत्त्व आत्मयास । स्पर्शोनि देह इंद्रियें सात्र

१ समज. २ द्रष्टा ईश्वर. ३ वेदांचें रहस्य. ४ कलंक.

मानी ॥ ७६ ॥ ऐसा सत्त्व गुण । ज्यास्तव आत्मस्वरूपीं आत्मपण । परि अविद्याभ्रमाचें लक्षण । कीं देह मी ह्मणे अहंकारें ॥ ७७ ॥ त्या प्रसंगें मी कर्त्ता ह्मणोनी । त्रिगुणात्मकें कर्में करूनी । त्या कर्माचीं फळें नाना योनी । तुह्मां जीवां ॥ ७८ ॥ तैसें अविद्येंकरूनी । मज जन्म घेणें नसे ह्मणोनी । आत्ममायेंकरूनि जन्मतों या वचनीं । भाव इतुका सूचविला ॥ ७९ ॥ अतएव जे मूर्ति प्रकट करीतसें । तें रूपचि मी न मानी ऐसें । सोनेंच दिसतां कैसें । रूप साचें मानूं अलंकाराचें ॥ ८० ॥ या भावें करूनी।"प्रकृतिं स्वामधिष्ठाय" ह्मणोनी । बोले श्रीकृष्ण या वचनीं । अर्थ भावार्थही ऐसा ॥ ८१ ॥ कीं प्रकृति ह्मणिजे आकृती । ते स्वप्रकृति ह्मणिजे स्वस्वरूपमूर्ती । अलंकारीं सुवर्णस्फूर्ती । तैसी प्रतिमा अधिष्ठुनि जन्मतों ॥८२॥ अधिष्ठुनि आकार । सोनेंचि प्रकटे निर्विकार । तैसा साकार मी दिसोनि निराकार । अगा प्रकटतसें ॥ ८३ ॥ ह्मणसी सर्वदेहीं तूं ऐसा । तरी या रूपींच हा विशेष कैसा । तरी त्या देहीं अविद्यांश जैसा । तैसा शुद्धसत्त्वीं माझ्या असेना ॥ ८४ ॥ अतएव आत्ममायेंकरूनी । मी संभवतों ह्मणोनी । तुज बोलिलों यावरूनी । विशेष इतरांहूनि हा समज ॥ ८५ ॥ अविद्या आणि कर्मबंध । नसतां कांहींच संबंध । मी जन्मतों ज्यास गंध । ठावा नसे पंचभूतांचा ॥ ८६ ॥ ईश्वरावतार देह । पांचभौतिक नव्हे निःसंदेह । हा येथेंच नवमश्लोकीं संदेह । निरसेल सकळांचा ॥ ८७ ॥ आतां याही पुढें श्लोक । तो कां बोले उत्तमश्लोक । त्याचें निमित्तही साधुलोक । परिसोत आतां ॥ ८८ ॥ पूर्वश्लोकार्थ भाव । परिसतां हा स्वयमेव । देहधारी देवाधिदेव । अर्जुन ऐसें समजला ॥ ८९ ॥ ऐसें समजला परी । ह्मणे मनीं कीं कां परी । हा देह धरितो ह्मणूनि हरि यावरी । प्रयोजन सांगतो या श्लोकीं ॥९०॥

॥ श्लोक ॥ यदा यदा हि धर्मस्य ग्लानिर्भवति भारत ।
अभ्युत्थानमधर्मस्य तदात्मानं सृजाम्यहम् ॥ ७ ॥

॥ टीका ॥ जे जे काळीं धर्महानी । होते अधर्माच्या बळेंकरूनी । ते ते काळीं देहधारी होऊनी । प्रकटतों निर्मितों आपणातें ॥ ९१ ॥ आपणातें आपण । निर्मूनि काय करितो निपुण । तेंही सांगतो स्वाचरण । या भावें बोलतो हा श्लोक ॥ ९२ ॥

॥ श्लोक ॥ परित्राणाय साधूनां विनाशाय च दुष्कृताम् ॥
धर्मसंस्थापनार्थाय संभवामि युगे युगे ॥ ८ ॥

---

१ पंचभूतांपासून झालेला.

॥ टीका ॥ अगा होतां धर्माची क्षीणता । होतसे साधूंस दुःखचिंता । अधर्म वृद्धीतें पावतां । पापी लोक प्रबळ होती ॥ ९३ ॥ त्या साधूंस माझें स्मरण । माझा तरी कल्पवृक्षाचा गुण । मातें स्मरे जो निपुण । मी त्यास पावतों स्वभाव हा माझा ॥ ९४ ॥ त्या साधूंचीं संरक्षणें । अगा करावया कारणें । मज लागतें देह धरणें । युगायुगाप्रती ॥९५॥ त्यामुळें जे पाप करणार । त्यांचा करावा लागतो संहार । कीं न नाशतां अंधकार । प्रकाश नेत्रांचा घडेना ॥ ९६ ॥ एवं साधुसंरक्षण । संहारावे पापी जन । या दों गोष्टींकारण । युगयुगाप्रति संभवतों ॥ ९७ ॥ संहारितों पापी जन । साधूंचें होत दुःखशमन । धर्माचें होत संस्थापन । हें प्रयोजन तीसरें ॥९८॥ प्रतियुगीं धर्माची हानी । अगा होते म्हणोनी । मींही प्रतियुगीं अवतरोनी । धर्म धार्मिक रक्षितों ॥ ९९ ॥ कैसा जन्मतो ईश्वर । तो पूर्वश्लोकीं प्रकार । किंनिमित्त करितो अवतार । तरी तें वर्णिलें या दों श्लोकीं ॥ १०० ॥ आतां यापुढें श्लोक । तो कां बोले उत्तमश्लोक । त्याचें निमित्त विवेकी लोक । आइकोत बरव्या प्रकारें ॥ १ ॥ तिन्ही अवतारप्रयोजनें । आइकिलीं बरीं अर्जुनें । परंतु शंका येथें मनें । घेतली ते उपयोगी जगासी ॥ २ ॥ कीं साधूंचें पालन । आणि दुष्टांचें निर्दलन । आणि तिसरें धर्माचें स्थापन । काय कठिण या ईश्वरा ॥ ३ ॥ कीं याच्या संकल्पमात्रें । ब्रह्मांडे अनंतें विचित्रें । उपजती नाशती आणि मायासूत्रें । नाचवी बुद्धि सर्वांच्या ॥ ४ ॥ हीं तीन कामें तयास । करावया काय प्रयास । संकल्पमात्रें जयास । सुखसाध्य कार्यें हीं तिन्हीं ॥ ५ ॥ काळचक्र ज्याचें आयुध । त्याणें कां दैत्यांशीं करावें युद्ध । जो संकल्पमात्रें नव्हतां क्रुद्ध । संहरी ब्रह्मांडें शतकोटी ॥६ ॥ स्वयें अनादि अज । म्हणवी देवकीवसुदेवांचा आत्मज । नित्य विरक्त जो सहज । सहस्र सोळा स्त्रिया कां तयासी ॥७ ॥ चराचरीं ज्याचा वास । तो येतो हास्तिनपुरास । द्वारकेंत म्हणती तयास । कीं येथें नाहीं श्रीकृष्ण॥८॥ पाहतां दूरदृष्टीं । अवतारप्रयोजनाच्या गोष्टी । बोलिला त्या वारा मुष्टीं । धरूनि दीधला मज मूर्खांसी ॥९॥ हे तों मूर्खसमजावणी । करितो हा चक्रपाणी । अर्जुन ऐसा अंतःकरणीं । साशंक जाला ॥११०॥ सर्वसाक्षी देव । समजोनि हा शिष्याचा भाव । तो पुसे तों स्वयमेव । हांसोनि बोलतो हा श्लोक ॥११॥

॥ श्लोक ॥ जन्म कर्म च मे दिव्यमेवं यो वेत्ति तत्त्वतः ॥
त्यक्त्वा देहं पुनर्जन्म नैति मामेति सोर्जुन ॥ ९ ॥

॥ टीका ॥ अगा अवतारीं मुख्य कारणें । हींचि कीं जन्मकर्ममर्मातें तारणें । जन्ममृत्युदुःखें निवारणें । अनादि या जीवांचीं ॥ १२ ॥ सर्वांसहीं उपायांतर । मी करूं शकें सर्वेश्वर । परी जीवांचा दुःखसंसार । या रोगास औषध हेंचि एक ॥ १३ ॥ तुटावया संसारव्यथा । औषध नाहींच अन्यथा । माझ्या चरित्रामृतकथा । या व्यथेतें नाशिती ॥ १४ ॥ वाढवावया कथारस । या गोष्टी दिसती सुरस । ज्या पूर्वश्लोकीं बोलिलों मी श्रीनिवास । तुजप्रती ॥ १५ ॥ मुख्य अवतारप्रयोजन । तें सांगाया पूर्वोक्तवचन । बोलिलों कीं रक्षावया साधुजन । वधावया दुष्ट धर्म संस्थापावया ॥ १६ ॥ कीं भूमीस भार जाला । तें बोलिली विधातयाला । तो मज शरण आला । कीं करावें स्थापन धर्माचें ॥ १७ ॥ तेव्हां देवकीच्या उदरीं । मी जन्मलों श्रीहरी । ऐसें वर्णितां अलौकिक परी । गंभीर माझी पुराणें वर्णिती ॥ १८ ॥ कीं प्राची दिशा स्वोदरीं । जैसी पूर्णचंद्रातें धरी । देवकी श्रीकृष्णास यापरी । धरिती जाली उदरांत ॥ १९ ॥ लोकांसारिखीं माझीं जन्में । लोकांसारिखीं माझीं कर्में । नव्हती हीं दिव्यें ऐसीं वर्में । सांपडती वेदीं पुराणीं ॥ २० ॥ तेथें अवताराचीं कारणें । बोलिलीं कीं साधूंतें संरक्षणें । आणि दुष्टांतें मारणें । स्थापणें धर्म ॥ २१ ॥ म्हणोनि हीं तुजलागीं । निमित्तें बोलिलों कीं त्या प्रसंगीं । चिंतिल तुझिया अंतरंगीं । कीं अलौकिकें जन्मकर्में ईश्वराचीं ॥ २२ ॥ दों परी कथाश्रवण । एक समजोनि एक मूढपण । मूढपणेंही आपला गुण । कथामाजी दावितीच ॥ २३ ॥ कीं नेणतांही मलिन । अग्नीवरी पडे आपलें वसन । तरी त्याचें होय दहन । पाप ऐसें कथामृतें ॥ २४ ॥ नकळत अरण्यांतील पाला । शाक म्हणोनि जरी भक्षिला । तरी तो गुण आपला । करीच कीं ॥ २५ ॥ घृत दुग्ध पुष्टिकारक । हें नेणे जरी बाळक । तथापि पुष्ट होतें तें कौतुक । वस्तुमहिमेचें ॥ २६ ॥ माझ्या कथांचा अद्भुत गुण । न कळोनिही घडे श्रवण । तरी पवित्र न करिती ऐसें कवण । बोलों शके ॥ २७ ॥ परंतु दिव्यें माझीं चरित्रें । लोकांसारिखीं नव्हती निश्चितें । ऐसें समजे जो त्यातें । मोक्षचि होय ॥ २८ ॥ माझें जन्म दिव्य सकळ । जो जाणेल त्यास हें फळ । कीं जन्म न पावे तो केवळ । मजचि पावे ॥ २९ ॥ अगा मज पावला । त्याचा कर्मबंध अवघा नासला । म्हणोनि जन्मा नाहीं आला । पुनरपि ॥ ३० ॥ माझें जन्म तत्त्वतां । दिव्य ऐसें कळतां । पुन्हा जन्म

१ ब्रह्मदेवाला. २ प्रकार; रीती. ३ चमत्कारिक, अलौकिक.

नाहीं पांडुसुता । अगा जे रीती ॥३१॥ कळतां दिव्य माझें कर्म । तुटे कर्मबंध हें वर्म । एवंच जाणावें जन्म कर्म । दिव्य माझें ॥३२॥ पंचभूतदेहसंबंध । त्यास निमित्त कर्मबंध । तरी मज टावका नसे गंध । कर्मनिमित्ता अहंकाराचा ॥ ३३ ॥ जो स्वयें परिमित । त्यास तें अहंकार निमित्त । कीं मी एवढा तें हेतु निश्चित । परिमितपण कर्मासीं ॥ ३४ ॥ मी अनंत अपरां पर । मज न सांपडे अहंकाराचा पदर । आणि ठाव नाहीं कीं जेथें मी ईश्वर । कर्में करूं ॥ ३५॥ बाहेर ना आंत । आणि आदि ना अंत । कर्में तो मी अनंत । केवीं करूं ॥३६॥ न उपजतां कर्म । न घडे पंचभूतदेहजन्म । शुक्रशोणित-संबंधधर्म । कर्मानुबंधें ॥३७॥ म्यां कर्म करावें । तरी कोठूनि कोठें जावें । काय घ्यावें काय टाकावें । मीच अवघा ॥३८॥ कोणाशीं मी बोलों । कोण्या मार्गें कोठें चालों । ऐसा अद्वय असतां पोटा आलों । कैसा कोणाच्या ॥३९॥ देवकी कौसल्या अदिती । अनुसूया[१] त्रिकुटा[२] देवहूती[३] । रेणुका पृश्नी[४] सत्य-वती[५] । इत्यादि माता माझिया ॥ १४० ॥ यांच्या पोटीं जगन्निवास । कैसा सांठवलों कीं गर्भवास । मज घडला ह्मणावा नवमास । कर्मबद्धां परिमितां जिवांसारिखा ॥ ४१ ॥ अगा सर्वगत अवकाश[७] । आहेच सर्वघटीं आकाश । मजवांचूनि कैंचा चित्प्रकाश[८] । पोटीं देवकीकौसल्यादिकांच्या ॥ ४२॥ आहेंच त्यांच्या उदरीं । जो मी वसतों चराचरीं । पुराणें बोलती यापरी । मज गर्भवास ॥ ४३ ॥ अलिप्त सर्वत्र असोनि । आकाश तैसा मी सर्व गर्भीं वसोनि । अलिप्त साक्षी न स्पर्शोनी । असें सर्पांत रज्जु जैसा ॥ ४४॥ तंतु नातळे पटातें । माती न शिवे घटातें । मी जगत्कारण संकटातें । न शिवें गर्भीं असोनि गर्भाच्या ॥ ४५ ॥ जीवांचिया मती । प्रपंच साचा मानिती । रज्जु नेणतां भीती । मिथ्या सर्पाची ॥४६॥ आणि ते माझे प्रतिबिंबांश । जळीं जळापुरताच अवकाश । त्या जीवां घडों शके प्रवेश । कर्म-बंधें गर्भीं मातेच्या ॥ ४७ ॥ पित्याच्या देहीं रिघोनी । त्याच्या वीर्यासवें तेथूनी । मातेच्या शोणितीं मिसळोनी । अवयव पावती गर्भांत ॥४८॥ देह वाढे जैसा । प्रतिबिंबांश वृद्धि पावे तैसा । त्यास गर्भवास ऐसा । घडों शके ॥ ४९ ॥ जीवांस पंचभूतशरीरें । त्यांस गर्भवास या प्रकारें । मी स्वेच्छा

---

१ रेतरक्त. २ दत्तात्रयाची माता. ३ रैवतमन्वंतरांतील विष्णूचे अवताराची माता. ४ कपिलाची माता. ५ सुतपा. प्रजापतीची स्त्री हीच पुढें कृष्णमाता देवकी झाली. ६ व्यासमाता. ७ अंतर. ८ चैतन्यप्रकाश.

कल्पित आकारें । असतों मनीं पित्याच्या मातेच्या ॥ १५० ॥ योगी मातें ध्यानीं । ध्याती जैसे कल्पूनि मनीं । तैसा स्वेच्छेंकरूनि । मूर्ति कल्पितों मनीं पित्याच्या मातेच्या ॥ ५१ ॥ पंचभूतें ही माझीच कल्पना । परि त्या देहांस हा महिमा येना । कीं जीवाचिया । कर्मबंधना । कारणें तीं म्यां कल्पिलीं॥५२॥अविद्येनें कर्में करिती । ते या पंचभूतांचे देह धरिती । अनादि संकल्प ये रीती । पंचभूतें कल्पितां ॥५३॥ अगा लोखंडाच्याच शृंखळा करिती । आणि लोखंडांचींच शस्त्रें घडिती । परि तीं शस्त्रें त्या शृंखळा तोडिती । जेव्हां सोडिती बंधासी॥५४॥माझीच कल्पना पंचभूतें । ज्या पंचभूतांचीं शरीरें अद्भुतें । मनुष्य देहांच्या कर्में बहुतें । जे अविद्येनें भोगिती हे जीव ॥ ५५ ॥ ते अविद्या आणि संचित । क्रियमाण कर्मांसहित । नाशावया निश्चित । संकल्प करूनि कल्पितों हे अवतार ॥ ५६ ॥ इत्यादि माझ्या जन्मरीती । अलौकिक दिव्य माझ्या मूर्ति । ऐसें जाणोनि माझ्या अवतारकीर्ती । जे गाती ऐकती निरूपिती ॥ ५७ ॥ ते पुन्हा जन्मा न येती । देह टाकूनि मातेंचि पावती । मुख्य अवतारप्रयोजनरीती । अर्जुना या माझ्या ॥ ५८ ॥ या भावें श्रीपती । बोलिला अर्जुनाप्रती । कीं माझे जन्म दिव्य ऐसें जे जाणती । ते जन्मा न येती पावती मजलागीं ॥ ५९ ॥ ऐसेंचि दिव्य कर्म । कीं हें सगुण ब्रह्म । विना अविद्या अहंकारभ्रम । कर्म घडे तें ईश्वराचें ॥ १६० ॥ कीं हा अपादपाणी[1] । ह्मणोनि बोले वेदवाणी । हा स्वमायेंकरूनि चक्रपाणी । कर्में दावी जगदीश्वर ॥ ६१ ॥ याणें केल्या बाइला । लोकरीती वर्तवी त्या स्त्रियांला । आणि लेंक लेंकीही यांला[2] । परि नसे यास कर्मबंध ॥ ६२ ॥ जीव पूर्वकर्माच्या बळें । पावती पुत्रकलत्रादि फळें । तो कर्मबंध समूळें । नसे याला ॥ ६३ ॥ लोकदृष्टीं कर्में दावी । परी अकर्त्ताचि गोसावी । ऐसीं दिव्यकर्में समजावीं । अगा माझीं ॥ ६४॥ या भावें ह्मणे हरी । कीं माझें दिव्य कर्म यापरी । ऐसें समजे तो गर्भकुहरीं[3] । न रिघे पावे मजाचि तो ॥ ६५ ॥ मुख्य अवतारप्रयोजन । ऐकोनि निःसंदेह जाला अर्जुन । तथापि शंकित जालें मन । कांहींसें ॥६६॥कीं याचें दिव्य जन्म । आणि दिव्य याचें कर्म । समजे त्यास मोक्ष हा नेम । स्वयें हाचि करितो ॥ ६७ ॥ आणि मोक्ष तरी विना ज्ञान । नव्हे ऐसें वेदांचें वचन । तेव्हां जें बोलतो कमलनयन । हें केवीं घडे ॥ ६८ ॥ ऐसा मनांतील भाव । जाणोनि

---

१ करचरणरहित. २ अपत्यें, स्त्रिया वगैरे. ३ गर्भस्थानीं.

बुद्धिसाक्षी देव । उत्तर देतो देवाधिदेव । संदेह आणीकही निरसूनी ॥६९॥ कीं खरेंचि ज्ञानावांचूनि मुक्ति नाहीं । आणि दिव्य जन्मकर्म जाणणें हेंही । विना ज्ञान न कळे कांहीं । दिव्यपण माझ्या जन्मकर्माचें ॥ ७० ॥ या-कारणें हरी । उत्तर देतो या श्लोकाचभीतरीं । एका शब्दें दोन्ही सूचवी यापरी । कीं "एवं यो वेत्ति तत्त्वतः" ॥ ७१ ॥ अगा तत्त्व ह्मणिजे आत्मसत्त्व या-स्तव । जन्मकर्म दिव्य ऐसें वास्तव । जाणे त्याचें हें प्रतिवैभव । बोलिलों तुज ॥ ७२ ॥ कीं आत्मा जरी कळे । तरी लिंगदेह तेव्हां जळे । ज्ञानाग्नीतें आतळे । चित्त जेव्हां ॥ ७३ ॥ आत्मयाकारितांच चित्त । सर्वदा प्रकाशे निश्चित । तेंचि गुरुमुखें अधिगत । जालें यासी ॥ ७४ ॥ परंतु जेव्हां समाधी । चित्तवृत्तिनिरोधें साधी । कीं सर्वही ब्रह्म या सर्वात्मबोधीं । चित्त थारे ॥ ७५ ॥ या समाधि दोन्ही । एक तरी बाणे या दोहींतूनी । तरीच सुटे जन्मकर्मबंधापासूनी । पक्कज्ञानी तथवां ॥७६॥ आत्मा कळोनिही तो । शब्दज्ञानीच बोलिजेतो । अनुभवी तेव्हां जेव्हां पावतो । समाधीतें ॥७७॥ समाधिप्राप्तीकारणें । दोंपरी लागे यत्न करणें । एक निर्गुणअंतःकरणें । प्रयत्नें ध्यातां ॥ ७८ ॥ त्यास हें सगुणगुणकीर्तन । अथवा सगुणमूर्तीचें ध्यान । जन्मकर्म दिव्य हें चिंतन । असेना ॥७९ ॥ नित्य निर्गुणत्वेंचि ध्या-ती । त्यांस अव्यक्तोपासक ह्मणती । हें द्वादशाध्यायाच्या ठायीं श्रीपती । विशद बोलेल ॥ ८० ॥ आणि आत्मा कळोनी । जे तत्पर सगुणभजनीं । अवतारगुणश्रवणकीर्तनीं । जे सादर ॥ ८१ ॥ तें भगवंताचें जन्म दिव्य । आणि दिव्य कर्म कर्तव्य । तत्त्वविचारें जाणती कीं सेव्य । निर्गुणत्वें सगुण ज्यांला ॥ ८२ ॥ ते ज्ञानी सगुण भक्त । भजोनि नव्हती विभक्त । सेव्य-सेवक अविभक्त । जयांतें ॥ ८३ ॥ भक्त आणि ज्ञानी । तो श्रेष्ठ सकळां-हूनी । तो अनायासें मोक्ष पावे ह्मणोनी । द्वादशीं श्रीकृष्ण बोलेल ॥ ८४ ॥ न करितां वृत्तींचा निरोध । आयताच बाणे समाधिबोध । हरिगुणकीर्तनश्र-वणें शोध । अनायासें होय चित्ताचा ॥ ८५॥ निर्गुणोपासकां श्रम । अपार ध्यातां केवळ ब्रह्म । जे निर्गुण कळोनि सगुण ब्रह्म । भजती अनायासें स-माधि तयांसी ॥ ८६ ॥ त्यांसि हाचि उपाय थोर । जो या श्लोकीं बोले स-र्वेश्वर । कीं दिव्य जन्मकर्म माझें ऐसें जो नर । जाणे तो पुन्हां जन्मा न ये मज पावे॥८७॥या भावें हरी । या श्लोकाचे भीतरीं। ह्मणे धरूनि हा भाव

१ खरेपणें. २ अवगत, प्राप्त.

अंतरीं ।·कीं 'एवं यो वेत्ति तत्त्वतः' ॥८८॥ आतां ज्ञानेंचि मोक्ष होणार । तरी जन्मकर्म दिव्य हा प्रकार । कळणें याचा काय बडिवार । कोणी ह्मणतील एथें ॥ ८९ ॥ तरी आत्मा कळल्याच वरी । निर्गुणोपासकां श्रम नानापरी । ते प्रयास न लागतां हरी । गति ह्मणे यांस ज्ञाचि बडिवार ॥ १९० ॥ यानिमित्त पूर्वापार । गीतावाक्याचा विचार । करूनि केला निर्धार । ये रीती ॥ ९१ ॥ ज्ञान जालिया वरी । सगुणगुणभजन कां पैरी । बोलती कोण्हीं या प्रकारीं । तरी ज्ञानपरिपाकार्थ हा सिद्धांत ॥ ९२ ॥ हें मुख्य अवतारप्रयोजन । हें भागवतीं प्रतिपदीं वर्णन । तें येथें आणितां मन । ग्रंथविस्तारें शिणेल श्रोतयांचें ॥ ९३ ॥ हें अवतारांचें मुख्य कारण । परिसतां अर्जुनाचें अंतःकरण । समाधान पावलें पुढें निरूपण । या प्रसंगींच होतें या श्लोकीं ॥ ९४ ॥

॥ श्लोक०॥ वीतरागभयक्रोधा मन्मया मामुपाश्रिताः ।
बहवो ज्ञानतपसा पूता मद्भावमागताः ॥ १० ॥

॥ टीका ॥ अगा आत्मा कळल्या ज्ञानियाचें । तप थोर हेंचि साचें । कीं दिव्यत्व माझ्या जन्मकर्मांचें । जाणोन करी श्रवण कीर्तन ॥ ९५ ॥ यास ह्मणावें ज्ञानतप । या तपाचा अद्भुत प्रताप । कीं सकळां पापांचें मूळ पाप । अनादि वासना ते नासे ॥ ९६ ॥ आगंतुक पाप मात्र । नासे ज्याचेंनी ह्मणावा पवित्र । परंतु पापमूळ वासना अपवित्र । असतां न पात्र परंपदा ॥ ९७ ॥ ह्मणोनि ह्मणे कमलनेत्र । कीं या ज्ञानतपें पवित्र । ते पुन्हां जो गर्भवास अपवित्र । नातळती तयासी ॥ ९८ ॥ कीं पावले माझिया भावासी । मद्रूप होऊनि वैकुंठवासी । किंबहुना जितांच तयांसी । मुक्ति आणि भक्तिही माझी ॥ ९९ ॥ कीं ज्ञान जालियावरी । जितांच मुक्ति व्हावी परी । काम क्रोध आणि भय वैरी । हे जों तों न ह्मणवे जीवन्मुक्त ॥ २०० ॥ जे पवित्र या ज्ञानतपें । कामक्रोधभयें त्यांचीं त्या प्रतापें । गेलीं ज्या आत्मज्ञानियास सोपें । भजन जन्मकर्मांचें माझिया ॥ १ ॥ जयाचा काम गेला । कीं विषयानुराग न असे ज्याला । तेव्हां भय कैंचें तयाला । क्रोध किमर्थ उपजेल ॥ २ ॥ ऐसे ते वीतरागभयक्रोध । हा त्यांच्या जीवन्मुक्तदशेचा शोध । यास कारण विश्वात्मबोध । त्यासही कारण भजन भगवज्जन्मकर्मांचें ॥ ३ ॥ हे दोन्ही सूचवूनी मन्मय आणि

१ पाड, मोठेपणा. २ रीति. ३ पावत नाहींत. ४ गत.

मदुपाश्रित ह्मणोनी । ह्मणे श्रीकृष्ण या वचनीं । अर्थ दोन्ही हे विशद ॥ ४ ॥ मन्मय ह्मणिजे मी ईश्वर । जो माझा नित्य अनुभवप्रकार । चित्त ज्यांचें तदाकार । ते मन्मय ह्मणावे ॥ ५ ॥ सर्व भूतें आपणांत । मृगजल जैसें किरणांत । जे या माझ्या अनुभवांत । ते मन्मय ह्मणावे ॥६॥ 'मन्मया' या वचनीं । ऐसा भाव हा यावरूनी । कीं याच अध्यायीं पुढे कृपेंकरूनी । हेंचि बोलेल ॥ ७ ॥ कीं अर्जुना संतांच्या मुखें । ज्ञान जालिया मग सुखें । सर्व भूतें विश्वतोमुखें । आपणामध्यें अशेष देखसी ॥ ८ ॥ ऐसिया सर्वात्मकपणातें । पावसी तेव्हां आपणातें । मज माजी देखसी या खुणेतें । समजणें मजशीं तेंचि ऐक्य ॥ ९ ॥ पुढें याच अध्यायांतरीं । हेंचि बोलेल परी । तें स्थळ कळावया या अवसरीं । लिहिजेल संगती पुढील श्लोकार्धा ॥ २१० ॥ पुढील श्लोकार्ध ॥ येन भूतान्यशेषेण द्रक्ष्यस्यात्मन्यथो मयि ॥टीका ॥ हें पुढें आइकेल धनंजय । प्रस्तुतीं ह्मणे कीं ते मन्मय । काम क्रोध आणि भय । गेलीं जयांचीं हीं तिन्हीं ॥११॥ एवं विश्वात्मकत्व । जयास त्यास ह्मणे मन्मयत्व । यासही कारण जाणोनि आत्मत्त्व । माझा आश्रय जरि असे ॥१२॥ ह्मणे या भावेंकरूनी । कीं ते मदाश्रित ह्मणोनी । भाव कीं दिव्य जन्में कर्में जाणोनी । श्रवण कीर्तन माझें करिती ॥ १३ ॥ मीचि तारक ऐसा । ज्यांस सर्वथा भरंवसा । आयता आत्मप्रीतीचा ठसा । उमटे चित्त शुद्ध होतां गुणीं माझ्या ॥ १४ ॥ प्रीति ज्याची धरी चित्त । तेथें आत्मयास सुख व्हावें हें निमित्त । स्त्री पुत्र गृह वित्त । आवडती आत्मयाकारणें ॥१५ ॥ ज्यांची ज्यांची आवडी । त्यां त्यांची कधीं तरी नावडी । होणार परी न दिसे ते घडी । कीं जेंत अप्रिय वाटेल हा आत्मा ॥ १६ ॥ आत्मप्रीतीचा ऐसा । आयता अनादि चित्तावरी ठसा । परी विषयवासनेचा वळसा । ठसा झांकला तो यामुळें ॥ १७ ॥ अविद्यासंस्कारें मलिन चित्त । ठसा आत्मप्रीतीचा यानिमित्त । मलिन जाला तो उमटे निश्चित । हरिगुणें चित्त क्षालितां ॥ १८ ॥ आत्मत्व जेव्हां कळलें । अविद्या आवरणें तेव्हां गेलें । परंतु विस्मृतींत शेष उरलें । संस्कारें देहात्मतेच्या ॥ १९ ॥ जेव्हां हा सगुणाचे गुण । दिव्य समजोनि निपुण । गाई आणि नाचे आइके जों तों खूण । बाणों लागे आत्मस्वरूपस्थितीची ॥ २२० ॥ विषयप्रीति तों तों दुरावे । आत्मप्रीति तों तों ओलावे । चराचरतरंगांसहित

१ उघड. २ सर्वत्र. ३ पडदा. ४ प्राप्त होऊं.

हेलावे आत्मसमुद्र ॥ २१ ॥ आइकतां सगुणजन्मकर्मगुण । दिव्यत्वें स्फुरे आत्मलखूण । देहीं विदेह तेव्हां निपुण । होय उमटतां ठसा आत्मप्रियत्वाचा ॥ २२ ॥ गाई उडे नाचे हरिकीर्तनीं । अच्युतानंत वासुदेव ह्मणोनी । तों सर्वात्मतेचा ठसा मनीं । उमटों लागे ॥२३॥ ह्मणतां अच्युता अच्युता । च्यवेना कधीं ते चिदात्मसत्ता । सर्वभूतीं स्फुरे तत्त्वतां । अच्युत सुवर्ण नश्वरा अलंकारीं ॥ २४ ॥ अनंता अनंता ह्मणूनि गाय । तों चित्त सप्तावरणांपुढें जाय । ब्रह्मांड सावरण चित्तांत माय । त्याही पुढें स्फुरे अनंत ॥ २५ ॥ वासुदेवा वासुदेवा । ह्मणोनि गातां देवाधिदेवा । सर्वभूतीं त्या चिदात्मदेवा । देखे सर्व भूतें त्यामधें ॥ २६ ॥ तत्त्वज्ञानें तत्त्वतां । दिव्य जन्मकर्मे हरीचीं कळतां । ध्यातां गातां आइकतां । अनुभव ऐसा जयांचा ॥२७॥ त्यांस ह्मणे अच्युत । कीं ते मदाश्रित । ईश्वरमय या अनुभवें ते निश्चित । ह्मणून ह्मणे मन्मय ह्मणूनी ॥२८॥ एवं दिव्य भगवज्जन्मकर्म । हें आत्मज्ञानावांणि न कळे वर्म । यास ह्मणावें भागवत धर्म । कीं ज्ञानें श्रवण कीर्तन सगुणाचें ॥२९॥ हें ज्ञानयुक्त तप । या तपाचा ऐसा प्रताप । कीं विषयवासना भय कोप । हरूनि मुक्ति दे जितांचि ॥ २३० ॥ हा ज्ञानतपप्रकार । अनुष्ठूनि बहुत नर । मज पावले ह्मणे सर्वेश्वर । भाव कीं अनादि हा भक्तिमार्ग ॥ ३१ ॥ आतां यापुढें जो श्लोक । तो कां बोले उत्तमश्लोक । त्याचें निमित्त विवेकी लोक । आइकोन आतां ॥३२॥ तपें कार्याची सिद्धी । लोकीं वेदीं ऐसी प्रसिद्धी । ज्ञानपरिपाकार्थ तपसमृद्धी । ज्ञान तप पूर्वश्लोकीं बोलिला ॥ ३३ ॥ ज्ञानयुक्ततपें मोक्ष । पावले जे पुरुष दक्ष । त्यांस बोलिला कमलपत्राक्ष । कीं ते मन्मय आणि मदुपाश्रित ॥ ३४ ॥ मन्मयशब्दें विश्वात्मक ज्ञान । मदुपाश्रितशब्दें दिव्यत्वें सगुणचिंतन । हा तदाश्रय कीं सगुणगुणभजन । या दोंपरी ज्ञानतप बोलिला ॥३५॥ एवं ज्ञान जालियावरी । सगुणाश्रय जो न धरी । दिव्यत्वें सगुणगुणभजन न करी । तप न घडे तयासी ॥ ३६ ॥ परी तो करूनि इंद्रियदमन । सर्वभूतीं समत्वें भजन । निर्गुणीं वृत्तिनिरोधें मन । योजूनि भजे सर्वदा ॥३७॥ तेही ईश्वराश्रित । होयचि कीं निश्चित । कीं सगुण निर्गुण यांत । भेद नसे अणुमात्र ॥ ३८ ॥ ऐसें असोनि अच्युत । कां त्यांतेंचि ह्मणे मदाश्रित । जे सगुणगुणभजनीं

१ खवळे. २ पतन पावेना. ३ पंचकोश अहंकार आणि माया हीं सात आवरणें. ४ ज्ञानपूर्ण होण्यासाठीं.

रत । आत्मज्ञ होऊनी ॥ ३९ ॥ ये विषयीं अर्जुन । द्वादशीं करील प्रश्न । कीं ज्यांस अक्षर निर्देश्य व्यक्ताचेंचि भजन । ते बरे कीं हे बरे आत्मज्ञ सगुणाश्रित ॥ २४० ॥ तेथें कृष्ण देईल उत्तर । कीं क्लेश अधिकतर । त्यांस ज्यांचें चित्त तत्पर । अव्यक्तींच ॥ ४१ ॥ या कारणें त्यांपरीस । ज्यांस सगुणभजनीं सौरस । ते बरे कीं मृत्युसंसारसागरीं त्यांस । उद्धरणार स्वयें मी ॥ ४२ ॥ एवं निर्गुणींच सादर । आणि सगुणीं अनादर । तेही मजचि पावती नर । परि क्लेश अधिकतर तयांसी ॥ ४३ ॥ द्वादशीं ऐसें अनंत । बोलेल कीं ऐसाच तत्त्वतां सिद्धांत । परि विचारितां यांत । विषमता लागते निर्दोषियासी ॥४४॥ हा अर्जुनें प्रश्न करावा । परि अद्यापि हा सिद्धांत नाहीं ठावा । द्वादशीं समजेल बरवा । "क्लेशोधिकत-रस्तेषां" हें आयिकतां ॥ ४५ ॥ म्हणोनि तेथें हा प्रश्न अर्जुन । करितो येथेंचि जगज्जीवन । स्ववैषम्यपरिहारवचन । बोलतो या प्रसंगीं या श्लोकीं ॥४६॥

॥ श्लोक ॥ ये यथा मां प्रपद्यंते तांस्तथैव भजाम्यहम् ।
मम वर्त्मानुवर्तंते मनुष्याः पार्थ सर्वशः ॥ ११ ॥

॥ टीका॥ अगा जो मी निर्गुण । पार्था तोचि मी सगुण । सुवर्णी सुवर्ण-प्रतिमा निपुण । भिन्न न देखती लेशही ॥ ४७ ॥ परि कल्पवृक्षस्वभाव । अगा मी देवाधिदेव । ज्या रूपीं ज्याचा जैसा भाव । त्या रूपें तैसींच मी फळें देतों ॥ ४८ ॥ परंतु निर्गुणीं नसे गुणधर्म । जेथें हा उपासक मी उपास्य ब्रह्म । हेही वृत्ति नसे तेथें भ्रम । करिती अव्यक्तोपासक ॥ ४९ ॥ तेथें कांहीं नसे गुण । तेंचि आह्मांस पाहिजे निर्गुण । ऐसा भाव ज्यांचा मी सगुण । केवीं उद्धरूं तयांसी ॥ २५० ॥ करावा एकाचा उद्धार । हा गुणवृत्तीचा प्रकार । मी सगुणवृत्तिविचार । ज्यास तो केवीं उद्धरूं तयांसी ॥ ५१ ॥ जे सगुणत्व नलगे ह्मणती । निर्गुणत्वेंचि मज भजती । मी सगुण भोंपती । केवीं उद्धरूं तयांसी ॥ ५२ ॥ कीं जे जैसे जैशा मला । भजती मी तैसा तैशां तयांला । भजतों पावतों या बोला । हृदयीं धरीं अगा पार्था ॥ ५३ ॥ प्राप्तिस्थळचि निर्गुण । ते प्राप्ति देणार मी सगुण । धनी सांडूनि धनातेंचि भजणें । ऐशी उपासना ते त्यांची ॥ ५४ ॥ अगा मी जैसा कल्पतरू । जे भजती कीं हा आह्मां सगुण उद्धरू । मी प्रतिक्षणीं तयां जगद्गुरू । सद्बुद्धि देतों विघ्नातें हरूनी ॥ ५५ ॥ हा भाव हृदयांत ।

---

१ गोडी. २ ठाउका.

तो पुढें दशमाध्यायांत । बोलिले कीं श्लोकीं भगवंत । ते हे श्लोक ॥५६॥ मच्चित्ता मद्गतप्राणा बोधयंतः परस्परम् । कथयंतश्च मां नित्यं तुष्यंति च रमंति च ॥ १ ॥ तेषां सततयुक्तानां भजतां प्रीतिपूर्वकम् । ददामि बुद्धियोगं तं येन मामुपयांति ते ॥ २ ॥ तेषामेवानुकंपार्थमहमज्ञानजं तमः । नाशयाम्यात्मभावस्थो ज्ञानदीपेन भास्वता ॥ ३ ॥ ॥ टीका ॥ या तीं श्लोकांची विशद[1] । पुढें टीका होईल प्रतिपद । येथें मथितार्थ[2] मात्र सांप्रद[3] । बोलिजेतो ॥ ५७ ॥ कीं माझे ठायीं प्राण चित्त । परस्पर माझें गुणामृत । बोधिती कथिती रमती अत्यंत । संतोष पावती मद्भजनें ॥ ५८ ॥ ऐसें प्रीतिपूर्वक । भजती त्यांस उत्तम विवेक । ज्यांत तो बुद्धियोग मी श्रीवत्सांक । देतों तयां ॥ ५९ ॥ त्या बुद्धियोगें मजप्रती । ते मज भजणार पावती । त्यांचें अविद्याआवरण आणि जडत्वभ्रांती । व्यतिरेकें अन्वयें मी नाशितों ॥२६० ॥ एवं जे मज भजती । मी बुद्धियोग देतों त्यांप्रती । हें बोलिला प्रस्तुतीं । तोचि भाव या श्लोकीं चतुर्थाध्याच्या॥६१॥ कीं जे जैसे भजती । मी तैसाच भजतों त्यांप्रती । सगुणत्वें भजतां मी श्रीपती । सद्बुद्धि देतों विघ्नें हरितों ज्ञानपरिपक्कांचीं ॥६२॥ जे निर्गुणत्वेंचि भजती । मी निर्गुणचि होतों त्यांप्रती । कीं जैसा यत्न तैसे पावती । ज्ञानपरिपाकयोगसिद्धीतें ॥ ६३ ॥ मनाचे लयविक्षेप । हरावे नेणे हें निर्गुणस्वरूप । त्यांचिया योगप्रयत्नाचा प्रताप । सिद्धि जे देईल तितकीच ॥ ६४ ॥ प्रारब्धकर्मफळ । भोगितां चढे मनावरी मळ । तें पुन्हा होतां निर्मळ । कष्ट लागती ॥ ६५ ॥ विघ्न करिती देव । इंद्रियांस दाविती विषयभाव । तेथें ते स्वयमेव । यत्न करितां कष्टती ॥६६॥ हीं सकल विघ्नें हरावीं।साधनें निर्विघ्न करावीं । प्रारब्धभोग सरतांच इंद्रियें आवरावीं । हें कृपाळुत्व माझें सगुणत्वीं ॥ ६७ ॥ ते भजतां शुद्ध निर्गुण । मी जरी पावों त्यांस सगुण । तेव्हां मी सर्वसम आपण । विषम होतों ॥ ६८ ॥ कीं मनुष्य जितके । माझ्याच मार्गी आहेत तितके । जो जें फळ आयिके । तो तदर्थीच भजे मजलागीं ॥ ६९ ॥ जो ज्याकारणें भजे मला । मी कल्पवृक्ष तेंचि देतों त्याला । तें मी निर्गुणोपासकाला । फळ केवीं देऊं सगुणोपासनेचें ॥ २७० ॥ म्हणोनि मज कल्पवृक्षा । करणें लागते त्यांची उपेक्षा । म्हणूनि निर्गुणमात्रोपासकपक्षा । कष्ट अधिक ॥ ७१ ॥ हें पुढें द्वादशीं बोलणें आहे। तेथें विषमता प्राप्त होणार[4] हें । तेंचि या अवतासरप्रसंगीं

---

१ स्पष्ट; उघड. २ सारांश. ३ प्रस्तुत. ४ पवित्र; शुद्ध.

पावे । ह्मणूनि परिहरी विषमता ॥ ७२ ॥ कीं ज्ञानतपें पूत । अनायासें पावले मज बहुत । ते कामक्रोधभयरहित । जितांचि मुक्ति पावले ॥ ७३ ॥ कीं त्यांचा करितों उद्धार । अनायासें मी सगुण सर्वेश्वर । हें पुढें बोलणार । ते हे भक्त पूर्वश्लोकोक्त ॥ ७४ ॥ तेव्हां विषमता प्राप्त जाली । ते या श्लोकीं ऐसी हरिली । कीं जो जैसा भजेल तैसी जाली । सिद्धि त्याला मी सम ॥७५॥ कीं जरी ऐसा न हों मी सर्वजगत्पती । मनुष्य सर्व माझ्या मार्गी वर्तती । जो जैसा भजे तैसेच रीती । मी भजतों तयांसी ॥ ७६ ॥ एथें ह्मणे श्रीघननीळ । कीं माझ्या मार्गी मनुष्य सकळ । वर्तती ह्मणूनि येथें केवळ । गहनभाव ॥ ७७ ॥ कीं मनुष्यांच्या कोटी । पाहतां विरळाचि आढळे शुद्ध गहाटी । कीं स्वहित धरूनि पोटीं । वर्तती मार्गी या परमेश्वराच्या ॥ ७८ ॥ एवं आकारें मनुष्यकूळ । परंतु पशुच ते केवळ । जे माझ्या मार्गी तेचि सफळ । मनुष्य ऐसा भावार्थ ॥ ७९ ॥ द्विपदत्वें मनुष्य होय । तरी पक्षियांस हीं दोनच पाय । दाढीनें मनुष्य तरी काय । दाढी नसे बोकडासी ॥ १८० ॥ हात आहेत यावरूनी । ह्मणावें मनुष्य ह्मणोनी । तरी मर्कटास हीं दोनी दोनी । असती हस्त ॥ ८१ ॥ सुरतसुखें ह्मणावें नर । तरी तें सुख पावती वानर खर । मनुष्य निर्मिती ह्मणावें घर । तरी पक्षीही गृह निर्मिती ॥८२ ॥ पुढील चिंता कोणासी । नसे ती एक मनुष्यासी । या गुणें ह्मणावें मनुष्यत्व यांसी । तरी पक्षियांसही ते[3] असे ॥ ८३ ॥ प्रसूत नाहीं तोंचि चिमणी । अंडियांकारणें गर्भिणी । कापूस आणि मृदुतृणीं सेज करी ॥ ८४ ॥ चारा सांडूनि वेंची । कापूस धरधरूनि चोंचीं । ते ऐसी चिंता संतानाची । करी जों उपजलीं तीं नसतीं ॥ ८५ ॥ ऐसा पाहतां विचार । पशुपक्षियां समान विहार । निद्रा मैथुन आहार । पशूंस तैसे मनुष्यांसही ॥ ८६ ॥ एवं भजन सर्वेश्वराचें । करिती त्यांचें मनुष्यत्व साचें । ह्मणूनि वाक्य भगवंताचें । कीं माझ्या मार्गी वर्तती मनुष्य सर्व ॥ ८७ ॥ एवं मनुष्य सकळ । माझ्या मार्गी त्यांस फल । मीच देतों परि केवळ । जो जें मागे तेंचि देतों ॥ ८८ ॥ ऐसा कल्पवृक्षस्वभाव । तो मी देवाधिदेव । सगुणत्वीं नसतां भाव । निर्गुणीं भजतां सगुण मी केविं पावों ॥ ८९ ॥ एवं जाणोनि निर्गुण । निर्गुणत्वें भजती सगुण । ते ज्ञानतपें पवित्र निपुण । अनायासें मज पावती ॥ १९० ॥ हे अनायासें पावती म-

१ क्वचित् २ चालचलणूक. ३ पुढची चिंता.

ला । पुढें बोलणें असे या बोला । क्लेश अधिकतर अव्यक्तोपासकांला । बोलले जेथें ॥ ९१ ॥ ते विषमता सर्वेश्वरें हरिली येथें याप्रकारें । आतां विषमता प्रकारांतरें । प्राप्त होते ते हरितो या श्लोकीं ॥ ९२ ॥

॥ श्लोक ॥ कांक्षतः कर्मणां सिद्धिं यजंत इह देवताः ।
क्षिप्रं हि मानुषे लोके सिद्धिर्भवति कर्मजा ॥ १२ ॥

॥ टीका ॥ अगा सगुणभजतां मी सगुण । निर्गुण भजतां मी निर्गुण । भजनानुरूप मी निपुण । विषम फळ देऊनिही नव्हे विषम ॥ ९३ ॥ परि या दोघांसही फळ मोक्ष । कीं ज्ञानें मातेंचि जे भजती दक्ष । मोक्ष न पावे तो पक्ष । जे सकाम इतरदैवतां भजती ॥ ९४ ॥ तीं दैवतें ही माझेच देह । फळदाता मीच निःसंदेह । परि कर्मसिद्धिचाच स्नेह । ज्यांस ते इतर दैवतांस भजती ॥ ९५ ॥ अपेक्षूनि कर्माच्या सिद्धी । संकल्पूनि कामनासमृद्धी । इतर दैवतांचे पायीं मनबुद्धी । लावूनि पूजिती तयांतें ॥ ९६ ॥ अगा सर्व कर्मांचें क्षेत्र । हा मनुष्यदेह विचित्र । जे धरिती कामनामात्र । तेचि सिद्धि पावती शीघ्र ते ॥ ९७ ॥ त्या कर्मजनिता सिद्धी । मीच देतों कीं त्यांच्या वृद्धी । त्याच अपेक्षिती समृद्धी । मी काय करूं ॥ ९८ ॥ ज्यांस वांछा जैसी । मी पुरवितों त्यांची तैसी । यांत विषमता कैसी । लागे मज ॥ ९९ ॥ जांतें माझीच उपासना । करिती मोक्ष त्या जनां । इतरांस मोक्ष मी देना । कीं नसे मुमुक्षा आणि मद्भजन त्यांस ॥ ३०० ॥ एवंच मी सर्वसम । विषम फळ देऊनि नव्हे विषम । वैषम्यपरिहार सर्वोत्तम । करी ऐसा आपला ॥ १ ॥ भजनफळीं विषमता । दिसे ते हरिली तत्त्वतां । आतां विषमसृष्टि रचितां । दिसे तेही हरितो या श्लोकीं ॥ २ ॥

॥ श्लोक ॥ चातुर्वर्ण्यं मया सृष्टं गुणकर्मविभागशः ।
तस्य कर्तारमपि मां विद्ध्यकर्त्तारमव्ययम् ॥ १३ ॥

॥ टीका ॥ ब्राह्मण क्षत्रिय वैश्य शूद्र । एकापरीस एक क्षुद्र । जो मी सम कृपासमुद्र । चारी वर्ण ते म्यांच निर्मिले ॥ ३ ॥ मीच त्यांचा कर्ता । जाण जो करूनि अकर्त्ता । कीं कर्तृत्त्व सम मायेचें मी सत्ता । प्रकाशक त्या मायेचा ॥ ४ ॥ तो मी अकर्ता अव्यय । कांहींच न करीं हा निश्चय । परंतु जड जग मायामय । सत्ता नसे मायेला ॥ ५ ॥ जिभेवीण आत्मा न बोले । परि त्याच्या सत्तेनें ते जीभ हाले । शब्द जे जे निघाले । ते आत्म-

१ नीच. २ बाजूचे लोक, उपासक. ३ स्थान.

सत्तेनें ॥ ६ ॥ आत्मा अबोलणा स्वयें । परि तोचि बोलतो ह्मणावा निश्चयें । कीं त्यावांचूनि इंद्रियें । अवघीं वृथा ॥ ७ ॥ इंद्रियांवीण तो असे । परि इंद्रियग्राम¹ त्यावीण न दिसे । सत्ता पाहतां उल्लसे । आत्मस्वरूपीं ॥ ८ ॥ मायेचें कार्य जग आणि तें स्वयें माया । प्रलयकाळीं गिळूनियां । स्वयें उरे मागुती तया । पासूनि माया उपजते ॥ २ ॥ कीं सत्ता असे ज्याला । आणि सत्ता नसे मायेला । या कारणें ह्मणे मला । जाण कर्त्ता अकर्त्ता यातें ॥ ३१० ॥ आपणास अकर्त्ता ह्मणतां । सुचवी कीं आपण सत्ता । परि ज्यासि अकर्तृत्वसत्ता तोचि कर्त्ता । ह्मणूनि मी कर्त्ता ह्मणे मागुती ॥ ११ ॥ हें रूप आपलें आणि मायेचें । करी मायेच करूनि साचें । आपलें अबोलणें बोलणें जिभेचें । जिभेनेंचि बोले पुरुष जैसा ॥ १२ ॥ परा पश्यंती मध्यमा वैखरी यांचा² । चालक हाचि पुरुष साचा । परि घेऊनि चाऱ्ही वाचा । दोन्ही रूपें तोचि करी ॥ १३ ॥ कीं मी अबोलणा³ । बोलकेपण वाचेस जाणा । दोन्ही वाचेनेंचि सांगे खुणा । परि न चळे वाणी त्याविण ॥ १४ ॥ ह्मणोनि ह्मणे मागुतीं । कीं मीच बोलका वाचेचा पती । ऐसी आपली आणि मायेची स्थिती । मी कर्त्ता अकर्त्ता ह्मणतां सूचवी ॥ १५ ॥ कोणी ह्मणतील ये स्थळीं । कीं जाणुनि पुरुष वाचा चाळी । तैसा इच्छा धरूनि सकळीं । सृष्टि करी तेव्हां कर्त्ताच ॥ १६ ॥ तेव्हां अकर्त्तेपण उडालें । कर्त्तेपणचि आलें । ह्मणूनि या बोलें । उडविती दृष्टांत वाचेचा ॥ १७ ॥ तरी अबोलणा पुरुष बोले कीं वाचा । हा तों दृष्टांतचि साचा । कीं प्रकार आपला आणि मायेचा । निरूपणें हेंही मायेनें ॥ १८ ॥ आतां इच्छेनें सृष्टि करणें । तेंचि इच्छा माया त्रिगुणें । परि त्या गुणांस इच्छारूपें स्फुरणें । न घडे सत्तेवांचुनी ॥ १९ ॥ भ्रमणें लोहाचा गुण । परि न चळे चुंबकावीण । सत्ता चुंबक पाषाण⁴ । भ्रमण लोहधर्म लोहाचा ३२० ॥ कर्मास नसे सत्ता । सत्तेस नसे कर्तृता । दोन्हीं मिळतां तत्त्वता । क्रिया घडे भलतीही ॥ २१ ॥ आतां इच्छा बोलायाची । तेही शक्ति बोलत्या पुरुषाची । पुरुषावांचूनि इच्छा कैंची । समर्थ स्वयें उठाया ॥ २२ ॥ इच्छेस नसे सत्ता । इच्छेवांचूनि यास नसे कर्तृता । मज इच्छा ह्मणतां हेही अहंता । पुरुषसत्ता याही पलीकडे ॥ २३ ॥ प्रकाश तो काष्ठामींचा । प्रकाश काष्ठास कैंचा ।

---

१ इंद्रियसमूह. २ हे वाणाचे ( बोलाचे ) चार भेद आहेत. ३ उक्तीमें. ४ लोहचुंबक.

परि काष्ठवातीगोवरीकाशाचा । योग नसतां दिसेना प्रकाश ॥ २४ ॥ तैसी मायेवीण । न बोलवे आत्मसत्तेची खूण । म्हणूनि मायेचेनि कृष्ण निपुण । रूप करी आपलें आणि मायेचें ॥ २५ ॥ काष्ठ गोवरी अथवा कांहीं । प्रकाशहीनातें स्वप्रकाश ही । न घेतां आपलें रूप कांहीं । न दाखवी जैसा ॥ २६ ॥ प्रकाशहीना काष्ठें करूनी । त्या प्रकाशहीनातें आणि आपणातें अग्नी । प्रकाशी तैसा माया ब्रह्म ऐसें म्हणोनी । मायेचेनि रूप करी श्रीकृष्ण ॥२७॥ परि तो अग्नि अग्नि प्रकाशेंचि असे । काष्ट प्रकाशहीन त्या प्रकाशेंचि दिसे । ब्रह्म आणि मायारूप दोहींचें गवसे । ब्रह्मसत्ताप्रकाशेंच ॥२८ ॥ पुढें आणितां दर्पण । पुरुष आपणातें आपण । देखे तैसा शुद्धसत्त्व गुण । आत्मप्रत्यय त्याकारितां ॥२९॥ निजरूप नव्हे दर्पणें । तैसें सत्त्व नव्हे आत्मा आपण । जरि सत्त्वा दर्पणावांचूनि खूण । न सांपडे आपली ॥३३०॥ दर्पणावीण पुरुष असे । दर्पणीं पुरुषावीण पुरुषाकार न दिसे । मायेंत तैसा न गवसे । ब्रह्मसत्तेवांचूनी ॥३१॥जें न देखती नेत्र । तें देखती उपनेत्र । तैसें ब्रह्म सत्तामात्र कर्तव्य अवघें मायेचें ॥३२॥ नेत्रांविना उपनेत्र । न देखतीं तरी म्हणावें देखती नेत्र । तैसें ब्रह्म सत्तामात्र । न करूनि करी सर्वही ॥ ३३ ॥ कर्तृत्व मायेचें परी । तें मजअधीन माझे सत्तेनें करी । विषम नव्हे मी याहीपरी । विषम सृष्टि करूनिही म्हणे या भावें ॥ ३४ ॥ कीं देखतां ब्राह्मण । क्षत्रियास वाटे स्वनीचपण । त्याहूनि नीच आपण । वैश्य वैश्याहूनिही शूद्र॥३५॥परि हे विषमता । मज न लागे तत्त्वतां । कीं गुणकर्मविभागें रचिता । मी प्रतिसृष्टि याचा होतसें ॥३६॥ कीं मी जैसा अनादी । तैसी माझी माया प्रसिद्ध वेदीं । तिच्या तिहीं गुणांच्या कर्मभेदीं । होती चारी हे वर्ण ॥३७॥ सत्त्वगुणें ब्राह्मण उत्तम । सत्त्वरजमिश्र ते क्षत्रिय मध्यम । रजोगुणमात्रें वैश्य अधम । अतिनीच शूद्र तमोगुणें ॥ ३८ ॥ हे गुणांचे विभाग । गुणानुरूप कर्मांचे योग । कर्मानुरूप फलभोग । हा अनादिप्रवाह मायेचा ॥ ३९ ॥ परि तेही माया मजअधीन । मजमाजीं उपजे असे होय लीन । जैसें उष्णांत मृगजीवन । निघे असे लय पावे ॥ ३४० ॥ मज नसे उत्पत्ति लय । या भावें म्हणे जाण अव्यय । व्यय नसोनि दिसे व्यय । प्रळयीं मायेचा तें न दिसतां ॥ ४१ ॥ माया प्रकटतां तीन्ही गुण । गुणानुरूप चारही वर्ण । होती एवं आपण । अकर्त्ता कर्त्ता होउनी ॥ ४२ ॥

१ काष्ठविकांचा. २ आरसा. ३ मृगजळ.

एवं कोणचीही विषमता । मज न लागे तत्त्वता । अकर्त्ता होऊनिह्मि कर्त्ता । जन्मी जालों ।।४३।। आतां यापुढें श्लोक । तो कां बोले उत्तमश्लोक । त्याचें निमित्त उपासक । परिसोत परमेश्वराचे ।। ४४।। ईश्वराचें भजन । जो करिती महाजन । ते दिव्यत्वें श्रवण कीर्तन चिंतन । करिती ईश्वराच्या गुणांचें ।। ४५ ।। सगुण गुणभजनाविणें । न घडे संसारसिंधु तरणें । यानिमित्त अवतार करणें । हें कृपाळुत्व जगदीशाचें ।। ४६ ।। स्वयें समर्थ होउनी । जनोद्धार न धरी मनीं । तो ह्मणावा महाजनीं निर्दय ।। ४७ ।। वैषम्य आणि निर्दयत्व । नसे आणि समत्व सदयत्व । असे तेथें ईश्वरत्व । त्या ईश्वरातें भजावें या भावें ।। ४८ ।। दयाळुत्वें सांगितलें अवतार । भजनानुरूप फळ देणें हा वैषम्यपरिहार । त्या प्रसंगें सृष्टिरचनाप्रकार । सांगतां सृष्टिवैषम्यही परिहरिलें ।। ४९ ।। कीं ईश्वरभजनीं हा निश्चय । आधीं असावा कीं सम सदय । सर्वथा नव्हे विषम निर्दय । तोचि ईश्वर ।।३५०।। ईश्वरास तरी भजतो । आणि गोष्टी ऐशा समजोनि बोलतो । कीं विषम आणि निर्दय तो । सिद्ध होतो त्या गोष्टीनें ।। ५१ ।। आमचा धणी बहु भला । कीं पाळितो तस्करांला । या स्तुतीनें न लावितां लागला । दोष त्या धणियासी ।। ५२ ।। ईश्वर स्वयें स्वतंत्र । तो लोकांस फळ देतो विचित्र । एकास देतो भाग्य कर्ण नेत्र । एकास अभाग्य बधिरत्व अंधत्व ।। ५३ ।। उत्कर्ष ऐसा बोलतां । वैषम्य दोष लावी न लावितां । ऐसियास सादरही भजतां । कृपा नव्हे ईश्वराची ।। ५४ ।। दोष लावितां ईश्वरा । दोष लागती त्या पामरा । निर्दोष समजे त्या नरा । ईश्वर करी निर्दोष ।। ५५ ।। हें करणेंही त्यापाशीं । नसे याचीच भावना यासी । सदोष निर्दोष करी ऐसी । सत्ताच ईश्वराची ।। ५६ ।। हा कल्पवृक्ष अन्न देतो । ह्मणतां अन्नचि देतसे तो । हा धोंडे देतो ह्मणिजे तों । धोंडमार होतो त्यावरी ।।५७।। ह्मणूनि भगवद्वाणी बोलते । कीं "ये यथा मां प्रपद्यंते" । कीं जे जैसे भजती होते । सिद्धि तैसी तयांसी ।।५८।। एवं ईश्वराचें समत्व सदयत्व । समजोनि भजतां तें महत्त्व । हाही पावतों हें तत्त्व । पूर्वीच सूचविलें श्रीकृष्णें ।।५९ ।। कीं माझें जन्म दिव्य । आणि दिव्य माझें कर्तव्य । जाणे त्याचें भवितव्य । दिव्यचि कीं मज पावे ।। ३६० ।। याकारणें मी सर्वोत्तम । अवतार तों हें दयालुत्व परम । हें बोलोनि प्रसंगें मी सम । विषम नव्हें हें बोलिला ।। ६१ ।। भाव कीं समत्व सदयत्व । जाणावें जैसें जन्मकर्मदिव्यत्व । कीं

जैसें माझें जाणोनि महत्त्व । भजे तैसें फळ पावे ॥ ६२ ॥ आतां बोलतो जो श्लोक । त्यांत फळांतरीं हें उत्तमश्लोक । स्पष्ट बोलेल तें सुश्लोक । या श्लोकीं परिसोत ॥ ६३ ॥

॥ श्लोक ॥ न मां कर्माणि लिंपंति न मे कर्मफले स्पृहा ।
इति मां योभिजानाति कर्मभिर्न स बध्यते ॥ १४ ॥

॥ टीका ॥अगा चहूं वर्णांची विषमसृष्टी । करूनि नसे मज विषमदृष्टी । पूर्वश्लोकीं हे बोलिलों गोष्टी । कीं करूनि मी अकर्ता॥६४॥ह्मणूनि मज सर्व-कर्मैं । लिप्त नव्हती अकर्तृत्वधर्मैं । परि कर्तृत्वरहित ब्रह्म । असे जीवत्वींही ॥ ६५ ॥ परि जीवांचे उपाधी । अहंकर्तृत्वें कर्तृत्वाच्या व्याधी । पावले कर्मफळसिद्धी । अपेक्षितां योगें अहंकाराच्या ॥ ६६ ॥ उपाधि ज्याचा अकर्ता । आत्मा लक्षूनि जाला तोचि नव्हे कर्ता । कीं कर्मफळाची वार्ता । नसे जया निरहंकारियासी ॥ ६७ ॥ अगा अहंकारही टाकिला । परि वास-नामळें फळेच्छा त्याला । उपजवितां गेला अहंकार आला । कीं फळ मज हो ह्मणोनी ॥ ६८ ॥ एवं कर्मफळाची अपेक्षा । नसे ज्यास त्याच दक्षा । अकर्ता ह्मणावें कीं मोक्षा । तो योग्य अलिप्त सर्वत्र ॥ ६९ ॥ मज तों नसेच बंध । कीं मी नेणें अविद्येचा गंध । अहंकारकर्मफलेच्छासंबंध । मज केंचा ॥ ३७० ॥ यालागीं सर्वदा सर्व कर्मैं । मज न लिंपती अकर्तृत्वधर्मैं । कीं नसे फळस्पृहा हीं वर्मैं । जाण तूं अगा अर्जुना ॥ ७१ ॥ कीं येथवरी माझे गुण । वर्णिले ते जो निपुण । जाणे तो आपण । कर्मी बांधला नव जाय ॥ ७२ ॥ इति शब्दें इतुकें । या प्रसंगीं गुण वर्णिले जितके । जो जाणे त्यास होऊं न शके । कर्मबंध कदापि ॥ ७३ ॥ या भावें ह्मणे श्रीपती । कीं "इति मां योभिजानाति । कर्मभिर्न स बध्यते" हे फळश्रुती । कळतां नि-र्दोष आपुलें गुणकर्म ॥ ७४ ॥ आणि हा एकगुणषड्गुणीं । जे प्रथमाध्याय-मंगलाचरणीं । वर्णिले कीं जो हें धरी अंतःकरणीं । तोही भगवंत षड्गुण ॥ ७५॥ कर्मे करूनि कर्मफळस्पृहा । नसणें वैराग्य गुण हा । समत्व सदयत्व पूर्वोक्त महा । धर्मगुण समग्र भगवत्पदाचा ॥७६॥ नवमाध्यायांत ऐश्वर्य-गुण । तैसीच ज्ञानादिगुणांची खूण । स्थळस्थळीं भगवान् षड्गुण । स्वयेंचि वर्णील ॥ ७७ ॥ एवं भगवद्गुण । दिव्यत्वें जाणेल तो निपुण । जिता देहीं च आपण । भगवान् षड्गुण बोलावा ॥ ७८ ॥ आतां यापुढें जो श्लोक । तो कां बोले उत्तमश्लोक । त्याचें निमित्त उपासक । आइकोत भगवंताचें

॥ ७९ ॥ कीं त्रिकांड वेद । कर्म उपासना ज्ञान हे तिन्ही भेद । तिहीं अनुष्ठानीं नासे खेद । अविद्याकर्मबंधाचा ॥ ३८० ॥ त्यांत सकामाचें कर्म । आणि त्याचा उपासनाधर्म । फळ देऊनि दे श्रम । पुन्हां जन्ममरणांचा ॥ ८१ ॥ मुमुक्षूचें निष्काम कर्म । आणि निष्काम उपासनाधर्म । त्यास ईश्वरप्रसादें ब्रह्म । कळे सुटे जन्ममरणापासूनी ॥ ८२ ॥ ज्ञानें आत्मानात्मविवेक ।कळोनियां मग कितीएक । होती निर्गुणमात्रीं उपासक। कोण्हीं सगुणभक्तीनें समाधीतें पावती ॥ ८३ ॥ परंतु दोहींसही जों ज्ञान होय । तोंवरी कर्म उपासना कांडद्वय । मुमुक्षूस पाहिजे हा निश्चय । वेदांतवेदपुराणांचा॥८४॥पहिलें कर्म दुसरें कांड उपासना । तिसरें ज्ञान चौथें कांड असेना । तीं कडियांची सांखळी जना । दिसे जैसी ॥ ८५ ॥ मधिले कडीस दोन्हीं। दोहीं कडील कडिया असती स्पर्शोनी । मधील कडी असे धरोनी । दोहींकडिल्या दोहीं कडियांस ॥ ८६ ॥ मध्यें उपासनाकांड पडे। कांडद्वय दोहींकडे । उपासनेस कर्मही सांपडे । सांपडे ज्ञानकांड ही ॥८७॥ उपासनाकांड ह्मणिजे भक्ती । पाहतां सांखळीची युक्ती । कर्म ज्ञान दोहींची प्रसक्ती । लागली भक्तियोगास ॥ ८८ ॥ कर्मकांडाचीच कडी । धरूनि लोंबती ते उडी । कामसमुद्रीं टाकूनि बुडी । देतां कष्टती जन्ममरणें ॥ ८९ ॥ जे तिन्हीं कडिया लंघूनी । विद्यातीत कैवल्यसदनीं । चढले ते झाले ज्ञानी । तिसरे कडीस ॥ ३९० ॥ कर्मकांडाची कडी पहिली । ते भक्तिकांडाचे कडीतें लागली । मुमुक्षुसेना चढली । कर्मकांडावरूनि भक्तिकांडीं ॥ ९१ ॥ एवं मुमुक्षुजन । कर्मकांडें करूनि भजन । भक्तिकांडीं पावोनि [१]भवभंजन । तिहीं प्रसन्न केला ॥ ९२ ॥ कीं न अर्पितां ईश्वरीं । जो निष्काम ही कर्म करी । तें तों बंधकचि यापरी । सिद्धांत जाला अध्यायीं तिसरिया ॥ ९३ ॥ ज्यास कर्मसमर्पण । तो ईश्वर सगुण । त्याच्या गुणांची खूण । निर्दोष ऐसी कळावी ॥ ९४ ॥ कीं जो [२]भाविजे जैसा । कल्पवृक्ष फळ दे तैसा । सर्वसम सदय ऐसा । भावितां निर्दोष करी दोषियां ॥ ९५ ॥ हें पूर्वश्लोकपर्यंत । स्वगुण स्वयें बोलिला भगवंत । समजोनि ऐसें ह्मणतो अनंत । कर्म करीं ह्मणोनि या श्लोकीं ॥ ९६ ॥

॥ श्लोक ॥ एवं ज्ञात्वा कृतं कर्म पूर्वैरपि मुमुक्षुभिः ।
कुरु कर्मैव तस्मात्त्वं पूर्वैः पूर्वतरं कृतम् ॥ १५ ॥

१ भव ह्म० संसार याचा नाशक ईश्वर. २ मानितां.

॥ टीका ॥ अगा ऐसें जाणोनि कर्म । करणें हाचि मुमुक्षूचा धर्म । ज्या कर्मे शुद्धचित्त पावे ब्रह्म । तेंही जाणोनि ऐसें करावें ॥ ९७ ॥ कीं ईश्वर सम सदय । तो कदापि नव्हे विषम निर्दय । कर्मे करूनि अलिप्त अव्यय । कर्मफळीं स्पृहा नसे जयासी ॥ ९८ ॥ ऐसें मज जाणोनि । पूर्वकल्पीं ही मुमुक्षुजनीं । केलें कर्म कीं ऐसिया मज समर्पूनी । करूनि अलिप्त अकर्ते ते जाले ॥ ९९ ॥ हें मुमुक्षूचें कर्म । हाचि होतो भागवत धर्म । कीं सम सदय सगुण ब्रह्म । जाणोनि समर्पिती तयासी ॥ ४०० ॥ प्रथम कर्मकांड धरूनी । दुसरिया भक्तिकांडास त्यावरूनी । आरूढ जाले कीं मज ऐसें समजोनी । केलीं कर्मे ॥ १ ॥ भाव कीं ईश्वरार्पण । तें एक बंधक नव्हे त्याविण । सर्व कर्म बंधक हे मी खूण । पूर्वाध्यांत बोलिलोंचि ॥ २ ॥ त्या ईश्वरास ऐसें समजणें । आणि त्यास कर्मे समर्पणें । निर्दोषी आवडी उपजणें । हाचि भक्तियोग ॥ ३ ॥ जें दिव्यत्वें जन्म कर्म । जाणणें आणि विश्वचि सगुण ब्रह्म । ज्ञानतपें हा भक्तियोग उत्तमोत्तम । तो या भक्तियोगें ज्ञान जालिया ॥ ४ ॥ ज्ञान जालिया निर्गुणीं । सगुण सोडूनि राहिले कोणी । पूर्वी तो सगुणीं । भजलेच ते ॥५॥ परि पहिली भक्तीची पायरी । हेचि कीं कर्मे परमेश्वरीं । अर्पणें ज्यास ऐसेपरी । जाणोनी ॥ ६ ॥ या भावें ह्मणे हरी । कीं जाणोनि ऐसेपरी । मुमुक्षुजनीं चतुरीं । कर्म केलें ॥७॥ अर्जुना तस्मात्कारणें । तुवांही कर्मचि करणें । मी सम सदय अलिप्त ऐसा स्मरणें । माझिया ॥ ८ ॥ हें कर्मही ऐसें जाण । कीं पूर्वील जे भले सुजाण । तिहीं ही केलें या गुणें । कीं कर्म हीं अनादि ह्मणोनी ॥ ९ ॥ कीं अनादि अविद्या जैसी । हे कर्मप्रवृत्तिही तैसी । या कर्मे चित्त शुद्ध होतां मनासी । आत्मा कळतां अविद्या नासते ॥ ४१० ॥ कर्म ऐसें समजोनी । मज पूर्वोक्त गुणीं ऐसें जाणोनी । केलें कर्म पूर्विल्या मुमुक्षुजनीं । तस्मात्कर्मेचि तूं करीं हा श्लोकार्थ ॥ ११ ॥ आतां यापुढें श्लोक । तो किमर्थ बोले उत्तमश्लोक । त्याचें निमित्त मुमुक्षुलोक । समजोनि परिसोत अर्थ हा ॥ १२ ॥ ईश्वरीं अर्पिलें कर्म । तें कर्मचि होतें अकर्म । कीं वचनाग विषही वैद्य उत्तम । रसायन करितां नव्हे विष तेंचि ॥ १३ ॥ हे मुख्य अकर्माची खूण । आणि कर्मचि न करणें हें ही अकर्मपण । यालागीं मोहले जे भले निपुण । तेही येथें ॥ १४ ॥ हें सांगावया कर्मतत्त्व । बोलणें द्विविध अकर्मत्व । हें न जाणोनि कर्म करितां सत्त्व । न पावे शुद्धातें ॥ १५ ॥ इत्यादि कर्माचा

उकल । होय ऐसें बोलों पाहतो खोल । तें तुज सांगेन ह्मणतो आधीं सखोल । कर्मतत्त्व ह्मणतो या श्लोकीं ॥ १६ ॥

॥ श्लोक ॥ किं कर्म किमकर्मेति कवयोऽप्यत्र मोहिताः ।

तत्ते कर्म प्रवक्ष्यामि यज्ज्ञात्वा मोक्ष्यसेऽशुभात् ॥ १६ ॥

॥ टीका ॥ अगा कैसें काय तें कर्म । आणि कैसें तें अकर्म । हें न कळतां येथें भ्रम । विवेकींही पावले ॥ १७ ॥ तरी तें कर्म तूतें । सांगेन कीं जाणोनि त्यातें । त्याच्या अशुभा बंधातें । तूं न पावसी सुटसी त्यापासुनी ॥ १८ ॥ पूर्वार्धी अकळ कर्म अकर्म । ह्मणोनि उत्तरार्धी ह्मणतो तें कर्म । तुज सांगेन याचें वर्म । प्रकट करितो या पुढलिया श्लोकीं ॥ १९ ॥

॥ श्लोक ॥ कर्मणो ह्यपि बोद्धव्यं बोद्धव्यं च विकर्मणः ।

अकर्मणश्च बोद्धव्यं गहना कर्मणो गतिः ॥ १७ ॥

॥टीका॥ अगा गति कळावी कर्माची । आणि गति कळावी[1] विकर्माची । आणि गति कळावी अकर्माची । गहनकर्माची गति ह्मणोनी ॥४२०॥पूर्वश्लोकीं कर्म अकर्म । अकळ ह्मणोनि तुज सांगेन कर्म । ह्मणोनि बोलिला या श्लोकीं विकर्म । तिसरें वरोनि ह्मणतो गहनगति कर्माची ॥ २१ ॥ भाव कीं कर्म तेंही कर्म । आणि कर्मचि तेंही जें अकर्म । आणि कर्म जें ह्मणावें विकर्म । गहनगति या त्रिविध कर्माची ॥ २२ ॥ जें ज्यास वेदें[2]विहित तें कर्म । जें वेदीं निषेधिलें तें करणें विकर्म । वेदविहित न करणें अकर्म । कर्म ह्मणावें तिहींस ही ॥ २३ ॥ ज्यांत मारक दोष । त्यास ह्मणावें विष । बंधकारक हे तिन्ही विशेष । फलबंध कर्माचे ॥ २४ ॥ वेदोक्त[3] कर्में करणें । त्यांत नसती फलविवरणें[4] । परि पितृलोक फळ त्या आचरणें । निष्कामासही ॥ २५ ॥ या गोष्टीचा सिद्धांत । पूर्वी जालाच पूर्वाध्यायांत । कीं ईश्वरीं अनर्पित त्या कर्ममात्रांत । बंधकत्व विषांत मारकत्व जैसें ॥ २६ ॥ अरे अरे विषा । तूं टाकीं आपल्या दोषा । मज मरणेच्छारहितपुरुषा । मारूं नको मी भक्षितों तुजलागीं ॥ २७ ॥ टाकितां मरणेच्छाही मारी । परि तेंचि अर्पितां धन्वंतरीचे[5] करीं । तो रसराज[6] करितां मृत्युही वारी । ऐसें कर्म ईश्वरार्पित ॥ २८ ॥ एवं निष्कामासही वेदविहित । फलबंध बाधेच निश्चित । हे सुवर्णाची बेडी पायांत । तरी तोही बद्धचि निष्काम ॥ २९ ॥

---

१ बोध, खुलासा. २ स्वर्ग, स्वरूप. ३ वेदोक्त. ४ फलप्राप्तीचें विशेष कथन. ५ सद्वैद्य. ६ रसायन, औषध.

एवं बंधकचि विहित कर्म । वेदीं निषेधिलें तें तों विकर्म । नरकप्रद तैसेंचि अकर्म । कीं नरक वेदोक्तविहित टाकितां ॥४३०॥ तिन्ही बंधकेंचि यास्तव । तिहींस कर्म ह्मणावें हा भाव । कीं जें बध करी त्याचें नांव । कर्म मारक तितकें विष जैसें ॥ ३१ ॥ ह्मणोनि ह्मणतो श्रीपती । कीं गहन कर्माची गती । गहन ह्मणिजे खोल कीं जे बुडती । ते भूमिका न पावती सुटकेची ॥ ३२ ॥ फळ भोगूनि सुटणें । तें सुटकेचें नव्हे लक्षण । सुटती बहुत जन । करचरण कापून घेऊनी ॥ ३३ ॥ गहनजळीं बुडाले । ते देह फुगोनि तीरा लागले । ते न ह्मणावे तरले । तया गहन उदकातें ॥ ३४ ॥ कर्माची गहन गती । कीं फळभोग कधीं न चुकती । त्या कर्माच्या तीन रीती । कर्म अकर्म विकर्म हीं ॥ ३५ ॥ एवं वेदोक्तकर्ता ही नव्हे अभिज्ञ । विकर्माकर्मपर ते तों अज्ञ । कर्मतत्त्व समजे तो सर्वज्ञ । श्रीजगद्गुरु निज मुखें प्रकटितो या श्लोकीं ॥ ३६ ॥

॥ श्लोक ॥ कर्मण्यकर्म यः पश्येदकर्मणि च कर्म यः ।
स बुद्धिमान्मनुष्येषु स युक्तः कृत्स्नकर्मकृत् ॥ १८ ॥

॥ टीका ॥ अगा कर्म करूनि विहित वेदोक्त । जो ईश्वरीं समर्पितो भक्त । तो त्या कर्मींच कर्मफळविरक्त । अकर्म देखे ॥ ३७ ॥ कीं रसायन जालें विष । त्यास औषध ह्मणिजे देखोनि निर्दोष । तैसें नित्यकर्म निःशेष । ईश्वरीं अर्पितां देखे अकर्म कर्मीं तया ॥ ३८ ॥ हें मुख्य अकर्माचें लक्षण । ज्यास्तव चाललें हें निरूपण । दुसरें अकर्म अवलक्षण । कर्मत्यागरूप पूर्वश्लोकीं वर्णिलें ॥ ३९ ॥ त्या अकर्मीं देखे कर्म । कीं बंधकास कर्म ह्मणावें हें वर्म । कर्मत्यागीं अकर्म अधर्म । नरकप्रद तें अकर्मही यास्तव ॥ ४४० ॥ ह्मणूनि कर्मत्यागरूप अकर्म टाकुनी । कर्म करूनि तें निष्काम ईश्वरीं अर्पुनी । यापरी कर्मीं अकर्म अकर्मीं कर्म देखे ह्मणोनी । ह्मणे देव ॥ ४१ ॥ एवं कर्मीं देखे अकर्म । आणि अकर्मीं देखे कर्म । तो बुद्धिमंत मनुष्यांत परम । तो योगी तो सर्वकर्म करणार ॥४२॥ ह्मणतां तो बुद्धिमंत । विकर्माचें तत्त्वही भगवंत । सुचवी कीं बुद्धिमंत विवेकी अत्यंत । निषिद्ध विकर्म आचरेचि ना ॥ ४३ ॥ कीं वेदोक्त न करणें तें अकर्म । टाकिलें जैसें आचरोनि कर्म । तैसें टाकिलें निषिद्ध विकर्म । कीं बुद्धिमंत कर्त्ता सकळ वेदोक्तकर्माचा ॥ ४४ ॥ ऐसा श्लोकार्थ जाला । परि कर्मीं

१ स्थानें. २ खोल. ३ वेदोक्त कर्म करणारा. ४ वाईट.

अकर्म देखे भला। ऐसें श्रीकृष्ण बोलिला। तो बोल वाखाणिला ये रीतीं॥४५॥ कीं ईश्वरीं अर्पितां कर्म। चुके बंध ह्मणोनि अकर्म। कर्मी देखे ऐसें वर्म। वाखाणिलें परी नसे ईश्वरार्पण॥ ४६॥ ह्मणूनि कोण्ही ह्मणती। तरी अ-कर्म कर्मी देखे कोणे रीती। हें पुसतां बोलती। कीं निष्काम निरहंकारित्वें॥ ४७॥ तरी निष्काम निरहंकारपण। या श्लोकीं तों नसे हें बोलणें। पूर्वा-परविचारें ह्मणतां भगवदर्पण। बंधक नव्हे हें पूर्वाध्यायांत॥ ४८॥ एवं पूर्वापरविचाराविण। न सांपडे येथें कर्मी अकर्मखूण। तेव्हां अकर्म-त्वास कारण। ईश्वरार्पणचि हा सिद्धांत॥४९॥ "यज्ञार्थात्कर्मणोन्यत्र। लोकोयं कर्मबंधन" ह्मणूनि पद्मनेत्र। तत्त्वचि बोलिला कीं बंधक अन्यत्र। एका विष्णुसमर्पणावांचुनी॥५५०॥ एवं ईश्वरार्पण हा बोल। जेथें नसेल तेथें सखोल। भाव हा कीं नव्हे फोल। कर्मबंध ईश्वरार्पणावांचूनी॥५१॥ आतां यापुढें श्लोक। कोण्या प्रसंगें बोले उत्तमश्लोक। त्याचें निमित्त आधीं सुज्ञलोक। परिसोत॥ ५२॥ कर्म ईश्वरीं अर्पित। तें बंधक नव्हे निश्चित। हे श्रीकृष्णें एथपर्यंत। अर्थें भावार्थें निरूपिलें॥ ५३॥ तरी हें क्रियमाण कर्म। ईश्वरीं अर्पितां जालें अकर्म। कीं न करी बंध ह्मणूनि वर्म। कळलें क्रियमाणाचें॥ ५४॥ परि पूर्वसंचिताचे पर्वत। उरले आहेत अपरिमित। तीं फळें भोगावीं निश्चित। साध्य काय कर्मी। अ-कर्म देखोनि हीं॥ ५५॥ मुमुक्षु येथें ह्मणती। कीं बंधपरिहार श्रीपती। क्रियमाणाचा बोलिला ये रीती। न बोलिला नाश संचित कर्माचा॥ ५६॥ तरी कर्मबंधपरिहारप्रकरण[1]। येथें संचितकर्मनाशनिरूपण[2]। केलें पाहिजे हें सर्वज्ञ निपुण। विचारिताजाला ये स्थळीं॥ ५७॥ परी ईश्वरीं अर्पितां कर्म। श्रीगुरुरूपें तेंचि सगुण ब्रह्म। अपरोक्षानुभव[3] देतां भस्म। ज्ञानाग्नीनें होय संचित कर्मांचें॥ ५८॥ त्या ज्ञानियांत कितीएक। सगुण सांडूनि झाले निर्गुणोपासक। निर्गुणानुभवें सगुणसेवक। होती कोण्ही॥ ५९॥ परि ज्ञान जालियावरी। उपासक जे हे दोंपरी। दोहींचीं कर्में वैश्वानरीं[4]। जळती ज्ञानाचिया॥ ४६०॥ परी दोघांचे दोनी प्रकार। वेगळे त्यांत जो नर। निर्गुणमात्रीं सादर। कर्म नाश त्याचा बोलतो प्रथम या श्लोकीं॥६१॥

---

१ कर्मबंधक न होण्याचे प्रकरणीं. २ संचित कर्मनाशाचें कथन. ३ प्रत्यक्ष अनुभव. ४ अग्नींत.

॥ श्लोक ॥ यस्य सर्वे समारंभाः कामसंकल्पवर्जिताः ।
ज्ञानाग्निदग्धकर्माणं तमाहुः पंडितं बुधाः ॥ १९ ॥

॥ टीका ॥ अगा ज्ञानाग्नीनें कर्म । जो जाळूनि करी भस्म । त्यातें वशिष्ठादि ज्ञानी परम । पंडित ह्मणती ॥ ६२ ॥ कर्मी देखे अकर्म । पूर्वी वर्णिला ज्याचें क्रियमाण कर्म । बंधक नव्हे तो कर्मयोगी परम । परि नव्हे ज्ञानी ॥ ६३ ॥ तोचि कर्म करितां ईश्वरार्पित । ज्ञान पावोनि होतो पंडित । पंडित तो जो अनुभवी अत्यंत । शास्त्रज्ञास उगाच वडिवार त्या नांवें ॥ ६४ ॥ तो ज्ञानाग्नीकरूनी । कर्मे जाळितो ह्मणोनी । ह्मणतां सूचवी यावरूनी । कीं कर्मे संचितें बहुतां जन्मांची ॥ ६५ ॥ जाळितो ये जन्मींचीं कर्मे । तरी तीं ज्ञानाहूनि पूर्वींही अकर्मे । होताति ऐसें पुरुषोत्तमें । निरूपिलें पूर्वीं ॥ ६६ ॥ याकारणें जाळूनि भस्म । ज्ञानाग्नीनें जे करितो कर्मे । तें संचित जें अनेकजन्म । उरलें प्रारब्धें भोगितां ॥ ६७ ॥ अतएव हा पंडित । कीं पूर्वोक्त तो अपंडित । हा पंडितज्ञानमंडित[1] । जो जाळी संचितें कर्मे अवघीं ॥ ६८ परि ज्यास निर्गुणमात्रीं उपासना । तो हा कृष्णें सांगीतला अर्जुना । यास सगुणभक्ति असेना । ज्ञान जालिया उपरी ॥ ६९ ॥ हा ज्ञान जालियावरी । कर्मे न अर्पी ईश्वरीं । ज्ञानाग्नीनेंचि भस्म करी । संचित क्रियमाण हीं ॥ ४७० ॥ ज्ञानाग्नीनें संचितें जाळी । आणि अकर्त्रात्मपणें क्रियमाणकाळीं । अहंकर्तृत्वाच्या विटाळीं । आतळें न करी चित्तासीं ॥ ७१ ॥ कीं ज्याचे समारंभ सकळ । कामसंकल्पवर्जित निर्मळ । कीं कामना आणि अहंकर्तृत्वाचें मूळ । दोन्हीं समूळ नसती जयासी ॥ ७२ ॥ अगत्य कर्माचे आरंभ । त्यास ह्मणावे समारंभ । ते ह्मणे कमलनाभ । कामसंकल्पवर्जित जयांचे ॥ ७३ ॥ अगत्य कर्मारंभ ह्मणिजे । देहास अगत्य जें पाहिजे । अन्नोदकार्थ पदार्थ जे जे । देहनिर्वाहार्थ मेळवावे ॥ ७४ ॥ अगत्य कर्मारंभ ऐसे । तेथें काम आणि संकल्प वसे । तो काम आणि संकल्पही नसे । अगत्यकर्मारंभींही जयांच्या ॥ ७५ ॥ क्षुधेस मिष्टान्न मिळावें । तृषेस गोड शीतळ जळ व्हावें । अगत्यकर्मारंभीं पाहावें । रूप इत्यादि कर्माचें ॥ ७६ ॥ अगत्यदेहनिर्वाहार्थेही असा । नसे ज्यास कामाचा वळसा । आतां देहनिर्वाह जसा तैसा । हो माझा संकल्पही असेना

[1] ज्ञान्याच्याही ज्ञानांस भूषित करणारा.

॥ ७७ ॥ निःशेष गेलें मीपण । जो अनंत सर्वगत आपण । न स्फुरे मी ह्मणायाची खूण । त्यास माझा निर्वाह हो हा संकल्प कैंचा ॥ ७८ ॥ मी आणि माझें । वृत्तीस हें नसेच ओझें । संकल्प त्या योगिराजें । करावा काय ॥ ७९॥ मुखीं पडे ग्रास । तो गिळतांही प्रयास । नसती अयास जयास । कामसंकल्पाचे ॥४८०॥ पाजिलें कोण्हीं जल । तें गोड क्षार उष्ण कीं शीतल । मज कैसें लागतें हाही समूळ । संकल्प नसे जयासी ॥ ८१ ॥ बैसला निजेला जेथें । मळमूत्र टांकी तेथें । हागेन मुतेन हाही येथें । न वाहे संकल्प ॥ ८२ ॥ मी बैसलों कीं निजलों येथें । हें न स्फुरोनि मळमूत्र तेथें । टांकी न साहे संकल्प जेथें । मी हागेन मुतेन इतकाही ॥ ८३ ॥ हे अगत्य देहकर्मांचे आरंभ । ऐसेही जयाचे समारंभ । तेही ह्मणे कमलनाभ। ऐसे कामसंकल्पवर्जित ॥ ८४ ॥ काम जेथें नसे । संकल्प जेथें न दिसे । ब्रह्मीं चित्त समरसें । असे जयाचें ॥८५ ॥ त्यासही मी एक कर्त्ता । स्फुरेल कोठूनि हे वार्ता । एवं जो ऐसा अकर्ता । क्रियमाणलेप कैंचा तया ॥ ८६ ॥ एवं समाधींत चित्त । ज्ञानाग्नीनें भर्जितां संचित । जळे आणि क्रियमाण तों निश्चित । न शिवे जया अकर्तया ॥ ८७ ॥ ऐशाचेंही शरीर । जितें हा प्रारब्धाचा बडिवार । तें भोगें सरे हा त्रिप्रकार । लय ज्ञानियांच्या कर्मांचा ॥ ८८ ॥ निर्गुणोपासनाच अत्यंत । तो हा वर्णिला ज्ञानवंत । कीं ऐसा त्यास ह्मणती संत । पंडित ह्मणोन ॥ ८९ ॥ येथें भाव दावी हरी । कीं हा ज्ञान जालियावरी । निर्गुणमात्रीं उपासक परी । भक्त नव्हे भागवत ॥ ४९० ॥ ह्मणूनि ह्मणे कीं पंडित । इतकेंचि यासि ह्मणती संत । तेथूनि चौथ्या श्लोकीं अनंत । ज्ञानी भक्त या प्रसंगींच वर्णील ॥ ९१ ॥ आतां यापुढें श्लोक । तो कां बोले उत्तमश्लोक । त्याचें निमित्त आधीं सुज्ञ लोक । परिसोत अर्थ त्यावरी ॥ ९२ ॥ पूर्वश्लोकीं हरी । अकर्त्रात्मपणाची परी । बोलिला तों ते खरी । अजगरवृत्ति पाहतां ॥ ९३ ॥ कीं अकस्मात येऊनी । जें पडे अजगराचे आननीं । असे तें तितकेंच गिळूनी । वृत्ति ऐसी ज्ञानियाची ॥ ९४ ॥ तरी अजगरवृत्तीवांचूनी । क्रियमाण लेप न चुके ह्मणोनी । सिद्धांत जाला ऐसें मनीं । अर्जुनादिकांच्या वाटेल ॥ ९५ ॥ प्रारब्धाच्या तरी गती । नाना प्रकारींच्या दिसती । न धरितां अजगरवृत्ति । राज्यें हीं जनकादिकीं चालविलीं ॥ ९६ ॥ ज्याचें प्रारब्ध ही ऐसें । कीं शरीर जैसें तैसें । आयुष्य सरिजे तें अनायासें । वांचावें ॥ ९७ ॥ ज्ञान आणि ऐसें

प्रारब्ध ।·घुणाक्षरन्यायें जालें लब्ध । तो नित्य समाधिस्थ स्तब्ध । अकर्त्रा-त्मत्वें ऐसा वर्णिला ॥९८॥ कीं नसोनि हो ज्ञान । अंध मूक बधिर जन । त्यांची देहयात्रा उदक अन्न । ऐसेंचि चालतें ॥ ९९ ॥ प्रारब्ध ऐसें अ-सोनी । अमित निष्काम पुण्यें जाला ज्ञानी । तो अकर्ता सहज ऐसा म्ह-णोनी । उत्तमकोटींत पडला ॥ ५००॥ आतां अकर्त्रात्मयोग । वाणला असोनि विचित्र भोग । ज्यास घडती त्याचा प्रसंग । श्रीरंग बोलतो या श्लोकीं ॥१॥

॥ श्लोक ॥ त्यक्त्वा कर्मफलासंगं नित्यतृप्तो निराश्रयः ।
कर्मण्यभिप्रवृत्तोपि नैव किंचित्करोति सः ॥ २० ॥

॥ टीका ॥ अगा कर्मफल आणि संग । कीं मी कर्त्ता ऐसा प्रसंग । टा-कूनि तृप्त अंतरंग । ज्ञानें सर्वदा जयाचें ॥ २ ॥ स्वयें अनंत सर्वगत । सर्वही मृगजल निजाश्रित । आपणास आपण आश्रय निश्चित । निराश्रय ऐसा ॥ ३ ॥ तो प्रारब्धें कर्म अशेष । करी सर्वकर्मीं वर्ते पुरुष । तरी अकर्ता निर्दोष । कांहींच नाहीं करीत तो ॥ ४ ॥ हा जें टाकितो कर्मफळ । तें नव्हे वेदोक्त केवळ । कीं वेदोक्तकर्मीं अकर्म समूळ । जिज्ञासुदशेंतही वर्णिलें ॥ ५ ॥ ज्ञान जालियावरी । कर्मफलत्याग यापरी । कीं प्रारब्धें कर्मीं प्रवर्त्ते परी । विषयसुखेच्छा न धरी कदापि ॥ ६ ॥ जो जें कर्म करितो । त्या कर्में सुख हो ह्मणतो । कोण्ही सुखेच्छेवांचूनि तों । न करी कर्मीं प्रवृत्ती॥७॥ तैसा नव्हे हा ज्ञानी । कर्मीं प्रवर्त्ततां मज सुख हो ह्मणोनी । न ह्मणे ऐसें कर्मफल टांकूनी । निःसंग कर्मीं प्रवर्ततो ॥ ८ ॥ संग हा कीं हा मी कर्त्ता । हे त्याच्या चित्तीं नसे वार्ता । कीं त्या निराश्रय अनंता । कर्तृत्व कैंचें ॥ ९ ॥ योगक्षेमार्थ आश्रय । नसे ज्यास तो हा निराश्रय । निराश्रयश-ब्दार्थनिर्णय । ऐसें न घडे ये स्थळीं ॥ ५१० ॥ कीं जनकासारिखा ज्ञानी । अकर्ता सर्व कर्में करूनी । तो योगक्षेमार्थ आश्रय न धरी ह्मणोनी । निरा-श्रय केवीं न ह्मणावें ॥ ११ ॥ टाकिलें कर्माचें फळ । संग टाकिला समूळ । हें वर्णूनि उदरार्थ केवळ । आश्रय न करी ह्मणे हें व्यर्थ ॥ १२ ॥ योग-क्षेम दोंपरी । एक स्वदेहमात्र निर्वाह करी । कुटुंब एकाचे घरीं । हे दोघे दों श्लोकीं यापुढें वर्णील ॥ १३ ॥ त्यक्तसर्वपरिग्रह । आणि शरीरमात्राचा

---

१ घुणा ह्मणून जो किडा असतो तो स्वेच्छेनें काष्ठ कोरीत असतां सहज री-त्या क, ख, इ० अक्षरें कोरलेलीं दृष्ट होतात; पण तीं त्याचीं बुद्धिकृत नव्हत तसें. २ योग=संपादन करणें व क्षेम=लब्धाचें पालन. ३ त्यक्तोपाधि.

निर्वाह । करी जो तोही अलिप्त निस्पृह । हें या पुढील श्लोकीं वर्णील ॥ १४॥ यदृच्छालाभसंतुष्ट ज्ञानी । तो कुटुंबी या भावें करूनी । वर्णूनि तोही लिप्त नव्हे ह्मणोनी । त्या पुढिल्या श्लोकीं श्रीकृष्ण वर्णील ॥ १५ ॥ ऐशा भिन्न-भिन्न उक्ती । प्रतिश्लोकीं तरीच चुकती पुनरुक्ती । अन्यथा याहूनि पूर्व-श्लोकींच अभिव्यक्ती । कर्मनाशाची वर्णिली ॥ १६ ॥ एवं निराश्रय ह्मणजे अनंत । ज्यास आद्यंत ते पराश्रित । स्वयें सर्वाश्रय निश्चित । हा स्वरूपानु-भव जयाचा ॥ १७ ॥ आणि जो जाला ज्ञानी । तो टाकितो कर्मफळ ह्म-णोनी । येथें ह्मणों नये कीं कर्मी अकर्म देखे ह्मणोनी । ज्ञान पावला निष्काम ॥ १८ ॥ कर्मी अकर्म पाहे । कीं त्या कर्मीं बंधकत्व न साहे । फळ टाकणें हें तों घडत आहे । जिज्ञासुदशेंत ही ॥ १९ ॥ ज्ञान जालियावरी । कर्म-फलत्याग अन्यत्रही हरी । बोलेल परि भाव अंतरीं । कीं विषयसुख तें कर्मफळ ॥ ६२० ॥ ज्यास जें कर्म करणें । तें विषयसुखाचकारणें । तें आत्मसुख अनुभवाविणें । टाकणें घडेना ॥ २१ ॥ येथें विषयसुखचि कर्मफल । आणि संग अहंकर्तृत्वादिमळ । टाकूनि सर्वकर्मी प्रवर्तला निर्मळ । तरी नित्यतृप्त कांहींच नाहीं करीत तो ॥ २२ ॥ तृप्त नित्यसुखेंकरूनी । अनित्य विषयसुखेच्छा टांकी ह्मणोनी । प्रारब्धें सर्वकर्मीं प्रवर्तला ज्ञानी । तरी कांहींच नाहीं करीत तो ॥२३॥ नित्यतृप्त कर्में करितो । तरी क्षुधित अन्नादितृप्ति इच्छितो । एवं ऐसा जरी तरी तो । त्या कर्मीं न लिंपे ह्मणतो या श्लोकीं ॥ २४ ॥

॥ श्लोक ॥ निराशीर्यतचित्तात्मा त्यक्तसर्वपरिग्रहः ।
शारीरं केवलं कर्म कुर्वन्नाप्नोति किल्बिषम् ॥ २१ ॥

॥ टीका ॥ ज्या कर्में रक्षावें शरीर । तें ह्मणावें शारीर । तें ही केवळ कीं नव्हे सादर । रसनादिकीं रसग्रहणाद्यपेक्षेत ॥२५ ॥ भलत्या आहारें प्राण । स्थिर होतो हा मुख्य गुण । या प्राणवृत्तीनें अन्नादि मेळवणें । शरीर कर्म ऐसें केवळ ॥२६॥ इंद्रियांस पाहिजे रस विचित्र । प्राणांस आहार मात्र । टाकूनि इंद्रियवृत्ति अपवित्र । प्राणवृत्तिपवित्रपणें हा वर्ते ॥२७॥ कीं कामना टाकूनि विरक्त । नियत ज्याची बुद्धि आणि चित्त । तो शरीरनिर्वाह करूनि निश्चित । पावत नाहीं कर्मबंधातें ॥ २८ ॥ ज्याणें टाकिला सर्व परिग्रह । ह्मणिजे न स्त्री पुत्र अथवा गृह । तो केवळ शरीरनिर्वाह। करी तऱ्ही न पावे कर्मबंधातें॥२९॥

---

१ ईश्वरेच्छेनें मिळतें त्यांत संतोषी. २ आसक्त. ३ स्पष्टीकरण.

मातीच्या भिंती । मातीनेंच लिंपिती । कर्में जाले देह ते वर्तती । कर्मेंचि करूनी ॥ ८३० ॥ क्षुधेस पाहिजे अन्न । तृषेस पाहिजे जीवन¹ । बरें वाई टआच्छादन² । शीतनिवृत्तीकारणें ॥ ३१ ॥ क्षुधादिबाधेनें विकळ । होतां चित्तीं होय डळमळ । तेव्हां चित्त शुद्ध जरी केवळ । स्थिर नव्हे स्वस्वरूपीं ॥ ३२ ॥ याकारणें ज्ञानी । विषयवासना टांकूनी । शरीरनिर्वाह करितां त्या कर्मेंकरूनी । पावत नसे किल्बिषातें ॥ ३३ ॥ पापास किल्बिष ह्मणावें । तें पाप एक किल्बिषाच्या नांवें । या प्रकरणीं या भावें घ्यावें । कीं पाप पुण्य दोन्ही पापचि ॥ ३४ ॥ सोनियाची बेडी । आपणाकारणें घडी । तऱ्ही बंधाचि जोडी । बेडी तेही ॥ ३५ ॥ पाप पुण्य मिळोनि । कर्म संचित क्रियमाण दोनी - दोहींनें पापेंचि ह्मणोनि । वेदांतीं ब्रह्मसूत्रीं प्रसिद्धि ऐसी ॥ ३६ ॥ ब्रह्मसूत्र ॥ तदधिगमे उत्तरपूर्वाघयोरश्लेषविनाशौ ॥ सूत्रार्थ ॥ जाला असतां ब्रह्मानुभव । पुढें जो पापाचा संभव । त्याचा नव्हे लेप लेश लव । आणि नाश पूर्विल्या पापांचा ॥ ३७ ॥ पुढिलिया क्रियमाणाचा नव्हे लेप । आणि नासे मागील संचित पाप । द्विविध कर्मीं द्विविध प्रताप । सूचविला ज्ञानाचा ॥ ३८ ॥ लेप नव्हे क्रियमाणाचा । या भावें बोलते व्यासाची वाचा । कीं अकर्त्रात्मानुभव साचा । जाला तयाच्या बुद्धीस ॥ ३९ ॥ यालागीं पापपुण्यरूप । त्यास न स्पर्शे क्रियमाण पाप । संचित पाप जळे तो प्रताप । ज्ञानाग्नीचा ॥ ८४० ॥ "ज्ञानाग्निदग्धकर्माणि" ह्मणोनि । याचि भावें स्वमुखें करूनी । श्रीकृष्ण बोलिला हें जेथूनी । प्रकरण संचितक्रियमाणनाशाचें ॥ ४१ ॥ एवं ज्ञानाग्नीनें जळे संचित । न करितां विस्तार त्याचा बहुत । क्रियमाणलेप नव्हे हें अद्भुत । त्याचे प्रकार नाना सांगितले ॥ ४२ ॥ पहिली बोलिली अजगरवृत्ती³ । कीं ऐसियास कर्म न स्पर्शती ॥ तदुपरि जरी सर्वकर्मी प्रवृत्ती । अकर्त्रात्मत्वें करी तरी अलिप्त ॥ ४३ ॥ प्रवृत्ति कर्मी कां परी । नित्यतृप्तास हे शंका त्याउपरी । तरी कर्म शरीररक्षणार्थ करी । हें बोलिलें या श्लोकीं ॥ ४४ ॥ कीं टाकिला सकळपरिग्रह । जयास न कुटुंब न गृह । तो करी शरीरमात्रनिर्वाह । तरी न पावे किल्बिषातें ॥ ४५ ॥ किल्बिष ह्मणिजे पापमात्र । परि पापपुण्या संचितक्रियमाण विचित्र । पाप ह्मणावें येथियें ब्रह्मसूत्र । प्रमाण ह्मणोनि वाखाणिलें ॥ ४६ ॥ आतां यापुढें श्लोक ।

---

१ उदक. २ वस्त्र. ३ उद्योग न करतां दैवानें जें मिळेल तें खाऊन असणारें अजगराप्रमाणें वर्तन. ( आरमामक सर्पाप्रमाणें. )

तो किमर्थ बोले उत्तमश्लोक । त्याचें निमित्त आदीं सुश्लोक । परिसोत अर्थ तदुपरि ॥ ४७ ॥ पूर्वश्लोकीं क्रियमाण । न लिंपे ज्यास त्याचें लक्षण । वर्णितां बोलिला कृष्ण । कीं टांकिला ज्याणें परिग्रह सर्व ही ॥ ४८ ॥ ज्याणें टांकिला सर्व परिग्रह । ज्यास कुटुंब ना गृह । तो शरीरमात्रनिर्वाह । करितां कर्मे लिप्त नव्हे ॥ ४९ ॥ हें पडतां कानीं । शंका उपजली अर्जुनाचे मनीं । कीं कुटुंबी गृहस्थ ज्ञानी । लिप्त होतो कीं काय ॥५०॥ ज्ञानी आणि कुटुंबाचा धणी । ज्यावांचूनि त्यास पाळक नसे कोणी । त्याणें प्रवर्ततां त्याच्या रक्षणीं । काय लेप होय क्रियमाणा ॥ ५१ ॥ हें अर्जुनाचे मनीं । तोच अंतर्यामी समजोनी । तोही अलिप्त ऐसा ह्मणोनी । बोलत असे या श्लोकीं ॥ ५२ ॥

॥ श्लोक ॥ यदृच्छालाभसंतुष्टो द्वंद्वातीतो विमत्सरः ।
समःसिद्धावसिद्धौ च कृत्वापि न निबध्यते ॥ २२ ॥

॥ टीका ॥ अगा कुटुंबी असोनी । जो संतुष्ट यथालाभें करूनी । द्वंद्वमत्सररहित ज्ञानी । बद्ध तो ही कां होईल ॥ ५३ ॥ यदृच्छलाभाचा ऐसा अर्थ । न मागतां न इच्छितां पदार्थ । जैसे मिळाले होय सिद्धार्थ । तितकियानें ॥५४॥ हा यदृच्छालाभसंतोष । न मानी तोचि पुरुष । कीं ज्याचे मनीं असेल दोष । द्वंद्वमत्सराचा ॥ ५५ ॥ द्वंद्व ह्मणिजे जोडें । ज्या जोडियांत एक सुख एक दुःख घडे । लाभ अलाभ मान अपमान रोकडे । हे जोडे नसती सुखदुःखहेतु जयासी ॥ ५६ ॥ द्वंद्व इत्यादि ह्मणावीं । त्यांत जो कुटुंबी गोसावी । त्याणें पुत्रकलत्रादि पोसावीं । मुख्य अयाचितवृत्तीनें ॥ ५७ ॥ कुटुंबास उदंड पाहिजे । त्यांत मिळती पदार्थ जे जे । तिहीं सुखी न होइजे । न मिळती तिहीं न होइजे दुःखी ही ॥ ५८ ॥ लाभालाभद्वंद्वरहित । तो लाभें संतुष्ट अलाभें संतोषवर्जित । नव्हे ऐसें असोनि भगवंत । यदृच्छालाभसंतुष्ट तो ह्मणे ॥ ५९ ॥ ऐसा परस्पर वाक्यविरोध । याचा करितां करा शोध । होतो यथास्थित बोध । यदृच्छालाभासंतोषाचा ॥ ६० ॥ यत्नाविणें लाभ जाला । त्याणें ही संतोष त्याला । न ह्मणवा कीं जयाला । संतोष एक आत्मानुभवाचा ॥ ६१ ॥ परंतु कुटुंबासहित स्वदेह । त्याचा क्षुधादिपरिहारनिर्वाह । नव्हतां जरी सर्व निस्पृह । अन्नादि अपेक्षा उपजेच ॥ ६२ ॥ कीं तृषा अथवा क्षुधा । जेंव्हां अंतरीं करिती बाधा । चित्त तेंव्हां सर्वात्मबोधा । न झोंबे उत्साहें करूनी ॥ ६३ ॥ त्या क्षुधादिकांचा वळसा । निवारे जैसा तैसा । यदृच्छालाभ होतां

तैसा संतुष्ट होतो ॥६४॥ कीं भलती तृषा क्षुधा । याणें शमतां चित्ताची बाधा । दूरी होतां त्या नित्यात्मबोधा । स्पर्शोनि असेल उत्साहें ॥ ६५ ॥ यदृच्छा-लाभें संतोष । या भावें मानी ज्ञानी पुरुष । जो पदार्थे संतोषतो अत्यंत दोष । कीं जडीं सत्यत्व सुखहेतुत्व उपजलें ॥ ६६ ॥ यालागीं लाभालाभसम । द्वंद्वातीत उत्तम । ह्मणोनि बोलिला पुरुषोत्तम । यदृच्छालाभसंतुष्ट ऐसा असोनि ही ॥६७ ॥ ऐसाच सम मानापमानीं । आणि असे निर्मत्सर होऊनी । कीं कोणाचा उत्कर्ष देखोनी । हें मज कां नाहीं ह्मणेना ॥ ६८ ॥ ऐसा अयाचितवृत्तीं करूनी । बद्ध नव्हे कुटुंबी ही ज्ञानी । कीं यदृच्छालाभसंतुष्ट ह्मणोनी । आणि द्वंद्वातीत निर्मत्सर ॥ ६९ ॥ आतां ज्ञाताही होऊनी । कुटुंबनिर्वाह यत्नावांचूनी । नव्हे तरी काय तो ज्ञानी । लिप्त होतो क्रियमाणें ॥ ५७० ॥ ऐशा संशयाचें स्थळ । देखोनि येथें मेघनीळ । ह्मणतो त्यासही बंधमूळ । नव्हे असेल जरी ऐसा ॥ ७१ ॥ आणि सिद्ध्यसिद्धींत सम । चित्तवृत्ति नव्हे विषम । तो करूनि कांहीं उद्यम । बद्ध नव्हे ॥७२॥ करितां यत्नाचा आरंभ । ह्मणे होणार तोचि होईल लाभ । कार्य सिद्ध होतां हृदय-कुंभ । न भरी हर्षें मृगजळाच्या ॥ ७३ ॥ कार्यसिद्धि नव्हे जरी । खेद न मानी कोण्हेपरी । आत्मलाभें सुख अंतरीं । अखंड त्याच्या ॥ ७४ ॥ एवं जो ज्ञानीं अनुभवी ब्रह्म । त्याचें ऐसें नासे त्रिविध कर्म । ह्मणूनि वर्णिलें कीं ज्ञान निष्कर्म । होतां न उरे कर्मबंध ॥ ७५ ॥ आतां यापुढें श्लोक । तो कां बोले उत्तमश्लोक । त्याचें निमित्त सुज्ञलोक । परिसोत आधीं मग अर्थ ॥ ७६ ॥ क्रियमाणें नव्हे लिप्त । ज्ञानाग्नीनें जळे संचित । ज्याचें तो येथ-पर्यंत । वर्णिला ज्ञानी ॥ ७७ ॥ त्याणें स्वस्वरूपीं असावें । कीं ज्ञानाकारणें शरीर रक्षावें । अथवा प्रारब्धें कुटुंब पोसावें । यथालाभें करूनी ॥ ७८ ॥ अथवा प्रारब्धें करूनी । राज्यादिसर्वकर्मीही ज्ञानी । प्रवर्ते तथापि अकर्त्रा-त्मत्वें करूनी । तो लिप्त नव्हे ॥ ७९ ॥ एवं प्रारब्धानुरूप कर्म करी । कीं निर्गुणीं ध्यान धरी । ह्मणूनि वर्णिला परी । सगुणभजन नाहीं वर्णिलें ॥ ५८० ॥ तरी ज्यास अपरोक्षज्ञान जालें । ज्ञानाग्नीनें संचित जळालें । लिप्त न होतांचि गळालें । क्रियमाण ज्याचें ॥८१॥ जो ऐसा ज्ञानी निपुण । त्याणें काय न भजावा सगुण । किंवा सगुणभजन होतें कारण । बंधासी ॥ ८२॥ हें येथें संशयाचें स्थळ । परि सगुणभक्त ज्ञानी तोही केवळ । निर्गुणानुभवेंचि सकळ । कर्मे नाशितो ॥ ८३ ॥ त्यांत नियत कर्म । आणि

श्रवणकीर्तनादि भजनधर्म । आणि प्रारब्धें लौकिक उद्यम । सर्व भागवतध-र्मीं योजितो ॥ ८४ ॥ ह्मणून याउपरी । या भावें श्रीहरी । ज्ञानीं स्वभक्त त्याचिपरी । सांगतो आतां या श्लोकीं ॥ ८५ ॥

॥ श्लोक ॥ गतसंगस्य मुक्तस्य ज्ञानावस्थितचेतसः ।
यज्ञायाचरतः कर्म समग्रं प्रविलीयते ॥ २३ ॥

॥ टीका ॥ अगा ज्ञानी आणि भक्तनिपुण । ज्ञान तंव त्याचेंही तेंचि नि-र्गुण । विशेष हाचि कीं सर्वकर्मार्पण । सगुणीं करीतसे ॥ ८६ ॥ कीं यज्ञ तो विष्णु सगुण । त्याकारणेंचि तो निपुण । आचरतो कर्म आणि तदर्पण । तें सर्वही करीतसे ॥ ८७ ॥ कीं समग्रही करणें । त्याचें विष्णूचकारणें । कीं जें करणें तें अशेष समर्पणें । विष्णूतेंचि ॥ ८८ ॥ विष्णूकारणें समग्र कर्म । करणें हाचि वैष्णवधर्म । तें कर्म तों होतें अकर्म । जिज्ञासुदशेंत ही ॥ ८९ ॥ तें ज्ञान जालियावरी । बंधक होईल काय परी । पूर्वोक्त ज्ञानि-यांत कोण्ही न करी । सगुणभजन ॥५९० ॥ ह्मणूनि त्याची ज्ञानीं स्थिती । कीं प्रारब्धें लोकीं प्रवृत्ती । दोहींत सांगीतल्या रीती । संचित क्रियमाणना-शाच्या ॥ ९१ ॥ कीं त्यांस कळलें निर्गुण । तेव्हां तिहीं सोडिलें सगुण । त्यांची सगुणभजनाची खूण । काय वर्णावी ॥ ९२ ॥ कळोनिही निर्गुण । ज्ञानानुभवी न सोडी सगुण । त्याच्या कर्माचें नाशलक्षण । वर्णिलें नाहीं यास्तव येथें ॥ ९३ ॥ परि येथें संदेहनिर्माण । होणार कीं त्याचें क्रियमाण । नाशतें कीं नाहीं हें निरूपण । जालें नाहीं यास्तव ॥ ९४ ॥ ह्मणूनि लागलें बोलणें । कीं त्याचें समग्र कर्म करणें । तें यज्ञा सगुणा विष्णूकारणें । तें तों प्रकर्षे विशेषें होतसे लीन ॥९५॥ प्रविलीयते ह्मणोनी । कृष्ण ह्मणे या भावें करूनी । लीयते इतकेंचि ह्मणतां तऱ्ही त्यावरूनी । हो-तोच अर्थ कर्मनाशाचा ॥ ९६ ॥ प्रविलीयते ह्मणणें । तें इतकियाकारणें । कीं विष्णूकारणें कर्म करणें । तें बंध जिज्ञासुदशेंतही करीना ॥ ९७ ॥ हें तों ज्ञानियाचें प्रकरण । ज्ञानी होऊनि जो सेवी सगुण । भजनरूप त्याचें क्रियमाण । प्रकर्षे विशेषें लय पावतें ॥ ९८ ॥ आतां कर्मनाशीं प्रकर्ष । कर्मनाशीं कोण विशेष । कर्मनाश तों निःशेष । निर्गुणोपासकांचाही होतसे ॥ ९९ ॥ तरी अध्याय जो द्वादश । तेथें निर्गुणोपासकां अधिक क्लेश । सगुणोपासकांपरीस हृषीकेश । बोलेल पुढें ॥ ६०० ॥ कीं समान ज्ञान आणि मोक्षफळ । अधिक तो क्लेशचि केवळ । कीं ज्या ज्ञानसिद्धीनें कर्म

समूळ । जळे तेथें कष्टती बहुयत्नें ॥ १ ॥ कीं त्यांस ईश्वर सहाय । नसतां क्लेश अत्यंत होय । यांसि इंद्रियादिजय । अनायासें कृपेनें सगुणाच्या ॥२॥ त्यांस कष्टाचेंच मोल । परि त्यांत बहुत यत्न होती फोल । ह्मणूनि त्यांस मी तारक ऐसा बोल । न निघे मुखांतूनि जगदीश्वराच्या ॥ ३ ॥ " ते मामनुर्वात मामेव " । इतकेंचि ह्मणे देवाधिदेव । अर्थी दाखवी ऐसा भाव । कीं त्याच्या यत्नेंचि ते मज पावती ॥ ४ ॥ "तेषामहं समुद्धर्ता" । ह्मणूनि ह्मणे भक्तांचा मी सिद्धिकर्ता । हा विचार करितां पुरता । 'प्रविलीयते' या शब्दाचा अर्थ सांपडे ॥ ५ ॥ शत्रु जाळिला एकीं नरीं । कष्टूनि पेटवूनि वैश्वानरीं । एकीं अनायासें तदंतरीं । जाळिला सुगंध तेलें स्नेहें भक्तीच्या ॥६॥ त्यांस सहाय त्यांचें साधनपरिकर[1] । यांस सहाय सर्वेश्वर । कर्मशत्रु जाळोनि सुखकर । भक्तियोग मुक्तीपरीस ही ॥ ७ ॥ काष्ठ आणि चंद्रज्योती । दोन्ही ही जळोनि विझती । परि प्रकर्षें विशेषें जळती । चंद्रज्योति प्रकाशें चांगल्या ॥ ८ ॥ किमर्थ दृष्टांत फार । ग्रंथ होतो अपार । एवं प्रकर्षें विशेषें कर्मसंहार । होतो भक्तां ज्ञानियांचा ॥ ९ ॥ आत्मानुभवी नित्य नव । विश्व आपण हा अनुभव । भगवत्पद षड्गुणवैभव । प्राप्त तया ॥ ६१० ॥ अनुभव ऐसा अंतरीं । श्रवणकीर्तनादिभक्ति करी । आपण तरोनि जग तारी । भक्त अनुभवी ऐसा ॥ ११ ॥ करी जनसंग्रहार्थ कर्म । सर्वकर्मी देखे ब्रह्म । प्रारब्धें शरीरधर्म । हें सर्व करणें भगवदर्थ॥१२॥ यज्ञ विष्णु तदर्पण । करायाच कारणें कर्मकरण । हें तृतीयाध्यायांत विवरण । आरूढावस्थेंत संस्कार तोचि ॥ १३ ॥ एवं भक्ति आणि शरीरयात्रा । परोपदेशादिकर्ममात्रा । अर्पावया यज्ञनामका कमलनेत्रा । आचरे जो ॥ १४ ॥ शुद्ध निर्गुणोपासक तया । सर्वभूतीं भगवद्भावें दया । नसे जो मौनी होऊनियां । असे अजगरवृत्तीनें ॥ १५ ॥ स्वयें तरले भगवद्भक्त । शुकादिक जीवन्मुक्त । तथापि उपदेश युक्तायुक्त । करूनि तारिती जनांसी ॥ १६ ॥ भक्त नारदादि । लोकांची अविद्या अनादी । हरिती जें गुह्य वेदीं । तें उपदेशिती जनांसी ॥ १७ ॥ श्रवणकीर्तनें करिती । प्रकट करिती भक्तीच्या रीती । शुकाच्या उक्ति श्रीभागवतीं । कीं गोड[2] भक्ति निर्गुणांपरिस ॥ १८ ॥ शुक ह्मणे आपण । परिपक्व[3] निर्गुणीं निपुण । परि उत्तमश्लोकलीला गुण । चित्त हरिलें तिहीं माझें ॥१९॥ मग मी हें श्रीभा-

१ साधनसामग्री. २ गौण्य. ३ पूर्ण.

गवत । पिता व्यास त्यापासीं निश्चित । पढता जाला जो अत्यंत । परि-निष्ठित निर्गुणीं ॥६२०॥ शुकोक्त श्लोक ॥ परिनिष्ठितोपि नैर्गुण्ये उत्तमश्लोकलीलया । गृहीतचेता राजर्षे आख्यानं यदधीतवान् ॥ २ ॥ टीका ॥ ऐसे निर्गुणनिष्ठ जीवन्मुक्त । तेही सगुणब्रह्मभक्त । पूर्णसिद्ध होऊनि अनुरक्त । सगुणाचरणीं ॥ २१ ॥ श्रीमद्भागवतश्लोक ॥ आत्मारामाश्च मनुयो निर्ग्रंथा अप्युरुक्रमे । कुर्वंत्यहैतुकीं भक्तिमित्थंभूतगुणो हरिः ॥ १ ॥ टीका ॥ श्र-वणमननादिसिद्ध मुनी । आत्माराम पक्कज्ञानीही होऊनी । निर्निमित्तभक्ति मधुसूदनीं । तेही करिती ॥ २२ ॥ ऐसा हरीचा गुण । कीं ऐसेही सिद्ध निपुण । भक्ति करिती कीं या गोडीची खूण । ते ज्ञानी भक्तचि जाणती ॥ २३ ॥ एवं भक्त ये रीती । तेच जनोद्धार ही करिती । कीं संतुष्ट होती श्रीपती । सर्व कर्मे तयांच्या ॥ २४ ॥ ते जनांमध्यें वर्तती । अधिकारियां ब्रह्म बोधिती । अनधिकारियां साधिती । अधिकार श्रवणकीर्तनें हरीच्या ॥ २५ ॥ सर्वभूतीं भगवद्भाव । मुखीं देवाधिदेव । ज्यां शरीरधर्म हीं अभिनव । होती भक्तियोगें परमेश्वराच्या ॥ २६ ॥ तेंही नवमाध्यायांत । अर्जुनास श्रीभगवंत । " यत्करोषि यदश्नासि " या श्लोकांत । स्वयें आपण वर्णील ॥ २७ ॥ कीं अन्नादि भक्षणें । तेंही ज्यांस परमेश्वरीं समर्पणें । एवं सर्व कर्म करणें । त्यातेंचि समर्पावया ॥ २८ ॥ एवं कर्म समग्र त्याचें । विष्णुकारणें अन्यथा कैंचें । " यज्ञायाचरतः कर्म समग्र " हें साचें । वचन श्रीकृष्णाचें ये रीती ॥ २९ ॥ कर्म समग्र विष्णुकारणें । करूनि समग्र वि-ष्णुस अर्पणें । हें तों स्फुरण संकल्पाचें मीपणें । येथें पूर्वपक्षाचें हें स्थळ ॥ ६३० ॥ याकारणें श्रीहरी । पुर्वार्धी आधींच हें परिहरी । कीं गतसंग मुक्तानें यापरी । कर्म लयातें पावतसे ॥३१॥ गतसंग ह्मणिजे गेला संग । कीं मी करितों अर्पितों हा प्रसंग । न स्पर्शे कीं ज्याचें अंतरंग । जालें अ-कर्तात्मतदाकार ॥ ३२ ॥ हा अर्थ कशावरूनी । ऐसें ह्मणती कोण्ही मनीं । तरी ज्ञानी ज्याची थारली बुद्धि ह्मणोनी । दुसरिया चरणीं बोलतो ॥३३॥ तरी शास्त्रज्ञानी बुद्धि थारली । कोण्ही ऐसी वाखाणिती हे बोली । ह्मणूनि मुक्त तो ऐसी वाणी आपली । प्रकट केली येथें ॥ ३४ ॥ गतसंग मुक्त कीं ज्याची ज्ञानी । बुद्धि थारली ऐसा तो ह्मणोनी । वर्णितां सूचवी कीं त्यापासूनी । निःशेष गळालें अहंपण ॥ ३५ ॥ तरी यज्ञाकारणें कर्म करी ।

१ एकनिष्ठ. २ नूतन. ३ स्थिरावली.

हें घडे कैसेपरी । कोण्हीं ह्मणती तरी जो नित्यमुक्त हरी । तोही मी कर्ता मी करितों ह्मणतसे ॥ ३६ ॥ तैसा तोही विष्णूनिमित्त । कर्म करी ह्मणे अच्युत.। परी तो तों जैसा भगवंत । वैष्णवधर्मी देह चोळी ॥ ३७ ॥ ईश्वर जग करितो पाळितो । तैसा अकर्ता हाही देह चाळितो । संस्कार-शेषातें ही पाहतो । साक्षित्वें अकर्ता ॥ ३८ ॥ निर्गुणोपासक जन्ही जाला । प्रारब्धें कर्म लागलेंचि त्याला । तैसा भक्तिसंस्कारें याला । भक्तियोगीं वर्तणें ॥ ३९ ॥ सकळ विष्णूकारणें । कर्म करणें आणि समर्पणें । इतकें करूनि साक्षिपणें । पाहों नये काय इतकियांसही ॥ ६४० ॥ एवं गतसंग मुक्त ज्ञानस्वरूपीं । बुद्धि थारली ऐसें कृष्ण निरूपी । भाव कीं ऐसा तथापि । सगुणभक्त ॥ ४१ ॥ एवं निर्गुणोपासकाचें । निर्गुण ज्ञान तैसेंचि याचें । अधिकपण तें हेंचि साचें । कीं सगुणभक्त कृपाळु जनोद्धारक ॥ ४२ ॥ याकारणें द्वादशाध्यायांत । ह्मणेल हा स्वयें श्रीकांत । कीं निर्गुणोपासकां-परिस अत्यंत । मज संमत युक्ततम भक्त हे ॥ ४३ ॥ निर्गुण कळल्यावरी । सगुणभक्ति कां परी । ऐसें ह्मणणार त्यांची वैखरी । ज्ञानहीन ह्मणे त्या भक्तांस ॥ ४४ ॥ जरी भक्त ज्ञानी नसे । तरी त्याहूनि कां संमत ह्मण-तसे । ज्ञानी सर्वांहूनि थोर ऐसें । किती श्लोक उत्तमश्लोकाचे ॥ ४५ ॥ ऐसें हें बोलणें । द्वादशीं असे होणें । एवं ज्ञानानंतर सगुण टाकणें । त्यांस कष्ट वाणतां स्थिति ज्ञानाची ॥ ४६ ॥ एवं संचित ज्ञानें जळे । क्रियमाण अक-र्तृत्वें नातळे । ऐसे ज्ञानी द्विविध वेगळे । निरूपिले या प्रकरणीं ॥ ४७ ॥ आतां यापुढें श्लोक । कीं विषय किमर्थ उत्तमश्लोक । बोले तें निमित्त सुज्ञ लोक । आदीं परिसोत ॥ ४८ ॥ गतसंग मुक्त ज्ञानी । विष्णूस अर्पी कर्में करूनी । त्याचें प्रकर्षें कर्म नासे ह्मणोनी । पूर्वश्लोकीं भक्त ज्ञानी वर्णिला ॥ ४९ ॥ येथें ज्ञानवंत दक्ष । ऐसा करिती पूर्वपक्ष । कीं भजनें साध्य मो-क्ष । तो ज्ञानेंचि होणार ॥ ६५० ॥ तें ज्ञान ही जालें । आणि पाकासही पावलें । आतां विष्णूकारणें कां लागलें । कर्म करणें त्यांसही ॥ ५१ ॥ कीं गतसंगमुक्त ज्याची बुद्धी । ज्ञानी थारली हे प्रसिद्धी । त्याणें कां कर्मसमृ-द्धी । करावी विष्णूकारणें ॥ ५२ ॥ आतां शुकादिक निपुण । पक्क योगी भजती सगुण । निर्निमित्त कीं ऐसाच गुण । हरीचा ऐसें भागवतीं ॥ ५३ ॥ तरी प्रयोजनावांचूनी । मूर्खही न प्रवर्त्ते ह्मणोनी । शास्त्र बोले हें तों ज्ञा-

१ वर्तवी. २ मुख्यत्वें करून. ३ परिपक्वदशेस.

नीं । सगुणभजनीं प्रवर्तती किमर्थ ॥ ५४ ॥ आतां हरीचा ऐसा अतर्क्य गुण । कीं भजती ऐसे ही निपुण । तरी काय गोड नव्हे निर्गुण । जें आत्मत्वें आयतें प्रिय सर्वांस ॥ ५५ ॥ जरी कांहीं प्रयोजन नसे । तरी हे गोष्टी आंहाच दिसे । ह्मणूनि ह्मणतील येथें ऐसें । हें समजला सर्वज्ञ ॥ ५६ ॥ या गोष्टीचें प्रयोजन । तोचि जाणे भवभंजन । कीं जाणती विरळ तन्मयजन । शुकादिक ॥ ५७ ॥ कीं मोक्ष चतुर्विध । चाऱ्ही न होती निर्गुणात्मबोध । त्यांत कैवल्य मोक्ष तेथें शुद्ध । निर्गुणत्वोंचि उरणें ॥ ५८ ॥ तरी असेच आतांही निर्गुण । परी ज्ञानियांस असे निर्गुणात्मखूण । नाहींसा होईल तो सत्त्वगुण । कैवल्यांत ॥५९॥ निर्गुण आहे आतां जैसें । पुढें याचें कैवल्यही तेंचि तैसें । अनुभवसुख सत्त्वसमरसें । कैवल्यांत तें नाहीं ॥६६०॥ जन्ममरणादिदुःखध्वंस । परी सुख अनुभवी जेव्हां परमहंस । तो स्वसुखलाभाचा अवतंस । कैवल्यांत याचा असेना ॥ ६१ ॥ ब्रह्मीं ब्रह्मानुभव । हेंही ईश्वराचें वैभव । अमृतास स्वगोडीअनुभव । ठावा नसे तैसें कैवल्य । ॥ ६२ ॥ एवं अनिष्टाचीच निवृत्ती । परि तेथें नसे इष्टप्राप्ती । सगुणमोक्षांत सत्त्ववृत्ती । कैवल्यमोक्षानुभवाची ॥ ६३ ॥ जीवन्मुक्तांचा जितां अनुभव । कैवल्यांत तें नसे वैभव । मोक्ष आणि अनुभव अभिनवें । सगुणमोक्षीं ज्ञानियां भक्तांसी ॥ ६४ ॥ जीवन्मुक्तांचा देह । तो कर्मांचा निःसंदेह । भोग सरतां सोडिती निस्पृह । जे ब्रह्म होऊनि राहिले ॥ ६५ ॥ मग निर्गुण ब्रह्मचि उरे । आनंदानुभव न स्फुरे । सत्त्वलहरी तेही मुरे । आनंदसागरीं ॥ ६६ ॥ आत्मानंदानुभव । तेथें नसे हें वैभव । चुकला पुनर्भव । परि गेला अनुभव स्वसुखाचा ॥६७॥ चुकोनि जन्ममरण । अखंड आनंदस्फुरण । ज्ञानियां भक्तांस मोक्ष सगुण । याप्रकारें ॥ ६८ ॥ ते सृष्टि होतां न होती । ते प्रलयव्यथा प्रलयकाळीं न पावती । काळास अतिक्रमूनि असती । शुद्धसत्त्वें भगवदाकारेंकरूनी ॥६९॥ काळातें अतिक्रमूनि असती । हें चतुर्दशाध्यायारंभीं श्रीपती । प्रथम श्लोकीं निर्गुणमुक्ती । बोलोनि हें द्वितीयश्लोकीं बोलेल ॥ ६७० ॥ ॥ चतुर्दशाध्याय श्लोक ॥ इदं ज्ञानमुपाश्रित्य मम साधर्म्यमागताः । सर्गेऽपि नोपजायंते प्रलये न व्यथंति च ॥१॥ ॥ टीका ॥ या ज्ञानाच्या आश्रयें । माझें समानधर्मत्व निश्चयें । ते पावले कीं जैसा मी स्वयें । तैसे तेही स्वानुभवें साकार ॥७१॥ सृष्टि होतां ते न

१ फोल मिथ्या; व्यर्थ. २ नाश. ३ नूतन.

होती । प्रळयकाळीं व्यथा ते न पावती । कालातीत होऊनि असती । आकारेंही साकार मी जैसा ॥७२॥ पद्मनाभादि माझ्या मूर्ती । सृष्टिकाळीं पवित्रकीर्ति । जैशा प्रकटती तैशा स्फूर्ति । त्यांस तेव्हां मद्रूपदेहाच्या ॥ ७३ ॥ प्रलयकाळीं सर्व गिळूनी । जेव्हां मी निजतों योगनिद्रे करूनी । तेव्हां तैसेच तेही निजती ह्मणोनी । प्रलयकाळीं न पावती ते व्यथा ॥ ७४ ॥ प्रळयीं नसे ईश्वरोपाधि जैसा । सगुणमुक्तवृंदही नसे तैसा । कालपाशाचा फांसा । जरि मज ह्मणवेल तरी त्यांसही ॥७५॥ सेवक चरण चुरिती । त्या गुणें निजेला नृपती । तो ते क्षणीं मेला ह्मणती । ते मूर्ख ॥ ७६ ॥ तैसा काळें करूनी । मी योगनिद्रे निजेलों ह्मणोनी । काळें अभाव पावलों ह्मणती ते सज्जनीं । तैसे मूर्ख समजावे ॥ ७७ ॥ मोक्ष ह्मणावा तरी । कीं कालचक्र न स्पर्शे जरी । या भावें ह्मणे हरी । कीं समानधर्मता माझी पावले ॥७८॥ याचीं साधकेंबाधकें । चतुर्दशाध्यायटीकेंत कौतुकें । बोलिजे तेथंलि येथें इतुकें । बोलणेंही अगत्यार्थ ॥ ७९ ॥ ऐशा सगुण मुक्ती । अपेक्षिल्या जिहीं जीवन्मुक्तीं । तिहीं नित्यनिजानुभवयुक्तीं । केल्या भक्ति सगुणाच्या ॥६८०॥होऊनि पक्क ज्ञानी । परिनिष्ठित सगुणध्यानीं कीर्तनीं । निर्गुणत्वें सगुणध्यानी । सगुणमोक्षीं ते सगुणातें पावले ॥ ८१ ॥ हा श्रुतिसिद्ध अर्थ । पुरुषार्थांत परम पुरुषार्थ । ह्मणोनि जे निर्गुणानुभवें कृतार्थ । तेही यज्ञविष्णु तदर्थ कर्मे आचरती ॥ ८२ ॥ हा पूर्वश्लोकीं हृषीकेश । सूत्रप्राय सगुणभजनलेश । पक्क ज्ञानियांस बोलिला उद्देश । सगुणमोक्षाचा जयासी ॥ ८३ ॥ आतां यज्ञनामकाकारणें । कोणे रीतीं कर्म करणें । आणि फळ कोणतें तिहीं पावणें । हें बोलतो या श्लोकीं ॥ ८४ ॥

॥ श्लोक ॥ ब्रह्मार्पणं ब्रह्म हविर्ब्रह्माग्नौ ब्रह्मणा हुतम् ।
ब्रह्मैव तेन गंतव्यं ब्रह्मकर्मसमाधिना ॥ २४ ॥

॥ टीका ॥ कर्म करायाचें मुख्य कारण । कीं करावें सगुणयज्ञनामकातें अर्पण । या जडसंकल्पलहरींत पूर्ण । चित्समुद्र ब्रह्मचि ॥ ८५ ॥ तरंग निमाला सागरीं । अर्पण जालें यापरी । अर्पणही ब्रह्म या प्रकारीं । तयाचें ॥ ८६ ॥ ज्याचें अर्पण ब्रह्म । ब्रह्मचि तेंही तयाचें कर्म । तें यज्ञरूपें सगुण ब्रह्म । ब्रह्मत्वें श्रीकृष्ण वर्णितो ॥ ८७ ॥ हविर्द्रव्य ज्याणें होम । तें जो देखे ब्रह्म । अलंकारां विना हेम । काय दिसे॥८८॥अग्निही ब्रह्मचि दिसे । कीं

१ दुःख. २ समुदाय. ३ सुताप्रमाणें सूक्ष्म. ४ सुवर्णावांचून.

घटाकारीं मातीच दिसे । कीं पटाआधीं तंतु गवसे । मग पटाकार ॥८९॥ कार्य तें कारणचि अत्यंत । हे असोत इतर दृष्टांत । अग्निब्रह्म हें तों अग्नींत । ज्वालान सांगती अग्नीच्या ॥६९०॥ ज्वाला अग्नीमधूनि निघती । मागुतीं त्याच अग्नींत रिघती । अग्नीरूपा अग्नीनेंचि दिसती । जों असती अग्नींत ॥९१॥ दृष्टि न स्पर्शे अनळ । तों न देखे ज्वाळ । दृष्टीस न दिसे माळ । तों सर्प कैसा भासतो ॥९२॥ सर्प दिसोनी असे माळ । ज्वाळा दिसोनि आहे अनळ । अग्नि दिसोनि आहे केवळ । ब्रह्मप्रकाशक प्रकाशाचें ही ॥९३॥ स्वयें दिसे सर्प साचा । असत्यास दोरावीण प्रकाश कैंचा । आकारमाळेंत सर्प साचा । जैसा ज्वालाकार अग्नींत ॥९४॥ ज्वाला अग्नींत अग्निरूप जैसा । अग्नि ब्रह्मीं ब्रह्मरूप तैसा । हा मननाचा मनीं ठसा । सिद्धांच्या ॥९५॥ एवं अग्निही ब्रह्म । त्यांत ब्रह्मचि हविरुत्तम । ब्रह्मेंचि होमिलें कीं इतकें कर्म । ज्याकरितां घडलें ब्रह्मचि तें सकळ ॥ ९६ ॥ “ अधिष्ठानं तथा कर्ता ” ह्मणोनी । अष्टदशाध्यायीं या श्लोकेंकरूनी । पांच कर्मनिमित्तें ज्यांवांचूनी । न घडे भलती क्रिया ॥ ९७ ॥ त्यांत अधिष्ठानशब्दें शरीर । कर्ता अहंकार । करण नाना इंद्रियविकार । विविधचेष्टा चेष्टवी प्राणक्रियाशक्ती ॥९८ ॥ इंद्रियांसीं चाळकें दैवतें । हें पांचवें निमित्त येथें । कर्ममूळें जेथें तेथें । हींचि पांच ॥ ९९ ॥ पांचांमुखांची पंचारती । एकाच पितळेची आकृती । पितळ न पावतां ते विकृती । न दिसे न असे त्यावांचूनी ॥७००॥ दिसे असे त्या धातुचकरूनी । पंचारती धातुच ह्मणावी त्यावरूनी । तरहां धातूनेंचि ओंवाळिलें ह्मणूनी । कां न ह्मणावें ॥ १ ॥ पांचां कनकसूत्रांकरूनी । विणिला कडदोरा ह्मणोनी । कनक झांकेल काय नयनीं । ब्रह्म तैसें याही पांचांत ॥ २ ॥ एवं कर्म निमित्तें पांच । असत्यें त्यांत ब्रह्मचि साच । ब्रह्मीं होमिलें त्याचा ऐसाच । अर्थ भगवद्वाक्याचा ॥ ३ ॥ गतसंगमुक्तयज्ञनामकाकारणें । कर्म करी हें पूर्वश्लोकविवरण । तयेंही निवारिलें अहंकर्तृत्वपण । गतसंगमुक्त ह्मणोनी ॥ ४ ॥ व्यतिरेक निखळ आत्मबोध । त्या अनुभवेंही त्याचा अहंकर्तृत्वविरोध । परिहरितां गेला शोध । कर्तृत्वसाक्षित्वापर्यंत ॥ ५ ॥ या श्लोकीं अन्वयेंकरूनी । घटपटादि मृत्तिका तंतूचि ह्मणोनी । पांचही कर्मनिमित्तें सुचवूनी । ब्रह्मेंचि होमिलें ह्मणतसे ॥ ६ ॥ एवं अर्पणादि चारी । अर्पण हविष्य अग्नि पांच होम करणारीं । कार्य तें का-

१ हारांत. २ चिंतनाच्या. ३ सुवर्णाच्या तारांनी.

म्हणोनि यापरी । अवघें ब्रह्म ॥ ७ ॥ ऐसें कर्मी ब्रह्म । देखे जो यज्ञनामका-कारणें कर्म । करी म्हणोनि पुरुषोत्तम । पूर्वश्लोकीं वर्णी जयास ॥ ८ ॥ तरि सादर कर्मी जो दिसेल । तो अपक्क म्हणावा असेल । पक्कयोगी कां ऐसा वसेल । ब्रह्मलक्षित कर्मांत ॥ ९ ॥ ऐसें येथें कोण्ही म्हणती । तरी याची कृष्णास अतिप्रीती । सप्तमाध्यायांत " वासुदेवः सर्वमिति । स महात्मा सुदुर्लभः " म्हणेल ॥ १० ॥ अपक्कास कैंचा हा अनुभव । हेंचि ज्ञानियांचें परम वैभव । तथापि अन्वय समजोनि मानव । ध्यानावांचूनि अपक्कही असती ॥ ११ ॥ कळलें अन्वयज्ञान । परि त्याहूनि अन्वयें विश्वात्मत्वध्यान । थोर म्हणोनि मधुसूदन । द्वादशाध्यायांत बोलेल ॥ १२ ॥ " ज्ञानाद्ध्यानं विशिष्यते " म्हणोनी । " श्रेयो हि ज्ञानमभ्यासात् " या श्लोकेंकरूनी । द्वादशीं श्रीकृष्ण या वचनीं । म्हणेल कीं ध्यानें स्थिति[1]वाणते ज्ञानाची ॥ १३ ॥ विश्व ब्रह्म या बोधीं । ज्यासि वाणे समाधी । तो पक्कज्ञानी मोक्ष साधी । जितांच देहप्रारब्धें ॥ १४ ॥ प्रस्तुत ज्ञानी या श्लोकीं । जो आतां वर्णिला कीं । अर्पण हविष्यादि अवलोकी । सर्वही ब्रह्म ॥ १५ ॥ तो अपक्क नव्हे कधीं । कीं ब्रह्मचि कर्म ऐशा बोधीं । लाधला योगी समाधी । कर्म म्हणिजे प्रपंचही अवघा ॥ १६ ॥ कीं विश्व ईश्वराचें कर्म । तें कर्म कळलें कीं ब्रह्म । अलंकारसृष्टि अवघी हेम । कर्म हेमकाराचें[3] ॥ १७ ॥ हें आधीं जालें ज्ञान । आणि विश्वात्मत्वाचें बहुध्यान । घडलें त्यास तेव्हां समाधान । चित्त पावतां समाधि त्याला वाणला ॥ १८ ॥ तरीच यज्ञरूप कर्म । अर्पण हविष्यादिही ब्रह्म । कार्य तितकें कारण परम । चित्त पावलें कारणीं स्थिरत्व ॥ १९ ॥ विश्व ब्रह्म हें नव्हे ज्ञान । आणि त्याचें बहुत न घडे ध्यान । तों कर्म ब्रह्मचि ऐसें समाधान । न पावे चित्त ॥ २० ॥ यालागीं कर्म ब्रह्म या बोधीं । वाणला म्हणतां समाधी । हा शब्द भावार्थें साधी । अर्थ पूर्वोक्त अभ्यासाचा ॥ २१ ॥ एवं ब्रह्मकर्मसमाधि जयालागीं । तो हा म्हणावा लागला योगीं । देह जितांच तो भोगी । कैवल्यसुख ॥ २२ ॥ तरी जीवन्मुक्त या नांवें । याणेंही आतां काय पावावें । म्हणोनी हा श्लोक चालिला ज्या भावें । तें बोलतो ॥ २३ ॥ "ब्रह्मैव तेन गंतव्यं " म्हणोनी । सगुणब्रह्म सुचवूनी । ऐसें निर्गुणप्राप्ती करूनी । भजतां पावावें म्हणे ब्रह्म सगुण ॥ २४ ॥ ब्रह्मैव या वचनीं । ब्रह्म आणि एव हे

१ उसते; प्रकट होते. २ पावला. ३ सोनाराचें.

ऐसे शब्द दोनी । सगुणत्व एव शब्देंकरूनी । सूचवितो येथें ॥ २५ ॥ एव शब्दें निश्चय । कीं सगुण जऱ्ही मायामय । किरण जळरूप तऱ्ही निःसंशय । किरणचि तें ॥२६॥ जलाभास किरणींच निघे । असें दिसे त्यांतचि निघे । मायाजलविलास अवघे । स्वयें किरणचि निश्चित ॥ २७ ॥ मध्यान्हीं किरणीं प्रकटे । लय पावोनि सायान्हीं न आटे । प्रतिदिनीं निघे रिघे न दाटे । द्वितीयत्वें रविकिरणीं ॥ २८ ॥ ऐसी नित्यमुक्ताची नित्यमुक्ती । चित्स्वरूपीं शुद्ध चिच्छक्ती । ब्रह्मीं ब्रह्मानुभव अभिव्यक्ती । ते माया ब्रह्मीं ब्रह्मचि ॥ २९ ॥ सुवर्णाचे विकार । घडतां मोडतां नश्वर । तैसें ब्रह्मचि अक्षर । चराचर क्षररूपही ॥ ७३० ॥ ऐसें चराचर क्षर । त्यांत चिदंश जीव प्रतिबिंब अक्षर । मुख्य अक्षर तो उपाधिसहित ईश्वर । तो उत्तमपुरुष पंचदशीं वर्णिजेल ॥ ३१ ॥ प्रस्तुतीं चराचर । जैसे हेमीं अलंकार नश्वर । तैसें अक्षरब्रह्म जग क्षर । क्षराक्षरैक्य हेमालंकारदृष्टांतें ॥ ३२ ॥ तैसा नव्हे ईश्वरोपाधी । ज्याणें ब्रह्मीं ब्रह्मात्मसमाधी । भिन्नत्व दिसोनि नव्हे कधीं । तो उपाधि अधिष्ठानावेगळा ॥ ३३ ॥ अलंकाररूप मोडे । तें न घडितां पुन्हा न घडे । परि पुन्हा न भासे ऐसा न बुडे । जलाभास किरणीं ॥ ३४ ॥ मध्यान्हीं किरणीं जळ । उठतां स्वयेंचि प्रकटती कल्लोळ । तैसें स्वेच्छेनें केवळ । पद्मनाभादिदेह ईश्वराचे ॥ ३५ ॥ भ्रमयुक्त दृष्टीविना । दोरीं सर्प भासेना । न लगे किरणींच्या जीवना । द्रष्टा देखावयास तैसा ॥३६॥ कीं किरणांस द्रष्टा जरि पाहे । तऱ्ही दिवसपूर्वभागीं जळ न वाहे । यालागीं द्रष्टा न पाहे तऱ्ही आहे । मध्यान्हीं जलाभास उष्णांत ॥ ३७ ॥ ये रीतीं अविद्याकल्पित । नव्हे ईश्वरोपाधी निश्चित । तो ब्रह्मी ब्रह्मत्वेंचि अत्यंत । अनादिमायोपाधि सगुणाचा ॥ ३८ ॥ एवं उपाधियुक्तही ब्रह्म । तऱ्ही ते ब्रह्मचि परम । यालागीं ह्मणे पुरुषोत्तम । 'ब्रह्मैव गंतव्यं ' ह्मणोनी ॥ ३९॥ गंतव्यं ह्मणिजे पावावें । ज्यास तें ब्रह्मैव ह्मणे या भावें । कीं सगुण ह्मणावें नांवें । परि सगुणत्व हीं ब्रह्मैव ॥ ७४० ॥ पोटीं श्रुति आणि मुखीं श्लोक । प्रतिश्लोक ऐसा उत्तमश्लोक । बोले त्याचा अर्थविलोक । श्रुतिच अवघिया सूचवी ॥४१॥ असोनि निर्गुण ज्ञान । निर्गुणत्वें सगुणध्यान । करितां नित्यसुखानुभवनिधान । सगुणमुक्ती ऐसें श्रुति बोले ॥४२॥ श्रुत्यनुरूपेंचि श्लोक । वाखाणावा ऐसें उत्तमश्लोक । कोड बोलिला एक । कीं न साधे अबाधितार्थ

१ सुवर्णालंकारांच्या उपमेनें नाशिवंत. २ अवलोकन.

त्याविणें ॥४३॥ कीं ज्ञानें ब्रह्म पावावें । तें जरी निर्गुण ह्मणावें । तरी निर्गुणात्मत्व आधीं बाणावें । तेव्हां ब्रह्मकर्म समाधिबाणेल ॥ ४४॥ ब्रह्मकर्मसमाधिनिष्ठ परम । ज्याणें आतां पावावें ह्मणतो ब्रह्म । त्यास तों नसे अविद्यावरणभ्रम ।कीं ब्रह्म आपण नव्हे ह्मणोनी ॥४५॥ जड भाग अवघा निरसावा । तेव्हां आत्मा ब्रह्मत्वें समजावा ।प्रथम अनुभव हा ह्मणावा । व्यतिरेकबोध ॥ ४६ ॥ मग अनात्मत्वें जो जडभाग । निरसूनि कळे आत्मानात्मविभाग । त्या जडास आत्मयाचा योग । पटीं तंतु ऐसा पहावा ॥४७ । या नांवें अन्वय । कीं आपण ब्रह्म चराचरमय । ध्यानें बाणतां हा निश्चय । जडही ब्रह्म ऐसा बाणे समाधी ॥ ४८ ॥ तो हा ब्रह्मकर्मसमाधिनिष्ठ । जो आदीं ब्रह्मत्व पावोनि स्पष्ट । ब्रह्म आपणचि हा उत्कृष्ट । अनुभव पावोनि यज्ञ करी ॥ ४९ ॥ जो पावलाच ब्रह्म निर्गुण । त्याणें आतां ब्रह्म पावावें कोण । ऐसा विचार करितां ब्रह्म सगुण । न ह्मणतां अर्थच न घडावा ॥ ७५० ॥ आतां ब्रह्मचि त्याणें पावावें । ह्मणिजे फलांतरास न वजावें । तरी ब्रह्म पावला नाहीं ह्मणावें । पावावें ब्रह्मचि या उपरी ॥५१॥ येथें क्लिष्टकल्पना । केल्या जरी नाना । तरी तो पांडित्याचा वृथा तनाना । शब्दशक्ति ऐसी ये स्थळीं ॥ ५२ ॥ आतां जैसा तैसा करावा वाक्यार्थ । तरी सांपडतां प्रमाणसिद्ध मुख्यार्थ । कोण अंगिकारील बाधितार्थ । आणि क्लिष्टकल्पना ॥ ५३॥ ब्रह्मरूप यज्ञ प्रांजळ । बोलोनि बोलिलें त्याचें फळ । तो त्या यज्ञाहूनि पूर्वींच केवळ । फळचि होऊनि तो आहे ॥ ५४ ॥ बाधितार्थ ऐसा ! सर्वज्ञ बोलेल कैसा । अर्थ वाखाणिती जैसा तैसा । वाक्यार्थ घडो ह्मणोनी ॥५५॥ एवं पावला आहे तें निर्गुण । त्या प्राप्तीनेंचि ऐसा निपुण । यज्ञ करूनि फळ त्याचें ब्रह्म सगुण । तो पावेल ॥ ५६ ॥ असोनि हीं निर्गुण । तें आत्मत्व अनुभवी सत्त्वें निपुण । त्या सत्त्वें पावावें सगुण । सगुणसमानधर्मत्व ॥५७॥ निराकारीं निराकार । जें सत्त्व त्यास गुणसंस्कार । सगुण भजनें वारंवार । होतां भृंगकीटकन्यायें[1] सगुणसत्त्व ॥ ५८ ॥ आतां नसे पुनरावर्त्तते[2] । ह्मणोनि वेदश्रुति बोलते । हा निर्गुणीं पावोनि कैसा परते । सगुणाकडे ह्मणावा ॥५९॥तरी निर्गुणात्मत्वास कांहीं । पुनरावृत्ति दिसत नाहीं । अनुभवी ज्या सत्त्वें तेंही । न परते जीवोपाधिकत्वा ॥७६०॥ एवं पाहतां कांहीं । विरुद्ध अणुमात्र दिसत नाहीं । दूरदृष्टीं पाहतां हीं । सुखानुभव सगुणमोक्षींच॥६१॥

---

१ भृंगाच्या तीव्र ध्यानानें कीटक भृंगरूप होतो, तसें. २ पुनर्जन्म.

अर्थ अबाधित झाला सिद्ध । परी नव्हे श्रुतिप्रसिद्ध । तरी श्रुत्यर्थेचि शुद्ध । या श्लोकीं प्रकटतो ॥ ६२ ॥ ॥ श्रुति ॥ यदा पश्यन्पश्यते रुक्मवर्णं कर्तारमीशं पुरुषं ब्रह्मयोनिम् । तदा विद्वान् पुण्यपापे विधूय निरंजनः परमं साम्यमुपैति दिव्यम् ॥ १ ॥ ॥ श्रुत्यर्थ ॥ विद्वान् म्हणिजे ज्ञानवंत । पश्यत् म्हणिजे पाहणार अत्यंत । व्यतिरेक अन्वय दोन्ही, या दों शब्दांत । ब्रह्मज्ञानानुभव श्रुति बोले ॥ ६३ ॥ आदीं आपणास जाणे । त्यास भलतें ज्ञान बाणे । तो मूढ जो आपणास नेणे । हें सर्व शाहणे जाणती ॥ ६४ ॥ ज्याणें जडावेगळें आपणा । ओळखिलें तो विद्वान् व्यतिरेकीं शाहणा । पश्यन पाहणार देखणा । जो तंतु घेऊनि पट पाहे ॥६५॥ काय दिसतें म्हणोनी । पुसतां पट एकास दाखवूनी । पटचि दिसतो म्हणेल नयनीं । तो डोळे असोनिही आंधळा ॥ ६६ ॥ तंतुच दिसतो पट । दिसोनि नाहीं पट निपट । ऐसें जो बोलेल प्रकट । तोचि डोळस देखणा म्हणावा ॥ ६७ ॥ जडीं ब्रह्मात्मबोधीं । बुद्धिदृष्टि स्पर्शोनि आधीं । जडविषय इंद्रियें पाहे समाधी । विश्वात्मत्वीं बाणला तयासी ॥ ६८ ॥ पश्यन्शब्दें देखणा । विश्व ब्रह्म पाहे जो शाहणा । ऐसा पुरुष पाहे सगुणा । रुक्मवर्णास ऐसें श्रुति बोले ॥ ६९ ॥ रुक्म म्हणिजे सुवर्ण । अर्थ कीं सुवर्णासारिखा ज्याचा वर्ण । कर्ता ईश पुरुष सगुण । त्यास तो ज्ञानी पाहे जो देखणा तत्त्वता॥ ७० ॥ जेव्हां ऐसा ध्यानीं । सगुण परमात्मा देखे ज्ञानीं । तेव्हां परम साम्य त्यानेंच पावे म्हणोनी । श्रुति बोले ॥ ७१ ॥ साम्य दिव्य आणि परम । म्हणिजे जैसें साकार सगुण ब्रह्म । होय हाही त्यासम । परम आणि दिव्य ॥ ७२ ॥ त्यासम म्हणिजे त्यासारिखें शरीर । चतुर्भुज शंखचक्रपीतांबर । परम म्हणिजे जैसा ईश्वराचा आकार । अखंडानंदानुभव सत्त्वाचा ॥ ७३ ॥ दिव्य म्हणजे अलौकिक । जो देह नव्हे पांचभौतिक । ऐसें दिव्य परम साम्य तो उपासक । पावे समीप परमेश्वराच्या ॥ ७४ ॥ उप म्हणजे समीप सामीप्य । साम्य समत्वें म्हणतें सारूप्य । एवंच सालोक्य ही प्राप्य । ज्ञानियांस ध्यानें सगुणाच्या ॥ ७५ ॥ कोण्हीं म्हणती कीं हें कर्मफळ । तरी कर्म सारूनि सकळ । पापपुण्य पुनरावृत्तिमूळ । त्यावेगळा होऊनि हे गति पावतो ॥ ७६ ॥ ज्ञानें जाळूनि संचित । क्रियमाणें न होऊनि लिप्त । प्रारब्धभोगें समाप्त । करूनियां ॥ ७७ ॥ त्रिविधही पुण्यपाप । नाशी हा ज्ञानप्रताप । सगुणध्यानें पावे रूप । जगदीश्वरासारिखें ॥ ७८ ॥

पुनरावृत्ति चुकली ज्ञानें । आनंदानुभव राहिला सगुणध्यानें । सगुणभजन या अनुसंधानें । श्रुति वर्णिती ज्ञानियांचें ॥ ७९ ॥ निर्गुण सगुण दोनी मुक्ती । दोन्ही गीतेंत भगवदुक्ती । परी मुख्यत्वें अभिव्यक्ती । सगुणमुक्तीची ॥१८०॥ अज्ञानाचा परिहार । आणि सगुणभक्तांचा वडिवार । ज्ञानयुक्त भक्तिच वारंवार । थोर करूनि वर्णिली या गीतेंत ॥ ८१ ॥ गीता संपतां श्रीपती । हेंचि ह्मणेल अर्जुनाप्रती । कीं धर्म्यसंवाद हा ये रीती । तुझा माझा ॥ ८२ ॥ धर्म्य शब्दें सधर्म । जें सधर्म सगुणब्रह्म । तत्संबंधी हा परम । संवाद ॥ ८३ ॥ मुख्यत्वें निर्गुणसंवाद जाला असता । तरी नैर्धर्म्यसंवाद याचें नांव ठेविता । आणि निर्गुणोपासकाचि थोर ह्मणता । सगुणोपासकांपरिस ॥ ८४ ॥ द्वादशीं ज्ञानिया सगुणोपासकास । थोर ह्मणेल निर्गुणोपासकापरिस । अधिक क्लेश आणि मुक्तींत ज्यास । नसे अनुभवानंदाचा ॥ ८५ ॥ आणि या श्लोकीं श्रीकृष्ण । भजन बोलिला तेंही सगुण । अन्वयज्ञानीं दावी खूण । सगुणत्वाची ॥ ८६ ॥ राजविद्या राजगुह्यातें । सांगतां हीं धर्म्य ह्मणेल त्यांतें । कीं विश्वब्रह्म या मायाशबलितातें । ज्ञानातेंही धर्म्य ह्मणे ॥८७॥ मायामय जग । ब्रह्मीं जैसा हेमीं नग । या ज्ञानासही ह्मणे श्रीरंग । धर्म्य ह्मणिजे हाचि अनुभव सगुणाचा ॥८८॥ धर्म्यकर्मरूप । ज्ञान नैष्कर्म्यस्वरूप । ज्ञानास धर्म्य ह्मणतां विरूप । केलें जाणों ग्रंथासी ॥ ८९ ॥ धर्म्य कर्मचि परि त्याचें कारण । माया आणि निर्गुण । मिळोनि जैसें ब्रह्म सगुण । तैसें धर्म्य ब्रह्मज्ञान विश्वरूप ॥७९०॥ येथें अर्पण हविष्यादि सकळ । ब्रह्मचि दिसे केवळ । हविष्याद्याकार शबल । सगुण ब्रह्मत्व धर्म्य हें ॥९१॥ द्वादशींही याचवरूनी । ये तु "धर्म्यामृतमिदं" ह्मणोनी । धर्म्यपदें चकरूनी । अध्यायांतीं भजन वर्णील ॥९२॥ "येथें ब्रह्मैव तेन गंतव्यं" ह्मणोनी । अनन्यगतिकत्वें करूनी । श्रुत्युक्तसगुणप्राप्ति स्थापूनी । सूचविला निर्णय ॥ ९३ ॥ निर्गुणत्वें सगुणा । उपासिती आणि ध्यान धारणा । सगुणत्वें मद्भक्त धरिती त्या खुणा । या श्रुत्युक्तक्रमें द्वादशींही बोलेल ॥ ९४ ॥ द्वादशाध्याय श्लोक ॥ ये तु सर्वाणि कर्माणि मयि संन्यस्य मत्पराः । अनन्येनैव योगेन मां ध्यायंत उपासते ॥ ॥ टीका ॥ येथें "यज्ञायाचरतः" कर्म । ह्मणिजे सगुणीं समर्पाया करी कर्म । 'मयि सर्वाणि कर्माणि' ऐसें द्वादशीं पुरुषोत्तम । हेंचि बोलेल ॥९५॥ "अनन्येनैव योगेन" । ह्मणिजे अद्वैतयोगेंचि करून । उपासिती आणि ध्यान । श्रुत्युक्त-

रीतीं माझें करिती ॥ ९६ ॥ अनन्ययोगें उपासिती । तें अर्पण हविष्यादि ब्रह्मचि ये रीती । इत्यादि सर्वत्र श्रीपती । ज्ञानियांस सगुणोपासनाच बोले-ल ॥ ९७ ॥ बोलोनि निर्गुणमात्रोपासक । ह्मणेल त्यांस क्लेश अधिक । हें पुढें उदंड कौतुक । स्थळोस्थळीं तो वर्णील ॥ ९८ ॥ निर्गुणोपासक व्य-र्थ । येथें अन्यथा करिती अर्थ । बोलती अर्पणशब्दार्थ । स्रुक्स्रुवादिपात्रें ह्मणोनी ॥ ९९ ॥ अर्पण ह्मणिजे जिहीं अर्पिजे तें । अर्पिजेतें ह्मणजे हो-मिजेतें । त्या होमपात्रांस ह्मणे ह्मणिजेतें । अर्पण ह्मणोनी ॥८००॥ पात्रें होमाचीं ब्रह्म । तेव्हां ब्रह्म नव्हे काय अर्पणधर्म । क्लिष्टकल्पना वृथा भ्रम । स्पष्ट दिसतो ॥ १ ॥ ब्रह्मत्वें वर्णिलें पात्र । तरी कां न वर्णिले मंत्र । आणि ब्रह्मत्वें देव विचित्र । तेंही कां नाहीं सांगीतलें ॥ २ ॥ जैसीं हीं अनुक्तें ध्यावीं । तैसींच पात्रेंही ह्मणावीं । अर्पणशब्दें कां पात्रें वाखाणावीं । क्लिष्ट कल्पितें ॥ ३ ॥ ज्ञान जालियावरी । कर्म ब्रह्मीं अर्पिलें जरी । तें बाधक होईल काय परी । ज्ञानियांस सगुणभजन सिद्ध होतें हा धाक ॥४॥ ह्मणूनि मोडिती अर्थ । ग्रंथार्थ नाशिती व्यर्थ । त्यांसही भिऊनि किमर्थ । वाखाणावें अन्यथा ॥ ५ ॥ द्वादशीं भक्त थोर ह्मणोनी । वर्णिला तो ह्मणे अज्ञानी । तरी श्रेष्ठ अज्ञानी ज्ञानियांहूनी । विरुद्ध बोलिला काय भगवंत ॥ ६ ॥ तें भगवंताचें बोलणें । अनधिकारियाच्या उत्साहाकारणें । ऐसें विरुद्धार्थ दृढीकरण । श्रीकृष्णेंचि निषेधिलें शेवटीं ॥ ७ ॥ "ये तु धर्म्या-मृतमिदं" या श्लोकीं । हें अध्यायांतीं बोलिल कीं । हें यथोक्तरीति लोकीं । जे उपासिती ॥ ८ ॥ ते प्रिय मातें अत्यंत भक्त । कीं अध्यायांत जें पूर्वोक्त । तें उपासिती यथोक्त । जें जैसें बोलिलें तैसेंची ॥ ९ ॥ हीं पुढें विवरणें । उदंड आहेत कारणें । ज्ञाननिष्ठींही याकारणें । सगुणीं भ-जावें हा सिद्धांत ॥ ८१० ॥ आतां यापुढें श्लोक । तो कां बोले उत्तम-श्लोक । त्याचें निमित्त आधीं सुज्ञश्लोक । परिसोत अनुसंधानाकारणें ॥ ११ ॥ पूर्वश्लोकीं यज्ञरीती । वर्णिली सगुणब्रह्मस्थिती । आतां निर्गुण-लय ह्मणिजे सर्ववृत्ती । निर्गुणीं होमणें ॥ १२ ॥ या वेगळेही यज्ञ । क-रिती कर्ममार्गाभिज्ञ । तेही प्रसंगें सर्वज्ञ । बोलों पाहतो या श्लोकीं ॥ १३ ॥

॥ श्लोक ॥ दैवमेवापरे यज्ञं योगिनः पर्युपासते ।
ब्रह्माग्नावपरे यज्ञं यज्ञेनैवोपजुह्वति ॥ २५ ॥

॥ टीका ॥ अगा कोण्ही कर्मयोगी । दैवयज्ञचि देवांलागीं । करिती हो-

मिती यथाविभागीं । इंद्रादिदेवां हविष्य ॥ १४ ॥ पूर्वोक्त सगुणब्रह्मयज्ञ । जो यजी ब्रह्मत्वें ब्रह्मज्ञ । तोही इंद्रादिदेवांच्या नांवें अभिज्ञ । होमीत्र तें हविर्द्रव्य ॥१५॥ परि इंद्रादि जें जें दैवत । तें तें ब्रह्मचि निश्चित । ह्मणोनि मुख्य यज्ञ सर्वात्मा अच्युत । यज्ञनामक श्रीविष्णु हें जाणे ॥ १६ ॥ अतएव 'अधियज्ञोहमेवात्र' । ऐसें अष्टमीं कमलनेत्र । बोलेल कीं नाना जीव देह विचित्र । परि अधियज्ञ मीचि या देहीं ज्या त्यांचिया ॥ १७ ॥ अधिष्ठूनि सर्वही यज्ञ । देहीं साक्षी फलप्रद अधियज्ञ । तो सर्वात्मा सर्वज्ञ । तोचि सर्व देवताही यज्ञांच्या ॥ १८ ॥ त्या याजकां पूर्वोक्तांहूनी । वेगळे कर्मयज्ञानिष्ठ ह्मणोनी । सांगतो कीं देवांच्या उद्देशेंचि करूनी । आणखी कर्मयोगी यजिती ॥ १९ ॥ पूर्वोक्त नव्हे देवताकिंकर । जो ज्ञानीं सगुणीं सादर । हें या अर्धश्लोकें दामोदर । स्पष्ट बोलिला ॥ ८२० ॥ आतां निर्गुणाचेच उपासक । त्यांचेंही विलक्षण यज्ञकौतुक । सांगोनि पूर्वोक्तास श्रीवत्सांक । वेगळे निवडितो ॥ २१ ॥ कीं पूर्वीं ज्यांस बोलिलों मी । तो ब्रह्मत्वें अग्नि देखोनि होमी । यावेगळे निर्गुणीं केवळ ब्रह्मीं । यज्ञरीतीच करूनी होमिती ॥ २२ ॥ तें ब्रह्मचि केवळ । अग्नि भाविती कीं वृत्ति सकळ । हविष्यरूपें जळती ह्मणोनि अनळ । ब्रह्मचि भाविती ॥ २३ ॥ परि यमनियमादिसंपन्न । त्यांसचि तो यज्ञ होय निष्पन्न । ह्मणूनि सांगावी परिच्छिन्न । यमनियमसंपत्ति आधीं ॥ २४ ॥ ते यज्ञरूप समाधी । साधे तो साधकचि तें आधीं । साधकांचें साधकत्व यास्तव बोधी । श्रीकृष्ण पहिलें या श्लोकीं ॥ २५ ॥

॥ श्लोक ॥ श्रोत्रादीनींद्रियाण्यन्ये संयमाग्निषु जुह्वति ।
शब्दादीन्विषयानन्य इंद्रियाग्निषु जुह्वति ॥ २६ ॥

॥ टीका ॥ श्रोत्रादि जें जें इंद्रिय । तें तें इच्छी आपलाला विषय । तो विषय मेळवावा हा निश्चय । विषयनिष्ठ बुद्धीचा ॥ २६ ॥ संकल्पविकल्परूपें करूनी । मनचि नानारूपें धरूनी । कल्पना करी आश्रय धरूनी । विषयनिष्ठ बुद्धीचा ॥ २७ ॥ ते बुद्धि विवेकारूढ । होऊनि धरी वैराग्य दृढ । तेव्हां स्वहिततत्पर प्रौढ । आवरी मनातें ॥ २८ ॥ तें आटोपितां मन । राहे विषयचिंतन । तेव्हां इंद्रियवृत्तींचें गमन । विषयांकडे घडेना ॥ २९ ॥ सरली इंद्रियांची तळमळ । राहिली मनाची डळमळ । मुख्य-

संयमाचा अनळ । पेटतां ऐसा ॥ ८३० ॥ विषयांचें करी स्मरण । तरी इंद्रियांसि इंद्रियपण । तें राहतां त्याची खूण । इंद्रियत्वें स्फुरेना ॥ ३१ ॥ तरी काय इंद्रियें पळालीं । तैसें नव्हे संयमाग्नींत जळालीं । स्मरणें जेधवां गळालीं । विषयाचीं॥३२॥तरी काय आपणा आपणें । जाळूनि घेतलें इंद्रियगणें । तैसें नव्हे यांणें। संयमाग्नींत होमिलीं ॥ ३३ ॥ हा इंद्रियांचा संयम । यालाचि ह्मणावें यम । येथेंचि सुचवी नियम । श्रीकृष्ण त्यांचा ॥ ३४ ॥ सर्वथा विषयांचा त्याग । तरीच हा साधे योग । प्रारब्धें घडे विषयभोग । तो त्यास दंड बळवंताचा ॥ ३५ ॥अपेक्षेवांचूनि भोग । प्रारब्धें विषयेंद्रियेयोग । तेथें नसे आग्रहाचा रोग । तो ह्मय उत्तरार्धीं अन्याचा ॥ ३६ ॥ ते रीति इतरांकडे गेली । तेव्हां यांकडे हेचि लागली । कीं सर्वथा इंद्रियें होमिलीं । संयमाग्नींत ॥ ३७ ॥ इंद्रियें आवरूनीच असावें । तेव्हां निर्जनस्थळीं वसावें । कडेकपाटीं वनीं बसावें । गलितपर्णादि भक्षूनी ॥ ३८ ॥ सर्वथा इंद्रियांचा संयम । न घडे जों ऐसा नव्हे नियम । अन्यथा न घडे होम । इंद्रियांचा ॥ ३९ ॥ गलिततर्णादि भक्षण । तें नव्हे इंद्रियवृत्तीचें लक्षण । वासनेपासून जतन रक्षण । हाचि होम इंद्रियांचा ॥ ८४० ॥ ऐसे यमनियम । ये जन्मीं अथवा अनेकजन्म । घडतां ब्रह्मीं वृत्तिनियम । घडे तें पुढिल्या श्लोकीं सांगणें असे ॥ ४१ ॥ सर्वसंगपरित्यागी । ते हे सांगितले योगी । जे विषयेंद्रियसंयोगीं । होम भाविती ते एक अन्य ॥४२॥ ब्रह्मसमाधीची अपेक्षा । जेथें वृत्ति न येती लक्षा । त्या विरक्तांस उपेक्षा । सर्वथा विषयांची ॥४३॥ कुटुंबी स्वजनीं शरीर । वर्तवूनिही अत्यंत धीर । लागों नेदिती वासनासमीर । वैराग्याच्या दीपासी ॥ ४४ ॥ कीं इतरांचें श्रोत्रादि जें जें इंद्रिय । त्यांचा शब्दादि जो जो विषय । त्या विषयेंद्रिययोगीं निश्चय । बुद्धि धरी रागद्वेषांची ॥ ४५ ॥ गोड लागतां भोग । उपजे राग ह्मणिजे अनुराग । वाइटा विषयांचा होतां योग । द्वेषकांटाळा अनावडी ॥ ४६ ॥ विषय जेव्हां गोड वाटे । तेव्हां वासनेस फुटती फांटे । वाईट लागतां हर्ष खुंटे । आणि उपजे विषाद ॥ ४७ ॥ विषाद आणि हर्ष । विषयभोगीं हे दोन्ही दोष । न उपजे ऐसा युक्तिविशेष । तो एक यज्ञ करिती कितीएक ॥ ४८ ॥ कीं अग्निरूप इंद्रियांतें । भावूनि त्यांत विषयांतें । होमिती यजितां या यज्ञातें । हर्षविषादातें नातळती ॥४९ ॥ यांचाही इंद्रियांवरी । संयम असे याच परी । त्यांवेगळे हे अन्य ऐसें हरी । अन्यश-

ऐंदें बोलतो ॥ ८५० ॥ भोग घडला मला । ऐसें स्फुरे मीपणाला । तेव्हां वरी पडे घाला । रागद्वेषांचा ॥ ५१ ॥ इंद्रियविषयांतें जाणे । तों तो होमचि वाणे । मज भोग जाला ऐसें न ह्मणे । हर्षविषाद भोगीं मग कैंचा ॥ ५२ ॥ एक भोगूनिही भोग । साधिती ऐसा योग । तुटावया भवरोग । उपाय ऐसे ॥ ५३ ॥ ऐसे उपाय आधीं । तेव्हां साधे ब्रह्मसमाधी । तो ब्रह्मसमाधि यज्ञरूपें बोधी । श्रीकृष्ण आतां या श्लोकीं ॥ ५४ ॥

॥ श्लोक ॥ सर्वाणींद्रियकर्माणि प्राणकर्माणि चापरे ।
आत्मसंयमयोगाग्नौ जुह्वति ज्ञानदीपिते ॥ २७ ॥

॥ टीका ॥ पूर्वश्लोकीं जो साधक । त्यावेगळे सिद्ध निर्गुणोपासक । त्यांचा समाधियज्ञ आतां आइक । अगा अर्जुना ॥ ५५ ॥ कीं चित्त जें शुद्धसत्त्ववृत्ती । ज्या वृत्तीनें सर्ववृत्ति स्फुरती । जीच्या जीवनें आत्मचैतन्यें जितीं । शरीर इंद्रियें प्राण ॥ ५६ ॥ नेत्रीं आणि शरीरीं । दीपा एकाचेंचि तेज परी । नये नेत्रांची सरी । शरीरास ॥ ५७ ॥ देह आणि दीपाची ज्योति । नेत्र दोहींस पाहती । ते नेत्र दीपीं स्थिर राहती । न दिसे तेव्हां आणिक ॥ ५८ ॥ आत्मप्रकाशें ये रीती । सर्ववृत्तींस जाणे चित्तवृत्ती । तीस बाणतां स्वरूपस्थिती । रजतम स्फूर्ति मग कैंच्या ॥ ५९ ॥ सत्त्ववृत्तीचें चपलपण । होतां चळती प्राण । तेधवां इंद्रियांचे गण । विषय घेती ॥ ८६० ॥ चित्त स्वरूपीं मुरे । चंचलत्व प्राणांचें सरे । इंद्रियवृत्तीस न स्फुरे । विषय तेव्हां ॥ ६१ ॥ तें इंद्रियांचें कर्म । आणि प्राणांचे चंचलत्वधर्म । न उरती जेव्हां निखळब्रह्म । चित्त लक्षी एकाग्र ॥ ६२ ॥ एवं इंद्रियें आणि प्राण । दोन्ही रजोगुण । तमविषयाचें कारण । रजतम तेव्हां न स्फुरे सत्त्वासी ॥ ६३ ॥ कीं सत्त्वाचें सत्त्वपण । निर्गुणीं जालें निर्गुण । विना चिदात्मत्व खुण । न स्फुरे जेथें आणखी ॥ ६४ ॥ चित्त आत्मस्वरूपावीण । नाठवी अवलंबी तेचि स्वात्मखुण । यास ह्मणती निपुण । चित्तसंयम ह्मणोनि ॥ ६५ ॥ याच संयमालागीं । योग ह्मणती पातंजलादि योगी । कीं रजतमवृत्ति वियोगी । योग चित्तचैतन्याचा ॥ ६६ ॥ स्पर्शोनि नित्यचैतन्य । रजतमवृत्ती स्मरे अन्य । ह्मणवूनि योगी परम धन्य । योग न ह्मणती तो चित्ताचा ॥ ६७ ॥ कीं स्पर्शोनि रज्जूस दृष्टी । तदाश्रयें मिथ्या सर्पसृष्टी । देखे वृथा होय कष्टी । नव्हे तो योग रज्जु दृष्टीचा ॥ ६८ ॥ एवं चित्तचैतन्ययोग । तोचि कीं रजतमवृत्तिवियोग । रज्जुत्वें रज्जुदृष्टि-

संयोग । चित्तचैतन्ययोग तो ऐसा ॥ ६९ ॥ ऐसेंचि योगशास्त्र ।.जेथें योगलक्षणें विचित्र । या निर्विकल्प योगाविषयीं सूत्र । ऐसेंची ॥ ८७० ॥ पातंजलसूत्र ॥ योगश्चित्तवृत्तिनिरोधः ॥ ॥ टीका ॥ रजतमाकारवृत्ती । चित्तामाजीं ज्या स्फुरती । त्या वृत्तींच्या निरोधिजे स्थिती । तें स्थितीच योग ॥ ७१ ॥ दोंचा जो संयोग । त्यास ह्मणावें योग । तरी निरोधीं इतर वृत्तींचा वियोग । तेव्हां चित्तचैतन्ययोग आयता ॥७२॥ एवंच संयमचि चित्ताचा । तो योग ऐसा शास्त्रकारांच्या वाचा । तो आत्मसंयोगचि साचा । अग्नि ह्मणे श्रीकृष्ण ॥७३ ॥ ऐसा आत्मसंयम जेधवां । न स्फुरती प्राण इंद्रियें तेधवां । तें त्या आत्मसंयमयोगाग्नींत तेव्हां । होमिलीं ह्मणावीं ॥ ७४ ॥ कीं रजतमवृत्ती । ज्या निमित्तें स्फुरती । चिदग्नींत जाली आहुती । तयांची हि ॥ ७५ ॥ आहुति अग्नींत होमिली । ते अग्नींत अग्निरूपचि देखिली । अनुभवस्थितींत लेखिली । वृत्तीं तथापि ॥ ७६ ॥ हेचि अवस्था उन्मनी । मन ब्रह्मचि जालें ह्मणोनी । हेचि शुद्ध तुर्या सज्जनीं । लेखिली अवस्था ॥ ७७ ॥ विश्व दिसे नयनीं । ते जागृतीं विश्व अभिमानी । अंध बधिर यासही रसनादिकीं करूनी। रसस्पर्शों कळे जागृतींत हें विश्व ॥७८॥ नव्हे विश्व जें स्वप्नकृत । तें जीवोपाधिनिर्मित । ईश्वरकृत जें जाणें जागृत । निर्विकल्पसमाधींत हें स्फुरेना ॥ ७९ ॥ इंद्रियकर्में राहती । कैंचीतेव्हां जागृती । नव्हे स्वप्नही कीं वृत्ती । न करिती कांहीं कल्पना ॥ ८८० ॥ जरी ह्मणावी सुषुप्ती । तरी निरोधिली चित्तवृत्ती । स्वस्वरूपाची स्फुरे स्फूर्ती । सुषुप्तींत कैंची ॥ ८१ ॥ हा निर्विकल्पसमाध्यनुभव । यज्ञरूपें बोले माधव । निर्धर्मी निर्गुणीं अभिनव । प्रत्ययसत्त्वेंचि आत्मत्वाचा ॥ ८२ ॥ अग्नि जरी स्वप्रकाश । काष्ठ पेटतां दिसे प्रकाश । तैसा निर्धर्मी हृषीकेश । चित्प्रकाश प्रत्यय सत्त्वें सूचवी ॥ ८३ ॥ कीं तो आत्मसंयमयोगाग्नी । ज्ञानदीपित ह्मणोनी । ज्ञान ह्मणिजे ज्ञानशक्तिसत्त्वें करूनी । दीपित ह्मणजे प्रकाशित ॥ ८४ ॥ निर्विकल्प समाधिस्थिती । यज्ञरूपें वर्णी श्रीपती । निर्गुणब्रह्मयज्ञाची रीती । हे ऐसी ॥ ८५ ॥ ब्रह्माग्नींतचि कोणी होमिती । हें मागें अर्जुनाप्रती । बोलिला त्याची रीती । वर्णिली ऐसी ह्मणोनी ॥ ८६ ॥ एवं प्रत्यक्ष अग्नींतचि जो ब्रह्मत्वें होमी । तो सगुण भक्ती पावे सगुण ब्रह्मी । हा निर्गुणोपासक तो स्वामी । जो ब्रह्मीच होमी वृत्तींत ॥ ८७ ॥ हें यज्ञप्रकरण । या प्रसंगीं यज्ञाचेंच विवरण । आणिकही तें यज्ञनाराण । यज्ञनामक अधियज्ञ बोलतो या श्लोकीं ॥ ८८ ॥

॥ श्लोक ॥ द्रव्ययज्ञास्तपोयज्ञा योगयज्ञास्तथापरे ।
स्वाध्यायज्ञानयज्ञाश्च यतयः संशितव्रताः ॥ २८ ॥

॥ टीका ॥ सुवर्णादि धातुजाती । तांदुळादिधान्यें वस्त्रें क्षिती । गजरथादि दानें योग्य जीं असती । तीं द्रव्यें ह्मणावीं सकळही ॥ ८९ ॥ ऐसीं द्रव्यें समस्त । आहुति आणि सत्पात्राचे हस्त । ते अग्नि यजमान गृहस्थ । त्यांत तीं द्रव्यें होमिती ॥ ९० ॥ आज्यादि हविर्द्रव्य । त्यासही ह्मणावें द्रव्य । परि तो ब्रह्मरूपार्पित यज्ञ दिव्य । आणि द्रव्ययज्ञ पूर्वी वर्णिला ॥ ९१ ॥ येथें द्रव्ययज्ञ शब्दें करूनी । सूचवी द्रव्यदान यज्ञ ह्मणोनी । अर्थ येथें त्यावरूनी । ऐसाच युक्त ॥ ९२ ॥ द्रव्यदानयज्ञकर्ते ऐसे । आतां तपोयज्ञ यजमान कैसे । तपाचे प्रकार जे जैसे । ते तैसे तपस्वी ह्मणावे तपोयज्ञ ॥ ९३ ॥ एक तप शीतोष्णादिसहन । आणि तप अनशन । न करणें अशन ह्मणजे अभोजन । भोजन ह्मणिजे विषयभोग ॥ ९४ ॥ ज्यां इंद्रियांचा जो विषय । तेंचि त्यांचें भोजन निश्चय । हा एक विषयत्यागमय । तपोयज्ञ ॥ ९५ ॥ तपालोचन ह्मणिजे विचार । त्यांत लौकिकविचार ते वेडचार । ब्रह्मात्मविचार तो विचार साचार । मख्य तप तें हेंचि ॥ ९६ ॥ तपें करूनि ब्रह्म जाण । वरुण ह्मणे भृगूतें तपीं सुजाण । तो भृगु विचारें जाला जाण । अनुभवी स्वानंदाचा ॥ ९७ ॥ जो बाणे ब्रह्मसमाधी । तो मननादिविचाररूप तपआधीं । तो तपोयज्ञ ह्मणावा जो साधी । ब्रह्मानुभव ॥ ९८ ॥ ब्रह्मविचारें क्रमें घडी । ते किल्ली अविद्या कवाडें उघडी । जन्मजन्मीं तपांच्या कोडी जोडी । तयीं सुचे विचार ब्रह्मात्मत्वाचा ॥ ९९ ॥ स्वहित करावें निश्चित । हा विवेकाग्नि होतां दीप्त । तो आहुतीनें करिती तृप्त । ब्रह्माद्वैतविचाराचिया ॥ १०० ॥ आतां कोण्ही योगरूपयज्ञ । करिती ते ह्मणावे योगयज्ञ । जे षट्चक्रें[2] भेद जाणती अभिज्ञ । प्राण नेती ब्रह्मरंध्रासी ॥ १ ॥ त्यांत ज्यास आत्मा मात्र कळे । आणि अविद्यासंस्कार न जळे । त्यास ब्रह्मलोकीं मोक्षफळें । जाती सत्यलोका ब्रह्मरंध्र भेदुनी ॥ २ ॥ हटयोगी आणि आत्मज्ञानी । राहिले ज्ञानसमाधि पावोनी । ते सुटोनी मृत्युमुखापासूनी । जीवन्मुक्त होउनी राहिले ॥ ३ ॥ जों आत्मज्ञान नसे । तों अविद्यावरण असे । ते हटयोगी ही कैसे । मुक्त होती ॥ ४ ॥ जे हटयोग नेणती । आणि ब्रह्मात्मता खरी

१ खरा. २ योगशास्त्रांत सांगीतलेली देहांतील सहा स्थानें.

जाणती । ते मुक्ति जितांही पावती । परी न चुकवूं शकती मृत्यु देहाचा ॥ ५ ॥ अविद्येंच इतर कर्मयोग । तैसेंचि अविद्या कर्म हटयोग । न चुकती जन्ममरणभोग । ब्रह्मविद्येवांचूनी ॥ ६ ॥ परि न लगतां हटयोगाच्या वाटे । देह मृत्यूपासूनि सुटे । आणि ब्रह्मविद्येवांचूनि तुटे । पुनरावृत्ति-शृंखळा ॥ ७ ॥ ज्यांस दोन्हीं असती । ते हटयोगें देह रक्षिती । ज्ञानयोगेंचि मोक्ष पावती । हा अर्थ श्रुतिसिद्ध ॥८॥ ॥श्रुति॥ अन्य आहुर्विद्यया अन्य आहुरविद्यया ॥ इति शुश्रुम धीराणां येनस्तद्विचाक्षिरे [?] ॥१॥ विद्या चाविद्या च यस्तद्वेदोभयं हि सः॥अविद्यया मृत्युं तीर्त्वा विद्ययामृतमश्नुते ॥२॥ श्रुत्यर्थ ॥ श्रुति ह्मणे विद्येंकरूनी । मोक्ष आहे ह्मणोनी । कोणी ह्मणती आणि कोण्ही । ह्मणती मोक्ष अविद्येनें ॥९॥ तें आह्मां वेदांचपासूनी । दोन्ही गोष्टी जाणोनी । बोलती कीं वेदवचनें दोन्ही । सारखींच दिसती ॥ ९१० ॥ कीं हटयोगें अमृतत्व पावती । ऐसें ज्या श्रुति बोलती । त्यावरूनी अविद्येनें मोक्ष ह्मणती । अविद्या ह्मणजे हटयोग ॥ ११ ॥ मृतत्व नव्हे तें अमृतत्व ह्मणावें । हें कालवंचनालक्षण गणावें । कीं मरण चुके स्वभावें । हटयोगेंच ॥ १२ ॥ आणि अमृतत्व मोक्षाचेंही नांव । परी हटयोगासी तो नसे प्रभाव । कालवंचनाफलस्वभाव । यालागीं अमृतत्व श्रुति ह्मणे ॥ १३ ॥ ॥ श्रुति ॥ शतं चैकं च हृदयस्य नाड्यस्तासां मूर्धानमभिनिसृतैका । तयोर्ध्वमायन्नमृतत्वमेति विश्वङ्गन्या क्रमेण भवंति ॥ श्रुत्यर्थ ॥ शरीराच्या नाडी अत्यंत । त्यांत हृदयाच्या एकोत्तरशत । त्यांत एक सुषुम्ना नाडी निश्चित । प्राण प्रावती मस्तकीं ब्रह्मरंध्रासी ॥ १४ ॥ जो ऐसा ऊर्ध्व जाय । त्यास फळ काय । तो ह्मणे अमृतत्व पावे हा निश्चय । अमृतत्व ह्मणिजे नव्हे जें मृतत्व॥१५॥ प्राणांत मन असे । मनीं जीवात्मा प्रतिबिंबांशा वसे । तो मना प्राणांसवें जातसे । ऊर्ध्व मस्तकीं ब्रह्मरंध्रासी ॥ १६ ॥ मृतत्व ह्मणिजे मरण । कीं जों ब्रह्मरंध्रीं असे प्राण । तों मृतत्व नाहीं त्यास ऐसा गुण । त्या स्थळाचा ॥ १७ ॥ हा हटयोगसमाधी । त्या समाधींत काळ त्यातें न बाधी । तथापि सर्वथा अमरत्व न साधी । हटयोगें देहासी ॥ १८ ॥ एक समाधिस्थ बैसला । तो मेला ह्मणोनि जाळिला । तुटे शस्त्रें तोडिला । समाधींतही॥१९॥पुण्य प्रारब्ध अत्यंत । तोचि हटयोगें वर्षशतें बहुत । वांचे शेवटीं निश्चित । मरे निमित्तें एका भलतियां ॥९२०॥ ब्रह्मादिकांचे देह । न राहती निःसंदेह । त्या नश्वराचा काय स्नेह । विरक्तां ज्ञानियांसी ॥ २१॥

होतां ब्रह्मदिनप्रलय । त्रैलोक्याचा दाह होय । तेव्हां हटयोगी आपडे काय । तृण शुष्क ॥ २२ ॥ एवं देवांस ह्मणावें अमर । यद्यपि बहुकाळें मरती सुर । तैसें बहुकाळ पूर्वपुण्यें शरीर । वांचे हटयोगियांचेंही ॥ २३ ॥ या आयुष्याचें प्रमाण । बोलिले युगयुगानुगुण । ते गणना होतां होतां निर्माण । अकस्मात मृत्यु ॥ २४ ॥ कलियुगीं वर्षशत । जरी वांचला अत्यंत । तें मरतां पावे निश्चित । मृत्यु प्राणांतें हरावया ॥ २५ ॥ जरी झालें शतप्रमाण । आणि ब्रह्मरंध्रीं असला प्राण । न करवे त्याचें प्रयाण । नियतकाल मृत्यूस ॥ २६ ॥ मृतत्व नाहीं ये रीती । यास अमृतत्व ह्मणे श्रुती । अमृतत्व । मोक्षासही ह्मणती । वेद शास्त्रें पुराणें ॥ २७ ॥ यावरूनी पूर्वश्रुती । ह्मणे अविद्येनें कोणी मोक्षा वाखाणिती । कोण्ही विद्येनेंच ह्मणती । वेदांतनिष्ठ ॥ २८ ॥ ज्ञानावांचूनि मोक्ष नसे । सर्व वेद ह्मणती ऐसें । अविद्या आवरण असोनि कैसे । हटयोगी मोक्ष पावती ॥ २९ ॥ हटयोगियांचें अमृतत्व । तो मोक्ष नव्हे जाणावें अमरत्व । वेदांतियांचें बोलणें तत्त्व । मुक्ति अमृतत्व शब्दें ॥ ९३० ॥ आतां हटयोगी मृत्यूपासूनि सुटती । ज्ञानयोगी मुक्ति पावती । ऐसें बोलतां न तुटती । विवाद अन्योन्य ॥ ३१ ॥ सुटले मृत्यूपासोनी । ते मुक्त जालेच ह्मणोनी । ऐसा श्रुतीचा आश्रय करूनी । स्वमत स्थापिती पुन्हा हटयोगी ॥ ३२ ॥ याकारणें श्रुती । विद्या अविद्या दोहींच्या गती । एकाच पुरुषाच्या वर्णितां तोडिती । वाद दोहीं मतांचा ॥ ३३ ॥ कीं विद्या एक अविद्या एक । दोन्ही जाणे जो साधक । तो अविद्येनें तरोनि मृत्यूचा पंक । विद्येनें अमृतत्व अनुभवी ॥३४॥ एवं मृत्यु तरला तरी कांहीं । मोक्ष तोंपर्यंत नाहीं । कीं ब्रह्मविद्येनें नरदेहीं । जों स्वरूप नाहीं ओळखिलें ॥ ३५ ॥ अविद्याशब्दें हटयोग । येथें अन्यार्थीं अविद्याशब्दप्रयोग । सर्वथा न घडे कीं इतर कर्मप्रयोग । करितां मृत्यु तरणें घडेना ॥ ३६ ॥ यावेगळा अर्थ । सर्व बाधित व्यर्थ । मृत्यु तरणें तेव्हां यथार्थ । अविद्याशब्दें हटयोग ॥ ३७ ॥ कीं अमृतत्व श्रुती । हटयोगें ह्मणती । अविद्या असतां साधिती । हटयोगानें साधक ॥३८॥ कीं अविद्या सर्व कर्म । विद्या कर्मातीत दावी ब्रह्म । हटयोगही मायासंभ्रम । अविद्यारूप ॥ ३९ ॥ परी सोडवी यथाकाळें मृत्यूपासूनी । अविद्याशब्दें ह्मणोनी । हटयोग येथें वेदवचनीं । वाखाणावा अबाधित ॥ ९४० ॥ एवं हटयोगें मरण । तरोनिही मोक्षाचें कारण । ब्रह्मविद्याच तीवीण । मोक्ष

नव्हे ॥ ४१ ॥ एवं अविद्येनें मृत्युही तरोनी । तोचि पुरुष विद्येंकरूनी । मोक्ष अनुभवी ह्मणूनी । ह्मणतां नुरे वादास अवकाश ॥ ४२ ॥ एवं हटयोगेंचि मोक्ष । हा अप्रयोजक पक्ष । न तुटे संसार विषवृक्ष । ज्ञानशस्त्रावांचूनी ॥ ४३ ॥ प्रस्तुतीं वर्णितां यज्ञ । इतर द्रव्यादि यज्ञही अज्ञ । जैसे करिती ह्मणे कृष्ण सर्वज्ञ । तैसे योगयज्ञही हटयोगी ॥ ४४ ॥ ब्रह्मीं चित्तवृत्ति । निरोधणें हेही योगस्थिती । ते पूर्वश्लोकींच रीती । "आत्मसंयमयोगाग्नि" ह्मणतां वर्णिली ॥ ४५ ॥ हे यज्ञ प्रत्येक प्रत्येक । न मेळवावे एकांत एक । वाखाणावा निःशंक । या योगयज्ञीं हटयोग ॥ ४६ ॥ आतां स्वाध्यायज्ञानयज्ञ । ह्मणिजे वेदार्थजाणते शास्त्रज्ञ । स्वाध्याय वेद त्यांचा अर्थ अभिज्ञ । वेदभाष्यें पाहती ॥ ४७ ॥ जरी नसे अर्थानुभव । तरी वेदार्थानुभवाचें वैभव । राजा न दिसे त्यासही अभिनव । राजवैभव दिसे गजरथादि ॥ ४८ ॥ परि वेदार्थ जाणावया । अधिकार पाहिजे धनंजया । कीं संन्यास असे जया । तोचि अधिकारी ॥ ४९ ॥ मुख्य वेदाचा अर्थ । ना वेदांतचि यथार्थ । कर्मपरांचें पांडित्य व्यर्थ । एकदेशी ॥ ५० ॥ कर्मकांडें चित्तशुद्धी । ते तोचि मानिती मुख्य सिद्धी । न रिघे ज्यांची बुद्धी । ज्ञानकांडीं ॥ ५१ ॥ कांडत्रयसंमत । तेंचि शास्त्र वेदांत । स्वाध्यायज्ञान निश्चित । तोंचि ह्मणावें ॥ ५२ ॥ त्या श्रवणासी अधिकारी । कीं संन्यासी होय जरी । संन्यासतत्त्व श्रीहरी । अष्टादशारंभीं बोलेल ॥ ५३ ॥ कीं काम्य तितकें कर्म । टाकणें हाचि संन्यासधर्म । विशेषें चतुर्थाश्रम । असे तरी बराचि ॥ ५४ ॥ असोनिही संन्यासाश्रम । जो आचरे काम्यकर्म । तो संन्यास वृथा श्रम । बरा काम्यत्यागी गृहस्थ ॥ ५५ ॥ एवं काम्यकर्में टाकिती । तेचि ह्मणावे यती । यत्नशीलास यति ह्मणती । यत्न तो मोक्षयत्नचि ॥ ५६ ॥ शृंखला असे पायीं । ते दृढचि होय ज्या उपायीं । ते उपाय घालिती अपायीं । तैसे काम्ययत्न काम्याचे ॥ ५७ ॥ जो काम्यावेगळा । तोचि यत्नशील यति आगळा । काम्यफळ मत्स्याचा बगळा[3] । दांभिक ही यति नव्हे ॥ ५८ ॥ एवं स्वाध्यायज्ञान ज्यांचा यज्ञ । ते यति ऐसें बोले अभिज्ञ । जरी नव्हती आत्मज्ञ । श्रवण करिती तदर्थ ॥ ५९ ॥ ते यति शंसितव्रत । कीं बरें तीक्ष्ण ज्यांचें ह्मणिजे सुव्रत । न चळती व्रतापासूनी ॥६०॥ आतां कोण्ही प्राणायामयज्ञ । मन

१ नवीन; आश्चर्यकारक. २ वेदांतशास्त्र. ३ बक पक्षी.

वश करावया अभिज्ञ । ते रीति वर्णितो सर्वज्ञ । या श्लोकीं ॥ ६१ ॥

॥ श्लोक ॥ अपाने जुह्वति प्राणं प्राणेऽपानं तथा परे ।
प्राणापानगती रुद्ध्वा प्राणायामपरायणाः ॥ २९ ॥

॥ टीका ॥ देहीं प्राणांची अधोवृत्ति । तीस अपान ऐसें ह्मणती । जे प्राणाची ऊर्ध्वगती । प्राण ह्मणती तेधवां ॥ ६२ ॥ दडपूनि वामपुटीं प्राण । वरि जों निघों पाहे प्राण । त्यास तळीं रेंटिती सत्राण । सव्यनासापुटें ॥६३॥ प्राणांची ऊर्ध्वगती।ते बळें अपानगति करिती।या नांव अपानीं प्राण होमिती । पूरक ह्मणावें यालागीं ॥ ६४ ॥ नासापुटें दोनी धरूनी । ते प्राण मूळाधारीं आवरूनी । हळुहळु अपसव्य नासापुटें करूनी । सोडिती दडपूनि सव्यपुट ॥ ६५ ॥ तळीं कोंडितां प्राण । पावला होता अपानत्व क्षणें । त्यास पुन्हां प्राणपण । आलें वरता नेऊनि सोडितां ॥ ६६ ॥ तो अपान होमिला प्राणीं । कीं हळुहळु बाहेर निघों लागला प्राणीं । या नांव रेचक परंतु कोण्हीं । ह्मणती कुंभकावीण नव्हे रेचक ॥ ६७ ॥ कीं वायु पीडणें पूरक । तदनंतर तो निरोधणें कुंभक । निरोधिला सोडणें तो रेचक । पूरकापुढें रेचक घडेना ॥ ६८ ॥ अपानीं होमिती प्राण । प्राणीं होमिती अपान । हें पूरक रेचकाचें विवरण । तरी कुंभकाविणें रेचक घडेना ॥ ६९ ॥ ह्मणूनि उत्तरार्धें हरी । ह्मणतो कीं प्राणापान दोनी उदरीं । निरोधूनि मग वरी । अपान होमिती प्राणीं तो रेचक ॥ २७० ॥ हें प्रणायामलक्षण । हाही एक यज्ञ ह्मणे नारायण । तो प्राणायामपरायण । जे प्राणायामचि करिती बहु ऐसे ॥ ७१ ॥ प्राणायामचि परम आश्रय । त्यांस कीं येणेंचि मनोजय । होईल ऐसा निश्चय । प्राणायामपरायणीं ॥ ७२ ॥ तें यज्ञप्रकरण । आणिक एका यज्ञाचें विवरण । करितो श्रीयज्ञनामक नारायण । या श्लोकीं ॥ ७३ ॥

॥ श्लोक ॥ अपरे नियताहाराः प्राणान्प्राणेषु जुह्वति ।
सर्वेऽप्येते यज्ञविदो यज्ञक्षपितकल्मषाः ॥ ३० ॥

॥ टीका ॥ आणखी कितीएक नर । नियत करूनि आहार । क्षुधा सर्व निरसे ऐसें उदर । न भरिती अन्नें ॥ ७४ ॥ ते प्राणीं प्राण होमिती । प्राणसंस्कृतें इंद्रियांसही ह्मणती । दुसरिया प्राणशब्दें श्रीपती । वायुरूप प्राणाचि सूचवी ॥७५॥ एवं इंद्रियें क्षीणत्वा जाती । प्राणांमाजीं ते होमिती । जे नियतें करिती । अल्प आहार ॥ ७६ ॥ कीं आहार पडता

१ नाकपुडया. २ या नांवाचें एक चक्र=स्थान. ३ निमिषमात्र. ४ सजीवत्व. ५ परिमित.

ऊणा । अशक्तत्व ये प्राणां । तेव्हां इंद्रियगणा । विषयीं कैंची प्रवृत्ती ॥ ७७ ॥ इंद्रियांचा जय । करावा हा निश्चय । परि इंद्रियवृत्ति करिती उदय । शरीरपुष्टिबळें करूनी ॥ ७८ ॥ विवेक पुरुषाच्या आंगीं । औषधार्थ जरी खाय भांगी । घडी एक तिच्या रंगीं । होतोच विकळ ॥ ७९ ॥ शरीरीं वीर्याची पुष्टी । ते स्त्रीसंगहीनास कांहीं कष्टी । करी जरी दूरदृष्टी । आटोपिती मनासी ॥ १८० ॥ तें कदाचित् अनावर । होईल ह्मणोनि निग्रहपर । पुष्ट होऊं नेदी शरीर । अल्प आहारादिकीं ॥८१॥ शरीर होतां क्षीण । अशक्त होती प्राण । स्ववश राहती इंद्रियगण । निग्रहपरांचे ॥ ८२ ॥ प्राणशक्तीवांचूनी । इंद्रियें निश्चळ राहती यावरूनी । प्राणांत इंद्रियें होमिलीं ह्मणोनी । मानावें ॥ ८३ ॥प्राणांत इंद्रियें होमिती । या भावें ह्मणे श्रीपती । येथवरी सांगोनि यज्ञरीती । स्तुति करितो त्या यज्ञ करणारांची ॥ ८४ ॥ कीं हे सर्वयज्ञजाणते पुरुष । यज्ञें जिहीं नाशिलें कल्मष । ह्मणजे हे निष्पाप निर्दोष । यज्ञकर्ते सकळही ॥ ८५ ॥ आतां यज्ञकर्ते उत्तम । कांहीं यज्ञ न करिती ते अधम । ह्मणोनि देवदेवोत्तम । बोलतो या श्लोकीं ॥ ८६ ॥

॥ श्लोक ॥ यज्ञशिष्टामृतभुजो यांति ब्रह्म सनातनम् ।
नायं लोकोस्त्ययज्ञस्य कुतोन्यः कुरुसत्तम ॥ ३१ ॥

॥ टीका ॥ अगा यज्ञ करितां अवशिष्ट । अन्नादिक तें अमृत ह्मणती शिष्ट । जे भक्षिती त्यांस फळ उत्कृष्ट । कीं ब्रह्मसनातन ते पावती ॥ ८७॥ कीं निष्काम यज्ञ । ईश्वरीं अर्पी अभिज्ञ । तो चित्तशुद्धीनें पावे ब्रह्म ब्रह्मज्ञ । भाव ऐसा ॥ ८८ ॥ आतां सकामही उत्तम परी । वाईट तो जो यज्ञ न करी । ह्मणूनि उत्तरार्धे हरी । निंदितो त्यासी ॥ ८९ ॥ कीं यज्ञ न करी कांहीं । त्यास हा लोक तोही नाहीं । कीं पडला जनमुखप्रवाहीं । निंदेचिया ॥ १९० ॥ दुसरे जन्मांतरीं । सुख न स्पर्शे त्याच्या शरीरीं । कीं पुण्यावीण कोणेपरी । सुखप्राप्ति न घडे ॥ ९१ ॥ एवं सुलभ इहलोक नाहीं ज्याला । परलोक कोठूनि होय त्याला । एवं सकाम भला । कांहीं न करी त्याहूनी ॥९२॥ दरिद्री आणि कांहीं । सदाचार जपतपही करीत नाहीं । तो श्रीकृष्णें या प्रसंगप्रवाहीं । निंदिला येथें ॥ ९३ ॥ कीं धनवंत न करी यज्ञ जरी । तो द्रव्यदानयज्ञ तरी करी । तितकियानेंच तो पावे गति बरी ।

१ वेगांत, अनलांत. २ पार. ३ शेष राहिलेलें.

द्रव्ययज्ञकर्ता लेखिला यांमाजी तो ॥ ९४ ॥ तो अग्निहोत्रादियज्ञ ही जरी। न आरंभी तरी द्रव्यादि दानें करी। एवं दरिद्री आणि दुराचारी। निंदिला येथें ॥ ९५ ॥ अथवा धनवंत धन। न दे याचकां न करी दान। तो द्रव्यलुब्ध सत्कर्मानुष्ठान। करी तऱ्ही व्यर्थ ॥ ९६ ॥ कीं पदरीं धन असोनी। सांग अन्न दक्षिणेवांचोनी। शठत्व लागे यज्ञ त्यांचा जाय म्हणोनी। अयज्ञ तोही ॥ ९७ ॥ एवं जप तप न करी निर्धन। आणि दातृत्व न करी सधन। दोघे अयज्ञ यांतें मधुसूदन। निंदितो ऐसें निर्णितां सांपडे तत्त्व ॥ ९८ ॥ येविषयीं व्यासाचीही भारती। बोले याचि श्रीमहाभारतीं। कीं हे दोघेच नरकाप्रती। जाणार ॥ ९९ ॥ ॥ महाभारतश्लोक ॥ द्वावेवाप्सु प्रवेष्टव्यौ कंठे बद्ध्वा दृढां शिलाम्। धनवंतमदातारं दरिद्रं चातपस्विनम् ॥ १ ॥ ॥ टीका ॥ पाहोनि खोल जळा। गळां बांधोनि दृढ शिळा। बुडवावें त्यांत खळा। धनवंतास जो दातृत्व न करी ॥१०००॥ आणि एक अभाग्य। तैसाचि बुडवावया योग्य। कीं दरिद्री होऊनि भाग्य। न साधी तपाचें ॥ १ ॥ शक्ति नाहीं करावया दान। तरी स्नानसंध्या अनुष्ठान। करूनि मोक्षवैभवाचें निधान। नाम जपे श्रीहरीचें ॥ २ ॥ एवं न तरती मनुष्यदेहनावें। तरी व्यर्थ कां भूमीस भार व्हावें। यालागीं खोल जळीं बुडवावें। जडशिळा कंठीं बांधोनी ॥ ३ ॥ एवं कांहीं एक यज्ञ। करी तोचि अभिज्ञ। या दों प्रकारींचे अयज्ञ। दोन्ही लोक नसती ऐसियांस ॥ ४ ॥ हे यज्ञ बोलिला सर्वज्ञ। यांत कांहीं कर्मयज्ञ कांहीं ज्ञानयज्ञ। आतां ज्ञानयज्ञ थोर ऐसें अधियज्ञ। बोलतो दों श्लोकीं ॥ ५ ॥ त्यांत कर्मयज्ञ कर्माच पासूनी। जाले आत्मयातें न स्पर्शोनी। हें जाणतां फळ थोर म्हणोनी। जाण म्हणतो आधीं या श्लोकीं ॥ ६

॥ श्लोक ॥ एवं बहुविधा यज्ञा वितता ब्रह्मणो मुखे।

कर्मजान्विद्धि तान्सर्वानेवं ज्ञात्वा विमोक्ष्यसे ॥ ३२ ॥

॥ टीका॥ यज्ञ आणिक ऐसे बहुत। वेदींच बोलिले निश्चित। परि अवघेही कर्मजनित। जाण अर्जुना ॥७॥ कीं कर्मापासोनि यज्ञ जाणे। त्यास आत्मयाची अकर्तृता बाणे। कीं जे हें जाणती ते शाहणे। कीं न स्पर्शे कर्म आत्मयातें॥८॥तूं अद्यापि हें नेणसी। तें जव्हां जाणसी। तेव्हां ऐसें जाणूनि पावसी। मोक्ष कर्माबंधापासूनी ॥९॥ कर्मयज्ञ ज्ञानयज्ञ सहज। मिसळोनि बो-

१ उक्ति. २ श्लोकेन.

लिलों तज । यांत कांहीं रहस्यगुज । तें सांगतों या श्लोकीं ॥ १०१० ॥

॥ श्लोक ॥ श्रेयान्द्रव्यमयाद्यज्ञाज्ज्ञानयज्ञः परंतप ।
सर्वं कर्माखिलं पार्थ ज्ञाने परिसमाप्यते ॥ ३३ ॥

॥टीका॥अगा आज्यादिक हविर्द्रव्य । ब्रह्मत्वें न जाणती दिव्य । बाह्यदृष्टिच यज्ञ कर्तव्य । ते द्रव्यमय यज्ञ बोलावे ॥११॥ ज्ञानेंकरूनि ब्रह्मस्थिती । हविर्द्रव्यादिकीं पूर्वोक्तरीती । किंवा आत्मसंयमयोगाग्नींत होमिती । सर्ववृत्ति ब्रह्मनिष्ठ॥१२॥हे ह्मणावे ज्ञानयज्ञ । यांचे यजमान ब्रह्मवेत्ते अभिज्ञ । ह्मणूनि ह्मणे कृष्ण सर्वज्ञ । कीं बरे हे द्रव्ययज्ञांपरिस॥१३॥ ज्यांत परम कल्याण । ते ज्ञानयज्ञ अर्जुना जाण । कीं द्रव्ययज्ञ होती निर्माण । कर्मापासूनी ॥१४॥तें सकल कर्म लया । जातसे ज्ञानींच या । कीं संचित क्रियमाण धनंजया । ज्ञानींच लया पावतें॥१५॥ज्ञानें सर्व कर्म सरे । पुनरावृत्तीस हेतु कांहीं न उरे । हे कर्मलयप्रकार बरे । येथेंचि वर्णिले तुजप्रती ॥१६॥ सर्वकर्मक्रियमाण ।अखिल कर्म संचित जाण । ह्मणूनि अर्जुनासि सूचवी सुजाण । द्विविध कर्मे ॥ १७ ॥ आतां यापुढें श्लोक । तो कां बोले उत्तमश्लोक । त्याचें निमित्त सुज्ञलोक । परिसोत अनुसंधानाकारणें ॥१८ ॥ सर्वांत थोर ज्ञान । हें पूर्वश्लोकीं बोलिला मधुसूदन ।कीं अपरोक्षाकारणें अर्जुन । शरण यावा ॥ १९ ॥ ज्याकारणें हृषीकेश । करितो गीतोपदेश । परि गुरुशरणागतीचा मार्गलेश । ठाउका नाहीं अर्जुनासी ॥१०२०॥ कीं भाग्यें भेटती संत । आणि ज्ञानमहिमा वर्णिती अत्यंत । तेव्हां समजावें कीं भगवंत । भेटला स्वयें उद्धाराकारणें ॥ २१ ॥ जन्म मरण जरा व्याधी । या संसारदुःखें संतप्त आधीं । त्यास संत भेटोनि बोलती ऐसें जधीं । तो भाग्य फळलें मानी आपुलें ॥ २२ ॥ तो गुरुत्वें अंतःकरणीं । करूनि मस्तक श्रीचरणीं । ठेवूनि शरणागतीनें वाणी । प्रकट करी तत्त्वजिज्ञासेची । ॥ २३ ॥ इत्यादि गुरुशरणागती । अर्जुन नेणे कांहींच रीती । ह्मणूनि श्रीकृपासिंधु त्याप्रती । हेंही उपदेशितो या श्लोकीं ॥ २४ ॥

॥ श्लोक ॥ तद्विद्धि प्रणिपातेन परिप्रश्नेन सेवया ।
उपदेक्ष्यंति ते ज्ञानं ज्ञानिनस्तत्त्वदर्शिनः ॥ ३४ ॥

॥ टीका ॥ तूं अर्जुनातें ज्ञान । जाण कैवल्यसुखनिधान । तें उपदेशिती कृपाघन । संते तूतें ॥ २५ ॥ संत सांगती ह्मणे परी । मीं सांगेन ऐसें न ह्मणे हरी । हें गुरुत्वलक्षण प्रकट करी । जगद्गुरु ॥ २६ ॥ कीं न येतां

१ मोक्षानंदाचें भांडार. २ साधु.

शिष्य शरण । न धरितां अनुतापें चरण । कृपा उपजली तऱ्ही आपण । मीं सांगेन ऐसें न ह्मणावें॥ २७ ॥ अन्यथा ज्ञानाचें महत्त्व । आणि गुरूचें गुरुत्व । दोहींस येथें न्यूनत्व । अहंकार वाढतो शिष्याचा ॥ २८ ॥ ज्यापासीं जें असे । तें त्याच्या अहंकारीं वसे । मी बुद्धिमंत धनवंत ऐसें । उसे मनीं धनवंतादिकांच्या ॥२९॥ सधनाशीं प्रीती । जे कोण्हीं करूं जाती । ते उगीच प्रीति केली तऱ्ही तो चित्तीं । भावी स्वधनाशेकारणें ॥१०३०॥ सुमति ह्मणे माझी मति । देखोनि हे लोक करिती प्रीती । रूपवंत ह्मणे प्रीति करिती । रूप माझें देखोनी ॥ ३१ ॥ तेही जगीं आपल्या चाडेकारणें । एकाचे जाऊनि धरिती चरण । तेथें स्वधनाद्याशा अंतःकरण । न भावी नातळे अहंकारासी ॥ ३२ ॥ हा अनादिमायानदीप्रवाह । ह्मणूनि गुरुपदवीस असावा निर्वाह । कीं कृपेनें उपजला जऱ्हीं उत्साह । तरी मज शरण ये ह्मणों नये ।। ३३ ।। कीं धनवंत ह्मणेल माझें धन । देखोनि हा कृपेचा घन । वर्षतो मजवरी जीवन । शरण आपण न जातां ॥३४ ॥ सुबुद्धि ह्मणेल माझी बुद्धी । देखोनि मजवरी कृपासमृद्धी । केली कीं आह्मांकरितां प्रसिद्धी । होणार याच्या गुरुत्वाची ॥ ३५ ॥ त्याकरितां आमचा उद्धार । परि आह्मांकरितां त्याचा बडिवार । जाला ऐसा अहंकार । पदभ्रष्ट करी शिष्यासी ॥ ३६ ॥ एवं शिष्य न येतां शरण । दाटूनि उपदेश करणें । हें अश्रद्धेस कारण । होणार ॥ ३७ ॥ याची कृपा मजवरी । होय कवणेपरी । ह्मणूनि जरी सेवा करी । तरीच करावा उपदेश ॥ ३८ ॥ आतां अधिकारी असोनी । मुमुक्षा उपजली नसेल मनीं । आणि त्यास सांगावें कृपेंकरूनी । वाटलें संतातें जरी ऐसें ॥ ३९ ॥ ज्ञानप्रशंसा बोलावी । कीं तो मोक्षाकडे चित्त लावी । आणि त्यास वाट दाखवावी । कीं जाय शरण संतांसी ॥ १०४० ॥ त्या शरणजायाच्या रीती । सांगाव्या तयास यथास्थिती । मग तो स्वयें जरी आपणाप्रती । शरण ये ॥ ४१ ॥ तरी पाहूनि सद्भाव । सांगावा ब्रह्मात्मानुभव । अतएव 'किं तद्ब्रह्म' ह्मणतां देव । उपदेश करील अष्टमाध्यायीं ॥ ४२ ॥ येथें गुरूस शरणागती । करावी कवणेरीती । तें सांगतो संतांचा पती । कीं शरणसंतांस तूं जाइं ॥ ४३ ॥ 'किं तद्विद्धि' ह्मणिजे तें जाण । तुज उपदेशितील ज्ञानी सुजाण । उपदेशितील या शब्दें खूण । सुचवी ज्ञानाधिकाराची ॥ ४४ ॥ कीं जरी कृपावंत । तरी अनधिकारियास संत । न उपदेशितां कीं ज्ञान अत्यंत । कठिण अनधिका-

रियांसी ॥ ४८ ॥ तरी तुज उपदेशिती । कीं अधिकारी ऐसें श्रीपती । मचवी परि तयांप्रती । शरण जावें कैसें तें सांगतो ॥ ४६ ॥ प्रथम प्रणिपातेंकरूनी । तें ज्ञान तूं जाण ह्मणोनी । ह्मणे कीं शरणागतीवांचूनी । न पाविजे ज्ञान ॥ ४५ ॥ शरणागतीचें लक्षण । प्रथम हें कीं आपण । कांहीं नेणे टोणपा अविचक्षण । सर्वज्ञ तूं मज उद्धरीं ॥ ४८ ॥ या भावें प्रणिपात । करावा प्रकर्षें शरीराचा निपात । तो दंडवत कीं अकस्मात । पडे जैसा टोणपा ॥ ४९ ॥ तो टोणपा ढकलितां पडों जाणे । परी पडला तो उठों नेणे । कीं मस्तकीं पद्महस्त बाणे । उठे प्रभावें तया त्या ॥ १०५० ॥ अचेतन दंड पडला । तो टोणपा सचेतनें उचलिला । तैसा जडात्मत्व जाणणार याला । उंचली कोण चिदात्मत्वें त्यावांचूनी ॥ ५१ ॥ याभावें ह्मणे श्रीहरी । कीं दंडवत होय शरणागतीनें जरी । अनन्यभावें करी । तरी ते जिज्ञासु ऐसें समजती ॥ ५२ ॥ अभयहस्तें उठविती । कृपादृष्टीं पाहती । तथापि तत्त्व न सांगती । जों स्वमुखें पुसेना ॥ ५३ ॥ यालागीं प्रश्नेंकरूनी । तें ज्ञान जाण ह्मणोनी । दुसरा प्रकार या भावेंकरूनी । सांगतो ॥ ५४ ॥ प्रश्न ऐसा कीं स्वामींचे चरण । तारूं करूनि मज भवसिंधु तरणें । यास काय शासन करणें । असेल तें मज शिष्यास आज्ञा करावी ॥ ५८ ॥ ते संत करुणाकर । परि पाहवा तुझा आदर । प्रश्नाचें देऊनि उत्तर । न करिती सद्य मुख्य उपदेश ॥ ५६ ॥ कीं जो कार्यार्थी असतो । आपलिया कार्याकारणें तो । अनन्यभावें भजतो । होणार कार्यसिद्धि ज्यापाशीं ॥ ५७ ॥ कार्योत्कंठा नाहीं मना । तो कांहीं तैसा भजेना । अजीर्णपोटीं तो अन्ना । त्वरा न करी सर्वथा ॥ ५८ ॥ क्षुधा नाहीं पोटीं । त्याचा शिथिल यत्न अन्नासाठीं । आणावया उदक फांटीं । न धांवे सर्वथा ॥ ५९ ॥ क्षुधा नसायाची खूण । समजती ऐसी निपुण । क्षुधित धांवे आपण । काष्ठादि पाकसामग्रीनिमित्त ॥ १०६० ॥ उदक ह्मणतां उंचली घट । गोवऱ्या वेंची स्वयें निपट । पाककर्ता सांगे ते खटपट । करी कांहीं न सांगतां ॥ ६१ ॥ धनार्थी धनप्राप्त्युपाय । करी चुरी दातयाचे पाय । पादरक्षा घेऊनि उभा होय । गमनाभिमुख देखतां ॥ ६२ ॥ लौकिकक्षुद्रकाम । तेथ ऐसा सादर सकाम । ज्या ज्ञानें होय पूर्णकाम । तदर्थ काय न करावें ॥ ६३ ॥ अनुतापें मनीं मुमुक्षा । ज्ञानाची अति अपेक्षा । सेवेंत त्याची परीक्षा । संत करिती ॥ ६४ ॥ या भावें ह्मणे हरी । कीं प्रणि-

पात प्रश्न करिसी परी । जों न करिसी सेवा बरी । तों ज्ञान न उपदेशिती तुज संत ॥ ६५ ॥ सेवा करावी सादर । नीच सेवेसी तत्पर । वैभव असोनिही स्वशरीर । सेवेसी लावावें तयांच्या ॥६६॥ श्रमसाध्यकामीं आळस । धन वेंचितां कुसमुस । नसे आणि परम उल्लास । सेवेंत ज्याला ॥ ६७ ॥ त्यांत त्याची मुमुक्षा। ज्ञानाची अत्यंत अपेक्षा । ओळखोनि मग त्या दक्षा । ते ज्ञान उपदेशिती ॥ ६८ ॥ या भावें ह्मणे अर्जुना । निष्कपट सेवेनें त्यां करुणाघना । सेवूनि घे ज्ञानजीवना । त्यांपासूनी ॥ ६९ ॥ एवं साधक ऐसा असावा । कीं करी प्रणिपात प्रश्न सेवा । आतां जे उपदेशिती ब्रह्मात्मभावा । ते कैसे ॥ १०७० ॥ शास्त्रें जाणती सकळ । अद्वैत बोलती प्रांजळ । अनुभव पुसतां केवळ । तोंड वांसिती ॥ ७१ ॥ कीं हें बोलावेंचि अद्वैत । अनुभव कोणा ठाउका निश्चित । अनुभवप्रश्न उचित । नव्हे ऐसा ॥ ७२ ॥ आतां असोनि ही अनुभव । ज्यास नाहीं शास्त्रवैभव । ते चुकविती आपुला पुनर्भव । परि उद्धरूं न शकती मुमुक्षूतें ॥ ७३ ॥ शिष्यसंदेह न शके हरूं । तो अनुभवी ही न ह्मणवे गुरू । कल्पिले पदार्थ नेदी तरू । तो कल्पतरु कैसा ह्मणावा ॥ ७४ ॥ ह्मणोनि शास्त्रिज्ञ आणि अनुभवी । साजे त्याला गुरुत्वपदवी । तोचि जगद्गुरु गोसांवी । की शास्त्रज्ञ आणि अनुभवी परिपक्क ॥ ७५ ॥ अनुभवशास्त्रावांचूनी । कधीं न घडेच ह्मणोनी । येथें शास्त्राभिमानी । बोलती ऐसें ॥ ७६ ॥ परि स्त्रिया आणि शूद्र नर । त्यांस वेदीं नसोनि अधिकार । ज्ञानीं असे अधिकार हा निर्धार । वेदशास्त्रपुराणांचा ॥ ७७ ॥ तेव्हां वेदाध्ययन । नसोनि ही पावती ज्ञान । मोक्ष पावती स्त्रीशूद्रजन । तैसेच कोण्ही ब्राह्मण ही ॥ ७८ ॥ ब्रह्म न कळे जयां । वेदार्थ ठाउका नाहीं तयां । वेदचि बोलती या । अर्थासी ॥ ७९ ॥ तेंचि अधिकार ज्ञानीं । स्त्री शूद्रांस आहे ह्मणोनी । वेद बोलती दोहीं वचनीं । एकवाक्यता ऐसी ॥१०८०॥ संन्यासी उत्तमांत । रजस्वला स्त्री अधमांत । यांस अधिकार नाहीं हात । पाकक्रियेसि लावावया ॥ ८१ ॥ परि रजस्वला आणि संन्यासी । सिद्धान्नीं अधिकार यांसी । ऐसा अधिकार वेदीं स्त्रीशूद्रांसी । नसोनि ज्ञानीं असे अधिकार ॥ ८२ ॥ परंतु पाकक्रिया करणार । आणि आयतें जेवणार । तृप्ति सर्वांची एकप्रकार । ब्रह्मानुभव तैसा ॥ ८३ ॥ अनुभवासि ज्ञान कारण । तेथें सम स्त्रीशूद्र ब्राह्मण । थोरपण क्षुद्रपण । परोपदेशीं निवडतें ॥ ८४ ॥ बहुतां जनांकारणें । प्राप्त

जालें पाक करणें । संन्यासी आणि रजस्वला अधिकाराविणें । तेथें न सरती ॥८५॥ तैसा करावया जनांचा उद्धार । स्त्रीशूद्रांसि नसे अधिकार । कीं विना वेदशास्त्रपरिहार । न करूं शकती संशयाचा ॥८६॥ तैसाच शास्त्राविण। जर्‍ही अनुभवी जाला ब्राह्मण। न साजे त्याला गुरुपण । कीं शिष्यसंदेह न हरी ॥ ८७ ॥ त्यांतही गुरुसेवातत्पर । गुरूच साक्षात्सर्वेश्वर । ऐसें मानूनि जे सादर । सेविती श्रीगुरूतें ॥८८॥ त्यांस सच्छास्त्रपठण । नसोनि ही होय सर्वशास्त्रज्ञान । कीं श्रीगुरूचें मन। प्रसन्न जालें त्यांवरी ॥ ८९ ॥ श्रीगुरूच्या कळा । यत्न न करितां पात्रे सकळा। अंजन घालितां डोळां । पदोपदीं निधानें ॥ १०९० ॥ किंबहुना ऐकलव्य या नांवें । जातीचा कोळी ही भक्तिभावें । गुरुप्रतिमापूजाप्रभावें । रहस्यविद्या गुरूची पावला ॥ ९१ ॥ हे आदिपर्वी भार्गवीं कथा । विस्तारितां वृद्धि होणार या ग्रंथा । एवं गुरुशुश्रूषा सर्वथा । गुरुसामर्थ्य संपादी शिष्यातें ॥ ९२ ॥ परंतु गुरु असावा भला । तरीच भलेपण प्राप्त होय शिष्याला । बौद्ध गुरु सद्भावें सेविला । तरी प्रौढ बौद्धचि होणार ॥ ९३ ॥ त्याची धरावी संगती । तो जाईल ज्या गांवांप्रती । त्याचे आश्रितही पावती । त्याच गांवांसी ॥ ९४॥ वेदविरुद्ध अनुष्ठान । तेंचि नरकाचें साधन । त्या गुरुसंगतीनें शिष्यजन । जाती तया नरकासी॥९५॥ एवं गुरु असेल जैसा । शिष्यही होईल तैसा । गुरुविश्वास तरीतो ऐसा । समजोनि गुरु करावा बाबाहो ॥९६॥ याकारणें गुरू । अनुभवसुखाचा कल्पतरू । वेदजंबुद्वीपाचा मेरू । तोचि सेवावा ॥ ९७ ॥ त्यांत कोणास अनुभवमात्र । कोण्हांस अनुभव ही शास्त्र। गुरुसेवेनेंचि दोन्ही नेत्र । प्राप्त होती ॥९८॥ एवं अनुभवी आणि शास्त्रज्ञ । तोचि गुरू सर्वज्ञ । शास्त्र नसोनि ही शास्त्ररहस्याभिज्ञ । तोही योग्य गुरुत्वासी ॥ ९९ ॥ कीं शिष्याचे संदेह । निरसूनि करी निःसंदेह । शास्त्र न पढोनिही निर्वाह । करी शिष्यप्रश्नाचा ॥ ११०० ॥ एवं शास्त्र आणि अनुभव । जेथें उभयरूप वैभव । तोचि देवाधिदेव । गुरुत्वें वरावा ॥१॥ या भावें संतांचा पती । जगद्गुरू ह्मणतो अर्जुनाप्रती । कीं तें ज्ञान तुज उपदेशिती । ज्ञानी आणि तत्त्वदर्शी जे संत ॥२॥ ज्ञानी ह्मणिजे शास्त्रज्ञ । तत्त्वदर्शी तत्त्वाचे अनुभवी अभिज्ञ । ते तुज उपदेशिती ह्मणे सर्वज्ञ । ज्ञान तें ॥ ३ ॥ आतां यानंतरें श्लोक । तो कां बोले उत्तमश्लोक । त्याचें निमित्त अभिज्ञलोक । परिसोत अनुसंधानाकारणें ॥ ४ ॥ पूर्वी ज्ञानाचा बडिवार ।

बोलिला तदर्थ प्रकार । गुरुशरणागतीचा विचार । जगद्गुरु पूर्वश्लोकीं बोलिला ॥ ५ ॥ प्रसंगें गुरुलक्षण । पूर्वश्लोकींच कमलेक्षण । बोलिला परि गुरुपरीक्षण । लागेल शिष्या ॥ ६ ॥ तरी शास्त्रज्ञता यथामती । ओळखेल परंतु अनुभवस्थिती । शिष्यासि कळे कवणेरीती । अंध केंवी जाणे डोळे डोळसाचे ॥ ७ ॥ अंध डोळ्यांकारणें । डोळसा वैद्यासि गेला शरण । तो डोळे देतां डोळसपण । सहजचि त्याचें दृष्टी पडेल ॥ ८ ॥ जो शिष्याचा अनुभव । तेंचि श्रीगुरूचें वैभव । ह्मणोनि तें ज्ञानलक्षण अभिनव । सांगतो आतां या श्लोकीं ॥ ९ ॥

॥ श्लोक ॥ यज्ज्ञात्वा न पुनर्मोहमेवं यास्यसि पांडव ।
येन भूतान्यशेषाणि द्रक्ष्यस्यात्मन्यथो मयि ॥ ३५ ॥

॥ टीका ॥ जें ज्ञान जाणोनि पांडवा । पुन्हा या मोहा देहात्मभावा । न पावसी कीं मज ईश्वराच्या अनुभवा । पावसील ॥ १११० ॥ कीं ज्या ज्ञानें चराचरें । जडें भूतें तूं एकसरें । आत्मस्वरूपीं देखसी जव्हां तूरें । ऐक्यें मजमाजी देखसी आपणा ॥ ११ ॥ श्लोकार्थ इतकाच ऐसा । परि वेदवेदांताचा आरसा । नक्षत्रांसहित चंद्र जैसा । दिसे मदीवरीलें दर्पणीं ॥ १२ ॥ श्लोकाच्या पूर्वार्धीं व्यतिरेक । उत्तरार्धीं कीं अनेक । ऐक्यें पाहणें हें कौतुक । अन्वयज्ञानाचें ॥ १३ ॥ व्यतिरेक आणि अन्वय ह्मणोनी । ब्रह्मविद्येचीं रूपें दोन्हीं । आवरण आणि विक्षेप या दों नांवेंकरूनी । दोनी रूपें अविद्येचीं ॥ १४ ॥ आपणास आपण । मेण हें अविद्येचें रूप आवरण । जैसें न कळतां दोराचें दोरपण । सर्प भासे ॥ १५ ॥ स्वप्रकाश आत्मा स्वयें । आपण ह्मणे देह इंद्रियें । हें अविद्यावरण नासे निश्चयें । साक्षात्कारें आत्मस्वरूपाच्या ॥ १६ ॥ देहावेगळें स्वस्वरूप । कळणें हें व्यतिरेकरूप । देहादिविश्वास अविद्याविक्षेप । नासे अन्वयज्ञानें करूनी ॥ १७ ॥ आधीं व्यतिरेक वाणे । तेव्हां अन्वयज्ञानातें जाणें । कीं जों वेगळा तंतु नेणे । तंतुपटअन्वय कळेना ॥ १८ ॥ ह्मणोनि पूर्वार्धीं प्रथम । अर्जुनातें ह्मणे पुरुषोत्तम । कीं पूर्वी शास्त्रज्ञ अनुभवी तुज उत्तम । ज्ञान उपदेशिती तें ऐसें ॥ १९ ॥ कीं जें जाणोनि पुन्हां । ऐसा मोह पावेसिना । आतां जैसा अर्जुना । मोहलासि देहात्मतेनें ॥ ११२० ॥ कीं मी पंडुसुत । भीष्मादि आजे चलते भाऊ माझे निश्चित । मी मारणार हे मरणार ऐसे अत्यंत । देहात्मत्वें पांडवा मोहलासी ॥ २१ ॥ ह्मणोनि इत्यादि भावें । पांडवा ह्मणूनि या

नांवें । आळविलें अर्जुनातें देवें । या श्लोकीं ॥२२॥ हें मोहाचें रूप केलें । कीं पांडव नांवें जेव्हां आळविलें । व्यतिरेक ज्ञानें दाविलें । निरसन याचें ॥२३॥ कीं जें ज्ञान जाणोनि पुन्हा । ऐसा मोह तूं पावेस न । कीं हा देहाविगळ्या जगज्जीवना । देहादिसाक्षित्वें ओळखसी ॥ २४ ॥ होतां हा व्यतिरेकानुभव । कैंचा पंडु कैंचा पांडव । जडाभिमानाचें तांडव । मग ऐसें न करिशी ॥ २५ ॥ हा जडचैतन्यविवेक । पूर्वार्धीं सूचविला व्यतिरेक । आतां एकीं एकत्वें अनेक । पाहणें हा अन्वयबोध उत्तरार्धीं ॥ २६ ॥ ज्या ज्ञानें पंचभूतें । आणि पंचभूतांचीं शरीरें बहुतें । चतुर्दशभुवनें ईश्वरासहितें । आत्मस्वरूपीं देखसी ॥ २७ ॥ अशेष देखसी म्हणता । ब्रह्मांडा सावरणा सहिता । सुचविलें जडा सर्वभूतां । चतुर्दशभुवनांसहित ॥२८॥ आत्मयासि देखसी म्हणतां । आत्मयावांचूनि त्या जडां भूतां । कोण जाणेल त्या प्रकाशरहितां । जडांतें ॥ २९ ॥ जडां भूतांची खूण । प्रत्यया न ये आत्मयाविण । आत्मयास आत्मयावांचूनि कवण । आणी प्रत्यया॥११३०॥ तंतुवांचूनि पट । अनुभवा न ये निपट । मातीवांचूनि घट । स्वयें दिसेना ॥ ३१ तरंगां उदकाविण । मृगजळ विना किरण । कीं सर्पाभासाची खूण । कळेल दोरावाचूनी ॥ ३२ ॥ एक दिसतो दोरावरी । एक निघे वारुळाबाहेरी । तो वारुळांतील स्वयें दिसे परी । दोरावरील दोराविण दिसेना ॥ ३३ ॥ दों सर्पांत कोण खरा । कोण लटिका हा त्ररा । विचार करितां चतुरा । सत्यत्व मिथ्यात्व उमजे ॥ ३४ ॥ वारुळींचा सर्प सत्य । दोरावरील असत्य । एवं मिथ्यात्व त्यास साधे अगत्य । जें दिसे आश्रयें एकाच्या ॥ ३५ ॥ एकाकारितां दिसे । आणि तें सत्य असे । ऐसा एक पदार्थ नसे । चराचरीं ॥३६ ॥ एवं दोरीं दोराच करितां दिसे । तो नसोनि दोरीं वसे । तेव्हां कालत्रयीं रज्जूच असे । सर्पाकारही रज्जूच ॥ ३७ ॥ तैसें आत्मयांत अशेष । अर्जुना देखसी भूतांचे विशेष । ब्रह्मांडासहित विराटपुरुष । आत्माच तुझा ॥ ३८ ॥ तूं आत्मा तुजवीण । प्रकाशील जड भूतांश कवण । या अनुभवें बाणेल जाण । कीं जडप्रकाशकचि मी सर्व ॥ ३९ ॥ एथें कोण्हीं म्हणती । कीं विना सूर्यचंद्राग्नि ज्योती । चराचरें न दिसती । तरी ऐक्य तयां कां घडेना ॥ ११४० ॥ याचें उत्तर श्रीपती । पंचदशीं अर्जुनाप्रती । देईल परि येथें ही किमपि रीती । न बोलतां राहेल । संदेह ॥ ४१॥ कीं शब्द स्पर्श रूप रस गंध पांच । मिळोनि अवघा प्रपंच ।

त्यांत एक रूप मात्र दिसतें साच । नेत्रांस सूर्यादिकां करितां॥ ४२ ॥ शब्द स्पर्श रस गंध । इंद्रियांस यांचा संबंध । अंधकारींहि घडे आणि अंध । नेत्रही नव्हती अंधकारीं ॥ ४३ ॥ पदार्थांचें रूपचि न दिसे । परि अंधकार तो दिसतसे । सूर्यादि तेजावांचूनि कैसे । न प्रकाशती ह्मणावे नेत्र ॥ ४४॥ आतां सूर्य नेत्राभिमानी । नेत्रीं असेच ह्मणोनी । पूर्वपक्ष कोण्ही कोरूनी । काढिती एथें ॥ ४५ ॥ तरी दिग्देवता कानीं । अश्विनीसुत प्राणीं वरुण रसनीं । तैसाच सूर्यही नयनीं । आत्मया एकावांण व्यर्थ सर्व ॥ ४६ ॥ दृष्टांत एकदेशी । तथापि अर्थसिद्धि ऐसी । कीं इंद्रियें दैवतें शवें जैसीं । आत्मयावीण ॥ ४७ ॥ नेत्रीं प्रकाशक रवी । तरी रात्रीं दीप कांहो रूप दावी । रसनेसही रस चाखवी । हस्त ऐसेंही ह्मणावें ॥ ४८ ॥ फणसास लागे रसना । तो आड त्वचा ते आंतील रस देना । हातें त्वचा काढितां मना । रसनाद्वारा रस कळे ॥ ४९ ॥ रसनेंत रसनाभिमानी । वरुण आधिदैवत असोनी । फणसरस हातें करूनी । कळला त्वचा आडील काढितां ॥ ११५० ॥ तैसा नेत्राभिमानी । सूर्य नेत्रीं असोनी । अंधकाराचा पडदा दीपें करूनी । निघतां रूप नेत्रीं देखिलें ॥५१॥वस्त्र झांकिलें ज्या रूपावरी । तें रूप न दिसे परी । वस्त्र दिसे ऐसेपरी । रूप न दिसे परि दिसे अंधार ॥ ५२ ॥ वस्त्र काढिती कर । अंधकार सूर्य चंद्र वैश्वानर । जैसा अंधार तैसें आड अंबर । सूर्यचंद्रवैश्वानरकर तैसे ॥ ५३ ॥ नेत्र प्रकाशका ज्योती । हे गोष्टी ही अपुरती । एवं जडें सर्वथा न प्रकाशती । आत्मसत्तेवांचूनी ॥ ५४ ॥ ज्या तत्त्वें तत्त्वें जडें । प्रकाशती तें सत्रायांतर उघडें। तंतूस झांकील लुगडें । घडे काय ॥ ५५ ॥ एवं सोनियांत अलंकार । कीं झाडाच्या खोडावरी पुरुषाकार । कीं शिंपींत रुपें ऐसीं भूतें चराचर । अर्जुना देखसीं आत्मयांत ।। ५६ ॥ तत्त्वदर्शी संत तूतें । उपदेशिती त्या ज्ञानातें । पूर्वश्लोकीं बोलिलों आपणातें । अनुभवीं लक्षण कळे तयांचें ॥५७॥ अगा यातेंचि ह्मणावें ज्ञान । आणि तेंचि गुरु कीं जें हें स्वजीवन । शिष्यास देती अनंत धन । जें न वेंचे देतांही कदापी ॥ ५८ ॥ अगा ऐसे अनुभवी नर । ते नर ह्मणावे ईश्वर । अतएव स्वानुभवें चतुर । शिष्य ईश्वर ह्मणती गुरूसी ॥ ५९ ॥ कीं ते ईश्वरीं आपण । भिन्न नसों ऐसे निपुण । देखती तेव्हां ईश्वरपण । ओळखती गुरूचें॥११६०॥ याभावें सर्वेश्वर । ह्मणे अर्जुना जेव्हां चराचर । आपणांत देखसी चतुर । होसी अ-

नुभवी ॥ ६१॥ मग यानंतर । जो मी श्रीकृष्ण परमेश्वर । मजमाजी ऐक्यें निरंतर । देखसी आपणा॥ ६२ ॥ कीं विश्व ब्रह्मांडासहित । आणि ब्रह्मांडाचीं आवरणें सात । हीं भूतें देखसी आत्मयांत । पुढें आत्माचि देखसी ॥ ६३ ॥ ऐशा ब्रह्मांडाच्या कोटी । माझ्या साक्षित्वाच्या पोटीं । मी त्या सर्वांत जैसा पटीं । एक तंतु ॥ ६४ ॥ हें माझें वैभव । तुज याचा होतां अनुभव । मग मजशीं ऐक्याचें अभिनव । काय असे ॥ ६५ ॥ ब्रह्मांडकोटीचे कल्लोळ । ज्या चित्समुद्रीं तो केवळ । तूं स्वयें ऐसा प्रांजळ । अनुभवी होसी जेधवां ॥ ६६ ॥ मग माझ्या एकपणीं । कोण गोष्टी असे उणीं । कीं मीही स्वस्वरूपीं निर्गुणीं । ब्रह्मांडकोटी देखतों ॥ ६७ ॥ आतां सृष्ट्यादिरचना । आणि सर्वज्ञत्वादि अर्जुना । ह्मणसी हें कां मज येना । सामर्थ्य तुझें ॥ ६८ ॥ तरी अगा एकी डाहाळी । वृक्षाची लवली फळीं । एकीस थोडीं फळें ह्मणोनि वेगळी । ह्मणवेल काय ते शाखा ॥६९॥ अगा अविद्या मालवली । वेगळीक तेव्हां बोळवली । माझ्या अनुभवें केळवली । बुद्धि जेव्हां॥११७०॥ एवं मजशीं ऐक्य तेधवां । कीं स्वस्वरूपीं सर्व भूतें जेधवां । दिसती तुज पांडवा । तरंग जैसे समुद्रीं ॥७१॥ पूर्वोक्त संतांचा अनुभव । तेव्हां कळेल कीं माझें वैभव । त्यांच्या प्रसादें अभिनव । अनुभविसी जेधवां ॥ ७२ ॥ तेव्हां तूं चतुर । त्यांस ह्मणसीच ईश्वर । परि आदीं शरण जावें सादर । शास्त्रदृष्टीं ईश्वरत्वें ॥ ७३ ॥ आतां यानंतर श्लोक । किमर्थ बोले उत्तमश्लोक । त्याचें निमित्त सुज्ञलोक । परिसोत अनुसंधानाकारणें ॥ ७४ ॥ ऐसी ज्ञानाची प्रशंसा । आयकोनि ही भाव ऐसा । उमजे कीं चरण शिरसा । वंदूनि मागावा तो प्रसाद ॥ ७५ ॥ कीं भीष्मादिवधीं दोष । तुज नाहीं ऐसें परमपुरुष । बोलिला तऱ्ही कर्म या किल्बिष । वाटेच मागुतीं अर्जुना ॥ ७६ ॥ भीष्मादिवधाचें पाप । कैसें चुके हाचि संताप । आयकोनि ही ज्ञानदीप जिज्ञासा धरीना ॥ ७७ ॥ पाप नव्हे ह्मणोनी । पूर्वी पाहिलें बोलोनि । परि ते गोष्टी मनीं । धरिली च नाहीं ॥ ७८ आतां हें पापही जऱ्ही होणार । तऱ्ही या ज्ञानेंचि नाशणार । ऐसा करोनि अर्धांगीकार । पापपरिहार बोलों पाहतो ॥ ७९ ॥ ज्ञानें क्रियमाणें न लिंपती । आणि संचितें भस्म होती । या पूर्वी बोलिल्या जरी रीती । या प्रसंगीं पुन्हां बोलतो ॥ ८० ॥ कीं उत्तम तत्त्वविचार । बोलावा वारंवार । यास ह्मणती शास्त्रकार । अभ्यास ह्मणोनी ॥ ८१ ॥

कीं 'तत्त्वमसि' हे श्रुती। नऊवार श्वेतकेतूप्रती। उपदेशिली परि प्रसंगरीती। वेगळाल्या ॥ ८२ ॥ भीष्मादिवधें पाप। अर्जुनास वाटे अनुताप। तो हराव्या पूर्वोक्त ज्ञानप्रताप। प्रकारांतरें बोलतो दों श्लोकीं ॥ ८३ ॥ क्रियमाणाचा नव्हे लेप। आणि जळे संचित पाप। त्यांत क्रियमाणलेप नव्हे हें रूप। आधीं बोलतो या श्लोकीं ॥ ८४ ॥

श्लोक ॥ अपि चेदसि पापेभ्यः सर्वेभ्यः पापकृत्तमः।
सर्वं ज्ञानप्लवेनैव वृजिनं संतरिष्यसि ॥ ३६ ॥

॥ टीका ॥ अगा तूं पातकी जरी केवळ। होसी हें क्रियमाण मानूनि ओंगळ। तरी तो पापसागर सकळ। तरसी नावेनें या ज्ञानाचिया ॥ ८५ ॥ पृथ्वीवरील पापी। त्याहूनि थोर तूं होसील तथापी। या ज्ञाननावेनें कदापी। न बुडतां तरसी समुद्र पापाचा ॥ ८६ ॥ जरी थोर पापी होसी। तरी बरे रीतीं पापाब्धि तरसी। गोष्टी बोलतां ऐसी। क्रियमाण सुचवी दृष्टांतें ॥ ८७ ॥ कीं कर्म करीत असावें। आपणास अकर्त्रात्मत्वें पाहावें। नखही ओलें न व्हावें। त्या जळें पापाचिया ॥ ८८ ॥ जो बसे बळकट नावे। त्याच्या नखासही उदक न शिवे। कीं वृत्ति कधीं न उद्भवे। अहंकर्तृतेची ॥ ८९ ॥ नावेंत जो बैसे। त्यास सर्वत्र जळ दिसे। ज्ञानी क्रियमाणीं तरती ऐसे। कीं कर्तृत्व न स्पर्शोनि[1] कर्म आचरती ॥ ११९० ॥ जे ज्ञाननावेनें तरती। त्यांस अन्य प्रायश्चित्तीं। अधिकार नाहीं कीं गंगातटीं[3] वसती। ते कां जाती तीर्थांतरां[4] ॥ ९१ ॥ ज्ञानियास अन्य उपाय। ते जाणावे अपाय। तो पापसमुद्र[2] तरोनि जाय। ज्ञानेंचि ॥ ९२ ॥ आतां अर्जुना हें तरणें किती। अरे कोटिजन्में संचितें जळती। ह्मणूनि ह्मणतो संतांचा पती। या श्लोकें ॥ ९३ ॥

॥ श्लोक ॥ यथैधांसि समिद्धोऽग्निर्भस्मसात्कुरुतेऽर्जुन।
ज्ञानाग्निः सर्वकर्माणि भस्मसात्कुरुते तथा ॥ ३७ ॥

॥ टीका ॥ अर्जुना जैसीं काष्ठें। ओलीं कोरडीं यथेष्टें। पेटला अग्नि अवशिष्टें। न उरवी करीत्र भस्म ॥ ९४ ॥ तैसा जो ज्ञानाचा अनळ। पेटला होतां अभ्यासबळ। तो पापपुण्यरूप सकळ। भस्म करी कर्में संचितें ॥ ९५ ॥ या दों श्लोकीं द्विविध पाप। त्यांत एका पापाचा नव्हे लेप। दुसरें संचित जळे प्रताप। द्विविध श्लोकीं ज्ञानाच्या ॥ ९६ ॥ येथें बोलती

1 स्पर्श. 2 पापसमुद्र. 3 नदीच्या तीरीं. 4 दुसऱ्या तीर्थांस.

कितीएक । कीं पूर्वश्लोकीं तरती पातक । हें बोलोनि सशंक । होऊनि दुसरा दृष्टांत बोलिला या श्लोकीं ॥९७॥ कीं तरला समुद्रनीर । परि उरला असे सागर । तैसें पापही अपार । उरलें हा अर्थ होतो या दृष्टांतें ॥ ९८ ॥ यालागीं दुसरा श्लोक । बोलिला श्रीवत्सांक । कीं ज्ञानाग्नींत जळतें पातक । ह्मणोनी ॥ ९९ ॥ हाही अर्थ बरा । परंतु सर्वेश्वरा । अयोग्य दृष्टांत बोलोनि दुसरा । योग्य दृष्टांत बोलणें कां लागे ॥ १२०० ॥ वक्ता सर्वज्ञशिरोमणि । आणि मिळाली अणीसें अणी । ते समयीं बोलोनि अयोग्य वाणी । दुसरिया श्लोकीं सांवरी हेंचि अयोग्य ॥ १ ॥ आतां यानंतर श्लोक । कां बोले उत्तमश्लोक । त्याचें निमित्तहि सुज्ञलोक । परिसोत ॥२ ॥ " सर्वं ज्ञानप्लवेनैव " । ह्मणुनि पूर्वश्लोकीं देव । दाखवी ऐसा भाव । एवं शब्दीं ॥ ३ ॥ कीं ज्ञानेंचि ज्ञानी तरे । इतर उपाय नव्हती बरे । गंगावासी तीर्थें फिरे । मूर्ख जैसा ॥ ४ ॥ ज्ञानामृताचें पान । करूनि कर्मकांजीचें ध्यान । करी तेव्हां तोहि अज्ञान । ह्मणावा कीं ॥ ५ ॥ एवं पापनाशकें बहुतें । शास्त्रीं बोलिलीं प्रायश्चित्तें । परमपवित्रें अद्भुतें । परि सरी नये ज्ञानाची ॥ ६ ॥ पवित्राहूनि पवित्र । आणि सुलभत्व अति विचित्र । ह्मणूनि बोलतो कमलनेत्र । आतां या श्लोकीं ॥ ७ ॥

॥ श्लोक ॥ नहि ज्ञानेन सदृशं पवित्रमिह विद्यते ।
तत्स्वयं योगसंसिद्धः कालेनात्मनि विंदति ॥३८॥

॥ टीका ॥ अगा वेद आणि वेदाश्रितें । धर्मशास्त्रेंही बहुतें । बोलती प्रायश्चित्तें । पवित्रें नाना ॥ ८॥ परंतु या श्रुतिस्मृतींच्या अन्वयांत । ज्ञानासारिखें अत्यंत । पवित्र कांहीं नसे निश्चित । अर्जुना ॥ ९ ॥ अगा हस्तीस भरलें जळीं । तो पाण्यांतही चांचपे धुळी । तीरास येतां कवळी । धुळी शुंडाग्रेंकरूनी ॥ १२१० ॥ ऐसें शुद्धिनिमित्त । केलें जरी कर्मप्रायश्चित्त । तथापि पापीं प्रवर्ते चित्त । पुनःपुन्हा ॥ ११ ॥ ज्ञान कर्माचीं मुळेंचि तोडी । सोडवी चित्ताच्या अनादि खोडी । लावूनि ब्रह्मसुखामृताची गोडी । कंटाळा आणी विषयकांजीचा ॥ १२ ॥ क्रियमाण कोणे काळीं । स्पर्शों नेदी आणि संचितें जाळी । अहंकर्तृत्वाच्या विटाळीं । ओंवळें होऊं नेदी मनातें ॥ १३ ॥ नाहीं नाहीं नाहीं । ज्ञानासारिखें पवित्र कांहीं । संसारदुःखसरिताप्रवाहीं । तारूं न असे यासारिखें ॥ १४ ॥ गंगा पवित्र परी ।

१ श्रीकृष्णास टोक. २ टोकास टोक. ३ पेज. ४ गृहण करी; मारी.

पापमात्रातेंचि संहरी । आणि पुण्यसुवर्णशृंखळी करी । दृढ अत्यंत ॥१५॥ गंगा क्रियमाणें न टाळी । आणि संचितें म जाळी । पापमात्राची करी होळी । एकाच जन्माचिया ॥१६॥ तेही पाप नाशी परी । ते गंगा देशांतरीं । जे वसती तीरीं । दुरी कांहीं तयांसही ॥ १७ ॥ तैसें नव्हे हें ज्ञान । अंगा जे जे इच्छिती जिज्ञासुजन । ते स्वयेंचि तें कैवल्यधन । पद परम साम्राज्याचें ॥ १८ ॥ राज्यभ्रष्ट राजा स्वप्नीं । मी राजा कधीं होईन ह्मणोनी । तळमळ करीत होता मनीं । जागृत होतां स्वयें तोचि सार्वभौम ॥ १९ ॥ पवित्रां सर्वांहूनि पवित्र । आणि सुलभ तरी अतिविचित्र । कीं दूरी नसे अणुमात्र । जो जाणे तो स्वयेंचि तें ज्ञान ॥१२२०॥ 'तत्स्वयं' ह्मणोनी । श्रीकृष्ण या वचनीं । हा अर्थ बोले कीं ज्ञानी । स्वयेंचि तें ज्ञान ॥ २१ ॥ ऐसें तें स्वयें स्वस्वरूप परी । चित्तास अज्ञानेंकरूनि होतें दुरी । दृष्टीस सर्प भासतां दोरीं । दोर नसे असोनि दृष्टींत ॥ २२ ॥ तो कळला जरी स्वात्मदोर । अनाद्यहंकार सर्पसंस्कार । क्षण विसरतां तो अहंकार । सर्प होय आत्मा रज्जूंत ॥ २३ ॥ ह्मणूनि करावा अभ्यास । लक्षावें निरहंकारस्वरूपास । आणि देहावेगळें आपणास । साक्षित्वें पाहावें सर्वदा ॥ २४ ॥ हा व्यतिरेकअभ्यास । दुसरा अन्वयाचा विलास । कीं स्वात्मकिरणीं जडला लाभास । आत्मकिरणत्वेंचि लक्षावा ॥ २५ ॥ तंतूनें स्फुरे पट । तो पट तंतूचि निपट । मातीवेगळा कैंचा घट । आत्माचि जड जग सकळही ॥ २६ ॥ या जडचैतन्यअन्वयें । जड नसे चैतन्यचि असे या निश्चयें । सर्वभूतीं नांदतो आपण स्वयें । जडतरंगीं चित्समुद्र ॥ २७ ॥ आपली बुद्धि आपलीं इंद्रियें । त्या मृगजळीं किरण स्वयें । तैसाचि शब्दादिविषयांतही निश्चयें । आपणासि आपणचि लक्षावें ॥ २८ ॥ पाचां विषयांचा प्रपंच । त्यास जाणती इंद्रियें पांच । हे मृगजलप्राय होती अहाच । स्वात्मकिरण पाहतां यामाजीं ॥ २९ ॥ हे उभय प्रकार योग । उभयत्र चित्तचैतन्यसंयोग । बहुत काल या अभ्यासें वियोग । होय अज्ञानसंस्काराचा ॥ १२३० ॥ यालागीं ह्मणतो सर्वेश्वर । कीं जो योगसंसिद्ध नर । कालेंकरूनि त्यास विसर । पडतो पूर्वसंस्काराचा ॥ ३१ ॥ तेव्हां बोणलें ह्मणात्रें ज्ञान । सांपडोनि जतन जालें स्वधन । सर्प न वाटतां निर्भय मन । स्वात्मरज्जूच्या दृढाभ्यासें ॥ ३२ ॥ जेव्हां चित्त

१ पुण्यरूप सोन्याची बेडी. २ निखालस. ३ उसलें. ४ रक्षण.

स्वरूपीं जागे । जडां जड प्रकाशातें पाहों लागे । अनायासें चित्त वागे । आत्मतंतुदृष्टी जडपटीं ॥ ३३ ॥ तेव्हां प्राप्त जालें निश्चयें । जरी तें ज्ञान हा आहे स्वयें । ह्मणोनि बोलिलें अद्वयें । कीं योगसंसिद्ध कालें तें पावे ॥ ३४ ॥ आतां ज्ञान चित्तेंकरूनी । तें चित्त आत्मा नव्हे ह्मणोनी । ज्ञान तें स्वयें ज्ञाताचि या वचनीं । संशय उपजेल ॥ ३५ ॥ याकारणें ह्मणतो हरी । कीं तें ज्ञान बिंबतें चित्ताच्या अंतरीं । कीं चित्त नव्हे तें ज्ञान परी । चित्तामाजी चित्तेंचि कळतसे ॥ ३६ ॥ तेव्हां चित्तासि वेगळेपण आलें । ज्ञान चित्तापासूनि भिन्न जालें । तथापि तें निर्धर्म उगलें । चित्तावीण नये प्रत्यर्थासी ॥ ३७ ॥ अंधकार अग्नीनेंचि नासे । परि काष्ठादिविना स्वयें न दिसे । तैसा चित्तावांचुनि न गवसे । आत्मप्रत्यय आत्मयाचा ॥ ३८ ॥ काष्ठ जाळितां काष्ठीं दिसे । तरी प्रकाशक अग्निच असे । तैसें चित्त प्रकाशितां चित्तीं गवसे । तें ज्ञान स्वस्वरूपरूप ॥३९॥ ज्ञाताचि तो जैसा ज्ञेय । ज्ञाताचि ज्ञानही हा निश्चय । कीं त्रिपुटी गिळून अद्वय । आत्मा स्फुरे तें ज्ञान ॥ १२४० ॥ यालागीं तें ज्ञान । स्वयें ह्मणे मधुसूदन । ज्ञान एथें आत्माचि चिद्घन । श्रीकृष्ण ऐसें बोलिला ॥ ४१ ॥ कोणी ह्मणती ऐसें । कीं स्वयमेव ह्मणिजे अनायासें । तें ज्ञान पावे ह्मणोनि श्रीनिवासें । या भावें बोलिलें स्वयमेव ॥ ४२ ॥ आतां हा अर्थ नव्हे सिद्ध । कीं तें ज्ञान पावे योगसंसिद्ध । ऐसें बोलिले प्रसिद्ध । ह्मणोनि हेंहि तदनुकूल वाखाणिती ॥४३॥ कीं एथें जो बोलिला योग । तो ह्मणावा कर्मयोग । तो करितां कर्मयोग-प्रयोग । सिद्ध होता ह्मणिजे पावतो योगत्व ॥ ४४ ॥ मग तो योगसंसिद्ध । अनायासें ज्ञानें होतो सिद्ध । ऐसेंही कोणी प्रबुद्ध । बोलती ॥ ४५ ॥ तरी कर्मयोगें सिद्ध जाला । गुरुशरणागती लागेच त्याला । प्रणिपात प्रश्न सेवा जयाला । प्रस्तुतींच या प्रकरणीं बोलिली ॥ ४६ ॥ या प्रकारें तो अर्थ । विचारितां होतो व्यर्थ । कीं यत्नाविणें स्वयें कृतार्थ । कोण जाला ॥ ४७ ॥ आतां गुरु तो ज्ञान उपदेशितो । तेव्हां अनायासें तें पावतो । शोध काढितां हा अर्थ येतो । एथवरी ॥ ४८ ॥ तरी कोण्या निमित्तेंकरूनि । अनायासें पावतो ह्मणोनि । पुसतां उत्तर एथूनि । देतील ऐसें ॥ ४९ ॥ कीं ज्याचें ज्ञान हें । तो आत्मा आपणचि आहे । आपणास आपण पाहे । अनायासें

१ उसवें. २ प्रकाररहित. ३ प्राप्त होई. ४ आत्मसाक्षात्कार. ५ ज्ञाता, ज्ञान ज्ञेय मिळून. ६ नमस्कार.

॥ १२५० ॥ ऐसें बोलतां पुसावें । कीं आत्मा स्वयेंचि या भावें । आत्म ज्ञान सुलभ ह्मणावें । तरी आत्मा ज्ञेय हें ज्ञान वेगळें कीं ॥ ५१ ॥ जेव्हां वेगळेपण आलें । तेव्हां अनायासत्व उडालें । आयासत्व प्राप्त जालें । वेगळेपणें ज्ञानासी ॥ ५२ ॥ आत्मा आपण स्वयें निःसंशय । परी नव्हे ज्ञान तो ज्ञेय । ज्ञान वेगळें तेव्हां प्राप्त होय । आयासपेण साधितां तें ज्ञान ॥ ५३ ॥ तेव्हां ह्मणाल कीं ज्ञान । स्वयें आत्माचि चिद्‍घन । कीं ज्ञान करितां भिन्न । बाध येतो ॥ ५४ ॥ ज्ञान वेगळें ह्मणाल । तरी ज्ञाता ज्ञेयावेगळा पडेल । ज्ञाता ज्ञेय एक मानाल । तरी ज्ञान वेगळें मग कैचें ॥ ५५ ॥ ज्ञाताचि तो ज्ञेय । तेव्हां ज्ञानही तोचि निःसंशय । त्रिपुटी गिळोनि अद्वय ज्ञान प्रकाशे स्वस्वरूप ॥ ५६ ॥ आतां ज्ञान ही ज्ञाता हाचि स्वयें । ज्ञानास अनायासत्व या निश्चयें । एवं ज्ञान स्वयें तरी कोण्या संशयें । आढेवेढे घेतां । ५७॥ स्वयें ज्ञाताचि होतें ज्ञान । ऐसेंचि कां न वाखाणावें हें वचन । आढेवेढे घेऊनि वदन । कां शिणवावें ॥ ५८ ॥ स्वयें ह्मणजे आपण । मुख्य अर्थ नव्हे अनायासपण । मुख्य अर्थ सोडूनि गौण । अंगीकारावा कां परी ॥ ५९ ॥ आणि स्वयंशब्दें अनायासत्व असिद्ध । कीं तो पावे पुरुष होऊनि योगसंसिद्ध । ह्मणोनि ह्मणती हें तों प्रसिद्ध । योग यत्नें साधावा ॥ १२६० ॥ आतां स्वयें ह्मणजे अनायासें । व्याख्यान जेव्हां केलें ऐसें । तेव्हां योग ह्मणतां आयासें । ह्मणावें लागेल ॥ ६१ ॥ आणि आत्मयोगही ते न मानिती । आत्मा कळतांचि मुक्त ह्मणती । ते या योगशब्दें वाखाणिती । कर्मयोग ॥ ६२ ॥ कीं कर्मयोगें होतो शुद्ध । मग तो ज्ञान पावतो समृद्ध । योगसंसिद्ध ह्मणजे योग्यतेनें सिद्ध । कर्मयोगें होतो ह्मणूनि ह्मणती ॥ ६३ ॥ योग्यतेनें सिद्ध जाला । तो साधकचि तरी बोलिला । सिद्धही न ह्मणावा संसिद्ध त्याला । कां ह्मणे श्रीकृष्ण ॥ ६४ ॥ आणि योगचित्ताची एकाग्रता । त्या योगें वरी सिद्धता । ज्यास तो योगसंसिद्ध तत्त्वतां । हाही मुख्यार्थ कां टाकावा ॥ ६५ ॥ गुरुमुखें आत्मा कळला । तरी अनादिसंस्कार आड लागला । वेदीं पुराणीं योग बोलिला । याचिलागीं ॥६६॥ बुद्धीस आत्मसत्ता कळली । तरी जों स्वरूपीं नाहीं मिसळली । निर्गुणीं निर्गुणत्वें जों नाहीं थारली । तोंवरी नव्हे ज्ञान परिपक्क ॥ ६७॥ हा निर्विकल्पयोग । बुद्धीस आत्मयास ऐक्यें संयोग । आत्मसागरीं मुरे

१ ज्ञानाहि. २ अमस्त ३ ज्ञान पूर्ण ४ स्थिरावली.

तरंग । बुद्धीचा ॥६८॥ अथवा तरंग चराचर । त्यांत एक आत्मसत्ता सागर । हा सविकल्पयोग निरंतर । जेव्हां बाणे ॥ ६९ ॥ तेव्हां पुरुष योगसंसिद्ध । ज्ञान तेव्हांच जालें सिद्ध । हा सोडूनि अर्थ प्रसिद्ध । कां वाखाणावें अन्यथा ॥ १२७० ॥ एवं ज्ञाता तोचि ज्ञान स्वयें । कीं ज्ञेयही तोचि निःसंशयें । परि चित्तचैतन्ययोगाश्रयें । बाणतसे हें ज्ञान ॥ ७१ ॥ गुरुमुखें आत्मा कळे । आणि तत्काल चित्त योगीं वळे । तो जन्मांतरीं योग कळे । यत्न करीत होता म्हणावा ॥ ७२ ॥ परि अनाद्यविद्यासंस्कार । चित्त स्वरूपीं वारंवार । न योजितां न तुटे हा निर्धार । सकळ वेदांचा ॥ ७३ ॥ आत्मा कळला निश्चित । अभ्यास न करी चित्त । त्यास देहात्मत्व अत्यंत । करीच मोह ॥ ७४ ॥ चिदात्मत्वस्मरण नाहीं । तेव्हां वाटेच आत्मत्व देहीं । तिसरा अवलंब तो नसे कांहीं । आत्मत्वाचा बुद्धीस ॥७५॥ देहात्मत्वप्रवाहीं । ब्रह्मात्मता तों स्फुरत नाहीं । काळ ऐसा लोटतां कांहीं । गुरुवचनहीं न आठवे ॥ ७६ ॥ एवं देहात्मसंस्कार मोडे । ब्रह्मात्मसंस्कार जोडे । अभ्यासावांचूनि न घडे । हे स्थिति ॥ ७७ ॥ ज्यास हे स्थिति बाणे । तोचि म्हणावा तें ज्ञान जाणे । अन्यथा जाणतो तोही नेणें । ज्ञान नाहीं म्हणवें तयाला ॥ ७८ ॥ एवं ब्रह्मात्मत्वस्मरणाभ्यास । हा योग साधे जयास । त्या योगसंसिद्धास । ज्ञानलभ्य तें स्वयेंचि तो ॥७९॥ अर्थ हाचि बरा । बाधित अर्थ दुसरा । टाकूनियां मत्सरा । विचारिती त्यांस हाचि अर्थ ॥ १२८० ॥ आतां यानंतर श्लोक । तो कां बोले उत्तमश्लोक । त्याचें निमित्त सुज्ञ लोक । परिसोत ॥८१॥ ज्ञानाची प्रशंसा फार । कृष्ण बोलिला वारंवार । कोणास त्या ज्ञानीं अधिकार । तें वर्णितो या श्लोकीं ॥ ८२ ॥

॥ श्लोक ॥ श्रद्धावाल्लभते ज्ञानं तत्परः संयतेंद्रियः ।
ज्ञानं लब्ध्वा परां शांतिमचिरेणाधिगच्छति ॥ ३९ ॥

॥ टीका ॥ अगा हें ज्ञान तो । श्रीगुरुमुखें पावतो । कीं जो श्रद्धा धरितो । वेदीं आणि गुरुवचनीं ॥ ८३ ॥ अनुभवगम्य अद्वैत । जों अनुभवा ये अत्यंत । तोंवरी वेदवेदांत । बोलती तेंचि मानावें ॥ ८४ ॥ ऐक्य जीवा ईश्वरा । ब्रह्मैक्य जडा चराचरा । प्रपंच मिथ्या जो प्रत्यक्ष खरा । हें सर्व कारण श्रद्धेस ॥ ८५ ॥ बुद्धीस आस्तिकता । ते श्रद्धा म्हणावी त-

१ उसत असतें. २ असें न मानल्यास.

त्वता । आस्तिक्य ह्मणजे सत्यता । भल्याच्या वाक्यांची मानणें ॥ ८६ ॥ अनादि ईश्वरवचनें वेद । ते उपपादिती अभेद । तेव्हां मिथ्या सर्व भेद । हे आस्तिकता श्रद्धा जयाला ॥ ८७ ॥ तोचि अधिकारी ज्ञानासी । कीं प्रमाण मानी वेदवेदार्थासी । हें न घडे ह्मणोनि मानसीं । अश्रद्धा धरीना ॥ ८८ ॥ आधीं परोक्षरीती । शास्त्रश्रवण जिज्ञासु करिती । तेथें जे श्रद्धा धरिती । तेचि अधिकारी अपरोक्षानुभवा ॥ ८९ ॥ दृष्टांतें मोडूनियां द्वैत । वेद उपदेशिती अद्वैत । परंतु जितका दृष्टांत । तितका एकदेशी ॥ ९० ॥ घटादि नाना पात्रजाती । लटकी त्यांत साच माती । तैसें ब्रह्म सर्वभुतीं । सत्य आणि मिथ्या भूतें श्रुति ह्मणे ॥ ९१ ॥ सत्य मृत्तिका मिथ्या पात्र । दृष्टांतीं साधे इतुकेंचि मात्र । एथें अनधिकारी अपवित्र । कुतर्के धरिती अश्रद्धा ॥ ९२ ॥ कीं वेगळाले मृत्पिंड । करितां घडिती जाती उदंड । तरी काय ब्रह्मांडीं खंडखंड । भूतें होतां होतसे ॥ ९३ ॥ वेगळे मृत्पिंड गोळे निघती । यांस परिच्छिन्नत्व ह्मणती । ब्रह्मापरिच्छिन्नत्व या दृष्टांतीं । न वर्णिती वेद ॥९४॥ कमलासारिखे नयन । हें सुंदरत्वाविषयीं वचन । एथें कमल दृष्टिहीन । ह्मणोनि दृष्टांत न घडे कैसा ह्मणावा ॥ ९५ ॥ दर्शनपटुत्व नयनीं । वर्णितां कमलासारिखे ह्मणोनी । दृष्टांत बोलतां वचनीं । बाध मानावा ॥ ९६ ॥ बुबुळें नाहींत कमळा । कमलासारिखा न ह्मणवे डोळा । तैसा हा कुतर्काचा चाळा । बुद्धि अनधिकारियाची ये रीती ॥ ९७ ॥ सत्यत्व मिथ्यात्वमात्र विचार । तेथें परिच्छिन्नत्वापरिच्छिन्नत्वादिप्रकार । ह्मणूनि वेदांचा मुख्य निर्धार । तेथें अश्रद्धा अनधिकारिया ॥ ९८ ॥ जीवेश्वरीं अभेद । 'तत्त्वमसि' ह्मणती वेद । अश्रद्धधान ह्मणती संसारखेद । दुःख भोक्तृत्व न घडे तेधवां ॥९९ ॥ प्रतिबिंबत्वें दुःखभोग । अन्यथा जीवेश्वरां ऐक्ययोग । हें आयकोनिही नव्हे वियोग । संशयाचा ॥ १३०० ॥ ऐसा अश्रद्धधान । वेदीं वेदांतीं श्रद्धाहीन । तो कधीं न लाहे ज्ञान । श्रद्धा न धरी तो अद्वैतीं ॥ १ ॥ वेदीं श्रद्धा धरूनी । नाना दृष्टांतेंकरूनी । शास्त्रश्रवणकाळीं धरी मनीं । श्रद्धा अद्वैततत्त्वाची ॥ २ ॥ तो ह्मणावा श्रद्धावंत । तो ज्ञान पावतो ह्मणे भगवंत । एवं जो अनुभवा ये अद्वैत । तो श्रद्धा आधीं असावी ॥३॥ तो श्रद्धावंत नर । ज्ञान पावोनि तत्पर । होय कीं अत्यंत सादर । अभ्यासीं स्वरूपानुसंधानाच्या

१ ज्ञानेच्छु. २ खरें. ३ पाहण्यास समर्थ. ४ लाभे; पावे.

॥ ४ ॥ त्या अभ्यासास इंद्रियें । विघ्नकारक निश्चयें । ह्मणोनि संयतेंद्रिय स्वयें । जो तत्पर होतसे ॥ ५ ॥ तो परम शांती । थोडियाच काळें ह्मणे श्रीपती ॥ पावतो एथें संतांचा पती । पूर्वश्लोकें संदेहही हरितसे ॥ ६ ॥ कीं योगसंसिद्ध कालेंकरूनी ॥ तें ज्ञान पावतो ह्मणोनी । पूर्वश्लोकीं बोलिला त्या वचनीं । विलंब योगसिद्धींत अर्जुन मानील॥ ७ ॥ ज्ञान त्रिबे काळेंकरूनी । मी बोलिलों यावरूनी । सिद्धीस विलंब ह्मणी मनीं । मानिसी अर्जुना ॥ ८ ॥ तरी अगा परम शांती । थोडियाच काळें बाणे स्थिति । 'अचिरेण' ह्मणोनि संतांचा पति । या भावें बोलिला॥९॥कीं ज्ञानी संयतेंद्रिय । आणि तत्पर ह्मणजे अभ्यासीं कृतनिश्चय । त्यासि परम शांति प्राप्त होय । स्वल्पचि काळें॥१३१०॥आणि ह्मणतां परमशांती । द्विविध शांति एथें श्रीपती । सूचवी कीं जों बाणली ज्ञानस्थिती । तोंवरी शांति ते परमशांति ह्मणवेना ॥११॥ कीं कामक्रोधादि वैरी । अनावर असोनि बळें आवरी । ब्रह्मानंद बरवा जोंवरी । अनुभविला नाहीं ॥१२॥ जो क्षुधाक्रांत । तो मन घाली भलत्या-त्या अन्नांत । परि अग्राह्य टाकी मनांत । इच्छा उपजोनि ही ॥१३॥ तोचि जेऊनि तृप्त जाला । मग कांहींच अन्न नलगे त्याला । तैसा ब्रह्मानंदें धाला । तो स्मरणही न करी विषयाचें ॥ १४ ॥ जेथें नाहीं काम । तेथें क्रोधाचें नाठवे नाम । काममूळचि दुर्गुणग्राम । त्यावेगळे लोभादि दोष न उपजती ॥ १५ ॥ राहतां वासनासमीर । अचल मानसाचें नीर । भगवत्पदपद्मेंहंसधीर । कामादि तरंग दृष्टीं न देखती ॥ १६ ॥ हे ह्मणावी परम शांती । पूर्व शांतीची अन्य रीती । अभ्यासपर हे स्थिति । शीघ्रचि पावती ॥ १७ ॥ परंतु अभ्याससाधन । तेव्हां जेव्हां गुरुमुखें कळे ज्ञान । त्यास अधिकारी तो कीं जो श्रद्धावान । अद्वैततत्त्वीं ॥ १८ ॥ एवं ज्ञानासि अधिकारी । तो वर्णिला या प्रकारीं । आतां जे अनधिकारी । ते वर्णितसे या श्लोकीं ॥ १९ ॥

॥ श्लोक ॥ अज्ञश्चाश्रद्दधानश्च संशयात्मा विनश्यति ।
नायं लोकोस्ति न परो न सुखं संशयात्मनः ॥ ४० ॥

॥ टीका ॥ अगा या ज्ञानास अनधिकारी । ते जाणावे तीं प्रकारीं । एक अज्ञ दुसरा अश्रद्धान याउपरी । संशयात्मा तो तीसरा ॥१३२०॥

१ संयम. २ अवश्य. ३ ज्याच्या इंद्रियें स्वाधीन. ४ उत्तम. ५ वाईट खोडीचा समुदाय. ६ उदक.

सहज लोक अज्ञानी । तेही ह्मणावे अज्ञ ह्मणोनी । परि हा अज्ञ तो जो गुरुमुखेंकरूनी । आइकोनि नेणे स्वरूपातें ॥ २१ ॥ गुरु समजावी परी । उकलें नव्हे अंतरीं । वर्षे पालथ्या घटावरी । गुरुकृपामेघ ॥ २२ ॥ मागें दुसरिया अध्यायांत । "आश्चर्यवत्पश्यति" या श्लोकांत । याचें अनधिकारित्व श्रीकांत । बोलिला चतुर्थचरणीं ॥ २३ ॥ द्वितीयाध्यायश्लोकचतुर्थचरण । "श्रुत्वाप्येनं वेद न चैव कश्चित्" ॥टीका॥ कोणी गुरुमुखें श्रवण करूनिही । या आत्मयास जाणत नाहीं । हें द्वितीयाध्यायांतही कांहीं । याचेंचि अनधिकारित्व वर्णिलें ॥ २४ ॥ कीं गुरुकृपाघन । शरणागतावरी ज्ञानजीवन । वर्षे परंतु पाषाण ज्याचें मन । तृणही तेथें उगवेना ॥ २५ ॥ अनधिकारी जन । जरी करवते सज्ञान । तरी कृपाळु संत त्रिभुवन । मुक्तचि करिते ॥ २६ ॥ संतकृपा नव्हे समर्थ । बोलों नये ऐसा अर्थ । ज्ञान न कळे तरी कृतार्थ । करितीच ते ॥ २७ ॥ कीं जो करितां प्रकार । त्यास जोडे अधिकार । तो त्यास सांगती विचार । चित्तशुद्धीचा ॥ २८ ॥ परंतु जरी यथापूर्व असेल शरण । तत्त्व न कळे तरी न सोडी चरण । जो टाकीच त्याचें शिष्यपण । तोचि नासे सन्मार्गापासुनी ॥ २९ ॥ दुसरा अनधिकारी जन । तो कीं जो अश्रद्धधान । कीं कांहीं समजोनिही ज्ञान । श्रद्धा धरीचना ॥ १३३० ॥ गेली विपरीत भावना । तो उभी राहिली असंभावना । कीं मी देह हे भावना । विपरीत भावना ह्मणावी ॥ ३१ ॥ देह आणि आपण एक । हा दुरी जाला अविवेक । होतां जडचैतन्यविवेक । गुरुमुखें ॥ ३२ ॥ व्यतिरेकें आत्मा कळे । तो ह्मणतां आत्मा ब्रह्मबुद्धि खवळे । ते वळितांहि न वळे । अश्रद्धधानाची ॥ ३३ ॥ कीं चैतन्यावांचूनी । जडास भोक्तृत्व न घडे ह्मणोनी । अद्वैतीं अश्रद्धा धरूनी । सन्मार्गापासूनि जो च्यवे ॥ ३४ ॥ अद्वैतशास्त्र सोडी । शासन गुरूचें मोडी । न तुटतां संसारबेडी । नाश पावे ये रीतीं ॥ ३५ ॥ व्यतिरेकज्ञान मात्र । होतां कोणी अपवित्र । सोडूनि मार्ग पवित्र । नाशती द्वैतमार्गीं भरोनी ॥ ३६ ॥ कर्ते भेदशास्त्राचे । जडचैतन्यविभागही वाचे । वर्णूनि अद्वैतानुभवाचे । मार्ग दूषिती ॥ ३७ ॥ देहात्मता विपरीतभावना । त्याची जाऊनिही असंभावना । उपजली कीं हें घडों शकेना । हे भावना असंभावना ह्मणावी ॥३८॥ कीं देहावेगळा द्रष्टा जडाचा । हा सुखदुःखभोक्ता साचा । यासि ब्रह्म ह्मणेल त्याची वाचा । काय प्रमाण ॥ ३९ ॥

१ निवाडा; उमज. २ भ्रष्ट होई. ३ ईश्वर मेशाच्य । अभिमानास पेटून. ३ खरा.

ह्मणोनि व्यतिरेक ज्ञान । होतां ऐसें अश्रद्दधान । पांडित्यबळें द्वैत अज्ञान । तेंचि ज्ञान अद्वैत ह्मणोनि स्थापिती ॥ १३४० ॥ जरी कळता अन्वय । तरी तुटते सर्व संशय । अद्वैत सत्य हा निश्चय । बाणता रूपाचा ॥ ४१ ॥ सर्वत्र आत्मा दिसे । जड चैतन्य एकत्वें समरसे । तेव्हां चित्तीं दृढ बसे । ठसा अद्वैताचा ॥ ४२ ॥ एका देहीं आपण । तो देहावेगळा हे कळली खूण । तो खरेंचि भोक्तृत्वपण । त्या प्रतिबिंबचैतन्यास ॥ ४३ ॥ ज्ञान झालें तथापि । सुखदुःख पूर्वपुण्यपापीं । उपजलें तें कदापी । न टळे भोगिल्यावांचूनि ॥ ४४ ॥ तोचि भोक्ता ह्मणावा । तोचि ब्रह्मत्वें गणावा । तेव्हां संशय काय लागला आणावा । देशांतरा जाऊनी ॥ ४५ ॥ ऐसा संशय पडोनिही । जो गुरुचरण सोडीत नाहीं। तो न पडतां अविद्याप्रवाहीं । होतोच सिद्ध ॥ ४६ ॥ कां अन्वयज्ञानीं दृष्टी पडे । आणि अभ्यासें सर्वात्मता सांपडे । संशयाचें मूळ न उडे । कां मग तयाचें ॥ ४७ ॥ परंतु कळतां व्यतिरेक । अश्रद्दधान जाले कितीएक । नाशती ह्मणे उत्तमश्लोक । ते अश्रद्दधान ॥ ४८ ॥ कळोनि श्रद्धा न धरी । तो अश्रद्दधान ऐसेपरी । कीं समजेचिना त्यातें हरी । बोले अज्ञ ह्मणोनी ॥४९॥ सहज अज्ञत्व नासेल । हें सांगणें काय नवल । ज्ञानाचा नव्हे उकल । तो अज्ञ एथें बोलिला ॥१३५०॥ आतां संशयबुद्धि तिसरा । ज्याच्या बुद्धींत संशयाचाच थारा । प्रत्यक्षावांचूनि खरा । अर्थ कांहीं न वाटे ॥५१॥ वेदशास्त्रीं विश्वास । आणि संशय वाटे मनास । तो अश्रद्दधान तयास । मागेंचि वर्णिलें॥५२॥ वेदशास्त्र तरी मानी । परी सर्वत्र संशय मनीं । कीं स्वर्गनरकजन्मांतर नयनीं । देखे ऐसा कोण आहे ॥ ५३ ॥ तेव्हां कैंचा ईश्वर । हा उगाच शास्त्रांचा पसर । परि सोडितां वेदशास्त्रांचा पदर । नास्तिक ह्मणती मज लोक ॥ ५४ ॥ ह्मणोनि वेदमार्गी असे । कर्मानुष्टान करितांही दिसे । आणि जाउनिहीं सादर बसे । वेदांत आइकती त्यांमाजी ॥ ५५ ॥ खरें नाणें असे । त्यांत खोटेंही तैसेंचि दिसे । परीक्षा होय तों येतसे । खऱ्या सांगातें गणनेस ॥ ५६ ॥ शास्त्रश्रवणकाळीं । त्याची प्रकृति न दिसे निराळी । अपरोक्षउपदेशींही कळी । उकले खोटेपणाची ॥ ५७ ॥ प्रत्यक्षा एकावांचुनी । कांहींच नाहीं ह्मणोनी । हा निश्चय ज्याचे मनीं । अपरोक्ष कळेल काय त्याला ॥ ५८ ॥ परि संतसंगीं वसे ॥ वरील पाषाण ओलासा दिसे ॥ वेदाचे

१ नाश पावते. २ ठसता. ३ मिसळे. ४ ढलगडा होई.

अर्थ समजेही तैसे ॥ तरी संशयें अंतर भिजेना ॥ ५९ ॥ एवं जैसे अज्ञ आणि अश्रद्दधान। च्यवती सन्मार्गापासून । तैसा हाही च्यवे ऐसें मधुसूदन। सगटें आधीं बोलिला॥१३६०॥कीं तिघेही मोक्षमार्गापासूनि। समान च्यवती ह्मणोनि । तिघे सगट आधीं बोलोनि । संशयबुद्धि वेगळा निवडितो ॥ ६१ ॥ कीं अज्ञ आणि अश्रद्दधान । एक न समजे एक न उमजे ह्मणोन। वायां गेलै परी जरी गुरुभजन। न सोडिती होती काळें कांहीं कृतार्थ ॥६२॥ अथवा ज्ञानमार्गापासूनी । च्यवले तरी काम्यानुष्ठानेंकरूनी । इहलोक परलोक साधिती ह्मणोनी । हा त्यावेगळा निवडिला ॥६३॥ कीं यास इहलोक । अथवा नाहीं परलोक । अथवा न सुख कांहीं तरी एक । यासी ॥ ६४ ॥ दानपुण्याचें फळ । तें अदृष्ट कीं दृष्टीस अकळ । तेथें संशयें डळमळ। याच्या मना ॥ ६५ ॥ दान अतिथिपूजन । न करी न वेंची धन । तें अपकीर्तिसाधन । सर्वत्र संशयबुद्धि जो त्याला ॥ ६६ ॥ सत्कीर्ति बोलती लोक । त्यासचि साधला इहलोक । ह्मणोनि ह्मणे उत्तमश्लोक । कीं इहलोक न असे तयाला ॥ ६७ ॥ वेदोक्त स्वर्गसुख । साधे करितां दानमख । संशयबुद्धीस्तव जो विमुख । यज्ञदानीं ॥ ६८ ॥ त्यास परलोक कैंचा ज्यास संशयें वेदयाचा । मिथ्या वाटती साचा । प्रत्यक्ष वादीच ज्यासी ॥ ६९ ॥ एवं न इहलोक । अथवा न परलोक । अथवा न सुख कांहींएक। तया संशयबुद्धीसी ॥ १३७० ॥ सुखी एक मूढ अत्यंत । किंवा सुखी संत । मूढ उन्मत्तपणें निश्चित । संत स्वहित साधूनी ॥ ७१ ॥ जो सर्व पांडित्य जाणे । आणि संशयें स्वहित करणें न वाणे । त्यास ह्मणतों परम शहाणे । अत्यंत दुःखी ह्मणोनी ॥ ७२ ॥ कीं खांदियावरी शूळ । गळां माळा तोंडीं गूळ । प्रतिपाउलास मृत्युस्थळ । जवळी होतें ॥ ७३ ॥ माळा गळां घालिती । खारिका खोबरें चारिती । तथापि टाउकें कीं आतां मारिती । वधस्थळीं ॥ ७४ ॥ जेथें रोंविती शूळ । दृष्टीस दिसे तें स्थळ । त्यास ते भोग सकळ । काय सुख होती ॥ ७५ ॥ तैसा हा संशयबुद्धि । संशयें न करोनि परलोकसिद्धि । भोग भोगूनिही समृद्धी । मृत्युभयाची मनांत ॥ ७६ ॥ कीं संशयबुद्धि परी जाणता । नव्हे केवळ उन्मत्त नेणता । मरण तों आहेच तत्त्वतां । हें जाणे ॥ ७७ ॥ ज्यांची बुद्धि निःसंशय । जिहीं केला स्वहितसंचय । त्यांच्या बुद्धीस निश्चय । कीं मेलों तरी गति आह्मां

१ बरोबर; साधारण अभिन्नपणें. २ खऱ्या त्या खोट्या वाटतात.

॥ ७८ ॥ यांस आत्मा तरी अतिप्रिय । तोचि नासेल हा निश्चय । का प्रत्यक्षावेगळा संशय । सर्वत्र ज्यांला ॥ ७९ ॥ एवं भोगूनिहीं विषय । शूलस्कंधासारिखें मृत्युभय । प्रवर्त्तोनि सन्मार्गीही संशय । ज्यास तो दुःखीच सर्वत्रही॥१३८०॥ एवं अज्ञ आणि अश्रद्दधान । त्यांस न होउनीहीं ज्ञान । होय करितां साधन । इहलोक परलोक आणि सुखही ॥ ८१ ॥ कीं न विवलें ज्ञान । तरी वेदीं तें श्रद्दधान । असोनिही अज्ञान । इहलोक परलोक साधिती ॥ ८२ ॥ ऐसा पाहतां निर्णय । ज्याच्या बुद्धींत बोलिला संशय । हा वेदमार्गी असोनिही होय । गुप्त चार्वाक[1] ॥ ८३ ॥ ते दोघे अनधिकारी । परी न धिवोनिहि ज्ञान जरी । गुरुशुश्रूषा करिती बरी । अधिकार पावोनि पावती ज्ञान ॥ ८४ ॥ आतां यानंतर श्लोक । तो कां बोले उत्तमश्लोक । त्याचें निमित्त सुज्ञलोक । परिसोत याउपरी ॥ ८५ ॥ संशयबुद्धि सर्वथा । नासे हे पूर्वश्लोकीं कथा । कानीं पडतां पार्था । चिंता उपजली स्वविषयीं ॥ ८६ ॥ कीं भीष्मादिवधें निरय । हा आपणातें निश्चय । आणि कृष्ण ह्मणतो निःसंशय । पाप नाहीं ॥ ८७ ॥ मज हें वाटे अहाच । पापचि वाटे साच । तेव्हां मीही तैसाच । संशयात्मा ॥ ८८ ॥ ऐशा संशयें याला । मारूं जरी तरी मजला । दोन्ही लोक नाहींत कीं बोलिला । कृष्ण संशयबुद्धीस गति ऐशी ॥ ८९ ॥ तेव्हां मी संशयमती । झगडतांही नसे उभयलोकगती । आणि यांस मारायाची प्रवृत्ती । न उपजे मला ॥ १३९० ॥ तरी कां मारूं याला । कां न राहों उगला । कीं मारितांही यांस मला । न दिसती उभय लोक॥ ९१ ॥ हा भाव धरितां मनीं । तो सर्वसाक्षी समजोनी । तूं तैसा न होसी ह्मणोनी । युद्ध करीं ह्मणतो दों श्लोकीं ॥ ९२ ॥ कीं न होसी तूं प्रत्यक्षवादी । तुज विश्वास वेदीं । वेदाश्रितांसही संवादीं । उपजती संशय उदंड ॥ ९३ ॥ कर्मी बंध निश्चित । आणि अज्ञानें संशयही अगणित । परि जे वेदीं विश्वासरत[2] । ते दोहींपासोनि सुटती ॥ ९४ ॥ ह्मणोनि तूं युद्ध करीं । हें पुढिल्या श्लोकीं बोलेल हरी । वेदविश्वासरत ज्यापरी । तरती तें बोलतो या श्लोकीं ॥ ९५ ॥

॥ श्लोक ॥ योगसंन्यस्तकर्माणं ज्ञानसंछिन्नसंशयम् ।
आत्मवंतं न कर्माणि निबध्नंति धनंजय ॥ ४१ ॥

॥ टीका ॥ अगा जो वेदोक्त कर्म । करितो वर्णाश्रमोचित धर्म । करू-

---

[1] नास्तिक; निरीश्वरवादी. [2] दृढविश्वासी.

नि ईश्वराराधनयोग परम । त्या योगीं जो समर्पितो ॥ ९६ ॥ वेदीं विश्वास धरूनी । ईश्वरीं अर्पी कर्मे करूनी । तरी अनादि अज्ञानें मनीं । संशय असती अपार ॥ ९७ ॥ मनीं असले संशय । तरी तो काय वाया जाय । कीं चित्त अज्ञानमय । अनादि असे ॥ ९८ ॥ परी कर्मे ईश्वरीं अर्पितां । प्रसाद ईश्वराचा होतां । शरण जातां संतां । ज्ञान होय ॥ ९९ ॥ त्या ज्ञानें सकल । संशय तुटती समूल । मग तो बुद्धिमंत केवळ । अर्जुना होतो ॥ १४०० ॥ तेव्हां कर्मे तया । कांहीं न बाधती धनंजया । संचितें जळतां जया । मोक्ष सरतां प्रारब्ध ॥ १ ॥ एवं बद्ध नव्हे सुजाण । ज्या कर्मे तें नव्हे क्रियमाण । संचित जळे प्रारब्धभोगें सरे हे खूण । सुचविली यावरूनि पूर्वोक्त ॥ २ ॥ म्हणूनि आतां अर्जुना । तूं मानूनि माझ्या वचना । ऊठ[1] झगडं[2] पांडुनंदना । या प्रकारें म्हणोनि म्हणतो या श्लोकीं॥३

॥ श्लोक ॥ तस्मादज्ञानसंभूतं हृत्स्थं ज्ञानासिनात्मनः ।
छित्त्वैनं संशयं योगमातिष्ठोत्तिष्ठ भारत ॥ ४२ ॥

इति श्रीमद्भगवद्गीतासूपनिषत्सु ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे श्रीकृष्णार्जुनसंवादे अर्जुनविषादयोगो नाम चतुर्थोऽध्यायः ॥

॥ टीका ॥ अगा जो जाला ज्ञानी । त्यास कर्मे न बाधों शकती म्हणोनी । बोलिलों तूतें पूर्वश्लोकेंकरूनी । याकारणें ॥ ४ ॥ कीं तूंही ज्ञानी । अगा होऊनी । होय अलिप्त कर्मे करूनी । अगा अर्जुना ॥ ५ ॥ तस्मात्कारण धनंजया । या अज्ञानसंभवा संशया । छेदीं ज्ञानखड्गें करूनियां । जो हृदयीं तुझ्याच वसतो ॥ ६ ॥ मी एक साचा[3] मारणार । हे एक साचे मरणार । या संशयाचा छेद करणार । एकचि खड्ग ज्ञानाचा ॥ ७ ॥ तरी ज्ञानखड्गें या संशया । छेदूनि अगा धनंजया । ऊठ आणि योगा या । अनुष्ठीं ॥ ८ ॥ ज्ञान जालियाहीवरी । अर्जुना तूं हा कर्मयोग करीं । म्हणूनि म्हणतो हरी । या भावें ॥ ९ ॥ कीं व्यतिरेकअन्वय । उभयप्रकारें अद्वैताचा निश्चय । करीं आणि हा नानात्वसंशय । छेदीं त्या ज्ञानें ॥ १४१० ॥ कीं पावोनि अद्वैतखुणे । सर्वात्मत्वही जरी होणें । तरी तें अभ्यासें बाणे । मोडूनि पूर्वसंस्कारातें ॥ ११ ॥ तें बाणायास साधन । ईश्वराचें आराधन । स्वकृतकर्मार्पणभजन । थोर एथें ॥१२॥ "ये तु सर्वाणि कर्माणि । मयि संन्यस्य" म्हणोनि । द्वादशीं श्रीकृष्ण बोलेल कीं ज्ञानी । भक्त सर्व कर्मे मज अर्पिती ॥ १३ ॥ त्या अभिप्रायेंकरूनी । ज्ञानें निःसं-

---

१ लढाई कर. २ खरे, शूर. ३ आचरें.

शय होउनी । योग अनुष्ठीं ह्मणोनी । ह्मणतो एथें ॥ १४ ॥ अनुष्ठीं योग । ह्मणजे करीं कर्मयोग । कर्मयोग तो कीं निःसंग । ईश्वरीं समर्पी ॥ १५ ॥ "यज्ञार्थात्कर्मणोन्यत्र"। पूर्वाध्यायांत हा निर्णय पवित्र। बोलिला कमलनेत्र। कीं बंध या वेगळ्या कर्ममात्रीं ॥१६ ॥ कर्मयोगाचें लक्षण । दोन अध्यायीं कमलेक्षण । बोलिला कीं निष्काम ईश्वरार्पण । तोचि कर्मयोग ॥ १७ ॥ एवं जालियाही ज्ञान । विहित गीतेंत सगुणभजन । हें विचारून सज्जन । अभिमानातें दवडूनी ॥ १८ ॥ ऐसा हा अध्याय चतुर्थ । एथें बोलिला समर्थ । कीं ज्ञान होऊनिही यथार्थ । करावें सगुणभजन ॥ १९ ॥" जन्म-कर्म च मे दिव्यं" ह्मणोनी । या श्लोकीं तत्त्वज्ञानेंकरूनी । माझें जन्मकर्म दिव्य जाणे तो देह सोडूनी । मातें पावे जन्मा पुन्हा नये हें बोलिला ॥ १४२० ॥ इत्यादि सगुणपर । अध्यायारंभ करी ईश्वर । ब्रह्मार्पणश्लोकें चक्रधर । सगुणप्राप्ति बोले ज्ञानियासी ॥२१॥ "ब्रह्मैव तेन गंतव्यं" ह्मणोनी । ब्रह्मचि जाला जो ज्ञानी । त्यासही सगुणब्रह्मप्राप्ति स्ववचनीं । अनन्यगतिकत्वें बोलिला ॥२२ ॥ कीं स्थिरतां[1] ब्रह्मानंदानुभव । ज्ञानियास देह असतां जें वै-भव । तें नसे तेव्हां स्वयें एकमेव । ब्रह्ममात्र आहे तैसेंच उरतें ॥ २३ ॥ या भावें श्रीकृष्ण ऐसें बोलिला । कीं ज्ञानी निर्गुणचि जो आहे जाला । मागुती ब्रह्म पावणें त्याला । ते सगुणब्रह्मप्राप्तीच ॥२४॥ "यज्ञायाचरतः कर्म" । इत्यादि अध्यायभागीं सर्वोत्तम । ज्ञानियास सगुणभजन परम । बोलिला शीघ्र सिद्धिप्रदत्वें ॥२५॥ अंतीं या शेवटिल्या श्लोकीं । उत्तमश्लोक बोलिला कीं । ज्ञानखड्गें संशय छेदूनि टाकीं । आणि ऊठ अनुष्ठीं योगातें ॥ २६ ॥ योगी ह्मणजे ईश्वराराधनेचे ठायीं । कर्म अर्पणें ईश्वराचे पायीं । कीं या मागिल्या श्लोकीं शेषशायी । हाचि बोलिला योगशब्दार्थ ॥ २७ ॥ " योगसंन्यस्तकर्माणं " ह्मणोनी । या चरणें हेंचि सुचवूनी । बोलिला त्या-चिवरूनी । हा अर्थ एथेंही साधतो॥२८॥योगी कर्मे समर्पी जो बरवा[2] । तो "योगसंन्यस्तकर्मा" ह्मणावा । आणि ज्ञानें संछिन्न पांडवा । संशय ज्याचे ॥ २९ ॥ त्यासि कर्में न बाधती । ह्मणूनि या श्लोकीं अर्जुनाप्रती । तस्मात् तूंही योग करीं ह्मणे श्रीपती । ज्ञानखड्गें छेदूनि संशयातें ॥ १४३०॥ योग-संन्यस्तकर्मा ह्मणजे । योगीं समर्पी कर्मवृंदें[3] करी जे जे । तेव्हां योग शब्दें घेतलें पाहिजे । ईश्वराराधन ॥ ३१ ॥ कीं कर्मे अर्पी ईश्वराराधनेचे-

१ स्थिर होतां. २ चांगला. ३ कर्मसमूह.

ठायीं । एवं करणें आराधन अर्पणें पायीं । त्या पुरुषास ह्मणे शेषशायी । ज्ञानसंछिन्नसंशय ह्मणोनी ॥ ३२ ॥ तस्मात्कारण तूं ज्ञानखड्गें करूनी । या संशयातें छेदूनी । योग करीं ह्मणजे स्वधर्म आचरोनी । ईश्वराराधन हें मानी ॥३३॥ जें करिसी अर्जुना । तें अर्पी मज मधुसूदना । हें नवमाध्यायीं पंडुनंदना । बोलणार या भावें एथें बोले॥३४॥ एवं जालियाही ज्ञान । ज्ञानी भक्त भगवद्भजन । करिती हें जगज्जीवन । सप्तमीं द्वादशीं सर्वत्र बोलेल ॥ ३५ ॥ सर्वात्मभाव मनीं । कृष्णकृपेनें दिनयामिनी । दृढ असोनिही वामनीं । आवडी सगुणभक्तीची ॥ ३६ ॥ ऐसा गीतार्थ बिंबला मनीं । तेचि टीका जाली वामनी । जे पाहती दिनयामिनी । कृष्णकृपापात्र ते होती ॥ ३७॥ क्लेश स्वल्प महत्फल । ज्ञानें सेवितां कृष्णपदकमल । मोक्षमार्ग हा अति निर्मल । वामन ह्मणे॥३८॥सकलही श्रीकृष्णकरणीं । तोचि आत्मा स्फुरे अंतःकरणीं । तथापि हे टीका त्याच्या चरणीं । भक्तिरसें समर्पी वामन॥१४३९॥

॥ वामनकृत संस्कृत श्लोक ॥

स धर्मः समर्थः पुमर्थश्चतुर्थः कृतार्थोयमध्याय एवं चतुर्थः ।
यथार्थः सदर्थः सतां भूसुराणां प्रियः किं कदर्थो गिरा वा सुराणाम्॥१॥

इति श्रीमद्वामनपंडितविरचितायां यथार्थदीपिकायां चतुर्थोऽध्यायः ॥

---

## अध्याय पांचवा.

॥ श्रीगणाधिपतये नमः ॥ श्रीमते भगवते भगवत्तमाय सर्वोत्तमाय स्वात्मारामपरमहंसप्रियाय मेघश्यामाय देवाधिदेवाय श्रीवासुदेवाय नमः । जय जय परमहंसानंदावतंस । जय भक्तजनमानसहंस । जय जय भवदुःखकंसविध्वंस । देवदेव देवकीनंदन ॥ १ ॥ जय जय सांख्ययोगसंसिद्धरूप । जय जय कर्मसंन्यासक्रमप्राप्यस्वरूप । जय जय सदसद्विश्वरूप । परमहंस पुरुषोत्तम ॥ २ ॥ जय जय परम सदय । जय जय श्रीवत्सहृदय[1] । जय मायातीत मायामय । जगदुदयलयनिलय गोविंद ॥ ३ ॥ जय जय भवरोगवैद्य । जय जय विद्यामृतप्रदाद्य । जय जय स्वात्मत्वैकवेद्य । निखिलवंद्य मुकुंद सच्चिदानंद ॥४ ॥ जय जय श्रीकरुणालय । जय जय कल्याणगुणवरुणालय । जय निखिलनिलय स्वात्मनिलय पालय पालय जगद्गुरो॥५॥

---

१ श्रीवत्सलांछन हृदयीं ज्याच्या. २ अनादि.

वंदूनि तुझे पाय । पंचमाध्यायार्थबोध उपाय । करितों कीं सर्वानर्थ अपाय । परि हरती स्मरतां तुझे श्रीचरण ॥ ६॥ आतां आरंभला अध्याय । एथें आधीं प्रश्न करितो धनंजय । कीं कर्मत्याग बोलोनि कर्ममय । योग मागुती बोलसी ॥ ७ ॥ तरी दोहींमधूनि एक । सांग करूनि बरवा विवेक । ज्याणें मी श्रेय आत्यंतिक । पावेन तुझ्या प्रसादें ॥ ८ ॥ या प्रश्नाचें निमित्त । ऐसें कीं पूर्वी भगवंत । ज्ञानी परिपक्व त्यास निश्चित । कर्म न लगे ऐसें बोलिला ॥ ९ ॥ आणि पूर्वाध्यायाच्या अंतीं । ऐसें बोलिला श्रीपती । कीं कर्मे अगा न बाधती । जो योगसंन्यस्तकर्मा तयासी ॥ १० ॥ ऐसें बोलोनि मागुती । अर्जुनातें ह्मणे श्रीपती । कीं ऊठ युद्ध करावयाप्रती । अर्जुना ॥ ११ ॥ एथें वाटे अर्जुनाला । कीं कर्मत्याग बोलोनिही मला । कर्म करीच ह्मणतो वहिला । दोन्ही कैसीं मी करूं ॥ १२ ॥ त्याग कर्माचा करावा । कीं कर्मयोगचि आचरावा । ह्मणूनि एकचि सांग मज देवा । हा प्रश्न करितो अर्जुन ॥ १३ ॥

॥ अर्जुन उवाच ॥ संन्यासं कर्मणां कृष्ण पुनर्योगं च शंससि ।
यच्छ्रेय एतयोरेकं तन्मे ब्रूहि सुनिश्चितम् ॥१॥

॥ टीका ॥ कर्म टाकणें तयास । ह्मणावें कर्माचा संन्यास । तरी तो कर्मसंन्यास तूं जगन्निवास । बोलतोसि श्रेष्ठत्वें ॥ १४ ॥ पुन्हा मज कर्म करीं । ह्मणूनि ह्मणसी तूं श्रीहरी । तरी या दोन्हीं अंतरीं । कोण बरें ॥ १५ ॥ निश्चय करूनि त्याचा । हेंचि एक करी ह्मणुनी वाचा । बोल ज्याणें करूनि साचा । कल्याणमार्ग मी पावेन ॥ १६ ॥ ऐसा प्रश्न करी अर्जुन । त्याचा भाव जगज्जीवन । जाणे कीं दोंहीमधून एकचि करीन । अर्जुन ह्मणतसे ॥ १७ ॥ मीं त्यास बोलिलों कर्मत्याग । कीं पक्व ज्याचा ज्ञानयोग । हा जिज्ञासु यास कर्मयोग । बोलिलों ॥ १८ ॥ न समजोनि तो अर्थ । प्रश्न करी हा पार्थ । परंतु याचा प्रश्न व्यर्थ । ऐसें कां ह्मणे ॥ १९ ॥ कीं या दोहींवांचोनी । मोक्ष नव्हे ह्मणोनी । दोन्ही मुमुक्षुजनीं । अनुष्ठावीं ॥ २० ॥ तरी हा प्रश्नहीं याचा । कां न अंगीकारूं साचा । कर्मत्याग आणि कर्मयोगाविषयीं वाचा । कां न बोलूं यासी ॥ २१ ॥ ह्मणूनि या भावें उत्तर । आतां देतो सर्वेश्वर । जगद्गुरु स्वतःसिद्ध चतुर । बोलतो भगवान् षड्गुण ॥ २२ ॥

॥ श्रीभगवानुवाच ॥ संन्यासः कर्मयोगश्चनिःश्रेयसकरावुभौ ।
तयोस्तु कर्मसंन्यासात् कर्मयोगो विशिष्यते ॥ २ ॥

॥ टीका ॥ अगा अर्जुना संन्यास । परम अंतरंग मोक्षास । आणि कर्मयोग चित्तशुद्धीस । मुख्य हेतु ॥२३॥ आपलें परम कल्याण । अगा अर्जुना मोक्ष जाण । त्या मोक्षाच्या प्राप्तीस कारण । संन्यास आणि कर्मही ॥ २४ ॥ कल्याणकर हे दोन्ही । दृढ धरी हे गोष्टी मनीं । तथापि कर्मसन्यासाहूनी । कर्मयोग विशेषत्वें वर्तसे ॥ २५ ॥ ऐसें कृष्ण या श्लोकीं बोलिला । परंतु एथें पार्थ शंकला । कीं कर्माहूनि थोर भला । संन्यास सर्वसंमत ॥ २६ ॥ आणि संन्यासाहूनी । कर्म थोर ह्मणोनी । कृष्ण कैसा बोलतो ऐसा मनीं । अर्जुन जाला सशंक ॥ २७ ॥ समजोनि हा अर्जुनाचा भाव । कर्म योगींच देवाधिदेव । संन्यास दावूनि अतएव । श्रेष्ठ कर्मयोग ह्मणतो या श्लोकीं ॥ २८ ॥

॥ श्लोक ॥ ज्ञेयः स नित्यं संन्यासी यो न द्वेष्टि न कांक्षति ।
निर्द्वंद्वो हि महाबाहो सुखं बंधात् प्रमुच्यते ॥ ३ ॥

॥ टीका ॥ अगा करूनिही कर्म । जो द्वंद्वरूपीं सुखदुःखीं सम । तोचि जाणावा परम । संन्यासी ॥ २९ ॥ जो न अपेक्षी विषय चोखट । न निंदी विषय वाईट । ईश्वरीं अर्पी सकळ खटपट । कर्माची ॥ ३० ॥ न उपजे कर्मबंधफल । तोचि कर्मत्याग केवळ । तेव्हां कर्मयोगींही निखिल । कर्मत्याग संन्यास साधला ॥३१॥ विषयाभिलाषवर्जित । आणि सर्वद्वंद्वातीत । कर्मे करी ईश्वरार्पित । तोचि संन्यासी जाणावा ॥३२॥ एवं द्वंद्वातीत । आणि विषयापेक्ष द्वेषवर्जित । या शब्दीं सुचविला निश्चित । करूनि निष्काम ॥ ३३ ॥ एवं काम्यत्याग । तोचि ह्मणावा संन्यासयोग । कर्म करूनि निःसंग । तोचि संन्यासी जाणावा ॥ ३४ ॥ परंतु जऱ्ही निष्काम । ईश्वरीं न अर्पितां कर्म । कर्मबंध घडे हा नेम । तृतीयाध्यायीं यासीच बोलिला ॥ ३५ ॥ याकारणें निष्काम । आणि ईश्वरीं अर्पी कर्म । तोचि जाणावा परम । संन्यासी ऐसा भावार्थ ॥ ३६ ॥ अतएव कृष्ण ह्मणतो । कीं तो अनायासें बंधापासूनि सुटतो । कीं जो न अर्पी ईश्वरीं तो । त्या कर्मै बंध पावणार ॥ ३७ ॥ हा बंधापासूनि सुटतो । यावरूनि ईश्वरीं कर्मै समर्पितो । ऐसा भावार्थ दावितो । श्रीकृष्ण ॥ ३८ ॥ आतां यज्ञादि कर्मकरण । हें तों गृहस्थपण । त्यांत निर्द्वंद्व निष्काम हें लक्षण । संन्यासाचें ॥ ३९ ॥ हें अर्जुनास वाटे कठिन । कीं गृहस्थाचें मन । निष्काम आणि द्वंद्वसहन । कैंवि होय ॥ ४० ॥ जो असेल परम समर्थ । त्यासचि साधेल

हा अर्थ । आपण आइकतों व्यर्थ । उपदेश ऐसा ॥ ४१ ॥ हा भाव पार्थाचे अंतरीं । तों बोलिला श्रीहरी । कीं अगा महाबाहो यापरी । कर्मयोगीही संन्यासी जाणावा ॥ ४२ ॥ तूंही महाबाहु अगा पार्था । साधितोस थोरा थोरा पुरुषार्था । हे गोष्टीही तुज साधेलचि कां वृथा । श्रम मानिसी ॥ ४३ ॥ ऐसा हृदयीं भाव । तों मुखें ह्मणे देव । कीं तूं हें साधिसी अतएव । महाबाहो ह्मणतों तुजला ॥ ४४ ॥ एवं कर्मयोगीं संन्यास । साधे ह्मणूनि कर्मयोगास । पूर्वश्लोकीं मीं जगन्निवास । श्रेष्ठ ह्मणोनि बोलिलों ॥ ४५ ॥ आश्रमांतराविण । गृहस्थाश्रमीं संन्यासपण । हें कर्मयोगाचें श्रेष्ठत्वलक्षण । न ये संन्यासासी ॥ ४६ ॥ कीं संन्यासियासी क्रिया । यज्ञादि कां न घडती धनंजया । यालागीं कर्मयोगाया । द्वावूं न शके संन्यास ॥ ४७ ॥ आणि शिखासूत्रत्याग । विनाकाम्यत्याग संन्यासयोग । आश्रम नव्हे तें सोंग । नटाचें ॥ ४८ ॥ एवं कर्मयोगीं जें निष्कामपण । संन्यासियासी पाहिजे हाचि गुण । तेव्हां संन्यासलक्षण । सिद्ध होतां आश्रम तो शुद्ध ॥ ४९ ॥ आणि कर्मयोगावांचूनि । अशुद्धता असतां मनीं । व्यर्थ संन्यास ह्मणोनी । कर्मयोगी संन्यासी हा थोर ॥ ५० ॥ आश्रमावांचूनि संन्यासयोग । घडे करितां काम्यत्याग । परि कर्मावांचूनि नव्हतां निःसंग । आश्रमसंन्यास न घडे ॥ ५१ ॥ एवं असोनि गृहस्थधर्मी । जो निष्काम गोस्वामी । तो संन्यासी थोर ऐसें जगत्स्वामी । श्रीकृष्ण बोलिला ॥ ५२ ॥ जातां यापुढें श्लोक । तो कां बोले उत्तमश्लोक । त्याचें निमित्त सुज्ञलोक । परिसोत ॥ ५३ ॥ गृहस्थें कर्म करावें । आणि कर्मयोगीं संन्यासातें पाहावें । ऐसें पूर्वश्लोकीं देवाधिदेवें । निरूपिलें ॥ ५४ ॥ परि अर्जुनास कर्मत्याग इष्ट । कीं स्वजनवधीं वाटे कष्ट । कर्म न टाकितां तो स्पष्ट । सद्य हे भीष्मादिक मारावे लागती ॥ ५५ ॥ आणि द्वितीयाध्यायीं शरण । आला शिष्यत्वें वंदूनि चरण । तेव्हांही बोलिला कीं युद्धाविण । कृष्णजी सांगसी तें करीन ॥ ५६ ॥ ह्मणूनि अर्जुन । आइकोनि हें वचन । करावया या पक्षाचें निरसन । युक्ति विचारी ॥ ५७ ॥ कीं मुमुक्षूस निश्चित । कर्मयोग संन्यास दोन्हीं अपेक्षित । ऐसें बोलतो अच्युत । मजलागीं ॥ ५८ ॥ तरी सांख्य योग दोन्ही पक्ष । प्रकटले द्यावया मोक्ष । त्यांत कोण्ही सांख्यें कोणी योगेंच दक्ष । मोक्ष पावती ॥ ५९ ॥ एका मोक्षाचे दोन्ही पंथ । आणि एकाविण एक समर्थ । तैसा संन्यासेंचि अथवा कर्मेंचि पुरुषार्थ ।

कां न साधे ॥६०॥ ऐसी कल्पना अर्जुन । करी तें जाणोनि मन । करितो त्याचें समाधान । भगवान् या श्लोकीं ॥ ६१ ॥

॥ श्लोक ॥ सांख्ययोगौ पृथग्बालाः प्रवदंति न पंडिताः ।
एकमप्यास्थितः सम्यगुभयोर्विंदते फलम् ॥ ४ ॥

॥ टीका ॥ अरे सांख्ययोग दोन्ही । बाल ह्मणती वेगळे ह्मणोनि । बाल ह्मणिजे अज्ञानी । जे नेणती आत्मतत्त्वा ॥ ६२ ॥ वेगळे दोन्ही निश्चित । ऐसें न मानिती पंडित । जयास जालें अधिगत[1] । आत्मज्ञान ॥ ६३ ॥ सांख्ययोग दोहींचिया । वेगळ्या दिसती शास्त्रप्रक्रिया[2] । ह्मणूनि मार्ग वेगळे अगा धनंजया । वाटती ज्ञानहीनासी ॥ ६४ ॥ एकाच वाराणसीप्रती । मार्ग दोनी जे असती । जे काशीस न जाती । त्यांस ते देश वेगळे वेगळे सहजचि॥६५॥तैसी आत्मजिज्ञासा नसे जयास । हीं दोन्हीं शास्त्रें सहजचि तयास । वेगळीं वाटती अज्ञानियास । तो बाल ॥६६॥काशीस जो जाय । त्यास कोण मार्ग जाला तरी काय । दोन्ही मार्गीं चालती पाय । आणि पावणें काशीतेंचि ॥ ६७ ॥ जे काशीस पावले । ते वेगळे मार्ग न ह्मणती भले । एकाच मार्गें जरी गेले । फळ पावले दोन्ही मार्गींचें ॥ ६८ ॥ ह्मणूनि जे पंडित । जे आत्मज्ञानी अत्यंत । ते ह्मणती संत । सांख्ययोग दोन्ही एकचि ह्मणूनी ॥ ६९ ॥ कीं सांख्य योग दोहींमधूनी । एकाच्याच अनुष्ठानेंकरूनी । दोहींची सिद्धि होते ह्मणोनी । सांख्ययोग वेगळे न ह्मणती पंडित ॥७०॥ या दोहींची सिद्धि एक । कैसी ह्मणेल तरी दोहींचा विवेक । सुचवूनि श्रीवत्सांक । एकवाक्यता बोलतो या श्लोकीं ॥ ७१ ॥

॥ श्लोक ॥ यत्सांख्यैः प्राप्यते स्थानं तद्योगैरपि गम्यते ।
एकं सांख्यं च योगं च यः पश्यति स पश्यति ॥५॥

॥ टीका ॥ सांख्यशास्त्राची रीती । जे मुमुक्षु अनुष्ठिती । सांख्य ह्मणावें तया जनांप्रती । अगा अर्जुना ॥ ७२ ॥ त्या सांख्यजनीं जें पाविजे स्थान । योगमार्ग अनुष्ठानींही तेंचि अनुष्ठान । पावती योगनिष्ठजन । मार्ग दोन फळ एक ॥ ७३ ॥ एवं सांख्य योग दोन्ही । एक फलत्वें एकचि ह्मणोनी । ऐसें जो पाहे ज्ञाननयनीं । तोचि पाहणार इतर अंध ॥ ७४ ॥ हे श्लोकार्थस्थिती । परि येथें श्रोते ह्मणती । कीं सांख्ययोग दोहींच्या भिन्न रीती । फल एक तें कैसें ह्मणोनि ह्मणावें ॥ ७५ ॥ यालागीं दोहींचे प्रकार । आणि एक प्राप्ति कैसी तो विचार । संक्षेपरूप निर्धार । बोलणें लाग-

१ प्राप्त. २ शास्त्रांमधी घटन क्रिया.

लें ये स्थळीं ॥ ७६ ॥ सांख्य ह्मणजे संख्येचा भाव । तत्त्वसंख्या विचारानुभव । ज्या विचारें परमात्मवैभव । ठायीं पडे ॥ ७७ ॥ जीं तत्त्वें ब्रह्मांडीं । तींचि तत्त्वें पिंडीं । त्या तत्त्वांची मांडणी मांडी । तें सांख्यशास्त्र ॥ ७८ ॥ आत्मतत्त्व एक । प्रकृतितत्त्वें जडें अनेक । यांचा करितां विवेक । ठायीं पडे आत्मतत्त्व ॥ ७९ ॥ त्या आत्मसमुद्रावरी । जड प्रकृतितत्त्वांचिया लहरी । तें पाहतां न उरे उरी । भेदाची ॥ ८० ॥ दिसोनि नानातरंग । उदकचि असे अंतरंग । या दृष्टीं पाहतां जाला भंग । द्वैतभावाचा ॥ ८१ ॥ एवं कळलें आत्मतत्त्व । तेंचि ब्रह्म सर्वात्मत्व । त्या चित्समुद्रीं जडत्व । तरंगाकारें ॥ ८२ ॥ ऐसा सांख्यशास्त्राचा अनुभव । हेंचि वेदांताचें वैभव । या गीतेंतचि देवाधिदेव । त्रयोदशाध्यायांत वर्णील ॥ ८३ ॥ यावेगळें जें सांख्यमत । तेथें प्रकृतीचें प्राधान्यसंमत । तो सिद्धांत असंमत । व्यासादिकां ॥८४॥ एवं व्यासादिकां संमत । तें वेदांतसंमत सांख्यमत । जेथें निर्मूळ होय अत्यंत । द्वैतमोह ॥ ८५ ॥ हे सांख्यबोधरीती । ठसावली ज्याच्या चित्तीं । त्यांस निःसंदेह मुक्ती । हें त्रयोदशीं श्रीकृष्णचि बोलेल॥८६॥ त्रयोदशाध्यायश्लोक ॥ "य एवं वेत्ति पुरुषं प्रकृतिं च गुणैः सह । सर्वथा वर्तमानोऽपि न स भूयोऽभिजायते"॥टीका॥ जो जाणतो या पुरुषातें । आणि गुणांसहित प्रकृतीतें । तो पुन्हा न पावे जन्मातें । जरी सर्वथा प्रपंचीं वर्तला ॥ ८७ ॥ सांख्यमार्ग ये रीती । जे आत्मतत्त्व पावले सुमती । तेंचि निरोधितां चित्तवृत्ति । पावती तें पावणें ह्मणावें योग ह्मणोनी ॥ ८८ ॥ इत्यादि या योगरीती षष्ठाध्यायीं । वर्णिजेतील याच गीतेच्या ठायीं । एवं दोन्ही उपायांत एक्या उपायीं । फलप्राप्ति जे उभयत्र बोलती ॥ ८९ ॥ यालागीं सांख्ययोग एक । जो पाहे करूनि ऐसा विवेक । तोचि देखणा डोळस आत्यंतिक । अगा अर्जुना ॥ ९० ॥ एथेंही कोणी ह्मणती । कीं सांख्यें कळावी आत्मस्थिति । तेव्हां योगें निरोधाव्या चित्ताच्या वृत्ती । योगचि कैसा स्वतंत्र ॥ ९१ ॥ आणि सांख्यें आत्मत्व कळलें । कळोनिही जों योगावांचूनि चित्त नाहीं वळलें । तें मागुती खवळलें । आत्मविस्मृतीनें अनात्मत्वीं ॥ ९२ ॥ तेव्हां सांख्यासही योगाविण । नसे मोक्षप्रदत्व स्वतंत्रपण । हे श्रोतयांची शंका श्रीकृष्ण । हरिताजाला श्लोकीं पूर्वीलियाच ॥९३॥ पूर्वार्धश्लोक । "एकमप्यास्थितः सम्यगुभयोर्विंदते फलम्" ॥टीका॥ हे वेगळे मार्ग दोन्ही । परंतु

एकही या दोंमधूनी । सम्यक् ह्मणिजे बरविया प्रकारें करूनी । अनुष्ठितां फलप्राप्ति दोहींची ॥ ९४ ॥ या सम्यक्शब्देंकरूनी । अनुष्ठान बरविया प्रकारें ह्मणोनी । गहन भाव या वचनीं । सूचविला ॥ ९५ ॥ कीं सांख्यें आत्मा कळे । तेव्हां योगें वृत्ति निरोधितां चित्त वळे । तो अष्टांग योग काय करितां मिळे । स्वस्वरूपीं चित्त ॥ ९६ ॥ त्यांत कोणी अष्टांग करिती । न करितां केवळ सांख्य स्थिती । सम्यक् प्रकारें अनुष्ठिती । स्वरूप लक्षिती सर्वत्र ॥ ९७ ॥ पटीं तंतुच दिसती । परि नसावी विस्मृती । धरितां तंतूची स्मृती । पट तितका तंतुचि असे ॥ ९८ ॥ ऐसी चित्ताची एकाग्रता । तेही योगाच ह्मणावी तत्त्वता । परि अष्टांगयोग न आचरतां । योग नव्हे ॥ ९९ ॥ स्पर्शोनिही योगगती । ते सांख्याचि ह्मणविती । कीं जे न अनुष्ठितो । अष्टांगमार्ग ॥ १०० ॥ एवं योगाविण ही योगस्थिती । पावले जे सम्यक् शांति अनुष्ठिती । एक सांख्यें आत्मा समजोनि सुमती । सम्यक्प्रकारें अनुष्ठिती योगातें ॥ १ ॥ सांख्यतत्त्वांची रीती । सम्यक्प्रकारें सर्वदा चालिती । ते तत्त्वसंख्या सोडूनि निरोधिती । चित्तवृत्तीच सम्यक् प्रकारें ॥ २ ॥ एवं सांख्यातें जरी सोडी । आणि सम्यक्प्रकारें योगचि जोडी । तथापि दोंही फळीं जे एकचि गोडी । ते पावतो ॥ ३ ॥ टाकूनी अष्टांग रीती । सांख्यमात्राचि सम्यक् अनुष्ठिती । तेही सिद्धि पावती । मार्गद्वयाची ॥ ४ ॥ एकांत एक मिळती । तथापि सम्यक्प्रकारें एक रीती । अनुष्ठितां साधक पावती । सिद्धि दोहीं मार्गांची ॥ ५ ॥ आधीं आपल्या ग्रामाबाहेर जावें । तेथूनी दोघीं दों मार्गीं भरावें । तेव्हां एकाचि मार्गातें सम्यगनुष्ठितां पावावें । एका मार्गें फल दोहीं मार्गांचें वाराणसी ॥ ६ ॥ ऐसें आत्मत्त्व समजावें । मग एकें सांख्यचि सम्यक् अनुष्ठावें । x अष्टांगयोगीं चित्त लावावें । त्यास एका एकाच मार्गें फल दोहीं मार्गांचें ज्ञानपरिपाक ॥ ७ ॥ ऐसे कर्मयोग आणि संन्यास । एका वेगळे एकास । कां स्वतंत्रत्व नये ह्मणूनी अर्जुनास । वाटतां चालिलें हें प्रकरण ॥ ८ ॥ भाव कीं अगा अर्जुना । हें जें वाटलें तुझिया मना । हें सांख्ययोगातेंचि घडे परि घडों सकेना । कर्मयोग आणि संन्यास या दोहींस॥९॥ घडों सके सांख्ययोगरीती । ते उपपादूनि श्रीपती । न घडे कर्मयोग आणि संन्यास या दोंप्रती । ह्मणूनि ह्मणतो या श्लोकीं ॥ १० ॥

॥ श्लोक ॥ संन्यासस्तु महाबाहो दुःखमाप्तुमयोगतः ।
योगयुक्तो मुनिर्ब्रह्म न चिरेणाधिगच्छति ॥ ६ ॥

॥ टीका ॥ संन्यास तो ऐसा योगावांचूनि । प्राप्त नव्हे ह्मणूनी । सांख्ययोग पूर्वश्लोकद्वयेंकरूनी । स्वतंत्र आणि एक फलत्वें तुज बोलिलों ॥११॥या भावें ह्मणतो हरी । कीं सांख्ययोगास ऐसें घडे परी । कर्मयोगावांचूनि संन्यासाची पायरी । न वेंघवे ॥१२॥ योगावांचूनि योगफळ । सांख्येंचि करूनी पाविजे केवळ । सांख्यावांचूनि सांख्यफळ निष्फळ । प्राप्त होय योग सम्यक् अनुष्ठितां ॥ १३ ॥ तैसें कर्मयोगाविण । न साधे संन्यासपण । दों प्रकारें लक्षण । ज्या संन्यासाचें ॥ १४ ॥ मुख्य काम्यत्यागें स्वकर्म । करणें परम संन्यासधर्म । दुसरें शिखासूत्रत्यागें आश्रम । हें लक्षणद्वय संन्यासाचें ॥ १५ ॥ नित्य विहितकर्में करी । त्यावेगळें काम्य हातीं न धरी । नव्हे कर्मत्यागें बद्ध तेव्हां संन्यास परी । कर्मयोगेंचि साधे हा संन्यास ॥ १६ ॥ एवं हाही संन्यास । जो कर्मयोग करील त्यास । आणि काम्यत्याग संन्यास हाही ज्यास । कर्मयोग साधे त्यातेंचि ॥ १७ ॥ कीं न टाकितां टाकितां काम्यकर्म । न घडे चित्तशुद्धिप्रद धर्म । तो कर्मयोगी नव्हे सकाम । जो कामनेनें कर्म आचरतो ॥ १८ ॥ काम्य टाकी सम्यक्प्रकारें । आणि कर्मयोग आचरे सम्यक् आदरें । तेव्हां ब्रह्म पावेल विचारें । वेदवाक्याचिया ॥१९ ॥ एवं संन्यास विहितकर्माविण । न साधे आणि कर्मयोगपण । सिद्ध नव्हे जों काम्यत्यागलक्षण । संन्यास सम्यक् प्रकारें घडेना ॥ १२०॥ षष्ठाध्यायांत दुसरिया श्लोकीं।"यं सन्यासमिति प्राहुर्योगं तं विद्धि"या वचनीं बोलेल कीं । कर्मयोगी नव्हे तोंवरी या लोकीं । जों काम्यत्यागसंकल्प होईना ॥ २१ ॥ एवं सांख्ययोग एक एकाविण । समर्थ तैसें संन्यास आणि कर्मयोगपण । न साधे हें श्रीकृष्ण । पूर्वापर अनुसंधान येथें सूचवी ॥ २२ ॥या श्लोकीं जगन्निवास । ह्मणे कर्मयोगावांचूनि संन्यास । प्राप्त नव्हे ह्मणूनि परि टीकाकारांस । प्रकरणानुरूप हेंही येथें सूचवी ॥ २३ ॥ कीं जैसा कर्मयोगावांचूनी । संन्यास न पाविजे ह्मणोनी । मी बोलिलों यावरूनि मनीं । तुह्मीं हेंही विचारा ॥ २४ ॥ कीं काम्य टाकिल्याविण । न घडे कर्मयोगपण । आणि संन्यासत्वाचेंही हेंचि लक्षण । कीं त्याग काम्यकर्माचा ॥२५॥"काम्यानां कर्मणां न्यासं संन्यासं"ह्मणोनी । अष्टादशाध्यायांत बोलणोंचि आहे स्ववचनीं । त्यावरूनी संन्यासावांचूनी । कर्मयोगास न घडे कर्मयोगत्व ॥ २६॥ एवं काम्यत्याग मुख्य संन्यास । ज्या संन्यासें संन्यासाश्रमास । संन्यासत्व घडे अन्यथा आयास । शिरोमुंडण सकामातें ॥ २७ ॥

तोही तेव्हां संन्यासधर्म । कीं चित्तशुद्ध होय करितां कर्म । परंतु कर्मयोगींच संन्यासधर्म । सांपडे काम्यकर्म त्यागितां ॥ २८ ॥ एवं न करितां कर्मयोग । करी शिखासूत्रत्याग । तोही अशुद्धचित्त मनीं आठवूनी भोगं । भ्रष्ट होणार ॥ २९ ॥ आतां काम्यत्याग मनीं । तो कर्मयोगयुक्त हो संन्यासी मुनी । कर्मयोगें संन्यासें दोहींकरूनी । ब्रह्म पावतो अतिशीघ्र ॥ १३० ॥ या उत्तरार्धेंकरूनी । कर्मयोगही काम्यत्याग संन्यासावांचूनी । सिद्धयोग नव्हे ह्मणोनी । सूचविलें ॥ ३१ ॥ कीं योगयुक्त जो मुनी । तो ब्रह्म थोडच्या काळेंकरूनी । पावतो ह्मणोनी । श्रीकृष्ण ह्मणे ॥३२॥ योगयुक्त तो जो युक्त कर्मयोगेंकरूनी । तो तेव्हां योगयुक्त कीं जेव्हां संन्यासी मुनी । कीं काम्यत्याग संन्यास साधिला ह्मणोनी । तो मुनि संन्यासी आणि कर्मयुक्त ॥ ३३ ॥ एवं हें श्लोकत्रयें[1] । या तिहीं श्लोकीं हा निश्चय । कीं कर्मयोग आणि संन्यास हें साधनद्वय[2] । दोहींविण ब्रह्म साधेना ॥ ३४ ॥ एक दोहींमधूनी । धरावें हें अर्जुनाचे मनीं । परी तैसें न घडे ह्मणोनी । श्रीकृष्णभाव ॥ ३५ ॥ सांख्ययोग दोन्ही । मोक्षमार्ग त्यामधूनी । एक एकावांचूनी । सम्यगनुष्ठितां मोक्षफलप्राप्ति दोहींची ॥ ३६ ॥ हें घडों शके अर्जुना । परी कर्मयोग संन्यास यांत ऐसें घडेना । कीं संन्यास कर्मयोग एक एकाविना । न घडे सर्वथा ॥ ३७ ॥ कीं "संन्यासस्तु महाबाहो दुःखमाप्तुमयोगतः" ह्मणोनी । संन्यास जों न पाविजे कर्मयोगावांचूनी । ऐसें 'संन्यासस्तु' ह्मणतां या "तु" शब्देंकरूनी । हें तों न घडे त्यासारखें हा अर्थ ॥ ३८ ॥ ऐसा अबाधित[3] अर्थ । टाकूनि कोणी व्यर्थ । सांख्ययोग व्याखाणिती तो नव्हे समर्थ[4] । अर्थ बाधित होतसे ॥ ३९ ॥ सांख्यशब्दें घेती संन्यास । योग ह्मणती कर्मयोगास । दोहींस एकत्व आणितां आयास । पावती फार ॥ ४० ॥ एकचि मार्ग दोहींमधूनी । अनुष्ठितां फलप्राप्ति दोहींची ह्मणोनी । अर्थ स्पष्ट होतो यावरूनी । मोक्ष ह्मणावा कर्मेंचि अथवा संन्यासेंचि ॥ ४१ ॥ तरी कर्माविण नव्हे शुद्धचित्त । आणि संन्यासाविण नव्हे मोक्ष प्राप्त । तो संन्यास तों तेव्हां निश्चित । जेव्हां चित्तशुद्धि कर्मयोगें ॥४२॥ आणि श्लोकार्थ तो स्पष्टतर । कीं दोहींमधूनि एकचि सम्यक् सादर । अनुष्ठितां फळ निर्विकार । पाविजे दोहींचेंही ॥ ४३ ॥ एथें ते ऐसें[5] ह्मणती । कीं कर्में चित्तशुद्धि बरवी ये रीती । होतां ज्ञानद्वारें

१ हे तीन श्लोक. २ हीं दोन साधनें. ३ निर्दोष. ४ खरा अर्थ. ५ स्वीकारितो.

होय प्राप्ती । मोक्षाची ॥ ४४ ॥ आणि संन्यासही बरविया प्रकारें । अनुष्ठितां पूर्वी जें कर्म केलें त्याणें बरें । त्याचें आणि संन्यासाचेंही जें फळ खरें । तें कैवल्य हा ह्मणे पावतो ॥ ४५ ॥ एवं कर्मयोग जरी केला । तरी काम्यत्याग संन्यास जों नाहीं साधला । तों कोणीं ज्ञानद्वारा नाहीं पावला । मोक्षफळासी ॥ ४६ ॥ आणि कर्मयोगें चित्तशुद्धी । नव्हतां न घडे संन्याससिद्धी । हें याच गीतेंत आणि सर्वत्रही प्रसिद्धी । गोंफोंदितां न ये सर्वथा ॥ ४७ ॥ ह्मणोनि ऐसें ह्मणती । कीं संन्यास अनुष्ठितां बरेविये रीती । पूर्वी अनुष्ठिली कर्मयोगस्थिती । या दोहींचें फळ तो पावतो ॥४८॥ एवं संन्यासाहूनि पहिलें । कर्म बरविये रीतीं अनुष्ठिलें । तेव्हां एकावांचूनि एक कैसें जालें । प्राप्त फळ कैवल्य ॥ ४९ ॥ आतां एक साधारण । आणि एका अनुष्ठानीं सम्यक्पण । ऐसें ह्मणतांही होती क्षीण । पक्ष सकळ शास्त्रांचे ॥ ५० ॥ कीं कर्मही करावें बरें । संन्यासही अनुष्ठावा सम्यक्प्रकारें । तेव्हां कैवल्यफळ तरी याही विचारें । अर्थ होतो हा व्यर्थ ॥ ५१ हें सांख्ययोगांसचि घडे । कीं दोहींमधूनि एकीचकडे । सादरत्वें उडी पडे । आणि एकीकडे अनादर ॥ ५२ ॥ तरी फळ उभयांचें जोडे । तैसें एथें कदापि न घडे । कीं एक पक्षीं जरी कांहीं उणें पडे । फळ विघडे दोहींचें ॥५३॥ कीं वस्त्र बरें धुतलें । आणि बरेंचि रंग रंगविलें । तरीच तें मोलास आलें । नासे उणें पडतां एकत्र ॥ ५४ ॥ आतां रंगाचे दोनी प्रकार । तैसे सांख्ययोगमार्गप्रचार । भलत्या एका रंगें अंबरें । सुरंग होय ॥ ५५ ॥ एवं या वेगळा अर्थ । बरें विचारितां अवघा व्यर्थ । हाचि अर्थ समर्थ । जो या टीकेंत वर्णिला ॥५६॥ सांख्ययोग शब्दांचा स्पष्ट । अर्थ हा सोडोनि कां कल्पावा क्लिष्ट । न साधतां सावयास कष्ट । कां करावे ॥ ५७ ॥ दूषणें लागती अपार । परंतु ग्रंथ वाढेल फार । असो आतां पुढें काय विचार । बोलेल श्रीकृष्ण तें पाहों ॥ ५८ ॥ आतां यानंतर श्लोक । तो कां बोले उत्तमश्लोक । त्याचें निमित्त सुज्ञ लोक । परिसोत आधीं ॥ ५९ ॥ कर्मयोग आणि संन्यास । दोनही साधनें अगत्य मोक्षास । हें परिसतां अर्जुनमानस । समाधान पावलें ॥ ६० ॥ परंतु एक शंका चित्तीं । उत्पन्न जाली मागुती । कीं कर्मयोग संन्यास दोन्ही साधती । तऱ्ही ज्ञानेंचि मोक्ष ॥ ६१ ॥ आणि ज्ञान जाहलियाही उपरी । कर्म करणें घडेच शरीरीं ।

---

१ झुगारितां. २ चांगल्या प्रकारें. ३ दुर्बल. ४ वस्त्र. ५ उत्तम.

जों कर्म करणें बंध तोंवरी । तरी मोक्ष जितां घडेना ॥ ६२ ॥ जो कर्मास लिंपतो । जीवन्मुक्त कैसा ह्मणावा तो । तेव्हां जितां मोक्ष ह्मणती होतो । हेंही अघटित ॥ ६३ ॥ हे शंका पूर्वींही निरसली । तथापि अर्जुनास स्मृति नाहीं राहिली । ह्मणूनि मागुती उपजली । हे शंका॥ ६४ ॥ ह्मणूनि शंका-परिहार । पुन्हा करि[illegible] सर्वेश्वर । या मिसें अकर्तृत्वप्रकार । विशद आतां बोलेल ॥ ६५ ॥ त्यांत एक कर्म करितेकाळीं । बुद्धीनें स्वअकर्तृत्व सांभाळी । कोणी पट तंतु ऐसें न्यहाळी । सर्व भूतीं ब्रह्म ॥ ६६ ॥ तोही अलिप्त कर्मीं ॥ ज्याची चित्तवृत्ति सर्वत्रही ब्रह्मीं । आधीं तयास वर्णितो जगत्स्वामी । या श्लोकीं ॥ ६७ ॥

॥ श्लोक ॥ योगयुक्तो विशुद्धात्मा विजितात्मा जितेंद्रियः ।
सर्वभूतात्मभूतात्मा कुर्वन्नपि न लिप्यते ॥ ७ ॥

॥ टीका ॥ अगा सर्व भूतें चराचरें । आणि ज्या जीवात्म्याचीं हीं शरीरें । आणि पंचमहाभूतें थोरें । आत्मा या सकळांचा जो स्वयें ॥ ६८ ॥ तो कर्म करितेही काळीं । आपण अकर्ता ऐसें जरी न सांभाळी । तो शरीर कर्मीं जरी चाळी । तरी करूनिही लिंपत नसे ॥ ६९ ॥ कीं आपल्या देहासहित । सर्व भूतीं देखे स्वात्मत्व निश्चित । त्यास त्याच्या कर्मासहित । प्रपंच अवघा निजात्माचि ॥ १७० ॥ प्रारब्धें सुखदुःखभोग घडे । तो भोग लागे प्रतिबिंबाकडे । हा विवेक्यपणें जरी निवडे । तरी प्रतिबिंब जीव जे त्यांचा आत्मा स्वयें हाचि ॥ ७१ ॥ कीं सर्व प्रतिबिंबोपाधितरंग । ज्यांत बिंबला चित्समुद्र श्रीरंग । त्या उपाधितरंगीं स्वयें अंतरंग । चित्स्वरूप आपणचि सर्वत्र ऐसें अनुभवी ॥ ७२ ॥ त्या उपाधींत प्रतिबिंब गवसे । त्याचा आत्माही हाचि असे । एवं जीवात्मत्वही भिन्न न दिसे । हाचि आत्मा तयाचा ॥ ७३ ॥ सूर्य भासला उदकीं । तेजोरूप तें उदकाचि कीं । तैसा जीवोपाधीच जीवलोकीं । चिदंशें जीवत्व पावला ॥ ७४ ॥ एवं सर्व भूतशब्दें सर्व देह । आत्मशब्दें जीवमात्रचि निःसंदेह । पुन्हा भूतशब्दें पंचमहाभूतसमूह । दुसरिया आत्मशब्दें जड पट तंतु आत्मा चैतन्य॥७५॥ ऐसा सर्वभूतात्मभूतात्मा ह्मणोनी । श्रीकृष्ण बोलिला स्वमुखेंकरूनी । तो करूनिही कर्म अलिप्त होऊनी । सर्वात्मभावें असतसे ॥ ७६ ॥ हा उत्तरार्धाचा अर्थ । आधीं वर्णिला ऐसा यथार्थ । पूर्वार्धाचा अर्थ समर्थ ।

---

१ प्रत्यक्ष होई. २ सांपडे; मिळे

प्रकट होतो हेतुरूपें यावरी ॥ ७७ ॥ कीं सर्वात्मभावें समरसें । आणि तेंचि चित्त विषयभोगीं पैसे । तरी अहंकारावीण कैसें । विषय स्फुरती भोगेच्छेंकरूनी ॥ ७८ ॥ म्यां भोग भोगावे ऐसा । मीपणींच वासनेचा ठसा । ज्यास मीपण तो कैसा । अलिप्त कर्मे करूनिही ॥ ७९ ॥ हे शंका परिहरी । ऐसें पूर्वार्धाच्या अंतीं हरी । वचन बोलतो कीं जितेंद्रिय तोंवरी । ऐसा अनुभव तयासी ॥ १८० ॥ कीं जो ऐसा तो जितेंद्रिय । त्यास मी विषय भोगीन हा कैसा निश्चय । वासनात्यागें मनोजय । जाहला ज्याचा ॥ ८१ ॥ हा अर्थ 'जितेंद्रिय' पदाहूनि आधीं । 'विजितात्मा' या शब्दें-करूनि साधी । आत्मशब्दें येथें अर्थ बोधी । मन ह्मणोनी ॥ ८२ ॥ देह-रथाचे घोडे । इंद्रियें फिरविती चहूंकडे । तेव्हां मनास वागोरेपण घडे । कीं मन इंद्रियें आटोपती॥८३॥ ऐसेंचि बोलते श्रुती । आतां वागोरे सारथ्या-आधीन असती । तरीच बुद्धीस वेद ह्मणती । सारथि ह्मणोनी ॥ ८४ ॥ एवं मनोजयाची सिद्धी । तेव्हां कीं जेव्हां शुद्ध जाली बुद्धी । आत्मशब्देंचि बुद्धि ही प्रसिद्धी । ऐसी संस्कृतांत ॥ ८५ ॥ ह्मणूनि 'विजितात्मा' या शब्दाआधीं । 'विशुद्धात्मा' ह्मणूनी हा अर्थ साधी । येथें आत्मशब्दें करूनि बोधी । बुद्धि ह्मणोनी ॥८६ ॥ तो विजितात्मा तरी । कीं विशुद्धा-त्मा जाला जरी । 'विशुद्धात्मा' या शब्दें हरी । सूचवी कीं बुद्धि शुद्ध ज्याची विशेषें ॥ ८७ ॥ बुद्धि एक वृत्ति सत्त्वाची । जेथें घडामोडी नि-श्चयाची । सर्वां निश्चयांत गोष्टी साची । एक पाहतां ॥ ८८ ॥ कीं व्हावें आपलें बरवें । वाईट कधीं न व्हावें । भलता निश्चय याच भावें । सत्त्ववृत्ति करी ते बुद्धि॥८९॥ जीवात्मा पुरुष बुद्धि गृहिणी । ह्मणे सुखी असो दुःखी न हो माझा धनी । परि गृहिणीच्या मूढपणीं । घात होतो पतीचा॥१९० ॥ अपथ्यीं पथ्य मानी । स्वामीस चारी गृहस्वामिनी । त्या अपथ्यभोजनीं दिनयामिनी । पुरुष दुःखी तिच्या मूढत्वें ॥९१॥ तीस सत्संगवैद्य भेटे । आणि अपथ्य पथ्यसें वाटे । तरी ते सुमार्गी राहटे । सुख तेव्हां पुरुषासी ॥ ९२ ॥ यालागीं ज्या पुरुषाची गृहिणी । सत्संगें सच्छास्त्रें शहाणी । त्यास दुःखाची कहाणी । कानींही पडेना ॥ ९३ ॥ यालागीं अनुभवि-याची बुद्धी । कर्मयोगें पावली शुद्धी । ज्या कर्मयोगीं संन्यास हे प्रसिद्धी । जे सूत्रप्राय येथेंही सूचविली ॥ ९४ ॥ त्या कर्मयोगें होऊनि युक्त । शुद्ध-

१ लगाम. २ स्त्री. ३ पति; स्वामी. ४ खायवी. ५ चाले; वर्ते. ६ संक्षेपानें.

बुद्धि मनोजयें जितेंद्रिय जीवन्मुक्त । जाला तोही कां विषयासक्त । होईल ॥ ९५ ॥ या भावें कृष्ण नित्यमुक्त । आधींच ह्मणे कीं तो योगयुक्त । तेव्हां शुद्ध बुद्धि जितमन जितेंद्रिय जीवन्मुक्त । सर्वात्मभावें कर्मी लिंपेना ॥ ९६ ॥ अर्थ ऐसा होतो सिद्ध । यालागीं आधीं उत्तरार्ध । वाखाणूनि मग पूर्वार्ध । ये रीती वाखाणिलें ॥ ९७ ॥ आतां यानंतर श्लोक । तो कां बोले उत्तमश्लोक । त्याचें निमित्त सुश्लोक । परिसोत आधीं ॥ ९८ ॥ मी अकर्ता ऐसी । स्मृति नसोनिही मानसीं । सर्वत्र सर्वकर्मा अहर्निशीं । आत्मत्व पाहे ॥ ९९ ॥ तरी तया पुरुषाला । कर्मलेपेन न घडे या बोला । बोलोनि आतां ज्याला । स्मृति सर्वदा स्वअकर्तृतेची ॥ २०० ॥ तो कर्म आचरतेकाळीं । अकर्तृत्व आपलें कैसें न्यहाळी । हें आतां वनमाळी । बोलतो या दों श्लोकीं ॥ १ ॥

॥ श्लोक ॥ नैव किंचित् करोमीति युक्तो मन्येत तत्त्ववित् ।
पश्यञ्शृण्वन्स्पृशञ्जिघ्रन्नश्नन्गच्छन्स्वपञ्श्वसन् ॥ ८ ॥
प्रलपन्विसृजन्गृण्हन्नुन्मिषन्निमिषन्नपि ।
इंद्रियाणींद्रियार्थेषु वर्तंत इति धारयन् ॥ ९ ॥

॥ टीका॥ अर्जुना तत्त्व कळलें ज्याला । आत्मा अकर्ता कळलें त्याला । मी कर्ता ऐसा अहंकार ज्याला । आत्मरज्जु कळतां मृषा सर्प ॥ २ ॥ मीपणातें अवलंबूनी । मी कर्ता ह्मणोनी । बुद्धि ह्मणे सचेतन होऊनी । आत्मसत्तेनें ॥ ३ ॥ जडा मीपण नसे सत्ता । दिसे चैतन्यास कर्तृता । जीवात्मयास बद्धता । ऐसी संगें कुबुद्धीच्या ॥ ४ ॥ वाटे भोंवते हे मेदिनी । परि भोंवंडी आपल्याच नयनीं । ते भूमि अचळ ह्मणोनी । कळे भोंवंडी जातां नेत्रांची ॥ ५ ॥ तैसा जातां अहंकार । बुद्धीस आत्मा दिसे निर्विकार । तेव्हां अकर्तृत्वनिर्धार । होय तो ह्मणावा तत्त्वज्ञ ॥ ६ ॥ ऐसा तत्त्वज्ञ तो । बुद्धीकरूनि ऐसें मानितो । कीं आत्मा कांहीं करितो । हें घडेना ॥ ७ ॥ तो आत्माच आपण । आपण कांहीं करीत नाहीं निर्गुण । ऐसी स्मरे अकर्तृत्वखूण । तेही बुद्धी ॥ ८ ॥ आत्मा अबोलणा बोले वाचा । हा निर्णय सर्वथा साचा । तथापि शब्द दोहीं निर्णयाचा । वाचाचि करी ॥९॥ तैसा आत्मा अकर्ता गुणातीत । हें मानणें बुद्धीचेंचि निश्चित । तरीच तो तत्त्वज्ञ ह्मणूनि संमत । जगद्गुरु श्रीकृष्णासी ॥२१०॥ या भावें श्रीकृष्ण ह्मणतो । कीं तत्त्वज्ञ अगा अर्जुना तो । जो आपण कांहींच करीत नाहीं

१ कर्मसंबंध. २ मिथ्या. ३ फिरते. ४ पृथ्वी. ५ गिरकी.

ऐसें मानितो । हें मानणेंही नसे आपणा ॥ ११ ॥ तेव्हां तत्त्वज्ञ ह्मणोनी । ह्मणावा कीं जरी ऐसें मानी । एवं अकर्तृत्व ऐसें मानूनी । तो असतो ॥ १२ ॥ आतां अकर्तृत्वं आपलें कळलें । आणि त्या स्मरणीं चित्त नाहीं वळलें । तें चित्त सत्त्वनिश्चित खवळलें । रजतमेंकरूनी ॥ १३ ॥ रजोगुण जें तें इंद्रिय । तम जो तो विषय । सत्त्वीं मिसळतां हें द्वयें । अद्वयस्फुरण मग कैचें ॥ १४ ॥ रज तम आणि सत्त्व । या त्रिगुणपटींही तंतु आत्मत्व । जो स्मरे सदा हें तत्त्व । तो पूर्वश्लोकीं वर्णिला ॥ १५ ॥ हें सर्वात्मत्वस्मरण । नश्वरीं जडीं नित्य चैतन्यस्फुरण । हें सिद्धाचें लक्षण । पूर्वश्लोकीं वर्णिलें ॥ १६ ॥ आतां आपण जडदेह । हा फिटला संदेह । स्वअकर्तृत्वस्मरणीं होय निःसंदेह । आणि त्याचे पूर्वसंस्कार मोडती ॥ १७ ॥ त्यानें आपलें चिदात्मत्व । ज्यास सर्वथा अकर्तृत्व । स्फुरे त्या स्मरणीं योजावें सत्त्व । रजतमावेगळें करूनी ॥ १८ ॥ चित्त चैतन्यस्वरूपीं योजे । ऐसें तत्त्वज्ञें आधीं केलें पाहिजे । ज्याणें ऐसें केलें त्यास ह्मणिजे । युक्त ह्मणोनी ॥ १९ ॥ एवं ऐसा युक्त जो तत्त्ववेत्ता । तो सांभाळी आपली अकर्तृता । तो आपण कांहीं करीत नाहीं तत्त्वता । ऐसें मानितो ॥ २० ॥ ऐसीं जगद्वयपदें । पूर्वार्धीं योजिलीं पदें । तीं वाखाणिलीं 'अनु' पदें । त्यानें चि ॥ २१ ॥ आतां कोण कोण कर्म । करितां आपण अकर्ता निर्धर्म । ऐसें मानितो हें सगुणब्रह्म । श्रीकृष्ण बोलतो दों अर्धीं ॥ २२ ॥ पाहतां ऐकतां स्पर्शतां । हुंगतां भक्षितां चालतां । निजतां ओढितां सोडितां । श्वासोच्छ्वास ॥ २३ ॥ बोलतां मळमूत्र टाकितां । हातेंकरूनि कांहीं देतां घेतां । आणि निमिषोन्मेषही हालतां । मानी कीं कांहीं करीत नाहीं आपण ॥२४॥ तरी कर्म घडे तें कैसें । अर्जुना ह्मणसील ऐसें । तरी ऐकतों जैसें । कर्तृत्व पाहतो कर्माचें ॥२५॥ मागिलिया दोंचरणीं । अकर्तृता बोलिला चक्रपाणी । तें कर्म कैसें घडतें हे वाणी । या शेवटिल्या अर्धीं बोलतो ॥२६॥ जो जयाचा विषय । त्या विषयांत तें इंद्रिय । वर्ततें ऐसा इंद्रियसमुदाय । स्वस्वविषयीं वर्ततो ॥ २७ ॥ ऐसें बुद्धीकरूनी । धरितो तो ह्मणोनी । आपलें अकर्तृत्व सांभाळूनी । कर्म ऐसें पाहतो ॥ २८ ॥ कीं रूप पहाती नेत्र । शब्द ऐकती श्रोत्र । घेतसे स्पर्शमात्र । त्वगिंद्रिय ॥ २९ ॥ इत्यादि जें इंद्रिय । घेतसे आपलाला विषय । तैसाच कर्मेंद्रियसमुदाय । स्वस्वकर्मीं

१ तमोगुण. २ हे दोन. ३ शब्द. ४ डोळे झांकतां उघडितां.

वर्ततो ॥ १३० ॥ आपण नव्हे इंद्रिय । कीं घेऊं कांहीं विषय । आपण असतां कर्मेंद्रियसमुदाय । तरी प्राप्त होतें कर्तृत्व भजलागीं ॥ ३१ ॥ ऐसा दों श्लोकीं साधकोत्तम । वर्णिला तत्त्वज्ञ परम । जो पूर्वसंस्काररूप भ्रम । चिदात्मत्वस्मृतीनें मोडतो ॥३२॥ या मागील जो श्लोक । तेथें सिद्धलक्षण उत्तमश्लोक । बोलिला आतां जिज्ञासु उपासक । जें तत्त्व जाणों इच्छिती ॥ ३३ ॥ त्यांस आत्मज्ञान नसे । ह्मणोनि स्वकर्तृत्व न दिसे । आपण कर्ता हृदयीं जों वसे । तोंवरी बंध ॥ ३४ ॥ कर्में बंध जया । नव्हे ईश्वरप्रसाद कर्में तया । ईश्वरप्रसादावांचूनिया । ज्ञान नव्हे ॥ ३५ ॥ या शंकेचा परिहार । पूर्वीं जाला वारंवार । परि थारला नाहीं तो निर्धार । अर्जुनमनीं ॥ ३६ ॥ आणि जो गुरुगम्य विचार । तो न आइकतां वारंवार । चित्तास दृढ संस्कार । वसत नाहीं ॥ ३७ ॥ गुरूनेंही पुनःपुन्हा । सांगितलेंच सांगावें शिष्यजना । 'तत्त्वमसि' ह्मणोनिया वेदवचना । नऊदां गुरू उपदेशी ॥३८॥ पुनःपुन्हा बोलणें यास । शास्त्रकार ह्मणती अभ्यास । ह्मणोनि पुनःपुन्हा अर्जुनास । हें प्रकरण उपदेशितो ॥ ३९ ॥ आतां जिज्ञासुजनीं । बंधन पाविजे ज्या कर्मेंकरूनी । तें श्रीकृष्ण बोलतो येथूनि । श्लोकद्वयें ॥ २४० ॥

॥ श्लोक ॥ ब्रह्मण्याधाय कर्माणि संगं त्यक्त्वा करोति यः ।
लिप्यते न स पापेन पद्मपत्रमिवांभसा ॥ १० ॥ ५।१०

॥ टीका ॥ ब्रह्मीं सगुणीं कर्में । समर्पूनि भागवतधर्में । फलसंग टाकूनि कर्में । निष्कामें जो करितो ॥ ४१ ॥ तो पापें नव्हे लिप्त । कीं कर्मबंध त्याचा होतो समाप्त । कमलपत्र जैसें अलिप्त । उदकीं उदकेंकरूनी ॥ ४२॥ श्लोकाचा इतकाच अर्थ । परि कितीएका पदीं गूढ भावार्थ । जो प्रकट होतां यथार्थ । श्रोतयां वाटे ॥ ४३ ॥ कीं ब्रह्मीं कर्में समर्पूनी । लिप्त नव्हे पापेंकरूनी । ह्मणूनि ह्मणतां या वचनीं । भाव न काढितां नव्हे वाक्यार्थ ॥ ४४ ॥ कर्में समर्पितो ब्रह्मीं । पाप कैचें त्या कर्मीं । तत्रापि संग टाकूनि पदपद्मीं । कर्में समर्पी सगुणाच्या ॥ ४५ ॥ तो तों पुण्यकर्में करी । आणि कृष्ण पापलेप परिहरी । एवं तें पुण्याचि परी । पाप ह्मणावें बंधकत्वें ॥ ४६ ॥ सुवर्णाची तरी बेडी । तैसें पुण्यही बंध घडी । एवं पुण्यही पापचि उघडी । हे गोष्टि होते भावार्थें ॥ ४७ ॥ ऐसे जिज्ञासु निपुण । जे जे

१ स्थिर, दृढ झाला. २ गुरूपासूनच समजणारा.

रीती ब्रह्मार्पण । करिताति तें कर्मलक्षण । आणि निमित्तही वर्णितो या श्लोकीं ॥ ४८ ॥

॥ श्लोक ॥ कायेन मनसा बुद्ध्या केवलैरिंद्रियैरपि ।
योगिनः कर्म कुर्वंति संगं त्यक्त्वात्मशुद्धये ॥ ११ ॥

॥ टीका ॥ कायेंकरूनि कर्म । स्नानसंध्यादि स्वधर्म । मनेंकरूनि उत्तम । भगवद्ध्यान ॥ ४९ ॥ भगवद्भजनेंचि मोक्ष होय । इत्यादि बुद्धीचा निश्चय । कीं त्याच्या प्रसादेंचि अद्वय । ज्ञानसिद्धी ॥ २५० ॥ यावेगळीं इंद्रियेंही करूनि । कर्में करिती तीं केवळ ह्मणोनि । इंद्रियांस केवल शब्द लावूनि । बोलेल या भावें ॥ ५१ ॥ कीं रजोगुणाचीं इंद्रियें । तीं सहज वासनामयें । त्यांत निष्काम भगवदर्पण निश्चयें । प्रवर्तती तीं केवळें ह्मणावीं ॥ ५२ ॥ श्रवणकीर्तनादि कर्म । भगवत्प्रीतीनिमित्त जो धर्म । घडे इंद्रियांतें उत्तम । तें कर्म केवल इंद्रियें घडतसे ॥ ५३ ॥ ऐसीं कर्में कर्मयोगीं । करिती चित्तशुद्धीलागीं । संग टाकूनि निःसंगी । भक्तियोग करीती ये रीतीचा ॥ ५४ ॥ आतां ऐसींच कर्में करितां दिसती । आणि बंध तरी ते पावती । ह्मणोनि निवडोनि दोन्ही रीती । श्रीपती बोले या श्लोकीं ॥५५॥

॥ श्लोक ॥ युक्तः कर्मफलं त्यक्त्वा शांतिमाप्नोति नैष्ठिकीम् ।
अयुक्तः कामकारेण फले सक्तो निबध्यते ॥ १२ ॥

॥ टीका ॥ ईश्वरीं कर्में अर्पी भक्त । संग टाकूनि फळीं विरक्त । तो ईश्वरीं योजिला यालागीं युक्त । तो ह्मणावा ॥ ५६ ॥ युक्त ऐसा कर्मफळ । टाकूनि ईश्वरार्थचि केवळ । कर्में करी तो शांति अचळ । पावतो ॥ ५७ ॥ तद्विपरीत अयुक्त । कर्में करूनि फळीं आसक्त । तो बंध पावतो अभक्त । अर्जुना ॥ ५८ ॥ काम उपजला मनीं । तो कर्में करवी यावरूनी । सुटावें ज्या कर्मबंधापासूनी । हा वश तयातेंचि ॥ ५९ ॥ ऐसा सकाम तो अयुक्त । कीं चित्त नसे ईश्वरीं युक्त । तो फळींच आसक्त । बंध पावतो यालागीं ॥ २६० ॥ आतां यानंतर श्लोक । तो कां बोले उत्तमश्लोक । त्याचें निमित्त सुज्ञलोक । परिसोत आधीं ॥ ६१ ॥ ग्रंथ येथवरी आला । तेथें निर्णय इतका जाला । कीं कर्तृत्व नाहीं ज्ञानियाला । स्वअकर्तृत्व कळलें जयासी ॥ ६२ ॥ जयास नाहीं ज्ञान । त्यांत दोन प्रकारचे जन । जिज्ञासु एक ते जरी ज्ञानहीन । कर्में समर्पिती ईश्वरीं ॥ ६३ ॥ जिज्ञासु ऐसे ते निष्काम । फलबंध पावती जे सकाम । परि दोहींसही अ-

कर्तृत्वधर्म । ठाउकें नसे ॥ ६४ ॥ अकर्तृत्व जाणती ज्ञानी । ते वर्णिले दों प्रकारेंकरूनी । एक सर्वही ब्रह्म ह्मणोनी । पाहती स्वकर्मासहित ॥ ६५ ॥ एक दर्शनश्रवणादि काळीं । इंद्रियें स्वविषयीं वर्तती ऐसें न्यहाळी । कर्तृत्व आपणावरूनि टाळी । अकर्तृत्व पाहे आपुलें ॥ ६६ ॥ तेथें शंकेचें स्थळ । एक राहिलें कीं चिदात्मा केवळ । तो अज्ञानियास अकळ । तरी अकर्ता न। ६७ ॥ तो असोचि अकर्ता । जरी वाटला कर्ता । तरी कर्तृत्वाची वार्ता । न लगे तयासी ॥ ६८ ॥ आतां बुद्धीस अकर्तृत्व त्याचें कळे । तेव्हां अकर्तृत्व त्यास फळे । परि जों बुद्धि तन्मयत्वीं न वळे । तों तो ज्ञानी न ह्मणवे अकर्ता ॥ ६९ ॥ बळली तथापि त्या बुद्धीवांचूनी । कर्म न घडे इंद्रियवर्गेंचिकरूनी । बुद्धीस अकर्तृत्व यावरूनी । लागलें तेव्हां कैसा अकर्ता ॥ २७० ॥ हे शंका हरावयास उत्तमश्लोक । बोलतो आतां हा श्लोक । गहन वृष्टि अर्थावलोक । निर्मत्सरीं करावा ॥ ७१ ॥

॥ श्लोक ॥ सर्वकर्माणि मनसा संन्यस्यास्ते सुखं वशी ।
नवद्वारे पुरे देही नैव कुर्वन्न कारयन् ॥ १३ ॥

॥टीका॥ अगा सत्त्वाचे भेद चारी । अंतःकरण चित्त बुद्धि मन या प्रकारीं । त्यांत आत्मस्फुरण अंतरीं । हें अंतःकरण॥७२॥आत्मचैतन्यें करूनी । चेतवी इतरां जडां ह्मणोनी । चित्त या नांवें सज्जनीं । सत्ववृत्ति वर्णिली दुसरी ते ॥ ७३ ॥ आत्मा नव्हे कर्ता । बुद्धीस निश्चयाची वार्ता । आत्मा तीहूनिहि परता । तिचा प्रकाशक ॥ ७४ ॥ बुद्धि करी निश्चय । मन संकल्पविकल्पकल्पनामय । त्यांत आत्मत्व अव्यय । अंतःकरणेंकरूनी अनुभवी ॥ ७५ ॥ चित्त आपणासहित । जडें चेतवी समस्त । प्रारब्ध सरे तोंपर्यंत । असेचि तें ॥७६॥ तें सुषुप्तीं जैसें तमीं । समाधींत तैसें ब्रह्मीं । त्यासहितही संयमी । अकर्तात्मत्वीं योजी बुद्धीतें ॥ ७७ ॥ बुद्धि अंतःकरणीं पावे लय । तें अंतःकरण चिन्मय । उरलें संकल्पविकल्पमय । मन याचें ॥ ७८ ॥ इंद्रियें त्या मनेंकरूनी । विषयीं वर्तती पूर्वसंस्कार स्फुरोनी । बुद्धि अकर्तात्मत्वीं मिळोनी । वेगळेपणें पाहे त्याही मनास ॥७९॥ यालागीं मनासह । वेगळीं इंद्रियें आणि देह । वेगळे विषय वेगळें कर्म निःसंदेह । आपण अकर्ता बुद्धीनें ह्मणे ॥ ८० ॥ ऐसा जो बुद्धिमंत । तो या मनासहित । कर्म वेगळें टाकूनि अत्यंत । सुख जैसें होय असतो तैसा ॥ ८१ ॥ मन त्याचें जें ये रीतीं । मोकळें न सोडी त्याहीप्रती । धरूं नेदूनि विषयप्रीती । वासनारहितबुद्धीनें ॥ ८२ ॥ पुरुष अश्व हातीं धरी ।

आर्तोही दे त्यास परी । होऊं नेदी रानभरी । मागुती वेगळा पाहे साक्षित्वें ॥ ८३ ॥ ऐसें पाहतां कांहीं । कर्म तो करीतचि नाहीं । नवद्वारपुरीं देहीं । असतो सुखें ॥ ८४ ॥ नवद्वारपुर । हें मानूनि शरीर । त्यांत असे सुखवस्ती नर । देहांत देही तो ऐसा ॥ ८५ ॥ नगरीं उदंड लोक वसती । बोलती चालती खाती हुंगती । देखोनिही तयांप्रती । निरभिमान जैसा ॥८६॥ मनासहित इंद्रियें । वेगळीं ऐशा निश्चयें । हा न करी कांहीं स्वयें । हें सिद्ध जालें ॥ ८७ ॥ परि याच्या सत्तेंकरूनी । तीं कर्में करिती ह्मणोनी । हा न करी स्वयें परी करवी ऐसें मानूनि मनीं । ह्मणी भावील अर्जुन ॥ ८८ ॥ ह्मणूनि ह्मणतो हरी । कीं तो न करीही ज्यापरी । न करवीही याच प्रकारीं । भगा अर्जुना ॥ ८९ ॥ सूर्यप्रकाश दृष्टी । त्या दृष्टीनें वर्त्ते सृष्टी । परि करणें करविणें दोन्ही अदृष्टीं । नसती सूर्याचिया ॥ २९० ॥ समीप होतां चुंबकशिळा । लोहशलाका होती चंचळा । हे चुंबकाची सहजकळा । नाचणें नाचवणें दोन्ही न तयासी॥९१॥एवं इंद्रियें चाळी । त्या मनासह तीं वेगळीं । करणें करविणें या भावें टाळी । अनुभवीं आपलें ॥ ९२ ॥ ऐसा कर्मावेगळा । तोचि कर्मसंन्यासी आगळा । सर्वथा कर्माहूनि निराळा । वर्णिती ते वर्णोत ॥ ९३ ॥ सर्व कर्में मनासहित । संन्यासूनि ऐसीं त्यागूनि निश्चित । न करी करवी सुखें अत्यंत । नवद्वारपुरीं वसे श्लोकार्थ ऐसा॥९४॥ आतां यानंतर श्लोक । तो कां बोले उत्तमश्लोक । त्याचें निमित्तही सुश्लोक । परिसोत आधीं ॥ ९५ ॥ कर्मकर्तृत्वपरिहार । अकर्त्तात्मबोधें सर्वेश्वर । बोलताजाला वारंवार । गीतेंत या ॥ ९६ ॥ आणि पाहतां लोकव्यवहार । सर्व करवितो ईश्वर । तात्पर्य न कळोनि आधार । यास वेदाचाही मानिती ॥ ९७ ॥ श्रुति ॥ एष ह्येव साधु कर्म कारयति यमेभ्यो लोकेभ्य उन्निनीषते । एष उ एवासाधु कर्म कारयति तं यमेभ्यो लोकेभ्यो निनीषते ॥ श्रुत्यर्थ ॥ वेद ह्मणती ईश्वर । उत्तम लोकास नेऊं पाहतो जो नर । त्यास साधुकर्मी तत्पर । करीतसे ॥९८॥ अधोलोकास जो पुरुष । न्यावा ह्मणूनि जो इच्छी परमपुरुष । असाधु कर्में सदोष । त्या हातीं करवितो ॥ ९९ ॥ वेदवचनाचें ये रीतीं । तात्पर्य विरळा जाणती । कीं ईश्वर उत्तम अधम गती । किंनिमित्त देऊं इच्छितो ॥ ३०० ॥ उत्तम ज्यास गती । देईन ह्मणतो जगत्पती । त्यानें यास काय देऊनि प्रीति । संपादिली याची ॥ १ ॥

१ लोहचुंबक पाषाण. २ लोखंडाची कांब. ३ शक्ति.

तो काय याचा सोयरा । आणि वैरी याचा काय दुसरा । दुर्गतीस ज्या नरा । नेईन ह्मणतो ॥ २ ॥ एथें ह्मणावें जैसा बाळ । पुतळे करूनि खेळे खेळ । बरीं वाईट कर्मे करवूनि सकळ फळ । बरें वाईट देतसे ॥ ३ ॥ तो तरी मूढ तें अचेतन । ईश्वर सर्वज्ञ हें सचेतन । एकास सुख एकास दुःख देतां निरंजन । ह्मणावा विषम आणि निर्दय ॥ ४ ॥ एकासी बरा एकासि वाईट । तेव्हां विषम ह्मणावा चोखट । आणि दुःखें देतो तेव्हां उत्कृष्ट । निर्दय ह्मणावा ॥ ५ ॥ जो विषम आणि निर्दय । तो ईश्वरचि नव्हे हा निश्चय । जो सर्वसम सर्वांवरी सदय । ईश्वर तोचि ॥ ६ ॥ विषम निर्दय मानिती । आणि ईश्वरास भजती । ते आपल्या पित्यास पिंड देती । नाम कुळ उच्चारूनि चांडाळाचें ॥ ७ ॥ विष्णुशर्मा नामें भला । ब्राह्मण ऋषिगोत्रीं उपजला । चांडाळासंगें पिंड दीधला । त्याच्या पुत्रें कुलगोत्रनामें चांडाळाच्या ॥ ८ ॥ ते पिंड न पावती पितरां । भजन न पावे ईश्वरा । तो सम सदय असोनि ज्या नरा । विषम निर्दय वाटला ॥ ९ ॥ जे दुष्ट दुराचारी । ते भोजन न करोत माझ्या घरीं । ऐसें ह्मणतां भले सदाचारी । घरा जाती कां तयांच्या ॥ ३१० ॥ विषम निर्दय ईश्वर । मानूनि करील जो नमस्कार । सम सदय सर्वेश्वर । नमस्कार घेईल तो किमर्थ ॥ ११ ॥ एवं सर्वज्ञ सर्वसम । सर्वभूतीं दयाळु परम । तोचि एक पुरुषोत्तम । या भावें भजावा ॥१२॥ जे ऐसें ईश्वरातें न समजती । त्यांस सांगों नये भजनरीती । अष्टादशीं " न च मां योभ्यसूयति " । ह्मणूनि कृष्ण अर्जुनातें बोलिले ॥ १३ ॥ दोष लावणें निर्दोषास । असूया ह्मणावी तयास । ह्मणूनि मज दोष लावी त्या पुरुषास । अर्जुना नको सांगों हे गीता ॥ १४ ॥ एवं जीवाहातीं कर्म । करवी स्वयें सर्वोत्तम । तरी तो निर्दय आणि विषम । सहजचि होय ॥ १५ ॥ तरी ऐसें कां बोलती श्रुति । ह्मणूनि कोणी ह्मणती । तरी वेदार्थ गहन तात्पर्यगती । पहावी एथें ॥ १६ ॥ ईश्वर कल्पतरूपम । विषमफळ देऊनिही सम । हें या गीतेंतचि पुरुषोत्तम । चतुर्थाध्यायांत बोलिला ॥१७॥ ॥ चतुर्थाध्यायश्लोकार्ध ॥ " ये यथा मां प्रपद्यंते तांस्तथैव भजाम्यहम्"॥ ॥ टीका ॥ जे जैसें मातें भजती । मी तैसाच भजतों तयांप्रती । या गीतावाक्यानुरूप श्रुती । वाखाणाव्या इत्यादि॥१८॥ कीं वेद जे अनंत । त्याचा मथितार्थ हा भगवंत । गीताश्लोकरूपें बोले ह्मणूनि संत । याच्या आधारें श्रुति वाखाणिती ॥ १९ ॥ आणि उगाच स्व-

भास नेऊं पाहे । उगाच नरका नेऊं ह्मणताहे । श्रुति ह्मणती हें न साहे । वैषम्य निर्दयत्व ईश्वरीं ॥३२०॥ तेव्हां जो स्वर्गास जावें ह्मणतो । त्यास ईश्वर त्याच साधुकर्मी प्रवर्तवितो । सूर्य जैसा प्रकाशितो । सन्मार्गी जातां नेत्रांसी ॥ २१ ॥ जो नरकास जाईन ह्मणतो । ह्मणजे नरकप्रद कुमार्गी चालतो । त्यास ईश्वर त्याच मार्गी प्रवर्तवितो । कीं कुमार्गही सूर्यच दाखवी ॥ २२ ॥ एवं जगत्प्रकाशक सत्ता । तेथें शुद्धमायायोगें ईश्वरता । जैसी काष्टादियोगें नेत्रप्रकाशता । दिसे अग्नीची ॥२३॥ अग्नि स्वयें प्रकाशक । परी पाहिजे काष्टादि उपाधि कांहींएक । तैसा मायाशबलित प्रवर्तक । हृषीकेश बुद्धींद्रियांचा ॥ २४ ॥ प्रकाशी ब्रह्मसत्तेंकरूनी । गति दे मायांश धरूनी । सत्ता तेथें प्रवर्तक ह्मणोनी । प्रकाशका श्रुति ह्मणती प्रवर्तकातें ॥ २५ ॥ तो मायाशबल सर्वोत्तम । प्रकाशक आणि कल्पवृक्षोपम । जो ज्या मार्गें जातो उत्तमाधम । फळ त्यास तोंचि देऊं इच्छितो ॥ २६ ॥ तदनुरूप कर्में करावितो । ह्मणजे त्या त्या वाटा त्यास प्रकाशितो । या तात्पर्यें वेद बोलतो । कीं जीव संकल्पें गति संकल्पोनि करावितो कर्में ॥ २७ ॥ ऐसा अर्थ सिद्ध जाला । परी डाव उरला एका बोला । कीं अधोगतीस जावें ऐसा आपला । घात कोण हो इच्छितो ॥ २८ ॥ कोणी न इच्छितां अधोगति । अधोगति द्यावया जगत्पति । ऐसा जो कर्में करवितो ह्मणती श्रुति । हें तात्पर्य एथें नलगे ॥ २९ ॥ धरूनि ऐसी ही शंका । श्रुतिसिद्ध कलंक निष्कलंका । लावूं ह्मणोनि मोहपंका । माजी दाटूनि कां बुडावें ॥३३०॥ ज्यानें जैसें कल्पावें । कल्पवृक्षापासूनि तैसेंचि पावावें । एथें ईश्वर कल्पवृक्षस्वभावें । द्यावा आणि कल्पणें तें कर्म ॥ ३१ ॥ जो कल्पी जैसें । कल्पवृक्ष फळ दे तैसें । हा दृष्टांत आतां दार्ष्टांतिकीं ऐसें । सिद्ध होतें ॥ ३२॥ कीं जो कर्म करी जैसें । ईश्वर फळ दे त्यास तैसें । कर्म करी तो नरकाऐसें । तोंचि फळ देऊं इच्छितो ईश्वर ॥ ३३ ॥ मग त्या हातीं तैसेंचि कर्म । करवितो ह्मणजे सगुणब्रह्म । त्याची बुद्धि आणि इंद्रियग्राम । नरकमार्गीच प्रकाशितो ॥ ३४ ॥ एवं जो प्रकाशक । त्यास श्रुति ह्मणती प्रवर्तक । हा अर्थ आत्यंतिक । सिद्ध पूर्वीच जाहला ॥३५॥ ईश्वर नव्हेचि कांहीं कर्ता । तेव्हां अजागलस्तन ऐसी वार्ता । आणितील सर्वथा अकर्ता । तो ह्मणतां ॥३६॥ हें ह्मणणेंही खरें । कीं निर्धर्मपणें असिजे तें ईश्वरें । परी ऐसें त्यास मानी

---

१ बोकडाच्या गळ्यांतील स्तनासारखें व्यर्थ. २ प्रसिद्ध करतील.

त्याचें बरें । नव्हे कदापि ॥ ३७ ॥ कीं जे जैसे भजती । त्यांस फळ तैसेंचि दे विश्वपती । जे तया अजागलस्तन ह्मणती । त्याचें सत्कर्म ही अजागलस्तन होतसे ॥ ३८ ॥ "भोक्तारं यज्ञतपसां" ह्मणोनि । या अध्यायांतीं या श्लोकेंकरूनी । सत्कर्म भोक्तृत्व त्या ईश्वरास यावरूनी । फळ त्यास अजागलस्तनरूपें तो देतो ॥३९॥ त्यास आळवावें ज्या नांवें । तो फळ देतो त्याच भावें । अजागलस्तनस्वभावें । फळ त्यांस जे ईश्वरास ह्मणती अजागलस्तन ॥ ३४० ॥ सामर्थ्य तेथें सत्ता । ऐसें असोनि सम सदय अकर्ता । जे ऐसा मानिती विश्वभर्ता । दे परम समर्थ फळ तोही तयांस ॥ ४१ ॥ एवं अजागलस्तनलक्षण । स्थापिती तेचि अवलक्षण । "ये यथा मां प्रपद्यंते"[१] ह्मणवूनि कमलेक्षण । या वचनीं हा अर्थ सुचवितो ॥ ४२ ॥ आतां सद्भाव कुभाव । धरोनि कर्म करी जीव । तोही तदंश तेव्हां स्वयमेव । तोचि कर्ता हें सिद्ध ॥ ४३ ॥ आणि कर्मे ईश्वर न करवी । त्यांत सदयता समता बरवी । दोन्ही साधितां कोण मिरवी । अपसिद्धांत ऐसा ॥ ४४ ॥ आतां श्रीकृष्ण मनीं । इत्यादि भावार्थ धरूनी । हा अर्थ या श्लोकेंकरूनी सिद्ध करितो ॥ ४५ ॥

॥ श्लोक ॥ न कर्तृत्वं न कर्माणि लोकस्य सृजति प्रभुः ।
न कर्मफलसंयोगं स्वभावस्तु प्रवर्तते ॥ १४ ॥

॥ टीका ॥ आपण कर्ता ह्मणूनी । मानी कर्मेंकरूनी । हें कर्तृत्व आणि दोन्ही । जीव लोकांचीं नसती निर्मित ईश्वरें ॥ ४६ ॥ जो मानितो मी कर्ता । त्यास वाटतें कीं मी भोक्ता । आणि कर्म सत्य मानितो याकरितां । सत्य भोग वाटे तयाला ॥ ४७ ॥ आत्मज्ञानें सकळ । मिथ्या जालें तरी कर्मफळ । भोगितां सत्य वाटे त्याचें मूळ । कर्तृत्वकर्म सत्यत्वें मानणें ॥ ४८ ॥ ऐसें कर्मकर्तृत्व या दोहींचें फळ । त्याचा संयोग यथाकाळ । होतो जैसी येतां फळाची वेळ । वृक्ष फळतो ॥ ४९ ॥ हीं दोन्ही ईश्वर निर्मित नाहीं कीं कर्मानुसार । फळ होतें कर्ता नर । तोचि भोग पावतो ॥ ३५० ॥ तेव्हां ईश्वर अजागलस्तन । ऐसें ह्मणतील मूर्ख जन । ह्मणोनि या श्लोकीं मधुसूदन । प्रभु ह्मणतो ईश्वरासी ॥ ५१ ॥ कीं तो प्रभु ह्मणजे समर्थ । तोचि देतो सकळ पुरुषार्थ । कर्मफलसंयोगीं अनर्थ । तयांस जे न भजती तयासी ॥५२॥ फळाची इच्छा करिती । ते दाटूनि पायीं शृंखळा भरिती । कोणी मानूनि अजागलस्तनरीती । स्वयें होती अजागलस्तन

---

१ ईश्वर. २ निरुपयोगी; निंद्य. ३ उत्तमाधम बुद्धि.

॥ ५३ ॥ जे त्यास कर्मे समर्पिती । आणि तूं समर्थ जगत्पती । प्रवर्तविती स्वजनमती । सुखमार्गी भाविती ऐसें ॥ ५४ ॥ या भावें भजती । त्यांस तैसाच तो विश्वपती । सन्मार्गी प्रवर्तवूनि सद्गति । देत असे ॥ ५५ ॥ आतां कैसा नव्हे समर्थ । कैसा नेदी ह्मणात्रा पुरुषार्थ । त्यावाचूनि पुरवी मनोरथ । ऐसा दुसरा असेना ॥ ५६ ॥ आपण कर्मे करवून आपण । फळ देतां लागतें विषमपण । फळ नेदी भजलियावीण । इतुकियाचं करितां ॥५७ ॥ तथापि कर्म जड अमंगळ । कर्ता असमर्थ विस्मरणशील । याला-गीं भोगवी कर्मफळ । स्वयें तोचि जगदीश्वर ॥ ५८ ॥ ऐसें असोनि या श्लोकीं हरी । ह्मणतो कीं कर्मफळसंयोगही परी । तो ईश्वर निर्माण न करी । ह्मणोनी ॥ ५९ ॥ हाही विरुद्ध दिसतो बोल । परी भावार्थ यामाजीं खोल । त्याणें अकर्तृत्व साधूनिही होतें फोल । विरुद्धपणें हें ॥ ३६० ॥ कीं पिकाचें शेत । तें सकल फलदायक निश्चित । परंतु पेरिलें बीजचि असे फळत । तें फळ न निर्मी यापरी ॥ ६१ ॥ तथापि भूमीवांचूनि फळ । बीज न देऊं शके केवळ । निवोनि भूमींत सकळ । फलरूप होतीं तीं बीजें ॥ ६२ ॥ कर्मे ईश्वराविण । फळों न शकती आपण । ईश्वरशक्तीकरूनि फळपण । तीं पावतीं ॥६३ ॥ तथापि अंकुराकारें । तें बीजचि होऊनि सारें । कणीस होऊनि नानाप्रकारें । यथाकाळें होतसे भागाई ॥ तैसा सर्वकर्मफलदाता । कर्मफलसंयोगनिर्माणकर्ता । तथापि फळतसे तत्त्वतां । कर्मेचि ॥ ६५ ॥ मागुती जैसी भूमि कांहीं । कोणास फळ देत नाहीं । तैसें न पडे वैषम्य-प्रवाहीं । ईश्वरत्व ॥ ६६ ॥ तथापि भूमीवांचूनी । फळ नाहीं ह्मणोनी । मागुती प्रभुशब्देंकरूनी । सुचविला हा भाव ॥ ६७ ॥ एवं कर्मा-नुरूप भोग । ह्मणूनि ईश्वरफलसंयोग । न करी आणि कर्तृत्वकर्म-संग । जीवांस नेदी ॥ ६८ ॥ तरी जीवकर्मप्रवृत्ति । प्रवर्तते कोण रीतीं । चतुर्थचरणीं जगत्पती । हेंही बोलतो ॥ ६९ ॥ चतुर्थचरण ॥ " स्वभा-वस्तु प्रवर्तते" ॥ ॥ टीका ॥ स्वभाव ह्मणजे संस्कार । चित्तास झोंवले जे जे विकार । ते ते संस्कारप्रकार । कर्मसंकल्प करविती ॥ ३७० ॥ तदनरूप बुद्धीच्या निश्चयें । कर्मी प्रवर्तती इंद्रियें । एवं संस्कारयोगें स्वयें । कर्मी लोक प्रवर्तती ॥ ७१ ॥ पाहतां ऐसियापरी । संस्कारेंचि जो तो कर्मे करी । ह्मणूनि ह्मणतो हरी । कीं 'स्वभावस्तु प्रवर्तते' ॥ ७२ ॥ कीं प्रव-र्ततो कोण ह्मणोनी । बरें विचारितां मनीं । या संस्कारावांचूनी । प्रवर्ते

कोण ॥७३॥ चित्तसत्त्व निर्मळ। चित्प्रतिबिंबकारक जवळ । तें पीतश्वेत रक्त श्यामळ। हरिद्रादियोगें जळ जैसें ॥ ७४ ॥ ज्यास जैसी संगती। त्याची तैसी संस्कारगती । सत्संगें भला होऊनि मागुती। दुष्ट होतो दुःसंगें ॥ ७५ ॥ संस्कारानुरूप आचरे। संस्कारानुरूपचि संचरे। यालागीं कर्मी वावरे। संस्काराचि ॥७६ ॥ प्रवर्ततो जो संस्कार। त्याचेही दोन्ही प्रकार। एक नैसर्गिक निर्धार। सहज एक ॥ ७७ ॥ नैसर्गिकाचें मूळ। सहज स्वभाव केवळ। सहजाचा होतो प्रबळ। नैसर्गिक ॥ ७८ ॥ सत्संगें सन्मार्ग न धरी। जें वाईट तेंचि करी। दुष्ट संस्कार जो यापरी। तोही नैसर्गिक ह्मणावा ॥ ७९ ॥ दुःसंगें दुर्मार्ग न धरी। जें बरें तेंचि करी। उत्तम संस्कार जो यापरी। तोही ह्मणावा नैसर्गिक ॥ ३८० ॥या संस्काराचें मूळ। सहज स्वभाव केवळ। त्याहूनि हा नैसर्गिक तो प्रबळ। परि होतो सहजाचिपासूनी ॥ ८१ ॥ नदी उगमीं[1] निघते। ते जिकडे नेली तिकडेचि जाते। तेचि थोर होऊनि जेव्हां वाहते। तेथें न मुरडे[2] कदापि ॥ ८२ ॥ जन्मांतरीं ये रीती। प्रबळ ज्यास सत्संगती। या जन्मीं ते संस्कारस्थिति। दुष्टसंगें मोडेना ॥८३॥ जन्मांतरीं येचि रीती। प्रबळ ज्याला दुःसंगती। या जन्मीं ते संस्कारस्थिती । न मोडे सत्संगेंही करूनी ॥ ८४ ॥ प्रबळला नाहीं संस्कार। तो मोडे संगानुसार। परंतु पाहतां विचार। कर्मी संस्कारचि प्रवर्ततो ॥ ८५ ॥ तदनुरूप कर्तृत्वकर्म। कर्मानुरूप फलसंगम। दोन्ही न करी समर्थ परम। समसदय जगदात्मा जगदीश ॥ ८६ ॥ आतां यानंतर श्लोक। तो कां बोले उत्तमश्लोक । त्याचें निमित्त सुज्ञलोक । परिसोत आधीं ॥ ८७ ॥ कर्म न निर्मी ईश्वर। आणि कर्मफलसंयोगाचाही प्रकार। ह्मणूनि बोलिला जगदाधार। पूर्वश्लोकीं ॥८८॥ आतां ज्या गोष्टीनिमित्त। कर्म करवणें तया नव्हे संमत। ते गोष्टी या श्लोकीं अच्युत। बोलतसे ॥ ८९ ॥ कर्म करवितां जो दोष । देखोनि न करवी निर्दोष। तो दोष सुचवितो परमपुरुष। या श्लोकीं॥ ३९० ॥

॥ श्लोक ॥ नादत्ते कस्यचित्पापं न चैव सुकृतं विभुः।
अज्ञानेनावृतं ज्ञानं तेन मुह्यंति जंतवः ॥ १५ ॥

॥ टीका ॥ अगा विभु समर्थ कोणाचेंही। पाप आपण घेत नाहीं। अथवा पुण्य उत्तम ह्मणूनि कांहीं । तेंही घेत नाहीं कोणाचें ॥ ९१ ॥ म्हणजे एका हातीं एक । अपराध करवूनि पाहे कौतुक। तो अपराध

---

१ हळदी इत्यादिकांच्या योगानें. २ स्वाभाविक. ३ आरंभीं. ४ परते. ५ मान्य.

अभिज्ञलोक । जो करवी त्याचा मानिती ॥ ९२ ॥ अपराध कर्त्याचा । जो करवी त्यास लागे साचा । तेव्हां जो करवितो तयाचा । अपराध आपण घेतसे ॥ ९३ ॥ ऐसें येचि रीती । करवी पाप जरी जनांहातीं । तरी तें पाप घे जगत्पती । तया जनांचें ॥ ९४ ॥ ज्या गोष्टींत ऐसा दोष । तें कां करील निर्दोष । ह्मणोनि ह्मणतो परमपुरुष । कीं विभु पाप घेत नाहीं कोणाचें ॥ ९५ ॥ बरवेंचि केलें जें सुकृत । तेंही घेत नाहीं निश्चित । ह्मणजे नाहींच करवित । कोणाहातीं सुकृतही ॥ ९६ ॥ एथें कोणी ऐसें ह्मणती । कीं सुकृतें जनांस उत्तम गती । तें न करवी जरी जगत्पती । तरी निर्दय ह्मणों तयाला ॥ ९७ ॥ शंका ऐसी पडते । परी विचार पाहतां उडते । कीं सत्कर्मीं वर्तवूं जातां विंघडते । दयालुता तयाची ॥ ९८ ॥ कीं पापकर्मीं रतीं । त्यास बळें लावितां सुप्रवृत्ती । पुढें बरें परी तत्काळ पावती । ते दुःख ॥ ९९ ॥ माता लेंकरांस माती । खाऊं नेदी तों तीं रडती । हितावह दूध पाजितांही पावती । कष्ट ते समयीं ॥ ४०० ॥ पापींच रत ते ऐसे । कष्ट पावतील इतकेंही न सोसे । त्याला ह्मणतां तुह्मी कैसें । निर्दय ह्मणोनि ॥ १ ॥ आतां याहीवरी हरी । कोणी ह्मणती यापरी । कीं त्याचें पापफल न निवारी । निर्दय तेव्हां कां नव्हे ॥ २ ॥ पाहतां या दोन्ही परी । निर्दयत्व लागतें ईश्वरीं । परंतु पापप्रवृत्ति स्वयें ईश्वर निवारी । पापफळ पावे त्याच्या स्वकर्माचें ॥ ३ ॥ यांत पापप्रवृत्तीतें निवारणें । ईश्वरास लागेल दुःख देणें । एथें तो जगदीश निर्दयपणें । स्वकर्तृत्वें दिसतसे ॥ ४ ॥ जीवांचें कर्म जीव । भोगिती जें केलें स्वयमेव । त्यांत ईश्वरकृत लेशलव । नसतां निर्दयत्व लागेना ॥ ५ ॥ या निश्चयें निश्चित । ईश्वर न करवी सुकृत । कीं कष्ट पावती पापरत । सुकृत करवणें याही कर्तृत्वें ईश्वराच्या ॥ ६ ॥ आतां याहीवरी । कोणी ह्मणतील या परी । कीं पापीं आवडीच कोणी न धरी । समर्थ न करी कां ऐसें ॥ ७ ॥ या गोष्टीस हें उत्तर । कीं तुह्मी ऐसे पुसणार चतुर । ऐसा समर्थ ईश्वर । हें तुह्मां कळलें तरी पुसतां ॥ ८ ॥ तरी आह्मी पुसतों त्याचें उत्तर । द्यावें तुह्मीं कीं ऐसा दयाळू ईश्वर । सृष्टि कां हे चराचर । निर्माण करितो ॥ ९ ॥ निर्माण न करूनि कांहीं । उगाच कां तो असत नाहीं । न करूनि सद्गति आणि दुर्गति जीवही । कां उगला असेना ॥ ४१० ॥ सृष्टि केली प्रत्यक्ष दिसे ।

---

१ पुण्य. २ घेते. ३ निवृत्त होते. ४ बिघडते. ५ आवडी. ६ उगीच.

भोग जीवातें दिसतसे । दयाळू सर्व सम तो ऐसियांत गवसे । हें आतां आ-
ह्मी बोलूं तें ऐका ॥ ११ ॥ याचा ऐसा परिहार । कीं अनादि जीव
अनादि ईश्वर । विश्वसृष्टिस्थितिसंहार । प्रवाह हाही अनादि ॥ १२ ॥
ब्रह्मबीज माया अंकुर । त्या मायेचा हा सर्व पसर । बीज नासे तरी हेही
प्रकार । न होतां राहती ॥ १३ ॥ हा अनादिप्रवाह जैसा । पापपुण्यप्रवृ-
त्तिमार्गही तैसा । विचार पाहतां ऐसा । आवडी ही अनादि जीवांच्या
॥ १४ ॥ आवडी ह्मणजे सत्त्ववृत्ति । ज्यांस आत्मत्वाची प्रीति । त्यांस
आत्मरज्जू सर्पाकृति । वाटे अविद्येंकरूनी ॥१५॥ तो आत्मा सुखस्वरूप ।
सत्त्वसुखप्रीतिरूप । जाहला आत्मलाभाचा लोप । सर्पभ्रमें लोपे हार[1] जैसा
॥ १६ ॥ सत्त्वसुखाकारणें झुरे । तो आत्महारीं अनात्मसर्प स्फुरे । त्यांत
इंद्रियांत वासना वावरे । रजोगुणें विषयरूपा तमाची ॥१७॥ त्यास त्या-
ची अविद्या जाय । विद्यनें अनात्मा मिथ्या होय । तरी आवडीचा निश्चय ।
आत्मस्वरूपीं होय सत्त्वाचा॥ १८ ॥ ऐसा आवडीस्वरूप । सत्त्वगुण प्री-
तिरूप । पक्वज्ञान होतां त्याचा संकल्प । ब्रह्मीं ब्रह्मविद्येंकरूनी॥१९॥ ऐशा
सत्त्वस्वरूपा ज्या आवडी । त्या जरी ईश्वर सकळ जीवांच्या मोडी ।
तरी सृष्ट्यादि घडामोडी । मग न पडती कदापि ॥ ४२० ॥ आवडीस्व-
रूप शुद्ध सत्त्वगुण । त्यापासूनि उपजे माया त्रिगुण । या सर्वें ईश्वर
निपुण । आपण आवडी धरी आपली ॥ २१ ॥ तेथूनि त्या मायेपासूनी ।
नाना जीवोपाधि होउनी । त्यांत प्रतिबिंब दृष्टांतेंकरूनी । जीवला पात्रे ई-
श्वर ॥ २२॥ ते उपाधि त्रिगुणवृत्ती । संस्काररूपें प्रवर्तती । त्या तरी मो-
डती कीं ते गुणप्रकृती । निःशेष मोडे ॥ २३ ॥ हा प्रपंचवृक्षाचा पसर ।
मोडे तरी जरी न उपजे मायाअंकुर । परम समर्थ जरी ईश्वर । न करूं
शके नाश तिचा ॥ २४ ॥ कीं ज्या सामर्थ्यें माया मोडी । तें सामर्थ्य
मायेचीच उडी । तीतें प्रकाशी सत्ता उघडी । तें निर्धर्म ॥२५॥ तो स्वयें
ब्रह्मचि साचें । परी माया सर्व सामर्थ्य त्याचें । समपण सदयपण हेंही कें-
चें । निर्गुणत्वीं तया ईश्वरासी ॥ २६ ॥ मायाचि समत्व सदयत्वादिगुण ।
मायाचि त्याचें समर्थपण । स्वसामर्थ्यें स्वसामर्थ्य मोडणें । घडे कैसें॥२७॥
ज्या सामर्थ्यें सामर्थ्य मोडे । तेंही सामर्थ्यपणेंचि निवडे ।एकं मायेचा नाश
न घडे । करीन ह्मणतांही ईश्वरासी॥२८॥आतां विद्येनें अविद्या नासे । परी

१ सांपडे. २ माळ.

ईश्वरोपाधि मूळ माया असे । ज्याच्या कृपासामर्थ्यें भंगली दिसे । तें तों न नासे सामर्थ्य ॥ २९ ॥ एवं ऐशा एका विचारें। माया न मोडे या प्रकारें । याहूनिही पाहतां बरें । अभंग प्रवाह प्रपंचाचा ॥ ३०॥ तरी प्रपंचवृक्षाचा पसर । मोडे जरी न उरे माया अंकुर । तरी अंकुर न उपजे कीं परात्पर । ब्रह्मबीज त्या मायाअंकुराचें जरी नासे ॥ ३१॥ ब्रह्म ईश्वराचें स्वस्वरूप । माया सामर्थ्याचें रूप । हीं दोन्ही नाशूं शके ऐसा प्रताप । नसे ईश्वरीं ॥ ३२ ॥ स्वस्वरूप स्वसामर्थ्य हीं दोन्हीं । त्याचें त्याच्यानें न नाशवे म्हणोनी । या सामर्थ्याच्या न्यूनत्वें करूनि । श्रेष्ठत्व त्याच्या स्वरूपास आणि सामर्थ्यास ॥ ३३ ॥ कीं तो नित्य अभंग स्वरूप । आणि सामर्थ्य त्याचें नित्य अक्षय्यरूप । एवं याच लक्षणें प्रताप । अत्यंत त्याचा ॥ ३४ ॥ जैसा आपणास आपण । बंध करूं न शके तो निपुण । तैसा याही सामर्थ्यें अपूर्ण । तरीच परिपूर्णत्व त्याचें अत्यंत ॥३५ ॥ सूर्यमंडळीं तम नसे । म्हणूनि जरी तो उणा दिसे । तरी ईश्वरीं अपूर्णत्व वसे । न मोडूं शकतां जगत्प्रवाह ॥ ३६॥ जगत्प्रवाह जरी मोडे । तरी आवडीचा नाश घडे । आवडी न मोडितां न उपडे । अंकुर विषयप्रीतीचा ॥ ३७ ॥ जों न मोडे विषयप्रीति । तों न चुके पापप्रवृत्ति । त्यास सन्मार्गीं योजी जगत्पति । तरी ते होती दुःखी जीववृंद ॥ ३८ ॥ दुःख देणें यापरी । हेंही न साहे ईश्वरीं । म्हणूनि सुकृतही परी । न करवी ईश्वर ॥ ३९ ॥ एवं जरी करविता सुकृत । सुकृत तरी कर्त्याचें घेता निश्चित । म्हणूनि या श्लोकीं म्हणतो भगवंत । कीं ईश्वर सुकृतही नेघे कोणाचें ॥ ४४० ॥ पूर्वश्लोकीं तो प्रभु म्हणोनी । वर्णिला ज्या भावेंकरूनी । या श्लोकीं विभु म्हणूनि या वचनीं । तोचि भावार्थ सूचवी ॥ ४१ ॥ कीं सुकृत न करवी ईश्वर । तथापि तो विभु म्हणजे समर्थ थोर । जे भजती त्या ईशास सादर । त्या हातीं सुकृत करवीच तो॥४२॥कीं जे जैसें यास मागती । कल्पवृक्ष तैसें फळ दे त्यांप्रती । सन्मार्गीं लावीं गा जगत्पती । म्हणूनि म्हणतां समर्थ सुकृतचि करवितो ॥ ४३ ॥ एवंच त्यास शरण जावें । सन्मार्ग दे म्हणूनि प्रार्थावें । जेव्हां ऐसें भजावें । तो सन्मार्ग जो असेल देतोचि त्यास ॥ ४४ ॥ पूर्वार्धीं या श्लोकीं हरी । सिद्धांत सिद्ध ऐसा करी । शंका उपजे कांहीं याहीवरी । ते परिहरील आतां उत्तरार्धें ॥ ४५ ॥ पूर्वश्लोकीं पुरुषोत्तम । म्हणे लोकांचें कर्तृत्व आणि कर्म । निर्मित नसे सर्वोत्तम । जगदीश्वर

॥ ४६ ॥ तरी कर्तृत्व आणि कर्म कैसें । उपजतें ह्मणती कोणी ऐसें । त्यास उत्तर दीधलें जगन्निवासें । कीं 'स्वभावस्तु प्रवर्तते' ॥ ४७ ॥ कीं प्रवर्ततो स्वसंस्कार । तो संस्कार संगानुसार । त्याचे दोनी प्रकार । पूर्वश्लोकीं टीकेंत वर्णिले ॥ ४८ ॥ येथें ऐसी शंका । कीं मनचि लिप्त या संस्कारपंका[1] । परि आत्मया निष्कलंका । लेप नसे ॥४८॥ संस्कार पाहतां चित्तीं । इंद्रियांस विषय कर्म प्रवृत्ती । ऐसी वस्तुता आत्मस्थिती । तरी बंध कर्मी कां घडे॥४९०॥एवं घडोंच न शके बंध । तरी कां होतो फळसंबंध । कीं ज्या फलसंबंधें भयगंध । कर्तृत्वाचा लागों नेदी ईश्वर आपणासी ॥ ९१ ॥ जीवातेंचि कर्मकर्तृत्व न घडे । तें केविं लागे ईश्वराकडे । ऐसें असोनिही कां बोलणें पडे । कर्तृत्वा परिहरीं ईश्वराच्या ॥ ९२ ॥ अकर्ता आत्मा तत्त्वतां । संस्कार चित्तीं इंद्रियादिकां कर्तृता । तेव्हां कर्मबंधाची वार्ता । समूळ खोटी ॥ ९३ ॥ ऐसी शंका यापरी । तरी जीवात्माही अकर्ता ही गोष्टी खरी । परी बंध मोक्ष दोन्ही शिरीं । बुद्धीचिया ॥९४॥ त्या बुद्धीस आत्मा न कळे । अहंप्रत्ययें वासना न जळे । ते कर्तृतेकडे न वळे । अज्ञानें करूनि ॥ ९५ ॥ तें बुद्धीचें अज्ञान । जाऊनि होय आत्मज्ञान । तेव्हां या अनुभवें चुके बंधन । कर्माचें ॥ ९६ ॥ अकर्तेपणाचा विचार । आइकिला वारंवार । मनीं धरूनि तो आधार । अर्जुन ऐसा शंकला ॥९७॥ शंकला मनीं सव्यसाची । ह्मणोनि शंकानिवृत्ती त्याची । करील उत्तरार्धें कीं हे गोष्टी साची । परी अज्ञानें केला अनर्थ ॥ ९८ ॥ उत्तरार्ध श्लोक ॥ अज्ञानेनावृतं ज्ञानं तेन मुह्यंति जंतवः ॥ टीका ॥ आत्मा अकर्ता आणि मिथ्या कर्म । अगा हें ज्ञानचि परम । कीं आहे तो रज्जुच नाहीं भुजंगम । हें जाणणें जे रीती ॥ ९९ ॥ परी अज्ञानें करूनी । हें ज्ञान वेटिलें असे ह्मणोनी । कर्मकर्तृत्वमिथ्यात्व न कळोनी । मोहती जीव ॥ ४६० ॥ मी कर्ता ह्मणोनि ह्मणती । कर्म सत्य ह्मणोनि जाणती । अकर्त्रात्मत्व आणि कर्ममिथ्यात्व नेणती । जंतु मोहती या प्रकारें ॥ ६१ ॥ मी कर्ता हें अज्ञान । येणें झांकिलें स्वअकर्तृत्वज्ञान । कीं सर्पभ्रमें झांकले नयन । स्पर्शले असोनि रज्जूसी ॥ ६२ ॥ रज्जूस दृष्टि स्पर्शली असे । आणि तीसचि सर्प भासे । रज्जु दिसत असोनि न दिसे । अज्ञानें वेष्टलें ज्ञान ऐसें ॥ ६३ ॥ आत्मयास सत्त्ववृत्ती । स्पर्शली असोनि तीस भ्रांती ।

[1] संस्काररूप चिखल, मळ.

त्या भ्रांतीनें प्रतीती । रजतमरूपा इंद्रियां विषयांची ॥ ६४ ॥ स्पर्शोनि आत्मयाला । ह्मणतो मी नेणें मला । हें अज्ञानवेष्टन ज्ञानाला । सर्पभ्रम-वेष्टन जैसें दृष्टीसी ॥ ६५ ॥ वेगळें अवस्थात्रय । वेगळा आपण ऐसा नि-श्चय । हे तुर्या जींत आत्मा अद्वय । स्फुरतसे ॥ ६६ ॥ ते तुर्येस घेऊनी । तिन्ही अवस्थां-वेगळा आपण ह्मणोनी । जो तो उघड बोलोनी । हे तुर्या आपण आत्मा हें कळेना ॥ ६७ ॥ मी स्वप्न देखत निजेलों । आतां मागुती जागृति पावलों । मग कांहीं न कळेसा जालों । यावरूनि अवस्थात्रया-तीत हे तुर्या ॥ ६८ ॥ कीं तिहीं अवस्थांवेगळा । आत्मा आपण निरा-ळा । ऐसें बोले हे तुर्या ज्ञानकळा । न कळे कीं अज्ञानें वेष्टिलें असे ज्ञान । ॥ ६९ ॥ ज्ञानदृष्टि सर्वांस आहे । परी अज्ञानसर्पें ज्ञानरज्जूतें कोणी न पाहे । अज्ञानें आवृत होऊनि राहे । ज्ञान ऐसें सर्वांचें ॥ ४७० ॥ अर्थ ऐ-साचि यथार्थ । परी कोणी प्रकारांतरें बोलती अर्थ । तो या अर्थापुढें व्यर्थ । होऊनि जातो ॥ ७१ ॥ ईश्वर कर्में करवितो ह्मणोनी । हें अज्ञान याच अज्ञानेंकरूनी । सम सदय हें ज्ञान झांकलें त्रिभुवनीं । येथें वाखाणिती ऐसें ॥ ७२ ॥ आतां असोनि ज्ञान । तरी आवरण करी अज्ञान । ऐसें बोलतें हें गीतावचन । अर्थ न घडे या प्रकारें ॥ ७३ ॥ ईश्वर कांहीं करवीत नसे । हें ज्याला कळत असे । त्यास ईश्वर करवितो ऐसें कां भासे । न करवी ऐसें श्रुत असोनी ॥७४ ॥ ईश्वर न करवी ऐसें ज्याला । ठाउकें अ-सेल त्याला । ईश्वर करवितो हें कां वाटेल बोला । अज्ञानें ज्ञान वेष्टिलें तें कैसें ॥ ७५ ॥ ठाउकेंचि नाहीं ज्याला । ईश्वर न करवी हें ज्ञान कैचें तयाला । आतां कोणतें ज्ञान झांकलें बोला । नसतां हें ज्ञान ॥ ७६ ॥ एवं आत्मरज्जु दिसे । ते दृष्टि जड सर्पभ्रमें वेष्टिली असे । तरी अज्ञानें वेष्टिलें ज्ञान गवसे । अर्थ अन्यथा न घडे ये स्थळीं ॥७७॥ आतां यानंतर श्लोक । तो कां बोले उत्तमश्लोक । त्याचें निमित्त सुज्ञलोक । परिसोत आ-धीं ॥ ७८ ॥ ईश्वर कांहीं । कर्म करवीतोचि नाहीं । ऐसें बोलतां उपजली शंका तेही । पूर्वश्लोकींच निसरली ॥७९ ॥ कीं समर्थ ईश्वर परी । जीवा-हातीं कर्में करवी जरी । विषमत्व निर्दयत्व तरी । त्यास लागे ॥ ४८० ॥ एका हातीं बरें कर्म । करवूनि देतो फळ उत्तम । वाईट करवूनि फळ अ-धम । देतो तेव्हां विषम तो ॥ ८१ ॥ आणि आपण करवूनि पाप । त्यास

१ चवथी अवस्था. २ पूर्वींच्या जागृति, स्वप्न, व सुषुप्ति या तीन.

भोगवी नरकसंताप । या गोष्टीनें निर्दयस्वरूप । होणार ॥ ८२ ॥ यालागीं कोणाचेंही दुष्कृत । तो नेघे अथवा नेघे सुकृत । कीं कर्त्याचा अपराध निश्चित । लागे त्यास जो करवितो त्याहातीं ॥ ८३ ॥ या सर्वांस अनर्थमूळ । हेंचि कीं भोगावें लागतें कर्मफल । तें कर्मफल उपजवी केवल । कर्तृत्व कर्तयाचें ॥ ८४ ॥ तरी जीवही शुद्ध चित्स्वरूप । त्यास नसे कधीं कर्मलेप । ऐसें असोनी फल पुण्यपाप । कां होतें ॥ ८५ ॥ कर्तृत्व नसे जयास । भोक्तृत्व कैंचें तयास । सुखदुःखभोग जरी दिसतो यास । निमित्तांतर योजावें यावरी ॥ ८६ ॥ एवं कर्मबंध अघटित । तें करवितां विषम आणि दयारहित । ईश्वर नव्हे हें निश्चित । सिद्ध जालें पूर्वपक्षेंकरूनी ॥ ८७ ॥ तेव्हां ईश्वर न करवी कांहीं । या परिहारानें अगत्य नाहीं । एवं बोलणें नलगे तेंही । कां बोलिला श्रीकृष्ण ॥ ८८ ॥ हे अर्जुनमनीं शंका । हे कळली श्रीवत्सांका । ह्मणुनि या शंकेच्या पंका । मधुनि काढिलें मन त्याचें ॥८९॥ कीं आत्मा अकर्ता । परि बुद्धीस वाटला कर्ता । बंध मोक्ष दोन्ही वार्ता । माथां बुद्धीच्या ॥९०॥ तीस अकर्ता आत्मा न दिसे । त्या दोरीं कर्तृत्व सर्प भासे । कीं अज्ञानें ज्ञान वेटिलें असे । त्यानें मोहती हे जंतु ॥९१॥ ऐसें अज्ञानें वेटिलें ज्ञान । त्या ज्ञानेंचि नासे तें अज्ञान । कीं काष्टांतूनि करितां मंथन । अग्नि निघोनि जाळी त्याच काष्टातें ॥९२॥ तरी तें ज्ञान कैसें । ह्मणुनि पुसे जों अर्जुन ऐसें । तोंचि कृपासागर कृपारसें । स्वयें बोलतो या श्लोकें ॥ ९३ ॥

॥ श्लोक ॥ ज्ञानेन तु तदज्ञानं येषां नाशितमात्मनः ।
तेषामादित्यवज्ज्ञानं प्रकाशयति तत्परम् ॥ १६ ॥

॥ टीका ॥ रज्जु दिसोनि न दिसे । कीं मिथ्या सर्प त्यांत भासे । रज्जूचें न कळणें हें निमित्त असे । त्या सर्पाचें ॥ ९४ ॥ तो रज्जु कळणें हें ज्ञान । त्या ज्ञानें रज्जूविषयीं जें अज्ञान । तें नासे या भावें कमलनयन । बोलतो ऐसें ॥ ९५ ॥ कीं आत्मयाचें होतां ज्ञान । त्या ज्ञानें आत्मविषयीं जें अज्ञान । तें ज्याचें नासलें त्याचें निजधन । प्रकाशे आदित्यासारिखें ॥९६॥ कीं रज्जूचें जें न कळणें । सर्प उपजविला त्याणें । त्या सापें त्या रज्जूचें पाहणें । आच्छादिलें ॥ ९७ ॥ त्या आच्छादिल्या पाहण्यास जरी रज्जु दिसे । तरीच त्यावरी तो सर्प भासे । जों रज्जूवरी दृष्टि न वसे । तों न उपजे तो सर्प ॥९८॥ एवं आयती रज्जूस दृष्टी । स्पर्शोनि सर्पभ्रम

होय कष्टी । तो रज्जुसा कळतां ते सर्पदृष्टी । रज्जूच होय ॥ ९९ ॥ ऐसी चिच्छक्ति वृद्धि आयती । चित्स्वरूपीं स्पर्शोनि पावली चित्स्फूर्ती । तीवें अधिष्ठानस्थिती । कळतां प्रपंचही होय तद्रूप ॥ ६०० ॥ एवं आदीं आत्मा कळे । तेव्हां जड जगभ्रम पळे । आत्मरज्जु कळतां गळे । मिथ्या सर्पत्व ॥ १ ॥ यालागीं प्रथम । आत्मा न कळे हा फिटे भ्रम । तेव्हां होय अधिगम । प्रपंचब्रह्म ह्मणोनी ॥ २ ॥ यालागीं आच्छादिलें जें ज्ञान । त्या ज्ञानें नासलें त्याचें अज्ञान । तयास स्वप्रकाश कैवल्यघन । ज्ञानस्वरूप प्रगट होय ॥ ३ ॥ तें आपणा प्रकाशी आपण । आणि त्याहूनि विलक्षण जें जडपण । तें वेगळेंसें दावी लक्षण । हें स्वप्रकाश प्रकाशी त्या परासही ॥ ४ ॥ स्वप्रकाश सूर्यकिरण । विलक्षण मृगजलस्फुरण । त्या परासही प्रकाशितो आपण । स्वप्रकाश सूर्य ॥५॥ यालागीं तें आदित्यासारखें । आणि जडपण तें परावें पारखें । परी त्या पराव्यातेंही कोणें आणिखें । आदित्याविण प्रकाशावें ॥६॥ ऐथें पूर्वार्धीं कमलेनयन । जें अज्ञाननाशक बोलिला ज्ञान । तें वृत्तिरूपज्ञान अविद्याशमन । स्वरूपज्ञान उत्तरार्धें ॥ ७ ॥ तें ह्मणे आदित्यासारखें । त्यांत मृगजळ परावें पारखें । त्या परास तें प्रकाशी ऐसें स्वमुखें । श्रीकृष्ण ह्मणे ॥ ८ ॥ वृत्तिरूपज्ञान तें अज्ञान । ज्याचें नासलें त्याचें ज्ञान । आदित्यासारखें तें ह्मणे जगज्जीवन । कीं परातें प्रकाशी ॥ ९ ॥ एवं तें स्वप्रकाशस्वरूप । त्यांत मायामय जडरूप । जैसा किरणांमाजी आरोप । भासे जळाचा ॥६१० ॥ तें परप्रकाश्य मृगजळ । न प्रकाशे स्वयें केवळ । मिथ्यात्वसाधनीं प्रबळ । हेचि युक्ती ॥ ११ ॥ वारुळामधें जो साप । तो प्रकाशे आपोआप । रज्जुवरील सर्प । रज्जु तयातें प्रकाशी ॥ १२ ॥ सोनें प्रकाशे आपण । त्या सुवर्णें प्रकाशे अलंकारपण । परप्रकाश्य मिथ्या याचि खूण । इतकीच ॥ १३ ॥ जळ प्रकाशे आपण । त्या जळें प्रकाशे तरंग बुद्बुदपण । परप्रकाश्य मिथ्याचि खूण । इतकीच ॥ १४ ॥ तंतु प्रकाशे आपण । त्या तंतूनें प्रकाशे पटपण । परप्रकाश्य मिथ्या याची खूण । इतकीच ॥ १५ ॥ माती प्रकाशे आपण । त्या मातीतें प्रकाशे घटपण । परप्रकाश्य मिथ्या याची खूण । इतकीच ॥ १६ ॥ ऐशा दृष्टांताच्या कोटी । पाहतां सिद्ध होतें हेंचि पोटीं । कीं स्वप्रकाश वस्तु साची आणि ते खोटी । जे प्रकाशे त्या स्वप्रकाशें ॥ १७ ॥ यालागीं एथें श्रीपति ।

१ दुसरें; अन्य. २ कृष्ण. ३ अज्ञाननाशक. ४ बिळामध्यें. ५ बोंबडपण; फेनत्व.

ऐसें बोलतो अर्जुनाप्रती । कीं तें ज्ञान आदित्यासारखें ज्याणें प्रकाशती । परें जडें चराचरें ॥ १८ ॥ कीं तें स्वरूपज्ञान । जड प्रपंचाचें अधिष्ठान । सूर्यकिरणीं जैसें मिथ्या जळपण । प्रपंच तैसा स्वरूपीं तयां ॥ १९ ॥ आदित्यासारखें तें त्याचें ज्ञान । ज्याचें वृत्तिरूप ज्ञानें नाशिलें अज्ञान । तें परातें प्रकाशी ह्मणे जगज्जीवन । या गूढभावेंकरूनी ॥५२०॥ न काढितां हा गूढ भावार्थ । आदित्यासारखें ह्मणावें व्यर्थ । व्यर्थ बोलणें बोले समर्थ । हें घडेना ॥ २१ ॥ आदित्यासारखें ज्योतिरूप । ह्मणतां इंद्रियगम्य होतें स्वरूप । ऐसें बोलतां जोडे महत्पाप । विरुद्ध अनुभवासी आणि वेदासी ॥ २२ ॥ लक्षवादियाचें लक्ष । आणि सूर्यादि तेज जें प्रत्यक्ष । दोन्ही समान तें पाहतां मोक्ष । ह्मणती तेचि अति मूर्ख ॥ २३ ॥ वेद स्थळोस्थळीं बोलती । तेज प्रकाश इत्यादि त्याला ह्मणती । न कळोनि त्या शब्दाची तात्पर्यस्थिती । तेजोरूपचि ह्मणती परब्रह्म ॥ २४ ॥ तेजें अंधकारातें निरसती । आणि नेत्रांस रूपें दाविती । तैसी जगत्प्रकाशस्वरूपस्थिती । परब्रह्मीं ॥ २५ ॥ या तात्पर्यें श्रुती । आत्मा ज्योतिरूप ह्मणती । जैसें जीवेश्वरांस वर्णिती । सुपर्ण नामें ॥ २६ ॥ वर्णनें असे जीवेश्वरांसी । तात्पर्यें वर्णिती सुपर्णासी । सुपर्ण ह्मणती पक्षियांसी । वेदवाणींत ॥ २७ ॥ तरी काय जीव आणि ईश्वर । दोघे ह्मणावे खगाकार । तैसे अतींद्रिय निराकार । तें काय तेजासारिखें ॥ २८ ॥ वेदवचनें अगणित । कीं तें निर्विकल्प अनंत । आणि हेतु दृष्टांतवर्जित । श्रुति ऐसें बोलती ॥ २९ ॥

॥ श्रुति ॥ ॥ निर्विकल्पमनंतं च हेतुदृष्टांतवर्जितम् ॥ ॥ श्रुत्यर्थ ॥

निर्विकल्प शब्दें वेद । ह्मणती कीं ब्रह्मीं नसे विकल्पभेद । दृश्य भेद जो उपजवी खेद । हा अविद्याकृत मिथ्या सर्वही ॥ ५३० ॥ आणि तें ब्रह्म अनंत । कीं देशकालादिकीं ज्यास नसे अंनत । ऐसियास हेतु दृष्टांत । हेही दोन्ही न असती ॥ ३१ ॥ सृष्टि स्थिति संहार । या अंकुरास हेतु तें बीज निर्विकार । त्याच्या हेतूचाही करितां विचार । न सांपडे कदापी ॥ ३२ ॥ हेतु ह्मणिजे निमित्त । तें निमित्तरहित निर्निमित्त । ब्रह्म कां आहे ऐसें अत्यंत । विचारितां निमित्त नाढळे ॥ ३३ ॥ आतां या वेदवचनांत । शेवटील पद हें कीं हेतु दृष्टांतवर्जिती । त्यांत हेतुशब्दाचा अर्थ निमित्त । आतां दृष्टांतवर्जित अर्थ याचा ॥ ३४ ॥ हे श्रुतीही याचकारणें । एथें

---

१ पक्षिस्वरूप. २ पुष्कळ.

लागली प्रगट करणें । कीं दृष्टांतवर्जित जें आपण । तें तेजासारिखें कैंवि होय ॥ ३५ ॥ प्रपंच कांहीं दृश्य । बुद्ध्यादि प्रपंच अदृश्य । वायु न दिसे तरी स्पर्श । त्वगिंद्रियासी ॥ ३६ ॥ प्रपंच पाहतां हा सर्वही । न असे पदार्थ ऐसा कांहीं । कीं ब्रह्म तैसें ह्मणावें यालागीं नाहीं । दृष्टांत तयासी ॥ ३७ ॥ ऐसें दृष्टांतवर्जित । वेद ह्मणती निश्चित । तें ज्योतीसारिखें ह्मणूनि अत्यंत ॥ श्रद्धेनें तेज नेत्रीं लक्षिती ॥ ३८ ॥ आतां दृष्टांत वेदीं । तें सत्यत्व नित्यत्व अभेदीं । परि न ह्मणती कोणी कीं तें अनादि । अमुकियासारिखें असे ॥ ३९ ॥ ब्रह्म जैसी माती । प्रपंच जैशा घटादि जाती । ह्मणूनिही वेद ह्मणती । तरी काय मातीसारिखें तें ब्रह्म ॥ ९४० ॥ माती प्रकाशे आपण। मातीकरितां घटपण । हे सत्यत्व मिथ्यात्व खूण । मृत्तिका आणि घटदृष्टांतें वर्णिली ॥ परंतु अमुकें एक रूप । त्यासारिखें तें स्वरूप । हें न ह्मणवे तेव्हां सूर्यचंद्रदीप ; या तेजासारिखें तें कैंवि॰होय ॥ ४२ ॥ इतकियासारिखें नसे। ऐसें तें ब्रह्मतेज असे । ऐसें ह्मणणेंही दिसे। त्याच सारिखें ॥ ४३ ॥ चंद्रासारिखा दीप नसे । चंद्रसूर्यासारिखा न दिसे । सूर्यतेजही न गवसे । चंद्रदीपांसारिखें ॥ ४४ ॥ तथापि दीपही ज्योती । चंद्रसूर्य ताराही ज्योतिर्मूर्ती । ऐसी अद्भुत कांहीं एक स्थिती । ब्रह्म ज्योतीची जरी ह्मणावी ॥ ४५ ॥ ज्योति ह्मणतां रूप होय । रूप ह्मणणें विषय । त्यास पाहेच इंद्रिय । इंद्रियगम्य तितकें नाशवंत ॥ ४६ ॥ जरी तें ज्योतिस्वरूप । प्रपंचही दिसावा ज्योतिरूप । कीं रज्जूचा वर्ण तैसा सर्प । भासेल त्या रज्जूवरी ॥ ४७ ॥ दोर असेल काळा । त्यावरी सर्प काळाच दिसेल डोळां । दोर असेल उजळा । तरी सर्पही उजळाचि भासेल ॥४८॥ ज्योतीवरी अंधकारें । भासावें कवणिया प्रकारें । पाहतां नाना विचारें । ज्योतीसारिखें ब्रह्म अघटित ॥ ४९ ॥ इत्यादि स्थळीं उत्तरें । कोणी कोरूनि काढिती आदरें । तींहीं निषेधावीं विस्तारें । परंतु ग्रंथ वाढेल बहु फार ॥९५०॥असो आतां याच अध्यायाचे अंतीं । श्लोक दोन प्रमाण त्याला वाटती । त्या प्रसंगीं त्यांची मूढमति रीती । खंडणें असे ॥५१॥ प्रस्तुत या प्रकरणीं । आदित्यासारिखें तें ज्ञान ह्मणे चक्रपाणी । तरी तेजासारिखें ब्रह्म ह्मणती कोणी । तें न घडे ॥ ५२ ॥ तें आदित्यासारिखें । आणि जें परावें पारिखें । त्यासि तें प्रकाशी ऐसें स्वमुखें । श्रीकृष्ण ह्मणे गूढभावें ॥५३॥ कोणी ह्मणती सूर्यासारिखें तें । जें प्रकाशितें परातें । तरी सूर्यासारखें प्रकाशक नुसतें कां न ह्मणावें

॥ ५४ ॥ तें परजड जैसें मृगजळ । सूर्य त्याचें अधिष्ठान निखळ । यावरूनि जग मिथ्यां समूळ । ऐसें कां एथें वाखाणावें॥५५॥ऐसेंही कोणी ह्मणती । तरी न वाखाणितां ये रीती । सूर्यदृष्टांतें प्रकाशकस्थिती । न साधे स्वरूपातें॥५६॥ तरी सूर्य प्रकाशक हेंही । विचारितां तत्त्वतां घडत नाहीं । नेत्र आणि रूप या दोंविना कांहीं । प्रकाशित नसे तो सूर्य ॥ ५७ ॥ प्रपंच अवघा पंचविषयें । त्यासवें पंचेंद्रियसमुदाय । अंधकारींही प्रकाश होय । शब्दस्पर्शरूपरसगंधांचा ॥ ५८ ॥ अंधकारीं घेतां रस । सूर्य नलगे त्यास । तैसेंचि गंधाघ्राणास । सूर्य नलगे अंधारीं ॥५९॥ शब्द स्पर्श हेही विषय । कर्ण आणि त्वगिंद्रिय । अंधकारीं घेतां करावा काय । सूर्य तेथें ॥ ६० ॥ ऐसेंच नेत्ररूप या दोंहींप्रती । सूर्य प्रकाशितो हेही ख्याती । तत्त्वता नसे लोकरीती । शास्त्रहीं वर्णि ये स्थळीं ॥ ६१ ॥ कीं सूर्यावांचूनि जगीं । नेत्रांस कांहीं न दिसे तरी । अंधकार निबिड अंधारीं । न दिसतां कदापि नेत्रांसी ॥६२॥अंधारीं अंधार दिसे। ज्या अंधारीं सर्व झांकलें असे । वस्त्रें आच्छादिलें तें दृष्टीस न गवसे । परी दिसे वस्त्र ज्यानें आच्छादिले पदार्थ॥६३॥ तें वस्त्र काढितां करें । आच्छादिलें होतें तें दिसों लागलें बरें । तैसें तमावरण भास्करकरें । काढितां दिसती पदार्थ बरवे॥६४॥ एवं नेत्र प्रकाशक जरी भास्कर। तरी नेत्र प्रकाशक नव्हे कां कर । वस्त्र आणि तम एकप्रकार । करें भास्करें काढितां ॥ ६५ ॥ काढितां आडील अंबर । नेत्रप्रकाशक ह्मणावा कर । तैसाच ह्मणावा भास्कर । परी मुख्य प्रकाशकत्व न घडे सूर्यातें ॥६६॥ आतां नेत्रांचें दैवत । सूर्य हें शास्त्रविख्यात । तम दिसतें नेत्रांस हेंही अत्यंत । प्रकाशकत्व सूर्याचें ह्मणावें ॥६७॥ तरी सूर्याचीं रूपें दोन्ही । जगीं दिसे तेजोरूप मंडलेंकरूनी । दुसरें नेत्रमात्र व्यापूनी । असे रूप त्याचें॥६८॥ अग्निही वाचेचें दैवत । आणिका इंद्रियांही एक एक असे निश्चित । ते देव स्वर्गी असोनि वर्तत । जनांच्या इंद्रियांतही ॥ ६९ ॥ सहस्रनेत्र वज्रपाणी । तो त्यारूपें नसे अभिङ्गूनी । यास प्रमाण न पाळे वाणी । अग्नीच्या अग्निरूपेंकरूनी ॥ ७० ॥ दाहकरूपें अग्नीच परी । व्यापकरूपें न असे वाचेभीतरीं । तैसें तेजोमयरूप न धरी । सूर्य नेत्रीं ॥ ७१ ॥ ज्योतिरूपें नयनीं बसतां । तरी नेत्रांसि अंधकारचि न दिसता । यालागीं नेत्रीं असे नुसता । व्यापूनि इतरां देवांसारिखा ॥ ७२ ॥ इंद्रियें अवघीं लिंगदेहीं । स्थूळदेहीं

१वज्र. २ इंद्र. ३ माजे. ४ सूक्ष्मशरीरांत. ५ आकृति.

इंद्रियें नसती कांहीं । नेत्रकर्णादि अवयवींही । गोलकें स्थूळदेहीं ह्मणावीं ॥७३॥ जैसे घोडे रथीं । जोडोनि चालवी सारथी । तैसीं इंद्रियें गोलकां योजूनि पंथीं । विषयांच्या आदिदेवतें वर्तविती ॥७४॥ इंद्रियां गोलकां योग । देव न करिती तेव्हां न घडे भोग । जैसा सारथि रथा घोडियां करी वियोग । तेव्हां न चाले तो रथ॥७५॥तैसें चक्षु इंद्रिय आणि नयनातें । सूर्य योगी त्या रूपातें । तेजोरूपत्व जरी असतें । तरी डोळां न दिसता अंधकार॥७६॥एवं अंधकाराचा पडदा भास्कर । आडील काढी जैसा कर । गगनच्छद या नांवें अंधकार । याच भावें संस्कृतीं बोलती ॥ ७७ ॥ छद वस्त्रातें ह्मणती । आणि गगनच्छद ह्मणजे गगनाप्रती । आच्छादितो अंधकार जे रीतीं । वस्त्र झांकी पदार्थ भलता ॥ ७८ ॥ गगन सर्वांवरी असे । त्यावरी अंधकाराचें वस्त्र वसे । तें न दिसतां सर्वही न दिसे । जैसें वस्त्रें झांकिलें पदार्थ ॥ ७९ ॥ तरी सूर्यास प्रकाशक । कां ह्मणती वेदादिक । ऐसेंही शंकती कोणी एक । तरी प्रकाशक तोही होय ॥ ८० ॥ कीं दिसत नव्हतें तें दावी । तेव्हां प्रकाशकता न कां वदावी । आतां विरुद्ध कां ह्मणावी । हे गोष्टी ॥ ८१ ॥ एवं प्रकाशक ब्रह्म । न ह्मणावें सूर्यासम । सर्व विषय सर्व इंद्रियग्राम । अंतःकरणादिही जें प्रकाशी ॥ ८२ ॥ नेत्र आणि अंधकार । सूर्य आणि चराचर । बाह्य आणि अभ्यंतर । प्रकाशी तें न ह्मणावें सूर्यासारिखें ॥ ८३ ॥ उगींचि सूर्यासम । जरी ह्मणता पुरुषोत्तम । तरी एकदेशी उपमेनें आदित्योपम । सुखें ह्मणों ये ॥ ८४ ॥ 'प्रकाशयति तत्परं' ह्मणोनी । या पर शब्दें करूनी । जगत्प्रकाशकत्व या वचनीं । सूचविलें ॥ ८५ ॥ दृष्टांत आदित्याचा । त्यास परम मृगजळाभास जो नव्हे साचा । हा मुख्यार्थ सूचवी कृष्ण वाचा । आतां गौणार्थ अवघे यापुढें ॥८६ ॥ मुख्यार्थ न सांपडे । तोचि गौणार्थ दृष्टी पडे । मुख्यार्थ सांपडतां उपडे । मूळ गौणार्थाचें ॥ ८७ ॥ एवं तें ज्ञानस्वरूप । वर्णिलें आदित्यरूप । तेव्हां परतें परावें जलारोप । जें बाह्यांतर प्रकाशितो आदित्य ॥ ८८ ॥ मृगजळातें अणुमात्र । न देखती त्या आदित्याविणें नेत्र । मृगजळीं आंत बाहेर सर्वत्र । असे सूर्यजळ द्वैत निरसोनी ॥ ८९ ॥ हा गूढार्थाचा आदित्य । प्रकाशिला नव्हता तो अगत्य । खद्योतरूप अर्थ असत्य । झळकत होते ॥ ९० ॥ आतां यानंतर श्लोक । तो कां बोले उत्तमश्लोक । त्याचें निमित्तही सुश्लोक । परिसोत आदीं॥९१॥पूर्वश्लोकीं वर्णिलें ज्ञान । जो भाग्यें पावला तें निधान ।

जो न करी आवडीनें त्याचें ध्यान । तरी तें अतन होईना ॥ ९२ ॥ ज्यास घडतें ध्यान । त्याचें कैसें अनुसंधान । हें सकळ सुखाचें निधान । श्रीकृष्ण बोलतो या श्लोकीं ॥ ९३ ॥

॥ श्लोक ॥ तद्बुद्धयस्तदात्मानस्तन्निष्ठास्तत्परायणाः ।
गच्छंत्यपुनरावृत्तिं ज्ञाननिर्धूतकल्मषाः ॥ १७ ॥

॥ टीका ॥ त्याच ज्ञानीं बुद्धि । आणि चित्तास तन्मयत्वसिद्धी । तेथेंचि निष्ठेची समृद्धी । तेंचि परम आश्रय जयासी ॥९४ ॥ ज्ञानें तयीं त्यांचें कल्मष । निर्धूत होय अशेष । ते तें पद पावती निर्दोष । पुनरावृत्ति जेथें नसे ॥ ९५ ॥ अर्थ इतकाच परी । विशद अर्थ बोलावा याउपरी । कीं एका एका शब्दांत हरी । भावार्थ दावी विस्तारें ॥ ९६ ॥ त्या ज्ञानीं बुद्धि ऐसें अच्युत । बोलोनि मागुती ह्मणे चित्त । त्या ज्ञानीं ज्याचें तें निश्चित । अपुनरावृत्तितें पावती ॥ ९७ ॥ तरी बुद्धि निश्चयरूपिणी । यावरूनि श्रीचक्रपाणी । मननंनिदिध्यासनलक्षणीं । बुद्धि त्याची ऐसें सूचवी ॥९८॥ तें श्रवण मनन निदिध्यास । आणि साक्षात्कार ज्यास । मनन निदिध्यास त्यास । घडे केवळ बुद्धीचकरोनी ॥९९॥ कीं श्रवण गुरुमुखें जालें । मनन केवळ बुद्धीच्या विभागा आलें । निदिध्यास करणेंही लागलें । बुद्धीतेंचि ॥ ६०० ॥ श्रवण गुरुमुखें घडे । अविद्येचें कवाड उघडे । अद्वैताचें बीज सांपडे । बुद्धीसी ॥ १ ॥ नाना युक्तीनें चिंतन । त्याचें करावें तें ह्मणावें मनन । त्यास केवळ साधन । बुद्धीच ॥ २॥ युक्ती करोनि सिद्ध जालें । सत्यपण असत्यपण समजलें । तेथें क्षणक्षणीं पाहिजे मन योजिलें । बुद्धीचकरूनी ॥३॥ पटरूप जड जग असत्य । आत्मतंतु विसरतां तें वाटे सत्य । कीं पूर्वसंस्कार अगत्य । यथापूर्व दावी प्रपंच ॥ ४ ॥ आत्मतंतूची स्मृती । क्षणक्षणीं धरी सन्मती । असत्य मानी जडा पटाप्रती । हा निदिध्यास ॥५॥ 'तद्बुद्धयः' ह्मणोनी । हा भाव सूचवी या वचनीं । 'तदात्मानः' या शब्देंकरूनी । सूचविला साक्षात्कार ॥ ६ ॥ कीं जे चित्ताची वृत्ति । तीस बाणे प्रत्यक्स्थिति । जडमात्रीं स्फुरे स्फूर्ति । चित्स्वरूपाची ॥ ७ ॥ हा अन्वयसाक्षात्कार । कीं जळरूपेंचि पाहणें तरंगाकार । विकार नाना दिसोनि निर्विकार । चैतन्यचि वाटे जडजग सर्वही ॥ ८ ॥ उदक आणि तरंगांचा आकार । हे दोन्ही एक पाहणें अन्वयप्रकार । शुद्ध उदकचि दिसे हा विचार । व्यतिरेकाचा ॥ ९ ॥ ऐसा व्यतिरेकसाक्षात्कार । कीं उदकीं बुडी

देऊनि नर । पाहे तों तरंगांवांचूनि नुसतें नीर । अनुभवा आलें ॥ ६१० ॥ तैसें आत्मस्वरूपीं चित्त । तदाकार होऊनि अत्यंत । मायाविकार कांहीं त्यांत । न देखे ॥ ११ ॥ बुद्धि चित्त या दशेतें पात्रें । तेव्हां तें तन्निष्ठ ह्मणावें । तेव्हां तें ऐसें जाणावें । कीं स्थिति वाणली तयास ॥ १२ ॥ तन्निष्ठत्व बाणे तरी । कीं मनन निदिध्यासन करी । तरीच मनन निदिध्यासन घडे जरी । ज्ञानचि वाटे तारक ॥ १३ ॥ आत्मज्ञान हेंचि एक । या भवसागरीं तारक । ऐसा विश्वास आत्यंतिक । तेव्हां मननीं निदिध्यासीं प्रवर्ते मन ॥ १४ ॥ यालागीं ह्मणतो हरी । कीं तत्परायणातें जरी । स्थिति वाणली ऐसी तरी । तत्परायणशब्दीं सूचवी हा भाव ॥ १५ ॥ तें ज्ञानचि तारक ह्मणोनि निश्चय । ज्यांस ज्ञानाचा ऐसा परम आश्रय । त्यांस ह्मणे परमात्मा अद्वय । तत्परायण ह्मणोनी ॥ १६ ॥ ऐसे परिपक्क योगज्ञानी । ज्ञानें निर्धूतकल्मष होऊनी । अपुनरावृत्तीतें पावती ह्मणोनी । श्रीकृष्ण ह्मणे ॥ १७ ॥ कल्मषशब्दें पापपुण्य । संचित जन्मजन्मींचें अगण्य । सूचवी एथें श्रीकृष्ण । हा अर्थ वारंवार पूर्वीं वर्णिला ॥ १८ ॥ संचित जळे ध्यातां स्वरूप । अकर्त्रात्मत्वबोधें नव्हे क्रियमाणलेप । भोगें सरे प्रारब्धरूप । पापपुण्यबंधकल्मष ॥ १९ ॥ आतां प्रारब्धभोगार्थ असणें । देह धरूनि तोंवरी त्याचें लक्षण । ऐसें ह्मणोनि कमलेक्षण । बोलतो या श्लोकीं ॥ ६२० ॥

॥ श्लोक ॥ विद्याविनयसंपन्ने ब्राह्मणे गवि हस्तिनि ।
शुनि चैव श्वपाके च पंडिताः समदर्शिनः ॥ १८ ॥

॥ टीका ॥ ज्यास वेदशास्त्राध्ययन । आणि जो विनीत नम्रतेंकरूनि संपन्न । ऐसा ब्राह्मण गाय आणि श्वान । आणि चांडाळ हस्तिसम पाहणें या सर्वांतें ॥ २१ ॥ ऐसे समदर्शी ज्ञानवंत । तेचि ह्मणावे पंडित । कीं विषमता देखोनि अत्यंत । समदर्शन जयांला ॥ २२ ॥ ब्राह्मण ऐसा उत्तमोत्तम । आणि चांडाळ अत्यंत अधमाधम । हें तारतम्य कळोनिही सम । ब्रह्मदर्शन ज्याला उभयत्र ॥ २३ ॥ गाय पशु उत्तमोत्तम । श्वान अत्यंत अधमाधम । हें तारतम्य कळोनि सम । ब्रह्मदर्शन ज्याला उभयत्र ॥२४॥ मृत्तिकेचित्र भिंती । वरि गेरूचीं चित्रें तीं गेरूही माती । विप्र चांडाळ गाय श्वान हस्ती । तें सर्व पाहतां मातीच ॥२५ ॥ ते सर्व माती ह्मणोनि । बोलावें ज्या वाचेकरूनी । विप्र चांडाळादि विवरूनी । त्याच वाचे बोलावें तारतम्य ॥ २६ ॥ ज्या बुद्धीनें सर्वही ब्रह्म । ह्मणूनि पहावें तत्त्वसम ।

त्याच बुद्धीनें उत्तमाधम । जाणावें तयासी ॥ २७ ॥ तेव्हां सर्वत्र पाहती सम । परि वर्तती यथायोग्य ऐसें पुरुषोत्तम । सूचवी कीं कळोनि उत्तमाधम । सम पांहती म्हणे समदर्शी॥२८॥ब्रह्म सर्वत्र समान । हें पाहणें या नांव ज्ञान । त्यासी वर्तणें हें कर्म जाण । तेथें वर्तणें लागे यथायोग्य॥२९॥ नवही द्वारें एक देह । हें भलता जाणे निःसंदेह । तथापि यथायोग्य स्नेह । नवही द्वारीं ॥ ६३० ॥ मुखीं घालावा ग्रास । द्वारांतरीं न घालिती कोणी त्यास । तैसें पाहणेंचि सम आत्मनिष्ठास । यथायोग्य वर्तणें तयासी ॥ ३१॥ पाषाणाचाचि देव । देऊळ पायरिया तो पाषाणचि स्वयमेव । पादरक्षा पायरियांवरी मानव । ठेवूनि मस्तक ठेविती चरणीं देवाच्या ॥ ३२ ॥ जें ब्रह्मत्व पाहती ब्राह्मणीं । तेंचि ब्रह्म दिसे चांडाळपणीं । त्यास बाहेर दुरू-नी घालिती अन्नपाणी । ब्राह्मण पूजिती नेऊनि गृहांत ॥ ३३ ॥ कांस्य-धातु गंडूषपात्र । भोजनपात्रही कांस्यमात्र । परि त्यांत जेविती अन्नें वि-चित्र । गंडूषपात्रीं थुंकती ॥ ३४ ॥ न करिती गंडूषपात्रीं भोजन । आणि ताटांत कोणी न थुंकती जन । एवं सम पाहणेंचि अपरोक्षज्ञान । वर्तणें यथा-योग्य॥३५॥या त्यांच्या दोन्ही रीती । एथें सूचवी श्रीपती । कीं उत्तमाधम जाणोनि पाहती । समदर्शी समब्रह्म ॥ ३६ ॥ ऐसे समदर्शी पंडित । ते जितांचि मुक्त निश्चित । ऐसें आतां अच्युत । बोलतो या श्लोकीं ॥ ३७ ॥

॥ श्लोक ॥ इहैव तैर्जितः सर्गो येषां साम्ये स्थितं मनः ।
निर्दोषं हि समं ब्रह्म तस्माद्ब्रह्मणि ते स्थिताः ॥ १९ ॥

॥ टीका ॥ अगा ऐसा समदर्शी ज्ञानी । या श्लोकींच हा देह जिवंत अ-सोनी । पुन्हां जन्म होय ज्या श्रमें करूनी । तिहीं तो जिंकिला ॥ ३८ ॥ जो पुनः पुन्हा देह सृजितो । तो सर्ग म्हणवूनि बोलिजेतो । तो जिंकिला म्हणजे नाहींचसा तो । केला तिहीं ॥ ३९ ॥ आतां सृजितो पुनर्जन्म तो सर्ग कैसा । श्रोतयांस पडेल संदेह ऐसा । तरी श्लोक द्वितीयचरणासरसा । संदेह निरसितो श्रीकृष्ण ॥ ६४० ॥ 'येषां साम्ये स्थितं मनः' म्हणोनी । जिहीं तो सर्ग जिंकिला त्याच्या या लक्षणेंकरूनी । त्या सर्गाचें रूप ठायीं पाडोनी । अर्थ करावा सूचवी हा भाव ॥ ४१ ॥ पूर्वश्लोकोक्त साम्य । जड ब्रह्मैक्य अनुभवैकगम्य । ज्या साम्यें जडभ्रांतिवैषम्य । नाशलें ॥ ४२ ॥ तेव्हां त्या साम्यांत त्यांचें मन । स्थिति पावे या भावें जगज्जी-वन । 'येषां साम्ये स्थितं मनः' ऐसें मधुसूदन । म्हणे चरणीं दुसरिया

१ पिकदाणी; व जेवायचें ताट एकाच कांशाचीं.

॥ ४३ ॥ त्या साम्यांत पावले स्थिती । त्यांचें मन तिहीं ह्मणे जगत्पती । सर्ग जिंकिला जो पुनर्भवाप्रती । नेणार त्यांला ॥ ४४ ॥ नासे जेव्हां जड-भ्रांति । तेव्हां समीं ब्रह्मीं बाणे स्थिती । तेव्हां जडभ्रमचि सर्ग ऐसें श्रीपती । सूचवी स्पष्ट ॥ ४५ ॥ जलतरंग चित्सागर । भिन्न नसती मृषा[1] आकार । हा साम्यज्ञानप्रकार । बाणतां जडभ्रमसर्ग मग कैंचा ॥ ४६ ॥ हें अन्वय-ज्ञानाचें वैभव । ज्याला नसे त्याला पुनर्भवें[2] । निश्चित ऐसें श्रीमाधव । सूचवी एथें ॥ ४७ ॥ या अन्वयज्ञानीं समत्वीं स्थिती । बाणतां हेतु जो पुन-र्जन्माप्रती । तो सर्ग जिंकिला संतीं । याच लोकीं याच देहीं एथें ॥ ४८ ॥ या श्लोकाचें पूर्वार्ध । त्याचा अर्थ ऐसा जाला सिद्ध । आतां उरलें उत्त-रार्ध । द्विविध अर्थ भावार्थ तयाचा ॥ ४९ ॥ जे केवळ निर्गुणतत्पर[3] । त्यांस सगुणीं नसे आदर । सगुण समत्व सदयत्व भजनें हें साम्यसार । प्राप्त जालें हा अर्थ कोणी न वाखाणिती ॥ ९५० ॥ उत्तरार्धीं अर्थ ऐसा बोलती कीं ब्रह्म । निर्दोष आणि तें सम । त्याकारणास्तव ते समदर्शी परम । ब्रह्मीं स्थिति पावले ॥ ५१ ॥ तेव्हां ब्रह्म सम निर्दोष । नसतें तरी स्थिति न पावतां ते पुरुष । ऐसा अर्थ होतो यांत काय विशेष । सिद्ध होतो भावार्थ ॥ ५२ ॥ ब्रह्म निर्दोष सम यास्तव । जरी हे पावले साम्यस्थैर्यवैभव । तरी सर्वही मानव । कां न पावती हे स्थिति ॥ ५३ ॥ निर्दोष आणि सम । काय त्यां-तेंच तें ब्रह्म । आणि काय सदोष विषम । उरल्या सकळांतें ॥ ५४ ॥ आतां उत्तम आणि अधम । पूजिले मानूनि सम । त्यांस हा दोष लागे परम । ह्मणोनि ह्मणावें ये रीती ॥ ५५ ॥ कीं ब्रह्म सम निर्दोष । त्या ब्रह्मीं ते पुरुष । तयास कैंवी लागे हा दोष । ह्मणोनि ऐसेंही कोणी बोलती ॥ ५६ ॥ तरी ब्राह्मणादि उत्तम । आणि चांडाळादि अधम । त्याविषयीं त्यांचें दर्शनचि सम । वर्णिलें विषमत्व लौकिकही सूचवूनि ॥ ५७ ॥ कीं ब्राह्मणादि उत्तम । चांडाळादि अधम । हें कळत असोनि सम । दर्शन ज्याचें विषम सृष्टींत ॥ ५८ ॥ असोनि समदर्शन । यथायोग्य करितां पू-जन । दोषें लिप्त ते जन । कैंवि होती ॥ ५९ ॥ असोनि समदर्शन । य-थायोग्य न करितां पूजन । तें सदोष होणार भजन । ह्मणोनि समदर्शनत्वचि त्यांचें वर्णिलें ॥ ९६० ॥ चांडाळ पूजितां विप्रासमान । चांडाळासम होतें ब्राह्मणपूजन । तेथें क्षोभ पावतें मन । ब्राह्मणाचें ॥ ६१ ॥ दुसरें हा ज्ञानी

---

१ मिथ्या. २ पुनर्जन्म. ३ भेदस्वरूप.

श्रेष्ठ । ऐसा वर्ततां जन होती भ्रष्ट । मग ब्राह्मणास सर्वांहूनि उत्कृष्ट । जन कां मानिती ॥ ६२ ॥ श्रीकृष्णही मनीं । इत्यादि भाव धरूनी । ब्राह्मणादि उत्तमाधम जाणोनी । ते सम पाहती मात्र ह्मणोनि बोलिला ॥ ६३ ॥ तथापि विप्रचांडाळादि सम । पूजावेच जरी ह्मणता पुरुषोत्तम । तरी हाचि धर्म होता परम । जेंवि बळी अंतीं वैश्वदेवाच्या ॥ ६४ ॥ नाहीं जेविले ब्राह्मण । तोंचि श्र्वचांडालादिपतितवायसांकारणें । अन्न नेऊनि बाहेर ठेवणें । हा कर्ममार्गं अनादिसिद्ध ॥ ६५ ॥ नसोनिही ज्ञान । ब्राह्मणाआधीं श्र्वचांडालादिबलिदान । देतां नव्हती सदोष जन । एथें शंकाच हे व्यर्थ ॥ ६६ ॥ हें तों यथायोग्य पूजन । करितां सुखी होती सर्व जन । आणि विषमीं समदर्शन । भवबंध तुटे या अनुभवें जयाचा । ॥ ६७ ॥ चांडाळ आणि ब्राह्मण सम । पूजितां ब्राह्मण क्षोभती परम । यथायोग्य पूजितां चांडाळ अधम । तोही सुखीच होईल ॥ ६८ ॥ इत्यादि भाव मनीं । तो श्रीकृष्ण धरूनी । ते पंडित समदर्शीच ह्मणोनी वर्णिता जाहला ॥ ६९ ॥ पूजा वर्णिली नसोनी । दाटूनि पूजेची शंका कल्पूनी । निर्दोषी ब्रह्मीं ते आहेत ह्मणोनी । निर्दोषत्व ऐसें त्यांचें कां वदावें ॥ ६७० ॥ एवं हा एक अर्थ । कोणी बोलती तो नव्हे यथार्थ । आतां अबाधित परम समर्थ । अर्थ ऐसा या उत्तरार्धाचा ॥ ७१ ॥ कोणा हातीं कांहीं । ईश्वर कर्म करवीत नाहीं । कीं करवितां कर्मफळ भोगावें तेंही तेथें विषम निर्दयत्व होणार ॥ ७२ ॥ तेथें शंका जाली प्राप्त । कीं जीवात्माही कर्मी अलिप्त । तेव्हां फलभोगवार्ताच जाली समाप्त । तें कर्म करवितां कैंचें वैषम्य निर्दयत्व ईश्वरातें ॥ ७३ ॥ तरी चिदात्मा अकर्ता हें खरें । परी बंध मोक्ष कोणाकरितां हें पाहतां बरें । लागतें विचार निर्धारें । बुद्धीसी ॥ ७४ ॥ आत्मा अकर्ताच असे । परी त्या बुद्धीस तो दिसोनि न दिसे । कीं दृष्टीस दोर गवसे । तथापि भासे सर्पसा ॥ ७५ ॥ एवं दिसोनि न दिसे आत्मा निधान । यालागीं अज्ञानें वेष्टिलें असे ज्ञान । त्या ज्ञानें ज्याचें नासलें तें अज्ञान । तें ऐसें ह्मणोनि समदर्शनपर्यंत वर्णिलें ॥ ७६ ॥ तिहीं पुनर्जन्म करणार । सर्ग जिंकिला असतांचि शरीर । ह्मणोनि पूर्वार्धीं सर्वेश्वर । श्रीकृष्ण ऐसें बोलिला ॥ ७७ ॥ आतां एवढी जीवन्मुक्तपदवी । कोण्या हेतुस्तव लब्ध जाली ह्मणावी । तें उत्तरार्धीं बोलतो गोसावी ।

१ कुत्रीं, चांडालादि नीच मनुष्य, कुष्ठी आदि, कावळे. २ वेदकालापासून यथाक्रम.

सकळा गोंसावी यांचा ॥ ७८ ॥ उत्तरार्ध । निर्दोषं हि समं ब्रह्म तस्माद्ब्रह्मणि ते स्थिताः ॥ टीका ॥ निर्दोष आणि सम । म्हणजे नव्हे निर्दय आणि जें विषम । त्यापासूनि हें जीवन्मुक्तिपद परम । कीं देह असोनि ब्रह्मींच ते राहिले ॥ ७९ ॥ निर्दोष आणि सम । तें म्हणावें सगुणब्रह्म । कीं निर्दय नव्हे आणि नव्हे विषम । म्हणोनि वर्णिलें जें या प्रकरणीं ॥ ६८० ॥ कीं पाप न करवी कोणा हातीं । आणि पुण्यही न करवी जगत्पती । म्हणोनि निर्दोषत्व समत्वस्थिती । ज्याची वर्णिली या प्रस्तुतीं ॥ ८१ ॥ तो करवितो म्हणतां कर्म । होतो निर्दय आणि विषम । ऐसें मानिती त्यास तें सगुणब्रह्म । प्रसन्न नव्हे ॥ ८२ ॥ न जोडतां त्याचे पाय । करितां कोटि कोटि उपाय । मोक्ष नव्हे होती अपार्थ । उपाय सर्व ॥ ८३ ॥ तें सदय आणि सम । मानूनि सेवितां शबलब्रह्म । देणार हें जीवन्मुक्तिपद परम । जें पूर्वार्धीं वर्णिलें ॥ ८४ ॥ उत्तरार्धीं या भावेंकरूनी । म्हणतो जें म्हणावें निर्दोष सम म्हणोनी । तस्मात् म्हणजे त्यापासुनी । ते ‘ ब्रह्मणि स्थिताः ’ म्हणजे ब्रह्मीं थारले ॥ ८५ ॥ ‘इहैव’ म्हणोनि पूर्वार्धीं या श्लोकीं । बोलिला कीं याच देहीं याच लोकीं । जडभेदभ्रम सर्ग जिंकिला कीं । समीं थारलें मन ज्याचें ॥ ८६ ॥ हें जीवन्मुक्तीचें वैभव । त्यापासूनि जो सम सदय देव । कीं मन समीं ब्रह्मीं थारलें इहैव । म्हणजे देह जिवंत असोनिही ॥ ८७ ॥ यालागीं सगुणब्रह्म । सदय आणि सम । निर्दय नव्हे आणि नव्हे विषम । कीं कर्म न करवी कोणा हातीं ॥ ८८ ॥ कर्म करवणें ईश्वरीं । न लागे हें प्रकरण एथवरी । आणोनि समाप्त करी हरी । फळ सांगोनि समत्वसदयत्वभजनाचें ॥ ८९ ॥ ऐसें निर्दोष आणि सम । तें सेवूनि सगुणब्रह्म । जे जाले जीवन्मुक्त परम । त्यांचें लक्षण बोलतो मंगलधाम । या श्लोकीं ॥ ६९० ॥

॥ श्लोक ॥ न प्रहृष्येत्प्रियं प्राप्य नोद्विजेत् प्राप्य चाप्रियम् ॥
स्थिरबुद्धिरसंमूढो ब्रह्मविद्ब्रह्मणि स्थितः ॥ २० ॥

॥ टीका ॥ प्रारब्धेंकरूनी । प्रियपदार्थ पावूनी । हर्ष मानी मनीं । वासनारहित ॥ ९१ ॥ प्राप्त होतां अप्रिय । घाबरा न होय । वासनारहित निःसंशय । मन ज्याचें ॥ ९२ ॥ त्यास नलगे कांहीं । कीं ज्यास विषयवासनाच नाहीं । तथापि प्रारब्ध साराबयास देहीं । बुद्धि असे जों असे आयुष्य देहाचें ॥ ९३ ॥ पूर्वसंस्कारें विषय इंद्रियें शरीर । बुद्धि जाणे

---

१ गोस्वामी—श्रेष्ठ, असें तात्पर्य. २ घात, नाश.

तरी ते स्थिर । प्रिय अप्रिय दोन्ही प्रकार । कळोनिही हर्ष खेद मानीना ॥ ९४ ॥ या भावें ह्मणे हरी । कीं प्रिय पदार्थ कळे परी । त्याच्या लोभें अंतरीं । हर्ष न पावे स्थिरबुद्धि ह्मणोनि ॥ ९५ ॥ ऐसें जाणोनिही अप्रिय । अप्रिय पावोनिही उद्विग्न न होय । कीं स्थिरबुद्धि ब्रह्मानंदमय । भाव ज्याच्या बुद्धीचा ॥९६॥ मीं देह ऐसी भ्रांती । येऊनि न करी मूढ त्याची मती । ह्मणोनि बाणली ऐसी स्थिती । तरी हर्ष विषादरहित तो ॥ ९७ ॥ ऐसा ब्रह्मवेत्ता । तोचि ब्रह्मीं थारलागा तत्त्वता । कीं जडीं प्रपंचीं ब्रह्मसत्ता । उघडी दिसे ज्याच्या बुद्धीस ॥ ९८ ॥ आतां यानंतर श्लोक । तो कां बोले उत्तमश्लोक । त्याचें निमित्त सुज्ञ लोक । परिसोत आतां ॥९९॥ पूर्वश्लोकीं जाणला निर्णय । कीं ज्ञानी पावोनिही प्रिय अप्रिय । हर्ष विषादयुक्त न होय । ह्मणोनी ॥७००॥ येथें अर्जुनास शंका वाटे । संदेह हृदयामाजीं दाटे । कीं बुद्धि ऐसी कवणिये वाटे । ब्रह्मीं स्थिर होय आपली ॥ १ ॥ हा अर्जुनमनोभाव । जाणोनि सर्वसाक्षी देव । तो जों पुसे तों स्वयमेव । उत्तर देतो या श्लोकीं ॥ ७०२ ॥

॥ श्लोक ॥ बाह्यस्पर्शेष्वसक्तात्मा विंदत्यात्मनि यत्सुखम् ।
स ब्रह्मयोगयुक्तात्मा सुखमक्षय्यमश्नुते ॥ २१ ॥

॥ टीका ॥ अगा विषयइंद्रिययोग । होतां सुख दाखवी विषयभोग । परंतु भोगीं दुःखसंयोग । कधीं चुकेना ॥ ३ ॥ भोग होतां गमे सुख । भोग सरतां वियोगदुःख । यालागीं विचारनिष्ठ मुख । न पाहे ह्मणे भोगांचें ॥ ४ ॥ तो मुमुक्षु विरक्त । बुद्धि त्याची ब्रह्मात्मयोगयुक्त । भोगीं दुःख ह्मणोनि आसक्त । बाह्यविषयसुखीं नव्हे त्याची ॥ ५ ॥ परंतु अगा अर्जुना । जों स्वस्वरूपीं मना । सुख स्वानुभवें कळेना । तों वळेना मन तें बुद्धीस ॥ ६ ॥ ह्मणोनि पूर्वश्लोकीं जो बोलिला । त्यानें दीर्घ दृष्टि विचार केला । निधि सुखाचा त्यानें मानिला । आपला आत्मा ॥७॥ कीं बाह्य विषय बहिर्मुख । ते जें सुख दाखवूनि देती दुःख । पाहतां तो तें सुख । आत्मयांतचि आपल्या ॥ ८ ॥ एवं जें सुख बाह्य विषयांभीतरी । तें आत्मयांतचि आहे अंतरीं । ऐसें जाणे तो वरवियेपरी । आसक्ति टाकितो विषयाची ॥ ९ ॥ ब्रह्मयोगें युक्त बुद्धी । त्यांची होऊनि ते पावती सिद्धी । ज्या सिद्धींत समृद्धी । अक्षय्य सुखाची ॥ १० ॥ या श्लोकीं हे अर्थस्थिती । या वेगळे अर्थ बाधित होती । ते वर्णितां ओविया फार होती । ग्रंथ वाढेल अत्यंत ॥ ११ ॥ हा अर्थ अबाधित परी । श्लोकीं न

दिसे झडकरी । ह्मणूनि पदांची योजना यापरी । पाहावी पंडितीं ॥ १२ ॥ ओवी संस्कृत । " बाह्यस्पर्शेषु यत्सुखं । विंदत्यात्मनि तत्सुखं । असक्तात्मा सब्रह्मयोगयुक्तात्मा सुखं । अक्षय्यमश्नुते ॥ १३ ॥ 'एवं मग त्या अक्षय्य सुखातें भोगी । जो या प्रकारें वीतरागी । हे सिद्धि पावणें ह्या लागीं । ठायीं पडतां सुखमूलत्वें निजात्मा ॥ १४ ॥ जरी विषय टाकितां सुखचि जातें । तरी वैराग्य कोणासही न येतें । एवं सुखाचें सुख "आत्मत्वीं आयतें । जातें तें दुःखचि ॥ १५ ॥ अगा आत्मसुखचि विषयांत परी स्वमुख भलें न पाहती मूत्रांत । हे भोग दुःख देती ह्मणूनी विषयांत । न रमती भले ह्मणूनि ह्मणतो या श्लोकीं ॥ १६ ॥

॥ श्लोक ॥ ये हि संस्पर्शजा भोगा दुःखयोनय एव ते ।
आद्यंतवन्तः कौंतेय न तेषु रमते बुधः ॥ २२ ॥

॥ टीका ॥ अगा विषय इंद्रियस्पर्शें उपजती । ते भोग दुःखचि देती । दुःखाचें जन्मस्थान होती । हेचि भोग॥ १७ ॥ ज्यांस आदि ज्यांस अंत । ते दुःखें देतीच निश्चित । आदि सदुःख कीं अत्यंत । आयासें उपजती विषयभोग ते ॥१८ ॥ भोग नाहीं उपजला । तोंच इच्छेनें तळमळूं लागला । भोगांतीं वियोग घडला । तेव्हां मागुती पडला कूपांत दुःखाच्या ॥ १९ ॥ कुंतीसुता ऐसा विचार । करितां होतो हाचि निर्धार । कीं सुख आत्माचि आणि विषयविकार । योनि ह्मणजे उत्पत्तिस्थान दुःखाचें ॥ ७२० ॥ यालागीं पूर्वश्लोकीं । तुज मी स्पष्ट बोलिलों कीं । हा निर्धार केला प्रबुद्धलोकीं। ह्मणूनि न रमती विषयभोगांत ॥ २१ ॥ आतां यानंतर श्लोक । तो कां बोले उत्तमश्लोक । त्याचें निमित्त सुज्ञलोक । परिसोत आधीं ॥२२ ॥ पूर्वश्लोकीं विषयभोग । वर्णिले कीं करिती दुःखयोग । ह्मणूनि ज्ञानी त्यांचा संग । न धरिती न रमती त्यांमाजी ॥ २३ ॥ हे गोष्टी अर्जुनें । आयकोनि धरिली मनें । कीं जें उपदेशिलें कमलनयनें । हें सत्य ॥ २४ ॥ या विवेकाचा दीप जळे । तोंदरी भोगीं दुःख देखती बुद्धीचे डोळे । परी जेव्हां वायु कामाचा खवळे । विझे दीप तो विवेकाचा ॥२५ ॥ पडतां अनादिवासनेचा अंधार । उठती भोगप्राप्तीस उपायतस्कर । त्यांचे पाठिराखे शस्त्रधर । क्रोधाविकार नाना प्रगटती ॥ २६ ॥ एवं उठतां कामविकार । नाठवे पूर्वोक्त विचार । उडे विवेक आणि निर्धार ॥ विषयभोग तयांचा ॥ २७ ॥ मग करूं लागे भोगप्राप्तीचा उपाय । तों भोगयत्नीं पदोपदीं अपाय । कांहीं विघ्न होतां

ातपाय. । आफळी आदळी मस्तक ॥ २८ ॥ एवं भोगत्याग केंवी घडे । यागूनिही पुन्हा फांसां पडे । ऐशा भावें श्रीकृष्णाकडे । पाहे अर्जुन ॥ २९ ॥ प्रश्न करूं जों पाहे । तों देवचि उत्तर देत आहे । कीं बापा जो ो कामक्रोधवेग साहे । ह्मणोनि ह्मणतो या श्लोकीं ॥ ७३० ॥

॥ श्लोक ॥ शक्नोतीहैव यः सोढुं प्राक् शरीरविमोक्षणात् ।
कामक्रोधोद्भवं वेगं स युक्तः स सुखी नरः ॥ २३ ॥

॥ टीका ॥ अगा कामक्रोधांचे वेग । त्यापुढें न थारे भोगवासनात्याग । सकळ निश्चयाचा भंग । करिती वेग कामक्रोधांचे ॥ ३१ ॥ यास उपाय विचार । त्या विचारीं त्यागनिर्धार । या उपायाचा पसर । परिसिला तुवां पूर्वींच ॥ ३२ ॥ ह्मणोनि विवेकाचा भाला । दुरूनीच टोंचिलें वैरियाला । तो भाला पिटूनि रेंटीत आला । आणि हात केला आपणावरी ॥ ३३ ॥ उरीं बैसला भाला । तो पाठीवाटे फुटूनि बाहेर आला । त्यास रेंटीत जो जवळी पावला । तो काय वांचूं पाहतो ॥ ३४ ॥ त्याच्या शस्त्रें घाय । जाला तरी होणार काय । कीं तो भाला पिटितां मृतप्राय । क्षीणबल जाहला ॥३५॥ स्वहस्तीं असे अमृत । तदर्थ आला तो भाला रेंटीत । त्यास भिऊनि तें पाजितां निश्चित । तो अमर होऊनि मारील आपणातें । ॥ ३६ ॥ अगा तेथें धीरपण । धरूनि तें स्वात्मत्वामृत आपण । पितां तो वैरी बलक्षीण । मरणार तत्काळ ॥ ३७ ॥ जो त्यास वश जाला । स्वात्मामृतें जीववी त्याला । तो निश्चयेंसी मेला । हातें तयाच्या ॥ ३८ ॥ अगा कामक्रोध अचेतन । स्वजीवनें त्यासी जीववी स्वमन । त्याच्या नाशाचें साधन । विवेकवैराग्य दृढ शस्त्र ॥ ३९ ॥ त्या शस्त्रें क्षीणबळ । जालें कामक्रोधांचें दळ । ते मरतां मरतां वेग प्रबळ । करिती जीवावरी उठूनि आपल्या ॥ ७४० ॥ तेथें क्षण एक धरोनि धीर । जो सोशील तोचि वीर । उत्तरक्षणीं ते वेग मृगनीर । होऊनि जाती ॥ ४१ ॥ अगा धीरता धरूनि जैसी । जो कामक्रोधांचे वेग सोसी । न धरी विषयभोगाची असोसी । तो सुखी तोचि जीवन्मुक्तही ॥ ४२ ॥ अगा ह्मणसी धराया धैर्य । कोणाचा करावा आश्रय । तरी स्वरूपीं चित्त चिन्मय । ऐसा युक्त होऊनि जो सोसूं शके सुखी तोचि॥४३॥ तोचि सुखी इहैव । इहैव ह्मणजे याचि लोकीं पावे मुक्तिवैभव । शरीर सोडणें त्याहूनि पूर्वींच ह्मणे देव । तो नर सुखी जो ऐसा ॥ ४४ ॥ दृष्टि या लाभावरी देऊनी । चित्त चिदा-

श्रित करोनी । भोगेच्छा न धरी वेग सोसोनी । कामक्रोधांचे ॥ ४५ ॥ तो याच लोकीं नर । जों नाहीं सोडिलें शरीर । तोंचि सुखी ह्मणजे मुक्त विज्वर । हा अर्थ या श्लोकाचा ॥ ४६ ॥ इथें कोणी टीकाकार । 'प्राक् शरीरविमोक्षणात्' याचा विचार । ऐसा बोलती कीं जैसें मृत शरीर । तैसा जितांच जो होय तो सुखी नर एक ॥ ४७ ॥ हाही अर्थ बहु बरा । परी एका गोष्टीनें नव्हे एथें खरा । कीं कामक्रोधवेग नरा । सोसणें लागतें ॥ ४८ ॥ कामक्रोधवेग जितके । ते जो नर सोसूं शके । त्याचें स्वसुख पिके । ऐसें बोलतो श्रीकृष्ण ॥ ४९ ॥ मृतशरीरा सोसणें । नलगे तेव्हां वृथा हें बोलणें । 'प्राक्शरीरविमोक्षणात्' याचा अर्थ याकारणें । वाखाणावा ये रीतीं ॥ ७५० ॥ कीं सोडिल्यावरी शरीर । मोक्षसुख पावेचि ज्ञानी नर । तें शरीर सोडण्याहूनि पूर्वींच सत्वर । सुख पावे ॥ ५१ ॥ हा ऐसा अर्थ अबाधित । तो अर्थ होतो बाधित । भोक्तयांस याहीवरी यांत । जो रुचेल तोचि अंगीकारीत ॥ ५२ ॥ वेग सोसूं शके ह्मणोनी । जरी नसतें या वचनीं । तरी तोही अर्थ मनीं । रुचताच संतांच्या ॥ ५३ ॥ कीं मृतशरीर आलिंगिती । आणि रडती युवती । आणि पुत्रादिक जाळिती । कामक्रोध दोहींपरी नसे तयांला ॥५४॥ हा अर्थ अत्यंत बरा । परी सोसणें नलगे मृतशरीरा । कामक्रोधवेग या नरा । आदळोनिही सोसावे लागती ॥ ५५ ॥ कीं जो सोसूं शके तो नर । सुखी होय ऐसें गीताकार । ह्मणतो तदनुरूप टीकाकार । बोलती तेचि टीका ॥ ५६ ॥ आतां यानंतर श्लोक । तो कां बोले उत्तमश्लोक । त्याचें निमित्त सुज्ञ लोक । परिसोत आधीं ॥ ५७ ॥ कामक्रोधांचे वेग । सोशी न इच्छी विषयभोग । त्यासि जितांचि होय मुक्तीचा योग । शरीरमोक्षणाहूनि पूर्वींच ॥ ५८ ॥ ये रीती उत्तमश्लोक । बोलिला तो वाखाणिलाच पूर्वश्लोक । त्याच्या अनुभवाचें कौतुक । वर्णील आतां यावरी ॥५९॥ कीं शरीरमोक्षणाहूनि पहिलें । मोक्षसुख प्राप्त जालें । जों त्याचें सत्त्व निर्वाण नाहीं पावलें । देहावसानीं परब्रह्मीं ॥ ७६० ॥ जो कामक्रोधवेग । सोसूनि ही न इच्छी बाह्य भोग । त्याचा हा मुक्तिप्रसंग । बोलेल आतां तीं श्लोकीं ॥ ६१ ॥

॥ श्लोक ॥ योऽन्तः सुखोऽन्तरारामस्तथान्तर्ज्योतिरेव यः।
स योगी ब्रह्म निर्वाणं ब्रह्मभूतोऽधिगच्छति ॥ २४ ॥

॥ टीका ॥ अगा ज्याचें चित्त अंतर्मुख । त्याला अंतरींच बाणे सुख ।

तो ह्मणावा अंतःसुख । अर्जुना गा ॥ ६२ ॥ तोचि कामक्रोधांचे वेग । सोसी ज्याला अंतःसुखाचा योग । आणि त्यासचि हा नित्यसुखसंयोग । जो वेग सोसूं शकें नित्य कामक्रोधांचे ॥६३॥ आणि अगा बाह्य विषयांवरी । अंतर्दृष्टि रमेना जरी । कामक्रोधवेग तरी । सोसी ऐसा कोण असे ॥६४॥ हा सोसितो यापरी । कीं याची दृष्टि रमे अंतरीं । जें तें ब्रह्मचि देखे परी । न मानी विषय जो कांहीं ॥६५॥ तो ह्मणावा अंतराराम । कीं अंतरींच जो रमे आत्माराम । ह्मणजे विषय आणि इंद्रियग्राम । या जडतरंगीं देखे चित्समुद्र ॥ ६६ ॥ताटंक कंकणादि आकार । वेश्या पाहे अलंकार । हेमक्रयविक्रयकार । हेमचि पाहे अलंकार दृष्टीं दिसोनिही ॥६७॥ वेश्या अलंकारींच मोहे । हा सोन्याकडेच पाहे । कार्यवासना सोडूनि रमताहे । कारणींच ऐसा अंतराराम ॥ ६८॥ विषय इंद्रियें साच मानी । तो भोगासक्त होय अभिमानी । तो बहिराराम ह्मणोनी । अगा ह्मणावा ॥ ६९ ॥ विषय आणि इंद्रियें । देखत असे हा स्वयें । परी पटीं तंतु या निश्चयें । स्वरूपींच रमतो अंतराराम ॥ ७० ॥ ब्रह्म बाह्य अभ्यंतरीं । ऐसें असोनि रमणें अंतरीं । अंतरारामाचें यापरी । काय हो ह्मणोनि हे शंका ॥ ७१ ॥ एथें समजावें या प्रकारीं । कीं मिथ्याभास वरिच्यावरी । यालागीं अधिष्ठान जरी बाह्यांतरीं । तरी अंतरीं ह्मणावें याकरितां ॥ ७२॥ कीं विवर्त नसे अंतरीं । अधिष्ठान असे विवर्ताभीतरीं । तें असोनिही बाह्य अभ्यंतरीं । पाहणें अंतरीं विवर्ताच्या ॥ ७३ ॥ तंतूस वरिच्यावरी । पट भासे तो नसे अंतरीं । ह्मणूनि पटाभीतरीं । तंतुच ह्मणावा ॥७४॥ तसीच वरिच्यावरी । दृष्टि पडे पटाकारीं । दृष्टि तेचि निघे अंतरीं । तो तंतुमात्र ॥ ७५ ॥ वरिच्यावरीच भास । अधिष्ठान आंत बाहेर त्यास । अंतरीं पाहतां विवर्तास । ठाव नसे ॥ ७६ ॥ अंतरीं अधिष्ठान दिसे । यालागीं वेदीं शास्त्रीं शब्द ऐसे । एवं अंतर्दृष्टि रमतसे । अंतराराम ॥ ७७ ॥ आतां अंतरींच सुख ज्याला । अंतरींच रमणें त्याला । ऐसें बोलतां प्राप्त जाला । भेद एथें ॥ ७८ ॥ कीं अंतःसुखानुभवकळा । पावला परी हा वेगळा । ऐसें सहज बोलतां धरितें गळा । द्वैत एथें ॥ ७९॥ ह्मणूनि एथें दुसरिया चरणीं हरी । हे द्वैतशंका परिहरी । कीं तैसा हा बोलिला तरी । जरी अंतर्ज्योति स्वयें हाचि ॥७८०॥ ॥ द्वितीय चरण ॥ तथांतर्ज्योतिरेव यः ॥ टीका ॥ तथा ह्मणजे तैसा । कीं अंतःसुख अंतराराम ह्मणोनि वर्णिला जैसा । तैसा जाला तो अर्जुन ऐसा ।

कीं अंतर्ज्योतिच जो स्वयें ॥ ८१ ॥ ज्योति ह्मणजे प्रकाश । जे प्रकाशी प्रकाशा आणि अंधकारास । प्रकाश अंधकार दोन्ही मृगजलाभास । ज्या चित्प्रकाशें प्रकाशती ॥ ८२ ॥ सूर्यें प्रकाशिले अलंकार । तरी सुवर्णावांचूनि ते ते आकार । न दिसती न असती वारंवार । हे दृष्टांत पूर्वीं सिद्ध जाले ॥ ८३ ॥ जरी निबिड अंधकार । हातीं चाचपतां कळे अलंकार । परी आधीं हातास निर्विकार । सोनेंचि लागे॥८४॥सूर्यावांचूनि अलंकार । असों शके धरूनि आधार । परी सोडोनि कनक निर्विकार । न असे न दिसे न लागे हातासही॥८५॥ एवं सोनेंचि नगै धरी दावी । तेव्हां सोनेंचि त्याचि ज्योति ह्मणावी । तैसी जगत्प्रकाशता वदावी । आत्मयातें ॥८६॥ तरंग वरिच्यावरी भासती । उदक त्यांची प्रकाशक अंतर्ज्योती । चित्तलहरींत चित्स्फूर्ती । अंतर्ज्योति त्याची तेच कीं ॥ ८७ ॥ जो ज्ञानी अंतर्ज्योति ऐसा । तो तथा ह्मणजे तैसा । कीं अंतःसुख अंतराराम ह्मणूनि ऐसा । वर्णिला तो अगा स्वयेंचि अंतर्ज्योती ॥ ८८ ॥ तो ह्मणावा ब्रह्मभूत । ह्मणजे ब्रह्मचि जाला निश्चित । प्रारब्धें जों देह आहे जित । तोंचि शरीरमोक्षणाहूनि पूर्वींच तो ऐसा ॥ ८९ ॥ हेंही शंकेचें स्थळ । कीं जो अंतर्ज्योतिच स्वयें केवळ । तो ब्रह्मभूत ह्मणजे ब्रह्म जाला ह्मणणें प्रबळ । विरोध एथें उपजवी ॥७९०॥ तरी याचा ऐसा भाव । कीं नाना जळीं सूर्य तैसा देव । प्रतिबिंबत्व पावला स्वयमेव । हे श्रुत्यर्थ पूर्वींच सिद्ध जाले॥९१॥ "ममैवांशो जीवलोके" ह्मणोनी । पंचदशाध्यायांत स्वमुखेंकरूनी । "भुंजानं वा गुणान्वितं" ऐसें बोलोनी । भोक्ता स्वांश वर्णील भगवंत॥९२॥ अज्ञान बुद्धीस होतें । तोंचि भिन्नत्व त्या प्रतिबिंबांशातें । योगीं ऐक्य तयातें । ब्रह्मभूत ज्ञानी ह्मणावा तो यास्तव ॥ ९३ ॥ जगत्प्रकाशक ज्योति । तो स्वयेंचि ऐसी बाणली स्थिति । जितांच पावला जीवन्मुक्ति । तो तेव्हां ॥ ९४ ॥ ऐसा बिंबैक्य पावला । ब्रह्मभूत ह्मणावें त्याला । तरी जो ब्रह्मचि केवळ जाला । देह असों नये तयासी ॥९५॥ ब्रह्म निर्धर्म निर्गुण । देह जड त्रिगुण । तेव्हां अंतःसुख अंतरारामपण । अनुभवी कोणत्या देहीं ॥९६॥ ह्मणूनि ह्मणे यदुपती । कीं "ब्रह्मनिर्वाणमृच्छति" । ह्मणजे प्रारब्ध सरतां देहांतीं । तो ब्रह्मनिर्वाण तें पावे ॥९७॥ कीं बिंबीं प्रतिबिंबैक्ययोगीं । तथापि प्रारब्धभोगार्थ जगीं । देह असे तेव्हां भोगी । सत्त्वीं प्रतिबिंबे मागु-

१ घन, दाट. २ स्पर्शून पाहतां. ३ सोनें. ४ दागिना.

ती चिदंश ॥ ९८॥ कीं ज्या सत्त्वास ऐक्यानुभव । त्या सत्त्वींच प्रतिबिंबला देव । प्रतिप्रलय सृष्टीतें पावेल संभव । ब्रह्मैक्य पावोनि मागुती ॥९९॥ कीं मेघ वर्षती जळ । तें सूर्यापासूनि निघे केवळ । ऐसें बोलती प्रांजळ । श्रुतीही ॥ ८०० ॥ श्रुति ॥ याभिरादित्यस्तपति रश्मिभिस्ताभिः पर्जन्यो वर्षति ॥ श्रुत्यर्थ ॥ स्पष्ट येथें श्रुत्यर्थ । मेघजळ सूर्यकिरणांतील यथार्थ । ग्रंथविस्तार कां व्यर्थ । करावा ॥ १ ॥ मेघांत कोठूनि येतें पाणी । हें तों न देखे दृष्टीं कोणी । यालागीं बोलते वेदवाणी । कीं आदित्य तपतो वर्षतो तया किरणीं । हेंचि सत्य ॥ २ ॥ एवं सूर्याचींच नाना जळें । त्यांत दिसती त्याचीं मंडळें । सूर्येंचि जळ शोषितां तीं सकळें । सूर्याचमध्यें पावती एकत्व ॥ ३ ॥ पुन्हा सूर्य वृष्टि करी । प्रतिबिंबें होती नाना नीरीं । तैसें प्रतिसृष्टि प्रतिसंहारीं । ब्रह्मीं रिघणें निघणें प्रतिबिंबासी ॥ ४ ॥ जळें प्रतिबिंबें सूर्यांतूनि निघती । प्रवेशती दोन्ही त्यांत मागुती । इतकीच एकदेशी दृष्टांतरीती । ब्रह्मीं उपाधि प्रतिबिंबप्रवेशनिर्गमीं वदावी॥५॥ नासे ज्याची अविद्या । त्याच्या जीवोपाधींत वाणे विद्या । तो न परते पावूनि आद्या । पुनरपी ॥ ६ ॥ प्रस्तुतीं याची अविद्या गेली । परी बुद्धि आहे उरली । इंद्रियें तींत असतीं भरलीं । तांदूळ जैसे कोथळींत ॥ ७ ॥ भक्षावया योग्य होती । परी पेरितां तांदूळ नुगवती । तैसी ज्ञानियाचीं इंद्रियें असती । योग्य प्रारब्धभोगमात्रासी ॥ ८ ॥ प्राप्त होतां प्रारब्धभोगकाळ । प्रतिबिंबयुक्त बुद्धि जळ । होय त्यांत डळमळ । दिसे घडी एक प्रतिबिंबाची ॥ ९ ॥ राजपुत्र एकास मारी । आणि वसे पित्याचे मांडीवरी । तो गाऱ्हाणें सांगतां उतरी । मांडीवरूनि क्षण एक दंडार्थ ॥८१०॥ यथान्यायें दंड करी । मागुती घे मांडीवरी । तैसा भोगकाळ सरतां परमेश्वरीं । पुन्हा एकत्व भोग भोगूनी ॥ ११ ॥ ज्ञानी पावला बिंबात्मता । तरी प्रारब्ध भोगणें तत्त्वतां । बिंबास भोग न घडे आतां । प्रारब्ध कोणें भोगावें ॥ १२ ॥ जडास न घडे सुखदुःखभोग । बिंबास नसे सुखदुःखसंयोग । आतां प्रारब्धभोगाचा योग । बोलावा कवणासी ॥ १३ ॥ एवं प्रतिबिंबयोगें उपाधी । अहंकर्तृत्वभावें आधीं । कर्म करितां जाला ते प्रारब्धीं । भोग लिहिले तयाच्याच ॥ १४ ॥ जो जैसें कर्म करी । तो तैसें फळ भोगी यापरी । विचारणा करितां वरी । प्रारब्ध भोगणें शरीरीं प्रतिबिंबाचिया

---

१ उत्पन्न होत नाहींत.

॥ १५ ॥ विवेक्य पावे तोचि ज्ञानी होऊनी । प्रारब्धभोग त्यास तेव्हांही ह्मणोनी । शास्त्र बोलतें आणि चैतन्यावांचूनी । भोग न घडे ॥ १६ ॥ प्रारब्ध तरी भोगीं । आणि सर्वदा ब्रह्मात्मयोगीं । तरी प्रतिबिंब घडी एक भोगालागीं । होणेंचि लागे तयाला ॥ १७॥ एवं ब्रह्मभूतही होऊनी । निर्वाण नाहीं पावला ज्ञानी । कीं प्रारब्धभोगार्थ उपाधि असे ह्मणूनी । प्रतिबिंब होणें लागतें ॥ १८ ॥ जेव्हां प्रारब्ध सरे । सत्त्वोपाधि वेगळा न उरे । तेव्हां प्रतिबिंबत्व न स्फुरे । कदापिही ह्मणावा तो निर्वाण ॥ १९ ॥ ह्मणोनि ह्मणे संतांचा पति । कीं " ब्रह्मभूतो ब्रह्मनिर्वाणमृच्छति " । ब्रह्मभूत ह्मणणें हे स्थिति । शरीरमोक्षणाहूनि पूर्वी तयाला ॥ ८२० ॥ आधीं जितां होती ब्रह्मभूत । मागुती ब्रह्म निर्वाण पावती देहांतीं निश्चित । ऐसें स्पष्टही यानंतर अच्युत । बोलतसे या दुसरिया श्लोकीं ॥ २१ ॥

॥ श्लोक ॥ लभंते ब्रह्म निर्वाणमृषयः क्षीणकल्मषाः ।
छिन्नद्वैधा यतात्मानः सर्वभूतहिते रताः ॥ २५ ॥

॥ टीका ॥ ब्रह्मीं निर्वाण पावती । ऋषि ह्मणजे अपरोक्ष जे अनुभविती । परी जेव्हां क्षीणकल्मष होती । निर्वाण पावती ते समयीं ॥ २२ ॥ क्षीण होतें कल्मष । ह्मणजे सरतें कर्म जेव्हां अशेष । यावेगळा ज्ञानी तितका निर्दोष । होतो अपरोक्ष आत्मा देखतां बुद्धीनें ॥ २३ ॥ श्रुति ॥ यस्तु विज्ञानवान्भवत्यमनस्कः सदा शुचिः ॥ श्रुत्यर्थ ॥ जो होतो विज्ञानवंत । तो सदा शुचिभूत । कीं तो अमनस्क ह्मणजे मनरहित । कीं मन कल्पितें आणि मन सर्वही ब्रह्म ॥ २४ ॥ ऐशा अनेक श्रुती । मागें चतुर्थाध्यायीं बोलिला श्रीपती । कीं अर्जुना तूं परम पातकी असलासि त्रिजगतीं । तरी ज्ञानेंचि होसी निष्पाप ॥ २५ ॥ यालागीं जे ऋषि ज्ञानी । ते ब्रह्मनिर्वाण पावती निष्कल्मष होऊनी । इतर कल्मष हे विरुद्ध गोष्टी भगवद्वचनीं । नये कदापी ॥ २६ ॥ यालागीं कल्मषशब्दें कर्म त्रिविध । संचित क्रियमाण प्रारब्ध । नुरतां या तिहीं कल्मषांचा गंध । प्रारब्ध सरतां पावती ब्रह्मनिर्वाण ॥ २७ ॥ हा अर्थ श्रीकृष्णाच्या मनीं । तो सिद्ध करूनि दाखवावा ह्मणोनी । त्याचीं लक्षणें उत्तरार्धेंकरूनी । तोचि भगवंत बोलतो ॥ २८ ॥ उत्तरार्ध ॥ छिन्नद्वैधा यतात्मनः सर्वभूतहिते रताः ॥ टीका ॥ तुटोनि गेलें ज्याचें द्वैत । ह्मणजे वाणलें अद्वैत[1] । कीं गुरुमुखें ज्ञान होतां अत्यंत । यत्नशील बुद्धि ज्याची ॥ २९ ॥ ज्ञान जालियावरी ज्ञानियासे ।

१ अद्वैतानुभवसंपन्न.

दृढ वैराग्य आणि दृढ अभ्यास । पाहिजे हाचि प्रयत्न त्यांस । हीं दोन्ही साधनें बरीं जयांचीं ॥ ८३० ॥ आणि सर्व भूतांचें जें हित । कीं तिहीं सन्मार्गीं वर्तावें निश्चित । या ऐशा सर्वभूतहितीं रत । ह्मणजे ते जगदुद्धारक जगद्गुरु ॥३१॥ ऐसेही जितांच जे ब्रह्मभूत । तेही ब्रह्मीं निर्वाण निश्चित । पावती होऊनि अत्यंत । क्षीणकल्मष ह्मणजे क्षीण होतां प्रारब्ध ॥ ३२ ॥ जे ऐसे ब्रह्मभूत जाले । ते जितांच ब्रह्म निर्वाणचि पावले । ह्मणूनि या प्रकरणीं बोले । श्रीकृष्ण या तिसरिया श्लोकीं ॥ ३३ ॥

॥ श्लोक ॥ कामक्रोधवियुक्तानां यतीनां यतचेतसाम् ।
अभितो ब्रह्म निर्वाणं वर्तते विदितात्मनाम् ॥ २६ ॥

॥टीका॥ विदितात्मे ह्मणिजे ज्यांला । आत्मा बरा विदित जाला । अगा अर्जुना उभयत्र त्यांला । जितां मेलियाही ब्रह्म निर्वाण ॥ ३४ ॥ जीवंत असो अथवा मरो गात्र । ब्रह्मीं निर्वाण त्यांस उभयत्र । कीं उपाधि उरला प्रारब्ध भोगायास मात्र । तोही ब्रह्मचि समजेल हा भाव ॥ ३५ ॥ प्रारब्ध आणि त्याचा भोग । सुखदुःख आणि त्याचा संयोग । ब्रह्मचि सर्वही हा अन्वयसमाधियोग । बाणणें नव्हे काय ब्रह्म निर्वाण ॥ ३६ ॥ देह पडलियाउपरी । हेंही नसे ह्मणोनि यापरी । देहत्यागाचे अवसरीं । ब्रह्मीं निर्वाण मागें बोलिलों ॥ ३७ ॥ अगा ब्रह्मचि आहे सकळ । परि त्यांत अविद्या दुःखमूळ । तें अज्ञान नाशलें जठरशूळ । ब्रह्मनिर्वाण त्याच समयीं ॥३८॥ उत्तरार्ध ऐसा प्रसंगानुसार । वर्णिला आतां या प्रकरणाचा उपसंहार । ह्मणजे या तीं श्लोकीं बोलिला प्रकार । जीवन्मुक्ति आणि मुक्ति दोहींचा तो संपतो ॥ ३९ ॥ प्रकरण आरंभतें एथूनी । कामक्रोधवेग सोसी तो वर्णिला जेथूनी । जे तैसे ते ऐसी सिद्धि पावती ह्मणोनी । बोलतो आधीं या पूर्वार्धीं ॥ ८४० ॥ कीं कामक्रोधरहित । यति आणि यतचित्त । हे पूर्वार्धीं बोलोनि ह्मणे अच्युत । उभयत्रही ब्रह्म निर्वाणचि असे त्याला ॥ ४१ ॥ कामक्रोधवर्जित । यावरूनि त्यास सुचवी अच्युत । कीं कामक्रोधवेग सोसूं शके तो सुखी अत्यंत । शरीरमोक्षणाहूनि पूर्वींच ह्मणूनि जो वर्णिला ॥ ४२ ॥ कामक्रोध त्यागिले म्हणावे तरी । कीं त्यांचे वेग सोसूं शके जरी । कीं वेग दाविती अत्यंत परी । हा वश नव्हे तयांला ॥ ४३ ॥ अत एव देह सोडिल्यावरी । होणार मुक्तिसुख तें याचि शरीरीं । तो पावे ह्मणूनि वर्णिला यापरी । जो सोसणार वेग कामक्रोधांचे ॥ ४४ ॥ त्यास

मागें वर्णी अच्युत । कीं जितांचि तो ब्रह्मभूत । देहांतीं ब्रह्मनिर्वाण अत्यंत । तो पावतो सरतां प्रारब्ध ॥ ४५ ॥ या श्लोकीं ब्रह्म निर्वाण । ह्मणे जितां मेलिया तैसियासी जाण । त्याचें आधीं वर्णिलें लक्षण । पूर्वार्धेंकरूनी ॥ ४६ ॥ कीं ऐसे ते कामक्रोधवर्जित । यति आणि यतचित्त । यतिशब्दे संन्यासी निश्चित । परि ते दों प्रकारींचे ॥ ४७ ॥ टाकूनि सर्व काम्यकर्म । होऊनि निष्काम निष्कर्म । जे अनुभवूनि ब्रह्म निर्वाण । जाले ऐसे ॥ ४८ ॥ गार्हस्थ्यादि आश्रम असोनी । जो ऐसा जाला ज्ञानी । तो संन्यासी ह्मणूनी । मागें वर्णिला पुढेंही वर्णील श्रीकृष्ण ॥ ४९ ॥ हा संन्यास नसतां । व्यर्थ भगवा संन्यास नुसता । हा अंतरीं असोनि तोही वरुता । असे तरी सोनें आणि तें सुगंध जैसें ॥ ८५० ॥ याकारणें श्रीपती । ह्मणे कीं जे ऐसे यती । त्यांस देह जितां मेलियाही मुक्ती । अगा अर्जुना ॥ ५१ ॥ एवं कामक्रोधवेग सोसी । न धरी विषयभोगाची असोसी । जे तैसे त्यांस सिद्धि ऐसी । हें प्रकरण एथवरी आणिलें ॥ ५२ ॥ एथें कोणी ह्मणती । कीं ब्रह्मीं ऐसी बाणतां स्थिती । कामक्रोधवेगचि त्यास नसती । जितां मेलियाही ब्रह्म निर्वाण ज्याला ॥ ५३ ॥ तरी उदकरूपचित्त । नीच स्थळासि धांवे निश्चित । ह्मणोनि ह्मणे यतचित्त । ते अगा ॥ ५४ ॥ ऐसें आवरिलें चित्त । तें चित्त ह्मणावें यत । त्यांस उभयत्र ब्रह्म निर्वाण निश्चित । जे ह्मणे कामक्रोधवर्जित यतचित्त ॥ ५५ ॥ तरीच कामक्रोधवर्जित । कीं जरी आहेत यतचित्त । यतचित्त ह्मणोनि अत्यंत । वेग सोशी कामक्रोधांचे ॥ ५६ ॥ शस्त्रें आदळती शरीरीं । परी दृढ कवच असे त्यावरी । तो शूर तीं शस्त्रें सोसी यापरी । हे वेग सोसी जीवन्मुक्तही ॥ ५७ ॥ जीवन्मुक्ताचें लक्षण । कीं तो वासनारहित विचक्षण । परी प्रारब्धभोगाकारणें त्रिगुण । असती कांडिल्या तांदुळासारिखे ॥ ५८ ॥ भोगास मात्र असती । देहांतरास कारण न होती । वासनारहित स्थिती । बाणे जयाला ॥ ५९ ॥ अग्नि शेकायाची वासना । उष्णकाळीं असेना । पाकार्थ ठेवितां हुताशना । करीच उष्णत्व ॥ ८६० ॥ प्रारब्धाकारणें काम । उरेच हा जरी आत्माराम । हा जरी अत्यंत निष्काम । वेगउठती तेव्हां तरी तयातें ॥ ६१ ॥ ते बाधा करूं न शकती तयास । ह्मणोनि ते वेग सोसायास । न लागती जीवन्मुक्तास आयास । ब्रह्म निर्वाण उभयत्रही तयाला ॥ ६२ ॥ कामक्रोधांचे वेग सोसिती जेथें । क्रोधाचे वेग

नुठतीच. तेथें । यालागीं समजावें ऐसें एथें । कीं काम सोसितां क्रोधही सोसिलाचि ॥ ६३ ॥ एवं अनादि वासना । ते ज्या ब्रह्मनिष्ठा असेना । जीवन्मुक्त त्या स्वसुखसंपन्ना । ह्मणावें ॥ ६४ ॥ तथापि प्रारब्ध विचित्र । लिंगदेह भोगसाधन मात्र । असे भंजित बीजरूपें सूक्ष्म गात्र । वासनेचें ॥ ६५ ॥ यालागीं भोगुनिही भोग । सोशी कामक्रोधवेग । तो काम त्याचा मुक्तियोग । भंगुं शकेना ॥ ६६ ॥ आतां यानंतर श्लोक । तो कां बोले उत्तमश्लोक । त्याचें निमित्त सुज्ञ लोक । परिसोत आधीं ॥ ६७ ॥ मोक्ष नसे ज्ञानाविण । तें ज्ञान ज्यास त्यासी मुक्तपण । ऐसें वर्णी श्रीकृष्ण । एथवरी ॥ ६८ ॥ कोणी नसोनि आत्मज्ञान । वश करिती आपुलें मन । मोक्षाची इच्छा धरूनि साधन । करिती मनोजयाचें ॥ ६९ ॥ तेही मोक्षास अधिकारी । मुक्त जालेच ह्मणावे परी । जाणोनि मातें मुक्ति खरी । पावतील ह्मणतो या श्लोकीं ॥८७० ॥

श्लोक ॥ स्पर्शान्कृत्वा बहिर्बाह्यांश्चक्षुश्चैवांतरे भ्रुवोः ।
प्राणापानौ समौ कृत्वा नासाभ्यंतरचारिणौ ॥२७॥
यतेंद्रियमनोबुद्धिर्मुनिर्मोक्षपरायणः ।
विगतेच्छाभयक्रोधो यः सदा मुक्त एव सः॥ २८ ॥

॥टीका॥ या दों श्लोकीं साधनसमृद्धि । सांगोनि मागुतीं ज्ञानेंचि सिद्धी । ह्मणोनि तिसऱ्या श्लोकीं ज्ञानप्रसिद्धी । बोलेल ॥ ७१ ॥ या श्लोकीं ह्मणतो हरी । कीं जो बाह्यविषय घालोनि बाहेरी । दृष्टि दोन्ही भोंवयांभीतरीं । स्थिर करी सम करोनि प्राणापानांतें ॥७२॥ आवरोनि मन बुद्धि इंद्रिय । वसे ज्यास मोक्ष परम आश्रय । इच्छा भय क्रोधादिरहित सदा होय । तोही मुक्तचि गा ॥ ७३ ॥ दों श्लोकीं अर्थ ऐसा । परी श्रोते ह्मणती विशद कैसा । तरी बोलिजेल प्रकाश जैसा । बोलिला एथें या साधनाचा ॥७४॥ बाह्येंद्रियसमुदाय । बाह्यचि त्याचे विषय । परी अंतरीं आठवितां भंग होय । एकाग्रतेचा ॥ ७५ ॥ ह्मणोनि बाह्यास घालोनि बाहेरी । ह्मणजे नचिंती मनाभीतरीं । ऐसें करोनि दोन्ही डोळे अंतरीं । लावी दोहीं भोंवयांच्या ॥७६॥ भोंवयांवरी जें कपाळ । त्या दों भोंवयांचें अंतरीं जें मध्यस्थळ । तेथें चक्षुरिंद्रिय नेत्रयुगुळ । लावूनि लक्षी आरंभ नासिकेचा तेथूनि ॥ ७७ ॥ तरीच तेथें थारती नयन । कीं जरी दृष्टीसवें थारे मन । तरी मन थारे कीं चिंतन । बाह्य विषयांचें घडेना ॥ ७८ ॥ तथापि मन असे प्राणाधीन । कीं प्राणबोधें परा उठतां चिंतन । पश्यंती सूक्ष्मरूपें करी विष-

याचें ॥ ७९ ॥ यालागीं नासापुटांचे अंतरीं । प्राण अपान खालवरी । संचरती तोंवरी । मन न थारे दृष्टीसह भ्रूयुगांत ॥ ८८० ॥ तरी प्राणापान सम करूनी । ह्मणजे पूरकरेचकावांचूनी । मूलाधारीं उगाच कुंभक धरूनी । भोंवयांत योजी दृष्टीतें ॥ ८१ ॥ दृष्टीसवें तेव्हां मन । थोर न करी विषयचिंतन । परी त्या मनाचें होय शोधन । तरीच थोर ॥ ८२ ॥ इच्छा भय क्रोध । या दोषींच मन अशुद्ध । हे टाकितां होय शुद्ध । तेव्हां थारे मन तें ॥ ८३ ॥ तरी हींही साधनें घडलीं तयाला । मोक्ष अपेक्षित ज्यास जाला । अतएव परम आश्रय जयाला । एकला मोक्ष वाटतो ॥८४॥ सदा जो कां मौनी । ऐसा मुमुक्षु मुनी । भगा तो मुक्त ह्मणोनी । मानावा ॥ ८५ ॥ कीं साधनीं ऐसिया शुद्ध जाला । ज्ञान होणारचि त्याला । तो जाणोनिया मला । मुक्त पावेल ॥ ८६ ॥ या पुढलिया श्लोकीं हरी । बोलेल ऐशियापरी । परी या दों श्लोकांभीतरीं । लक्षवादी नाचती अत्यंत ॥ ८७ ॥ तें ब्रह्म नव्हे त्यांचें लक्ष । जे नेत्र देखती प्रत्यक्ष । हा त्यांचा खंडोनि पाखंड पक्ष । मग त्यापुढील श्लोक वाखाणूं ॥ ८८ ॥ या श्लोकीं ह्मणे हरी । कीं चक्षु दों भोंवयांअंतरीं । लावूनि जो मोक्षपरायण यापरी । तो मुक्तचि ॥ ८९ ॥ नेत्र दोनी भोंवयांत । लावी ह्मणतां हें प्रकारांतरें अत्यंत । आपल्या लक्षास मानिती विहित । प्रमाण तें ॥ ८९० ॥ कीं ते नेत्र झांकिती । आणि बुबुळें उफराटीं करिती । ते भोंवयांचें अंतर मानिती । तेज लक्षितां बुबुळांचें ॥ ९१ ॥ लिंगदेहीं इंद्रियें असती । तीं स्थूळ देहीं गोळकीं वसती । त्यांत चक्षुरिंद्रियास गवसती । ज्योतिर्विकार बुबुळांचे ॥ ९२ ॥ कोणास चक्रें दिसती । कोणास नक्षत्रांचे घोंस भासती । कोणास उगीच दिसे ज्योती । हिरवी पिंवळी निळी आरक्त शुभ्र ॥ ९३ ॥ तेंच ह्मणती ब्रह्म शुद्ध । आपण ब्रह्मदर्शी प्रबुद्ध । त्या लक्षास लक्षितां मानती सिद्ध । मोक्ष आपणातें ॥ ९४ ॥ त्यांस चक्षु भोंवयांत । ह्मणतां वाटे प्रमाण अत्यंत । आणि 'स मुक्त एव' ह्मणे अच्युत । तरी मोक्ष या लक्षें मानिती आपण ॥ ९५ ॥ हेंच प्रमाण जरी । ब्रह्म इंद्रियगम्य मानावें तरी । तेव्हां आपल्या वचनास आपण हरी । विरुद्ध बोलतो ह्मणावें ॥ ९६ ॥ बुद्धिग्राह्य तें सुख निश्चित । आणि इंद्रियां अगम्य इंद्रियातीत । ऐसें षष्ठाध्यायांत । अच्युत बोलेल ॥ ९७ ॥ षष्ठाध्यायश्लोकार्ध । सुखमात्यंतिकं यत्तद्बुद्धिग्राह्यमतींद्रियम् ॥ टीका ॥तें बुद्धिग्राह्य सुख अर्जुना । अतींद्रिय ह्मणजे इंद्रि-

यातीत बुद्धीविना । सर्वथा इंद्रियां दिसेना । बुद्धीनेंच घ्यावें तें सुख ॥ ९८ ॥ तेज लक्ष डोळां दिसे । तें ब्रह्म संत मानिती कैसें । जे लक्षवादी ऐसे । ते चुकले पंथ मोक्षाचा ॥ ९९ ॥ इंद्रियांतें ब्रह्म न दिसे । तें बुद्धीसचि गम्य असे । सर्वत्र वेदीं घोष ऐसे । श्रुतीचे ॥९००॥ श्रुति ॥ न संदृशे तिष्ठति रूपमस्य न चक्षुषा पश्यति कश्चिदेनम् । हृदा मनीषा मनसाभि क्लृप्तं य एनं विदुस्तेऽमृता भवन्ति ॥ श्रुत्यर्थ ॥ दृष्टीस रूप दिसे । यास रूप न असे । चक्षूकरूनि पाहात नसे । कोणी यातें ॥ १ ॥ हृदयेंकरूनीच कळे । मनीषायुक्त मन त्यातेंचि आकळे । मनीषा बुद्धि तीस तें कळे । त्या मनेंचि जाणावें ब्रह्म तें ॥ २ ॥ हृदयशब्दें अंतःकरण । चित्त बुद्धि मन तीं परी त्याचें स्फुरण । या चहूंचें पाहतां विवरण । एक शुद्ध सत्त्व ॥ ३ ॥ एवं सत्त्वें ब्रह्म पाहावें । त्यानें तदाकार होऊनि राहावें । अंतःकरण चित्त बुद्धि मन ह्मणावें । त्याच शुद्धसत्त्वास ॥ ४ ॥ ह्मणूनि मनें पाहावें ह्मणती । बुद्धीस दिसतें ऐशाही श्रुती । एवं शुद्ध सत्त्वास साक्षात्कारस्थिति । इंद्रियां अगम्य ॥५॥ सर्वज्ञ ईश्वर अनादी । त्याचीं अनादि वचनें त्या वेदीं । डोळा तेथें न पावे ऐसें उपपादी। सर्वज्ञ ईश्वर याचिकरितां ॥ ६ ॥ कीं बुबुळांचिया ज्योती । पानीं झांकूनि लक्षितां चक्षुसि दिसती । कीं चक्षुरिंद्रियाची वसती । दोहीं बुबुळांत ॥ ७ ॥ तेंचि ब्रह्म ऐसें ह्मणीं । पाखंड मार्ग काढिती कोणी । ह्मणूनि सर्वज्ञ ईश्वराची ऐसी वाणी । कीं चक्षु तेथें न पावे॥८॥श्रुति॥न तत्र चक्षुर्गच्छति॥ श्रुत्यर्थ॥ त्या ब्रह्मीं ह्मणे श्रुती । कीं चक्षुर्न गच्छति । ह्मणिजे डोळा न पावे त्या वस्तूंत ये रीतीं । श्रुति हांका मारिते ॥ ९ ॥ कोणी ऐसेंही ह्मणती । कीं ज्योतीस पाहते स्वयें तेचि ज्योती । नेत्र तेथें कोठें असती । असे तेज मात्र ॥ ९१० ॥ तरी राजदंडवळें । ज्याचीं काढिलीं असती बुबुळें । त्यास त्या बुबुळांवेगळें । ब्रह्म तें कां हो दिसेना ॥ ११ ॥ मिळोनि पाखंडी चावट । हेंचि ब्रह्म ह्मणूनि आडवाट । ज्ञानमार्गी दावूनि अचाट । गुरुत्व संतपण मिरवती॥१२॥ब्रह्म नव्हे ज्योती । ब्रह्म न दिसे डोळ्यांप्रती । असो हे पाखंडमतरीती । पुढें विश्वरूपाध्यायांत खंडेल॥१३॥सहस्र सूर्यांच्या ज्योती । विश्वरूपीं अर्जुनास दिसती । तें साकाररूप त्यास ह्मणती । निर्गुण ब्रह्म ज्योतिस्वरूप॥ १४ ॥ विश्वरूप एकसरें । पहावें अर्जुनें सारें । ह्मणूनि दिव्यचक्षु सर्वेश्वरें । दिधलें त्यास ॥ १५ ॥ मग तेजोरूप चराचर । दा-

खवी त्यास सर्वेश्वर । त्यास ह्मणती हे मूर्खतर । कीं तेज नेत्रीं तेंच दिव्य चक्षु ॥ १६ ॥ तरी साकार मूर्ति । विकराळ जिव्हा मुखें ज्यांत दिसती । ते निगुर्ण ब्रह्मसत्ता असती । तरी हे वेडी गोष्टीही साजती कांहीं ॥ १७ ॥ आतां या प्रस्तुत दों श्लोकीं । उत्तम श्लोक बोलिला कीं । तो मुक्तचि जो भ्रूयुगुळांत टाकी । दृष्टि योजी इच्छाभयक्रोधरहित ॥१८॥ राजद्वारा जावया योग्य । जाला तो पावलाचि भाग्य । हा भाव नेणोनि बोलती अयोग्य । कीं मुक्ति याच साधनें॥१९॥'ज्ञानादेव हि कैवल्यं' ह्मणोनी । या ब्रह्मसूत्रेंकरूनी । हा सिद्धांत असतां आत्मज्ञानावांचूनी । मुक्त नव्हे ऐशा साधनाच्या कोटीनें ॥९२०॥ ऐसें असोनि लक्षवादी जन । ह्मणती भोंवयांत उफराटे करितां नयन । दिसतें तेज ब्रह्म तेंचि ज्ञान । तरी तो मुक्तचि ह्मणतो श्रीकृष्ण हें सत्य ॥ २१ ॥ ते ऐसें बोलती । त्यांस विरुद्ध गीता पुराणें श्रुती । परी ह्मणों त्यांच्या बोलें मोहती । प्रमाण दावितां हें भगवद्वाक्य ॥ २२ ॥ यालागीं ह्मणतो कमलनयन । कीं ऐसें करूनिही साधन ।तदनंतर पावोनि माझें ज्ञान । मुक्ति पावेल ऐसें या श्लोकीं ।। २३ ॥

॥ श्लोक ॥ भोक्तारं यज्ञतपसां सर्वलोकमहेश्वरम् ।

सुहृदं सर्वभूतानां ज्ञात्वा मां शांतिमृच्छति ॥ २९ ॥

इति श्रीमद्भगवद्गीतासूपनिषत्सु ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे श्रीकृष्णार्जुनसंवादे अर्जुनविषादयोगो नाम चतुर्थोऽध्यायः ॥

॥ टीका ॥ अगा तो आत्मत्वें जाणोनि मातें । पावेल शांतीतें । कीं जडावेगळें जाणोनि त्या जडातें । स्वात्मत्वें देखतां कैंची अशांति ॥ २४ ॥ अर्जुना शांतीस हेंचि मूळ । कीं मी जो सर्वभूतसुहृद् केवळ । तोचि मी त्याचाही आत्मा निष्फळ । या ज्ञानें शांति पावतो ॥ २५ ॥ ज्याच्याठायीं सुष्ठु शोभन हृदय । तोचि सुहृद् हाचि निश्चय । तरी आपलाला आत्मा अव्यय । आवडे निर्निमित्त सर्वांस ।। २६ ॥ न कळोनि आत्मा आपुला । तो देह ह्मणोनि देहही प्रिय वाटला । स्त्रीधनादि पाहिजे त्याला । ह्मणोनि तींही सुहृदें वाटती ॥ २७ ॥ सुहृद वाटे देह । ह्मणोनि देहाच्या सुहृदांचा स्नेह । तो देह अप्रिय होय निःसंदेह । त्या सुहृदा आत्मयाकारणें ॥ २८ ॥ हातास घाय लागला । तो कापून तळितां वांचणें याला । तेव्हां त्या हातावरी उदार जाला । प्रीति धरूनि आत्मया सुहृदाची ॥ २९ ॥ समग्रदेहीं दुःखसंयोग । तेव्हां आरंभितो देहत्याग । ऐसा काढितां माग । सुहृद एक आत्मा आपुला ॥ ९३० ॥ मी सर्वभूतांचा सुहृद । ह्मणोनि ह्मणे गोविंद ।

त्याचा अर्थ ऐसा नव्हतां मुकुंद । सुहृद वाटतो कवणासी ॥ ३१ ॥ कृष्णास प्रीति सर्वभूतीं । ह्मणोनि बोलावा अर्थ ये रीती । तरी सर्वभूतांचा मी सुहृद ह्मणे श्रीपती । तेव्हां भूतांस याची प्रीति बोलावी ॥ ३२ ॥ ते आत्मत्वावेगळी । भगवत्प्रीतिच निराळी । न दिसे कोणास कोणे काळीं । भेदें अर्थ हा साधेना ॥३३॥ जे भेदें भजतीही तयाला । त्यांसही सुहृद आत्माच आपला । कीं आपल्या कल्याणाकारणें या घननीळा । ते भजती ॥ ३४ ॥ आपल्या सुखाकारणें नृपती । अतिप्रीतीनें जैसे भजती । तैसी भुक्ति मुक्ति आपणा व्हावी ह्मणोनि प्रीती । भेदवादिया ईश्वराची ॥ ३५ ॥ एवं मुख्य सुहृद । आपला आत्मा तदर्थ मुकुंद । सुहृद वाटला तेव्हां गोविंद । नव्हे सुहृद कीं सुहृद आत्माच आपला ॥ ३६ ॥ तरी तोचि आत्मा गोविंद । तरीच मी सर्वभूतांचा सुहृद । ह्मणोनि मुक्तिप्रद मुकुंद । स्वमुखें ऐसें बोले ये स्थळीं ॥ ३७ ॥ सर्वभूत सुहृद त्या मातें । जाणे ह्मणजे स्वआत्मयातें । जाणोनि मग पावतो शांतीतें । पूर्वश्लोकद्वयोक्त साधक ॥३८॥ एवं मुक्ति तेव्हां जेव्हां ज्ञान । ज्ञान तें कीं ज्याणें नासे अज्ञान । अज्ञान तें कीं आपणास आपण जन । न जाणती ॥ ३९ ॥ आपणास आपण । जाणोनि तो पूर्वोक्त साधक शांतपण । पावतो ह्मणे कमलेक्षण । शांतपणेंचि मुक्ति असतां शरीर ॥ १४० ॥ तो सर्वभूतसुहृदा तुजला । आपल्या केवळ साधनबळेंचि पावला । किंवा तुझा प्रसाद होतां त्याला । सर्वभूतसुहृद तूं कळलासी ॥ ४१ ॥ ऐसें पुसेल अर्जुन । ह्मणोनि कमलनयन । पूर्वार्धी हेंचि शेषशयन । आपल्या विशेषणीं सूचवितो ॥ ४२ ॥ कीं भोक्ता यज्ञतपांचा । सर्वांभूतांचा मी महेश्वर साचा । तोचि मी सुहृद आत्मा ज्याचा । त्या मातें जाणोनि शांति पावतो ॥ ४३ ॥ यज्ञतपाचा भोक्ता मी यावरूनी । सूचविलें कीं मत्प्रीत्यर्थ यजनपेंकरूनी । मातें सुहृदा आत्मयातें जाणूनी । शांति पावतो ॥ ४४ ॥ मज समर्पाया कर्म केलें । तदर्थेचि मन माझें भुकेलें । यज्ञतपाचें भोक्तृत्व आलें । मज वास्तव ॥४५॥ पत्र पुष्प फळ पाणी । भक्तीनें अर्पिलें तें मी चक्रपाणी । भक्षितों ह्मणोनि स्ववाणी । पुढें ऐसी बोलेल ॥ ४६ ॥ आणि सर्वभूतमहेश्वर । या पदें आपण सर्वेश्वर । मुक्तिप्रद आपणाहूनि इतर । नाहीं ऐसा भावार्थ ॥४७॥ कीं जे देव इतर । तेही ह्मणावे ईश्वर । परी त्यांसहित सर्वभूत महेश्वर । आपण आत्मा सुहृद सर्वां भूतांचा॥ ४८ ॥ एवं ज्ञानावांचूनि न घडे मुक्ति ।

खवी त्यास सर्वेश्वर । त्यास ह्मणती हे मूर्खतर । कीं तेज नेत्रीं तेंच दिव्य चक्षु ॥ १६ ॥ तरी साकार मूर्ति । विकराळ जिव्हा मुखें ज्यांत दिसती । ते निर्गुण ब्रह्मसत्ता असती । तरी हे वेडी गोष्टीही साजती कांहीं ॥ १७ ॥ आतां या प्रस्तुत दों श्लोकीं । उत्तम श्लोक बोलिला कीं । तो मुक्तचि जो भ्रूयुगळांत टाकी । दृष्टि योजी इच्छाभयक्रोधरहित ॥१८॥ राजद्वारा जावया योग्य । जाला तो पावलाचि भाग्य । हा भाव नेणोनि बोलती अयोग्य । कीं मुक्ति याच साधनें॥१९॥'ज्ञानादेव हि कैवल्यं' ह्मणोनी । या ब्रह्मसूत्रेंकरूनी । हा सिद्धांत असतां आत्मज्ञानावांचूनी । मुक्त नव्हे ऐशा साधनाच्या कोटीनें ॥१२०॥ ऐसें असोनि लक्ष्यवादी जन । ह्मणती भोंवयांत उफराटे करितां नयन । दिसतें तेज ब्रह्म तेंचि ज्ञान । तरी तो मुक्तचि ह्मणतो श्रीकृष्ण हें सत्य ॥ २१ ॥ ते ऐसें बोलती । त्यांस विरुद्ध गीता पुराणें श्रुती । परी श्लोकीं त्यांच्या बोलें मोहती । प्रमाण दाविती हें भगवद्वाक्य ॥ २२ ॥ यालागीं ह्मणतो कमलनयन । कीं ऐसें करूनिही साधन । तदनंतर पावोनि माझें ज्ञान । मुक्ति पावेल ऐसें या श्लोकीं ॥ २३ ॥

॥ श्लोक ॥ भोक्तारं यज्ञतपसां सर्वलोकमहेश्वरम् ।
सुहृदं सर्वभूतानां ज्ञात्वा मां शांतिमृच्छति ॥ २९ ॥

इति श्रीमद्भगवद्गीतासूपनिषत्सु ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे श्रीकृष्णार्जुनसंवादे अर्जुनविषादयोगो नाम चतुर्थोऽध्यायः ॥

॥ टीका ॥ अगा तो आत्मत्वें जाणोनि मातें । पावेल शांतीतें । कीं जडावेगळें जाणोनि त्या जडातें । स्वात्मत्वें देखतां कैची अशांति ॥ २४ ॥ अर्जुना शांतीस हेंचि मूळ । कीं मी जो सर्वभूतसुहृद् केवळ । तोचि मी त्याचाही आत्मा निष्कळ । या ज्ञानें शांति पावतो ॥ २५ ॥ ज्याच्याठायीं सुष्ठु शोभन हृदय । तोचि सुहृद् हाचि निश्चय । तरी आपलाला आत्मा अव्यय । आवडे निर्निमित्त सर्वांस ॥ २६ ॥ न कळोनि आत्मा आपुला । तो देह ह्मणोनि देहही प्रिय वाटला । स्त्रीधनादि पाहिजे त्याला । ह्मणोनि तींही सुहृदें वाटती ॥ २७ ॥ सुहृद वाटे देह । ह्मणोनि देहाच्या सुहृदांचा स्नेह । तो देह अप्रिय होय निःसंदेह । त्या सुहृदा आत्मयाकारणें ॥ २८ ॥ हातास घाय लागला । तो कापून तोडितां वांचणें याला । तेव्हां त्या हाताविरी उदार जाला । प्रीति धरूनि आत्मया सुहृदाची ॥ २९ ॥ समग्रदेहीं दुःखसंयोग । तेव्हां आरंभितो देहत्याग । ऐसा काढितां माग । सुहृद एक आत्मा आपुला ॥ १३० ॥ मी सर्वभूतांचा सुहृद । ह्मणोनि ह्मणे गोविंद ।

त्याचा अर्थ ऐसा नव्हतां मुकुंद । सुहृद वाटतो कवणासी ॥ ३१ ॥ कृष्णास प्रीति सर्वभूतीं । ह्मणोनि बोलावा अर्थ ये रीती । तरी सर्वभूतांचा मी सुहृद ह्मणे श्रीपती । तेव्हां भूतांस याची प्रीति बोलावी ॥ ३२ ॥ ते आत्मत्वावेगळी । भगवत्प्रीतिच निराळी । न दिसे कोणास कोणे काळीं । भेदें अर्थ हा साधेना ॥३३॥ जे भेदें भजतीही तयाला । त्यांसही सुहृद आत्माच आपला । कीं आपल्या कल्याणाकारणें या घननीळा । ते भजती ॥ ३४ ॥ आपल्या सुखाकारणें नृपती । अतिप्रीतीनें जैसे भजती । तैसी भुक्ति मुक्ति आपणा व्हावी ह्मणोनि प्रीती । भेदवादिया ईश्वराची ॥ ३५ ॥ एवं मुख्य सुहृद । आपला आत्मा तदर्थ मुकुंद । सुहृद वाटला तेव्हां गोविंद । नव्हे सुहृद कीं सुहृद आत्माच आपला ॥ ३६ ॥ तरी तोचि आत्मा गोविंद । तरीच मी सर्वभूतांचा सुहृद । ह्मणोनि मुक्तिप्रद मुकुंद । स्वमुखें ऐसें बोले ये स्थळीं ॥ ३७ ॥ सर्वभूत सुहृद त्या मातें । जाणे ह्मणजे स्वआत्मयातें । जाणोनि मग पावतो शांतीतें । पूर्वश्लोकद्वयोक्त साधक ॥३८॥ एवं मुक्ति तेव्हां जेव्हां ज्ञान । ज्ञान तें कीं ज्याणें नासे अज्ञान । अज्ञान तें कीं आपणास आपण जन । न जाणती ॥ ३९ ॥ आपणास आपण । जाणोनि तो पूर्वोक्त साधक शांतपण । पावतो ह्मणे कमलेक्षण । शांतपणेंचि मुक्ति असतां शरीर ॥ ९४० ॥ तो सर्वभूतसुहृदा तुजला । आपल्या केवळ साधनबळेंचि पावला । किंवा तुझा प्रसाद होतां त्याला । सर्वभूतसुहृद तूं कळलासी ॥ ४१ ॥ ऐसें पुसेल अर्जुन । ह्मणोनि कमलनयन । पूर्वार्धीं हेंचि शेषशयन । आपल्या विशेषणीं सूचवितो ॥ ४२ ॥ कीं भोक्ता यज्ञतपांचा । सर्वांभूतांचा मी महेश्वर साचा । तोचि मी सुहृद आत्मा ज्याचा । त्या मातें जाणोनि शांति पावतो ॥ ४३ ॥ यज्ञतपाचा भोक्ता मी यावरूनी । सुचविलें कीं मत्प्रीत्यर्थ यज्ञतपेंकरूनी । मातें सुहृदा आत्मयातें जाणूनी । शांति पावतो ॥ ४४ ॥ मज समर्पाया कर्म केलें । तदर्थेचि मन माझें भुकेलें । यज्ञतपांचें भोक्तृत्व आलें । मज यास्तव ॥४५॥ पत्र पुष्प फळ पाणी । भक्तीनें अर्पिलें तें मी चक्रपाणी । भक्षितों ह्मणोनि स्ववाणी । पुढें ऐसी बोलेल ॥ ४६ ॥ आणि सर्वभूतमहेश्वर । या पदें आपण सर्वेश्वर । मुक्तिप्रद आपणाहूनि इतर । नाहीं ऐसा भावार्थ ॥४७॥ कीं जे देव इतर । तेही ह्मणावे ईश्वर । परी त्यांसहित सर्वभूत महेश्वर । आपण आत्मा सुहृद सर्वां भूतांचा॥ ४८ ॥ एवं ज्ञानावांचूनि न घडे मुक्ति ।

तें तेव्हां कीं जेव्हां ईश्वरप्रसादाभिव्यक्ति । तो प्रसाद होय करितां भक्ति । सर्वेश्वराची ॥ ४९ ॥ त्यांत जें आत्मज्ञान । तेंचि म्हणावें जीवेश्वरैक्य ज्ञान । आणि मुक्तिप्रद ईश शेषशयन । स्वयें ईश्वरेश्वर श्रीकृष्ण ॥५० ॥ या पंचमाध्यायाचे अंतीं । या श्लोकें श्रीपती । हा सिद्धांत करी त्याच्या पदाची प्रीती । वामन म्हणे मज असो अखंड ॥ ५१ ॥

॥ वामनी संस्कृत श्लोक ॥

न प्रेरकः सुकृतदुष्कृतयोर्जनस्य कृष्णः समर्थ सदयश्च सखार्जुनस्य ।
बुद्धिप्रदः स च पदांबुजयोर्नतस्य कल्पद्रुमो विषमताप्युभयोर्नतस्य ॥ १ ॥

इति श्रीमद्वामनपंडितविरचितायां यथार्थदीपिकायां पंचमोऽध्यायः ॥

---

## अध्याय ६ वा.

श्रीमते भगवते नरसारथ्यनिपुणाय नारायणाय नमः॥जयजय योगेश्वर । जयजयाशेषयोगकलेवर । जयजय आत्मयोगविद्यागुरुवर । जगद्गुरो ॥१॥ जयजय चिदात्मयोगैकमात्र । जयजय सर्वात्मयोगमात्र । जयजय शतपत्र-नेत्र । पवित्रकीर्ते ॥ २ ॥ जयजय कल्याणकृत्कल्याणमार्ग । जयजय सु-मंगलस्वर्गापवर्ग । जयजय परिहृन्मन उपसर्ग । त्रैलोक्यनाथ ॥ ३ ॥ जय-जय करुणासागर। जयजय भवमूलसंहार । जयजय योगेंद्रसंमत योगेश्वर । हर ॥ ४ ॥ जयजय मंगलायतन । जयजय श्रीनिकेतन । जयजय नित्यनू-तन । प्रियतम परम परमप्रिमात्मन॥५॥जयजय निर्विकार । जयजय भगव-द्गीताकार । जयजय टीकाकार वामनाकार । जगदलंकारकनक ब्रह्मजनक ॥ ६ ॥ आतां अजी शेषपर्यंका । स्मरोनि तूतें श्रीवत्सांका । षष्ठाध्याय-टीका । आरंभितों ॥ ७ ॥ पूर्वाध्यायांत आरंभींच अर्जुन । करिता जाला ऐसा प्रश्न । कीं संन्यास आणि कर्म या दोहींमधून । जें श्रेयस्कर तेंचि एक सांग मजलागीं ॥ ८ ॥ श्रीकृष्णें दीधलें उत्तर । कीं मोक्षार्थी जो च-तुर । त्या मुमुक्षूस दोन्ही श्रेयस्कर । संन्यास आणि कर्महि ॥ ९ ॥ तत्रा-पि दोहींमधूनी । कर्मत्यागरूप संन्यासाहूनी । कर्मयोग थोर म्हणोनी । बो-लिला श्रीकृष्ण ॥ १० ॥ कीं संन्यासें कर्मयोगाचें लक्षण । न सांपडे आणि कर्मयोगीं संन्यासपण । साधे म्हणोनि आपण । बोलिला श्रीकृष्ण स्ववाचा ॥ ११ ॥ 'ज्ञेयः स नित्यं संन्यासी' । या श्लोकीं अर्जुनासी । संन्यासत्व

कर्मयोगियासी । सिद्ध करूनि बोलिला ॥ १२ ॥ कीं संन्यासी तोचि नर । जो इच्छाद्वेषवर्जित निरंतर । आणि निर्द्वंद्व तो सत्वर । बंधापासूनि सुटतो अनायासें ॥ १३ ॥ तो जाणावा संन्यासी । ह्मणिजे संन्यासत्व कर्मयोगियासी । ये रीती साधे ऐसी । गोष्टी पोटीं हरीच्या॥ १४ ॥ परंतु शब्दाची इतकीच रचना । कीं संन्यासीच तो जाणावा अर्जुना । कीं न स्पर्शती ज्याच्या मना । इच्छाद्वेषद्वंद्वें हें कांहीं ॥ १५ ॥ परंतु कर्मयोगिया तोचि वैभव । हा न समजला पोटांतील भाव । तो त्याचें आणीक संदेह देव । निरसिता जाला जे या प्रसंगीं उपजले ॥ १६ ॥ कीं सांख्य योग मार्ग दोन्ही । परी एक एकावांतूनी । सिद्धि देती ह्मणोनी । कर्म आणि संन्यास ऐसे न ह्मणावे ॥ १७ ॥ संन्यास तो महाबाहो अगा । असाध्य बहु न करितां कर्मयोगा । कर्मयोगें युक्त त्वा निःसंगा । ब्रह्मप्राप्ति अतिसत्वर ॥१८॥ तो कर्मयोगाचा कर्ता । ज्ञानदृष्टीं होतो अकर्ता । या प्रसंगें अकर्तृत्ववार्ता । वाढली ॥१९॥ त्या प्रसंगें ईश्वर कांहीं । कोणाहातीं करवीत नाहीं । इत्यादि प्रसंग आणीक ही । अध्यायांतपर्यंत चालिले ॥ २० ॥ परंतु कर्मयोगियास । कर्मीच साधे कर्मत्यागसंन्यास । हा भाव वरवा अर्जुनास । समजला नाहीं ॥ २१ ॥ ह्मणूनि आरंभितो षष्ठाध्याय । यांत आरंभीं हेंचि प्रमेय । बोलेल तें ओंकाह्य । प्रथम बोलतो भगवंत ॥ २२ ॥

॥ श्रीभगवानुवाच ॥ अनाश्रितः कर्मफलं कार्यं कर्म करोति यः ।
स संन्यासी च योगी च न निरग्निर्नचाक्रियः ॥१॥

॥ टीका ॥ श्रीभगवान् षड्गुण । अर्जुनातें ह्मणतो आपण । कीं तोचि संन्यासी तोचि कर्मयोगी निपुण । जो करी निष्काम नित्य कर्म ॥ २३ ॥ कर्मफळ मज हो ह्मणोनी । हा कर्मफळाश्रय नसे जयाच्या मनीं । कर्मत्याग यावरूनी । सूचवी त्याचा श्रीकृष्ण ॥ २४ ॥ कीं ज्यास काम्यफळाचा आश्रय । तो काम्य करीच हा निश्चय । जो न अपेक्षी फळ किमपि तो होय । काम्य टाकितां संन्यासीच ॥२५॥ यालागीं तोचि संन्यासी । काम्यकर्मत्याग घडला जयासी । आणि तोचि कर्मयोगी कीं त्यासी । साधे निष्काम कर्मयोग ॥ २६ ॥ नसोनि आश्रमसंन्यास । संन्यास साधला कर्मयोगियास । कीं काम्यकर्मत्याग जयास । साधला ॥ २७ ॥ न करी अग्निसाध्य कर्म । तो निरग्नि संन्यासाश्रम । अनिश्रेष्ट परि जरि नसे काम । आणि काम्यकर्में करीना ॥ २८ ॥ तो संन्यासाश्रम । या काम्यत्यागसंन्या-

सावीण वृथाश्रम । कीं न तुटे अविद्याभ्रम । त्याच संन्यासें ॥ २९ ॥ त्या आश्रमसंन्यासाविण । काम्यत्यागी कर्मयोगी निपुण । लाधोनि संन्यासपण । ब्रह्म पावे उपदेशें गुरूच्या ॥ ३० ॥ एवं जेथें काम्यत्याग । तेथेंचि संन्यासयोग । त्यावांचोनि निरग्निसंन्यास सोंग । न तो संन्यासी न कर्मयोगी ही ॥ ३१ ॥ कीं मन असे सकाम । तों नव्हेचि संन्यासाश्रम । आणि कर्मयोग ही नव्हे कां यज्ञादिकर्म । न करवे निरग्निसंन्यासियास ॥ ३२ ॥ एवं नसे कर्मफलाश्रय । तोचि संन्यासी हा निश्चय । आणि तोचि कर्मयोगी कीं नव्हे अक्रिय । करितो क्रिया नित्या वेदोक्त ॥ ३३ ॥ टाकूनिही काम्यकर्म । जरी न आचरे नित्यकर्मस्वधर्म । तो अक्रिय ह्मणावा अधम । त्यासही नसती पदें हीं दोन्ही ॥ ३४ ॥ कीं अंतरीं काम्यत्याग । बाहेरी आश्रमसंन्यासयोग । त्यास न घडे पापसंयोग । नित्यकर्म गार्हस्थ्यधर्म टाकितां ॥ ३५ ॥ टाकूनि काम्य निष्काम । जाला तरी असे गृहस्थाश्रम । तो न करितां विहित नित्यकर्म । प्रत्यवायें जाय नरकातें ॥ ३६ ॥ नरक साधे जया । कैंचा संन्यास अक्रिया तया । आणि नित्यकर्मत्यागें जया । न साधला कर्मयोगही ॥ ३७ ॥ ऐसा जो अक्रिय । तो कोवि संन्यासी अथवा कर्मयोगी होय । ह्मणोनि कृष्ण ह्मणे कीं नचाक्रिय । कीं अक्रिय न संन्यासी न कर्मयोगीही ॥ ३८ ॥ एवं काम्य टाकूनि निष्काम । आणि करी नित्य विहितकर्म । तोचि संन्यासी तोचि कर्मयोगी परम । न निरग्नि अथवा नव्हे ऐसा अक्रिय ॥ ३९ ॥ श्लोकाचा अर्थ ये रीतीं । परि एथें टीकाकार जे स्वयें यती । ते आश्रमाभिमानें वाखाणिती । आश्रमसंन्यासनिंदापरिहारूनी ॥ ४० ॥ निरग्नि आणि अक्रिय । एकाचेंचि विशेषणद्वय । वाखाणिती कीं अर्थी प्रगट होय । निंदा आश्रमसंन्यासाची ॥ ४१ ॥ निरग्नि ह्मणिजे जो गृहस्थ नर । अग्निसाध्य यज्ञादिक्रियापसर । न करी आणि अग्नीवांचूनि कर्मप्रकार । तोही टाकितो तो अक्रिय ह्मणावा ॥ ४२ ॥ एवं द्विप्रकार कर्मविशेष । टाकितो जो पुरुष । तो न संन्यासी न कर्मयोगी ऐसा घोष । या श्लोकटीकेचा ते करिती ॥ ४३ ॥ परंतु ह्मणतां अक्रिय । कर्मत्यागप्रकारद्वय । साधतां निरग्नि कैसा न होय । त्यावेगळा ॥ ४४ ॥ अग्निमुखीं आहुति पडती । या कर्मासही क्रियाच ह्मणती । आणि अग्नीवांचूनि संध्यादिक घडती । क्रियाच ह्मणावें त्यांसही ॥ ४५ ॥ हा क्रियाप्रकारद्वय । जो टाकीनसे तो अक्रिय । जरी ऐसा अर्थसिद्ध न होय । तरी निरग्निशब्दें संन्यासी

न बोलावा ॥ ४६ ॥ निरग्निशब्दाचा अर्थ । संन्यासी ह्मणूनि येथें किमर्थ । वाखाणावा ह्मणाल तरी संन्यास व्यर्थ । सकामाचा होय कीं नव्हे हें सांगा ॥ ४७ ॥ दोरी यज्ञोपवीताची तोडिली । मस्तक शिखाही बोडिली । मनीं काम्याची गोडी असे जोडिली । तो संन्यासी कैसा ह्मणाल ॥ ४८ ॥ कर्मफळाचा आश्रित । आणि चतुर्थाश्रम घेतला निश्चित । या प्रसंगीं त्यास भगवंत । न निंदी कैसा ॥ ४९ ॥ कीं बाह्यसंन्यासवर्जित । आणि कर्मफळीं अनाश्रित । तो तेव्हां तद्विपरीत । हा संन्यासी ॥ ५० ॥ एवं गृहस्थही कर्मफळीं अनाश्रित । तोचि संन्यासी निश्चित । तेव्हां संन्यासी काम्यफलासक्त । निंद्य ऐसें तो संमत तुह्मांस ही ॥ ५१ ॥ तो हरीनें निंदिला । तुह्मीं कां हा अंगीकारिला । येथें निरग्निशब्दें पाहिजे बोलिला । संन्यासी आणि सकाम जो निंद्य ॥ ५२ ॥ येथें कोणी ह्मणती । कीं जो जाला यती । तो निरग्नि त्यास कोणे रीती । काम्य घडे ॥ ५३ ॥ तरी वैराग्यें जिज्ञासु जाला । आणि ज्ञानाकारणें संन्यास घेतला । तो आंत बाहेर ही बोलिला । संन्यासी अतिशुद्ध ॥५४॥ त्यास निंदील कां हरी । निंद्य संन्यासी तो जो यापरी । कीं संन्यास घेऊनि ही करी । इतरदेवतामंत्रजप ॥ ५५ ॥ जाणे जारण मरण । तेचि मंत्र उपदेशूनि शिष्यगण । मेळवूनि मूढदृष्टी आपण । ह्मणवी परम संन्यासी॥५६॥ तो निरग्नि जाला । परी काम्यमंत्र जपों लागला । इत्यादि अर्थ सूचवूनि निंदिला । निरग्नि संन्यासी ये स्थळीं ॥५७॥ कीं तो नव्हे संन्यासी । कीं काम्य वसे मानसीं । कीं वृथा गार्हस्थ्यपणासी । त्याणें टाकिलें ॥ ५८ ॥ जरी गृहस्थ असता । पंचयज्ञादि कर्मं करिता । ऋणत्रयापासूनि सुटता । तदभावें नव्हे कर्मयोगीही तो ॥ ५९ ॥ आतां यानंतर श्लोक । तो कां बोले उत्तमश्लोक । त्याचें निमित्त सुज्ञ लोक । परिसोत आधीं ॥ ६० ॥ जो निष्काम कर्मयोगी । संन्यासी आणि कर्मयोगी त्याचि लागीं । ह्मणावें ऐसें महायोगी । बोलिला पूर्वश्लोकीं श्रीकृष्ण ॥ ६१ ॥ तों अर्जुनास संदेह ऊठिले । कीं संन्यास कर्मयोग मार्ग वेगळाले । ते दोन्ही मार्ग कैसे साधले । एकासचि एके समयीं ॥ ६२ ॥ हे शंका अर्जुनाचे मनीं । तोचि बोलतो सर्वसाक्षी जाणोनि । संन्यास कर्मयोग एकचि ह्मणोनी । बोलतो आतां या श्लोकीं ॥ ६३ ॥

॥ श्लोक ॥ यं संन्यासमिति प्राहुर्योगं तं विद्धि पांडव ।
न ह्यसंन्यस्तसंकल्पो योगी भवति कश्चन ॥ २ ॥

॥ टीका ॥ अगा संन्यास ह्मणती जयास । कर्मयोगही जाण तूं तयास । कीं जों नाहीं संन्यास । तों कर्मयोगी नव्हे कोणीही ॥ ६४ ॥ जोंवरी हृदयीं कामना । तोंवरी फळसंकल्प न तुटती मना । ते संकल्प असतां घडेना । निष्काम कर्मयोगीपण॥ ६५ ॥आणि फलसंकल्पत्याग । काम्यत्यागेंचि घडे तो संन्यासयोग । संन्यासांत त्यांत करी निःसंग । नित्य कर्में तेव्हां तो कर्मयोग सिद्ध होतो ॥ ६६ ॥ ह्मणोनि जयास । अगा ह्मणावें संन्यास । कर्मयोग ही तयास । जाण तूं गा॥ ६७ ॥ कीं जों न सिजे अन्न । तों न घडे भोजन । हे गोष्टी तों सर्वजन । जाणतीचि कीं ॥ ६८ ॥ एक त्या अन्नाचें सिजवणें । एक त्याचें जेवणें । ऐसें असोनि हीं वेगळेपणें । दोन्ही एक ॥ ६९ ॥ कीं अन्ननिष्पत्तीविण । न घडे कदापि जेवण । तैसें न साधतां काम्यत्यागलक्षण । न घडे निष्काम कर्मयोग ॥ ७० ॥ आणि भोजनाच्या अपेक्षेविण । न घडे अन्न सिद्ध करणें । तैसें काम्यत्याग संन्यासलक्षण । निष्काम कर्मयोगार्थ ॥ ७१ ॥ एवं काम्यही त्यागी । आणि न प्रवर्ते निष्कामकर्मयोगीं । तो अक्रिय याचि लागीं । निंदिला सकाम जैसा निरग्नी ॥ ७२ ॥ कीं सिद्ध करूनि अन्न । जो न करी भोजन । तैसा काम्य त्यागुनि ही न करी भजन । नित्य कर्मार्पणें ईश्वराचें ॥ ७३ ॥ भोजनाकारणें अन्न । सिद्ध करूनि करी भोजन। तैसा काम्यत्यागुनि सज्जन । नित्य कर्म आचरे ॥ ७४ ॥ त्यासही अन्न सिद्धीविना । भोजनक्रिया घडेना । त्याच्या अन्ना आणि भोजना । नसे भिन्नत्व ॥ ७५ ॥ या भावें ह्मणे श्रीहरी । कीं संन्यास कर्मयोग भिन्न ही परी । एकचि कीं संकल्पत्यागसंन्यास जरी । तरीच कर्मयोगी तो होय ॥ ७६ ॥ आतां कर्मयोग कोण काळवरी । करावा तो अवधि श्रीहरी । बोलों पाहतो याउपरी । या श्लोकें ॥ ७७ ॥

॥ श्लोक ॥ आरुरुक्षोर्मुनेर्योगं कर्म कारणमुच्यते ।
योगारूढस्य तस्यैव शमः कारणमुच्यते ॥ ३ ॥

॥ टीका ॥ अगा आत्मयोगावरी । आरूढ नसे जाला तोंवरी । आरूढ होऊं इच्छी तोंवरी । आरूढ नसे तो आरुरुक्षु जाणावा ॥ ७८ ॥ ऐसा आरुरुक्षु मुनी । श्रवण करूनि जो आहे मननीं । त्याला कर्मेंचि करूनी । प्राप्त होते आरूढता ॥ ७९ ॥ यालागीं आरुरुक्षु मुनी । त्यास कर्मचि कारण बोलिजे तें ह्मणोनी । श्रीकृष्ण या पूर्वार्धे करूनी । बोलता जाला॥८०॥

आतां तोचि योगारूढ जाला । तेव्हां त्याच योगारूढाला । शमचि कारण बोलिलां । श्लोकाच्या उत्तरार्धे करूनी ॥ ८१ ॥ इतकाच या श्लोकाचा अर्थ । परी याचा भावार्थ । न बोलतां साधनक्रम यथार्थ । न उपजे मनासी ॥ ८२ ॥ आत्मा गुरुमुखें कळला । आणि योग नाहीं बाणला । तोंचि कर्मयोग ज्याणें टाकिला । योगसिद्धि न घडे तयासी ॥ ८३ ॥ तो होय शब्दज्ञानी । असत असतां होतो ज्ञानाभिमानी । कीं चित्त विषयासक्त आणि मनीं । मी ज्ञानी ह्मणोनि जो ॥ ८४ ॥ त्याणें करावें कर्म । कर्मी पहावें ब्रह्म । अनुष्ठुनि यम नियम । करावा अभ्यास ॥ ८५ ॥ व्यतिरेकें आत्मत्व कळलें जैसें । चित्तही जालें पाहिजे तैसें । सिंधु सलिल समरसें । सधवखडा जे रीती ॥ ८६ ॥ चिद्रूपता चित्तास न बाणे । तोंवरी शब्दज्ञानीच तो जरी आत्मा जाणे । याकारणें मुमुक्षु शाहणे । यत्न करिती योगसिद्धीचा ॥ ८७ ॥ योग न बाणे जोंवरी । योगारूढ न ह्मणावें तोंवरी । तो आत्मज्ञ आरुरुक्षु जरी । यत्न करी योगसिद्धीचा ॥ ८८ ॥ त्यास कारण कर्म । यमनियमादि आणि स्वधर्म । चित्त होऊं लागे ब्रह्म । तोचि योगारूढ तेव्हां बोलावा ॥ ८९ ॥ चित्तचैतन्यसंयोग । आयता असे तोचि योग । परी चित्तास जडत्वाचा वियोग । होतां योग आयता ॥ ९० ॥ त्यांत निर्विकल्प योग । ऐसा कीं जडवृत्तीचा सर्वथा वियोग । तेव्हां आयता चित्तचैतन्ययोग । तें चित्त चिदाकारता पावतें ॥ ९१ ॥ तेव्हां योगारूढ ता । जो आरुरुक्षु तत्पूर्वी बोलिजे तो । निर्विकल्पयोगीं आरूढ होतो । या प्रकारें ॥ ९२ ॥ बाणतां निर्विशेष योग । चित्तास ऐसा जडत्वाचा वियोग । सविकल्पयोगीं जडवृत्तिसंयोग । असोनिही नाढळे जडत्व चित्तासी ॥ ९३ ॥ कीं चैतन्यतंतु जडत्व पट । चित्स्वरूपचि हें सर्व निपट । वृत्ति निरोधाची न करितां खटपट । चराचरीं दिसे एक आत्मा ॥ ९४ ॥ अनुभव ऐसा जयाला । योगारूढ बोलिजे त्याला । ऐशास ही जीवन्मुक्तीस हेतु जाला । शम ह्मणिजे समाधी ॥ ९५ ॥ कीं अनुभव ऐसा जाला । तथापि समाधि बाणेना ज्याला । तो आरूढ होऊनि उतरला । योगसाक्षात्कारावरूनी ॥ ९६ ॥ जोंवरी जडीं ब्रह्मस्फुरण । तोंवरी समाधिच ह्मणावें तें स्मरण । हें विसरतां जडत्वभ्रमाचें आवरण । करी तत्काळ पूर्वसंस्कार ॥ ९७ ॥ यालागीं जरी योगारूढ जाला । शमसमाधि पाहिजे त्याला । ह्मणोनि शम कारण बोलिला । योगारूढासही श्रीकृष्ण ॥ ९८ ॥ आतां योगारूढ केव्हां

ह्मणावा । जाणोनि ऐशा अर्जुनाच्या भावा । बोलणें लागलें देवाधिदेवा । लक्षण त्याचें या श्लोकीं ॥ ९९ ॥

॥ श्लोक ॥ यदा हि नेंद्रियार्थेषु न कर्मस्वनुषज्जते ।
सर्वसंकल्पसंन्यासी योगारूढस्तदोच्यते ॥ ४ ॥

॥ टीका ॥ श्रोत्रादिइंद्रियांचे अर्थ । शब्दस्पर्शादि पदार्थ । आणि कर्म जें त्या विषयांच्या साधनार्थ । आसक्त नव्हे जेव्हां उभयत्र ॥ १०० ॥ आतां टाकिले जरी विषय । आणि कर्मही टाकिलें तद्विषय । आणि भोगीं भोगसाधनीं न होय । आसक्त ही ॥ १ ॥ कां मोक्षास विघ्न हें सकळ । ह्मणोनि ऐसा जाला जरी केवळ । आणि विषय गोड ऐसें वासनामूळ । जरी असे हृदयांत ॥ २ ॥ तरी विषयभोग आणि भोगसाधन । यांचे संकल्प करीच मन । तेव्हां करूं लागे चिंतन । विषयभोगभोगसाधनांचें ही ॥ ३ ॥ नव्हे योगारूढ तोंही । जों संकल्पाचा त्याग नाहीं । संकल्पत्याग तेव्हांचि जेव्हां कांहीं । शेष नसे वासनेचें ॥ ४ ॥ यालागीं भोग आणि भोगसाधनासी । टाकी आणि होय सर्वसंकल्पसंन्यासी । तेव्हां योगारूढ तयासी । ह्मणावें अगा अर्जुना ॥ ५ ॥ हे अवघे मनाचेच खेळ । तेंचि आवरावें केवळ । ह्मणोनि येथें मेघनीळ । बोलतो त्यांत पहिला हा श्लोक ॥ ६ ॥

॥ श्लोक ॥ उद्धरेदात्मनात्मानं नात्मानमवसादयेत् ।
आत्मैव ह्यात्मनो बंधुरात्मैव रिपुरात्मनः ॥ ५ ॥

॥ टीका ॥ अगा अर्जुना मन । असे बुद्धीच्या आधीन । त्या मनासी आवरायाचें साधन । एकली बुद्धी ॥ ७ ॥ ते बुद्धि जों नसे विवेकारूढ । तोंवरीच मन होऊनि मूढ । धरूनि विषयकामना दृढ । पडिलें कूपीं वासनेच्या ॥ ८ ॥ वासनेच्या कूपाभीतरीं । मन पडिलें असे परी । बुद्धीच्या हातीं असे दोरी । त्या मनाची ॥ ९ ॥ त्या बुद्धीचा सहज गुण । कीं सुखी असावें आपण । आपण ह्मणतां आत्मपण । सुखदुःखभोक्तृत्व ज्या चिदंशानें ॥ ११० ॥ एवं ज्या गोष्टीनें सुख । तेंचि करी आणि दुःख । ज्याकरितां साधे त्याचें मुख । न पाहे बुद्धी ॥ ११ ॥ सुखप्राप्ति वाटे ज्यांत । बुद्धि मनास योजी त्यांत । जें वाटे दुःखाचें निमित्त । त्यांतूनि काढी मनासी ॥ १२ ॥ बुद्धीस टाउकें कीं कांहीं । विषयावांचूनि सुख नाहीं । ह्मणोनि त्याच वासनेच्या प्रवाहीं । घालिते बुद्धि मनासी ॥ १३ ॥ जेव्हां सत्संग मिळे । विषय तितका दुःख ऐसें कळे । परमार्थी सुख मानोनि वळे । भजनाकडे बुद्धि जेव्हां ॥ १४ ॥ तेव्हां विषयामधूनि मन । ते बुद्धि काढी

मम चिंतन । विषयाचें टाकूनि साधन । चिंती ब्रह्मप्राप्तीचें ॥१५॥ ब्रह्मानुभवाविना । जरी जाईना विषयवासना । तथापि बुद्धि मना । पडों नेदी विषयांत ॥ १६ ॥ देखोनि वाढिलें मिष्टान । लाळ घोटी क्षुधार्ताचें मन । परी त्यांत विष ऐसें कळतां भोजन । बुद्धि करों नेदी सर्वथा ॥ १७ ॥ सत्रें चोर मैंद मित्र जाला । तो मैंदसा जेव्हां कळला । आप्त ह्मणों नेदी त्याला । सर्वथा बुद्धि ॥ १८ ॥ विषयवासनेनें जीवास । मरण नरक गर्भवास । कळतां न धरी बुद्धि हव्यास । विषयभोगाचा ॥ १९॥ परमार्थाची आवडी धरी । ते बुद्धि मनातें आवरी । तेव्हां उडी प्रपंचावरी । न पडे मनाची ॥ १२० ॥ ह्मणोनि बुद्धीकरूनी । मन उद्धरावें ह्मणोनी । श्लोकाचिया प्रथमचरणीं । चक्रपाणि ऐसें बोलिला ॥ २१ ॥ श्लोकद्वितीयचरणीं हरी । ह्मणतो कीं मन उद्धरावेंच परी । बुडों देऊं नये दुःखसागरीं । सर्वथा॥२२॥ मन आणि बुद्धी । आत्मशब्दें दोहींची सिद्धी । अहंकार देह याचीही प्रसिद्धी । आत्मशब्दें ॥ २३ ॥ त्यांत ' आत्मना ' ह्मणजे बुद्धीकरूनी । आत्मा मन तें उद्धरावें ह्मणोनी । श्रीकृष्ण बोलिला यावचनीं । श्लोकाचिया पूर्वार्धीं ॥२४॥ उत्तरार्धें ह्मणतो हरी । कीं आत्माच बंधु आत्माच वैरी । ह्मणजे मनचि शत्रुमित्र ह्या दोन्ही परी । विशद बोलतो या श्लोकीं ॥२५॥

॥ श्लोक ॥ बंधुरात्मात्मनस्तस्य येनात्मैवात्मना जितः ।
अनात्मनस्तु शत्रुत्वे वर्तेतात्मैव शत्रुवत् ॥ ६ ॥

॥ टीका ॥ मन त्याचें सखें सोयरें । ज्यानें बुद्धीनें तें जिंकिलें खरें । ते बुद्धि आत्मयाची हेही बरें । जाण अगा अर्जुना ॥ २६ ॥ कीं ज्या बुद्धीस आत्मा कळे । आणि जे आत्मयोगीं वळे । ते आवरील तेव्हां न खवळे । मन विषयवासनेनें ॥२७॥ आतां जो पुरुष अनात्मा । ह्मणजे ज्यास ठाऊका नसे आत्मा । मन त्याचें त्यास स्वमहिमा । शत्रु होऊनि दाखवी॥२८॥ वर्ते शत्रुत्वें करूनी । तें प्रसिद्धचि सांगावें काय ह्मणोनी । आतां मित्रत्वें कैसें वर्ते तें येथूनी । बोलतो श्रीकृष्ण या श्लोकें ॥ २९ ॥

॥ श्लोक ॥ जितात्मनः प्रशांतस्य परमात्मा समाहितः ।
शीतोष्णसुखदुःखेषु तथा मानापमानयोः ॥ ७ ॥

॥ टीका ॥ ज्याचें मन ज्यास जित । ह्मणजे स्ववश मन निश्चित । तो प्रशांत अत्यंत शांत । स्थिर मन त्याचें आत्मत्वीं ॥१३०॥ कामक्रोधरहित । तो ह्मणावा शांत । ज्याची बुद्धि अत्यंत । विवेकारूढ सर्वदा ॥ ३१ ॥ त्या बुद्धीनें मन । आवरी तेव्हां तें विषयचिंतन । न करी होऊनि राहे लीन ।

त्या बुद्धीसहित आत्मयांत ॥ ३२ ॥ मे आत्मस्वरूपीं होय स्थिर । तें स्थिर-च निरंतर । शीतोष्णीं आणि सुखदुःखीं एक प्रकार । आणि मानापमानीं ही ॥ ३३ ॥ आतां यानंतर श्लोक । तो कां बोले उत्तमश्लोक । त्याचें नि-मित्त सुज्ञलोक । परिसोत आधीं ॥ ३४ ॥ योगारूढाचें लक्षण । बोलिला नेथें कमललक्षण । सर्वसंकल्पत्यागी तोचि निपुण । योगारूढ तेव्हां ऐसें बोलिला ॥ ३५ ॥ त्या संकल्पाचें मूळ । तें मनचि केवळ । तें बुद्धीफिरूनि करावें निश्चळ । ऐसें बोलिला ॥ ३६ ॥ तें वश होतां स्वमित्र । तें वश न होतां अमित्र । हें एथवरी विशद पद्मनेत्र । बोलिला ॥ ३७ ॥ जो योगा-रूढ नर । बांगतां वाढला हा पसर । आणि त्याचाच बोलतां राहिला प्रका-र । तो बोलतो या दों श्लोकीं ॥ ३८ ॥

॥ श्लोक ॥ ज्ञानविज्ञानतृप्तात्मा कूटस्थोऽविजितेंद्रियः ।
युक्त इत्युच्यते योगी समलोष्टाश्मकांचनः ॥ ८ ॥.

॥ टीका ॥ अगा तो योगारूढ योगी । समशीतोष्ण मानापमानादि ज्या-लागीं । परमानंदें तृप्त तरी वीतरागी । सर्वत्र ऐसा अनायासें ॥३९॥ अगा सकळवासनासमाप्ती । होतां निजानंदाची प्राप्ती । ते प्राप्ति तेव्हां जेव्हां तृप्ती । बुद्धि पावे ज्ञानीं आणि विज्ञानीं ॥१४०॥ बुद्धि ज्याची ज्ञानीं । तृप्त आणि विज्ञानीं । आणि कूटस्थ तो ह्मणोनी । लक्षण बोले त्याचें भगवंत ॥ ४१ ॥ व्यतिरेकबोध येथें ज्ञान । अन्वयबोध विज्ञान । दोन्ही बोधीं अन्यचिंतन । बुद्धि न करी तेव्हां समाधी ॥ ४२ ॥ तेंचि बुद्धीची तृप्ती । तेंचि वासनेची समाप्ती । बुद्धीस जेव्हां एकाग्रताप्राप्ती । व्यतिरेकीं आणि अन्वयांतही॥४३॥ या दोहीं समाधींचें लक्षण । पुढें याच अध्यायांत कमलेक्षण । बोलेल मागें ही विवरण । प्रसंगोपात्त जालें टीकेंत ॥ ४४ ॥ व्यतिरेकीं निखळ चित्स्व-रूप । तें ज्ञान आणि विज्ञान विश्वरूप । विघरलें थिजलें एकचि तूप । ब्रह्म उभयत्र एकचि ॥ ४५ ॥ निखळज्ञान तें ज्ञान । मायाविशिष्ट ज्ञान तें वि-ज्ञान । कीं नाना जडतरंगीं समान । एक उदक चित्स्वरूप ॥ ४६ ॥ बुद्धि तृप्त ऐशा ज्ञानीं । आणि स्थिरबुद्धि ज्याची विज्ञानीं । तो कूटस्थ ह्मणोनी । श्रीकृष्ण ह्मणे या श्लोकीं ॥ ४७ ॥ कूटस्थ शब्दाचा विचार । ऐसा कीं नि-र्विकार । स्थळांतरीं अर्थांतर । परी निर्विकार ह्मणावा ये स्थळीं ॥ ४८ ॥ आत्मा सकळांचा निर्विकार । परी बुद्धि जाली पाहिजे तदाकार । एवं जे-

---

१ कढलें. २ सांकलें.

याची बुद्धि ऐसी तो नर । कूटस्थ स्वयें ह्मणावा ॥ ४९ ॥ बुद्धीस करितां विकार । इंद्रियें रज विषय तम दोन्ही प्रकार । शुद्ध सत्त्वस्वरूपाकार । निर्विकार बुद्धि ते ह्मणावी ॥ १५० ॥ अंतरीं ऐसा आशय । तो कृष्ण त्यास ह्मणतो कीं विजितेंद्रिय । कीं कूटस्थाचें रूप होय । विजितेंद्रिय ह्मणतां तयातें ॥५१॥ कीं जिंकिला इंद्रियांचा समुदाय । तेव्हां न आठवे त्या त्या इंद्रियाचा विषय । सत्त्वरजतमातीत होय । तेचि बुद्धि निर्विकार त्या कूटस्थाची ॥ ५२ ॥ ऐसी निर्विकार बुद्धी । तेव्हां कूटस्थीं कूटस्थपणाची सिद्धी । योगारूढास तेव्हां समृद्धी । ज्ञानविज्ञान दोहीं समाधींची ॥ ५३ ॥ या दोहीं समाधींची स्थिती । तृप्ति तेव्हां कूटस्थपदाची प्राप्ती । विषयवासनेची समाप्ती । ऐसा योगयुक्त योगी अगा बोलिजे तो ॥ ५४ ॥ ऐसे श्लोकाचे तीन चरण । यांत योगारूढाचें लक्षण । जें बोलिला कमलेक्षण । तें अर्जुनें ऐकिलें॥ ५५ ॥ त्यांत तो ज्ञानविज्ञानतृप्त । आणि त्यास कूटस्थपद प्राप्त । हीं दोन्ही लक्षणें गुप्त । तोचि स्वयें जाणे तयाचीं ॥ ५६ ॥ उरलें जितेंद्रियपण । प्रगट दिसे हें एक लक्षण । इतकियाच लक्षणें तो विचक्षण । योगारूढ समजावा ॥ ५७ ॥ तरी कोणी दांभिकही जन । दाविती जितेंद्रियत्व आणि भजन । आणि कोणी योगारूढही विषयसेवन । करिती प्रारब्ध भोगितां ॥ ५८ ॥ तो न वाटे योगारूढ । कीं जितेंद्रियत्व न दिसे दृढ । आणि योगारूढ वाटे तो मूढ । जो दंभें दावी जितेंद्रियत्व ॥ ५९ ॥ आतां कोण बाह्यलक्षण । कीं तो योगारूढ कळे विचक्षण । अर्जुन ऐसा शंकतां कमलेक्षण । चतुर्थचरणीं हरितो हे शंका ॥१६०॥ ॥ चतुर्थ चरण ॥ समलोष्टाश्मकांचनः ॥ ॥ टीका ॥ अगा धनाकारण । दांभिकाचें जितेंद्रियपण । जो धनीं निस्पृह निपुण । तो विषय भोगी तरी योगारूढ जाणावा ॥ ६१ ॥ ज्यास मृत्तिकेचा भेंडा । आणि वाटेचा अप्रयोजक धोंडा । आणि सधन कांचनाचा हांडा । तिन्ही समान ॥ ६२ ॥ जितेंद्रिय आणि इच्छी धन । तें जितेंद्रियत्व धनसाधन । धनीं निरपेक्ष तो विषयसेवन । प्रारब्धें करी तथापि योगारूढ ॥ ६३ ॥ आतां यानंतर श्लोक । तो कां बोले उत्तमश्लोक । त्याचें निमित्त पुण्यश्लोक । परिसोत आधीं ॥६४॥ योगारूढलक्षण । पूर्वश्लोकीं कमलेक्षण । बोलतां बोलिला कीं तो विचक्षण । ज्ञानविज्ञानतृप्तात्मा ह्मणोनी ॥६५॥ व्यतिरेकीं वाणे समाधी । ते तृप्ति निखळ निर्गुणात्मत्वबोधीं । अन्वयबोधीं तृप्ति साधी । तें विज्ञानीं विश्वरूपीं स्थिरत्व ॥६६ ॥

दोहीं परी ब्रह्म दिसे । बुद्धि ब्रह्मीं समरसे । उभयत्रही ज्यास असे । तृप्ति बुद्धिस्थिरत्वें ॥६७॥ ह्मणोनि बोलतां हरी । शंका उपजली या परी । कीं या दोहींत एक समाधी जरी । साधे तरी नव्हे काय तो योगारूढ ॥६८॥ आणि दोहींमधूनि एक । अन्वय अथवा व्यतिरेक । बाणतां आरूढ तेव्हां कोण अधिक । द्विविध योगारूढांत ॥६९॥ शब्द थोडे अर्थ फार । दावूनि ऐसा चमत्कार । करितो या शंकेचा परिहार । या श्लोकें ॥ १७० ॥

॥ श्लोक ॥ सुहृन्मित्रार्युदासीनमध्यस्थद्वेष्यबंधुषु ।
साधुष्वपि च पापेषु समबुद्धिर्विशिष्यते ॥ ९ ॥

॥ टीका ॥ अगा व्यतिरेकें निर्गुणसमाधी । चित्तवृत्तिनिरोधें साधी । तोही योगारूढ परी आधीं । न तुटती नानात्वभेदाचे ॥ ७१ ॥ हा भाव धरूनि अंतरीं । मुखीं हा श्लोक बोले हरी । कीं अन्वयसमाधियोगावरी । आरूढ तो विशिष्ट होतो त्या परीस ॥ ७२ ॥ कीं दिसत असोनि विषमत्व । त्या विषमत्वीं दिसे समत्व । प्रिय अप्रिया बऱ्यावाइटांत ही ब्रह्मत्व । ज्याची बुद्धि पाहे तो विशिष्ट ॥ ७३ ॥ सुहृद ह्मणिजे ज्यांचें बरें हृदय । जे आपुले ठायीं सहज सदय । मायबाप इत्यादि समुदाय । सुहृद ह्मणावा ॥ ७४ ॥ स्नेहवृद्धीनें हित करी । मित्र ह्मणावा यावरी । वाईट सर्वथा करी तो वैरी । दोहीं वेगळा तो उदासीन ॥ ७५ ॥ नव्हे मित्र नव्हे वैरी । बरें वाईट दोन्ही न करी । तो उदासीन या परी । आतां मध्यस्थ ॥ ७६ ॥ आपुला वैरी आणि आपण । इच्छी या दोघांचेंही कल्याण । त्यास घडतें मध्यस्थपण । कीं दोघांसी जो करूं पाहे एकत्व ॥ ७७ ॥ घात करूं पाहे जो आपुला । द्वेष्य ह्मणावें तयाला । कीं इतरां प्रापंचिकजनांला । युक्त वाटे द्वेष करणें तयाचा ॥ ७८ ॥ बंधु ह्मणिजे जे आपुले सोयरे । साधु जे सन्मार्गरत जे बरे । पापी ह्मणावे ज्यांची बुद्धि वावरे । कुकर्मी अखंड ॥ ७९ ॥ ऐसे सुहृद् मित्र शत्रु उदासीन । मध्यस्थ द्वेष्य बंधुजन । साधु आणि पापी कुजन । या इतुकियांचे ठायीं समबुद्धि ॥ ॥ १८० ॥ ऐसे दिसोनि विषम । ब्रह्मभावें बुद्धि ज्याची सम । तो अन्वय समाधिनिष्ठ उत्तम । व्यतिरेकसमाधिनिष्ठापरीस ॥ ८१ ॥ वर्णितां ऐसी समता । अन्वयमाधि हा तत्त्वतां । हा विशिष्टयोगारूढ ह्मणतां । उणा दुसरा या समानकोटीचा ॥ ८२ ॥ अधिक ह्मणतां बंधु जेष्ठ । उणा ह्मणावा नलगे कनिष्ठ । ह्मणतां हा ज्येष्ठश्रेष्ठ । उणा भाऊच कनिष्ठ समजावा ॥८३॥

आणि "वासुदेवः सर्वमिती । स महात्मा सुदुर्लभः" ह्मणे श्रीपती । अन्वयसमाधिनिष्ठ भक्त अती । श्रेष्ठ ह्मणूनि वर्णिला ॥८४॥ याच षष्ठाध्यायांत । द्विविध योगी बोलोनि भगवंत । अन्वयसमाधिनिष्ठ योगी अत्यंत । थोर ह्मणेल स्वमुखें ॥ ८५ ॥ या अध्यायांत यापरी । द्विविध योगाच्याही परी । पुढें विशद जो बोलणार हरी । त्या संक्षेपें आधींच बोलिला ॥ ८६ ॥ त्यांत समाधि निर्गुणीं । वाणला तरी जगीं त्रिगुणीं । विषमता वाटोनि अंतःकरणीं । स्फुरेल द्वैत ॥ ८७ ॥ जो अन्वयसमाधिनिपुण । त्यास त्रिगुणीं दिसे निर्गुण । पटतंतूची हे खूण । बाणली जयास ॥८८॥ या कारणें समाधि जो व्यतिरेक । त्याहूनि अन्वयसमाधि अधिक । कीं अद्वैत आत्यंतिक । बिंबे जया ॥ ८९ ॥ आतां यानंतर श्लोक । त्यापासूनि उत्तमश्लोक । अष्टांगयोग बोलेल तो सुज्ञलोक । परिसोत एथूनी ॥ १९० ॥ आरूढ नाहीं योगावरी । त्याणें आरूढ होइजे कोणे परी । तो अष्टांगयोग याउपरी । एथूनि बोलेल ॥ ९१ ॥ गुरुमुखें आत्मा कळला । परंतु योगीं आरूढ नाहीं जाला । कीं चित्तास नाहीं बाणला । चित्स्वरूपीं योग ॥ ९२ ॥ त्यास यम आणि नियम । आसन आणि प्राणायाम । ध्यान धारणा प्रत्याहार सप्तम । तेव्हां समाधि अष्टम सिद्ध होय ॥ ९३ ॥ त्यांत आरंभ योगाचा । आणि प्रकार यमनियमांचा । इतुकें बोलतो स्ववाचा । श्रीकृष्ण या श्लोकीं ॥९४॥

॥ श्लोक ॥ योगी युंजीत सततमात्मानं रहसि स्थितः ।
एकाकी यतचित्तात्मा निराशीरपरिग्रहः ॥ १० ॥

॥ टीका ॥ योगारूढ होऊं इच्छितो । योगीच कीं ह्मणावा तो । त्यास श्रीकृष्ण ह्मणतो । कीं त्याणें मनातें योजावें सर्वदा ॥ ९५ ॥ एकांतीं त्याणें वसावें । ह्मणजे जनसभादिकीं न वसावें । अत एव एकाकी होऊनि असावें । आणि अपरिग्रह ॥९६ ॥ सर्वथा परिग्रहचि नसे । अथवा प्रारब्धें जरी लागला असे । तरी परिग्रह टाकूनि सत्क्षेत्रीं वसे । योगसिद्ध्यर्थ तोही अपरिग्रह ॥ ९७ ॥ कीं अभ्यासासि बैसला । तें समयींच एकाकी जाला । तरी परिग्रह ज्यास लागला । व्यग्र होणार मन त्याचें ॥ ९८ ॥ यालागीं एकाकीपण वदोनी । वर्णिला अपरिग्रह ह्मणोनी । आणि नियतचित्त शरीर या वचनीं । यम सूचवी तयाचा ॥९९॥ कीं इंद्रियग्राम । आटोपतांच चित्ताचा संयम । होणार तोचि यम । यम ह्मणिजे मुख्य आवरणें इंद्रियांचें ॥२००॥ यम ह्मणजे नियत । चित्त आणि देह जयाचा निश्चित । ऐसा यतचित्तात्मा

ह्मणोनि भगवंत । यम सूचवी तयाचा ॥ १ ॥ नियमही या श्लोकीं । त्याचा सूचविला असा कीं । तो अपरिग्रह एकाकी । ह्मणूनि वर्णिला ॥ २ ॥ कीं योगास जें प्रतिकूळ । तें टाकावें सकळ । धरावें तें जें योगास अनुकूळ । स्वरूप नियमाचें इतुकेंचि ॥ ३ ॥ आणि एकांतवास । नियमचि ह्मणावें त्यास । कीं जनसभादिविरुद्ध योगास । तें टाकूनि एकांत धरिला ॥ ४ ॥ आतां या यमास । आणि नियमास । प्रतिकूळ ते आस । धनादिविषयाची ॥ ५ ॥ जो नसे निराश । त्यास बांधे आशापाश । मग योगास कैंचा अवकाश । यमनियम न पडती कानींही ॥६॥ यालागीं तो निराशी । कीं आशारहित ह्मणावें त्यासि । भाव कीं आशा जयासी । कैंचे यमनियमही त्याला ॥ ७ ॥ एवं निराशपण । योगसिद्धीचें मुख्य लक्षण । यालागीं यमनियमपरायण । निराशी ह्मणावें तयांतें ॥ ८ ॥ यमनियमांची स्थिती । बोलूनि ऐसी श्रीपती । आतां आसनाची रीति । बोलतसे स्पष्ट या श्लोकें ॥९॥

॥ श्लोक ॥ शुचौ देशे प्रतिष्ठाप्य स्थिरमासनमात्मनः ।
नात्युच्छ्रितं नातिनीचं चैलाजिनकुशोत्तरम् ॥ ११ ॥

॥ टीका ॥ अगा योग योजावा एकांतीं । ह्मणोनि बोलिलों तुजप्रती । परी तें स्थळ अती । असावें पवित्र ॥२१० ॥ शुचि शुद्ध भूमि वरी । आसन स्थापावें तीवरी । तें अति स्थिर कीं न करी । डळमळूनि डगमग चित्तासी॥११॥तें न बहुत उंच । अथवा न बहु नीच । कुश आंथरूनि त्यावरीच । अजिन आणि अंबर असे ऐसें॥१२॥तळीं कुश वरी अजिनासन । तें कृष्णाजिन अथवा व्याघ्राजिन । तयांहीवरी वसन । एवं स्थिर मृदु आणि पवित्र ॥ १३ ॥ एवं यम नियम आसन । सांगूनिया गरुडासन । क्रमें आणिकही साधन । सुचवितो या श्लोकीं ॥१४ ॥

॥ श्लोक ॥ तत्रैकाग्रं मनः कृत्वा यतचित्तेंद्रियक्रियः ।
उपविश्यासने युंज्याद्योगमात्मविशुद्धये ॥ १२ ॥

॥ टीका ॥अगा आसन रचूनि ऐसे परी । बैसोनियां त्यावरी । मनाची एकाग्रता वरी । साधावी तेथें ॥१५ ॥ तेथें एकाग्र मन करूनियां । आवरूनि चित्तेंद्रियक्रिया । योग योजावा आसनीं बसोनियां । बुद्धीचिया शुद्धीकारणें ॥ १६ ॥ मनाची एकाग्रता करावी । ह्मणतां प्राणायाम सूचवी । कीं मनाची एकाग्रता व्हावी । प्राणायामें ॥ १७ ॥ करूनियां प्राणायाम । करावा चित्ताचा संयम । यालागीं मागुती पुरुषोत्तम । यतचित्तत्व बोल-

तो ॥१८॥ प्राणायामाच्या आवृत्ती । होतां मनाच्या संकल्पवृत्ती । चित्तसंयम करितांच राहती । भाव ऐसा ॥ १९ ॥ या भावें मन एकाग्र करूनी । मागुती ह्मणे यतचित्त होऊनी । इंद्रियवृत्ति आणि क्रिया आवरूनी । योग योजावा ह्मणतसे ॥ २२० ॥ योग एथें कवण । वाखाणावा तरी तें खुण । बुद्धीच्या शुद्धीचें बोलतां कारण । सगुणध्यान सूचवी ॥ २१ ॥ जरी ह्मणावा कर्मयोग । तरी यज्ञादि कर्में तेथें अंतरंग । तेव्हां स्त्री आणि ऋत्विगादिसंग । तो एकाकी अपरिग्रह ह्मणवेना ॥ २२ ॥ योगशब्दें हटयोग । बोलतो ह्मणावा श्रीरंग । तरी न तुटे वासनासंग । हटयोगें करूनी ॥२३॥ देहामुळें भोग नाना । त्याच्या जीवित्वाची वासना । धरूनि करिती काळवंचना । हटयोगी ॥२४॥ देह व्हावा अजर । देह व्हावा अमर । हटयोगें उपजे आदर । या जडा शवाचा ॥ २५ ॥ काळास वंचूनि देह । रक्षिती धरूनि त्याचा स्नेह । ऐसियानें त्यजिलें जरी गेह । तरी तें वैराग्य ह्मणवेना ॥ २६ ॥ कोणी स्त्री कर्कशा । ह्मणूनि टाकिती गृहाशा । तरी न तोडिती स्नेहपाशा । देहाचिया ॥ २७ ॥ जैसें वैराग्य त्याचें । तैसेंचि याचें । एवं वैराग्य तेंचि साचें । कीं प्रीति सुटे या जडा शवाची॥ २८ ॥ देहप्रीति सोडी बुद्धी । तेचि बुद्धीची अत्यंत शुद्धी । या शुद्धीची सिद्धी । ध्यानें नारायणाच्या ॥ २९ ॥ बुद्धिशुद्धीकारण । योग योजावा ह्मणे श्रीकृष्ण । तेव्हां योगशब्दें सगुण । मूर्ति ध्यावी तयाचीच ॥ २३० ॥ योग आत्मस्वरूपाचा । तोही न बोले भगवद्भावाचा । कीं शुद्धबुद्ध तेव्हां साचा । आत्मा स्फुरे बुद्धीसी ॥३१॥बुद्धीच्याच शुद्ध्यर्थ । एथें योग योजावा ह्मणे समर्थ । एवं सगुण ध्यावा हाचि समर्थ । बोलावा एथें ॥ ३२ ॥ आतां जों अशुद्ध बुद्धी । तों न घडे या योगसिद्धी । करी त्या बुद्धीचीच शुद्धी । तेव्हां योगशब्दें न घडे हें ध्यान ॥ ३३ ॥ कोणी एथें ऐसें बोलती । तरी हे शुद्धी कोणती । तांदूळ कांडिले सडिले तरी धुती । पाकसमयीं वारंवार ॥३४॥ कर्मयोगें शुद्धी । पावली ये जन्मीं अथवा जन्मांतरीं बुद्धी । तेव्हां आत्मानात्मविवेकसिद्धी । जाली गुरुमुखें ॥ ३५ ॥ कांडिले बरे तांदूळ । पाकचि होणें असे केवळ । तैसा योगारूढमात्र हा निर्मळ । होऊं पाहतो ॥ ३६ ॥ तथापि घालूनि जळ । निर्मळही जे तांदूळ । तेही करूनि अतिनिर्मळ । पाक करिती ॥ ३७ ॥ या आरुरुक्षूची बुद्धी । जरी पावलीच आहे शुद्धी । तरी योगारूढत्वसिद्धी । घडावी ध्यानें सगुणाच्या॥ ३८ ॥ आणि अष्टांगयोग ।

त्यांत ध्यान तें सगुणध्यानयोग । स्वस्वरूपीं चित्तवृत्तीचा वियोग । तो समाधी ॥३९॥ बाणे चित्तवृत्तीचा निरोध । अथवा बाणे सर्वात्मबोध । तोंवरी अभ्यास त्या अभ्यासाचा करितां शोध । तेचि धारणा॥२४०॥ सत्त्ववृत्तींत आत्मा स्फुरे । ते वृत्ति त्या स्वरूपातें स्फुरे । ते धारणा कीं जेथें नुरे । जडवृत्तीची धारणा॥४१॥ धारणाचि जेव्हां निश्चळ । तोचि समाधि केवळ । क्षणक्षणां वृत्ति चंचल । होतां धारणेचाच होतो अभ्यास ॥ ४२॥ एवं ध्यान तें सगुण । धारणा ज्याची तें निर्गुण । चित्स्वरूपीं स्थिति तें लक्षण । समाधीचें ॥४३॥ एवं आसनीं बैसोनि योग । योजावा तो ध्यानयोग । चित्तचैतन्यसंयोग । तो योग पुढें बोलेल ॥ ४४ ॥ अष्टांग योग भागवतीं । कपिलमुनि देवहूतीप्रती । सांगे तेथें ध्येयमूर्ती । सविस्तर सांगे मुकुंदाची ॥ ४५ ॥ आरंभीं कपिल मुनि । सबीजयोग सांगतो ह्मणोनि । ह्मणे आणि बीज तें पायांपासूनि । ध्यान सांगे मूर्तीचें ॥ ४६ ॥ द्वितीय स्कंधीं येचि रीती । एकादशस्कंधीं उद्धवाप्रती । जेथें अष्टांग तेथें बोलती । पुराणांतरींही ध्यान सगुणाचें ॥ ४७ ॥ आतां यानंतर श्लोक । तो कां बोले उत्तमश्लोक । त्याचें निमित्त सुज्ञलोक । परिसोत आधीं ॥ ४८ ॥ ध्यानयोगबुद्धिशुद्धीकारण । योजितां मूर्ति सगुण । आवडे तेव्हां अन्यत्र निपुण । विरक्त होय ॥ ४९ ॥ हेचि अत्यंत शुद्धी । कां विषयवैराग्य सिद्धबुद्धि । एवं या शुद्धीची सिद्धी । बुद्धीस जाली ॥ २५० ॥ परी भजन मांडलें द्वैत । मुख्य फळ बाणावें अद्वैत । तो ध्यातां साकार अत्यंत । भेदसंस्कार उपजला ॥ ५१ ॥ ध्यान ह्मणतां दुसरें । ध्यातें हेंचि वाटे खरें । स्वस्वरूपध्यान एकसरें । केंवि घडे तयाला ॥ ५२ ॥ आतां सगुण ध्यानावरी । स्वरूपधारणा सांगावी परी । ते धारणा उत्तम जे दों प्रकारीं । न धरवे याला तेधवां ॥ ५३ ॥ आपली धारणा आपण । धरावी हे बाणावी खूण । आणि नाना अवयवध्यानीं जें निपुण । तें चित्त थारावें एकत्र ॥ ५४ ॥ याकारणें कमलेक्षण । सांगतो स्वनासाग्रनिरीक्षण । कीं ध्येय आपण ही खूण । बाणावी साधका॥५५॥ आणि मनास अनादि संस्कार । कीं स्मरावें नानाकार । जरी बिंबलें ध्यान साकार । तरी नानाकार अलंकार अवयव ॥ ५६ ॥ यालागीं स्वनासिकाग्रमात्र । जरी लक्षिती स्वनेत्र । दृष्टीसवें एकत्र । चित्त थारे ॥ ५७ ॥ आणि नासिकाग्रीं दृष्टि थारे । तरी मनाची कल्पनाही सरे । कीं दृष्टि सर्वत्र वावरे । ते थारली एकत्र ॥ ५८ ॥ या

संस्कारें चित्त । होय जेव्हां संस्कृत । निराकाराची निश्चित । धरूं शके धारणा ॥ ५९ ॥ यालागीं नासिकाग्रनिरीक्षण । बोलों पाहतो कमलेक्षण । त्याही पुढिल्या श्लोकीं लक्षण । धारणेचें बोलेल ॥ २६० ॥ आतां बैसोनि कोणे रीती । लक्षावें नासिकाग्राप्रती । तें बोलेल स्वयें श्रीपती । या श्लोकीं ॥ ६१ ॥

॥ श्लोक ॥ समं कायशिरोग्रीवं धारयन्नचलं स्थिरः ।
संप्रेक्ष्य नासिकाग्रं स्वं दिशश्चानवलोकयन् ॥ १३ ॥

॥ टीका ॥ काय शिर आणि मान । हीं तिन्ही धरूनि समान । असती अचळ वर्तमान । शरीर असे ऐसें करावें हा भाव ॥ ६२ ॥ कीं स्थिर होतां शरीर । अंतःकरण होतें स्थिर । तेव्हां आपण स्थिरतर । ऐसें वाटे ॥ ६३ ॥ एवं स्थिर शरीर । करूनि होऊनि आपण स्थिर । अभ्यासीं व्हावें तत्पर । तो अभ्यास उत्तरार्धें बोलतो ॥ ६४ ॥ उत्तरार्ध ॥ "संप्रेक्ष्य नासिकाग्रं स्वं दिशश्चानवलोकयन्" ॥ टीका ॥ कीं वरिलिया प्रकारें । पाहूनि स्वनासिकाग्र बरें । दहा दिशा एकसरें । न पाहतां पाहावें नासिकाग्रमात्र ॥ ६५ ॥ नासाग्र ऐसें लक्षूनि । या लक्षें मन संयमूनी । स्वरूपधारणा धरावी तेही सोडूनी । ऐसें बोलेल आतां या दुसरिया श्लोकें॥६६॥

॥ श्लोक ॥ प्रशांतात्मा विगतभीर्ब्रह्मचारिव्रते स्थितः ।
मनः संयम्य मच्चित्तो युक्त आसीत मत्परः ॥ १४ ॥

॥टीका॥ पूर्वोक्तरीती निश्चित। मन संयमूनि व्हावें मच्चित्त। ह्मणजे चित्तीं प्रकाशक अत्यंत। जो मी स्मरावें त्या मातें॥६७॥ ऐसा होय तेव्हां युक्त। ह्मणजे चित्त स्वरूपीं प्रयुक्त। आणि मत्पर ह्मणजे माझा भक्त। कीं मीच परसिद्धिदायक जयाचा॥६८॥कीं सगुणध्यानयोगीं। प्रीति वाणली माझियालागीं। मीचि थोर ज्यास ऐसा योगी। बसे धारणा ऐसी धरूनी॥६९॥सोडोनि नासाग्रनिरीक्षण। धारणा धरायाचें लक्षण। हें बोलिला कमलेक्षण। उत्तरार्धें ॥ २७० ॥ कीं यमनियमांचीं आंगें। पूर्वार्धीं त्याचिया प्रसंगें। सूचवूनि उत्तरार्धें श्रीरंगें। धारणा त्याची वर्णिली ॥ ७१ ॥ कीं यमनियमांविना। या साधनासि कोणी पावेना। हें सुचवावया साधकजना। आधीं यम नियम त्याचे बोलतो ॥ ७२ ॥ तत्रापि सगुणध्यान। करितां पावला समाधान। ह्मणोनि आतां यमनियमसाधन। विशेष पूर्व यमनियमांही परिस ॥ ७३ ॥ कीं प्रशांत ज्याची बुद्धी। ते ध्यातां सगुण पावली शु-

द्धी । प्रशांतता ज्यास त्यास इंद्रियजयसिद्धी । दृढ यम ऐसा जयाचा ॥ ७४ ॥ ब्रह्मचारी व्रती परम । या गोष्टींत सुचवी नियम । कीं योगास अनुकूळ तें स्वीकारी उत्तम । योगप्रतिकूळ तें टाकी ॥ ७५ ॥ टाकी योगप्रतिकूळ । धरी जें योगास अनुकूळ । या त्यागयोगीं भयविव्हळ । नव्हे कीं असे जो मत्पर ॥७६॥सिद्धिदाता माझा हरी । ऐसा भाव ज्याच्या अंतरीं । तो मत्पर भय न धरी । योगविघ्नाचें ॥ ७७ ॥ ऐसा पूर्वार्धेंकरूनी । साधक आधीं वर्णूनी । उत्तरार्धें मन संयमूनी। मच्चित्त असतो हें बोले ॥ ७८ ॥ या श्लोकीं हरी । धारणा बोलिला परी । समाधि हेचि धारणा जरी । न येती लय विक्षेप ॥ ७९ ॥ निद्रेस ह्मणावें लय । विक्षेपकल्पना हा निर्णय । या दोहींकरितां होय । समाधिभंग ॥ २८० ॥ त्यांत युक्ताहारविहार । हीं नियमांगें बोले सर्वेश्वर । निद्रालस्याचा परिहार । त्या उपायें ॥ ८१ ॥ विक्षेप नानाकार । कल्पना उठे वारंवार । त्यास उपाय प्रत्याहार । अष्टांगाचें अंग तेंही ॥ ८२ ॥ त्यांत जन्मांतरयोगभ्रष्ट । ज्यास साधनें पूर्वजन्मीं यथेष्ट । घडलीं त्याला विना कष्ट । योग बाणे ॥८३॥ किंवा आत्मज्ञ आणि सगुणभक्त । सगुणीं प्रीती विषयीं विरक्त । विक्षेपापासूनि मुक्त । चित्त त्याचें होतें अनायासें ॥ ८४ ॥ "तेषामहं समुद्धर्ता"। ऐसें द्वादशीं विश्वभर्ता । ह्मणेल कीं त्याच्या योगसिद्धीचा कर्ता । मी स्वयें होतसें॥ ८५ ॥ कीं "अनन्येनैव योगेन । मां ध्यायंत" ऐसें मधुसूधन । बोलिल कीं अनन्ययोगेंचि ध्यान । माझें जयां ॥ ८६ ॥ तयांचा ह्मणे मी उद्धर्ता । तेव्हां त्यांचा योगसिद्धिकर्ता । मी क्षीराब्धिकन्येचा भर्ता । सूचवी ऐसं॥ ८७ ॥ भक्त ऐसा धरी धारणा । तों तेचि समाधि बाणे अंतःकरणा । नलगे त्या कृष्णशरणा । प्रत्याहाराची खटपट॥८८॥ प्रस्तुतीं शार्ङ्गधर । या साधकां ह्मणे मत्पर । यालागीं एथें प्रत्याहार । अंग अष्टांगाचें न दावी ॥ ८९ ॥ आणि अव्यक्तोपासक । योगभ्रष्ट जो साधक । तो पूर्वाभ्यासेंचि आत्यंतिक । समाधि पावे अनायासें ॥ २९० ॥ या योगभ्रष्टप्रकरणीं । याच अध्यायांत चक्रपाणी । बोलिल यालागीं एथें वाणी । न बोले प्रत्याहाराची॥९१॥प्रस्तुतीं योगी मत्पर। ह्मणूनि बोलिला जो साधक नर । त्याचा समाधिपर्यंत सर्वेश्वर । योग बोलोनि मग प्रत्याहार बोलेल ॥९२॥"संकल्पप्रभवान्कामांस्त्यक्त्वा" ह्मणोनी। प्रत्याहारलक्षण या श्लोकापासूनी । श्रीकृष्ण बोलेल बोलोनी । याचा समाधियोग तेथपर्यंत ॥९३॥एवं

ऐसा प्रत्याहार । तो विक्षेपाचा परिहार । लयपरिहारप्रकार । अपेक्षी तयां सर्वांसही ॥९४॥कीं प्रारब्धें लागला असे देह । जरी टाकिला त्याचा स्नेह । आहारनिद्रा निःसंदेह । पाहिजे त्यासी ॥ ९५ ॥ लय निद्रा समाधींत । न ऐथेंही भगवंत । या पुढिलिया श्लोकापुढें अव्यवहित । त्या श्लोकांत बोलेल ॥ ९६ ॥ या श्लोकीं धारणा । बोलिली ज्याच्या अंतःकरणा । त्याच्या प्राप्तीच्या विवरणा । बोलतो या श्लोकें ॥ ९७ ॥

॥ श्लोक ॥ युंजन्नेवं सदात्मानं योगी नियतमानसः ।
शांतिं निर्वाणपरमां मत्संस्थामधिगच्छाति ॥ १५ ॥

॥टीका॥ अर्जुना या प्रकारें चित्त । जो सदा योजी योगव्रत । ज्या योगियाचें नियत । मन असे॥९८॥तो पावतो परम शांति । निर्वाण परमा जीस ह्मणती । परमनिर्वाण बोलती । कैवल्यातें ॥ ९९ ॥ कैवल्य तें परम । जें शुद्ध निर्गुणब्रह्म । तें सर्वदा सर्वत्र निर्धर्म । स्फुरे स्पष्ट ॥३००॥ कामादि अशांत ऊर्मी । लेश नसती त्या ब्रह्मीं । जेथें तूं आणि मी । भेद कांहीं दिसेना ॥ १ ॥ ज्यास बाणे हा अनुभव । त्यातें सहज शांतिवैभव । जीवन्मुक्त तो मानव । ह्मणावा तेव्हां॥ २ ॥ पावतो ऐशा शांतीतें । जो अधिष्ठूनि असे मातें । कीं माझ्या ब्रह्मानुभवातें । नसे खंडत्व ॥ ३ ॥ अखंड निर्गुणाचा अनुभव । तेथें अखंड शांतीचें वैभव । हे माझी शांति ही पावती मानव । योगेंकरूनी ॥४ ॥ एवं ऐसी धारणा । तेचि समाधि बाणे अंतःकरणा । तेव्हां या शांतीच्या खुणा । तो पावे॥५॥आतां यानंतर श्लोक । तो कां बोलेल उत्तमश्लोक । त्या दों श्लोकांचें सुश्लोक । निमित्त आधीं परिसोत॥६॥ कीं स्वभक्त योगनिष्ठ । त्यांचें आपण पुरवितो अभीष्ट । ते सिद्ध होती न लागतां कष्ट । त्यांत हा मत्पर ह्मणूनि वर्णिला॥७॥कीं यमादि सात अंगें । समाधीपर्यंत वर्णिलीं श्रीरंगें । अनायासप्राप्तिप्रसंगें । प्रत्याहार नाहीं वर्णिला ॥८॥अनायासें पावे मत्पर । अथवा योगभ्रष्ट नर कीं । योगाभ्यासीं जन्मांतर । क्रमिलें ज्यानें॥९॥एवं विक्षेपकल्पना । स्वभक्तास कीं योगभ्रष्टास असेना । परि निद्राधर्म देहाचा सुटेना । देहपातपर्यंत ॥३१०॥ त्यास निद्रा आहारविहार । नियत होतां निद्राविकार । न करूं शके बलात्कार । त्यास समाधि माजी ते निद्रा ॥११॥ योगाभ्यासी जन्मांतरीं । तोही नियत निद्रा आहार न करी । तरी निद्रासमाधीतें परिहरी । तयाच्याही ॥१२॥ आतां भक्तांचीं विघ्नें देव । परिहरी तो देवाधिदेव । तरी निद्रापरिहारही स्वयमेव । तोचि

करील ह्मणावा समाधींत ॥ १३ ॥ धान्य भक्ताचे घरीं । तो स्वयें रांधी भोजन करी । त्यास पाहिजे कां परी । भगवंत॥ १४ ॥ चालायास उपाय। आपलेच दोन्ही पाय । एथें पाहिजे त्यास काय । परमगतिदाता भगवंत ॥१५॥पांडवांहातीं युद्ध । करवूनि दे त्यांस राज्यसमृद्ध । त्यांस असाध्य तें स्वयें सिद्ध । कार्य करूनि दाखवी॥१६॥ किंबहुना विश्वरूपीं । कौरव मारूनि दावी तथापी । त्याचेच हातें ते पापी । मारविले समस्त ॥ १७ ॥ स्वयें भक्तांची योगसिद्धी । स्वयेंचि त्यांची साधनसमृद्धी । तथापि दावी ऐसी प्रसिद्धी । कीं तेही करिती योगप्रयत्न ॥ १८ ॥ तथापि इतरां दुर्लभ । तें त्यांस करी अति सुलभ । सोपे यत्न श्रीवल्लभ । त्यांचे हातीं करवितो ॥ १९ ॥ एवं जे स्वभक्त । आणि योगभ्रष्ट विरक्त । आणि याचि जन्मीं उपासिती अव्यक्त । योगयत्न इतरांसही ॥ ३२० ॥ त्यांत योगी स्मरतां स्वरूप । जो नाना कल्पनारूप । तो परिहारणें विक्षेप । क्लेशसाध्य अष्टांगीं ॥ २१ ॥ त्या विक्षेपाचा परिहार । होय आणि सिद्धीतें सत्वर । स्वभक्त पावेच ऐसा सर्वेश्वर । स्वभक्तियोग देतो तयासी॥ २२ ॥ श्रवणकीर्तनें जैसा जैसा । मळ मनाचा जातो तैसा तैसा । चित्तीं चित्स्वरूपाचा ठसा । स्पष्ट दिसतो ॥ २३ ॥ प्रतिपदीं हें भागवतीं । शुकादि योगी वर्णिती । अष्टांगयोगाच्या सांगतां रीती । सिद्धि ध्यानयोगें सगुणाच्या ॥ २४ ॥ एवं ध्यातां सगुणरूप । विघ्न न करी विक्षेप। समाधि स्थैर्य तो प्रताप । सगुण ध्यानाचा ॥ २५ ॥ सुगम निद्रापरिहार । युक्तनिद्रा आहारविहार । ह्मणोनि या प्रसंगें तो प्रकार । बोलतो या श्लोकें करूनी ॥ २६ ॥

॥ श्लोक ॥ नात्यश्नतस्तु योगोऽस्ति न चैकांतमनश्नतः ।
न चातिस्वप्नशीलस्य जाग्रतो नैव चार्जुन ॥ १६ ॥
युक्ताहारविहारस्य युक्तचेष्टस्य कर्मसु ।
युक्तस्वप्नावबोधस्य योगो भवति दुःखहा ॥ १७ ॥

॥ टीका ॥अर्जुना जो अत्यंत भक्षी । तो स्वस्वरूपातें काय लक्षी । तटतटती ज्याच्या कुक्षी । बोट न रुते रोंवितां ॥ २७ ॥ यालागीं जो भक्षी बहुत । त्यास योग नसे निश्चित । आणि त्यासही एकांत । न साधे जो कांहींच भक्षीना ॥ २८ ॥ कीं अन्नावीण । विकळ होय अंतःकरण । तो जरी योगनिपुण । न वाणे योग ते समयीं तैशासही ॥ २९ ॥ व्यतिरेक आणि अन्वय । दोन्ही योगीं हा निश्चय । योग आणि एकांतशब्दद्वय । दों

परी योजिले या भावें ॥३३० ॥ योगशब्द उभयत्रंही । एकांतशब्द विशेषें कांहीं । अन्वयाकडे जैसा तैसा नाहीं । व्यतिरेकाकडे ॥३१ ॥ कीं एका चित्स्वरूपांत । दिसे सर्वा जडाचा अंत । तो योग बोलावा एकांत । जेंवि एका हेमीं नाना अलंकार ॥ ३२ ॥ व्यतिरेकयोगीं योगियास । एकांताचा ऐसा न दिसे विलास । एकांत वाणोनिही त्यास । एकांत ऐसा दिसेना ॥ ३३ ॥ कीं जडावेगळें जें स्वरूप । त्यांत सत्त्वही जालें चिद्रूप । परी तेंचि सर्व हा प्रताप । न दिसे त्यांत अन्वय समाधीचा॥३४॥ज्यांत मन जालें उन्मन । तेंचि सर्वचैतन्यघन । एकांत या भावें सज्जन । निर्गुणसमाधीसही ह्मणती ॥ ३५ ॥ परि हा वेगळाचि अनुभव । न दिसे हें तेथें वैभव । बोले हृदयीं धरूनि हा भाव । योग एकांत हीं भिन्ननांवें भगवंत ॥३६॥ एवं द्विविध योगही निश्चित । न साधती त्यास जो भक्षी अत्यंत । आणि जो नसे कांहीं भक्षित । योग दोन्ही न साधती तयासी॥ ३७॥ आणि जो निजे बहुत । असाध्य त्यांतेंही निश्चित । अथवा अखंड जागाच अत्यंत । योग असाध्य त्यांतेंही॥३८॥यालागीं युक्त आहार । आणि युक्त ज्याचा विहार । युक्त निद्रा युक्त जागर । आणि कर्मी चेष्टाही युक्त जयाच्या॥३९ ॥ योगसिद्धि त्याला । कीं युक्तपण इतुकिया गोष्टींत जाला । ज्या योगसिद्धींत बोलिला । नाश दुःखा अनादीचा ॥३४०॥ आहारयुक्त ऐसा । कीं ज्याचा आहार जितका जैसा । त्यांत योगास अनुकूळ तितका तैसा । घेणें आहार तो युक्त ॥४१ ॥ भक्षितां अन्न फार । पासला पडों पाहे नर । डरडरां येती ढेकर । योग कैंचा तयासी ॥४२॥ आणि न भरतां उदर । अल्प घेतां आहार । योगीं नव्हे चित्त स्थिर । नव्हतां शांति क्षुधेची ॥ ४३ ॥ जितकिया आहारें चित्त । योगीं थारे उल्हाससहित । हे खूण समजावी निश्चित । ज्याची त्यानें ॥ ४४ ॥ हा नव्हे हटयोग । कीं अन्न भरावें दोन भाग । एक उदकें चतुर्थ विभाग । रिता ठेवावा पोटाचा ॥ ४५ ॥ वायुधारणा जेथें । हा हटनियम तेथें । तोचि नियम एथें । कीं चित्त उल्हासयुक्त थारे स्वरूपीं ॥ ४६ ॥ एवं ज्या देशीं जो आहार । त्यांतही पवित्र प्रकार । तोचि घ्यावा कीं दृढतर । अभ्यास त्याच अन्नाचा ॥ ४७ ॥ अन्न टाकूनि पर्ण । खातां लागे हगवण । साधील येऊनि कवण । योग त्याचा ॥ ४८ ॥ शरीर पर्णाहार सोसी । तरी अन्नाची धरूं नये असोसी । होऊनि अरण्यवासी । पर्णें भक्षूनि योग साधावा॥४९॥ऐसेंचि

कदन्न अथवा रूक्ष। सोसतां होऊनि साक्षेप। सदन्नसघृतदक्ष । योगाभ्यासी न इच्छिती ।। ३५०।। एवं योगास अनुकूळ । तें भक्षावें टाकावें प्रतिकूळ । ऐसाच अगत्य केवळ । विहारही तितकाच ।। ५१ ।। विहार गमनागमन । योगार्थ करिती योगीजन । स्नान पान भोजन । गमनागमन यदर्थ ।। ५२ ।। तोही बहु विहार। करितां होय श्रांत फार। चित्त त्याचें स्वरूपाकार। नव्हे साधकाचें ।। ५३ ।। आणि विहार न करी कांहीं । एकाग्र मन नव्हे तयाचें-ही। कीं दडोनि राहणें याचा नाहीं। अभ्यास ज्याला ।। ५४ ।। ज्याला फिरणेंचि नावडे। तो जरी एकेचि ठायीं दडे। त्याची योगसिद्धि घडे। तितकियानेंचि।।५५।।एवं युक्ताहार ।आणि युक्त विहार। तोचि कीं जो करिता प्रकार। योगस्वरूपीं थारे चित्त ।। ५६ ।। कर्मींही याच रीती । युक्तचि अंगचेष्टा ज्याच्या होती । कीं योगार्थ रक्षणें शरीरस्थिती । तदर्थ अगत्य अंगचेष्टा ।।५७।। वेदोक्त नित्यकर्में करी । तें योगास अनुकूळ त्याचपरी । अत्यंत जपतपावरी । न धरी आदर ।। ५८ ।। गायत्रीचा जप उत्तम । तो एकसहस्र शत मध्यम । कनिष्ठ जपाचा नेम । दशकमात्र श्रुतिसिद्ध ।।५९।।

।।श्रुति।।सहस्रपरमा देवीं शतमध्यां दशावराम् ।।श्रुत्यर्थ।। स्पष्ट श्रुतीचा अर्थ। एवं शुद्धचित्तयोगाभ्यासीं कृतार्थ । अगत्यविधिपरिपालनार्थ । कर्म करी ।।३६०।। त्यांत गायत्रीचा जप। करितां स्फुरे जरी स्वरूप। विघरलें आणि थिजलें तूप। भिन्न नसती ।।६१।। अन्वयें आत्मा स्मरे। त्यास जडीं नगीं आत्महेम स्फुरे। एवं जप आणि योग यासी नुरे। वेगळेपण।।६२।।"यज्ञानां ज्जपयज्ञोस्मि"। म्हणोनि कृष्ण अंतर्यामीं ।पुढें बोलेल कीं जपयज्ञ मी । सर्वां यज्ञांत ।। ६३ ।। ऐसा एकाग्रतेचा जप। तो जपयज्ञ भगवत्स्वरूप। योगास अनुकूळ हें तप। तो साधकही कर्मी युक्तचेष्ट।।६४।।ऐसा घडतां जप। परादिवाचांचें रूप । होय अवघें स्वरूप । बाणे समाधी ।।६५ ।। कीं शब्द-स्फूर्ति राहे । तरी निर्विशेष योग होत आहे । आणि शब्दीं स्वरूप पाहे । तरी योग सविशेष तोही म्हणावा ।। ६६ ।। न बाणतां दोन्ही रीती । जे जपचि फार करिती । ते इतरांहूनि बरे परि योगगती । अंतरे योगियाची ।। ६७ ।। तो नव्हे कर्मी युक्तचेष्ट। कीं हे चित्तशुद्धीनिमित्त कष्ट। हा चित्त योजूं लागला स्पष्ट। स्पष्टतर स्वस्वरूपीं ।। ६८ ।। आतां निद्रा जागृती । उभयत्र युक्त ये रीती । कीं न बहु निजे अथवा अती । जागाच नित्य न असे ।। ६९ ।। कीं जरी बहुतचि निजे । तरी तमोगुणें चित्त भि-

जे । भिजट फार होतां न शिजे । दाळ तुरीची जे रीती ॥ ३७० ॥ आणि काळ वेंचूनी । निद्रेंत जाय योगावांचूनी । जों जों निजे तों तों दिनदिनीं । वाढेंच लागे निद्राही ॥ ७१ ॥ जागाचि असे जरी । योगीं निद्रा लागे तरी । एवं योगीं निद्रा न ये यापरी । तावन्मात्र करी निद्राही ॥ ७२ ॥ न बहु होय निद्रित । न बहु असे जागृत । त्यास योग वाणे जो अत्यंत । नाशी अनादि दुःखें तीं ॥ ७३ ॥ एवं आहार विहार । आणि कर्मी चेष्टा हे सकळ प्रकार । बोलिले कीं ऐशियास विकार । लय न करी अभ्यासी ॥ ७४ ॥ कीं बहुत होतां आहार । निद्राच येऊं लागे फार । केवळ राह-तां निराहार । निद्राच ये रूपें मूर्छेच्या ॥ ७५ ॥ बहुत होतां विहार । श्रमें निद्राच ये फार । कांहींच न करितां विहार । क्षुधामांद्य ॥ ७६ ॥ क्षुधा मंद जेव्हां । अन्न न चले तेव्हां । निद्रा नये आणि तेधवां । योगीं न थारे चित्तही ॥ ७७ ॥ तथापि चित्त लागे जरी । निद्रा घाला घाली वरी । एवं ही सर्व नियमाची परी । लय परिहाराकारणें ॥ ७८ ॥ एवं आ-हारादि नियम । होतां योग वाणे परम । तो समाधि अत्युत्तम । त्याचें ल-क्षण आतां या श्लोकीं ॥ ७९ ॥

॥ श्लोक ॥ यदा विनियतं चित्तमात्मन्येवावतिष्ठते ।
निःस्पृहः सर्वकामेभ्यो युक्त इत्युच्यते तदा ॥१८॥

॥ टीका ॥अगा जेव्हां विशेषें नियत । उक्तप्रकारीं नेमिलें जें अत्यंत । तें आत्मस्वरूपींच थारे चित्त । ह्मणावा योगारूढ तेव्हां तो योगी ॥३८०॥ आत्मस्वरूपींच स्थिर । चित्त होय ह्मणतां सर्वेश्वर । योगरहस्य चम-त्कार । सुचवी एथें ॥ ८१ ॥ कीं जो स्फुरे आत्मप्रत्यय । तोंचिवरी चित्त चिन्मय । त्यांत कांहीं विस्मृति होय । समाधिभंग ते काळीं ॥ ८२ ॥ आत्मत्वें स्फुरे स्वस्वरूप । तेथें विस्मृति पडतांच विक्षेप । कल्पना उठे नानारूप । भंगे समाधी ॥ ८३ ॥ त्या विस्मृतीचें निमित्त । होतें तेथें तेंचि चित्त । कीं वैराग्य न असे अत्यंत । चित्तासि ज्या ॥ ८४ ॥ ज्याची ज्याची आवडी । त्यावरी पडे स्मृतीची उडी । एवं थिता समाधि मोडी । लेशही प्रीति विषयांची ॥ ८५ ॥ ते नसे जयाला । समाधिस्थैर्य वाणे तयाला । ह्मणोनि कृष्ण ह्मणे याला । कीं निस्पृह जो सर्व कामापासूनी ॥ ८६ ॥ एवं निस्पृहा न विक्षेप । कीं ज्यास आवडे एक स्वरूप । लय-परिहाराचें तें जें रूप । तें युक्ताहारविहारत्वींच बोलिलें ॥ ८७ ॥ एवं

विक्षेप कल्पनेतें ह्मणती । तेव्हां स्वप्न किंवा जागृती । कीं निद्रेंतही देखती । नानारूपें तें स्वप्न ॥ ८८ ॥ एवं स्वप्न आणि जागृती । कल्पनेंत अवस्था दोनी दिसती । निद्रा ह्मणावी नुसती । ते सुषुप्ति अत्यंत ॥ ८९ ॥ एवं विक्षेप आणि लय । तेव्हां स्फुरे अवस्थात्रय । जेव्हां चित्त स्वस्वरूपमय । तेव्हां तुर्यावस्था चतुर्थी॥३९०॥ एवं आत्मा तुर्यातीत । तेव्हां तदाकार होय चित्त । ते तुर्या ह्मणावी शुद्ध अत्यंत । शबल तुर्या अन्वय समाधी ॥ ९१ ॥ कीं दिसे स्वदेहादि विश्व । ते जागृति तदभिमानी अत एव विश्व । तें विश्व दिसे अविश्व । शबल तुर्या ते ह्मणावी ॥ ९२ ॥ एवं व्यतिरेकें अथवा अन्वयें । स्वचित्तीं स्फुरे आत्मा स्वयें । जोंपर्यंत तोंवरी निश्चयें । अवस्था तुर्या ते ह्मणावी ॥९३॥ प्रस्तुतीं ह्मणे अच्युत । कीं जेव्हां आत्मस्वरूपींच चित्त । थारे तेव्हां आरूढ निश्चित । ऐसें ह्मणतांच हे तुर्या ॥ ९४ ॥ चित्ताची प्रत्येक वृत्ती । तेव्हां आत्मयास प्रत्यगात्मा ह्मणती । तुर्याभिमानी अधिपती । तोचि तेव्हां तुर्येचा ॥ ९५ ॥ एवं लय आणि विक्षेप । निरसलें दोहींचें स्वरूप । चित्त चित्स्वरूपीं चित्स्वरूप । होऊनि जेव्हां थारलें ॥९६॥ तें चित्त कां होतें चंचळ । आणि कोण्या गुणें जालें निश्चळ । हें उपमारूपें घननीळ । बोलतो आतां या श्लोकीं ॥ ९७ ॥

॥ श्लोक ॥ यथा दीपो निवातस्थो नेङ्गते सोपमा स्मृता ।
योगिनो यतचित्तस्य युंजतो योगमात्मनः ॥ १९ ॥

॥ टीका ॥ अगा अर्जुना दीप । वारा लागतां पावे कंप । विषयवासनेनें ऐसें रूप । होतें पहिलें जया चित्ताचें ॥९८॥ ज्या स्थळीं चंचळ नसे समीर । तें स्थळ निर्वात ह्मणती नर । त्या निर्वातस्थळीं स्थिर । दीप जैसा ॥ ९९ ॥ ऐसें योगियाचें चित्त । जें वैराग्याच्या बळें यत । यत ह्मणजे नियत । नेमिलें वासनेवेगळें करूनि ॥ ४०० ॥ तें त्या योगियाचें चित्त । जो त्यास आत्मत्वीं होता योजित । ह्मणजे अभ्यासीं होता रत । समाधि बाणला तयासी ॥१॥ एवं वैराग्य आणि अभ्यास । दोंचि उपायें वळवावें चित्तास । हें अर्जुनातें श्रीनिवास । प्रश्नोत्तरीं याच अध्यायांत बोलेल ॥२॥ तोचि भाव एथें दावी । अर्जुनास हे कळा नसे ठावी । ह्मणोनि करितां प्रश्न या भावीं । उत्तर देईल श्रीकृष्ण ॥३॥ एवं ज्या आकाशीं दीप । समीरें होतां अति सकंप । निर्वात होतां स्थैर्यरूप । त्याच आकाशीं पावला ॥ ४ ॥ ऐसें ज्या स्वरूपीं चित्त । वासनेनें होतें भ्रमत । वैराग्याभ्यासें अ-

त्यंत। स्थैर्य त्याच स्वरूपीं पावलें ।। ५ ।। आतां यानंतर श्लोक । तो कां बोलेल उत्तमश्लोक । त्याचें निमित्त सुज्ञलोक । परिसोत आधीं ।। ६ ।। निवातशब्दें निर्वासना । "आणि युंजतो योग" ह्मणतां सूचना । अभ्यासाची दाविली कीं या दों विना । न बाणे समाधी।।७।। परि वैराग्य उपजे जयास । समाधीच बाणावा तयास । करणें लागे कां अभ्यास । स्थळ ऐसें पूर्वपक्षाचें ।। ८ ।। कीं स्वरूपास चित्त । स्पर्शे तेव्हां अभ्यास नियत । तेथें न थारतां उचित । अभ्यास करणें ।।९।। तेथें न थारायास मूळ । विषयवासना ओंगळ । जो मुमुक्षु विरक्त प्रांजळ । न थारे चित्त कां तयाचें।।४१०।। अभ्यास तेव्हां निश्चित । कीं स्वरूपास लागे चित्त । कीं वाचेस लागे श्लोकार्थसांत । अभ्यास घोषाचा तरी घडे ।।११।। गुरुमुखें वेदऋचा । आयके परि उच्चारूं न शके वाचा । घोष अभ्यास पाठ करायाचा । केंवि घडे तयासी ।।१२।।वासनारूप पाप । नसतां कां उठे विक्षेप । कां चित्त विसरे स्वरूप । कां समाधिभंग कां अभ्यास ।। १३ ।। स्वस्वरूपीं न लागे चित्त । तों अभ्यास न घडे निश्चित । स्वरूपीं लागतांच अत्यंत । समाधि बाणावा विरक्तासी ।। १४ ।। ऐसें संशयाचें स्थळ । परी येथें अभ्यासासि एक मूळ । कीं तेव्हां नव्हे चित्त चंचळ । विरक्ताचें हीं ।।१५।। कीं स्वरूपानंद चाखे । निजानंदें चित्त माखे । तेव्हां तें आपणास राखे । स्वरूपीं स्वरूपाकार करी ।।१६ ।।कर्दमजळांतलि मासा । क्षीरसागरीं पडतां जैसा । परम सुखी होय तैसा । भाव चित्ताचा निजसुखीं ।। १७ ।। आत्माच सुख केवळ । परि सुख न वाटे जों वृत्तीची चळवळ । वृत्ति राहतां निश्चळ । ये अनुभवास सुखरूपें ।। १८ ।। विवेकें वैराग्यधरी । परि चित्तास अभ्यास आकारीं । तें योजितां निराकारीं । कोंडणी मानी आपणातें ।। १९ ।। ह्मणोनि योजितां चित्त । योजिलें न राहे अत्यंत । तें पुनःपुन्हा योजितां त्यांत । थारों लागे हळुहळू ।। ४२० ।। जैसी राजपत्नी नवोढा मनोरमा । मातृमुखें जाणोनि भर्तृमहिमा । बैसोनि अंकीं ही परमा । जाऊंच पाहे उठूनि ।।२१।। जों जों वाढे सलगी । तों तों अधिक थारे पलंगीं । गोडी घेतां अंगसंगीं । ढकलिली तरी ढकलेना ।। २२ ।। तैसें चित्त घडी घडी । अभ्यासीं घे स्वरूपाची गोडी । स्थिरत्व बाणतां न सोडी । अनुभव तो आनंदाचा ।।२३।। पोटीं इत्यादि भाव । धरूनि अभ्यास देव । विरक्तासही बोलोनि देवाधिदेव । स्थिति सुखानुभवें बोलतो दों श्लोकीं ।। २४ ।।

यत्रोपरमते चित्तं निरुद्धं योगसेवया ।
यत्र चैवात्मनात्मानं पश्यन्नात्मनि तुष्यति ॥ २० ॥
सुखमात्यंतिकं यत्तद्बुद्धिग्राह्यमतींद्रियम् ।
वेत्ति यत्र न चैवायं स्थितश्चलति तत्त्वतः ॥ २१ ॥

॥ टीका ॥ अगा जेथें निरोधिलें चित्त । उपरमातें असे पावत । ह्मणजे स्वरूपीं स्वरूपमय असे होत । जडवृत्तिस्मरण टाकूनी॥२५॥जेथें आत्मयाचकरूनी । चित्त आत्माकार होऊनी । आत्मयाचमाजी आत्मयातें लक्षूनी । संतोषतें॥२६॥जैसे नेत्र दीपेंच करूनी । दीपातें पाहती ज्या सदनीं । तें सदनही दिसेना नयनीं । देहादिप्रपंच तेव्हां ये रीती ॥२७॥ज्याकरितां दिसे देहादि जग । दोरीं दोराचकरितां जैसा भुजंग । त्या दोरेंच तो दोर पाहतां मग । भुजंग दृष्टीस दिसेना ॥ २८ ॥ या भावें ह्मणे भगवंत । कीं आत्मस्वरूपेंच आत्मयास चित्त । पाहे तेव्हां असे पावत । संतोषातें ॥ २९ ॥ कीं आत्माच दिसे अन्य कांहीं । जडप्रपंच भासत नाहीं । भाव कीं वृत्तिप्रवाहीं । चित्त नसे ते समयीं ॥४३०॥ अगा तें ह्मणावें सुख । जेथें वृत्तीचें दिसेना सुख । वृत्तिजडत्व तेथें दुःख । हें सुख तों आत्यंतिक त्या परतें ॥ ३१ ॥ आत्यंतिक शब्देंकरूनी । मनीं सामवेदश्रुतीतें धरूनी । आत्मसुखानुभव त्या वरूनी । सूचविला येथें॥ ३२ ॥ श्रुति ॥ यो वै भूमा तत्सुखं नाल्पसुखमस्ति । अथ यदल्पं तन्मर्त्यं तद्दुःखम् ॥श्रुत्यर्थ॥ भूमा ह्मणजे अनंत । सर्वथा न असे ज्यास अंत । जो ऐसा अनंत तोचि अत्यंत । सुख ह्मणावा ॥३३॥ ज्यास ह्मणावें अनंत । त्यासचि ह्मणावें अत्यंत । अत्यंतातेंच निश्चित । आत्यंतिक ह्मणावें ॥३४॥ अंत नसे त्यास संत । आणि वेद ह्मणती अनंत । आणि जें अतिक्रमूनि असे अंत । तें अत्यंत अनंत तेंचि या अर्थें ॥ ३५ ॥ ज्यास असे अंत । सुख नसे त्यांत । वृत्ति तितकी अंतवंत । अत्यंत तें जें असे अतिक्रमूनि त्यातेंही ॥ ३६ ॥ श्रुतिही ह्मणे कांहीं । जें अल्प त्यांत सुख नाहीं । अल्पीं त्या सुख नसोनि हीं । अल्प तें दुःख आणि नश्वर॥३७॥ एवं आत्मा सुखस्वरूप । चित्त जड अल्प दुःखरूप । त्यास विसरोनि सदा सकंप । कांपे वासनासमीरें ॥ ३८ ॥ वैराग्य आणि अभ्यास । दोहींकरूनि चित्तास । इतर वृत्तिस्मृतीनिरास । होतां समरसे आत्मत्वीं ॥ ३९ ॥ तेव्हां अनुभवा ये स्वरूप । तेंचि आत्मसुखानुभवरूप । जेव्हां चित्त होय निःकंप । दीप जैसा निर्वातीं॥४४०॥जडवृत्ति तितकी अंतवंत ।

अतिक्रमूनि ते सर्व अंत । असे तें सुख अनंत । अत्यंत ह्मणावें या अर्थें ॥ ४१ ॥ तें सुख अनंत परि निर्गुण । त्यांत नसे अनुभवाची खूण । अमृत गोड परि रसनेवीण । नेणे गोडी आपुली ॥ ४२ ॥ एवं चित्तवृत्ती-करूनी । सुख तें जाणावें तन्मय होऊनी । तें अत्यंतचि सुख ह्मणोनी । आत्यंतिक ह्मणावें त्या चित्तें ॥ ४३ ॥ या भावें ह्मणे हरी । कीं आत्यंतिक सुख यापरी । तें योगी जाणेल जेव्हां त्या उपरी । तत्त्वापासूनि तेव्हां च्यवेना ॥ ४४ ॥ सुखस्वरूपाची गोडी । लागतां चित्त त्यातें न सोडी । चंचलत्वादि सर्व खोडी । सोडी गोडी सुखाची लागतां ॥ ४५ ॥ तें सुख अतींद्रिय । कीं बुद्धि होतां तन्मय । त्या बुद्धीनें ग्राह्यही निश्चय । अगम्य इंद्रियां सुख तें ॥ ४६ ॥सुगंध पुष्पहार । परि अज्ञानें भासला सर्पाकार । निरसूनि दृष्टिभ्रमविकार । शुद्ध दृष्टीनें पहावा ॥ ४७ ॥ हारीं स्पर्शलें नेत्र । परि भ्रमें जालें भयाचें पात्र । बुद्धि स्पर्शोनि चिन्मात्र । भी इंद्रिय-भ्रमें जडत्वें त्या तेंचि ॥ ४८ ॥ सर्प भासला जरी हार । सुगंध सुख दे वारंवार । तथापि सर्पाकार । भय मागुती उपजवी ॥ ४९ ॥ तैसा आत्मा न विषय । आणि तोचि इंद्रियसमुदाय । विषयसुखही देऊनि भय । जड-त्वभासें उपजवी ॥ ५० ॥ सुख विषयभोगीं तेंची । जडीं सुखाची वार्ता कैंची । परि न कळतां शुद्ध खूण त्याची । दुःख उपजे जडत्वें ॥ ५१ ॥ भ्रम सर्पत्वाचा निरसे । तेव्हां तो हार दृष्टी दिसे । तैसा इंद्रियांस न असे । साक्षात्कार स्वरूपाचा ॥ ५२ ॥ दार्ष्टांतिकीं बुद्धि दृष्टांतीं दृष्टी । भ्रम इंद्रि-यें सर्प हे सृष्टी । भ्रमा इंद्रियांवेगळी होतां तुटी । अधिष्टान हार लक्षितां ते पावे ॥ ५३ ॥ बुद्धिग्राह्य तें अद्वय । आणि ह्मणे अतींद्रिय । त्याचा भावार्थनिर्णय । या प्रकारें ॥ ५४ ॥ आत्मा बुद्धीस दिसे । कोठें वेद बोलती ऐसें । कोठें मनास कोठें चित्तास दिसतसे । ऐसेंही बोलती ॥५५॥ अंतःकरण सत्त्व । त्यासचि चित्तमनबुद्धित्व । कोण्या एका सत्त्ववृत्तीस तत्त्व । कळावें न असे भेद अन्योन्य ॥ ५६ ॥ एवं योगभ्रंशाचें कारण । तोंच जों नसे सुखस्वरूपें स्वात्मस्फुरण । सुखनिश्चयें अंतःकरण । अनुभ-वितां नव्हे भ्रंश योगाचा ॥ ५७ ॥ अंतःकरण चिन्मय । तें सुखरूपीं सुख-चि होय । सुख तें हेंचि ऐसा निश्चय । करी तेव्हां त्यातेंचि बुद्धि ऐसें ह्मणा-वें ॥ ५८ ॥ ऐशा सुखें जरी निवाला । प्रारब्धभोग न सुटे त्याला । तो भोग सुखदुःखरूपें बोलिला । तऱ्ही न चळे हें वदे आतां या श्लोकीं ॥५९॥

॥ श्लोक ॥ यं लब्ध्वा चापरं लाभं मन्यते नाधिकं ततः ।
यस्मिन्स्थितो न दुःखेन गुरुणापि विचाल्यते ॥ २२ ॥

॥ टीका ॥ अगा लाधोनि स्वात्मसुख । देखे जरी विषयसुखाचें मुख । तरी स्वसुखाहूनि सुख आणिक । सुखपणें न मानी ॥ ४६० ॥ कीं इतर सुखाचा लाभ । गाभणा ज्यांत दुःखाचा गाभ । लाभ त्याचाच कीं जें स्वयंभ । आत्मसुख आत्मत्वें अनुभवी ॥ ६१ ॥ सुखभोगीं यापरी दुःखही प्राप्त जालें जरी । तें थोर दुःखही असेना कां परी । त्या सुखापासूनि तो चळेना ॥ ६२ ॥ कीं ज्या स्वात्मसुखीं स्थिति । पावला असे ब्रह्ममति । तो न चळे जरी अति । दुःख प्रारब्धें पावला ॥ ६३ ॥ ज्याचा महिमा ऐसा । त्या योगशब्दाचा अर्थ कैसा । तरी तो जाणावा ऐसा । ह्मणूनि बोलतो या श्लोकीं ॥ ६४ ॥

॥ श्लोक ॥ तं विद्याद्दुःखसंयोगं वियोगं योगसंज्ञितम् ।
स निश्चयेन योक्तव्यो योगो निर्विण्णचेतसा ॥ २३ ॥

॥ टीका ॥ अगा दोंचा जो योग । तो ह्मणावा योग । आतां चित्तचैतन्यसंयोग । हा तों असे आयता ॥ ६५ ॥ अगा रज्जु स्पर्शोनि दृष्टी । आधीं जेव्हां होत असे उटी । तेव्हां सर्प दावूनि कष्टी । करी द्रष्टा जो तयातें ॥ ६६ ॥ चित्ताची ऐसी वृत्ती । स्पर्शली आत्मयातें आयती । तरी दुःखरूपा वृत्ति स्फुरती । चित्तासि त्या ॥ ६७ ॥ अंतरीं चित्तचैतन्ययोग । वरी दुःखवृत्तीचा संयोग । त्या जडा दुःखवृत्तीचा वियोग । होतां योगचि आयता ॥ ६८ ॥ जडचैतन्यशोध । करितां चित्तास आत्मबोध । होतां करावा वृत्तिनिरोध । तोचि योग ऐसें बोले पतंजली ॥ ६९ ॥ पातंजलसूत्र ॥ ॥ योगश्चित्तवृत्तिनिरोधः ॥ टीका ॥ योगशास्त्र करणार । पतंजलि शेषावतार । तो योगाचा वदे हाचि प्रकार । कीं योग ह्मणजे निरोध चित्तवृत्तीचा ॥ ४७० ॥ चेतवणें चित्ताचें लक्षण । रहस्य जाणती हे विचक्षण । कीं आत्मस्वरूपें सचेतन । आपण होऊनि चेतवी सर्व वृत्ती ॥ ७१ ॥ ते त्याची पराक् वृत्ती । कीं सत्त्व धांवे रजतमाप्रती । त्याचीच प्रत्यक् वृत्ती । जे परतोनि पाहे स्वप्रकाशातें ॥ ७२ ॥ प्रत्यक्वृत्तिस्वरूप । पाहतांचि होय तद्रूप । कीं दृष्टि पाहूं लागे दीप । अन्य न देखे ते समयीं ॥७३॥ ज्या दीपप्रकाशेंचि नेत्र । पाहती पदार्थ चित्रविचित्र । ते पाहूं लागतां दीपमात्र । पदार्थ तेव्हां न दीसती ॥ ७४ ॥ चित्त न चेतवी जोंवरी ।

वृत्ति न चेतती तोंवरी । ते थारे स्वरूपीं जरी । वृत्तिनिरोधें सहजचि । ॥७५॥ विसरतां स्वरूपा । वृत्ति उठती त्या दुःखस्वरूपा । आत्मप्रतीति स्मृति तों सोपा । योग कीं वृत्ति न असती ॥७६॥ एवं जडवृत्तिसंयोग । तोचि अनादि दुःखभोग । त्या वृत्तीचा होतां वियोग । योग बाणे आयताचि ॥ ७७ ॥ ह्मणोनि जो दुःखसंयोग । त्याचा होतां वियोग । तोचि जाणावा योग । कृष्ण ह्मणे ॥ ७८ ॥ तो योग योगसंज्ञित । तो योजावाच निश्चित । विरक्त करूनि अत्यंत । सर्वत्रही चित्तातें ॥ ७९ ॥ 'निर्विण्णचेतसा' ह्मणोनि । वैराग्य बोले या शब्देंकरूनि । 'अनिर्विण्णचे-तसा' ऐसें ही या वचनीं । अकारयुक्तही पद होत असे ॥८०॥ तेव्हां अ-निर्विण्ण ह्मणजे अवैराग्य । तें प्रपंचीं ह्मणतां अभाग्य । प्रपंचीं वैराग्य तेंचि भाग्य । मोक्षसिंहासनीं बैसवी ॥ ८१ ॥ आतां प्रपंचीं वैराग्य । आणि आत्मयोगीं अवैराग्य । तेव्हां अवैराग्यशब्देंही भाग्य । कीं अनुराग चित्ता-स योगाचा ॥ ८२ ॥ एवं योगाची प्रीती । असेल ज्या शुद्धचित्तीं । त्या चित्तें हे योगस्थिती । आधीं आधीं साधावी ॥८३॥ आतां यानंतर श्लोक । तो कां बोले उत्तमश्लोक । त्याचें निमित्त विवेकी लोक । परिसोत आधीं ॥ ८४ ॥अष्टांगाचीं अष्ट अंगें । त्यांत सात वर्णिलीं श्रीरंगें । अनायासप्राप्ति-प्रसंगें । प्रत्याहार नाहीं बोलिला ॥ ८५ ॥ कीं स्वभक्त अथवा योगभ्रष्ट । त्यांस न लागती बहुत कष्ट । बाणे तयां समाधि स्पष्ट । न लागतां क्लेश अ-त्यंत ॥ ८६ ॥ आतां जे अव्यक्तोपासक । आणि योगाचे साधक । त्यांस द्वादशीं क्लेश अधिक । "क्लेशोधिकतरस्तेषां" ह्मणोनि बोलेल ॥८७॥ त्यांस त्यांचें चित्त । अनावर अत्यंत । प्रत्याहार त्यांकारणें भगवंत । बोलेल आतां एथूनी ॥८८॥ ह्मणोनि योगमहिमा बोलोनी । योग असावाच ह्मणोनी । बोलिला आतां जे संकल्प मनीं । ते आधीं टाकावे ह्मणतो या श्लोकीं ॥८९॥

॥ श्लोक ॥ संकल्पप्रभवान्कामांस्त्यक्त्वा सर्वानशेषतः ।
मनसैवेंद्रियग्रामं विनियम्य समंततः ॥ २४ ॥

॥ टीका ॥ अगा संकल्पापासूनि । जे कामसंस्कार बैसले मनीं । ते संकल्पापासूनि जाले ह्मणोनि । ह्मणावे काम ॥ ९० ॥ त्या सर्वां कामातें । टाकूनि मग त्या मनेंद्रियांतें । अत्यंत नेमावें जीं नानाविषयांतें । ध्यात होतीं मनीं निघोनी ॥९१॥ त्या सर्वां विषयांपासूनी । मनें त्या त्याइंद्रियांतें नेमूनी । आत्मस्वरूपीं योजूनी । कांहीं न चिंतावें ह्मणे या श्लोकीं ॥ ९२ ॥

॥ श्लोक ॥ शनैःशनैरुपरमेद्बुद्ध्या धृतिगृहीतया ।
आत्मसंस्थं मनः कृत्वा न किंचिदपि चिंतयेत् ॥ २५ ॥

॥ टीका । अगा आत्मस्वरूपीं मन । योजून आणिक चिंतन । कांहींच करूं नये जतन । करावें आत्मप्रत्ययातें ॥९३॥ तें न सोडी विषयचिंतन । परी असे बुद्धीआधीन । बुद्धीकरूनि तें मन । आत्मतत्त्वीं थारे ऐसें करावें ॥९४॥परि ज्या बुद्धीस कामना । ते कां आवरील तया मना । यालागीं अगा अर्जुना । बुद्धि वश करावी धारणेनें॥९५॥पदार्थ जो बुद्धीनें नसे देखिला । तो धारणेमध्यें न रेखिला । देखिला तेव्हां रेखिला । धारणेमाजी ॥ ९६॥ ज्याची होय ओळखी । ते धारणेनें बुद्धि रेखी । आत्मा कळतां त्यास लेखी । आत्मत्वें ॥ ९७ ॥ श्रवण मनन निदिध्यास । तिहीं-प्रकारें बुद्धीस । दृढ बसे संस्काररस । आत्मा ऐसा ह्मणोनी ॥ ९८ ॥ चिदात्माचि आत्मा हा निश्चय । जों जों करी तों तों तन्मय । होतां धारणा तेंचि होय । आत्मा प्रत्यगात्माच ह्मणोनी ॥ ९९ ॥ ऐशा धारणें-करूनी । जे बुद्धि असे निश्चय धरूनी । ते बुद्धि 'धृतिगृहीता' ह्मणोनी । ह्मणावी अगा ॥ ६०० ॥ त्या बुद्धीकरूनि उपरमों । हळू हळू पावावें गा पांडवोत्तमा । ह्मणजे योगावांचूनि इतर कामा । मनीं न धरणें सर्वथा ॥ १ ॥ एवं आत्मयाविना । कांहींच नलगे ऐसी भावना । तेंचि उपरमणें अर्जुना । ह्मणूनि सूचवी श्रीकृष्ण ॥ २ ॥ कीं बुद्धि जे धृतीकरूनी । आपणाकडे ओढोनी । घेतली विषयांतूनि काढूनी । हळू हळू उपरमावें त्या बुद्धीनें ॥ ३ ॥ पावोनि ऐशा उपरमातें । योगीं योजितां मनातें । आत्मस्वरूपीं बुद्धिवंतें । स्थिर करावें॥ ४ ॥ मन आत्मत्वीं करूनी स्थिर । चिंतूं नये कांहीं इतर । आत्मस्फुरण निरंतर । योगीं बाणे ऐसें करावें ॥५॥ बुद्धीनें उपरमावें । आणि मन स्वरूपीं स्थिर करावें । ऐसें बोले गहन भावें । श्रीकृष्ण एथें॥६॥ बुद्धीनेंचि उपरमावें । बुद्धीतेंचि कां स्वरूपीं न योजावें । हेंही घडे परंतु देवें । गहन भाव एथें सुचविला ॥ ७ ॥ कीं प्रपंचापासूनि उपरती । दुःख समजोनि भले धरिती । प्रपंचदुःख आत्माच सुख ये रीती । निश्चय करणें हेचि बुद्धी॥८॥ उपरमातें पावणें । तें ऐसें या बुद्धीच्या गुणें । तेंही सत्त्व आणि कल्पना करणें । तें मनही तेंचि सत्त्व ॥ ९ ॥ सत्त्व बुद्धी करितांचि निश्चय । तेंचि मन होतां कल्पनामय । सत्त्वकल्पना करीना तेव्हां होय । योगीं मन तें उन्मन ॥ ६१० ॥ यालागीं कमलनयन । उपरम

बुद्धीनें बोलोनि मन । स्वरूपीं योजावें आणि चिंतन । ह्मणे कांहीं करूं नये त्या योगीं ॥ ११ ॥कीं कांहीं कल्पना उठे । तरी समाधि सिद्ध तोही तुटे । कृष्णहृदयीं हा भाव दाटे । मुखें ह्मणे मन स्थिर करावें ह्मणोनी ॥ १२ ॥ तथापि हें मन । अभ्यासीं करूंच लागे कांहीं चिंतन । तरी राहोनि सावधान । प्रत्याहारें आवरावें ह्मणे या श्लोकीं ॥ १३ ॥

॥ श्लोक ॥ यतो यतो निश्चरति मनश्चंचलमस्थिरम् ।
ततस्ततो नियम्यैतदात्मन्येव वशं नयेत् ॥ २६ ॥

॥ टीका ॥ ज्या ज्या पदार्थीं मन । निघोनि करी चिंतन । योगियानें होऊनि सावधान । तेथें तेथेंचि आत्मत्वीं योजावें ॥ १४ ॥ आत्मप्रकाशाविना । कल्पना तों उठेना । तेथें तेथेंचि त्या मना । प्रत्यग्वृत्तीनें योजावें आत्मत्वींच ॥ १५ ॥ ज्या आत्मस्वरूपेंकरूनी । मन न निघे कल्पना कल्पूनी । त्या आत्मस्वरूपींच योजूनि । वश करावें आत्मत्वीं ॥१६॥ ज्या आत्मत्वीं राहूं लागलें । मन तेधवांचि वश जालें । तोंवरी अभ्यासीं प्राप्त जालें । करणें ऐसें ॥ १७ ॥ वश होतां तें मन । राहतां वृत्तीचें चिंतन । अनुभवा ये आनंदघन । जें सुख आत्यंतिक बोलिलें या मागें ॥ १८ ॥ मन होतां स्थिर । पूर्वोक्त सुख योगचतुर । कैसें पावतो हें सर्वेश्वर । बोलतो आतां या श्लोकीं ॥ १९ ॥

॥ श्लोक ॥ प्रशांतमनसं ह्येनं योगिनं सुखमुत्तमम् ।
उपैति शांतरजसं ब्रह्मभूतमकल्मषम् ॥ २७ ॥

॥ टीका ॥ अगा मन जेव्हां प्रशांत । ह्मणजे प्रकर्षें अतिशयें शांत । योगीं होतां सुख अत्यंत । अनुभवा येतें ॥ ५२० ॥ मन ऐसें ज्याचें प्रशांत । त्यास सुखलभ्य होतें अत्यंत । लक्षणें दोन्ही या श्लोकांत । त्या सुखाचीं भगवंत बोलतो ॥ २१ ॥ तें सुख ह्मणोनि उत्तम । दों प्रकारें सर्वोत्तम । उत्तमत्व त्याचें पुरुषोत्तम । बोलतसे ॥ २२ ॥ शांत जेथें रजोगुण । ह्मणतां सुचवी हें निपुण । कीं जेथें नसे इंद्रियांचा गण । तें सुख शांतरज ह्मणावें ॥ २३ ॥ जेथें इंद्रियें न दिसती । तेथें विषय कैंचे असती । सुखप्रतीति नुसती । बाणे जेथें ॥ २४ ॥ विषयेंद्रिययोगें । जें चित्सुख भोगावें जगें । विषयेंद्रियवृत्तिवियोगें । योगीं शांत रजसुख तेंचि ॥ २५ ॥ कीं होऊनि सर्पाकार । शैत्यसुगंधें पुष्पहार । दाखवूनि भयही अपार । दावित होता ॥ २६ ॥ तो मिथ्या सर्प गेला । पुष्पहारसा कळों आला ।

तेव्हां जो गळां घाली त्याला । भयरहित सुख होय तो हार॥ २७ ॥ रज-तमवृत्तियांगें । सुखविषय इंद्रियभोगें । संसारदुःख त्या वासनासंगें । सुख तरी तें आत्मसुख ॥ २८ ॥ जेथें नसे रज । तम तेथें नसे सहज । तें सुख ह्मणे शांत रज । संसारचक्रापलीकडे ॥ २९ ॥ अनुभविलें तें सुख । तो संसारचक्राचें न पाहे मुख । ऐसें सुचवूनि आणिक । लक्षण सांगे त्या सुखाचें ॥ ६३० ॥ कीं तें सुख अकल्मष । ह्मणजे नसे जेथें वृत्तिकल्मष । कीं उपजे दुःखाचें किल्बिष । जडवृत्तिरूपें ॥ ३१ ॥ जेथें वृत्ति न दिसती । जेथें रजतम न असती । तेथें सत्त्ववृत्ति नुसती । ब्रह्ममय ॥३२॥ तें हें सुख ह्मणोनी । बोलिलीं लक्षणें दोनी । ऐसीं सुखलक्षणें वदोनी । लक्षण बोलतो त्या योगियाचें ॥ ३३ ॥ कीं तो ब्रह्मभूत । ह्मणजे ब्रह्मचि जाला निश्चित । ज्यास हें सुख अत्यंत । अनुभवा आलें ॥ ३४ ॥ तो ब्रह्मचि केवळ । परी अनुभवीं असे सत्त्व निर्मळ । तें ब्रह्मीं ब्रह्म निखळ । होतसे समाधीमध्यें ॥ ३५ ॥ योग वाणला केवळ । सुख पावला निष्कळ । जाला मनुष्यजन्म सफळ । तें ह्मणतसे आतां या श्लोकीं ॥ ३६ ॥

॥ श्लोक ॥ युंजन्नेवं सदात्मानं योगी विगतकल्मषः ।
सुखेन ब्रह्मसंस्पर्शमत्यंतं सुखमश्नुते ॥ २८ ॥

॥ टीका ॥ टाकूनि जडचिंतन । योगी योजी सदा ऐसें मन । त्या योगीं कल्मषाचें दहन । जालें ज्याच्या ॥ ३७ ॥ सकल कल्मषाचें बीज । मूळवासना जे सहज । ते गेली ऐसें अधोक्षज । सुचवी एथें ॥ ३८ ॥ कीं ब्रह्मस्पर्शजनित । जें योगसुख अत्यंत । तें अनायासें त्याचें चित्त । अनुभवूं लागे ॥ ३९ ॥ वृत्तिनिरोध आयास । न करितां समाधि बाणे ज्यास । त्या ब्रह्मानुभवसुखें ज्यास । वासना कैंची ॥ ६४० ॥ ऐसा व्यतिरेक योग । जेथें जडवृत्तीचा वियोग । त्यातें ऐसा श्रीरंग । वर्णिता जाला एथवरी ॥ ४१ ॥ आतां यानंतर श्लोक । तो कां बोले उत्तमश्लोक । त्याचें निमित्त सुज्ञ लोक । परिसोत आधीं ॥ ४२ ॥ व्यतिरेक आणि अन्वय । ज्ञानाचें हें प्रकारद्वय । दोंहीपरी ब्रह्म अद्वय । कळे मुमुक्षूतें ॥ ४३ ॥ आधीं उदक ओळखावें । मग तें तरंगांत सर्वांत लक्षावें । आधीं व्यतिरेकें जाणावें । मग चराचरीं पाहावें तें सर्व ॥ ४४ ॥ ज्ञान दोंहीपरी आलें । तें दोंहीपरी पक्क पाहिजे जालें । याकारणें बोलणें लागलें । योगरीती ॥ ४५ ॥ त्यांत बोलिला हा योग एक । जो समाप्त होय पूर्वश्लोक ।

त्यास ह्मणावें व्यतिरेक । कीं वृत्तिवियोगें योग हा वर्णिला ॥ ४६ ॥ परंतु उघडूनि नेत्र । देखेल जेव्हां जग विचित्र । तेव्हां प्रपंच सर्वत्र । दिसों लागे साचसा ॥ ४७ ॥ हें तों योगींच अद्वैत । डोळे उघडितां दिसे द्वैत । तेव्हां न ह्मणवे निश्चित । जीवन्मुक्त त्यालाही ॥ ४८ ॥ यालागीं अन्वयसमाधी । जोंपर्यंत योगी न साधी । जीवन्मुक्त नव्हे जरी निरोधी । योगी व्यतिरेकी वृत्तीतें ॥ ४९ ॥ आणि पूर्वश्लोकीं श्रीपति । बोले जीवन्मुक्तस्थिति । योगाची तों बोलिला रीति । व्यतिरेक मात्र ॥ ५० ॥ हें संशयाचें स्थळ । कीं योगीं पावला ब्रह्म केवळ । डोळे उघडितां तोही कुशळ । प्रपंच सत्यत्वें देखेल ॥ ५१ ॥ जरी बाणला समाधिरसा । तरी कृतार्थ तो नव्हे ऐसा । कीं सर्वही आत्मया चिद्रसा । नाहीं चाखिलें ॥ ५२ ॥ या शंकेचा परिहार । हाच कीं योग द्विप्रकार । बाणला तरीच सर्वेश्वर । कृतकृत्यत्व त्याचें बोलिला॥५३॥ कीं "यतो यतो निश्चरति" । या श्लोकीं अन्वयाचीही रीति । दाविली परि विशद स्थिति । बोलिला नाहीं ॥५४॥ कीं जें जें कल्पी मन । तेथें तेथें आत्मचिंतन । करितां स्वरूपीं थारे हें साधन । वाटलें ॥ ५५ ॥ एवं व्यतिरेकयोग । वर्णिला जेथें वृत्तिवियोग । आतां अन्वययोग त्याचाच श्रीरंग । वर्णितसे या श्लोकीं ॥ ५६ ॥

॥ श्लोक ॥ सर्वभूतस्थमात्मानं सर्वभूतानि चात्मनि ।
ईक्षते योगयुक्तात्मा सर्वत्र समदर्शनः ॥ २९ ॥

॥ टीका ॥ एक आत्मा सर्वभूतीं । सर्व भूतें त्या आत्म्यांत असती । युक्तचित्त योगी तो ये रीती । ज्यास सर्वत्र समदर्शन ॥ ५७ ॥ श्लोकार्थ इतकाच रम्य । परि अन्वयज्ञानयुक्तिगम्य । कीं नाना वैषम्यांत साम्य । आत्मतत्वाचें ॥ ५८ ॥ शब्दांत दिसतें द्वैत । परि अंतरीं असे अद्वैत । यांतही सूचवी अनंत । कीं अन्वयज्ञानही ऐसेंच ॥ ५९ ॥ प्रपंच दिसे द्वैतरूप । परि असे अद्वैतमात्ररूप । कीं दृष्टीस विघरलें थिजलें तूप । रसनेस तों एकचि ॥ ६० ॥ आत्मा सर्वभूतीं । ह्मणतां आत्मा भूतें भिन्न दिसती । सर्वभूतें आत्मयांत असती । द्वैत एथें तैसेंचि दिसतें ॥ ६१ ॥ कीं सर्व घटीं आकाश । त्याच आकाशीं सर्व कलश । या दृष्टांतें लवलेश । ऐक्य घटा आणि आकाशा घडेना ॥ ६२ ॥ तैसेंचि उदकीं घट । उदक आंत बाहेर निपट । याही दृष्टांतें उत्कट । द्वैतचि दिसे ॥ ६३ ॥ कीं घट जळीं अनेक । आणि घट बुडवूनि उरलें उदक । दृष्टांत पाहतां वाटे कौतुक ।

पारि द्वैत साधलें अत्यंत ॥ ६४ ॥ एवं सुचवी ऐसें अच्युत । कीं जगीं द्वैतीं बाणे अद्वैत। तोचि अद्वैत वाखाणील निश्चित। द्वैतभास कीं या शब्दीं॥६५॥ कीं आत्मा सचराचरीं । जळ जैसें तरंगाभीतरी । चराचर त्यांत जैशा लहरी । एका जळांत॥६६॥ कीं प्रळयाचें जळ। त्यांत गारा जळाचि निखळ। गारा जळीं त्या गारांत केवळ । जळाचि तें ॥ ६७ ॥ गारांचें काठिणपण । दिसे उदकाहूनि विलक्षण । परी मृदु उदकाचि आपण । असे गारांत॥६८॥ कठिण होऊनि गारा । उदक न पावे विकारा । तैसा चराचराचा पसारा । सारा निर्गुण ब्रह्मचि ॥ ६९ ॥ प्रलयजलास नाहीं अंत । त्या जळीं गारा ही अनंत । सवे गारांत जें जळ तयांत । त्या गारा अवघिया ॥ ५७० ॥ आत्मा चराचरभूतीं । सर्व भूतस्थ ये रीती । आणि याचिपरि असती । सर्वभूतें आत्मयांत ॥ ७१ ॥ याही काळीं मेघधारा । समुद्रावरी वर्षतां गारा । त्या अपरा जळीं अपारा । बुडती जेव्हां ॥७२॥ तेव्हां सर्वा गारांतही । नसे जळावांचूनि कांहीं । त्या समुद्रीं गारा असोनिही नाहीं । द्वैत गाराजळास ॥ ७३ ॥ हे अद्वैताची स्थिति । वाणे त्यास अन्वययोग ह्मणती । अन्वयसमाधिनिष्ठ मती । त्या योगियाची ॥७४॥ द्वितीयाध्यायांत अर्जुन । ह्मणे स्थितप्रज्ञ समाधिसंपन्न । तो काय बोले कैसा वर्ते ऐसा प्रश्न । करितां उत्तरही तैसेंचि पावला ॥ ७५ ॥ एवं चाले बोले उठे बसे । तरी अन्वयसमाधि लागला असे । कीं जडचैतन्यऐक्यांत समरसे । मानस त्या योगियाचें ॥ ७६ ॥ या योगाविषयीं हा श्लोक । बोलिला एथें उत्तमश्लोक । जडचैतन्य दोन्ही एक । पाहे जेथें योगिराज ॥ ७७ ॥ ऐसा योगी विचक्षण । त्याच्या अनुभावें ईक्षण । आणि योगाचें लक्षण । कमलेक्षण वदे उत्तरार्धे ॥७८॥ उत्तरार्ध॥ "ईक्षते योगयुक्तात्मा सर्वत्र समदर्शनः"॥ ॥ टीका ॥ योगीं युक्त ज्याचा आत्मा । तो ह्मणावा योगयुक्तात्मा । एथें आत्मशब्दें परमात्मा । चित्त ह्मणोनि सचवी ॥ ७९ ॥ तंतु आणि पट । माती आणि घट । यांचा आयता योग निपट । आणि हेमालंकारांचा ॥५८०॥ दोंचा जो संयोग । तोचि ह्मणावा योग । एथें योगशब्दें प्रयोग । आत्मा आणि सर्वा भूतांचा ॥ ८१ ॥आत्मा सर्वभूतीं आयता । सोनें अलंकारीं तत्त्वता । न दिसती जैंवी नात्मसत्ता । हेम नग जैसे ॥ ८२ ॥ जळ आणि तरंग । यांचा आयता असे योग । त्या योगीं होतां दृष्टिसंयोग । जळ तरंगीं तरंग जळीं दिसती॥८३ ॥ तैसा आत्माच सकळ । परी चित्त

विषयभावें विकळ । तें त्या योगें निश्चळ । तो योगयुक्तात्मा ह्मणावा ॥ ८४ ॥ युक्तात्मा ह्मणजे युक्तचित्त । कीं आयत्या योगीं योजिलें चित्त । अर्थ हाचि यथार्थ निश्चित । ह्मणतां सर्वत्र समदर्शन ॥ ८५ ॥ सर्वत्र जें सम । त्याच समत्वीं दर्शन परम । सर्वत्र सम हा योगउत्तम । तेथें दर्शन ह्मणजे युक्तचि तत्त्व ॥ ८६ ॥ एवं व्यतिरेक योग । ज्या योगीं वृत्तीचा वियोग॰ हा अन्वययोगही श्रीरंग । वर्णी त्याचा ॥ ८७ ॥ व्यतिरेक समाधींत बैसे । तरी प्रारब्धीं शरीर असे । प्रपंचीं वर्ततांही गवसे । आत्माच सर्वत्र ॥ ८८ ॥ तरी त्या योगाचा अभ्यास जैसा । अभ्यास याचाही करी तैसा । तरीच वर्ततांही तोचि ठसा । गवसे चित्तीं ॥ ८९ ॥ व्यतिरेकयोगीं प्रत्याहार । वर्णितां सूचविला हा प्रकार । मन परतावयाचा चमत्कार । दाविला जेथें ॥ ९० ॥ "यतो यतो निश्चरति" । या श्लोकीं श्रीपति । ह्मणे जें जें मन चिंती । तेथें तेथेंचि योजावें आत्मत्वीं ॥ ९१ ॥ एवं निरोधितां वृत्ती । अनावर होऊं लागती । तेव्हां कल्पूनि जगदाकृती । सर्वत्र आत्मा पहावा ॥ ९२ ॥ जरी अभ्यास ऐसा असे । तरी कल्पनेंत आत्मा गवसे । मागुती मन स्वरूपीं समरसे । निरोधवृत्तीच्या मागुती ॥ ९३ ॥ या श्लोकीं देव । बोलिला जो सर्वात्मभाव । तो दोहीं परी देवाधिदेव । सूचवी योग ॥ ९४ ॥ करूनि चराचरध्यान । जडीं चित्स्वरूपाचें दर्शन । तरंगा देखूनि जीवन । पाहणें जसें ॥ ९५ ॥ किंबहुना आधीं जळ दिसे । तेव्हां तरंगाकार गवसे । ऐसा अनुभवाचा ठसा बैसे । पाहतां ये रीती ॥ ९६ ॥ योग ऐसा बाणे । तरी जडास आत्मत्वें जाणे । जगीं योगी शहाणे । वर्तती ऐसे ॥ ९७ ॥ तेव्हां आत्मा सर्वभूतां । आणि सर्वभूतें आत्मयांत दिसतां । इत्यादि गहनभावें श्रीपती । बोलिला हा श्लोक ॥ ९८ ॥ आतां यानंतर श्लोक । तो कां बोले उत्तमश्लोक । त्याचें निमित्त सुज्ञलोक । परिसोत आतां एथूनी ॥ ९९ ॥ व्यतिरेकयोगप्रसंगें । अन्वययोग वर्णिला श्रीरंगें । कीं जीवन्मुक्त अन्वययोगें । व्यतिरेकयोगेंही बोलावा ॥ ६०० ॥ एवं व्यतिरेकयोग वरा । साधला तरी अन्वययोग दुसरा । न साधे तों न ह्मणावें त्या नरा । जीवन्मुक्त ॥ १ ॥ जेव्हां अन्वययोगाविण । व्यतिरेकयोगेंचि नव्हे जीवन्मुक्तपण । तेव्हां अन्वययोगें निपुण । तोही तैसा ह्मणावा ॥ २ ॥ कीं होतां वृत्तिनिरोध । समाधींत बाणे व्यतिरेकबोध । तो योग न बाणतां जाला सिद्ध । अन्वययोग ॥ ३ ॥ यास तेव्हां जीवन्मुक्तपण । नसे ह्मणावें व्यतिरेकयोगसिद्धीविण । तेव्हां

दोहीं योगीं निपुण । तो जीवन्मुक्त बोलावा ॥ ४ ॥ आणि पाहतां श्रुती । दोन्ही योग स्वतंत्र दिसती । जीवन्मुक्तस्थिती । दोन्ही योगीं ॥ ५ ॥ ब्रह्मवल्ली उपनिषदीं । दोन्ही योग हे यजुर्वेदीं । बोलिले जे वदनारविंदीं । निवाले एथें श्रीकृष्णाच्या ॥ ६ ॥ व्यतिरेकयोगविषयकश्रुति ॥ "यतो वाचो निवर्तंते अप्राप्य मनसा सह ॥ आनंदं ब्रह्मणो विद्वान्न बिभेति कुतश्चनेति" ॥ श्रुत्यर्थ ॥ जेथूनि वाचा परतती । जेथें न पावती मनोवृत्ति । ऐसी जे व्यतिरेकयोगस्थिति । त्या स्थितींत अनुभव निजानंदाचा ॥७॥ ऐसा ब्रह्मानंद ज्याला । व्यतिरेकयोगीं अनुभवा आला । कोणापासूनिही त्याला । भय नसे ॥ ८ ॥ ह्मणोनि ह्मणे श्रुति । कीं भिईना कोणास कोणे रीती । हे व्यतिरेकयोगस्थिति । ब्रह्मवल्लींत ।।९ ॥ त्याच ब्रह्मवल्लींत । अन्वययोगही बोलिला निश्चित । ती श्रुतिही या प्रसंगांत । वाखाणावी ॥ १० ॥ श्रुति ॥ "विज्ञानं ब्रह्म चेद्वेद तस्मांचेन्न प्रमाद्यति ॥ शरीरं पाप्मनो हित्वा सर्वान्कामान्समश्नुते"॥ ज्ञान तें शुद्ध ज्ञान । विशिष्ट ज्ञान तें विज्ञान । अलंकाररूपें विशिष्टपण । जैसें सुवर्णासी ॥ ११ ॥ एवं ज्ञानशब्दें ब्रह्म केवळ । जैसें उदक निश्चळ । तरंगाकार जैसें जळ । विश्वाकार ब्रह्म विज्ञान ॥ १२ ॥ व्यतिरेकें ब्रह्म परम । कळलें ज्ञान तें सुगम । समजोनि उमजणें विज्ञानब्रह्म । दुर्गम अत्यंत ॥ १३ ॥ कीं नित्या नश्वरा एकपण । जडा चैतन्याची ऐक्यखूण । सत्य असत्य विरुद्धलक्षण । विरळ समजे हें ऐक्य ॥ १४ ॥ ब्रह्म अतींद्रिय । प्रपंच पंचेंद्रियमय । या द्वैतीं पाहे अद्वय । विरळ कोणी ॥ १५ ॥ याकारणें श्रुति ह्मणे । कीं विज्ञानब्रह्म जरी जाणे । तरी जाणे ह्मणतां ये खुणे । विरळ पावे ऐसें तात्पर्य ॥ १६ ॥ व्यतिरेकें आत्मा जाणे । त्यास तो नित्य हें सहजेंचि बाणे । कीं अनित्या जडाच्या विपरीत खुणें । पावोनि नित्यत्वें ओळखे आत्मयातें॥१७॥ जडास अनित्यत्व ऐसें प्रसिद्ध । तेव्हां नित्य चैतन्यास भेद सिद्ध । भेद सिद्ध होतां असिद्ध । अद्वैत जालें ॥ १८ ॥ आतां जड मिथ्या ह्मणोनी । असत्य द्वैत यावरूनी । बोलावें तरी शब्देंचिकरूनी । प्रपंचमिथ्यात्व साधेना ।.१९।। चोरटा आहे खरा । परि चोरी अंगीं न लावितां त्या नरा । ह्मणों जातां अरे चोरा । तुझा बाप चोरटा तो ह्मणेल ॥ ६२० ॥ ऐसें प्रपंचाचें जोंपर्यंत । न कळे मिथ्यात्व निश्चित । तोंवरी मिथ्या ह्मणतां स्ववेदांत । मिथ्या होतो न लागतां मिथ्यात्व ॥ २१ ॥ पटीं सर्वत्र तंतु दिसे ।

तेव्हां पटाचें मिथ्यात्व गवसे । घट तेव्हां मिथ्या भासे । कीं दृष्टि स्पर्शो मातीसी ॥ २२॥ तंतूवेगळा न निघे पट । मातीवेगळा न निघे घट । एवं तंतु माती पाहतां निपट । पट घट होती असत्य ॥ २३ ॥ एवं तंतूचि पट । मातीच घट । ब्रह्मचि ऐसें निपट । प्रपंचीं दिसे तरी मिथ्या प्रपंच ॥ २४ ॥ नसोनि ऐसा अनुभव । कोणी दाविती युक्तिवैभव । कीं जडीं नश्वरत्व स्वभावें । मिथ्या ह्मणावें या करितां ॥ २५ ॥ नश्वरत्वें जरी । मिथ्यात्व साधे तरी । सर्पभास रज्जूवरी । तैसें मिथ्या कां ह्मणावें ॥ २६ ॥ प्रत्यक्षास विरुद्ध । तर्क तितुका असिद्ध । उपजला मेला ह्मणतां सिद्ध । मिथ्यात्व कैसें होणार ॥ २७ ॥ पिता मेला ज्याचा । पुत्र आहे जीवंत त्याचा । तेव्हां साचाच होता मेलाही साचा । तरी पुत्र साचा दिसतसे ॥२८॥ वांझेस पुत्र झाला । वांझेचा पुत्र मेला । ऐसें कोणी नाहीं बोलिला । धरणीवरी ॥ २९ ॥ सत्य उपजला सत्य मेला । सत्य पुत्र आपला विऊनि गेला । दिसतसे प्रत्यक्ष त्याला । केंवि मिथ्या ह्मणावें ॥६३०॥ प्रत्यक्षीं रज्जु सत्य । प्रत्यक्षीं सर्प असत्य । ऐसें सिद्ध होतां अगत्य । प्रपंच मिथ्या बोलावा ॥ ३१ ॥ आतां ज्ञान जरी जालें । प्रपंच मिथ्यात्व कळों आलें । प्रारब्धें शरीर आहे उरलें । प्रपंच तोंवरी दिसतसे ॥ ३२ ॥ तरी एकाच दृष्टांतें करूनी । अनुभव न साधे ह्मणोनी । धातु विकल्पभेदेंकरूनी । प्रपंचमिथ्यात्व सामवेदीं बोलिलें ॥ ३३ ॥ कीं कळतां एक मृत्पिंड । मृण्मय पदार्थ कळती अखंड । नामें आणि विकार उदंड । सकळ मिथ्या ॥३४॥ ज्यास पाहिजे कनक । तो भूषणें न टाकी याचक । एक ब्रह्म भासे अनेक । जीवन्मुक्त कौतुकें हें पाहे ॥ ३५ ॥ रज्जु कळतां नसे भुजंग । ब्रह्म कळतां नसावें जग । तरी सोनें दिसोनिही दिसे नग । हा दृष्टांत घ्यावा ये स्थळीं ॥३६॥ ज्या दृष्टांत येतां भ्रम । निर्माण केला भुजंगम । तोच रज्जुदर्शनें गतभ्रम । होतां परिहरी सर्पातें ॥ ३७ ॥ अलंकार जाला हातें । हातेंचि मोडावें त्यातें । तैसें विश्व काळेंकरूनि होतें । नासतें काळेंचिकरूनी ॥ ३८ ॥ जों स्थितीचा काळ असे । तोंपर्यंत विश्व भासे । सोनें दिसोनिही नग दिसे । तैसें ब्रह्म दिसोनिही दिसे सर्व ॥३९॥ आणि मोडतां अलंकार । सोनें न मोडे निर्विकार । तैसें मोडे घडे चराचर । शाश्वत असे ब्रह्मत्व ॥ ६४० ॥ आतां घडे आणि मोडे । हेंही न लागे कनकाकडे । कीं कनकत्व त्याचें न बिघडे । दधिपणें बिघडे जैसें दुग्धत्व ॥ ४१ ॥ हे सुवर्णाची

शक्ती। घडे मोडे पावे नानाव्यक्ती। दृष्टांत एकदेशी तथापि युक्ती चढती तोंपर्यंत चढवाव्या ॥ ४२ ॥ एवं प्रपंच अनित्य। आणि ब्रह्म नित्य। प्रपंच मिथ्या ब्रह्म सत्य। तथापि ऐक्य दोंहीस ॥ ४३ ॥ कळल्या इत्यादि युक्ती। बोलका बोलिला ऐशा उक्ती। तरी न पावतो मुक्ति। जों अनुभव ऐसा होय ना ॥४४॥ कीं अलंकारीं उघडें हेम। तैसें चराचरीं उघडें ब्रह्म। दिसे तेव्हां ज्ञानी उत्तम। वाचाळ शब्दवादीच तोंवरी ॥४५॥ ऐसें ब्रह्म चित्स्वरूप। आणि जडप्रपंचरूप। या विपरीत लक्षणासही ऐक्यप्रताप। करी श्रीगुरूचा ॥ ४६ ॥ जेथें अधिष्टान सत्य। आणि विवर्त असत्य। दोंहीस ऐक्य मानावें अगत्य। कीं एक असे एक असेचिना ॥ ४७ ॥ विवर्त आणि अधिष्टान। इतुकेंचि दोंहींचें अनुसंधान। कीं स्वयें प्रकाशे स्वप्रकाशज्ञान। अधिष्टान ऐसें समजावें ॥ ४८ ॥ सूर्यप्रभा प्रकाशे स्वयें। मृगजळ त्याकरितां भासे निश्चयें। जितकीं परप्रकाशमयें। लटिकीं विवर्तें तीं जाणावीं ॥४९॥ सूर्यसत्तेनें दिसे मृगजळ। रज्जुसत्तेनें दिसे मृषा व्याळ। तरंगातें प्रकाशी जळ। सुवर्ण अलंकारातें प्रकाशीं ॥ ६५० ॥ तंतूवांचूनि पट। मातीवांचूनि घट। न दिसतां न असती निपट। जैसें मृगजळ तेजावांचूनी ॥ ५१ ॥ तैसें आत्मसत्तेविण। कोणत्या जडें जाणावें जड कवण। चिदधिष्टानीं विवर्तपण। ऐसें जडाचें ॥ ५२ ॥ एवं जितकें जडाचें रूप। तितकें असे स्वात्मस्वरूप। इंद्रियदृष्टीस विघरलें थिजलें तूप। बुद्धिरसनेस रस एक ॥ ५३ ॥ परंतु माती घटीं उघडी। ऐसी आत्मसत्ता दिसे जडीं। तेव्हां या अनुभवीं बुडी। चित्त दे ॥ ५४ ॥ हें अवघें युक्तिजाळ। गुरुकृपेनेंचि होय सफळ। तोंपर्यंत अत्यंत अकळ। जडीं देखणें चित्स्वरूप ॥ ५५ ॥ सर्वत्र तंतु उघडा पटीं। दिसे माती उघडी घटीं। हे किल्ली असे पोटीं। गुरुकृपेच्या ॥५६॥ श्रुतींत "विज्ञानं ब्रह्म चेद्वेद"। हें या तात्पर्यें बोले वेद। कीं बहुत जाणती जडचैतन्यभेद। विरळ जाणे उभयऐक्य ॥५७॥ एवं विश्वरूप ब्रह्म। हें विज्ञानब्रह्म परम। 'चेद्वेद' म्हणजे जरी जाणणें हें दुर्गम। अन्वयज्ञानविज्ञान ॥५८॥ ऐसें अकळही कळलें। आणि त्यानीं चित्त नाहीं वळलें। तें कळोनिही खवळलें। जड जग यथापूर्व मानूनी ॥५९ ॥ म्हणूनि म्हणते श्रुति। कीं "तस्माच्चेन्न प्रमाद्यति"। म्हणजे जरी त्यापासूनि मागुती। चित्त विस्मृतीतें पावेना॥६६०॥ विज्ञान ब्रह्म जाणे। जरी जाणोनिही त्या खुणे। न विसरे तरी मुक्ति वाणे।

शरीर असतांही जीवंत ॥ ६१ ॥ एवं कठिण अन्वयज्ञान । जाणणें विश्वरूप ब्रह्मविज्ञान । तैसेंचि जाणोनि करणें जतन । कठिण अत्यंत ॥६२॥ हेंही ऐसें जाणे । जाणोनिही जरी अखंडता बाणे । तरी शरीर असतांचि तो मुक्त ह्मणे । हे श्रुति ऐसी ब्रह्मवल्लीची ॥६३॥ कीं अज्ञान गेलियावरी । जीवन्मुक्तीस इतुकीच उरी । कीं विषयभोगीं काम करी । भ्रमसंस्कारशेषें पहिलिया ॥ ६४ ॥ सकळ पापाचें बीज । न कळणें स्वस्वरूप सहज । तें कळलें असोनिही आत्मत्व निज । विरस पाडी हा काम ॥६५ ॥ एवं पापी ह्मणावें या कामा । श्रुति यास्तव यास ह्मणे पाप्मा । तृतीयाध्यायीं याच अधमा । पाप्मा ह्मणे श्रीकृष्णही॥६६॥"पाप्मानं प्रजहि ह्येनं" ह्मणोनी । या कामातेंचि या गीतावचनीं । कृष्ण ह्मणे हृदयीं धरूनी । या श्रुतीतेंचि॥६७॥ तृतीयाध्यायश्लोकार्ध । "पाप्मानं प्रजहि ह्येनं ज्ञानविज्ञाननाशनम्"॥ टीका ॥ पाप्मा पापी हा काम । जो ज्ञानविज्ञान नाशी अधम । मारीं हा पापी परम । पाप्मा ह्मणोनि ज्याला श्रुति ह्मणे ॥६८॥ एवं ज्ञान व्यतिरेक ज्ञान । अन्वय ज्ञान तें विज्ञान । काम पाप्मा उभयनाशन । गीता ह्मणे ॥ ६९ ॥ ऐसी गीता आणि श्रुती । पाप्मा या कामास ह्मणती । श्रुति ह्मणे जीवन्मुक्तीप्रती । पावे मारूनियां पापी या कामातें ॥६७०॥ तरी दुःखाची निवृत्ति । आणि नित्यसुखाची प्राप्ती । ते ह्मणावी जीवन्मुक्ति । कैवल्यांतही नसे हा लाभ ॥ ७१ ॥ कीं आनंदमात्र ब्रह्म । परी तें निर्गुण शुद्ध निर्धर्म । तें अनुभवा येणें हाही धर्म । शुद्धसत्त्वाचा ॥ ७२ ॥ अमृत आपलें अमृतपण । नेणे तैसें सुख निर्गुण । सत्त्वें त्याच्या अनुभवाची खूण । जीवन्मुक्तास कीं वैकुंठवासियास ॥ ७३ ॥ एवं ज्ञानही जालें जयास । हा पापी काम त्यास । येऊं नेदी विलास । जीवन्मुक्तिवैभवाचे ॥ ७४ ॥ परी जरी हें विज्ञानब्रह्म । जाणे आणि बाणे परम । तरी या पापिया कामातें मारूनि उत्तम । ब्रह्म सुख पावे शरीर असतांही ॥ ७५ ॥ काम टाकिल्याविण । अनुभवा नये ज्या सुखाची खूण । श्रुति त्या सुखाचें लक्षण । बोलतसे ॥ ७६ ॥ "सर्वान्कामान्त्समश्नुते ह्मणोनी । श्रुति या सर्व कामशब्देंकरूनी । परमानंद सूचवूनी । बोलतसे ॥ ७७ ॥ कीं होती जे जे कामभोग । ते ते दाविती सुखाचे योग । परी कामतृप्त नव्हे कीं संयोग । अपेक्षी आणखी कामभोगाचा ॥ ७८ ॥ ज्यास हें स्थावर जंगम । अवघेंचि विज्ञानब्रह्म । कळलें बाणलें त्यास काम । कांहीं न उरला ॥ ७९ ॥ कीं

अभ्यासबळें काम । टाकिला बाणलें विज्ञानरूप ब्रह्म । त्यास अवघें स्थावरजंगम । सुखचि जालें ॥ ६८० ॥ यालागीं कामभोग । जे असतील त्या सर्वांचा संयोग । त्यास जाला बाणतां योग । विज्ञानब्रह्मस्वात्मतेचा ॥ ८१ ॥ एवं अन्वययोगेंचिकरूनी । जीवन्मुक्ति सिद्ध जाली यावरूनी । आणि "यतो वाचो निवर्तंते" ह्मणोनी । हे श्रुति व्यतिरेकयोगें हें बोले ॥८२॥ "यतो वाचो निवर्तंते" हे श्रुती । ह्मणे मन वाचा चारी जेथें परतती । जो जाणे त्या ब्रह्मानंदाप्रती । तो भीना मग कवणास ॥ ८३ ॥ एवं भयापासूनि मुक्त । तोही ह्मणावा जीवन्मुक्त । तेव्हां व्यतिरेक योगमात्रेंचि युक्त । तोही जीवन्मुक्त बोलावा ॥ ८४ ॥ या योगातेंही स्वतंत्रपण । ऐसें असोनि कमलेक्षण । पूर्वश्लोकीं अन्वययोगेंचि खूण । जीवन्मुक्ततेची कां वदे याचीही ॥ ८५ ॥ ऐसा हा संशय । ज्यास सहाय श्रुतिसमन्वय । या संशयनिरासें निर्णय । करूं पाहे श्रीकृष्ण ॥ ८६ ॥ कीं चित्तास वृत्तीचा वियोग । तो बाणला जरी व्यतिरेकयोग । भोगितां प्रारब्ध जग । जड दिसेल अन्वययोगावांचूनी ॥ ८७ ॥ व्यतिरेकयोग ऐसा । त्याच योगें जीवन्मुक्त कैसा । जडा तरंगांत चिद्रसा । न देखे जोंवरी ॥ ८८ ॥ यालागीं अन्वययोगाविण । व्यतिरेकयोगेंचि न घडे जीवन्मुक्तपण । ह्मणोनि व्यतिरेकयोगनिपुण । जीवन्मुक्त अन्वययोगेंचि बोलिला ॥ ८९ ॥ आतां "यतो वाचो निवर्तंते"। हे श्रुति फळ जें बोलते । तेथें पुनर्जन्मनिवृत्ति होते । परी जीवन्मुक्ति त्याचयोगें साधेना ॥ ६९० ॥ व्यतिरेक आणि अन्वययोग दोन्ही । एकही बाणतां या दोहींमधूनी । मुक्त निश्चयें ह्मणोनी । जन्ममरणास तो भीना श्रुति ह्मणे ॥ ९१ ॥ कीं ज्ञान झालियाउपरी । चित्तनाश नोहे जोंवरी । पुन्हा गर्भत्रास उदरीं । होणारचि त्याला मातेच्या ॥ ९२ ॥ त्या चित्तनाशास हे दोन्ही । उपाय असती ह्मणोनी । योगवासिष्ठीं वसिष्ठमुनी । बोले श्रीरामातें दों श्लोकीं ॥ ९३ ॥ योगवासिष्ठ श्लोक । "द्वौ क्रमौ चित्तनाशाय योगो ज्ञानं च राघव । योगो वृत्तिनिरोधो हि ज्ञानं सम्यगवेक्षणम् ॥१॥ असाध्यः कस्यचिद्योगो कस्यचि ज्ज्ञाननिश्चयः । प्रकारौ द्वौ ततः साक्षाज्जगाद परमः शिवः ॥२॥" ॥ टीका ॥ दोन क्रम चित्तनाशाचे । अगा राघवा बोलिले साचे । एक योग एक ज्ञान ऐसें स्ववाचे । परम शिव वदला ह्मणे वसिष्ठ ॥ ९४ ॥ त्यांत योग ह्मणजे वृत्तिनिरोध । ज्ञान ह्मणजे अन्वयबोध । सम्यगवेक्षण शब्दाचा शोध । करितां अन्वय-

योग सिद्ध होतो ॥ ९५ ॥ कीं सम्यगवेक्षण ह्मणजे बरें निरीक्षण । बरें पाहणें याचें लक्षण । ये रीतीचें ॥९६ ॥ कीं एकास वस्त्र दाखवूनी । पुसावें काय आहे ह्मणोनी । आणि ह्मणावें कीं बरें अवलोकूनी । हें काय आहे तें सांग ॥ ९७ ॥ तो ह्मणेल वस्त्रमात्र । आहे हें बरें पाहती माझे नेत्र । हें वस्त्रचि आहे संदेहमात्र । नसे अवलोकनांत या माझ्या ॥ ९८ ॥ तंतुच आहे हे खूण । न कळे सत्य मानी पटपण । त्यास कैंचें सम्यगवेक्षण । कीं तंतु दिसोनिही न दिसे जयाला ॥ ९९ ॥ वस्त्राभावें पाहणार । त्यांतही दोन प्रकार । एक पांचा वर्षांचा कुमार । एक तरुण शाहणा ॥ ७०० ॥ तंतूचा रचला पट । हें कुमार नेणे निपट । तंतु विसरोनि शहाणाही निपट । सम्यगवेक्षण करीना ॥ १ ॥ पटांत तंतु जैसा । सर्वभूतीं आत्मा तैसा । ज्यास नसेत्र बोध ऐसा । तो या ज्ञानमार्गी ह्मणावा बाळक ॥२॥ गुरुमुखें समजोनिही व्यतिरेक । अन्वय समजला अनेकीं एक । आणि न पाहे हें अद्वैतकौतुक । ध्यान न करी सर्वात्मकत्वें ॥ ३ ॥ तोही न ह्मणवे निपुण । कीं कळोनिही न करी सम्यगवेक्षण । ह्मणजे बरें न करी निरीक्षण । कीं आत्मतंतु जडपटीं पाहेना ॥ ४ ॥ तंतूचा पट हें जाणे तरुण । परी पट मिथ्या ऐसी न धरी खूण । त्यासही नसे सम्यगवेक्षण । जे रीतीं ॥ ५ ॥ वस्त्र दावूनि त्याप्रती । हें काय दिसतें ह्मणोनि जे पुसती । तो त्यास ह्मणेल,बरविये रीती । म्यां पाहिलें परी असे हें वस्त्रचि ॥ ६ ॥ तंतूवांचूनि वेगळा पट । काढितां नसेचि कांहीं निपट । तरी पट नाहीं तंतुच आहे ऐसें नीट । न सांगे कीं सम्यगवेक्षण असेना ॥ ७ ॥ एवं कळोनिही अन्वयज्ञान । विश्वरूप ब्रह्मविज्ञान । एकाग्रचित्तें करी ध्यान । सम्यगवेक्षण त्याला ह्मणावें ॥ ८ ॥ एवं चित्तनाशास उपाय दोनी । प्रस्तुतीं बोलिला वसिष्ठमुनी । एक योग एक ज्ञान ह्मणोनी । त्यांत हें विवरण ज्ञान शब्दाचें ॥ ९ ॥ कीं ज्ञान ह्मणजे सम्यगवेक्षण । सम्यगवेक्षणाचें हें निरूपण । कीं जडीं चिदात्मनिरीक्षण । बरविया प्रकारें ॥ ७१० ॥ दोहींपरी चित्तनाश । कीं दोहींपरी स्फुरे एक आत्मप्रकाश । तोंवरी चित्त जोंपर्यंत लेश । स्फुरतसे चित्तीं जडत्वाचा ॥ ११ ॥ कीं चित्त चेतवी मन । तें करी जडविषयचिंतन । चित्तीं राहे अनुसंधान । जडत्वाचें ॥ १२ ॥ व्यतिरेकयोगीं चित्त । मुरे आत्मस्वरूपीं अत्यंत । अन्वययोगीं सर्वत्र निश्चित । आत्मा देखे तरंगीं जैसा समुद्र ॥ १३ ॥

आत्मप्रकाशेंकरूनी । जडास चेतवी ह्मणूनी । चित्त ह्मणावें जों असे विसरोनी । आत्मसत्ताप्रकाशातें ॥ १४ ॥ व्यतिरेक योगीं जड कांहीं । आत्मस्वरूपीं दिसत नाहीं । अन्वययोगीं चराचर ही । आत्माच वाटे ॥ १५ ॥ दोहींपरी ऐसें पाहे । तों चित्तचैतन्यचि होऊनि राहे । एवं चित्त ह्मणणें न साहे । दोहीं योगीं यापरी ॥१६॥ चित्तनाशें मुक्ति ह्मणूनी । एका श्लोकें वसिष्ठ मुनी । बोलिला हे प्रकार दोनी । श्रीरामचंद्रा जगद्गुरूतें ॥ १७ ॥ चित्तनाश प्रकार दोनी । एकही साधे जरी दोहींमधूनी । तरी चित्तनाश ह्मणोनी । वसिष्ठ ह्मणे ॥ १८ ॥ कीं स्वरूपीं चित्तास जों वृत्तीचा वियोग । कोणास हा व्यतिरेकयोग । असाध्य आणि आत्मभावें जग । पाहणें असाध्य कोणासी ॥ १९ ॥ कोणास व्यतिरेकयोग सिद्ध । त्यास अन्वययोग न असे सिद्ध । कोणी अन्वययोगीं प्रबुद्ध । व्यतिरेक योग असाध्य त्यालागीं ॥ ७२० ॥ एवं या दोहींमधूनी । चित्तनाश भलत्या एका योगेंकरूनी । ह्मणूनि बोलिले वसिष्ठमुनी । ऐसेंच श्रुतीही बोलते ॥२१॥ "यतो वाचो निवर्तंते"ह्मणोनी । श्रुति या व्यतिरेकयोगेंकरूनी । या योगाचा अनुभवी कोणापासूनी । भय न पावे ह्मणतसे॥ २२ ॥ व्यतिरेकयोगीं चित्त । नाश पावलें निश्चित । तेव्हां मोक्ष त्याला हस्तगत । मग तो निर्भय कां नव्हे ॥ २३ ॥ परंतु विज्ञानब्रह्मयोगश्रुती । शरीर असतां जीवन्मुक्ती । अन्वययोगें बोले ऐसी उक्ती । व्यतिरेकयोग श्रुति वदेना ॥ २४ ॥ कोठें व्यतिरेकयोगीं । वर्णूनीही त्यालागीं । जीवन्मुक्ति वर्णिली जगीं । तरी अन्वययोगही त्यास असेल जाणावें ॥ २५ ॥ कीं तोचि जीवन्मुक्तयोगी । कीं पटीं तंतु तैसा आत्मा जगीं । देखोनी वर्ते त्याचिलागीं । जीवन्मुक्तपदवी बोलावी ॥ २६ ॥ याचि भावें भगवंत । व्यतिरेकयोग आधीं या अध्यायांत । बोलोनि शेवटीं अत्यंत । अन्वय त्यातेंचि बोलिला ॥ २७ ॥ कीं अन्वययोगावांचूनी । द्वैतदर्शन घडे ह्मणोनी । अन्वययोगेंचिकरूनी । जीवन्मुक्तत्व व्यतिरेकयोगियातें ही ॥ २८ ॥ यालागीं "सर्वभूतस्थमात्मानं" ह्मणोनी । या पूर्वश्लोकेंकरूनी । व्यतिरेकयोगही बोलोनी । वर्तणूक अन्वययोगें बोलिला ॥ २९ ॥ तों संशय उपजला या भागीं । कीं व्यतिरेकसमाधिसंपन्न योगी । जाला तरी पाहिजे तयालागीं । अन्वययोग जीवन्मुक्तीकारणें ॥ ७३० ॥ तेव्हां अन्वययोगनिपुण । ज्यास बाणेल सर्वात्मखूण । त्यानेंही व्यतिरेकयोगप्रवीण । जालें पाहिजे ॥३१॥

कीं त्यास अपेक्षा याची । तेव्हां यासही अपेक्षा असेल त्याची । आणि वेदवाणी तों योगद्वयाची । प्रशंसा स्वतंत्रत्वें बोलते ॥ ३२ ॥ शंका ऐसी उपजली । तों वेदांची पाहतां बोली । वसिष्टादि मुनिमतें सिद्ध जाली । मुक्ति दोहींत एका योगेंकरूनीही ॥ ३३ ॥ परी जीवन्मुक्तिदशा श्रुती । अन्वययोगियांतेंचि बोलती । आणि पाहतां अनुभवाची ही रीति । द्वैत न दिसे अन्वययोगियांतेंचि ॥ ३४ ॥ श्रुति युक्ति इत्यादि कोटी । श्रीकृष्ण धरूनि आपुले पोटीं । या दों श्लोकीं ह्मणे अगा किरीटी । थोर अन्वययोग दोहींत ॥ ३५ ॥ पोटीं ऐसा भाव । तों दों श्लोकीं देवाधिदेव । ह्मणतो व्यतिरेकयोगावांचूनिही स्वयमेव । स्वतंत्र अन्वययोग जीवन्मुक्तीस ॥३६॥ आणि योगीं प्रवर्तला । तो कोणी नाहीं परतला । ह्मणूनि बोलतो या बोला । प्रथम या श्लोकीं ॥ ३७ ॥

॥ श्लोक ॥ यो मां पश्यति सर्वत्र सर्वं च मयि पश्यति ।
तस्याहं न प्रणश्यामि स च मे न प्रणश्यति ॥ ३० ॥

॥ टीका ॥ अगा मातें पाहे सर्वत्र । आणि मजमाजीं हें सर्व विचित्र । पाहे हा योगारंभमात्र । जो करी ॥ ३८ ॥ तो योगारूढ नसे जरी जाला । योगभ्रंश न घडे कदापि त्याला । कीं मी मग त्या योगियाला । अंतर नेदीं कदापी ॥ ३९ ॥ जो ऐसें पाहों लागला । मी अंतर नेदीं कदापि त्याला । आणि तो न सोडी मजला । अगा कदापी ॥ ७४० ॥ श्लोकार्थ इतकाचि परी । कोणी ह्मणतील याउपरी । कीं आत्मा देखेल चराचरीं । तो योगारूढचि बोलावा ॥४१॥तरी जेव्हां योगारूढचि जाला । अंतर न देणें काय-उरलें तयाला । मग अवकाश न दिसे या बोला । कीं मी अंतर नेदीं तयातें ॥ ४२ ॥ कीं आत्मत्वें जगीं । जो पाहे कृष्ण जगदात्मयालागीं । तो कृष्ण जाला योगी । त्यास न सोडी हेंही अपूर्व काय ॥४३॥ यालागीं योगारूढ बरवा । हा योगी न वाखाणावा । कीं योगारूढ तेव्हां ह्मणावा । जेव्हां अखंडता वाणे या अनुभवाची ॥ ४४ ॥ कीं जडत्व न दिसे कांहीं । किंबहुना जड कांहींच नाहीं । या अखंडतेनें विदेही । देह धरूनि जो वर्ते॥४५॥ आणि सर्वत्र भगवंत । त्या भगवंतीं सर्वभूतें निश्चित । भूतें भगवंत ऐसें द्वैत । देखोनि अद्वैत जो पाहे॥४६॥त्यास एथें ये रीती । त्याचा अनुभव दावूनि विश्वपती । वर्णी कीं योगारूढ स्थिती । नसे अद्यापि हा भाव ॥४७॥ एवं योगाचा अभ्यासक । सिद्ध नव्हे हा साधक । परी अद्वैतभजन आत्यंतिक । घडों

लागलें या योगीं ॥ ४८ ॥ आणि हा ज्ञानी । सर्वात्मयोगीही होऊनी । अभ्यास करितां लागला भजनीं । सगुणाचिया ॥ ४९ ॥ कीं जे निर्गुणाचि ध्याती । त्यांस व्यतिरेकयोगींच अत्यंत रती । जे ज्ञानी सगुण भजती । त्यांस आवडी अन्वययोगाचीच अत्यंत ॥ ७५० ॥ अत एव पूर्वश्लोकें करूनी । "सर्वभूतस्थमात्मानं" ह्मणोनी । आत्मदर्शनचि बोलोनी । या श्लोकें मातें सर्वत्र जो पाहे ह्मणतसे ॥ ५१ ॥ कीं आत्मा सर्वत्र दिसे । तोचि आत्मा सगुणपरमात्मा असे । ऐसी सर्वभूतीं समरसे । भक्ति माझी हा भाव ॥ ५२ ॥ "वासुदेवः सर्वमिति" । सप्तमाध्यायांत श्रीपती । बोलेल आणि अष्टादशाध्यायाचे अंतीं । भक्तिरहस्य हेंचि बोलेल ॥५३॥ "ब्रह्मभूतः प्रसन्नात्मा" या श्लोकीं । श्रीकृष्ण अष्टादशीं बोलेल कीं । ब्रह्म जालाच तरी या लोकीं । तो सम सर्वभूतीं मद्भक्ति पावतो॥५४॥ "समःसर्वेषु भूतेषु ह्मणोनी ।"मद्भक्तिं लभते परां"ह्मणे यावरूनी । भक्ति थोर सर्वात्मकज्ञानीं । हा सिद्धांत गीतांतीं स्थापिला ॥ ५५ ॥ द्वादशीं "अनन्येनैव योगेन मां ध्यायंत उपासते" ऐसें स्ववचन ।बोलोनि तेषामहं समुद्धर्ता' 'कमलनयन । ऐसेंही बोलेल ॥ ५६ ॥ तो हा अन्वययोग । कीं मातें सर्वत्र पाहे आणि सर्व जग । मजमाजि पाहे भक्तियोग । सुचवी ऐसा या श्लोकीं ॥ ५७ ॥ पूर्वश्लोकीं आत्मा सर्वत्र । पाहे आणि आत्मयांत जग विचित्र । पाहे ह्मणे कमलनेत्र । भाव दावी निर्गुणीं ॥ ५८ ॥ तोही अन्वययोगी । परी जो न भजे सगुणालागीं । तो व्यतिरेकनिष्ट त्याचें जगीं । जीवन्मुक्ति अन्वययोगें वर्णिली ॥ ५९ ॥ तो स्वयत्नेंचि तरणार । ह्मणोनि त्याचा मी उद्धरणार । त्यास मी न अंतर देणार । ऐसें न ह्मणे ॥ ७६० ॥ कीं मी कल्पवृक्षस्वभाव । सर्वसम देवाधिदेव । जो जैसा धरी भाव । फळ तैसें देतसें तयासी ॥६१॥"ये यथा मां प्रपद्यंते" ह्मणोनी । हा निर्णय चतुर्थाध्यायांत करूनी । एकदां बोलिला त्यावरूनी । ज्ञानी सगुणभक्त सुचविला या श्लोकीं ॥६२॥ कीं "तस्याहं न प्रणश्यामि"। ह्मणजे त्यास अदृश्य न होणार मी । यावरूनी सूचवी जगत्स्वामी । कीं ज्ञानी योगी सगुणोपासक ॥ ६३ ॥ कीं जरी तो भजे मातें । मी अदृश्य नव्हे तयातें । हें न ह्मणे निर्गुणोपासकातें । कीं दयालुत्वधर्म न असती निर्गुणत्वीं ॥ ६४ ॥ मीच असें निर्गुण । परी तेथें नसे दयालुत्व गुण । देयकरितां सगुणपण । अवलंबावें लागतें ॥ ६५ ॥ तें सगुणपण जरी । त्या निर्गुणोपासका दाऊं तरी । विषमता रोकडी मजवरी ।

स्थापेल॥६६॥जो भजे जैसा । मी प्रगटतों त्यास तैसा । तरीच विषमत्वाचा ठसा । मजवरी बैसेना ॥ ६७ ॥ एवं सगुणभक्तयोगियास । न लगती योगसिद्धीआयास । इत्यादि भावें तयास । गौरवूनि बोलतो आतां या श्लोकीं ॥ ६८ ॥

॥ श्लोक ॥ सर्वभूतस्थितं यो मां भजत्येकत्वमास्थितः ।
सर्वथा वर्तमानोऽपि स योगी मयि वर्तते ॥ ३१ ॥

॥ टीका ॥ अगा मी सर्वभूतीं असें । सर्व कल्पूनि सर्वांत वसें । तोचि मी आत्मा आपुला ऐसें । व्यतिरेकें कळलें जयासी ॥ ६९ ॥ तो सकळाहूनि प्रिय । आपला आत्मा हा निश्चय । कीं पुत्रकलत्र इत्यादि होय । प्रिय त्याच आत्मयाकारणें ॥ ७७० ॥ तो ऐसा आवडता अत्यंत । अर्जुना तोचि मी सर्वभूतीं भगवंत । सुखसमुद्र उगलों अनंत । चराचर तरंग व्यापूनी ॥ ७१ ॥ एकत्व त्या नजरीं ऐसें । अनुभूनि सर्वात्मभक्तिरसें । तो भजे योगी औरसें । निवृत्तिमार्गे ॥ ७२ ॥ अर्जुना तो श्रेष्ठ अत्यंत योगी । हें काय नवल सांगों तुजलागीं । कीं सर्वसंगपरित्यागी । आणि भक्त माझा ॥ ७३ ॥ अगा तो सर्वांही प्रकारीं । नांदला जरी घरदारीं । आणि प्रवर्तला जरी पुत्रदारीं । तरी मजमध्येंच तो योगी वर्ततो ॥ ७४ ॥ अगा सर्वथा प्रपंचीं वर्तणें । आणि मजमध्येंच असणें । त्यास आश्चर्य न वाटे या लक्षणें । परी आश्चर्य तुझ्यां सर्वांसी ॥ ७५ ॥ कीं पश्चिम दिशे असे निधान । तदर्थ पूर्वाभिमुख करी खनन । तसा प्रपंचीं प्रवर्तोनि साधन । करणें मोक्षमार्गाचें ॥ ७६ ॥ परंतु प्याला अमृत । तो विष भक्षितांही नव्हे मृत । तैसा सर्वात्मभक्त अत्यंत । प्रपंचीं वर्तला परी पदच्युत होईना ॥ ७७ ॥ कां नव्हे पदच्युत । आता हेतुही अच्युत । मूळचा कां तो असे वर्तत । सहजचि मजमाजीं ॥ ७८ ॥ तो नव्हे पदच्युत । जो सर्वभूतीं देखे अच्युत । जरी प्रपंचीं अत्यंत । तो वर्तला ॥ ७९ ॥ सर्वथा प्रपंचीं वर्तला । तरी अर्जुना ऐसें जाण त्याला । कीं मजमध्येंचि वर्ततो या बोला । बोलिला गहन भावें ॥ ७८० ॥ कीं जरी नसे माझी आवडी । तरी मजमाजीं चित्त न थारे घडी । एवंच मजमाझीं वर्ततो या शब्दें गोडी । अत्यंत आपली दाखविली ॥ ८१ ॥ एवं सुवर्णाची प्रीति । त्यास सर्वालंकारीं तेचि स्मृति । तैसी स्त्रीपुत्रधनवाहनादि आकृति । भगवद्रूप जो पाहे ॥ ८२ ॥ तो सर्वथा वर्तोनिही प्रपंचीं । प्रपंचवार्ता त्यास कैंची ।

भगवद्वाणी स्थिति तयाची । ऐसी सूचवी या भावें ॥ ८३ ॥ एवं ऐसा सर्वात्मभक्त । प्रपंचीं वर्तला तरी विरक्त । प्रारब्धभोगूनि अनुरक्त । भक्तिमार्गीच ॥ ८४ ॥ एवं होऊनिही ज्ञानयुक्त । प्रपंचीं वर्तोनिही विरक्त । आणि सर्वात्मभावें भगवद्भक्त । अन्वययोगी होतसे ॥ ८५ ॥ एवं अन्वययोगाचें महत्त्व । नसे व्यतिरेकयोगीं हें तत्त्व । या दों श्लोकीं श्रेष्ठत्व । अन्वययोगाचें ये रीती ॥ ८६ ॥ आणि विश्व भगवद्रूप निपुण । पाहे हें परम भक्तियोगाचें लक्षण । या भावें कमलेक्षण । श्रेष्ठत्व अन्वययोगाचें बोलिला ॥ ८७ ॥ या योगें भगवद्भक्ति । ह्मणूनि या रीतीत भगवदुक्ति । स्थळस्थळीं त्याची अभिव्यक्ति । दाखविलीच या टीकेंत ॥ ८८ ॥ गीताशास्त्र सूत्रप्राय । गूढ ग्रंथें जो भगवदभिप्राय । याच्या अर्थबोधाचा उपाय । विशद श्रीमद्भागवतीं ॥ ८९ ॥ श्रीभागवत महापुराण । तेथें वेदव्यासरूपी नारायण । विशद गीतार्थनिरूपण । पदोपदीं करितसे ॥७९०॥ प्रस्तुत अन्वययोगरीति । स्वभक्तियोगीं श्रीपति । योजूनि बोलिला हेचि स्थिति । विशद भागवतीं सर्वत्र॥ ९१ ॥ त्यांत प्रल्हाद पुण्यश्लोक । भक्तियोगीं हा एक । बोलिला असे हा श्लोक । सप्तम स्कंधीं ॥ ९२ ॥

सप्तमस्कंधश्लोक ॥ एतावानेव लोकेऽस्मिन् पुंसः स्वार्थः परः स्मृतः । एकांतभक्तिर्गोविंदे यत्सर्वत्र तदीक्षणम् ॥ टीका ॥ प्रल्हाद ह्मणे या श्लोकीं । स्वार्थ स्वपुरुषार्थ परम हा कीं । एकांतभक्ति उत्तमश्लोकीं । वेदवेदांतवेद्या गोविंदीं जरी घडे ॥ ९३ ॥ श्लोकाचे तीन चरण । एकांत भक्ति महत्त्व निरूपण । आतां चतुर्थचरणीं विवरण । एकांतभक्तीचें तेंचि करितो ॥९४॥"यत्सर्वत्र तदीक्षणं" ह्मणोनी । या चतुर्थचरणें करूनी । अर्थ एकांत भक्तीचा विवरूनी । बोलतसे प्रल्हाद ॥ ९५ ॥ कीं जें सर्वत्र तदीक्षण । ह्मणजे सर्वाठायीं त्याचें निरीक्षण । हें एकांतभक्तीचें लक्षण । कीं एकामाजी अंत सर्वांचा ॥ ९६ ॥ सर्वांचा अंत । एका त्याच्या स्वरूपांत । त्यास ह्मणावें एकांत । त्याचा अर्थ कीं सर्वत्र त्यातें पाहणें ॥ ९७ ॥ दृष्टांतें हा अर्थ । सिद्ध होतो ज्यांत परमार्थ । अंत समुद्रांत तों यथार्थ । सर्वां तरंगां ॥ ९८ ॥ पाहतां सर्वां तरंगीं । समुद्र जळचि दिसे अंतरंगीं । चित्समुद्रीं श्रीरंगीं । हेंचि एकांत भक्ती ॥ ९९ ॥ कीं तरंगमात्रीं सागर । तैसा चराचरीं सर्वेश्वर । तेव्हां तरंगसागरीं तैसें चराचर । अंत पावलें एका गोविंदीं ॥ ८०० ॥ अंत ह्मणजे अभाव । कीं चराचरीं देखतां भगवद्भाव

जडत्वास न उरे ठाव । हा एकामाजि अंत सर्वांचा ॥ १ ॥ एका आत्मसुवर्णाआंत । सर्वाजडा अळंकाराचा अंत । या ज्ञानाचें नांव एकांत । भक्ति हेच भजतां सगुणत्वें ॥ २ ॥ इत्यादि दृष्टांत कोटी । प्रल्हाद आठवूनि पोटीं । अन्वययोगीं हे दाखवी गोमटी । भक्ति गोविंदाची ॥ ३ ॥ हे अर्थ सूत्रप्राय । गीतेंत दाखविले अभिप्राय । कीं ब्रह्मभूत सर्वत्र सम होय । तो परम भक्ति माझी पावतो ॥ ४ ॥ एवं भक्त अन्वययोगी । त्या एकांतभक्तीस उपयोगी । आणि अव्यक्तोपासकालागीं । द्वैतनाशक हाचि योग ॥ ॥ ५ ॥ ह्मणऊनि वारंवार । या योगाचा अत्यंत बडिवार । प्रकरण तों पाहतां प्रकार । योगाचेंचि ॥ ६ ॥ आतां यानंतर श्लोक । तो कां बोले उत्तमश्लोक । त्याचें निमित्त सुज्ञलोक । परिसोत आधीं ॥ ७ ॥ व्यतिरेक अन्वययोग दोन्ही । बोलोनि देहींमधूनी । भक्तीस योग्य ह्मणोनि । श्रेष्ठ अन्वययोग बोलिला ॥ ८ ॥ या योगाचे अनुभवी । पावती भगवद्भक्तपदवी । सर्वात्मत्वें नित्य नवी । गोडी भक्तिरसाची जयास ॥ ९ ॥ कोणी अनुभवी गाढे । त्या सुखांत जाले वेडे । ते न पाहती सुखदुःखाकडे । जनाचिया ॥ ८१० ॥ सर्वभूतीं भगवंत । ज्यासि हेंचि पाहणें अत्यंत । जीवांच्या सुखदुःखपर्यंत । दृष्टि न देती ते भक्त ॥ ११ ॥ सर्वांतरंगीं सागर । सर्वभूतीं तैसा ईश्वर । सागरीं तरंग तैसें चराचर । वासुदेवांत देखती ॥ १२ ॥ ऐसे सर्वात्मतेचे अनुभवी । पावले भक्तींची परम पदवी । परी चराचरदेहांच्या गोसांवी । ईश्वरास नाहीं निरीं गौरविलें॥१३॥त्याच्या अंतरीं दया । असोनिही गेली वायां । आणि परम विभूतिदर्शन तया । न घडे स्वसुखसोहळे अनुभवितां ॥ १४ ॥ पुढें बोलिजेतील जेथें विभूती । तेथें परम विभूती हे कीं सर्वभूतीं । मज सुख हो ऐशा आशयांत असती । जे जीव अंश ईश्वराचे ॥ १५ ॥ "अहमात्मा गुडाकेश । सर्वभूताशयस्थितः" ऐसें हृषीकेश । ह्मणेल प्रथम उपदेश । हा विभूतीविषयीं ॥ १६ ॥ विभूतिरूपें कृष्णभजन । करावें या कारणें अर्जुन । प्रश्न करील त्यास जगज्जीवन । प्रथम विभूति हेंचि सांगेल ॥ १७ ॥ कीं सर्व भूतांचा आशय । मज सुखचि हो दुःख न हो ऐसा निश्चय । त्यांत मीं आत्मा देहाभिमानमय । अगा असें ॥ १८ ॥ पाहूनि भगवद्विभूती । भजन यथायोग्य सर्वांभूतीं । सर्व भूताशयामाजीं मीं जगत्पती । जीवात्मा ह्मणतां हें सूचवी ॥ १९ ॥ कीं आशय नसे आणखीं । आशय हाचि कीं म्यां असावें सुखी ।

आणि कधीं नसावें दुःखी । सर्व आशयशाखा याच्याच ।। ८२० ।। सुखप्राप्ति दुःखपरिहार । ज्याच्या आशयांत हाचि प्रकार । कोटि-वर्षें शोधितां निर्धार । इतकाच सर्वां आशयांचा ।। २१ ।। त्या आशयांत आत्मा । तो प्रतिबिंबांश जीवात्मा । नानाजळीं सूर्य तैसा परमात्मा । मीच असें आशयांत सर्वांच्या ।। २२ ।। हे प्रथम विभू-ती । ह्मणतां दया करणें सर्वभूतीं । हें अर्जुनातें जगदात्मा श्रीपती । सु-चवील आशयशब्दें करूनी ।। २३ ।। कीं मज सर्वभूतीं भाविलें । त्यास माझ्या ऐक्यें सुख फावलें । परी मज नाहीं पावलें । सुख कांहीं भूतदयेवां-चूनी ।। २४ ।। सूर्यास उपचार दीपाचा । अमृतास नैवेद्य गुळाचा । कीं गंगेस थिल्लर जळाचा । अभिषेक ।। २५ ।। अखंडसुखाचा अनुभव । हें जयाचें वैभव । त्या मज कोण मानव । काय सुखी करील ।। २६ ।। प्रति-बिंबरूपें दुःख । तेथें दुःख हरूनि दे सुख । या वेगळा उपाय शाणिक । नसे सुखी करावयाचा ।। २७ ।। यालागीं सर्वभूतीं । आशयांत माझी विभूती । त्या जीवात्मयातें यथामती । सुख देतां मी सुखी होतसें ।।२८ ।। सुख द्यावें ईश्वरातें । ऐसें वाटे जयातें । त्याणें प्रतिशरीरीं जीवात्मयातें । सुख द्यावें ।। २९ ।। राज्यभ्रष्ट क्षितिपती । त्यास जे सुखी करिती । तो पाळितां ही सर्व जगती । स्मरे तया उपकारातें ।। ८३० ।। प्रतिबिंबरूपें ईश्वर । ऐसा लक्षूनि चतुर । जे सुख करिती सादर । तिहीं बिंबरूपीं सुखी केला ।।३१।। जीवास दुःख दीधलें । त्यानें ईश्वरास दुःखी केलें । हें सतराविया अध्यायांत आपलें । गुह्य सांगेल श्रीकृष्ण।।३२।। "कर्शयंतः शरीरस्थं" या श्लोकें करूनी । "मां चैवांतःशरीरस्थं" ह्मणोनी । ह्मणेल कीं अशास्त्र तपें देह कष्टवूनी । दुःख देती मज अंतःशरीरस्थातें ।।३३।। एवं अन्वययोगी । सर्वात्मता लाधोनि ही जगीं । भूतदयेविना एका आंगीं । उणा पडला ह्मणावा ।। ३४ ।। इत्यादि भाव कोटी । श्रीकृष्ण धरूनि पोटीं । सर्वांभूतीं दया करावी हे धाटी । ज्यास तो थोर ह्मणतसे या श्लोकीं ।। ३५ ।।

।। श्लोक ।। आत्मौपम्येन सर्वत्र समं पश्यति योऽर्जुन ।
सुखं वा यदि वा दुःखं स योगी परमो मतः ।।३२।।

।। टीका ।। अगा अर्जुना योगी । मज सर्वत्र पाहोनिही जगीं । जरी दये-करूनी जीवालागीं । सर्वत्र पाहे ।। ३६ ।। तरी तो योगी अत्यंत । थोर आणि मज संमत । ह्मणोनि या भावें भगवंत । दयालुत्व रीति त्याची व-

र्णितो ॥३७॥ कीं ब्रह्मात्मरसें मातला । सुखदुःख कांहीं नाठवे त्याला । तथापि स्वपूर्वानुभवें ज्याला । दया करणें सर्वभूतीं तो थोर ॥ ३८ ॥ कीं सर्वत्र भोक्ता जीवात्मा । पिपीलिका हो अथवा ब्रह्मा । एका देहीं मीं जैसा हे उपमा । सुखदुःखीं पाहे सर्वत्र ॥ ३९ ॥ आपणास लागे क्षुधा । तेधवां वाटे प्राणांत बाधा । जे पक्वयोगी त्यांच्याही बोधा । डगमग आणी घडी एक ॥४०॥ दुःख अत्यंत ये रीती । क्षुधा तृषादि करिती सर्वभूतीं । अन्नउदकादियोगें त्यांची शांती । होतां सुख होय अत्यंत ॥ ४१ ॥ एवं योगी आणि पूर्वकर्मबळें । पावतो धनधान्यादि फळें । त्यानें क्षुधादिनिवृत्ति मूळें । अन्नादिकें द्यावीं स्वसम पाहोनी ॥ ४२ ॥अन्न द्यावें क्षुधिता । उदक द्यावें तृषिता । वस्त्र द्यावें शीतपीडिता । कन्यादिविवाहानिमित्त धन द्यावें॥४३॥ ऋणी ऋणापासूनी । मुक्त करावे धन देउनी । राजदंडातें चुकवूनी । सुटत ऐसें धन द्यावें ॥४४ ॥ हरिकीर्तनादि उत्सव । करावे यथावैभव । सकळ जनकर्णद्वारा देव । त्यांच्या हृदयीं निघे ऐसें करावें ॥४५ ॥ कोण्ही भजनीं तत्पर । आणि कुटुंबार्थ निरंतर । श्रमती न सांपडे अवसर । भजनाकारणें ॥ ४६ ॥ त्याचा कुटुंबनिर्वाह । ऐसा करावा कीं इतर स्नेह । टाकूनि भजती निस्पृह । निष्काम देवाधिदेवातें ॥ ४७ ॥ त्यांस उपदेश परमार्थाचा । करावा दाखवावा मार्ग साचा । स्वधन आणि स्ववाचा । दोहींकडोनि सुख द्यावें तयांस ॥ ४८ ॥ कीं आपणातेंही । तिसरे गोष्टींत असणें नाहीं । भजन कीं तदर्थ देहरक्षण कांहीं । अन्नउदकवस्त्रें करावें ॥ ४९ ॥ याच दों गोष्टींविण । दुःखी होइजे तें आपण । याच दों गोष्टींत देखे निपुण । सुख आपणातें ही ॥ ५० ॥ कीं जरी पक्वज्ञानी । दुःखी होतोच क्षुधादिकें करूनी । त्या प्रारब्धभोगार्थ पावोनी । जीवदशा भोगणें निःसंदेह ॥५१॥ येथें कोण्ही ह्मणती । कीं ज्ञानियास क्षुधादिकेंचि नसती । आणि पुसतां तेचि बोलती । देहप्रारब्धाचा त्यांचा ह्मणोनी ॥५२॥ प्रारब्धकर्मक्षय । भोगेंचि होय ऐसा निर्णय । भोगीं सुखदुःख हा निश्चय । सुखदुःख कीं तें स्पर्शे भोक्त्यातें । ५३ ॥ हें बोलणें वारंवार । पूर्वी जालें पुढें होणार । प्रस्तुत भूतदया प्रकार । स्वोपमेनें ऐसा योगियातें ॥ ५४ ॥ त्यांत ज्ञानयोगी । दों प्रकारींच जगीं । प्रारब्धें विभव ज्यालागीं । तो योगी इत्यादि रीती दयाळू ॥५५॥ ज्यांस नसेल विभव । तिंहीं सर्वभूतीं देवाधिदेव । धन साध्यावेगळें स्वयमेव । सुख व्हावें सर्वां भूतांचें ॥ ५६ ॥ काया वाचा

मन । हें तों आपलें निजधन । दुःखहरण सुखकरण साधन । उदंड इतुकीं ॥ ८७ ॥ सर्वांसि प्रिय बोलणें । चुकवूनि कृमिकीटकांतें चालणें । स्वोपमेनें सुख पाहणें । इत्यादिस्थळीं समसधन निर्धन योगियां ॥८८॥ स्वोपमेनें स्वसम । सुखदुःख पाहणें उत्तम । यास्तव बोले श्रीकृष्ण कीं स्थावरजंगम । भूतें सुखी करावीं दुःखें हरूनी ॥ ८९ ॥ त्या सकळ दुःखाचें मूळ । अविद्या अनादि हृदयशूळ । तीस करूनि निर्मूळ । परममंगळ स्वसुख द्यावें जीवांतें ॥८९०॥ हृदयीं दयेचा ठसा पडे । तरीच ब्रह्मविद्यादान घडे । जे स्वलाभेंचि जाले वेडे । ते भगवत्प्रिय न होती अत्यंत ॥ ९१ ॥ सर्व जगन्निवास । त्यास जे देवकीच्या गर्भीं वास । ते जना दिसो नेदी कंस । बंदीं घालोनि बहिण आपुली ॥ ९२ ॥ तैसी ज्ञानियाची वाणी । जींत ब्रह्मसुखाची खाणी । तीस पाडिली घाणी । मौन धरोनी ॥ ९३ ॥ मुक्ति साधली आपणा । परी मनीं नसे करुणा । तैसा मोक्ष तो अवलक्षणा । कंसासही जाला ॥ ९४ ॥ आपण मिष्टान्न जेवी । जिवलगा उच्छिष्टही न दावी । तैसा ह्मणावा तो मुक्त गोसावी । जो प्रकट न करी भजन मार्ग ॥ ९५ ॥ आपण जाला पृथ्वीपती । सखे सोयरे भिक्षा मागती । तैसा पावोनिही ब्रह्म स्थिती । जो अविद्या न नाशी जीवांची ॥ ९६ ॥ आपली जातां अविद्या । सुख पावला पावोनि विद्या । तरी इतरांसि ही सुखरूपा आद्या । दावितां ऐसें सुख तेही पावती ॥ ९७ ॥ ऐसें स्वोपमेकरूनी । सर्वत्र सुखदुःख देखोनी । जीव उद्धरी ज्ञान देऊनी । तो थोर अर्जुना मज संमत ॥ ९८ ॥ सुखदुःख सर्वयोगीं । स्वसाम्यें पाहे जगीं । तो थोर याचि लागीं । कीं दुःखें हरूनि सुख दे तयातें ॥ ९९ ॥ सर्वांचें दुःख हरणें । आणि सर्वांस सुख करणें । लौकिकें परमार्थें याचि विवरणें । हीचि कीं यथाशक्ती ॥ ८७० ॥ त्यांत मुख्य दुःख हरणें । आणि सर्वांस सुख करणें । त्याचें हेंचि विवरण । कीं अधिकार पाहोनि उपदेश ॥ ७१ ॥ आणि स्वशक्ती जरी नसे । ब्रह्मविद्या तों त्यापासीं वसे । एवं सुख देणें तें हेंचि दिसे । कीं अविद्यादुःख नाशावें ॥ ७२ ॥ आतां दोन यानंतर श्लोक । श्रोता पार्थ पुण्यश्लोक । अन्वययोग असाध्य मानूनि कितीएक । प्रश्न करितो अर्जुन ॥ ७३ ॥

॥अर्जुन उवाच॥ योयं योगस्त्वया प्रोक्तः साम्येन मधुसूदन ।
एतस्याहं न पश्यामि चंचलत्वात्स्थितिं स्थिराम् ॥ ३३ ॥

चंचलं हि मनः कृष्ण प्रमाथि बलवद्दृढम् ।
तस्याहं निग्रहं मन्ये वायोरिव सुदुष्करम् ॥ ३४ ॥

॥ टीका ॥ अर्जुन ह्मणे जी मधुसूदना । मधुकैटभादि असुरमर्दना । अवतरोनि देवकीनंदना । उपदेश दीनास मज करिसी ॥ ७४ ॥ तुज नित्यमुक्ता सर्व सुगम । परी मज अत्यंत वाटे दुर्गम । जो हा अन्वययोग सर्वोत्तम । बोलियेला तुवां ॥ ७५ ॥ योग बोललासी दोनी । त्यांत हा आलीकडे साम्यें करूनी । सर्व भूतस्थमात्मानं ह्मणोनी । या श्लोकापासूनि वदलासि योग ॥ ७६ ॥ त्याह्रूनि पूर्वील योग जेथें वृत्तीचा वियोग । चित्तचैतन्याकार सयोग । त्या आलीकडे साम्ययोग हा ॥ ७७ ॥ कीं आत्मा सर्वत्र सम । हा साम्यें करूनि योग परम । जो वदलासि हा सुगम । न वाटे मजला ॥ ७८ ॥ या योगाची स्थिती । स्थिर राहों नेदी मनाची गती । त्याच्या चंचलत्वें मती । विषमत्व अवलंबील तत्काळ ॥ ७९ ॥ अजी कृष्णजी हें मन । परम चंचळ आणि मथन । करूनि इंद्रियकाष्ठांचें दहन । करी विवेकाचें ॥ ८० ॥ हें बळवंत नावरे । धरूं जातां अधिक बावरे । मोट बांधों जातां भरे । गगनीं जैसा महावायु ॥ ८१ ॥ हें मन परम दुर्लभ । याचा निग्रह परम दुष्कर । भावगर्भ नारायणातें नर । पुसे कीं केवीं साधे हा योग ॥ ८२ ॥ प्रश्न करितां अर्जुन । अंगीकारूनि त्याचें वचन । जिंकोनियां ऐसेंही मन । योग साधावाचि ह्मणतसे भगवंत ॥ ८३ ॥

॥ श्रीभगवानुवाच ॥ असंशयं महाबाहो मनो दुर्निग्रहं चलम् ।
अभ्यासेन तु कौंतेय वैराग्येण च गृह्यते ॥ ३५ ॥

॥ टीका ॥ अगा येविषयीं नाहीं संशय । कीं कठिण करणें मनाचा जय । हें चंचल केला न जाय । निग्रह याचा ॥ ८४ ॥ हें असाध्य निःसंदेह । परी याचाही करील तो निग्रह । कीं अजिंकही शत्रुसमूह । जिंकिले तुवां ॥ ८५ ॥ महाबाहो ह्मणोनी । गूढ भाव दावी या वचनीं । कीं अजिंकही या बाहू करूनी । जिंकिलें तुवां ॥ ८६ ॥ आणि तूं कौंतेय । आमची आत कुंती तिचा तनय । परम समर्थ होउनि काय । लेखा धरिसी मनाचा ॥ ८७ ॥ अगा जो प्रपंचीं दक्ष । तोचि परमार्थी साधील मोक्ष । मन जिंकवेना ऐसा हा पक्ष । तुज योग्य नव्हे हा भाव ॥ ८८ ॥ ज्याला असेल दक्षपण । तो जिकडे निघेल तिकडे निपुण । या प्रयत्नीं तूं आपण । प्रवर्तसी तेव्हां हेंही साधेल ॥ ८९ ॥ आतां दक्षही जाला । तरी सा-

धनसंपत्ति पाहिजे त्याला । तरी मनाच्या निग्रहाचें तुजला । सांगतों वर्म ॥ ८९० ॥ कीं मुख्य येथें अभ्यास । वैराग्यसाधन त्यास । मन जिंकणें ज्यास । हीं दोनी अगत्य त्यास असावीं ॥ ९१ ॥ आत्मतत्व आधीं कळावें । मग मन अभ्यासीं वळावें । अभ्यासीं त्यासि कवळावें । वैराग्ययुक्त बुद्धीनें ॥ ९२ ॥ स्थिर कराया मना । स्थळ आत्मया विना । मायिक पदार्थी कांहीं असेना । वावरोंच लागे अन्यत्र ॥ ९३ ॥ ज्यास पाहिजे सुख । तें सुख चैतन्यावांचूनि नाहीं आणिक । चित्स्वरूपीं करितां अंतर्मुख । स्थैर्य पावे ॥ ९४ ॥ निखळ चैतन्य सोनें असे । अथवा चराचर अळंकाररूपें दिसे । परी सुवर्ण याचकास गवसे । सुवर्ण भलत्या प्रकारें ॥९५॥ तृषितास जळधारा । अथवा सांपडोत गारा । निखळ अथवा प्रपंच सारा । चिद्रूप दिसावा मनातें ॥ ९६ ॥ तेथें स्थिरत्व मन पावे । परी पूर्व संस्कार त्याला आठवे । ह्मणूनि विषयांकडे धांवें । विषय ते जडत्वें मानूनी ॥ ९७ ॥ तेव्हां पाहिजे वैराग्य । त्या वैराग्यें स्वानंद सौभाग्य । जतन होय नासे अभाग्य । विषयवासना ॥ ९८ ॥ चित्स्वरूपीं मन । लावितांही करी विषयाचिंतन । तेथें पाहिजे वैराग्यसाधन । त्या वैराग्यसंस्कारें तें परते ॥ ९९ ॥ स्वरूपीं लागणें अभ्यास । तेथूनि उठतां त्यास । परतवूनि योजणें यास । वैराग्य पाहिजे ॥ ९०० ॥ एवं वैराग्य अभ्यास दोनी । उपाय या दोहीं करूनी । मनाचा निग्रह ह्मणोनी । श्रीकृष्ण बोलिला ॥ १ ॥ उपाय नाहीं याविना । ह्मणोनि या उपायें मना । न आवरी त्यास योग साधेना । ह्मणोनि ह्मणतो या श्लोकीं ॥ २ ॥

॥ श्लोक ॥ असंयतात्मना योगो दुःष्प्राप इति मे मतिः ।
वश्यात्मना तु यतता शक्योऽवाप्तुमुपायतः ॥ ३६ ॥

॥ टीका ॥ अगा मनास चैतन्याचा योग । तेधवां सिद्ध होतो योग । त्यास आवडती जड विषयभोग । योग तेथें मग कैंचा ॥ ३ ॥ ह्मणोनि जें मन नव्हे संयत । जें नसेल आवरिलें अत्यंत । त्या मनें करूनि निश्चित । अघटित सिद्धि योगाची ॥ ४ ॥ हे अर्जुना माझी मती । जें बोलिलों तुजप्रती । कोणी उपायांतर जाणती । तरी जाणोत ॥ ५ ॥ एवं उपाय अत्यंत । तो हाचि निश्चित । आणि जें मन असंयत । त्या मनें योग साधेना ॥ ६ ॥ दळिल्या कांडिल्या कुटिल्या विना । नुसत्या गोधूमाचे पदार्थ नाना । कोणी सुगरणी ऐसी दिसेना । कीं शेवया मालल्या सिद्ध करी ।

॥ ७ ॥ एवं मन वश आधीं करावें । या मनातें अभ्यासीं भरावें । तेव्हां यत्न करणारिया पुरुषें पावावें । योगातें उपायें करूनी ॥ ८ ॥ आतां या नंतर श्लोक । त्यांत पार्थ पुण्यश्लोक । प्रश्न करील सुज्ञ लोक । निमित्त त्याचें परिसोत ॥ ९ ॥ कीं योगाचीं साधनें । ऐकिलीं अर्जुनें । तीं अत्यंत कठिणें । वाटलीं तया ॥ ९१० ॥ परी ऐकोनि योगफळा । घोटूं लागला लाळा । करी अनावर चाळा । या मनाचा ॥ ११ ॥ तथापि करावा उपाय । हा उपजला निश्चय । परी ह्मणे जरी योगसिद्धि होय । तरी बरेंचि अत्यंत ॥ १२ ॥ तो यत्न नव्हे थोडा । कीं योग साधे रोकडा । जरी मध्येंचि मोडे गाडा । परम पद पावणें मग कैचें ॥ १३ ॥ तरी त्यास कोण गती । हें पुसों ह्मणे महामती । ह्मणोनि संतांच्या स्वामीप्रती । प्रश्न करितो अर्जुन ॥ १४ ॥

॥ अर्जुन उवाच ॥ अयतिः श्रद्धयोपेतो योगाच्चलितमानसः ।
अप्राप्य योगसंसिद्धिं कां गतिं कृष्ण गच्छति ॥ ३७ ॥

॥ टीका ॥ अर्जुन ह्मणे कोणी अयती । ह्मणजे यत्न योगसिद्धीप्रती । न करी आणि ज्याची मती । युक्त श्रद्धेंकरूनि पाहतां ॥ १५ ॥ कीं आत्मा कळों आला । परी योगसिद्ध पाहिजे जाला । ह्मणोनि श्रद्धा ज्याला । आस्तिक्यबुद्धि ऐसी अत्यंत ॥ १६ ॥ योगें निःसंदेह मोक्ष । ऐसी श्रद्धा परि नव्हे दक्ष । तोडावया संसारवृक्ष । असंगशस्त्र जो नेघे ॥ १७ ॥ आणि योगही आरंभिला । परि योगापासूनि चळला । पुन्हा योगीं न लागसाच जाला । मनोभाव ज्याचा ॥ १८ ॥ योगाची सिद्धि बरवी । ते न पावला मुक्तिपदवी । कृष्णजी त्याची गति मजला सांगावी । कीं कोण्यागतीप्रति तो जातो ॥ १९ ॥ कृष्णजी ह्मणसील मातें । कीं कां हा संदेह जाला तूतें । तरी या गोष्टीनें संदेहचित्तें । मानिला ह्मणोनि ह्मणतो या श्लोकीं ॥ ९२० ॥

॥ श्लोक ॥ कच्चिन्नोभयविभ्रष्टश्छिन्नाभ्रमिव नश्यति ।
अप्रतिष्ठो महाबाहो विमूढो ब्रह्मणः पथि ॥ ३८ ॥

॥ टीका ॥ अजी ऐसें वाटतें मला । कीं उभयभ्रष्टता असेल त्याला । कीं प्रतिष्ठा नाहीं पावला । ब्रह्ममार्गीं ॥ २१ ॥ प्रतिष्ठा ह्मणजे अत्यंत स्थिति । ते ब्रह्ममार्गीं त्याची मति । जरी निश्चयेंशीं पावती । तरी पावतांच मोक्ष ॥ २२ ॥ तरी अयति यत्न न करी ह्मणोनी । चळला योगापासूनी । यालागीं मोक्षातें न पावोनी । विमूढ होऊनि राहिला ॥ २३ ॥ आतां स्व-

र्गास जावें । तरी यागादि न करी काम्यभावें । कीं ब्रह्ममार्गीं यालागीं स्वभावें । निष्काम तो ॥ २४ ॥ उभयभ्रष्ट यालागीं ॥ मज वाटतो तो योगी । अभ्राचें थिगळ आकाशमार्गीं । उभयभ्रष्ट जे रीतीं ॥ २५ ॥ कीं वायूचें होतां बळ । तुटे अभ्राचें एक थिगळ । तें वितळोनि नासे निष्फळ । मधींच्यामधीं ॥ २६ ॥ ज्या मेघापासूनि चळे । त्या मेघांत न मिळे । अथवा मेघांतरांतही न मिसळे । व्यर्थ जाय वितळोनी ॥ २७ ॥ ऐसें मज वाटलें । ह्मणूनि पोटीं होतें तें निवेदिलें । परी तुज असे सर्व कळलें । ऐसेंचि होय कीं नव्हे तें सांग ॥ २८ ॥ हें मज पुसणें अगत्य । आणि सांगणार तूंचि सत्य । ह्मणूनि उत्तर देऊनि कृतकृत्य । करी ह्मणतसे या श्लोकीं ॥ २९ ॥

॥ श्लोक ॥ एतन्मे संशयं कृष्ण छेत्तुमर्हस्यशेषतः ।
त्वदन्यः संशयस्यास्य छेत्ता न ह्युपपद्यते ॥ ३९ ॥

॥ टीका ॥ कृष्णजी या माझ्या संशया । अशेषें छेदावया । योग्य तूंचि सर्वां सर्वज्ञांचिया । शिरोमणि जगद्गुरू ॥ ९३० ॥ तुजवांचूनि यातें । छेदी संशयातें । ऐसा न सांपडे मातें ॥ भुवनत्रय धुंडितां ॥ ३१ ॥ नारायणातें नर । प्रश्न करितां पार्थ चतुर । सर्वज्ञ याचें देतो उत्तर । पूर्ण षड्गुण श्रीभगवान् ॥ ३२ ॥

॥ भगवानुवाच ॥ पार्थ नैवेह नामुत्र विनाशस्तस्य विद्यते ।
नहि कल्याणकृत्कश्चिद्दुर्गतिं तात गच्छति ॥ ४० ॥

॥ टीका ॥ पृथा कुंती तिचा सुत । तो पार्थ या नांवें विख्यात । त्यातें ह्मणे श्रीभगवंत । अगा पार्था ह्मणोनी ॥ ३३ ॥ अगा पार्था ज्ञानमार्गीं । निघोनिही प्रवर्तला योगीं । उभयभ्रष्टत्व त्याहीलागीं । बापा घडों शके काय ॥३४॥ करणारे स्वकल्याण । ते या मोक्षमार्गीचे साधक जाण । त्या विषयीं बोलतों हें प्रमाण । कीं त्यांत कोणीही दुर्गतीतें नच जाय ॥ ३५ ॥ बापा या कल्याणमार्गीं प्रवर्तला । तो कोणीच वायां नाहीं गेला । तूं पुससी हा तों चळला । श्रद्धेनें प्रवर्तोनि योगमार्गीं ॥ ३६ ॥ ज्या जन्मीं योगापासूनी । तूं पुसतोसि चळला ह्मणोनी । त्यानंतर इहलोक परलोक दोन्ही । कामधेनू होती तयासी ॥३७॥ इहलोकीं त्यांचा नाश । न परलोकीं त्यातें क्लेश । दोहीं लोकीं त्याचा लेश । पार्था बापा नाश नव्हे ॥३८॥ दुर्गतीतें तो नच जाय । येविषयीं आश्चर्य काय । या कल्याणमार्गी न होय । दुर्गती कोणासही ॥ ३९ ॥ अगा सत्संगें उपजली मुमुक्षा । अपेक्षूं लागला

मोक्षा । अद्वैतबोधाची अपेक्षा । तो न पावे दुर्गति कदापि ॥९४०॥ हा तं योगीं प्रवर्तला । तेथूनि मागें घसरला । दुर्गति होणार कीं काय याला । पार्थ बापा काय पुससी ॥४१॥ पार्था ताता ह्मणोनि । या श्लोकीं या दों संबोधनें करूनि । कृपासमुद्र आळवीन आवरूनि । भरितें कृपेचें ॥४२॥ जरी प्रस्तुत भ्रंश जाला । तरी प्रिय तो अधोक्षजाला । सागरकृपेचा हेलावला । गोष्टी त्याची परिसतां ॥ ४३ ॥ त्यांत तो उभयभ्रष्ट कीं काय । ह्मणोनि शब्द कानीं जाय । त्यास उत्तर कीं हाय हाय । काय बोलिलास हें ह्मणोनी॥४४॥ पार्था बापा ह्मणोनी । या दों शब्देंकरूनि । अंतरींचा कळवळा ऐसा दावूनी । बोलिला श्रीकृष्ण ॥ ४५ ॥ आणि तुटतां हा संशय । योग आवडी भावा ऐसा निश्चय । साधक सर्व करिती ह्मणोनि धनंजय । गोड वाटला या प्रश्नें ॥४६॥ यालागीं ताता बापा ह्मणोनी । एथें या तातशब्देंकरूनी । आवडीनें अर्जुनातें आळवूनी । हा संशय निरसितो ॥ ४७ ॥ अठरा अध्याय गीता । परी अन्यत्र कोठेंही ताता । ह्मणोनि अर्जुनातें जगत्पिता । ऐसा गौरवूनि बोलिला नाहीं ॥४८॥ एथें स्वविषयीं अर्जुन मनीं । शंकला योग साधावा ह्मणोनि । कीं चळलों जरी या योगापासूनि । ह्मणी दुर्गतीस जाईन ॥ ४९ ॥ यावरूनि कृपासागर । ताता बापा ह्मणूनि उत्तर । देतो कीं मोक्षमार्गी सादर । त्यास दुर्गति हे घडेना ॥ ९५० ॥ कीं हे गीता योगशास्त्र । श्रद्धेनें आइके कानीं मात्र । तोही होउनि पवित्र । जाय उत्तम लोकातें ॥ ५१ ॥ योगाचीच श्रद्धा ज्याला । कीं योगें मुक्ति होईल मला । आणि योगीं प्रवर्तोनि चळला । बापा तो केंवि जाय दुर्गतीतें ॥ ५२ ॥ आणि योगशास्त्र गीताच हे । अर्थज्ञान नसोनिही ह्मणताहे । त्यासिही ज्ञानिया योगियासमान पाहे । कृपाळू हा श्रीकृष्ण॥५३॥गीतेचा अर्थ कांहीं । ज्या पुरुषास कळत नाहीं । गीता पठनमात्रें त्यानेंही । मज यजिलें ज्ञानयज्ञें ह्मणतसे ॥५४॥ "अध्येष्यते च य इमं" या श्लोकीं । "ज्ञानयज्ञेन तेनाहं" ह्मणोनि बोलेल कीं । पठनमात्रें त्यागें या लोकीं । ज्ञानयज्ञेंचि जाणों मज यजिलें ॥ ५५ ॥ ज्ञानाग्नि ह्मणजे ब्रह्म । त्यांत दोंपरी वृत्तीचा होम । चित्त तन्मय अथवा तेंचि सम । दिसे द्विविधयोग हा ज्ञानयज्ञ ॥ ५६ ॥ योगशास्त्रीं या गीतेभीतरीं । ज्ञानयोगयज्ञ ऐसेपरी । तिच्या पठनमात्रें मोक्षाधिकारी । प्रिय भगवंताचा होत असे ॥५७ ॥ या योगशास्त्रपठनें येरझारा । चुकती पुन्हा नये संसारा । पावतो ऐशा अधिकारा । हा तों कळ-

ला अभ्यास करितां योगाचा ॥ ५८ ॥ त्यास आणि दुर्गती । हे शंका आ-इके संतांचा पती । ह्मणोनि बापा पार्था ऐसा अर्जुनाप्रती । आळवी दावी कळवळा ॥ ५९ ॥ गीता अध्याय अठरा । परी ऐशा कळवळियानें पांडुकुमारा । ताता बापा ह्मणोनि एकसरा । उचंबळला नाहीं करुणार्णव॥९६०॥ कीं बापा हें काय घडे । ऐसा तो कैसा दुर्गतींत पडे । अमृतपान एकदां सांपडे । तो मरेना ॥६१॥ असो आतां यानंतर श्लोक । तो कां बोले उत्तम श्लोक । त्याचें निमित्त सुज्ञलोक । परिसोत आधीं ॥ ६२ ॥ योगापासूनि भ्रष्टला । अर्जुन पुसे तो काय उभयभ्रष्ट जाला । श्रीकृष्ण त्यास बोलिला । कीं दोंहीं लोकीं नाश त्याचा होइना ॥ ६३ ॥ न स्वर्ग अथवा मुक्ति । त्या उभयभ्रष्टशंकेनें अर्जुनाची उक्ति । त्या उक्तीची प्रत्युक्ति । जाली नाहीं अद्यापि ॥ ६४ ॥ दोंही लोकीं नाश त्याचा । न घडे ऐसें कृष्ण स्व-वाचा । पूर्वश्लोकीं बोलिला तो कृपेचा । कळवळा अत्यंत ॥६५॥ स्वर्गमोक्ष दोंहींपासूनी । भ्रष्ट होणार कीं काय ह्मणोनी । हे शंका अर्जुनाचे वचनीं । याचें उत्तर हें नव्हे ॥ ६६ ॥ परी एके शंकेचा परिहार । करी याच गोष्टींत परमेश्वर । कीं स्वर्ग नव्हे याचें उत्तर । जालें उभयलोकीं नाश नाहीं ह्मणतां ॥ ६७ ॥ आतां उत्तमकुळप्रसूत । होऊनि मुक्ति पावे निश्चित । ऐसें बोलणार तेव्हां अत्यंत । होणार समाधान अर्जुनाचें ॥ ६८ ॥ कळव-ळियानें अत्यंत । दोंहीं लोकीं नाश नाहीं निश्चित । ह्मणोनि बोलिला भग-वंत । तें विशद बोलणें या श्लोकीं ॥ ६९ ॥

॥ श्लोक ॥ प्राप्य पुण्यकृतांल्लोकानुषित्वा शाश्वतीः समाः ।
शुचीनां श्रीमतां गेहे योगभ्रष्टोऽभिजायते ॥ ४१ ॥

॥ टीका ॥ अगा योगभ्रंश जाला । त्यानंतर तो जेधवां मेला । तेधवां तो पावला । उत्तमोत्तम लोकांतें ॥ ९७० ॥ राजसूय अश्वमेधादिक । पुण्य अगण्य पुण्यश्लोक । करूनि पावती जे लोक । योगभ्रष्ट त्या लोकांतें पावतो ॥ ७१ ॥ पृथ्वीदानादि दानें । करूनी अधिष्ठूनि दिव्य विमानें । पावती पदें सुखनिधानें । योगभ्रष्ट त्या लोकांतें पावतो ॥ ७२ ॥ परी अ-र्जुनातें पुण्यश्लोक । जैसे पावती पुण्यलोक । तैसा त्यांत हाही एक । ह्मणी ऐसें मानिसी ॥ ७३ ॥ अगा त्यांचा अवधि काळ । सरतांचि लोटिती त-त्काळ । राहों न देती एक पळ । त्या लोकीं तयातें ॥ ७४ ॥ ते या देखतां नेणो किती । त्या लोकास येती आणि जाती । इतकीं अगण्य वर्षें लोटती ।

योगभ्रष्टातें त्या लोकीं ॥ ७५ ॥ ऐसीं वर्षें शाश्वत । वास करोनि त्या लोकीं अत्यंत । शुचि आणि श्रीमंत । त्यांच्या घरीं योगभ्रष्ट जन्मतो ॥ ७६ ॥ एवं परलोक त्याचा तैसा । आणि इहलोक त्याचा ऐसा । नाश त्याचा ह्मणावा कैसा । दोहीं लोकीं ॥ ७७ ॥ आतां योगभ्रष्ट द्विविध । कीं होतां अन्वयव्यतिरेकबोध । योगीं प्रवर्ते करी वृत्तिनिरोध । किंवा ध्यानीं सर्वात्मतेनीं मन योजी ॥ ७८ ॥ दोहीं परी योग एक । अन्वयं अथवा व्यतिरेक । परी योगभ्रष्ट होती साधक । ते द्विविध जाणावे ॥ ७९ ॥ त्यांत कोणी संगदोषेंकरूनी । पुन्हा विषयासक्त होउनी । यत्न सोडितां योगापासूनी । भ्रष्ट जाले ॥ ९८० ॥ कोणी ज्ञान पावोनी । योगयत्नीं प्रवर्तोनी । न बागतां योग मले ह्मणोनी । मुक्ति नाहीं पावले ॥ ८१ ॥ एथें कोणी वेदांताभिमानी । शब्दज्ञानी अनुभवी ह्मणोनी । जडनिषेधमात्रें मुक्ति उपपादुनी ।•आत्मज्ञानी नव्हे ह्मणती योगभ्रष्ट हा ॥ ८२ ॥ आत्मा जड-निषेधें समजला । तरी शब्दज्ञानचि ह्मणावें त्याला । जों चित्तनाश नाहीं जाला । अन्वययोगें अथवा व्यतिरेक योगें ॥ ८३ ॥ अगत्य पाहिजे योग । परी हे दोन्हीं योग नव्हती हठयोग । चित्त चिन्मय वृत्तिवियोग । अ-थवा चित्स्वरूप लक्षावें जडमात्र ॥ ८४ ॥ वेदशास्त्र पुराणें वेदांत । या सर्वांचाही सिद्धांत । कलियुगीं ज्ञानमार्गीही जे भ्रांत । ते उडविती योग । आणि सगुण भजनातें ॥ ८५ ॥ असो आतां योगभ्रष्ट द्विप्रकार । त्यांत कोणी दुष्टसंगें विषयविकार । गोड मानूनि योगाचा विचार । सोडोनि देती ॥ ८६ ॥ कोण्ही योगीं प्रवर्तले । परी साधक ते सिद्ध नाहीं झाले । आयुष्य सरतां मेले । देहांतीं विस्मरण पावोनी ॥ ८७ ॥ जो देहांतीं आत्मा स्मरे । त्याचा देह मात्रचि मरे। तो सच्चिदानंद उरे । कीं अंतीं जें स्मरे पावे तयातें॥८८॥"यं यं वापि स्मरन् भावं" ह्मणोनी। अष्टमाध्यायांत या वचनीं । हा सिद्धांत होणार यावरूनी । देहावसानीं आत्मस्मृतीनें कैवल्य ॥ ८९ ॥ परंतु अष्टमाध्यायांत । त्यात्र श्लोकीं भगवंत । ह्मणेल कीं सदा जो भाव अत्यंत । भाविजे तोचि देहांतीं आठवे ॥ ९९० ॥ योग याकारणें । नरा-स या अध्यायांत नारायणें । विशद वर्णिला कीं मोक्षपरायणें । आत्मा स-मजोनि योग साधावा ॥ ९१ ॥ एवं चित्स्वरूपीं चित्त जडे । कीं सर्व आ-त्मा हा ठसा पडे । तरीच देहावसानीं वडे । आत्मस्मृति ॥ ९२ ॥ अवि-द्याच नाहीं गेली । जों चिन्मय बुद्धि नाहीं झाली । ज्ञानाभिमानियांची

बोली । असो परती असंमत ॥ ९३ ॥ एवं योगभ्रष्ट दोंपरी । एक पडोनि विषयांवरी । एक वैराग्य असोनि अंतरीं । योग साधितां मृत झाला ॥९४॥ त्यांत अर्जुनें पुसिला । तो विषयासक्तीनें परतला । तरी "विमूढो ब्रह्मणः पथि" ह्मणोनि बोलिला । विशेषण त्याचें अर्जुनें॥९५॥कीं न होतां योगारूढ । विशेषें जाला मूढ । भावार्थ यांत गूढ । कीं तोचि विमूढ जो विषयासक्त ॥ ९६ ॥ दोहीं लोकीं नाश । त्याचा नव्हे लेश । ह्मणोनि बोलतां हृषीकेश । जन्म बोलिला शुचि श्रीमंतगृहीं तयाचा ॥ ९७ ॥ कीं देहावसानीं चित्त । विषयांकडे त्याचें होतें रत । ह्मणोनि जे श्रीमंत । त्यांच्या गृहीं तो जन्मतो॥९८॥कीं संयोग पूर्वबुद्धीचा । त्या जन्मीं त्यास होतो ऐसें स्ववाचा । कृष्ण ह्मणेल तोंपर्यंत तो सुत श्रीमंताचा । पूर्वसंस्कारें भोगितो विषयातें ॥९९॥परी ते श्रीमंत । शुचिर्भूत अत्यंत । या भावें ह्मणे भगवंत । कीं प्रवृत्ति न घडे त्याची कुमार्गीं॥१०००॥ आणि जो पूर्वबुद्धिसंयोग । होय तो आरंभीं सत्कर्मयोग । आणि करी विषयभोग । यथान्यायें ॥ १ ॥ जो विषयासक्त होउनी । योगभ्रष्ट मेला तो येरीती करूनी । शुचि श्रीमंतगृहीं जन्मे ह्मणोनी । सर्वज्ञशिखामणी बोलिला ॥ २ ॥ आतां ज्यास होती विरक्ती । योगसिद्धि न होतां न पावला मुक्ती । इतकियांत मेला परंतु विषयासक्ती । नव्हती पोटीं तयाच्या ॥ ३ ॥ तोही पुण्यलोकांतें जातो । शाश्वत काळ तेथें राहतो । पुन्हा या लोकीं जन्मतो । योगसिद्धीकारणें ॥ ४ ॥ तो श्रीमंताचे गृहीं । उत्पन्न होत नाहीं । कीं विषय भोगावे हा कांहीं । संस्कार नव्हता ॥ ५ ॥ त्यासही प्रारब्धाच्या बळें । जरी भोगणें विषयभोग फळें । तरी तोही यथाकाळें । श्रीमंतगृहीं जन्म पावे ॥ ६ ॥ जरी प्रारब्धही तैसें नसे । आणि तदनुरूप संस्कारही नसती तैसे । तरी तो जन्मतां न दिसे । श्रीमंताच्या ॥ ७ ॥ ह्मणोनि त्यास परम लोक । वर्णूनि आतां उत्तमश्लोक । इहलोकजन्मीं कांहीं एक । वैपरीत्य वदतो अथवा ह्मणोनि या श्लोकीं ॥८॥

॥ श्लोक ॥ अथवा योगिनामेव कुले भवति धीमताम् ।
एतद्धि दुर्लभतरं लोके जन्म यदीदृशम् ॥ ४२ ॥

॥ टीका ॥ अथवा योगियांचें कुळ । जे योगी बुद्धिमंत प्रांजळ । कीं अपेक्षूनि मुक्ति केवळ । योगाचि अनुष्ठिती जे योगी ॥ ९ ॥ कुळीं तयाच्या तैशिया । जन्म योगभ्रष्टा तया । कीं संस्कार नव्हता जया । विषयभोग यत्नाचा ॥ १०१० ॥ अर्धश्लोकें करूनि । प्रकारद्वय जन्म वर्णूनि । बोलतो

उत्तरार्ध वचनीं। महिमा योगभ्रष्ट जन्माचा ॥ ११ ॥ अगा अर्जुना । या लोकीं बहुतां जना । जन्म होती परी येना । सरी याच्या जन्माची॥ १२ ॥ मोक्षास विलंब त्याला । होऊ नथे तथापि जाला । परी हा योगभ्रष्ट जन्म- पावला । तो परमदुर्लभ या लोकी ॥१३॥ अनायासें धनंजया । योगसिद्धि ऐशा जन्मीं तया । ह्मणोनि बोलतसे आतां या । दों श्लोकें करूनी ॥१४॥

॥ श्लोक ॥ तत्र तं बुद्धिसंयोगं लभते पौर्वदेहिकम् ।
यतते च ततो भूयः संसिद्धौ कुरुनंदन ॥ ४३ ॥

॥ टीका ॥ पूर्वदेहीं मुमुक्षा । अत्यंत मोक्षाची अपेक्षा । ते विना सत्सं- गादि शिक्षा । स्फुरों लागे बुद्धीतें ॥ १५ ॥ बुद्धीचे दोन प्रकार । एक स- त्त्ववृत्ति निश्चयाकार । एक विवेकें विचारनिर्धार । तेही ह्मणावी बुद्धि ह्म- णोनी ॥ १६ ॥ एकें विचार सांगीतला । ते बुद्धि ह्मणती दिधली त्याला । त्याची बुद्धि गेली आली याही बोला । लोक बोलती ॥ १७ ॥ निश्चय क- रणारी सत्त्ववृत्ती । ते तो होतीच त्याच्या चित्तीं । परी स्वहितविचार- प्रवृत्ती । बुद्धि ते गेली आली ह्मणावी ॥ १८ ॥ एवं मोक्षमार्गप्रवृत्ती । आणि विषयमार्गी निवृत्ती । हे पूर्वदेहसंस्कारवृत्ती । स्वयेंचि स्फुरों ला- गे बुद्धीतें ॥ १९ ॥ तो पूर्वदेह बुद्धीचा । संयोग ह्मणे कृष्ण स्ववाचा । लाभ त्या बुद्धिसंयोगाचा । होतो त्या जन्मी तयातें ॥ १०२० ॥ जों जों वाढे शरीर । बुद्धी जों जों होय चतुर । तों तों उमटे पूर्वसंस्कार । हृदया- मध्यें ॥ २१ ॥ बाळपणींच एक । तरुणपणीं कितीएक । पूर्वदेहबुद्धिवि- वेक । या योगभ्रष्ट जन्मीं लाधले ॥ २२ ॥ ऐसा पूर्वबुद्धिसंयोग । होतां पुन्हा आत्मयोग । आरंभितो संतसंग । अलभ्यलाभ पावोनी ॥ २३ ॥ हर- पलें ज्ञानरत्न । तें ईश्वरें त्या कारणें केलें होतें जतन । न करितां फारसा यत्न । गुरुरूपें त्याचें तयातें पाववी ॥ २४ ॥ कोणास संत प्रसिद्ध । तेचि भेटले ज्ञानवृद्ध । कोणी जाले ज्ञानसिद्ध । ईश्वराचि भेटतां गुरुरूपें॥ २५ ॥ कोण्या एक्या प्रकारें । ज्ञान पावोनि आदरें । योग प्रयत्न पूर्वसंस्कारें । क- रूं लागे अत्यंत ॥ २६॥ प्रयत्न मुक्तीलागीं । अत्यंत करितो योगी । सक- ळां पूर्वजालागीं । उद्धरितो आपुल्या ॥ २७ ॥ भाव ऐसा ह्या वचनीं । सूचवी कुरुनंदना ह्मणोनी । अर्जुनातें या नावें करूनी । आळविलो ॥२८॥ कीं आनंदवी कुरुवंशातें । कुरुनंदन ह्मणावें त्यातें । येथें सूचवी अर्जुनातें । कीं तूंही स्वपूर्वजांस उद्धरिसी ॥ २९ ॥ ऐसा तो वंशोद्धारक । जन्मांतरीं-

चा साधक । स्वयेंचि स्वहितीं प्रवर्ते कौतुक । आइक ह्मणतो श्रीकृष्ण या श्लोकीं ॥ १०३० ॥

॥ श्लोक ॥ पूर्वाभ्यासेन तेनैव ह्रियते ह्यवशोऽपि सः ।
जिज्ञासुरपि योगस्य शब्दब्रह्मातिवर्तते ॥ ४४ ॥

॥ टीका ॥ अगा पूर्वजन्म अभ्यास । त्याचिया चित्तास । ओढूनि ने विना प्रयास । योजी मोक्षमार्गींच ॥ ३१ ॥ जो स्वहिताविषयीं रत । तो स्ववश ह्मणावा निश्चित । कीं आपणास आपण अत्यंत । बुद्धींद्रियासहित वश असे ॥ ३२ ॥ अवश ह्मणावें त्याला । कीं स्वहिताचरण न घडे ज्याला । तैसा हा जरी अवश जाला । पूर्वाभ्यास त्याला न सोडी ॥३३॥ संसारबंधापासूनी । आपणास सोडवावें ह्मणोनी । हा पूर्वाभ्यास सिद्ध होऊनि । होता संस्काररूपें बुद्धींत ॥ ३४ ॥ प्रपंच्याचा विलास । जरी गोड लागे तयास । तरी पूर्वजन्मस्वहिताभ्यास । योजीच त्याला मोक्षमार्गीं॥३५॥ आतां आपलें हित । मोक्षप्राप्तीच निश्चित। परी शुद्ध करावया चित्त । कर्मयोगही पहिल्यानें पाहिजे ॥ ३६॥ तरी काय पूर्वाभ्यास । कर्मयोगीं योजितो यांस । ह्मणोनि वाटेल अर्जुनास । ये स्थळीं ॥ ३७ ॥ तरी कर्मयोगें करूनी । हा शुद्धचित्त होउनी । काम्यकर्में सर्व टाकुनी । जन्मांतरींच ज्ञानयोगीं प्रवर्तला ॥ ३८ ॥ मग योगापासूनि चळला । कीं मेला अथवा कुसंगें खवळला । या जन्मीं स्वहितीं वळला । पूर्वाभ्यासें ॥३९॥ जन्मांतरीं शुद्धचित्त । जाला करूनि कर्म निर्निमित्त । मग ज्ञानीं श्रद्धाउपजली अत्यंत । कर्मीं उपजली अश्रद्धा ॥१०४०॥ ज्ञानाचि तारक गमे ज्यास । शुद्धचित्त ह्मणावें त्यास । तेव्हां कर्मीं अनादर हा अभ्यास । पूर्वजन्माचा ॥४१॥ तो पूर्वील अभ्यास । कर्ममार्गीं कां ओवील त्यास । ज्ञानचि तारक ऐसी जयास । श्रद्धा होती पूर्वींच ॥ ४२ ॥ या लागीं हा अर्थ । ज्या वरूनि समजे पार्थ । ऐसें बोलतो आतां समर्थ । या श्लोकाच्या उत्तरार्धें करूनि ॥ ४३ ॥ ॥ उत्तरार्ध ॥ जिज्ञासुरपि योगस्य शब्दब्रह्मातिवर्तते॥ ॥टीका॥ अगा आत्मा कळोनि योगास । आरंभ करावा ऐसी पूर्वजन्मीं जिज्ञासा ज्यास । तोही अतिक्रमूनि वेदास । ये जन्मीं वर्तता ॥ ४४ ॥ इतकाच वाक्याचा अर्थ । तो विशद बोलतां यथार्थ । प्रगट होतो परमार्थ । ये रीती ॥४५॥ कीं ज्यास आत्मानात्मविवेक । कळला अन्वयव्यतिरेक । त्यास मुक्तीस साधन उरलें एक । कीं चित्तचिद्रूपयोगीं करावें ॥ ४६ ॥

आत्मजिज्ञासु पूर्वी होता । तो आत्मा कळला तत्त्वतां । आतां चिन्मात्र चिन्मयता । कैसी होय हा यत्न यानंतर ॥ ४७ ॥ तेव्हां योगाचें लक्षण । जाणों इच्छी विचक्षण । त्यास ह्मणे कमलेक्षण । योगजिज्ञासु ह्मणोनी । ॥ ४८ ॥ आत्मा जाणों इच्छितो । आत्मतत्त्वजिज्ञासु बोलावा तो । मग योगरीती जाणेन ऐसें अपेक्षितो । तो आत्मज्ञ योगजिज्ञासु ह्मणावा ॥ ४९ ॥ आणि अर्जुनें ज्याचा प्रश्न केला । तो योगाभ्यासीं घसरला । कीं अर्जुन बोलिला । "योगाच्चलितमानसः" ह्मणोनी॥१०५०॥ वृक्षापासूनि पर्ण गळे । तैसें योगापासूनि मन चळे ।"योगाच्चलित"या शब्दें स्पष्ट कळे । अर्थ ऐसा ॥ ५१ ॥ तो शब्दब्रह्म वेदातें अतिक्रमी । कृष्ण ह्मणे हें काय सांगों मी । योगजिज्ञासु तोही कर्मी । न प्रवर्ते प्रवर्ते या जन्मीं योगींच ॥ ५२ ॥ अर्जुना तुवां ज्याचेविषयीं प्रश्न केला । त्याहूनि नीच पायरीचा जरी असला । तोही अतिक्रमूनि वेदांला । प्रवर्तो हा भाव ॥ ५३ ॥ वेदांचें अतिक्रमणें । हेंचि कीं वेदोक्त कर्मादर न धरणें । काम्यकर्म तों ज्याणें । टाकिलें पूर्वजन्मींच ॥ ५४ ॥ एथें ऐसें बोलिला । आणि शुचिश्रीमंत-सदनीं त्याला । जन्म बोलिला तेव्हां प्राप्त जाला । विरोध कांहीं तोही परि-हरिला पूर्वींच ॥ ५५ ॥ कीं पवित्र शुचिष्मंत । आणि ते श्रीमंत । त्यांचा पुत्र तोही अत्यंत । सादर कर्मी होणार॥ ५६ ॥ तरी अनुभवूनि ब्रह्म । जी-वन्मुक्तही करी कर्म । हें लोकसंग्रहाचें वर्म । तृतीयाध्यायांत वर्णिलें ॥५७॥ हाही सत्कर्मी प्रवृत्त । परी या कर्मेंचि माझें स्वहित । ऐसें मानूनि नव्हे रत । कर्ममार्गी ॥ ५८ ॥ तोही पूर्वबुद्धिसंयोग । होय तोंवरी कर्मयोग । अनुष्ठी तारक ह्मणोनि मग । करी लोकसंग्रहाचिकारणें ॥ ५९ ॥ परंतु कर्मी अनादर । कीं नव्हे तो विधिकिंकर । यालागीं योगींच होऊनि तत्पर अतिक्रमी वेदांतें ॥ १०६० ॥ एवं पूर्वाभ्यास । ज्ञानमार्गींच योजी त्यास । कर्ममार्गी नसे ज्यास । आदर ऐसा श्लोकार्थ ॥ ६१ ॥ या भगवद्गीतेंत जो संक्षेप । श्रीमद्भागवतीं त्याचें विशद रूप । एकादशीं सच्चिदानंदस्वरूप । उद्धवाप्रति बोलिला हें ऐसेंचि ॥६२॥ भागवत श्लोक॥ "कुयोगिनो ये विहि-तान्तरायैर्मनुष्यभूतैस्त्रिदशोपसृष्टैः। ते प्राक्तनाभ्यासबलेन भूयो युंजंति योगं न तु कर्मतंत्रम्"॥१॥ टीका ॥ श्रीकृष्ण ह्मणे उद्धवा । ज्ञानी होऊनि यत्न-बरवा । योगाकारणें न करी तो ह्मणावा । कुयोगी ह्मणोनि ॥ ६३ ॥ ऐसे कुयोगी । यत्न न करिती आत्मयोगीं । देव घालिती विषयभोगीं । वळा-

त्कारें तयांतें॥६४॥देव विघ्नें करिती । विषयकामना नाना रीति । देऊनियां चेवविती । होऊं न देती योगसिद्धीतें ॥ ६५ ॥ ते देव इंद्रियाभिमानी । त्यांच्या इंद्रियांतें खवळूनी । स्त्रीपुरुषांच्या इंद्रियांतें क्षोभवूनी । विघ्नें करिती कुयोगियांतें ॥ ६६ ॥ करिती प्रजाशासन । जे राजसेवक जन । अतिक्रमूनि त्यांतें नृपदर्शन । प्रजांस होतां ते क्षोभती ॥ ६७ ॥त्या प्रजा रायाप्रती । न पावत ऐसीं विघ्नें करिती । राजकृपा होतां न लेखिती । प्रभा त्या आपणातें ॥६८॥ मनुष्य यजिती देवांतें । ते वृष्ट्यादि फळ देती त्यांतें । जे मुमुक्षु त्या निष्कामांतें । उपेक्षा तयांची ॥ ६९ ॥ ह्मणूनि देव क्षोभती । योगसिद्धि होऊं न देती । दोघांस त्यांचीं विघ्नें न बाधिती । कुयोगी ते या दोहींवेगळे ॥ १०७० ॥ या द्विविधा ज्ञानिया योगियांत । एक सेविती सगुण भगवंत । एक निर्गुणोपासक ते अत्यंत । क्लेशें देवकृत विघ्नें परिहरिती ॥७१॥ "क्लेशोधिकतरस्तेषां"ह्मणोनी । द्वादशाध्यायांत या भावें करूनी । श्रीकृष्ण बोलेल त्या वचनीं । समजावा हा अर्थ ॥७२॥ जे ज्ञानी होऊनि सगुणाची । कांस न सोडिती त्यांची । देवकृतविघ्नें हरूनि योगाची । सिद्धि अनायासें ईश्वर देतसे ॥७३॥ "तेषामहं समुद्धर्ता" ह्मणोनी । द्वादशाध्यायांत या भावेंकरूनी । श्रीकृष्ण बोलेल कीं सकळ विघ्नें हरूनी । मी उद्धरणार भक्तांतें ॥ ७४ ॥ हाचि अर्थ भागवतीं । पुनःपुनः स्कंधस्कंधाप्रती । निरूपिला तीं प्रमाणें किती । वाखाणावीं ये स्थळीं ॥ ७५ ॥ ग्रंथ-वाढेल फार । ह्मणूनि दाविजे तो अनुकार । एवं देवकृत विघ्नें परिहार । अनायासें भगवद्भक्तां ज्ञानियांचा ॥ ७६ ॥ ज्ञान जालियाउपरी । सगुण सोडोनि निर्गुणाचवरी । प्रीति धरूनि बरी । अवलंबिली जिहीं असंगता ॥ ७७॥ देव त्यांस विघ्नें करिती। परी ते अतिक्लेशें परिहरिती । निःसंग होऊनि धरिती । अभ्यास आत्मयोगाचा ॥ ७८ ॥ तेहि ह्मणावे सुयोगी । देवविघ्नें तयांलागीं । न बाधती आणि जे कुयोगी । देवविघ्नें बाधकें होती तयांतें ॥ ७९ ॥ जे आत्मा समजोनी । आणि योगींहि प्रवर्तोनी । अभ्यास बरा न करिती ह्मणोनी । कुयोगी ह्मणावें तयांतें ॥ १०८०॥ गोष्टी तयांची प्रस्तुत । कीं देव त्यांस विघ्नें अत्यंत । करिती निघोनि इंद्रियांत । त्यांच्या आणि मनुष्यांच्या ॥ ८१ ॥ विघ्नें मनुष्याकृती । त्यांत कांहीं पुरुष कांहीं युवती । योगास विघ्नें करिती त्या किती । प्रसिद्ध गोष्टी बोलाव्या ॥ ८२॥ एवं जे कुयोगी । देव विघ्नें करिती ज्यांलागीं । ते योगभ्रष्ट होऊनि मेले

जगीं । मुक्ति नाहीं पावले त्या जन्मीं ॥ ८३ ॥ ते शुचिश्रीमंतसदनीं । पुन्हा उत्तम जन्म पावोनी । प्राक्तनाभ्यासबळें करूनी । आत्मयोगीं यो-जिती चित्तातें ॥ ८४ ॥ परंतु कर्माकडे न भरती । आत्मयोगींच चित्त योजिती । ऐसें उद्धवातें श्रीपती । श्रीमद्भागवतींही बोलिला ॥ ८५ ॥ एवं या प्रस्तुतीं । गीतेंत अर्जुनाप्रती । "शब्दब्रह्मातिवर्तते" ऐसें जगत्पती । तोचि बोलतो ॥ ८६ ॥ एवं बालदशेपासूनी । मोक्षाची इच्छा धरूनी । कर्म-मार्गीं रत नसे तरी सज्जनी । त्यास उपदेश मोक्षमार्गींचा करावा ॥ ८७॥ कीं तो जन्मांतरीं । ज्ञानमार्गींच होता यापरी । परीक्षा करूनि अंतरीं । अधिकारी जाणावा यज्ञाचा ।। ८८ ॥ एवं या गीताश्लोकीं । श्रीकृष्ण ऐसें बोलिला कीं । तो जरी गुंते लौकिकीं । पूर्वाभ्यास मोक्षमार्गींच ओढी तयास ॥ ८९ ॥ तो अतिक्रमूनि कर्म । धुंडुं लागे परब्रह्म । योग साधूनि उत्तम । मोक्ष पावे हें पुढें बोलिजेल ॥ १०९० ॥ आतां यानंतर श्लोक । तो कां बोले उत्तमश्लोक । त्याचें निमित्त सुज्ञ लोक । परिसोत आधीं ॥ ९१ ॥ योगभ्रष्ट या जन्मीं । स्वहित साधी परब्रह्मीं । परि न पडे कर्मीं । ऐसें बो-लिला श्रीकृष्ण ।। ९२ ॥ आणि त्याचा पूर्वाभ्यास । बळेंचि त्याच्या हि-ताकडे त्यास । ओढी ऐसेंही जगन्निवास । पूर्वश्लोकीं बोलिला ॥ ९३ ॥ या दों गोष्टींत दोनी । संदेह उपजले पार्थाच्या मनीं । कीं या जन्मीं काय ह्मणोनी । यत्न करावा त्यानें योगाचा ॥ ९४ ॥ कीं तो पूर्वाभ्यासेंचि सिद्ध । होणार हें जालें प्रसिद्ध । तरी त्यानें विषयसमृद्ध । यथेष्ट कां न भोगावें ।। ९५ ॥ आणि " यतते च ततो भूयः " ह्मणोनी । पूर्वश्लोकीं या वचनीं । मोक्षार्थ यत्न अत्यंत त्याचा दावूनी । स्वयें बोलिला॥९६॥ आणि पूर्वजन्मीं शुद्धचित्त । कर्में करूनि जाला निश्चित । तरी शुद्ध वस्त्रही असे होत । मलिन बहु काळेंकरूनी ॥ ९७ ॥ तरी याही जन्मीं । चित्तशु-द्धि करणें कर्मीं । कां रत नसावें वेदोक्त कर्मीं । ऐसी शंका दूसरी॥९८॥ शंका दोनि यापरी । उपजतां अर्जुनाच्या अंतरीं । तत्परिहारवाक्यें बरीं । आतां या श्लोकीं बोलतो ॥ ९९ ॥

॥ श्लोक ॥ प्रयत्नाद्यतमानस्तु योगी संशुद्धकिल्बिषः ।
अनेकजन्मसंसिद्धस्ततो याति परां गतिम् ॥ ४५ ॥

॥ टीका ॥ अगा मुक्ति जे कां परम गती । प्रयत्नेंचि करूनीच ते गती-प्रती । पावतो ऐसें श्रीपती । बोलोनि परिहरी एक शंका ॥ ११०० ॥ कीं

पूर्वाभ्यास त्याचा । बळेंचि त्यास ओढी हें स्ववाचा । बोलिलों अर्थ साचा । त्याचा इतकाच ॥ १ ॥ कीं ज्ञानमार्गींच सादर । त्यास करी पूर्वसंस्कार । कर्म अतिक्रमूनि निर्धार । ब्रह्मींच करितो यास्तव ॥ २ ॥ अगा जो ग्रंथ जेथवरी । पाठ करूनि विसरे तेथवरी । पूर्वाभ्यासें झडकरी । पाठ होय त्या पुढें लागे प्रयत्न ॥ ३ ॥ एवं ज्ञानमार्गच उत्तम । इतकेंचि पूर्वाभ्यासें सुगम । पुढें स्वरूपीं चित्तसंयम । हा यत्न करणें लागेच ॥ ४ ॥ परी इतरासारिखे श्रम । त्यास न लागती करितां चित्ताचा संयम । कीं अश्रुत वेदही होती सुगम । योगाभ्यासीं पूर्वीं विरूढली वाणी जयाची ॥ ५ ॥ एवं सुगम रीती । प्रयत्न त्यासही लागती । शंका एक जगत्पती । परिहरी ऐशिया भावें ॥ ६ ॥ आतां पूर्वजन्मीं शुद्ध चित्त । तरी काळ लोटला अत्यंत । पुन्हा त्याच्या सिद्धीनिमित्त । कर्मयोग कां न करावा ॥७॥ऐसी शंका दुसरी । अनेक"जन्मसंसिद्धः"या वचनें हरी । "संशुद्ध किल्बिषः" ह्मणोनिही हरी । द्वितीय शंका ॥ ८ ॥ कीं अनेक जन्म । अगा करितां निष्काम कर्म । आत्मत्वें जाणावें ब्रह्म । हे जिज्ञासा उपजते ॥ ९ ॥ ब्रह्मजिज्ञासा उपजली । तेव्हांचि शुद्धि बुद्धीची जाली । कीं भोगवासना वाईट वाटली । दोहीं लोकांची जेधवां ॥ १० ॥ आतां ह्मणशील योगभ्रष्ट जाला । तेव्हां पुन्हा मळ लागला । कीं धौतपटही मळला । बहुतां काळें जे रीती ॥ ११ ॥ तरी विषयचि गोड तत्त्वतां । ते अनादि बुद्धीची मलिनता । कठिणता आणि शामता । लोखंडाची जे रीती ॥ १२ ॥ त्या लोहातें लागे परीस । मग कठिणता शामता नये त्यास । ऐसा त्याचा पूर्वाभ्यास । "योगी विगतकल्मषः" ह्मणतां सूचवी ॥ १३ ॥ निष्काम कर्में ईश्वरीं । अर्पितां जन्मांतरीं । परिसास लोह लागे यापरी । विगतकिल्बिष पूर्वींच हा जाला ॥ १४ ॥ आतां योगभ्रष्ट जाला । ह्मणोनि ह्मणसी मळ लागला । तों तों वरील मळ चढला । सोनें मलिन जैसें धुळीनें ॥ १५ ॥ त्यास लागतांच हात । शुद्ध होय निश्चित । एवं लोहत्वीं किल्बिष अत्यंत । तैसा अनादि मळ किल्बिष तें नाहीं ॥ १६ ॥ ह्मणोनि शुद्ध किल्बिष त्याला ह्मणावें । तेथें संशुद्ध किल्बिष ह्मणे या भावें । संशुद्ध ह्मणतां जाणावें । कीं समीचीन प्रकारें तो शुद्ध ॥ १७ ॥ ऐशा शंका दोन्ही हरूनी । आतां योग थोर सर्वांहुनी । तो योग तूं अनुष्ठीं ह्मणोनि । योगी सर्वांत थोर ह्मणतो या श्लोकीं ॥ १८ ॥

॥ श्लोक ॥ तपस्विभ्योऽधिको योगी ज्ञानिभ्योपि मतोऽधिकः ।
कर्मिभ्यश्चाधिको योगी तस्माद्योगी भवार्जुन ॥ ४६ ॥

॥ टीका ॥ अंगा अर्जुना तपस्वी । तपें पावती थोर पदवी । परी तीं तपें आणि फळें जाणावीं । नश्वरें दोन्ही ॥ १९ ॥ अगा तैसा नव्हे योगी । जो निजानंदपदींच चित्तालागीं । योजी आणि देह जीवंत असतां जगीं । प्राप्ति निजानंदपदाची ज्याला ॥ ११२० ॥ योगी तपस्वी याहूनि । अधिक कोटिगुणेंकरूनि । योगी होय ह्मणे ह्मणोनि । अर्जुना तूंहि ॥ २१ ॥ कोणीं कर्मेचि करिती । नाना देवतातें यजिती । उत्तम लोकासही जाती । शेवटीं सकळही नश्वर ॥ २२ ॥ कर्मकर्त्याहूनी यालागीं । कोटिगुणें अधिक योगी । ह्मणोनि होय तूंहि जगीं । योगी अगा अर्जुना ॥ २३ ॥ अगा ह्मणसी तीं सकामें । वाईट तपें आणि कर्मे । मी जीं करीन तीं निष्कामें । त्याणें मोक्ष पावेन ॥ २४ ॥ तरी निष्कामाचें फळ । आत्मज्ञान केवळ । मागुती तेथें चित्त करणें निश्चळ । तो योग ॥ २५ ॥ एवं ज्ञानियाहीहुनी । योगी अधिक ह्मणोनी । यास्तव ह्मणतो कृपेंकरूनी । कीं तूं योगी होईं अर्जुना ॥ २६ ॥ एथें बोलिले ज्ञानी । कीं योगी थोर जयाहुनी । ते ज्ञानी शास्त्रज्ञानी । ऐसें कोणी बोलती ॥ २७ ॥ ज्याच्या मतें आत्मा कळला । मग योग कां पाहिजे त्याला । ते येथें बोलती या बोला । कीं आत्मज्ञानी तोचि योगी ह्मणोनि ॥ २८ ॥ आत्मा कळला ज्यालागीं । तितके ज्ञानेंचि तो योगी । ऐसें मत ह्मणोनि या प्रसंगीं । ज्ञानी तो शास्त्रज्ञानी एथें बोलती ॥ २९ ॥ एक वेदांताविणें । शास्त्रमात्र ज्याला दूषणें । योग थोर ह्मणतां घेणें । लागेल योगशास्त्र ॥ ११३० ॥ तरी योगशास्त्रींच्या इतर रीती । टाकूनि योगचि जगत्पती । या गीतेंत बोले आणि श्रुती । वदती व्यतिरेक अन्वय दोन योग ॥ ३१ ॥ योग न साधे जोंवरी । देहात्मसंस्कार न तुटे तोंवरी । ह्मणोनि योग उपपादूनि यापरि । बोलती श्रुति ॥३२॥ श्रुति ॥ यदि। पंचावतिष्ठंते ज्ञानानि मनसा सह । बुद्धिश्च न विचेष्टते तमाहुः परमां गतिम् । तां योगमितिमन्यंते स्थिरामिंद्रियधारणाम् । अप्रमत्तस्तदा भवति योगोहि प्रभवाप्ययौ ॥ श्रुत्यर्थ ॥ जेव्हां पांचां ज्ञानेंद्रियांच्या वृत्ती । मनासहित निश्चळ राहती । बुद्धीची चेष्टा गती । राहे परमगती त्या गतीतें ह्मणावें ॥ ३३ ॥ ऐसी जे परमा गती । तीतें योग ह्मणोनि ह्मणती । त्या योगाची हेचि स्थिती । कीं स्थिरा इंद्रियांची धारणा ॥ ३४ ॥ कीं प्रपंच

ह्मणावें तया । जो अनुभवा ये पांचां इंद्रियां । शब्द स्पर्श रूप रस गंध यां । वेगळा प्रपंच काय असे ॥ ३५ ॥ चित्त जालें चिन्मय । तेव्हां कोण्या विषयातें कोण कल्पी इंद्रिय । प्रत्यगात्मस्मृतीचाच निश्चय । तन्मयत्वेंचि उरे बुद्धीचा ॥ ३६ ॥ ऐसी धारणास्थिती । तीस योग ऐसें ह्मणती । परि अप्रमत्त तेव्हां जेव्हां ये रीती । स्थिति बाणे॥३७॥ ज्यास स्वरूपाची विस्मृती । त्यास प्रमत्त ह्मणती । स्मृति जातां पदच्युती । प्रमत्तातें॥३८॥ ऐसा योग न बाणे । श्रुति त्यातें अप्रमत्त ह्मणे । कीं योगसिद्ध शाहाणे । ते स्वचिदात्मता न विसरती ॥ ३९ ॥ चिदात्मता आपली विस्मरे । तेव्हां देहात्मता आयती स्फुरे । मग काय ते समयीं उरे । अंतर ज्ञानिया अज्ञानियास ॥ ११४० ॥ कोणी एथें ह्मणती । कीं आपणास सौभाग्यवती । ऐसें जरी सुवासिनी न स्मरती । तरी अहेवपण गेलें काय त्यांचें ॥ ४१ ॥ तरी सौभाग्यातें विसरती । आणि क्षौरकातें आतळती । तरी तीस* स्मृति धरणें लागती । अगत्य आपल्या सौभाग्याची ॥४२॥ बुद्धीस जेव्हां चिदात्मता । न स्फुरे स्फुरे तेव्हां देहात्मता । हा संस्कार न्हावी आयता । सिद्ध बैसला मुंडनातें ॥ ४३ ॥ कोणी ह्मणती ब्राह्मण । न स्मरे कीं ब्राह्मण आपण । तरी तें काय गेलें शहाणपण । मूर्ख कोणी दाविती ॥ ४४ ॥ जो भ्रष्टोनि शुद्ध जाला । मी शुद्ध जालों हें न स्मरे ज्याला । तो विसरूनी अन्न भक्षुं लागला । इतर नीच जातींचें ॥ ४५ ॥ पूर्वसंस्कारें देहात्मत्व । जरी न मानी ज्ञानियाचें सत्त्व । तरी चिदात्मत्व विस्मरणें पूर्णत्व । न जाय ऐसें अंगीकारूं ये ॥ ४६ ॥ असोत दांभिकाचे बोल । परमार्थही न फोल । परी त्यातें मानूनि सखोल । वायां जाती उपेक्षूनी योगातें ॥४७॥ एवं "अप्रमत्तस्तदा भवति" । येथपर्यंत श्रुती । योगशब्दें हे स्थिती । विशद व्यतिरेक यागीं बोलिली॥४८॥उरला शेवटील चरण । त्यांत अन्वय योगविवरण । ज्या योगीं मायेचे तिन्ही गुण । तेही निर्गुणाचि लक्षावे ॥ ४९ ॥ श्रुत्यंतिम चरण । "योगो हि प्रभवाप्ययौ" ॥श्रुत्यर्थ॥ प्रभव ह्मणजे उत्पत्ती । अप्यय नाशास ह्मणती । या दोहींतें ह्मणे श्रुती । योग ह्मणोनि ॥११५०॥ कीं सृष्टि आणि संहार जगास । ब्रह्म हेमीं जैसें नगास । नग उपजणें असणें नाशणें तिघांस । अधिष्टान सोनें तैसें जगासही ब्रह्म ॥ ५१ ॥ एवंच ब्रह्मचि न्होनि विश्व जालें । ब्रह्मचि त्याचा नाश जें अंतीं उरलें । स्थितिकाळीं ही ब्रह्मचि या बोलें । सूचविलें श्रुतीनें ॥ ५२ ॥ कीं सोनेंचि अळं-

कार जो जाला। उरलें नाशूनि तेंचि नाश त्यांच्या बोला। होऊनि नासे तों-पर्यंतही त्याला। सोनेंचि कीं ह्मणावें ॥ ५३ ॥ एवं अलंकाराचें उपजणें। सोनें आणि सोनेंचि त्याचें नाशणें। तेव्हां सोनेंचि असणें। उपजोनि नासे तोंपर्यंत ॥ ५४ ॥ तरंगउत्पत्ति जळ। त्याचा नाश तेंचि केवळ। तरंग आहे तोंवरीही निखळ। उदकचि असे ॥ ५५ ॥ कार्यांत निखळ कारण। पाहाणें ऱ्यास योगनिपुण। योग ह्मणती श्रुतीही खूण। हेंचि दावी ॥ ५६ ॥ ज्याचें जें उपादान कारण। त्या कार्यास प्रत्यक्षीं कारणपण। त्याचें उपजणें नाशणेंही आपण। कारणचि दिसे ॥ ५७ ॥ येविषयीं प्रमाण श्रुती। आणीकही उदंड असती। परंतु पावेल विस्ताराप्रती। ग्रंथ हा ॥ ५८ ॥ एवं योगशास्त्ररीती। टाकूनि गीता पुराणें श्रुती। वाखाणावया ज्ञानस्थिती। योग बोलती तो मोक्षातें अगत्य ॥ ५९ ॥ हा अर्थही या प्रस्तुतीं। स्पष्ट बोलिली श्रुती। "कीं अप्रमत्त स्तदा भवति"। श्रुति ह्मणे ॥ ११६० ॥ कीं देहात्मसंस्कारें प्रमत्त। नव्हे तेव्हां ह्मणावा अप्रमत्त। ऐसा अप्रमत्त तेव्हां कीं जेव्हां चित्त। चिन्मययोगीं होतसे ॥ ६१ ॥ या गोष्टीचा प्रसंग। या-वरूनि कीं योग। ज्ञानी न साधी तों नव्हे भंग। देहात्मत्वसंस्काराचा ॥ ६२ ॥ कोणी न मानिती हा सिद्धांत। साभिमान जाले वाचूनि वेदांत। आत्मज्ञानी ह्म-णवूनि भ्रांत। देहात्मभावें सर्वदा ॥ ६३ ॥ योग थोर बोलिला जेथें। ते आत्म-ज्ञानमात्र वाखाणिती तेथें। प्रस्तुतीं ज्ञानियाहूनि योगी थोर एथें। तो ज्ञानी शास्त्रज्ञानी ऐसें बोलती ॥ ६४ ॥ जड चैतन्य भाग दोन्ही। समज-ला तोचि योगी अनुभवी ज्ञानी। तो ज्या ज्ञानियाहूनि थोर ह्मणोनी। व-र्णिला तो शास्त्रज्ञानी ह्मणती ॥ ६५ ॥ कीं आत्मत्वमात्र समजला। योगी शब्दें तोचि ह्मणती एथें वर्णिला। त्याहूनि उणा ज्ञानी बोलिला। तरी तो ह्मणती शास्त्रज्ञानी ह्मणावा ॥ ६६ ॥ आत्मा कळल्यावरी। चित्त चिन्मय करावें त्याउपरी। ऐसें ते मानिते जरी। तरी आत्मज्ञानियाहूनि योगी थोर ते ह्मणते ॥ ६७ ॥ असो आत्मज्ञानियाहुनी। योगी थोर ह्मणोनी। अर्थ या भगवद्वचनीं। बोलिला पाहिजे ॥ ६८ ॥ एवं तपस्वी कर्मी ज्ञानी। योगी थोर या सर्वांहुनी। श्रीकृष्ण ह्मणे ह्मणोनी। होय तूं योगी अर्जुना ॥ ६९ ॥ कीं तुज आत्मज्ञान। होईल मग आपलें मन। स्वरूपरूप करूनि मोहन। मोडी देहात्मतेचें ॥ ११७० ॥ ऐसा योगीही होउनी। मज सगुणातें भजे ह्मणोनी। योगी भक्त सर्वां योगियांहुनी। थोर ह्मणतो आतां या श्लोकीं ॥ ७१ ॥

॥ श्लोक ॥ योगिनामपि सर्वेषां मद्गतेनांतरात्मना ।
श्रद्धावान् भजते यो मां स मे युक्ततमो मतः ॥ ४७ ॥

इति श्रीमद्भगवद्गीतासूपनिषत्सु ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे श्रीकृष्णार्जुनसंवादे अर्जुनविषादयोगो नाम षष्ठोऽध्यायः ॥

॥ टीका ॥ अगा सर्वांत थोर योगी । ह्मणूनि पूर्वश्लोकीं बोलिलों तुजलागीं । त्याही सर्वां योगियांत जगीं । थोर जो योगी मद्भक्त ॥ ७२ ॥ जो श्रद्धावंत भक्त । ज्याचें अंतःकरण माझ्या स्वरूपीं अनुरक्त । त्या अंतःकरणें योगयुक्त । भजे मातें ॥७३ ॥ योगी तितुके ह्मणावे युक्त । परि ज्याचें चित्त सगुणीं अनुरक्त । वरकड युक्त तो युक्ततम भक्त । मज संमत बहुत तो योगी ॥७४॥ युक्त योगी ह्मणावा । युक्ततम तो थोर योगी गणावा । आणि मज संमत जो मनोभावा । मज सगुणीं योजी तो भक्तीनें ॥ ७५ ॥ ऐसेंच सप्तमाध्यायांत । ज्ञानी भक्त थोर अत्यंत । ह्मणोनि ह्मणेल भगवंत । द्वादशीं तरी दोहींत थोर यातेंचि ह्मणेल ॥ ७६ ॥ एथें निर्गुणोपासक । आत्मा कळतांच जे सगुणोपेक्षक । ते दाखविती पांडित्यकौतुक । जों पुसता नाहीं भेटला ॥ ७७ ॥ कोणी ह्मणती योगियांत । भक्त थोर ह्मणे भगवंत । ते योगी आत्मज्ञानंव्रत । ऐसें नव्हे ॥ ७८ ॥ जे यमनियमादि विचित्र । योगमार्ग अनुष्ठिती पवित्र । ते आत्मज्ञ न होती योगी मात्र । त्यांत स्वभक्त श्रेष्ठ ह्मणोनी श्रीकृष्ण ह्मणतो ॥ ७९ ॥ ज्ञानाभिमानी हो अरे । प्रसंग कोण हें विचाराना कां बरें । ऐसी क्लिष्ट कल्पना कल्पूनि खरें । टीकाकार जगीं ह्मणवितां ॥ ११८० ॥ यामागें तिसरा श्लोक । तेथें बोलिला उत्तमश्लोक । कीं यतमान योगीं प्रयत्न अनेक । करूनि परम गतीतें पावतो ॥ ८१ ॥ तो तों आत्मज्ञानी ह्मणावा । आतां त्या पुढिल्या श्लोकीं जो श्रेष्ठ गणावा । तो ज्ञानहीन कोठोनि आणावा । तपस्वी कर्मी तेव्हां भक्त ज्ञानियाहूनि थोर ॥८२॥ त्या पुढिलिया श्लोकांत । "योगिनामपि" सर्वेषां ह्मणे भगवंत। तो श्रेष्ठ ज्ञानहीना योगियांत । अरे साभिमान हो कां ह्मणतां ॥८३॥ "योगिनामपि सर्वेषां" या वचनीं । योगियांतही सर्वांत युक्ततम ह्मणोनि । भगवंत ह्मणतो एथें कोठूनी । ज्ञानहीन योगी तुह्मीं आणिले ॥८४ ॥ मागें तिसरिया श्लोकीं योगी । मुक्ति बोलिली ज्यालागीं । तो ज्ञानियाहीहूनि थोर जगीं । या मागिल्या श्लोकीं वर्णिला ॥ ८५ ॥ तैशाही सर्वां योगियांते । माझा भक्त युक्ततम अत्यंत । ऐसें स्पष्ट बोले भगवंत ।

तें कां रे तुह्मीं मोडितां ॥ ८६ ॥ हा मुख्यार्थ मानाना जरी । अभिमान स्थापला तुह्मांवरी । आणि अंगीकाराल तरी । ज्ञानियांत भक्तज्ञानी तो थोर ॥ ८७ ॥ त्यांतचि अन्य टीकाकार । ते तेथें अन्य प्रकार । बोलती कीं नानादेवता इतर । त्यांचे उपासक ते योगी ॥८८ ॥ त्या सर्वा योगियांत । स्वभक्त थोर ह्मणतो भगवंत । एवं च ते योगी नव्हती ज्ञानवंत । ज्यांत भक्त थोर वाखाणिती ॥ ८९ ॥ तरी हें उपासना प्रकरण । नसतां क्लिष्टकल्पित विवरण । योगीशब्दाचें यांत स्फुरण । स्पष्ट दिसतें अभिमानाचें ॥११९०॥ मागिलिया तिसरिया श्लोकापासूनी । योगी थोर सर्वांहूनी । त्यांतही भक्त श्रेष्ठ ह्मणोनी । या श्लोकीं ह्मणे भगवंत ॥९१ ॥ हा शुद्धपक्ष अंगीकारा । टाकानि अभिमान सर्वेश्वरा । सगुणातें भजोनि तरा । सर्वात्मत्वें ॥ ९२ ॥ हा अध्यायाच्या अंतींचा श्लोक । जेथें ज्यांस सर्वात्मत्व अवलोक । ते भक्त-थोर ऐसा उत्तमश्लोक । स्थापिता जाला सिद्धांत ॥९३ ॥ हेचि भक्ति विशद अत्यंत । उत्तराध्यायापासूनि भगवंत । द्वादशाध्यायपर्यंत । बोलेल आतां ॥९४ ॥ आत्मज्ञानाविण । भक्ती तें अन्न अलवण । आणि अन्नावांचूनि लवणचर्वण । भक्तीवांचूनि ऐसा आत्मबोध ॥ ९५ ॥ ऐसी टीका वामनी । हाचि अनुभव बरवा मनीं । जे पाहती दिनयामिनीं । ते भगवद्भक्ति आत्मयोगीं देखतीं ॥ ११९६ ॥

॥ वामनकृत संस्कृत श्लोक ॥

गोष्ठे दधारात्मकरेण योगं षष्ठेऽर्जुनायादिशदात्मयोगम् ।
स आविरक्तः स्थिरजंगमेषु सिंधूर्मिवच्चिज्जडसंगमेषु ॥ १ ॥
इति श्रीमद्वामनपंडितविरचितायां यथार्थदीपिकायां षष्ठोऽध्यायः ॥

---

# अध्याय ७ वा.

---

श्रीमते भगवते भगवत्तमाय मायापतये सर्वोत्तमाय श्रीकृष्णाय नमः ॥

जय जय विजयसूत । जयजय गीतापीयूषजीमूत । जय जय चराचर भूत । परापरप्रकृत्यधिष्ठान ॥१॥ जयजय मायापते । जय जय प्रसन्न मायातीत गते । जय जय जगत्कल्पना मते । जगदात्मन् ॥२॥ जय जय सत्त्व रज तम फणिगुण । जयजयाशेषकल्याणगुण । जय जय मुक्त मुमुक्षु

सेव्य सगुण । जगद्गुरो ॥ ३ ॥ जय जय कामाकामसेवित । जय जयापरोक्षसंपन्न सद्भक्तसंमत । जय जय बुधभक्त सुप्रीत । परम गुरो श्रीहरे ॥ ४ ॥ जय जय बहु जन्म सिद्धोपासित । जय जय सर्व वासुदेवाच्युत । जय जय जडतरंगबोधामृत । देवाधिदेव ॥ ५ ॥ जय जय जगदावास । जय जय जगन्निवास । जय जय श्रीवल्लभ श्रीनिवास । श्रीवत्सांक शेषपर्यंक । ॥ ६ ॥ जय जय चरण शरण ज्ञानप्रद । जय जयानाद्यविद्याध्वंस गोविंद । जय जय कैवल्यदायक मुकुंद । जगदेकनाथ ॥ ७ ॥ ऐशिया श्रीशेषशयना । वंदूनि तूतें कमलनयना । गीता सप्तमाध्याय टीकारचना । करीन तुझ्या प्रसादें ॥ ८ ॥ तूंचि गीता तूंचि गीताकार । तूंचि टीका तूंचि टीकाकार । गीतेंत हेंचि हाचि प्रकार । टीकेंतही ॥ ९ ॥ तुजवांचूनि काय असे । तंतूचि जैसा पट दिसे । कीं मृगजळीं वसे । भानु एक ॥ १० ॥ आतां षष्ठाध्यायावरी । सप्तमाध्याय कां परी । आरंभतो हें अर्जी हरी । बोलतों तुझ्या मूर्ती श्रोते त्यांप्रती ॥ ११ ॥ षष्ठाध्यायामाजि योग । बोलतां योगभ्रष्टप्रसंग । अर्जुनें पुसतां श्रीरंग । विशद बोलिला ॥ १२ ॥ कीं उत्तमश्लोकातें जाउनी । बहु काळ तेथें राहुनी । पुन्हा उत्तम जन्म पावोनी । त्या जन्मीं मुक्ति पावतो ॥ १३ ॥ सकळांमाजि यालागीं । श्रेष्ठत्वें वर्णिला योगी । त्या सर्वां योगियांतही जगीं । योगी अतिश्रेष्ठ जो स्वभक्त॥१४॥योगियांत योगी उत्तम । तो स्वभक्त युक्ततम । ऐसें बोलिला सर्वोत्तम । शेवटीं षष्ठाध्यायांत॥१५॥ तरी सगुणीं भजे तो भक्त। आत्मत्वें भजे तो योगयुक्त । त्याचि योगीं कोंवि अनुरक्त। सगुणा परमेश्वरातें ॥१६॥ ऐसें अर्जुनाच्या मनीं । तत्काळ वाटलें ह्मणोनी । तो प्रश्न करी जों तों स्वयेंचि एथुनी । तेंचि सप्तमाध्यायांत उपदेशितो ॥ १७ ॥ कीं सगुण चौं भुजांचा ह्मणावा । तरी द्विभुज राम निर्गुण गणावा । आतां मनुष्याकार सगुण जाणावा । तरी मत्स्यकूर्मादि हे कोण॥ १८ ॥ आतां असावा आकार कांहीं । त्यावांचूनि सगुणत्व नाहीं । तरी चराचर साक्षी हाही । साकार तेव्हां लेखावा ॥ १९ ॥ साक्षीही साकार । हाही अंगीकारावा प्रकार । ह्मणूनि जरी ये विचार । एथवरी ॥ २० ॥ तरी साक्षी एक आहे । जो सर्वत्र सर्व पाहे । तो देखिला नसोनि बुद्धि साहे । काय ह्मणोनि हे गोष्टी ॥ २१ ॥ तेव्हां वेदशास्त्रें बोलती । ह्मणूनि अंगीकारावी हे रीती । तरी साक्षित्व वर्णिती श्रुती । सगुण आणि निराकार ॥ २२ ॥ श्रुति ॥ अपाणि-

पादो जवनो गृहीता पश्यत्यचक्षुः स शृणोत्यकर्णः । स एव वेद्यं न च तस्य वेत्ता तमाहुरग्र्यं पुरुषं पुराणं ॥ श्रुत्यर्थ ॥ नसोनि हस्त चरण । वेगवंत आणि करी ग्रहण । नसोनि चक्षु श्रवण । पाहे आणि आयके ॥ २३ ॥ हा-ताविणें घेणें । आणि वेग पायांविणें । दोन्हींही गोष्टी व्यापकपणें । घडती आकाशदृष्टांतें ॥ २४ ॥ कीं जें असेल जेथें । तें आकाशें आपणांत घेतलें तेथें ? तैसें व्यापका वेगळें एथें । काय असे आकाशांत ॥ २५ ॥ पक्षी उ-डे गगनीं । तों गगन पुढें असे त्याहूनी । गगन वेगवंत ह्मणोनी । या गुणें ह्मणावें ॥ २६ ॥ तैसें हस्तावांचूनि ग्रहण । आणि वेग पायांवीण । ऐसें न-सोनि चक्षु श्रवण । पाहे आणि आइके ॥ २७ ॥ विचारितां हें लक्षण । दिसतें शुद्ध निर्गुणपण । परि दर्शन आणि श्रवण । निर्गुणीं न घडे ॥२८॥ मायायोगें द्रष्टेपण । मायायोगेंचि श्रवण । तैसें सर्व पदार्थांचें ग्रहण । सर्व मजमाजी जो जाणे तयातें ॥ २९ ॥ मन धांवे जेथपर्यंत । त्याहूनि पुढें आपण अनंत । ज्यास ऐसें जाणणें वेगवंत । ह्मणावा तोचि ॥ ३० ॥ एवं पश्यति आणि शृणोति । ह्मणूनि बोले श्रुति । तेव्हां हेही धर्म त्यांत असती । कीं आपण गृहीता आणि वेगवंत ॥ ३१ ॥ ऐसें सगुण साक्षित्वा-चें रूप । माया आणि शुद्ध चित्स्वरूप । ब्रह्म माया दोन्हीं अरूप । उभय योगें साक्षित्वकार्य मायेचें ॥ ३२ ॥ तरीच माया आणि ब्रह्म । अव्यक्त दोहींचें नाम । ब्रह्मीं श्रवण दर्शनादि नसती धर्म । मायायोगें सधर्मत्व ॥ ३३ ॥ त्यास ह्मणावें सगुण । अवतारीं साकारपण । अवतार ज्याचे तो आपण । सगुण होउनिही निराकार ॥ ३४ ॥ अवतार त्याची कल्पना । कल्पनात्र त्याची विश्वरचना । ज्ञानदृष्टि पाहतां असेना । चराचरास अव-तार रूपास भिन्नत्व ॥ ३५ ॥ त्यांत इतकेंचि अंतर । कीं ईश्वरांश जीव कर्मानुसार । हे देह पावती आणि अवतार । स्वेच्छा कल्पित तारक तया जिवांचे ॥ ३६ ॥ तथापि माया कल्पित । अवतार आणि चराचर निश्चित । दोन्ही समान भगवंत । देह आपले मानितो ॥ ३७ ॥ लक्षूनि जिवांचें कर्म । स्वयें होतो स्थावर जंगम । लक्षूनि त्यांचा उद्धार सर्वोत्तम । अवतरतो स्व-यें तोचि ॥ ३८ ॥ हे नेणती जीव । जैसें अविद्येस्तव । तैसेंचि नेणती अव-तारविभव । परि भेद न देखे ईश्वर ॥ ३९ ॥ राजा शिरीं भूषणें धरी ।

---

१ घेणें २ ग्रहण करणारा. ३ धांवणारा. ४ साक्षिपणाचें काम. ५ अव-ताराचें वैभव.

त्याच हेमें नाना परी । गज रथ अश्वादि अलंकारी । समवित्त आपलें तो पाहे ॥ ४० ॥ या प्रकारें चराचर । ईश्वरास वाटे आपलें शरीर । आणि अनुभव हा निरंतर । कीं शुद्ध निर्गुण आपण ॥ ४१ ॥ जैसा तंतूचि पट ! आणि मातीच घट । ऐसें निर्गुणचि निपट । त्रिगुण विश्व ॥ ४२ ॥ ऐसें पाहणें बाणे । त्यास योग ह्मणती शाहणे । तो योगी दृश्य मिथ्या ह्मणे । त्याचा प्रकाशक आत्मा तो सत्य ॥ ४३ ॥ तंतु सत्य मिथ्या पट । माती सत्य मिथ्या घट । आत्माच आहे निपट । परी भास मिथ्या ते योगी मानिती ॥ ४४ ॥ भक्त योगीहि हेंचि जाणे । परी त्यास विशेष एक बाणे । कीं हे ईश्वरकल्पना तेव्हां ह्मणे । चराचर अवतार ईश्वराचे ॥ ४५ ॥ कीं मत्स्यकूर्मादि देह । भगवदवतार निःसंदेह । स्थिरचर तैसेंचि संदेह । काय एथें ॥ ४६ ॥ विष्णुप्रतिमा सुवर्णाची । त्यांत सुवर्णताचि साची । तैसी स्वरूपावांचूनि कैंची । सत्ता अवतारमूर्तीतें ॥ ४७ ॥ ऐसें निर्गुणत्वें सगुण । तो लक्षी जैसा निपुण । तैसें निर्गुणत्वेंचि त्रिगुण । विश्वही लक्षी ॥ ४८ ॥ अवताररूपीही माया । लटिकीच वाटे जया । प्रपंचरूपीं तया । काय सत्य वाटेल ॥ ४९ ॥ परंतु अवताररूपीं प्रीती । तैसीच प्रीति सर्वभूतीं । जैशा रामकृष्णादि मूर्ती । भक्त पाहे तैसें चराचर ॥ ५० ॥ नुसता योगयुक्त । आणि योगी होऊनि भक्त । त्यांत अंतर हेंचि कीं अनुरक्त । सगुणीं ह्मणूनि सगुणत्वें जग पाहे ॥ ५१ ॥ वर्णिला षष्ठाध्यायाचे अंती । योगयुक्त भक्त ये रीती । हें आइकोनि मती । साशंक जाली अर्जुनाची ॥ ५२ ॥ कीं योगीं भक्ति ये रीती । हे विदित नसे अर्जुनाप्रती । ह्मणूनियां अध्यायारंभीं जगत्पती । हेंचि आइक ह्मणतो ॥ ५३ ॥ ऐश्वर्य ज्ञान वैराग्य धर्म । यश श्री हा षड्गुणांचा क्रम । साही गुण स्थावर जंगम । देह ज्याचा तो बोलतो श्रीभगवान् ॥ ५४ ॥

॥ श्रीभगवानुवाच ॥ मय्यासक्तमनाः पार्थ योगं युंजन्मदाश्रयः ।
असंशयं समग्रं मां यथा ज्ञास्यसि तच्छृणु ॥ १ ॥

॥ टीका ॥ पार्था माझ्या ठायीं आसक्त । मन गुंतलें ऐसा अनुरक्त । योगही योजूनि माझा भक्त । होसील तूं जैसा आइक तें ॥ ५५ ॥ सर्वही मीच ईश्वर । ऐसें ज्या प्रकारें तूं चतुर । मातें जाणसील तें आइक सादर । अगा पार्था ॥ ५६ ॥ मी सगुण ईश्वर अद्वय । तोचि मी सर्वही हें निःसंशय । तूंही हें जाणसील मदाश्रय । ज्या प्रकारें तें आतां आइक ॥ ५७ ॥

चित्त सर्वात्मयोगीं योजे । तथापि मायेचे भास दिसती जे जे । ते ते मी सगुण ऐसी विराजे । भक्ति माझी योगांतही ॥ ५८ ॥ योजित असोनि योग । घडे माझा भक्तियोग । योग भक्ति दोहींचा संयोग । एकेचि समयीं ॥ ५९ ॥ याकारणें योग योजितां । मी सगुण ऐसें चराचर भूतां । मद्रूप पाहसी तें आतां । अगा पार्था आईक ॥ ६० ॥ अर्थ उकलला ऐसे परी । भावार्थ प्रतिपदीं हरी । सुचवितो या-वरी । कांहीं विशद बोलावा ॥ ६१ ॥ योग तरी योजिसी । त्या योगीं मज समग्रत्वें पाहसी । ज्या ज्ञानें ऐसा प्रवीण होसी । तें आइक ह्मणती हा अर्थ ।। ६२ ।। तरी सर्वत्र दिसे ब्रह्म । हा सर्वात्मयोग परम । याही अनु-भवावरि भ्रम । हा किमर्थ ॥ ६३ ॥ किं त्रिगुणीं दिसे निर्गुण । मग तेंचि सर्वही ब्रह्म सगुण । पाहावें हें न जाणे जरी निपुण । तरी काय उणें अ-नुभवीं तयाच्या ॥ ६४ ॥ ऐसें ह्मणेल पार्थ । तरी हे गोष्टी यथार्थ । परी साधुनिही चतुर्थ पुरुषार्थ । भक्ति नाहीं साधली तयातें ॥ ६५ ॥ योगि-यांतही तो योगी थोर । जो योगी होऊनि सगुणीं सादर । हें पूर्वाध्याया-च्या अंतीं सर्वेश्वर । सिद्धांतरूपें बोलिला ॥ ६६ ॥तरी योगीही होउनी । जरी लागे सगुणमात्र भजनीं । तरी जतन होय जो मनीं । ठसा योगाचा ॥ ६७ ॥ कीं भक्तिसुखापुढें जया । मोक्षही नलगे तया । काय करावी घेऊनियां । योगसिद्धी ॥ ६८ ॥ आणि थोरपण आलें तेथें । कीं योग अ-सोनि भक्ति जेथें । यालागीं बोलणें लागलें एथें । ऐसें श्रीकृष्णासी ॥६९॥ कीं माझेठायीं आसक्त मन । ह्मणजे मी जो साकार कमलनयन । त्या माझेंचि भजन चिंतन । करी लंपट होउनी ॥ ७० ॥ ऐसें माझे ठायीं । मन आसक्त लंपट माझे पायीं । त्या संयोगीं सगुण दावूनि या उपायीं । दोन्ही साधती ऐसें करावें ॥ ७१ ॥ कीं भक्ति नुसती ज्ञानाविण । न ठा-उकी स्वात्मखूण । त्यास निर्गुण न कळतां सगुण । काय कळे ॥ ७२ ॥ निर्निमित्त आपली प्रीती । आयता आत्मा भक्ति आयती । अविद्येनें प-डली भ्रांती । हें भक्तिरहस्य न कळे तयातें॥७३॥ तोंही आत्मा कळे । आणि चित्त योगीं न वळे । चित्स्वरूपीं न मिसळे । तोंवरि न तुटे अविद्यासं-स्कार ॥ ७४ ॥ एवं योगाचा ठसा पडे । तरीच भक्तिसुख सांपडे । ते भक्ति तरी ह्मणावी कीं घडे । जरी भजन सगुणाचें ॥ ७५ ॥ अन्यथा नि-

सर्वत्र ब्रह्म पहाणें.

गुणोपासक । होतां फळीं क्लेश अधिक । ज्ञानी योगी सगुणसेवक । श्रेष्ठ सर्वांत हे पदवी ॥ ७६ । स्वयत्नें तरीं हा निश्चय । क्लेशें चित्त करिती चिन्मय । भक्तांस सगुणाचा आश्रय । योगसिद्धि अनायासें वास्तव ॥ ७७ ॥ अत एव या भावेंकरूनी । या श्लोकीं मदाश्रय ह्मणोनी । योगिया भक्तांचें विशेषण वदोनी । आईक ह्मणतो आपलें समग्रत्व ॥ ७८ ॥ कीं योग योजूनि मदाश्रय । ज्यास आश्रय मी जगदाश्रय । ऐसा होऊंनि तूं निःसंशय । सर्व मी ऐसें जे रीती जाणशी ॥ ७९ ॥ तैसें सांगेन तुजला । आइक त्या माझ्या बोला । परी त्या समग्र विश्वरूपा मला । पाहाणें न घडे योगावांचूनी ॥ ८० ॥ आणि योग भक्तीवांचुनी । तो योगी भक्त नव्हे ह्मणोनी । योगातें योजित असोनी । समग्रातें मातें ये रीती जाणसी ॥ ८१॥ योजीत असोनि योगातें । जे रीती जाणसी समग्र मातें । तें आइक ह्मणतां एथें । न घडे अर्थ यावेगळा आणिक ॥ ८२ ॥ कीं सर्व ब्रह्म जाणे । योगयोजणें त्यातेंचि बागे । ऐसें असोनी श्रीकृष्ण ह्मणे। "योगं युंजन् ज्ञास्यसि" ह्मणोनी ॥ ८३ ॥ योग योजीत असोनी । समग्रातें मातें जाणसी ह्मणोनी । ह्मणतां विरोध वचनीं । प्राप्त जाला ॥ ८४ ॥ तरी सर्वात्मत्वें योगातें । योजितां चराचरातें । माझीं सगुणरूपें ह्मणोनी मातें । जे रीती जाणसी तें आईक ॥८५ ॥ विरोध ऐसा परिहरे । अन्यथा वाक्यार्थ एथें विखरे । जे निर्मत्सर पाहती बरे । ते मानिती याचि अर्थातें ॥ ८६ ॥ योगशब्दें योगव्यातिरेक । समग्रत्वें अन्वयाचें कौतुक । व्यतिरेक योजीत एकीं अनेक । हा अन्वय बोल तो जरी ह्मणावा ॥ ८७ ॥ तरी व्यतिरेक आणि अन्वय । दोंपरी अद्वैत निश्चय । करूनि होऊनी निःसंशय । मग योग योजूं तो भलता ॥ ८८ ॥ व्यतिरेक योगीं मन । करूं लागतां विषयचिंतन । तेथेंच आत्मत्वाचें अवलोकन । करूनि मन योजावें स्वरूपींच ॥ ८९ ॥ हें पूर्वाध्यायांत ।"यतो यतो निश्चरति" या श्लोकें भगवंत । बोलिला तेव्हां असावा विदित । अन्वयबोध व्यतिरेक योगियांतेही ॥ ९० ॥ व्यतिरेक आणि अन्वय । द्विविध जाणोनि अद्वय । मग योगीं करूनी चित्त तन्मय । दोहीं मधूनि योगीं योजी भलतिया एकीं ॥ ९१ ॥ विना व्यतिरेक न कळे अन्वय । विना अन्वय न कळे अद्वय । नव्हतां गुरुमुखें हे दोन्ही निश्चय । बोध कैंचा ॥ ९२ ॥ नाहीं अद्वैतबोध । तोंवरी वृथा वृत्तिनिरोध । कीं नाना द्वैत जडावरोध । केला असे अविद्येनें ॥ ९३ ॥ तोंवरी अविद्याच

नाहीं गेली । जों अन्वयाची न कळे किल्ली । अविद्यासंस्कारभंगार्थ लागली । साधनें योगसिद्धि अगत्य ॥ ९४ ॥ एवं व्यतिरेक योग योजित । समग्रातें मातें जाणसी निश्चित । ह्मणूनि बोलतो भगवंत । हा अर्थ न घडे सर्वथा ॥ ९५ ॥ आतां योगातें योजित । ह्मणजे योगाचा अभ्यास करित । समग्रातें मातें जाणसी तें भगवंत । आइक ह्मणतो ऐसें कोणी बोलती ॥९६॥ त्या टीकेचा भाव ये रीती । कीं तेव्हां जो साधक त्याप्रती । सगुणत्वें सांगे श्रीपती । न बोलतो सिद्धांतें ॥ ९७ ॥ साधकास उपदेश यालागीं । न भजती सगुणातें सिद्ध योगी । ह्मणूनि ते या प्रसंगीं । वाखाणी ऐसें ॥ ९८ ॥ तरी या श्लोकामागील जो श्लोक । पूर्वाध्यायांत तेथें उत्तमश्लोक । बोलिला त्याचा बरा अर्थावलोक । करितां साधक यातें न ह्मणावें ॥ ९९ ॥ कीं योगी थोर सकळांत । तैशाही योगियांत । भक्त थोर ह्मणे भगवंत । ते तों योगीं न ह्मणवती साधक ॥ १०० ॥ जो सिद्ध योगनिष्ठ । तोचि सर्वांत बोलिला वरिष्ट । त्या तैशाही वरिष्ठांमध्यें श्रेष्ठ । स्वभक्त योगी बोलिला ॥ १ ॥ ज्यांत हा श्रेष्ठ बोलिला । सिद्धचि ह्मणावें त्याला । तैसियासही साध्यांश उरला । भक्ति अलंकार योगसिद्धीचा ॥२॥ ह्मणूनि या पुढिलिया श्लोकांत । अर्जुनातें ह्मणे भगवंत । कीं तूं योग योजित । समग्रातें मातें जाणसी तें आइक ॥ ३ ॥ कीं सिद्ध जरी जाला । योग योजीत असावें लागे त्याला । तैसा तूं योग योजीत मला । समग्रत्व जाणसी जैसा तें आइक ॥ ४ ॥ या अर्थें पूर्वश्लोकोक्त । सिद्ध होतो कीं पक्क योगी आणि भक्त । तो योगियांत अत्यंत युक्त । आणि मज संमत ह्मणे श्रीकृष्ण ॥ ५ ॥ पुढें आर्त जिज्ञासु अर्थार्थी ज्ञानी । ज्ञानी भक्त त्या तिघांहूनी । श्रेष्ठ माझा आत्मा ह्मणोनी । याच अध्यायांत बोलिल ॥ ६ ॥ तेथेंही भक्त जो ज्ञानी । तो ज्ञानसिद्धचि बोलावा ह्मणोनी । मागील पुढील विचार पाहोनी । तेथें सिद्ध योगीच बोलावा ॥ ७ ॥ कीं सर्वांत थोर ज्ञानी । तोही भक्त तरी अतिश्रेष्ठ ह्मणोनी । श्रीकृष्ण ह्मणे यावरूनी । एथें सिद्ध योगीच बोलावा ॥ ८ ॥ सर्वांत बरा मानव । त्यांत बरें रूप अभिनव । त्यांतही अलंकारादिवैभव । ज्यास तो बरा अत्यंत ॥ ९ ॥ तैसा ज्ञानी सर्वांमध्यें श्रेष्ठ । त्यांत थोर योगनिष्ठ । त्या योगियांत वरिष्ट । जरी योगीं योजी सगुणभक्ती ॥ ११० ॥ याकारणें एथें भगवंत । ह्मणे कीं तूंही योग योजित । सर्वही मी ऐसें मातें निश्चित । जाणसी जैसें तें आइक ॥ ११ ॥ कीं "वासु-

देवः सर्व मिति। स महात्मा सुदुर्लभः" ऐसें याचमती । याच अध्यायीं जगत्पती । बोलणार ऐसें पुढेंही ॥ १२ ॥ असो हा अति ग्रंथविस्तार । हें पुढें बोलणें असे वारंवार । प्रस्तुत पार्था ह्मणूनि यदुवीर । या श्लोकीं या नांवें आळवी ॥ १३ ॥ कीं पृथा कुंती आपुली आत । पार्थ ह्मणजे तिचा तूं सुत । तीस असोनिही ज्ञान अत्यंत । असे ऐसीच भक्ति माझी ॥ १४ ॥ तुझी जननी पृथा ते । मातें भजोनिही हेंचि मागते । ऐक्यांत अद्वैतभजनीं दे ह्मणते । भक्ति तुझी ॥१५॥ तूं तिचाच सुत । आणि सखा माझा अत्यंत । ह्मणोनि सर्वात्मयोगांत । भक्ति माझी देत असें हा भाव ॥ १६ ॥ कीं ध्यानीं कुंती सदा । ऐसी भक्ति मागे मुकुंदा । ते प्रत्यक्षही एकदां । बोलिली ऐसें भागवतीं ॥१७॥ भागवतश्लोक । त्वयि मेनन्यविषया मतिर्मधुपतेसकृत् । रतिमुद्वहतादद्धांगंगेवोघमुपन्वाति ॥ टीका ॥ मधुकुळ माझें माहेर । मधुकुळीं तयांत सर्वेश्वर । अवतरलास या भावें गंभीर । कुंती ह्मणे अगा मधुपते ॥ १८ ॥ ह्मणूनि ह्मणे कुंती । कीं अगा श्रीमधुपती । मी मागतें ऐसी प्रीती । तुझेठायीं दे मला ॥ १९ ॥ कीं अन्यत्वें कांहीं विषय । न स्फुरे स्फुरे अद्वय । ऐसी माझी वृत्ति निःसंशय । धरो प्रिति तुझी पुनःपुनः ॥१२०॥ ऐसी कुंती बोलिली । परि बोलोनि मागुती शंकली । कीं विशद न बोलतां आपुली । दिसेल वाणी विरुद्ध ॥२१॥ कीं आत्मत्वें ऐक्य जाणे । सर्वात्मत्वें अद्वैत बाणे । त्या बुद्धीस ह्मणती शहाणे । अनन्यविषया ह्मणोनी ॥ २२ ॥ ऐसी अनन्यविषया बुद्धी । जीस बाणली अद्वैतसिद्धी । वारंवार प्रीतिसमृद्धी । तीस भगवंती कैंवि घडे ॥ २३ ॥ शंका ऐसी ह्मणोनी । गंगासमुद्र दृष्टांत देऊनि । श्लोकाच्या चतुर्थ चरणें करूनी । हे शंका परिहरिते ॥ २४ ॥ कीं अगा श्रीरंगा । सागरीं ऐक्य पावोनि गंगा । मागुती आपुल्या जळाच्या तरंगा । वारंवार समुद्रीं मेळविते ॥ २५ ॥ वस्तुतः पाहतां उदक । समुद्र नद नद्या अनेक । त्यांत भेद हरूनिही जाली एक । सागरीं गंगा मिळोनी ॥ २६ ॥ तथापि वरिच्यावरी । सागरीं मिसळती लहरी । कुंती ह्मणे ते हरी । भक्ति ऐसी मज देईं ॥ २७ ॥ एकदेशी दृष्टांत । परि भाव ऐसा यांत । कीं मेघबिंदुही समुद्रांत । होतीच ऐक्य ॥२८॥ मुमुक्षु तैसा निर्गुणीं । मिळे परि त्या एकपणीं । भक्ति न घडे ज्ञानी सगुणीं । भक्ति अद्वैतबोधें करिती ॥ २९ ॥ ते गंगा समुद्ररीती । भक्ति अजी मधुपती । दे मज ह्मणूनि कुंती । प्रार्थी ऐसें ॥ १३० ॥ ते कुंतीचें नांव

पृथा । ह्मणोनि तिच्या पुत्रा पार्था । तितें देऊनिया अर्था । तिच्या संततीसही देतसे ॥ ३१ ॥ अगा पार्था ह्मणोनी । या भावेंकरूनी । या श्लोकीं आळवूनी । तिनें मागितलें तें यातेंही देतसे ॥ ३२ ॥ आतां यानंतर । जें ज्ञान सांगेन ह्मणतो ईश्वर । त्याचा ऐसा विशद निर्धार । करूनि बोलतो या श्लोकीं ॥ ३३ ॥

॥ श्लोक ॥ ज्ञानं तेहं सविज्ञानमिदं वक्ष्याम्यशेषतः ।
यज्ज्ञात्वा नेह भूयोन्यज्ज्ञातव्यमवशिष्यते ॥ २ ॥

॥ टीका ॥ अगा निर्गुण निखळ एक । कळे ज्ञान तें व्यतिरेक । त्या एकीं अनेक अनेकीं तें एक । हें विज्ञानविशिष्ट ज्ञान ॥ ३४ ॥ या विज्ञानासहित ज्ञान । पावोनि मुक्त जाले मुमुक्षु जन । परि समग्रत्वें माझें सगुणभजन । न घडे तयां ॥ ३५ ॥ ते सर्वज्ञ विगतकिल्बिष । परि जाणण्यांत कांहीं असे विशेष । तो राहिला कीं जग अशेष । सगुणमूर्ति ईश्वराची न समजले ॥ ३६ ॥ ज्ञानविज्ञानसहित । त्यांस होऊनि गुह्य अत्यंत । जें शेष राहिलें तेंही निश्चित । तुज मी हें आतां सांगतों ॥ ३७ ॥ या भावें ह्मणे भगवंत । कीं ज्ञानविज्ञानासहित । तें अशेष सांगेन जें अत्यंत । गुह्य शेष तेंही न ठेवितां ॥ ३८ ॥ या अशेषपदेंकरूनी । जें गुह्य शेष वदलें तेंही ह्मणोनी । पूर्वार्धी ऐसें वदोनी । स्पष्ट बोलतो उत्तरार्धें ॥ ३९ ॥ जें पूर्वार्धें करूनी । बोलिलों तें सांगेन ह्मणोनी । तें ऐसें कीं [illegible] । या जगीं जाणणें कांहीं उरेना ॥ १४० ॥ इह ह्मणजे या जगीं । ब्रह्माचि सर्वात्मयोगीं । देखिलें जरी तरंगीं । समुद्र जैसा ॥ ४१ ॥ तरी तरंगांचा आकार । तो नव्हे सागर । तैसें चराचरीं ब्रह्म परि चराचर । रूप माया मिथ्या ब्रह्म नव्हे ॥ ४२ ॥ निर्गुणोपासकां निर्गुण । अपेक्षित आणि न लगती मायागुण । हा मायाविलास स्वयें आपण । सगुण ईश्वर ऐसें त्याला कळेना ॥ ४३ ॥ ते मायेचे तिन्ही गुण । स्वयें केवळ देखती निर्गुण । कीं अलंकार तितकें सुवर्ण । ऐसें जरी जाणती ॥ ४४ ॥ तथापि होती अलंकार । त्यांत सोनें निर्विकार । तेव्हां करणें लागला निर्धार । कीं ते शक्ति सुवर्णाची ह्मणोनी ॥ ४५ ॥ तैसें ब्रह्म चराचरीं । सोनें जैसें अलंकारीं । द्वैत कांहीं नसे परी । तें चराचराकार माया ह्मणती ॥ ४६ ॥ ते निर्गुण मात्राचे उपासक । त्यांस निर्गुणचि पाहिजे एक । मायाविलास जे अनेक । त्यांस न घडे उपासना त्याची ॥ ४७ ॥ हें उणेपण एक अद्वैतभजनीं ।

कीं मायाविलास ईश्वर ह्मणोनी । हें रहस्य त्यांस न कळोनी । या जगीं अंश उरला जाणावयाचा ॥ ४८ ॥ जरी त्याचें ज्ञान दिव्य । या जगीं उरलेंचि कांहीं ज्ञातव्य । तेथें कारण हें कीं नसे सेव्य । सगुणत्वें ईश्वर तयाला ॥ ४९ ॥ इत्यादि भाव पोटीं । तों कृष्ण ह्मणे अगा किरीटी । मद्रूप पाहतां ब्रह्मांडकोटी । ज्ञातव्य न उरे कांहींच ॥ १५० ॥ याकारणें सांगेन ह्मणोनी । जें बोलतो प्रतिज्ञा करूनी । तें ऐसें असे जें जाणोनी । ज्ञातव्य कांहीं उरेना ॥ ५१ ॥ आणिक जाणणें असे कांहीं । ऐसी उरी ज्यांत नाहीं । ऐसें सगुणत्वें माझें ज्ञान तेंही । तुजला आतां सांगतों ॥ ५२ ॥ कीं उंच आणि नीच । मूढास दिसे प्रपंच । ज्यास हें ज्ञान कळलें साच । त्यास बरें वाईट सर्वही सर्वोत्तम ॥ ५३ ॥ जीवांची जे अविद्या । तेही ईश्वराची विद्या । विश्वरूपें त्या विश्ववंद्या । पाहती तेचि धन्य ॥ ५४ ॥ जो पशूंचा धणी । त्या आधीन त्यांची दावणी । बांधणें सोडणें दोहीं गुणीं । तेंचि दिसे ॥ ५५ ॥ बंध बांधतां करी दांवें । तेंचि पशु सोडितां मोक्ष ह्मणावें । धन्याचें तों स्वभावें । दोरखंड तें ॥ ५६ ॥ जीवांस वाटे अविद्या । जिवांस वाटे विद्या । सर्वही मिळोनि माया आद्या । ईश्वराची ॥ ५७ ॥ ऐसें त्याचें ज्ञान । पावूनि करूं लागे ध्यान । तोचि स्वयें जगज्जीवन । जो योग योजीत करी ये रीतीं भक्ती ॥ ५८ ॥ त्यास काय जाणणें उरे । ज्यास सर्वही निर्गुणत्वें स्फुरे । ईश्वरत्वें पाहतां झुरे । [illegible] मायांशही जो कांहीं ॥ ५९ ॥ अर्जुनातें हें ज्ञान । सांगों पाहतो कमलनयन । एथें निर्गुणोपासक जन । हें निर्गुणत्वेंचि वाखाणिती ॥ १६० जों न कळे निर्गुण । तोंवरी काय कळे सगुण । परि निर्गुण ज्ञानी होऊनिही निपुण । सर्व सगुण पाहे तो भक्त ॥ ६१ ॥ गीतेच्या शेवटीं मुकुंद । हेंचि अर्जुनातें ह्मणेल गोविंद । कीं तुझा माझा हा संवाद । ह्मणावा धर्म्य कीं नव्हे निर्धर्म ॥६२॥ "अध्येष्यते च य इमं" ह्मणोनी । "धर्म्यंसंवादमावयोः" या श्लोकेंकरूनी । श्रीकृष्णें धर्म्यपद योजूनी । सगुणज्ञानसंवाद सूचविला ॥ ६३ ॥ ज्ञेय निर्गुणचि नुसतें । जरी या गीतेंत असतें । तरी या संवादाचें नाम होतें । निर्धर्मसंवाद ह्मणोनी ॥ ६४ ॥ हा धर्म्यसंवाद । ऐसेंचि ह्मणतो गोविंद । कीं निर्गुणज्ञान बोलोनिही मुकुंद । सगुणज्ञान बोलेल त्यावरी ॥ ६५ ॥ द्वादशीं पुसेल अर्जुन । तेथें ज्ञानी आणि सगुणभजन । तो

१ बाकी, शेष.

थोर ऐसें कमलनयन । ह्मणेल ह्मणूनि हा धर्म्यसंवाद ॥ ६६ ॥ आतां धर्म-
ही एथें बोलिला । ह्मणोनि ह्मणावें धर्म्य याला । तरी मुख्य निर्गुण या
गीतेंत जाला । ब्रह्मविद्यायोग यांच दोहींचा ॥ ६७ ॥ प्रति अध्यायाच्या
अंतीं । "ब्रह्मविद्या यां योगशास्त्रें" ह्मणती । कीं ज्ञानाहूनि कर्म श्रीपती ।
बहुत नीच ह्मणे या गीतेंत ॥ ६८ ॥ "दूरेण ह्यवरं कर्म" । या श्लोकीं पुरुषो-
त्तम । ज्ञानापुढें अधमाधम । कर्म ह्मणे ॥ ६९ ॥ संवाद एथें धर्माचा ।
ह्मणूनि धर्म्य ह्मणे कृष्ण वाचा । हा पक्षही नव्हे साचा । धर्म्य सगुणज्ञान
हाचि अर्थ ॥ १७० ॥ आतां धर्म्यपदाचा अर्थ । पांडित्यबळें अन्यथा
केला तरी व्यर्थ । हें धर्म्यपद होतें समर्थ । सगुणज्ञानाविषयींच ॥ ७१ ॥
कीं नवमाध्यायांत । "राजविद्याराजगुह्य" या श्लोकांत । हें ज्ञान धर्म्य ह्मणू-
नि भगवंत । प्रतिज्ञा करूनि सगुणज्ञान बोलेल ॥ ७२ ॥ "पश्य मे योग-
मैश्वरं" ह्मणोनी । या ऐश्वर्यशब्देंकरूनी । हा ईश्वररूपयोग ह्मणतां
यावरूनी । हा सगुणज्ञानसंवाद हें सिद्ध ॥ ७३ ॥ एथेंहीं क्लिष्ट कल्पना ।
करिती त्या साभिमानजना । द्वादशाध्यायांत या धर्म्यवचना । दाखवितां
होती निरुत्तर ॥ ७४ ॥ कीं "ये तु धर्म्यामृतमिदं" ह्मणोनी । श्रीकृष्ण या
श्लोकेंकरूनी । संपूर्ण द्वादशाध्यायार्थ यावरूनी । सगुणज्ञान परम ऐसें बोले-
ल ॥ ७५ ॥ हा द्वादशाध्यायांत अंतीचा श्लोक । तेथें धर्म्यामृत ह्मणे उत्तम
श्लोक । करितां अध्यायार्थाचा अवलोक । श्रेष्ठ सगुणभक्ति ज्यांत अत्यंत॥७६॥
ते भक्त ज्ञानहीन । ऐसे ह्मणती ते जन । तरी ज्यांस नाहीं ज्ञान । ते ज्ञानिया-
हूनि श्रेष्ठ कैंवि होती ॥७७॥ निर्गुण सगुण उपासक । दों वर्गांतही कोण योग-
वेत्ता अधिक । हें अर्जुन पुसतां श्रीवत्सांक । ह्मणे सगुणोपासक श्रेष्ठ तो॥७८॥
हें असे पुढें बोलणें । एथें धर्म्यपदाकारणें । बोलणें लागलें कीं श्रीकृष्णें ।
धर्म्यामृतपदें सगुणज्ञान बोलिलें तें ऐसें॥७९॥द्वादशीं ऐसें धर्म्यामृत । पाठ
दुसरा धर्मामृत । दोहींचा अर्थ तोचि निश्चित । परि पाठभेदें शंकित न व्हावें
श्रोतयांनीं॥१८०॥तैसेंच नवमीं आरंभीं धर्म्यपद । तें ज्ञान सांगोनि गोविंद ।
हा ऐश्वर्ययोग पाहें ह्मणे मुकुंद । आद्यंत एकवाक्यता ऐसी॥८१॥याकारणें
अटादशीं गीतांतीं। हा धर्म्यसंवाद ह्मणे श्रीपती । तें या सप्तमापासूनि पार्था
प्रती । सगुणज्ञान बोलतो ॥८२॥अत एव होऊनिही ज्ञाननिर्गुण । विरळा हें
ज्ञान सगुण। जाणतो ह्मणूनि ककमलनयन । बोलतो आतां या श्लोकीं॥८३॥

---

१ धर्म; सगुणज्ञान. २ ओढून ताणून आणिलेला विचार.

॥ श्लोक ॥ मनुष्याणां सहस्रेषु कश्चिद्यतति सिद्धये ।
यततामपि सिद्धानां कश्चिन्मां वेत्ति तत्त्वतः ॥ ३ ॥

॥ टीका ॥ अगा मनुष्यांचीं सहस्रें अनेक । त्या बहु सहस्रांत कोणी एक । आत्मज्ञानाचा साधक । यत्न करी आत्मज्ञानसिद्ध्यर्थ ॥ ८४ ॥ ज्ञानार्थ यत्न करिती । त्यांत आत्मज्ञही कोणी होती । आणि सिद्धीतेंही पावती । योगमार्गें ॥ ८५ ॥ तैशा सिद्धांच्या सहस्रांत । कोणी एक निपुण अत्यंत । विश्व समग्र भगवंत । ऐसें मातें जाणतो ॥ ८६ ॥ ह्मणसी ऐसें कां परी । श्रेष्ठ सर्वांत हें तरी । अपरोक्ष साक्षात्काराहीवरी । अनादि भक्तिपद हें आहे ॥ ८७ ॥ कर्मयोगावरी । जैसी ज्ञानाची पायरी । कीं चित्तशुद्धि नव्हे तोंवरी । नव्हे आत्मबोध ॥ ८८ ॥ तो आत्मबोध घडे । तरीच हा भक्तियोग ठायीं पडे । सर्व सगुणब्रह्म ऐसा सांपडे । अनुभव तेव्हां ॥ ८९ ॥ ह्मणतो या भावेंकरूनी । “ मां वेत्ति तत्त्वतः ” ह्मणोनी । कीं तत्त्वज्ञानावांचूनी । मज सगुणातें नेणवे ॥ १९० ॥ चित्तशुद्धीविना । ज्ञान जैसें होईना । तैसें मातें जाणवेना । तत्त्वज्ञानावांचूनी ॥ ९१ ॥ एवं कर्में चित्तशुद्धी । ज्ञान त्याहूनि थोर प्रसिद्धी । त्या ज्ञानें मग हे सगुणज्ञानसिद्धी । आत्मज्ञानाहूनि थोर यास्तव ॥ ९२ ॥ यालागीं ज्ञानसिद्ध । त्या सिद्धांत कोणी एक ज्ञानवृद्ध । मातें सगुणातें जाणोनि समृद्ध । होतो भक्तीकरूनी ॥ ९३ ॥ ऐसी भक्तीची पदवी । नुसती या ज्ञानाहूनिही श्रेष्ठ-वी । हे सर्वात्मभक्ति नित्य नवी । या गीतेंत श्रेष्ठत्वें वर्णिली ॥ ९४ ॥ गीतार्थ येच रीती । वाखाणावा ऐसें श्रीपती । स्वयें बोलेल अर्जुनाप्रती । अध्यायांत अठराविया ॥ ९५ ॥ “ य इदं परमं गुह्यं ” ह्मणोनी । या दों श्लोकेंकरूनी । ह्मणेल कीं त्याहूनी । प्रिय मज कोणी असेना ॥ ९६ ॥ कीं हें गुह्य परम । जें मथूनि काढिलें सर्व निगम । माझे भक्त भागवतोत्तम । त्यांत जो वर्णी ॥ ९७ ॥ प्रिय त्याहूनि या पृथ्वीवरी । कोणी नसे न होणार यापरी । भक्ति थोर करूनि जरी । वाखाणी या गीतेतें ॥ ९८ ॥ “ भक्तिं मयि परां कृत्वा ” ह्मणोनी । हा अर्थ या चरणेंकरूनी । दाखविला कीं सर्वांहुनी । भक्ति थोर मी बोलिलों या गीतेंत ॥ ९९ ॥ सर्वज्ञ हें भविष्य जाणे समर्थ । कीं यथारुचि गीतार्थ । वर्णितील परि यथार्थ । भाव आपला विरळा समजेल ॥२००॥ ह्मणूनि हे अष्टादशीं खूण । स्पष्ट दावील आपण । कीं प्रिय मज तो निपुण । भक्ति थोर करूनि वर्णी गीतेंत ॥१॥ ते भक्ति माझे ठायीं

ह्मणोनी । शेषशायी ह्मणे यावरूनी । सर्वात्मयोगीं सगुणत्वेंकरूनी । भक्ति चराचररूपीं सूचवी ॥ २ ॥ जे या रहस्यातें नेणती । ते हा चरण अन्यथा वाखाणिती । "भक्तिं मयि परां कृत्वा" एथें ह्मणती । भक्ति माझेठायीं करूनि मज पावेल ॥३॥ भक्ति करूनि भलता । भगवंतास पावेल तत्त्वता । गीतार्थकथनाचा आतां । काय महिमा वर्णील ॥ ४ ॥ इत्यादि अर्थ अमंगळ । पुढें उडतील सकळ । एवं गीतेंत ह्मणे मेघनीळ । भक्ति थोर करूनि वाखाणावी ॥ ५ ॥ आतां विश्व सर्वही सगुण । हें कळावया रहस्यखूण । आपरा परा प्रकृति आपल्या आपण । दोन्ही बोलतो दों श्लोकीं ॥ ६ ॥

॥ श्लोक ॥ भूमिरापो नलो वायुः खं मनो बुद्धिरेव च ।
अहंकार इतीयं मे भिन्ना प्रकृतिरष्टधा ॥४॥

॥ टीका ॥ पृथ्वी आप तेज वायु व्योम । हीं पंच भूतें मन षष्ठ बुद्धि सप्तम । यांसहि अहंकार अष्टम । ऐसी अष्टधा भेद पावली ॥ ७ ॥ हे माझी प्रकृती । हे अष्टभेद जिचे दिसती । ते आठही पाहतां असती । माया मात्र ॥ ८ ॥माझी शक्ति माया । तेचि प्रकृति ह्मणावी धनंजया । इचें तत्त्व कळे तया । हे नाहींच मी असें ॥९॥ मृगजळाचे कल्लोळ । त्यांचें पाहतां मूळ । कल्लोळ अवघे मृगजळ । तेंही पाहतां असे तेज मात्रचि सूर्याचें ॥ २१० ॥ मुकुट कुंडलादि विकृती । ते सकल सुवर्णाच्चि प्रकृती । ते प्रकृति आणि नाना आकृती । सोनेंचि अवघें ॥ ११ ॥ होऊनि नाना अलंकार । सुवर्णत्वीं नसे विकार । कनकीं सामर्थ्य एकप्रकार । ते शक्ति प्रकृति त्या सुवर्णाची ॥ १२ ॥ दुधाचें जालें दहीं । दूधपण त्या दधीपणीं नाहीं । सुवर्णासारिखें कांहीं । सामर्थ्य दुग्धास ह्मणवेना ॥ १३ ॥ याकारणें कनकीं । अद्भुत शक्ति मानावी कीं । नाना प्रकारें मिरवूनि लोकीं । कनकत्वीं न लागे विकार॥१४॥यालागीं जितके आकार । ते सुवर्णशक्तीचेचि विकार । त्या विकारीं निर्विकार उघडेंचि सोनें ॥ १५ ॥ जैसी सुवर्णशक्ति प्रकृती । त्या प्रकृतीच्या विविध विकृती । तैसी माझी प्रकृति आकृती । पावली भेद अष्टधा ॥१६॥ हेच अष्टधा प्रकृती । स्थावरजंगमाच्या आकृती । प्रकृतीच्या तेवीस विकृती । यात्र अष्टभेदांत ॥१७॥ पृथिव्यादि पंचभूतें जेथें । शब्द स्पर्श रूप रस गंध तेथें । एवं दहाही इंद्रियें येथें । अहंकारांत ॥१८॥ कीं कारण अहंकार । तेथें कार्य दश इंद्रियविकार । मीं पाहतों ऐकतों इत्यादि प्रकार । दहा भेद एका अहंकाराचे ॥ १९ ॥ एवं तत्त्वें एकवीस । मन बुद्धि मि-

ळोनि तेवीस । बुद्धि तेंचि महत्तत्त्व कार्य कारणास । भेद नसे ॥ २२० ॥ महाभूतादि तत्त्वें चोवीस । अध्यायीं त्रयोदशीं त्यांतही तेविस । बोलेल पुढिल्या श्लोकीं श्रीनिवास । तें परतत्त्व चोविसावें अव्यक्त ॥२१॥ या चोविसांचें क्षेत्र जेथें । इच्छा द्वेषादि मनोमळ तेथें । हें त्रयोदशीं त्यांत एथें । क्षेत्र यां नवां प्रकृतींत दाविलें ॥ २२ ॥ त्यांत नववी परा प्रकृति ते । क्षेत्रज्ञाकडे लागते । एवं हे नवविधा प्रकृति दाविते । चोवीस तत्त्वें ॥ २३ ॥ जेवढीं पाहवीं क्षेत्रें । त्यांत हींचि विचित्रें । किंवा पृथिव्यादि भूतमात्रें । भेद अवघे प्रकृतींचे ॥ २४ ॥ प्रकृति भेद कनकाचे । ते कनकावेगळे न निघती साचे । आकार तैसे चराचराचे । स्वरूपावेगळे न निघती ॥ २५ ॥ इत्यादि भाव पोटीं । तो कृष्ण ह्मणे अगा कीरिटी । रचल्या ब्रह्मांडाच्या कोटी । ते अष्टभेद पावली प्रकृति माझी ॥ २६ ॥ आतां यानंतर लोक । तो कां बोले उत्तम लोक । त्याचें निमित्त सुज्ञलोक । परिसोत आधीं ॥ २७ ॥ मायाशक्तीकरूनी । ब्रह्मीं उपजले भेद दोनी । त्यांत जड भेद टाकिला निषेधूनी । अष्टधा प्रकृति बोलतां ॥२८ ॥ आतां सत्त्वचिच्छक्ती । त्यांत चिदंशा जीवाची अभिव्यक्ती[1] । एका सूर्याच्या नाना व्यक्ती । जैशा नाना उदकांत ॥ २९ ॥ सूर्य गगनीं एक । प्रतिबिंबांश त्याचे अनेक । त्या अनेकत्व भेदास उदक । निमित्त जैसें ॥ २३० ॥ तैसें सत्त्वचित्त । चिदंशभेदाचें निमित्त । ते नवमीं प्रकृति अच्युत । बोलतो आतां यीं श्लोकीं ॥ ३१ ॥

॥ श्लोक ॥ अपरे यमितस्त्वन्यां प्रकृतिं विद्धि मे पराम् ।
जीवभूतां महाबाहो ययेदं धार्यते जगत् ॥ ५ ॥

॥ टीका ॥ पूर्वश्लोकीं पांडववीरा । प्रकृति बोललों ते अपरा । विलक्षण तीहूनि हे परा । सांगतों तेही माझी प्रकृति जाण ॥ ३२ ॥ थोर ते परा ह्मणावी । नव्हे परा ते अपरा गणावी । परा थोर ऐसी जाणावी । कीं जीवत्व पावली चिदंशें ॥ ३३ ॥ घटस्थानीं अपरा । जळस्थानीं परा । सूर्याचा प्रकाश दुसरा । ज्या जळीं ॥ ३४ ॥ प्रकाश जैसा घटास नसे । तैसा जळासही प्रकाश न दिसे । तथापि जळ समरसे । सूर्यप्रतिबिंबप्रकाशीं ॥ ३५ ॥ जळ प्रकाशसहित । होऊनि घटांतें असे प्रकाशित । तैसें सत्त्व निर्मळ अत्यंत । परा प्रकृतीरूप जाणावें ॥ ३६ ॥ कीं त्यांत चैतन्य प्रति-

[1] चिद्रूप अंश जीव त्याचें प्रगटणें.

बिंबांश । निर्मळत्वें करी प्रवेश । तें त्याकरितां होऊनि सप्रकाश । प्रकाशी अपरा प्रकृतिभेदातें ॥ ३७ ॥ ह्मणूनि ते जीवभूता । परा प्रकृति गा पंडुसुता । ह्मणे जगद्गुरु ज्ञानदाता । ऐसें जाण तूं तीतें ह्मणोनी ॥ ३८ ॥ प्रत्यक्षही पाहतां लोकीं । सूर्यप्रतिबिंब ज्या उदकीं । तो प्रतिबिंब सूर्य तें जळचि कीं । जालें प्रकाशें सूर्याच्या ॥ ३९ ॥ यालागीं जीवभूता ह्मणिजे । प्रतिबिंबांशें जीवेंचि सजीव जाली जे । तथापि तीमाजी विराजे । जीव प्रतिबिंब ईश्वराचा ॥ २४० ॥ सूर्यप्रतिबिंबें जळ । स्वयेंचि सूर्यरूप जालें केवळ । तरी त्यांत जें असे झळझळ । तें सूर्याचें प्रतिबिंब ॥ ४१ ॥ हें युक्तिसिद्ध । हेंचि गीतेंत पुराणीं प्रसिद्ध । " ममैवांशो " ह्मणूनि शुद्ध । पंचदशीं वदेल भगवंत ॥ ४२ ॥ " ममैवांशो " या श्लोकीं । श्रीकृष्ण ह्मणेल जीवलोकीं । जीवभूत ह्मणिजे जीव जाला कीं । उपाधियोगें पावला जीवत्व ॥ ४३ ॥ जीवलोक सत्त्वोपाधि जाणावा । चिदंश त्यांत जीवभूत जीव जाला ह्मणावा । प्रकृति जीवभूता हा शब्दही वाखाणावा । येचि रीती ॥ ४४ ॥ अंश जीवभूत ईकरितां । हे जीवभूता त्यांसि मिसळतां । एवं जीवत्व पाहतां । योगें याच दोन्हींच्या ॥ ४५ ॥ ऐसें असोनि कोणी ह्मणती । कीं क्षेत्रज्ञ चिदंश त्यातें श्रीपती । ह्मणतसे परा प्रकृती । तरी अर्थ ऐसा अयुक्त ॥४६ ॥ पूर्वप्रकृती तें अपरा । या प्रकृतीतें ह्मणे परा । जडा प्रकृतीच्या एकसरा । जीव चिदंश कैंवि होय ॥४८॥ असो तें आतां हे कां परा । आणि ते कां ह्मणावी अपरा । ह्मणूनि हेतु बोलतो बरा । चतुर्थ चरणीं ॥४७॥ चतुर्थ चरण ॥ " ययेदं धार्यते जगत् " ॥ टीका ॥ कीं जे प्रकृतीकरूनी । हें जग धरिजेतें ह्मणूनी । हे परा थोर अपरेहूनी । प्रकृति माझी ॥ ४९ ॥ अर्थ इतकाच परी । विशद बोलावा याउपरी । कीं ईकरूनि ह्मणतो हरी । हें जग धरिजेतें ह्मणोनी ॥ २५० ॥ तें धरणें जगाचें कैसें । तरी कल्पिलें नगर जैसें । मनें कल्पूनि मनेंचि धरिजे ऐसें । धरिजेतें परेनें ॥ ५१ ॥ तें जग सकळही अपरा । तें अपरेतें कल्पूनि धरिते परा । याप्रकारें धरिजेतें चराचरा । म्यां ईश्वरें परा प्रकृतीकरूनी ॥ ५२ ॥ एवं ईश्वराची शुद्ध सत्त्वप्रकृती । तीपासूनि तिन्ही गुण प्रगट होती । नगर मनें कल्पिजे ये रीती । त्रिगुणसृष्टि हे समस्त ॥ ५३ ॥ ते अष्टधा वर्णिली अपरा । त्यांत पंचभूतें तमाचा पसारा । रज इंद्रियें गुण तिसरा । तें मिश्रसत्त्व मनबुद्धि ॥ ५४ ॥ आठवा अहंकार उरला । तो

त्रिविध सृष्टींत आला। यांत पांचभौतिक शरीरीं बोलिला। तामस सृष्टींत तामस अहंकार ॥ ५५ ॥ इंद्रियें राजसें ह्मणोनी। राजस अहंकार यांत अभिमानी। बुद्धींत आणि मनीं। या सत्त्वसृष्टींत सात्विक अहंकार ॥ ५६ ॥ मी कृश मी स्थूळ। इत्यादि तामस अहंकारकल्लोळ। मी पाहतों चाखतों हुंगतों हे खेळ। राजस अहंकाराचे ॥ ५७ ॥ मी ऐसें कल्पितों। मी ऐसा निश्चय करितों। विलास इत्यादि पाहतों। सात्त्विक अहंकार ॥ ५८ ॥ होतां गुरुकृपादृष्टी। अनात्मत्वें निषेधितां या त्रिगुणसृष्टी। आत्मानुभव ये ज्या दृष्टी। ते जीवभूता परा प्रकृति शुद्ध सत्त्व ॥ ५९ ॥ ते त्रिगुणसृष्टीस पाहे। तोंवरी तीस जीवत्व आहे। प्रत्येक्‌दृष्टि पाहतां राहे। स्थिर होऊनि बिंबस्वरूपीं ॥ २६० ॥ परतोनि पाहे जेधवां। अधिष्ठानीं मिळे तेधवां। हे परा प्रकृति मानवां। न कळे गुरुकृपेवांचूनी ॥ ६१ ॥ ज्या परा प्रकृतीनें ईश्वरत्व। अपरेस तिचें अंशत्व। जें त्रिगुणावेगळें शुद्ध सत्त्व। ते हे परा ॥ ६२ ॥ हे व्यतिरेकबोधीं ये रीती। अन्वयबोधींही हेचि प्रकृती। चराचरा जडा आकृती। चिद्रूप देखे ॥ ६३ ॥ हे ज्या परेचा अंश। त्या परेकरूनि जगदीश। प्रकृति अपरा हृषीकेश। कल्पूनि धरितो साक्षित्वें ॥ ६४ ॥ कीं कल्पनेनेंचि पाळी मोडी। साक्षित्वावांचूनि एकी काडी। कल्पिली दिसेना ॥ ६५ ॥ तोंचि कल्पिला पदार्थ असे। कीं साक्षित्वदृष्टि जों दिसे। एवं विश्वकल्पना उल्लसे। साक्षित्वांत ॥ ६६ ॥ शुद्धब्रह्मीं साक्षित्व। न घडे जेथें निर्गुणत्व। एवं हे परा शुद्ध सत्त्व। साक्षित्व या पराकृतीकरूनी ॥ ६७ ॥ एवं या जगाचें धरणें। घडे साक्षित्वाच्या गुणें। ह्मणूनि कृष्ण ह्मणे कीं जिणें। ज्यां धरिजे तें हें जग ॥ ६८ ॥ हें जग जीकरूनी। धरिजे ते परा ह्मणोनी। जाण माझी प्रकृति ऐसें बोलोनी। पुढिलिया श्लोकीं हेंचि विशद वदेल ॥ ६९ ॥ जीवभूता प्रकृती। ह्मणतां सूचवी श्रीपती। कीं हे चिच्छक्ति नुसती। नव्हे द्रव्यशक्ति अथवा क्रियाशक्ती ॥ २७० ॥ चराचर द्रव्यशक्ती। इंद्रियग्राह्य ते क्रियाशक्ती। ऐसें ह्मणावें तरी युक्ती। कुंठित येथें होतसे ॥ ७१ ॥ कीं विना अंतःकरण। इंद्रियांतें नव्हे स्फुरण। जग इंद्रियें यां सर्वांचें धारण। अंतःकरणें घडों शके ॥ ७२ ॥ अंतःकरण चिच्छक्ती। शुद्धसत्त्वाची अभिव्यक्ती। ते परा प्रकृति कीं भगवदुक्ती। जीवभूता ह्मणे परेतें ॥ ७३ ॥ जीवोपाधि शुद्धसत्त्व। त्यातेंचि अंतःकरणत्व। हें अंश ज्याचा

ते अव्यक्ततत्त्व । ते पराप्रकृति शक्ति ईश्वराची ॥ ७४ ॥ जीवीं जीवोपाधि हे ह्मणावी । परी ते अंशरूपें गणावी । ईश्वरीं हेचि जाणावी । ईश्वरशक्ती ॥ ७५ ॥ हें जग या प्रकृतीकरूनी । धरिजेतें ह्मणतो यावरूनी । स्थिति सूचवूनि ईजपासूनी । सृष्टीही ह्मणतसे या श्लोकीं ॥ ७६ ॥

॥ श्लोक ॥ एतद्योनीनि भूतानि सर्वाणीत्युपधारय ।
अहं कृत्स्नस्य जगतः प्रभवः प्रलयस्तथा ॥६॥

॥ टीका ॥ हे सकल भूतांची योनी । सकळ भूतेंही उपजती इजपासूनी । ज्याची उत्पत्ति जेथूनी । त्याची ते योनि ऐसें ह्मणावें ॥ ७७ ॥ इजपासूनि उत्पत्ती । सर्व भूतांची ये रीती । तूं जाण ह्मणे श्रीपती । गहनभावें ॥ ७८ ॥ कीं चराचरें भूतें । तूंही कल्पूनि बहुतें । पाहे आणि प्रकृतीतें । जाण अंशरूपें पराच हे ह्मणोनी ॥ ७९ ॥ आणि " इति उपधारय " ह्मणोनी । उपधारय या शब्देंकरूनी । गहन भाव सूचवूनी । जाण ह्मणे अनुभवें ॥ १८० ॥ इति ह्मणजे ऐसें । कीं म्यां जग कल्पिलें जैसें । ऐसें तूंही कल्पूनि मानसें । धरीं तें त्याचि मानसें करूनी ॥ ८१ ॥ उपधारय ह्मणजे धरीं । म्यां कल्पूनि धरिलें ज्यापरी । उपधारय या शब्दाअंतरीं । अनुभव ये रीती सूचवी ॥ ८२ ॥ पूर्वश्लोकीं या प्रकृतीकरूनी । हें जग धरिजेतें ह्मणोनि वदोनी । या श्लोकीं चराचराची योनी । हेचि ह्मणूनि बोलिला ॥ ८३ ॥ कीं या प्रकृतीकरूनी । भूतें धरितो या प्रकृतींनेंचि कल्पूनि । तरी तूंही कल्पूनि धरीं ह्मणोनी । उपधारय या शब्दें सूचवी ॥ ८४ ॥ एवं कल्पना ते अपरा । कल्पना करणारी परा । कार्य कारणरूप सारा । खेळ दोहीं प्रकृतींचा ॥ ८५ ॥ या अर्ध श्लोकापर्यंत । ऐसें बोलिला भगवंत । तों निरीश्वर सांख्य मत । सिद्ध जालें ॥ ८६ ॥ कीं ते स्वयेंचि जग धरी । स्वयेंचि भूतें निर्माण करी । तेथें ईश्वर कां परी । पाहिजे तो ॥ ८७ ॥ प्रकृतीच विश्व करिते । प्रकृतीच विश्व धरिते । तेव्हां ईश्वर केंचा प्रकृतीच ते । स्वयें समर्थ ॥ ८८ ॥ त्या मताचें निरसन । करीतसे जगज्जीवन । आणि अद्वैत सिद्धांत गहन । उत्तरार्द्धें बोलतसे ॥८९॥ उत्तरार्द्ध ॥"अहं कृत्स्नस्य जगतः प्रभवः प्रलयस्तथा"॥ टीका ॥ अगा सकळ जगाची उत्पत्ती । अंतीं संव्हार मध्यें स्थिती । हें सर्व मीच जगत्पती। स्वयें आपण॥१९०॥कीं मजमाजि जग। सुवर्णांत जैसे नग। कीं सागरीं नाना तरंग। कीं सर्प रज्जूंत जैसा॥ ९१ ॥ नव्हे सोनेंचि ते नग । आणि

समुद्रचि ते तरंग । रज्जूच सर्प तैसें जग । सर्वही मी ॥९२॥तरंगाचें.उपजणें तेंहि । सागरावांचूनि अन्य नाहीं । तरंग नाशही कांहीं । समुद्रावेगळा असेना ॥ ९३ ॥ तरंग उपजती नाशती । तोंपर्यंत जे असती । त्या असणियास ह्मणावें स्थिती । ते स्थितीही तो समुद्र ॥ ९४ ॥ संहार आणि उत्पत्ती । ह्मणतां स्वयेंचि प्राप्त होय स्थिती । या भावें सृष्टि संहार मात्र श्रीपती । मीच ह्मणे ॥ ९५ ॥ एवं हे सृष्टि त्रिगुण । त्रिगुण सर्वही मीच आपण । येथें शुद्ध निर्गुणपण । त्रिगुण सृष्टींत दाविलें ॥ ९६ ॥ ऐसें बोलिला कमलनेत्र । परि निर्गुण अधिष्ठान मात्र । विकार आकार जे विचित्र । हे सर्व खेळ प्रकृतीचे ॥ ९७ ॥ तेव्हां तेच विश्व करिते । तेचि विश्व धरिते । तेचि स्वयें संहारिते । कां नव्हे ऐसेंचि ॥ ९८ ॥ तेव्हां प्रपंच होतां जैसा । तूं निर्गुणत्वें न होसी तैसा । एवं जे भासवी या भासा । कां स्वतंत्र नव्हे प्रकृतीच ॥ ९९ ॥ शंका येथें मागुती । प्राप्त जाली ये रीती । तेही हरितो जगत्पती । तथा ह्मणूनियां तथा शब्दें करूनी ॥ ३०० ॥ कीं सृष्टि स्थिति संहार जैसा । भासही भासवी प्रकृति तैसा । मीच सर्व सिद्धांत ऐसा । प्रकृति शक्ति माझी यास्तव ॥ १ ॥ जो जयातें प्रवर्तवी । तो तयाचा धणी गोंसावी । प्रकृति या कारणें ह्मणावी । पुरुषाआधीन ॥ २ ॥ जे ज्याच्या सत्तें करूनी । वर्तते तदधीन ह्मणोनी । विश्वाभास प्रकृति होउनी । मज निर्गुणा आधीन ॥ ३ ॥ तीवेगळा मी निर्गुण । सत्ता मात्र असतों आपण । परि मज निर्गुणाविण । ते असेना अथवा दिसेना ॥ ४ ॥ सुवर्णावांचूनि जैसा । अलंकार न कळे कीं आहे कैसा । प्रपंचाचा भास ऐसा । मजवांचूनी ॥ ५ ॥ होऊनि नाना अलंकार । सुवर्णास होऊं नेदी विकार । ऐसी सुवर्णशक्ति परि आधार । तीसही त्या सुवर्णाचा ॥ ६ ॥ कीं सुवर्णाच्या आश्रयें असे । परि असे ऐसी कदापि न दिसे । विचार करितां गवसे । शक्ति तेही ॥ ७ ॥ कीं शक्ति नसती ऐसी जरी । सोनें विकारातें पावतेंचि तरी । कीं दधि जालियावरी । शक्तीवांचूनि दुग्ध नासे ॥ ८ ॥ दुग्धपण न नासे । आणि दधिपण त्यांत भासे । दुग्धांत शक्ति ऐसी असे । तरी दुग्धत्व असोनि दधि होतें ॥ ९ ॥ सुवर्णी शक्ति ऐसी परी । ते त्याविण अनुभवा येती जरी । सत्ता आहे ह्मणूनी तरी । बोलिजे तें तीसही ॥ ३१०॥ कारण शक्ति ऐसी हेमीं । तैसीच माया निर्गुणब्रह्मीं । विश्वरूप तीकरूनि मी । कनक अलंकाररूप साकार जैसें ॥ १ ॥

एवं सुवर्णशक्तींत सुवर्ण । धणी जैसें आपण । तैसें मायाशक्तीचें धणी-पण । निर्गुणा मातें ॥ १२ ॥ तेव्हां निर्गुणातेंचि ईश्वरपण । निर्गुणत्वेंचि मी सगुण । तोचि मी स्वयें आपण । सृष्टि स्थिति आणि संहार ॥ १३ ॥ ईश्वरत्व आलें निर्गुणीं । मिथ्यात्व साधलें त्रिगुणीं । तथापि मायाभास-गुणीं । न बोलवे निर्गुणत्व ॥ १४ ॥ तरी सृष्टि स्थिति संहार । प्रकृतीं भास त्रिप्रकार । तिन्ही मिळोनि माझा आकार । जो सर्वेश्वर सगुण मी ॥ १५ ॥ कीं चराचर व्यक्ती । ज्या अपरा परा माझिया शक्ति । पाह-तां चाळूनि युक्ती । मीच असें ॥ १६ ॥ शक्ति कार्य कारण । न निव-डती वेगळेपण । जैसी सुवर्णशक्ति सुवर्ण । न सोडी ती ॥ १७ ॥ जेव्हां जो जो अलंकार । सोनेंचि तो तो आकार । तैसे परा अपरा प्रकृतीविकार । मी निर्विकारचि होतसें ॥ १८ ॥ तें न ह्मणवे निर्गुण । तरी विश्व ईश्वर-रूप सगुण । "तथा" शब्दें ऐसी खूण । श्रीकृष्ण येथें सूचवी ॥ १९ ॥ ते प्रकृतीच आपण । ईश्वर ह्मणावा सगुण । तरी ते निर्गुणाविण । सांपडे-चिना ॥ ३२० ॥ जेथें सत्ता असे । धणीपण तेथेंचि गवसे । यालागीं ईश्व-रत्व दिसे । निर्गुणींच ॥ २१ ॥ तीवांचूनि ईश्वरपण । नसे तरी असे निर्गुण । त्यावांचूनि कांहींच खूण । न ये ईची ॥ २२ ॥ ईकारितां ईश्वर-पण । परी ईश्वर तेंचि जें निर्गुण । ह्मणूनि ईश्वराचें भासनें रूपही मी आपण । सगुण जो ऐसें बोलतसे ॥ २३ ॥ हें माझें कृष्णरूप । येथें ही माया आणि चित्स्वरूप । माया चित्स्वरूपचि विश्वरूप । तेव्हां चराचर रूपीं मी स्वयें ॥ २४ ॥ मी किरण हें मृगजळ । मीच या मायेचें मूळ । याकारणें सर्व खेळ । मीचि असें ॥ २५ ॥ यालागीं सृष्टि संहार स्थिती । तिन्ही अपरा परा दोन्ही प्रकृती । ते तथा ह्मणजे तसेंचि मी जगत्पती । शेवटीं ऐसें बोले श्रीकृष्ण ॥ २६ ॥ एवं सर्वही निर्गुण । योगीं ऐसी बाणे खूण । तरी माया भास तोही सगुण । योग योजीत असोनि जाणे ॥२७॥ निर्गुणत्वीं सर्वात्मयोग । सगुणत्वीं भक्तियोग । एका समयांत संयोग । ऐसा योग भक्ति दोहींचा ॥ २८ ॥ संपतां षष्ठाध्याय । श्रेष्ठत्वें ज्याचा जाला निर्णय । त्या योगियास योगद्वय । ते ऐसे दोन्ही वर्णिले ॥२९ ॥ पुढें हा अध्याय आरंभला । आरंभीं हेंचि बोलता जाला । कीं योग योजीत समग्रा मजला । जैसें जाणसी तें आईक ॥३३०॥ तें समग्रत्व आपलें । ऐसें येथें वर्णिलें । सर्वात्मकत्व यांतचि दाविलें । योग योजावया ॥३१॥

आतां यानंतर श्लोक । तो कां बोले उत्तमश्लोक । त्याचें निमित्त सुज्ञ लोक । परिसोत आधीं ॥ ३२ ॥ अपरा परा शक्ति दोन्ही । विश्व जाहल्या ऐसें वदोनी । अंतीं ते सकळ मी ह्मणूनी । पूर्वश्लोकवरी वर्णिलें ॥ ३३ ॥ जेथें जग आणि आपण । दोन्ही दावूनि एकपण । बोलतां सूत्रविली । खूण । विवर्त्त अधिष्टान एकत्वाची ॥ ३४ ॥ कीं सर्वज्ञात्रें वचन । अनुभवा ये ऐसें मनन । करावें जे युक्तीकरूनि चिंतन । मनन ह्मणावें तयातें ॥ ३५ ॥ तरी दृष्टांतीं जेथवरी । अधिष्टान विवर्त्त तेथवरी । अधिष्टान सत्य मिथ्यावरी । विवर्तसर्प दोरीं जैसा ॥ ३६ ॥ अनुभवी हे खूण । पाहे अनुभवीं निपुण । कीं जडीं विवर्तीं दिसे निर्गुण । सुवर्ण जैसें अलंकारीं ॥३७॥ तरंगीं दिसे पाणी । निर्गुण ऐसें दिसे त्रिगुणीं । कीं तंतु जैसा पटपणीं । घटपणीं माती उघडी ॥३८॥ जोंवरी ऐसा नव्हे अनुभव । तोंवरी समजावें युक्तिवैभव । एवं मीच सृष्टि संहार ह्मणतो भाव । अधिष्ठान विवर्त्त एकत्वाचा सूचला ॥ ३९ ॥ कीं असोनि सत्य दोर । मिथ्या भासे सर्पाकार । त्या सर्पापलीकडे निर्विकार । दोरचि असे ॥४०॥ तो सर्प असत्य । त्यापलीकडे दोर तो सत्य । यालागीं मानावें अगत्य । कीं दोरचि सर्प तो ॥ ४१ ॥ तो दोरही होता असत्य । ब्रह्म कळतां सत्य । त्या दोरासहित अगत्य । जग हें ब्रह्म मानावें ॥ ४२ ॥ तरी त्याहि ब्रह्मापलीकडे । कांहीं असिलिया तेंही उडे । कीं सर्पापलीकडे । होऊनि उडे । दोर मिथ्यात्वें ॥ ४३ ॥ हेही शंका अनादि । परिहरिली अनादि वेदीं । श्रुति जेथें उपपादी । प्रकृति पुरुषा ॥ ४४ ॥ प्रकृति वर्णूनि अलीकडे । श्रुति ह्मणे पुरुष तीपलीकडे । मागुतीं श्रुति ह्मणे ऐसें न घडे । कीं पुरुषापलीकडे असे कांहीं॥४५॥श्रुति॥ पुरुषान्नापरं किंचित् सा काष्ठा सा परा गतिः ॥ श्रुत्यर्थ ॥ पूर्वी जाला असे । प्रमाण एथें स्पष्ट दिसे । एवं संदेहास अवकाश गवसे । तरी श्रुति निषेधी तयातें ॥ ४६ ॥ कीं प्रकृति पुरुषाआलीकडे । पुरुष तीहूनि पलीकडे । परंतु ऐसें न घडे । कीं पुरुषापलीकडे असे कांहीं ॥४७॥ ऐशा अपरा परा प्रकृती । विवर्त्तरूपें वर्णी श्रीपती । शेवटीं ह्मणे अर्जुनाप्रती । कीं मी अधिष्ठानचि असें सर्व ॥ ४८ ॥ परी मिथ्या सर्पापलीकडे दोर । त्या दोरापलीकडे ब्रह्म निर्विकार । तैसा ब्रह्मापलीकडे त्यास आधार । आणखीं असेना ॥ ४९ ॥ भ्रमें सर्प दृष्टी पडे । दोर असे त्यापलीकडे । तो कळतां सर्प उडे । प्रत्यक्ष सिद्ध ॥ ३५० ॥ ऐकतां वेदांत । वि-

रवसर्प ब्रह्मदोरांत । ऐसें परिसतां संशयांत । बुद्धि निघे ॥ ५१ ॥ कीं दोर कळतां सर्प उडे । तो दोरही राहे आलीकडे । ब्रह्म ऐकतां पलीकडे । तेव्हां दोरही जाला असत्य ॥ ५२ ॥ त्याही ब्रह्मापलीकडे । कांहीं असलिया हें आलीकडे । मिथ्या होऊनि उडे । प्रत्यक्ष सिद्ध ॥ ५३ ॥ स्थळ संदेहाचें ये रीती । जाणोनि एथें जगत्पती । येविषयीं अर्जुनाप्रती । आर्धी हेंचि बोलतो या श्लोकीं ॥ ५४ ॥

॥ श्लोक ॥ मत्तः परतरं नान्यत्किंचिदस्ति धनंजय ।
मयि सर्वमिदं प्रोतं सूत्रे मणिगणा इव ॥ ७ ॥

॥ टीका ॥ मजपलीकडे धनंजया । कांहीं असेल ऐसिया । ह्मणी धरिशील संशया । मज पलीकडे कांहीं असेना ॥५५॥ अर्धश्लोकेंकरूनी । प्राप्त शंका परिहरूनी । आतां सर्वाश्रय आपणचि ऐसें वदोनी । स्वाश्रयत्व आपलें वदतो ॥५६॥ अगा मणि अनेक । त्यास आश्रय सूत्र एक । ते मणि सूत्र अवघें कनक । भेद मागुती असेना ॥५७॥ सर्वांस मी आश्रय । मी स्वाश्रय निराश्रय । सर्वथा न धरी हा संशय । कीं मज आश्रय असेल कांहीं ॥५८॥ सुवर्णाचें सूत्र एक । सुवर्णाचे मणि अनेक । तैसा मी ईश आणि महदादिक । ब्रह्म असे सकळही ॥ ५९ ॥ तथापि ते मणिगण । मी सूत्र ईश्वर सगुण । विश्वरचनारूपें जाण । ओंविले असती मजमाजी ॥३६०॥ सूत्रावांचूनि जे रीती । मणिहार होऊं न शकती । विश्वरचनास्थिती । न ठाके महदादितत्त्वां मजविण ॥ ६१ ॥ ऐसें श्रीमद्भागवतीं । मैत्रेय ऋषि विदुराप्रती । बोले कीं करूं न शकती । महदादि तत्त्वें ब्रह्मांड जेधवां ॥ ६२ ॥ तेव्हां ईश्वरें आपली । शक्ती त्यामध्यें मेळविली । मग सुखें होऊं लागली । ब्रह्मांडरचना ॥ ६३ ॥ महदादितत्त्वांचा पसर । मणिगण भूतें चराचर । त्यांत सूत्र स्वयें ईश्वर । आश्रय तयांचा ॥ ६४ ॥ आणि आपणास आपण । आश्रय ब्रह्म सगुण । या अर्धश्लोकें हेंही खूण । श्रीकृष्ण सांगे ॥६५॥ कीं सर्वही ह्मणतां आपण । उडालें सेव्यसेवकपण । ह्मणूनि सर्वाश्रयत्वें श्रीकृष्ण । आपण सेव्य सकळ सेवक ह्मणोनी सूचवी ॥ ६६ ॥ आतां यानंतर । विभूति बोलतो सर्वेश्वर । त्याचें निमित्त सुज्ञ चतुर । परिसोत आतां ॥ ६७ ॥ कीं समग्रत्व आपलें । बोलतां सेव्यसेवकत्व गेलें । तें

१ समुदाय.

साधलें एकाच बोलें । कीं सूत्रमणिन्यायें तथापि मी आश्रय आश्रितांचा ॥ ६८ ॥ हे गोष्टी देवें साधिली । तों शंका आणखी प्राप्त जाली । कीं सेव्यता एक ईश्वरासि आली । त्या वेगळे सर्व सेवक ॥ ६९ ॥ तेव्हां जे जे श्रेष्ठ । ते न सेवावे वरिष्ठ । आणि ज्येष्ठातें जो कनिष्ठ । त्यानें किमर्थ सेवावें ॥ ३७० ॥ कीं जो तो माया आणि ब्रह्म । तेव्हां सकळही सम । ह्मणूनि ईश्वर सर्वोत्तम । भजावें एका तयातेंचि ॥ ७१ ॥ या संदेहाचें स्थळ परी । सिद्धांतीं हेंचि गोष्टी खरी । कीं सर्वाश्रय एक हरी । तोचि सेव्यं ॥ ७२ ॥ इतर सर्व सम । कोण उत्तम कोण अधम । सर्वाश्रय ह्मणूनि सर्वोत्तम । सेव्य तोचि सर्वा आश्रितां ॥ ७३ ॥ याकरितां हाचि सिद्धांत । अंगीकारूनि भगवंत । विभूतिवैभव आपलें अत्यंत । तें सांगतो ॥ ७४ ॥ कीं उत्तमत्व चित्रविचित्र । माझ्या उपाधीवांचूनि अन्यत्र । नसे तेंचि सर्वत्र । असे यथाविभागें या जगीं ॥ ७५ ॥ जें उत्तमत्व जेथें । ते माझी विभूति सेव्य तेथें । ह्मणूनि विभूति आपल्या एथें । बोलतो या श्लोकापासूनी ॥ ७६ ॥

॥ श्लोक ॥ रसोहमप्सु कौंतेय प्रभास्मि शशिसूर्ययोः ।
प्रणवः सर्ववेदेषु शब्दः खे पौरुषं नृषु ॥ ८ ॥

॥ टीका ॥ उदकीं रस आपण । ऐसें ह्मणतां गोडपण । जें ज्यांत असेल त्यांत खूण । रस ह्मणोनी ॥ ७७ ॥ गुळचट कडू तिखट क्षार । इत्यादि रसेना जाणे प्रकार । ते सर्व रस पाहतां विचार । उदकाचेच ॥ ७८ ॥ एवं ज्यांत जो गोड गुण । त्यास ईश्वराचें विभूतीपण । हे हृदयांत धरितां खूण । होय स्मरण ईश्वराचें ॥ ७९ ॥ श्रवणादि भक्ति नव । त्यांत स्मरणभक्ति जीव । श्रवणादि कोण भाव । घडे स्मरणावांचूनी ॥३८०॥ श्रवणादि भक्ति जेजे । तीस स्मरण आधीं पाहिजे । त्या आठांतीण स्वयें विराजे । स्मरणभक्ति स्वतंत्रत्वें ॥ ८१ ॥ आतां जों नव्हे श्रवण । तों न घडे ह्मणावें स्मरण । तरी श्रवणासी हेतु स्फुरण । स्वहिताचें ॥ ८२ ॥ स्वहितास हेतु प्रीती । त्या प्रीतीतेंचि भक्ति ह्मणती । ते भक्ति कळते आयती । श्रवणादिकींकरूनी ॥ ८३ ॥ ईश्वर आत्मा आपला । हें रहस्य नेणे त्याला । भक्तियोग नाहीं बोलिला । जो ह्मणावा अव्यभिचार ॥ ८४ ॥ भक्ति दों स्थळीं जाली । ते व्यभिचारिणी बोलिली । जैसी स्त्री भजों ला-

---

१ जीभ.

गली । पुरुषां दोघांतें ॥ ८५ ॥ कीं ईश्वरीं जे प्रीती । भक्ति तीतें ह्मणती । परि भक्ति तेच करिती । चाड स्वहिताची जयांस ॥८६ ॥ आपणास आपण गमे गोड । तरीच आत्महिताचा निघे मोड । या गोडीपुढें जाली रोंड । गोडी ईश्वराची ॥ ८७ ॥ आपणास पाहिजे धन मान । ह्मणूनि रायातें सेविती जन । ऐसेंच आवडीनें भजन । आपणाकारणें देवाचें॥ ८८॥ हाचि आत्मा ईश्वर । ऐसें कळतां जो जो आदर । तो तो ह्मणावा अव्यभिचार । कीं प्रीति दों ठायीं असेना ॥ ८९ ॥ पतिव्रतेचा दृष्टांत । तोही येथें न साहे अत्यंत । कीं तेही अपेक्षूनि स्वहित । पतिसेवा करीतसे ॥३९०॥ एवं दों स्थळीं नसे प्रीती । ते अव्यभिचारिणी भक्ति ह्मणती । प्रीतीसी दोन फांटे फुटती । व्यभिचारिणी ती ह्मणावी ॥ ९१ ॥ एवं जे आपली प्रीति अत्यंत । तेच भक्ति होते निश्चित । त्या प्रीतीनें आठवे स्वहित । तें स्मरण आधीं श्रवण तेव्हां ॥ ९२ ॥ तेंही तरी घडे श्रवण । कीं श्रवणाचें जरी असे स्मरण । कीं स्मरण तेथें अंतःकरण । श्रवण अंतःकरणेंचि घडतें ॥९३॥ एवं श्रवणकाळीं पाहिजे स्मरण । परि स्मरणकाळीं नलगे श्रवण । कीर्तनादिकाची तों खूण । स्मरणाविणें सांपडेना ॥ ९४ ॥ आठां भक्तींची कळी । न उकले स्मरणावेगळी । ऐसी सर्वांत आगळी । स्मरणभक्ति ॥ ९५ ॥ सर्वां रसीं जळ । तें भक्षूनिही उदक केवळ । पानार्थ पाहिजे ऐसी निखळ । स्मरणभक्तीही लेखिली नवांत ॥ ९६ ॥ एवं पाहतां विभूती । होय ईश्वरांची स्मृती । प्रस्तुतीं गोडी गोडी प्रीती । रस विभूतियोगें हरि स्मरावा ॥ ९७ ॥ एवं उदकीं मी रस । येथें बोले जगन्निवास । मू[illegible] सर्वां रसास । रस जो दिसतसे जलरूपें ॥ ९८ ॥ ऐसीच चंद्रसूर्यांत प्रभा । मीच माझी विभूति ते शोभा । ज्या प्रभा व्यापूनि नभा । पडदा काढिती तमाचा ॥ ९९ सर्वां वेदांचें मूळ । जो प्रणव ओंकार केवळ । तो मीच संन्यासी निर्मळ । ज्या बीजमात्रातेंचि जपती ॥ ४०० ॥ आतां शब्द आकाशगुण । ज्या शब्दें कळे सर्वांची खूण । तो मी सगुण निर्गुण । वाच्य अनिर्वाच्य ह्मणती ज्या शब्दें ॥ १ ॥ पुरुषामाजीं पुरुषार्थ । तो मीच स्वयें समर्थ । एवंच जाण तूं यथार्थ । कीं पुरुषार्थ सर्वही मी असें ॥ २ ॥

॥ श्लोक ॥ पुण्यो गंधः पृथिव्यां च तेजश्चास्मि विभावसौ ।
जीवनं सर्वभूतेषु तपश्चास्मि तपस्विषु ॥ ९ ॥

---

१ अंकुर. २ शुष्क. ३ पिण्यासाठीं.

॥ टीका ॥ अगा सर्वत्र सुगंध । तो पृथ्वीचाच गुण गंध । यावेगळे जे दुर्गंध । ते विकार ॥ ३ ॥ यालागीं जो पुण्यगंध । ह्मणजे पृथ्वींत जो सुगंध । तो मी माझी विभूतिसंबंध । सुगंधमात्रीं तूं पाहें ॥ ४ ॥ मी तेज अग्नीभीतरी । कीं माझी विभूति वैश्वानरीं । सर्वभूतीं यापरी । जीवन तें[1] मीच ॥ ५ ॥ कीं लिंगदेह आणि त्रिदश जीव । जोंवरी असे तोंचिवरी सजीव । ह्मणावा अन्यथा शव । अमंगळ होतसे देह तो ॥ ६ ॥ तें जीवन मी जगत्पती । ह्मणिजे माझी विभूती । जोंवरी जीवन तोंवरी प्रीती । परम आप्ताचीही त्यावरी ॥ ७ ॥ आतां तपस्वियांत तप । अत्यंत ज्याचा प्रताप । तें मी माझ्या विभूतीचें रूप । तें तपही जाण तूं ॥ ८ ॥ ऐशा पाहतां विभूती । ह्मणी आत्मतत्त्वाची पडे विस्मृती । ह्मणूनि आत्मा सर्वभूतीं । पाहें कीं तें पाहणें विभूति ह्मणतो या श्लोकीं ॥ ९ ॥

॥ श्लोक ॥ बीजं मां सर्वभूतानां विद्धि पार्थ सनातनम् ।
बुद्धिर्बुद्धिमतामस्मि तेजस्तेजस्विनामहम् ॥ १० ॥

॥ टीका ॥ अगा मीं या माझ्या विभूती । सांगतों ज्या समस्तां भूतीं । त्या भूतांचें बीज मी जगत्पती । परि नव्हे इतरां बीजांसारिखा ॥ ४१० ॥ कीं उपजतां अंकुर । बीजनाश सत्वर । बीज होऊनिही मी नव्हे नश्वर । सनातन नित्य शाश्वत ॥ ११ ॥ तरी बीजत्वें कां गणावें । शाश्वत नित्य जेव्हां ह्मणावें । बीज ह्मणतां कोठोनि आणावें । नित्यत्व ॥ १२ ॥ कोणी ऐसें ह्मणती तरी । याच्या उत्तरार्धीं हरी । बोले ऐसी वैखरी । कीं बुद्धि मी बुद्धिवंतांत ॥ १३ ॥ ह्मणूनि हा अर्थ । ज्या दृष्टांतें साधे यथार्थ । त्या दृष्टांतें साधाया ऐसें समर्थ । सूचवी येथें ॥ १४ ॥ कीं बीजपण तरी घडे । आणि नित्यत्व तरी न विघडें । ऐशा विचारें उघडे । या वाक्यार्थाचें कवाड ॥ १५ ॥ सूर्यकिरणापासूनी । मृगजळ उपजे प्रतिदिनीं । पुन्हा त्यांत लय पावूनी । बीजांत वृक्ष ऐसें असे ॥ १६ ॥ बीजांत वृक्ष असे । कीं त्यांतूनि निघतां दिसे । आणि वृक्षांत बीज वसे । तरी उपजे वृक्षापासूनी ॥ १७ ॥ परि बीज नाशत असे । त्यांतील अंकुर जेव्हां दिसे । मृगजळ होतां तैसा नसे । नाश किरणांचा ॥ १८ ॥ आणि किरण सत्य । जळभास असत्य । स्वयें बीज सत्य तें असत्य । हें साधेल याच दृष्टांतें ॥ १९ ॥ इत्यादि भाव पोटीं । तों कृष्ण ह्मणे आगा किरिटी । ऐशा ब्रह्मां-

१ पिण्यासाठीं. २ नाशवंत.

डाच्या कोटी । बीज सनातन मी त्याचें ॥४२० ॥ बीज शब्द ऐसा गहन । बोलोनियां जगज्जीवन । बुद्धिमंतांत बुद्धि मी ऐसें वचन । त्यापुढेंचि बोलतसे ॥ २१ ॥ कीं रहस्य अत्यंत । हें गुह्य यासही बुद्धिमंत । यथार्थ वाखाणिती त्यांत । बुद्धि ते भगवंत मी असें ॥ २२ ॥ ते बुद्धिमंत तेचि बुद्धि । कीं ज्यास जे बुद्धीनें तत्त्वसिद्धी । त्या नित्य बीजाच्या अनुभवाची समृद्धी । ज्या बुद्धीनें धन्य ते ॥ २३ ॥ आतां जे तेजस्वी थोर । ज्ञानी तपस्वी चतुर सुंदर । धनवंत विद्यावंत कलावंत नर । त्यांतें तेज जें जें तें तें मी असें ॥२४॥ इत्यादि ज्यापाशीं जो गुण । तें तेज त्यांचें हे खूण । त्या तेजें तो तेजस्वी निपुण । परि भगवद्विभूति तें तेज ॥ २८ ॥

॥ श्लोक ॥ बलं बलवतां चाहं कामरागविवर्जितम् ।
धर्माविरुद्धो भूतेषु कामोस्मि भरतर्षभ ॥ ११ ॥

॥ टीका ॥ बलवंतांत मी बळ । परंतु तें बळ जें केवळ । कामविषयप्रीति ओंगळ । तें बळ नव्हे विभूति माझी ॥ २६ ॥ आणि धर्मास नव्हे विरुद्ध । स्वस्त्रीशीं यथाकाळें भोग शुद्ध । तो काम मी इतर अशुद्ध । विभूति माझी तो नव्हे ॥२७॥ एथवरी ज्या ज्या विभूती । बोलता जाला श्रीपती । त्यांत मात्र दावी ये रीती । कीं उत्तम तितकें स्ववैभव ॥ २८ ॥ प्रस्तुत धर्मास अनुकूळ । तो काम विभूति आपली निर्मळ । धर्मास विरुद्ध तो अमंगळ । विभूति आपली न म्हणावी हा भाव ॥ २९ ॥ तरी आपण सर्वसम । आपणास कां उत्तमाधम । या संशयें मतिभ्रम । अर्जुनादिकांचा होणार ॥ ४३० ॥ एथें हेंचि समाधान । कीं त्रिगुणचक्रीं मन । भ्रमतसे म्हणूनि जन । गुणानुरूप फळ पावती ॥३१॥ त्यांत सत्त्वें उत्तम गती । तमें अत्यंत अधोगति होती । रजोगुणें मध्यें राहती । हें चतुर्दशीं स्पष्ट होणार ॥ ३२ ॥ प्रस्तुतीं धर्मास अविरुद्ध । तो काम सत्त्वगुणयोगें शुद्ध । सत्त्वगुणें उत्तमलोकगति सिद्ध । रजें मध्यम तमें अधोगती ॥३३॥ एकचि सोनें परी । त्याचे नग वेगळ्याल्या कुसरी । एकास एकाची सरी । येणार नाहीं[1]॥ ३४ ॥ लोखंडाचीच परि बेडी । लोखंडाचाच घन घडी । किंकेरी लोखंडाचीच तोडी । लोखंडाचेच बेडीतें ॥ ३५ ॥ तैसे प्रकृतीचे गुण । मीच स्वयें निर्गुण । कीं गारांचें कठिणपण । पाहतां अवघें मृदु जळ ॥३६॥ प्रकृतीचेच गुण । जाले नरक दारुण । त्या नरकप्राप्तीस कारण । तेचि जाले ॥ ३७ ॥ चुकती नरक दारुण । यासही निमित्त तेच गुण । त्यांत

---

[1] पातळी.

सात्त्विका स्वभावाची खूण । स्वहिताचरण वेदोक्त ॥ ३८ ॥ एवं धर्मास तो नव्हे विरुद्ध । सात्त्विकाचा काम शुद्ध । माझें विभूतिपण सिद्ध । त्या कामास याकरितां ॥ ३९ ॥ ते तिन्ही गुण । आणि यांचें लक्षण । आणि गति हें निरूपण । चतुर्दशांत होणार ॥ ४४० ॥ प्रस्तुत धर्मास अविरुद्ध । तो काम सात्त्विकांचा शुद्ध । ह्मणूनि ऐसें जालें सिद्ध । कीं त्रिगुण एथें बोलावें ॥ ४१ ॥ त्यांत सात्त्विकभाव माझ्या विभूती । सत्त्वानुरूप उत्तम गती । तरी मीच मायाधिपती । चाळक तिन्ही गुणांचा ॥ ४२ ॥ तथापि ते गुण असत्य । त्यांचें अधिष्ठान आपण सत्य । हें जे रीती साधे अगत्य । तैसें बोलतो या श्लोकीं ॥ ४३ ॥

॥ श्लोक ॥ ये चैव सात्त्विका भावा राजसास्तामसाश्च ये ।
मत्त एवेति तान्विद्धि न त्वहं तेषु ते मयि ॥ १२ ॥

॥ टीका ॥ अगा धर्मास अनुकूळ काम । ह्मणूनि ऋतुकाळीं स्वस्त्रीसंगम । हा सात्त्विकभाव उत्तम । सात्त्विक भाव इत्यादि ॥ ४४ ॥ आणि अनादि वासना । जे उपजवी भोगकामना । विषयासक्त करी मना । राजसभाव इत्यादि ॥ ४५ ॥ विषयभोगनिमित्तक । क्रोधशोकमोहादिक । इत्यादि भाव अनेक । तमोगुणाचे ॥ ४६ ॥ हे गुणाचे भाव । परि मजपासूनि यांचा उद्भव । कीं ते गुण स्वयमेव । मजपासूनिच उपजले ॥ ४७ ॥ मजपासूनि त्यांची उत्पत्ती । परि त्यांत नसें मी जगत्पती । आणि ते मजमाजि असती । जाण ऐसें अर्जुना ॥ ४८ ॥ ऐसें जाण ह्मणोनी । बोलतां या स्ववचनीं । भाव दावी कीं ज्या दृष्टांतेंकरूनी । हें घडे त्या दृष्टांतें हें जाण ॥ ४९ ॥ कीं दृष्टांताविना अर्थ हा साधेना । ह्मणूनि जाण ह्मणे अर्जुना । तें दृष्टांतेंचि जाणा ह्मणतो ह्मणावें ॥ ४५० ॥ कीं काय ऐसें असे । ज्यांत हा सर्वव्यापक नसे । हा त्यांत नसतां ते कैसे । यामाजी असती ॥ ५१ ॥ आकाश जैसें सर्वगत । हा तैसा त्याहीपुढें अनंत । जें असेल त्या आकाशांत । त्यांत तो नसेल कैसा ॥ ५२ ॥ वायु आकाशापासूनी । तो वायु वसे त्याच गगनीं । गगन वायूंत नसे ह्मणोनी । ह्मणेल कोण ॥ ५३ ॥ एथें याकारणें । लागलें जेव्हां विचार करणें । तेव्हां अगत्य लागलें येणें । दृष्टांतावरी ॥ ५४ ॥ सर्प ज्या रज्जूपासूनि होतसे । त्या सर्पीं रज्जु तो नसे । कीं सर्प सत्य न दिसे । दोर त्यांत न असे यालागीं ॥ ५५ ॥ जळास भास किरणांपासूनी । उपजे परी मिथ्या ह्मणोनी । जें असत्य तें नसे यावरूनी । किरणें नसती मृगजळीं ॥ ५६ ॥ परी मृगजळ किरणांवांचूनी । न दिसे न असे या निमित्तेंकरूनी ।

किरणींच आहे ह्मणोनी । ह्मणावें अगत्य ॥५७॥ ऐसे त्रिगुणाचे भाव । मज-पासूनि ह्मणे देव । परी मिथ्यात्वें नसती यास्तव । ह्मणे त्या त्रिगुणभावांत मी नसें ॥ ५८ ॥ परी ते गुणांचे भाव आणि गुण । न दिसती न असती मजविण । सागरीं तरंगांतें तरंगपण । तैसे असती मजमाजी ॥ ५९ ॥ इत्यादि दृष्टांत कोटी । उपजे असत्य सत्याचेच पोटीं । असत्य नाहीं यास्तव शेवटीं । सत्य नसे ह्मणावें त्या असत्यांत ॥ ४६० ॥ परी जें सत्य । त्यावांचूनि न दिसे असत्य । ह्मणोनि मानावें अगत्य । सत्यांतचि असत्य आहे ह्मणोनी ॥ ६१ ॥ एवं गुण गुणाचे भाव । असत्य आणि सत्य स्वयमेव । ऐसें सूचवूनि देव । सकळ मी ऐसें दावी समग्रत्व॥६२॥आणि मागुती गुण त्रिविध । त्या तिहींचे भाव विविध । जैसा भाव तैसाच फलसंबंध । त्रिगुणभावकर्माचा ॥ ६३ ॥ त्यांत सात्त्विक शुद्ध । कामाविलास त्याचे शास्त्रसिद्ध । ह्मणोनि धर्मास अविरुद्ध । तो काम मी ऐसें ह्मणे ॥ ६४ ॥ कीं कामादि शास्त्रसंमत । दिव्य फळ देती निश्चित । ह्मणोनी आपली विभूति भगवंत । ह्मणे त्यातें ॥ ६५ ॥ एवं सर्वात्मत्वस्थिती । त्यांत आपल्या विभूती । द्वैत नसोनि गती । गुणकर्मानुरूप ॥ ६६ ॥ हें इतकें सिद्ध जालें । जेव्हां गुणभावास मिथ्यात्व आलें। कीं भाव विविध तेव्हां साधलें । फळ विविधत्वें गतिविविधत्व ॥ ६७ ॥ अद्वैतामध्यें द्वैत । आणि द्वैतांत अद्वैत । प्रसंगें ऐसें भगवंत । तत्त्व सर्वांचें बोलिला ॥ ६८ ॥ कीं देखिलें ऐकिलें जें कांहीं । आणि देखिलें ऐकिलें जें नाहीं । जें जेथें जैसें असेल सर्वही । तेंचि तत्त्व सकळांचें॥ ६९ ॥ कीं सर्व या गुणांचेच भाव। त्यांचा प्रकाशक एक देव । परी हें तत्त्व नेणती जीव । याच गुणभावेंकरूनी ॥ ४७० ॥ हे गुणभाव ऐसे अनेक । यापलीकडे यांचा प्रकाशक । जीव नेणती हा विवेक । या गुणाचिकरितां ह्मणतसे या श्लोकीं ॥ ७१ ॥

॥ श्लोक ॥ त्रिभिर्गुणमयैर्भावैरेभिः सर्वमिदं जगत् ।
मोहितं नाभिजानाति मामेभ्यः परमव्ययम् ॥ १३ ॥

॥ टीका॥ अगा हे त्रिगुणमय भाव । याचकरितां जगीं जीव । मोहोनि जो यापरता मी देव । त्या मातें कोणी नेणती॥ ७२ ॥ त्यांत जो सत्त्वगुण । त्यासही रजतमामिश्रितपण । अनादि अविद्येंकरूनि खूण । नेणे माझी ॥ ७३ ॥ ज्यांस सत्त्वीं उत्तम गती । तेही गर्भवासा येती मागुती । न चुकती यातायाती । जो गुणापलीकडे मज नेणे ॥ ७४ ॥ चित्त बुद्धि मन सत्त्वगुण । इंद्रियें रज देह तमोगुण । अहंकारीं याचें एकपण । हाचि

मोह ॥ ७५ ॥ मोह ह्मणजे अविवेक । हा वेगळा द्रष्टा वेगळा हा विवेक । त्या अनेकीं आत्मा एक । अव्यय अविनाशी मी असें ॥ ७६ ॥ परंतु या तिहीं गुणांचे भाव । त्या भावीं मोहले जीव । त्यांचा आत्मा मी देवाधिदेव । त्या मातें न जाणती ॥७७॥ गुण हे कां ऐसे बलवंत । आणि ऐसियांसही तरूनि जाती संत । त्यास काय कारण हें भगवंत । गुह्य सांगतसे या श्लोकीं ॥ ७८ ॥

॥ श्लोक ॥ दैवी ह्येषा गुणमयी मम माया दुरत्यया ।
मामेव ये प्रपद्यंते मायामेतां तरंति ते ॥ १४ ॥

॥ टीका ॥ आइकें अगा धनंजया । गुण तिन्ही हे ह्मणावी माया । ते माया अति दुरत्यया । ह्मणजे जें न तरवे दुःखेंही ॥ ७९ ॥ "मा" ह्मणजे नसे । "या" ह्मणजे जें नसोनि भासे । या दों शब्दांचे दोन्ही ऐसे । अर्थ कीं ऐसेंचि तत्त्व तिचें ॥ ४८० ॥ मृगजळ वस्तुतः नसे । नाहीं ह्मणतां आहेसें दिसे । दों अक्षरांचे भाव ऐसे । माया ह्मणावी याकरितां ॥ ८१ ॥ नाहींच ह्मणावी ते । तरी विश्वरूपें दिसते । आहे ह्मणावी तरी होते । दूर कळतां जैसा सर्प ॥ ८२ ॥ तरंग जळीं दिसती । जळावेगळे कांहींच नसती । नाहीं ह्मणावे तरी भासती । नानारूपें ॥ ८३ ॥ माया ह्मणूनी हीं दोंनी अक्षरें । या भावें या प्रकारें । योजूनि म्यां अनादि चतुरें । नांव ठेविलें या शक्तीचें ॥ ८४ ॥ कार्यरूपी माया । ऐसी ह्मणावी धनंजया । कारणत्वीं ही आपुलिया । शब्दद्वयार्थातें न सोडी ॥ ८५ ॥ मध्यान्ह टळतां किरणीं । जैसें दिसेना असत्य पाणी । तैसी प्रलयकालीं निर्गुणीं । कार्यरूपी माया दिसेना ॥ ८६ ॥ तेव्हां ह्मणावी नाहीं ह्मणूनी । तरी प्रकटते पुन्हा त्यापासूनी । मृगजळ जैसें प्रतिदिनीं । किरणीं प्रकट होतसे ॥८७॥ जळाभास किरणीं नसे । कारणरूपें त्यांत तेव्हांही वसे । कीं कार्यरूपें दिसे । दुसरिये दिवसीं ॥ ८८ ॥ कीं बीजांत वृक्ष न दिसे । तरी ह्मणावाच कीं असे । नसेचि तो कोठोनि गवसे । जेव्हां निघतो त्यांतूनी ॥ ८९ ॥ प्रपंच लय पावोनी । पुन्हा उपजे निर्गुणापासूनी । तेव्हां कारणरूपें असेच ह्मणोनी । प्रलयकाळीं ब्रह्मीं हे माया ॥ ४९० ॥ "मा" शब्दें तेव्हां माया नसे । कीं ब्रह्मीं इतर कांहींच न दिसे । "या" शब्दें तथापि तेव्हां ब्रह्मीं वसे । तरी निघतसे मागुतीं ॥ ९१ ॥ नसोनि इच्छा किरणीं । जळाभास उपजे ऐसी निर्गुणीं । इच्छा नसोनि कारणरूपिणी । कार्याभिमुख माया प्रकटते ॥ ९२ ॥ ते समयीं निर्गुण । असोनिही निर्गुणपण । त्या मायेक-

रूपिही होतें सगुण । त्रिगुण तेव्हां प्रकटती ॥ ९३ ॥ गुण तिन्ही आणि त्यांचे भाव । या कार्यरूपीं ते माया स्वयमेव । कारणरूपिणी वास्तव । समूळ मिथ्या खेळ इचे ॥ ९४ ॥ याकारणें धनंजया । हे ह्मणावी माया । त्रिगुणभावरूपें दुरत्यया । कधीं न तरवे ऐसी जाली ॥ ९५ ॥ गोंवी गुण त्रयाच्या भावीं । गुणमयी याकारणें ह्मणावी । शक्ति गुणशब्दाची पहावी । तो दोर ह्मणूनी अर्थ गुणशब्दाचा ॥ ९६ ॥ बंधनाचे प्रकार । फांसे दांवीं जाळीं इत्यादि इतर । यास साधन दोर । ते दोर संस्कृतीं गुण ह्मणावे ॥ ९७ ॥ त्रिगुणाचिया भावीं । जीवां संसारीं गोंवी । माया गुणमयी ह्मणावी । याकरितां ॥ ९८ ॥ ऐसी गुणमयी माया । आणि अत्यंत दुरत्यया । दुरत्यया ऐसी कीं ईस तराया । शक्त नव्हे कोणीही । ॥ ९९ ॥ कीं जरी हे सत्य असती । तरी नावा घालूनि तरली जाती । प्रलयसूर्यें शुष्क होती । सांपडती पायवाट ॥ ६०० ॥ धरूं जातां न सांपडे । धरणार अधिक फांसीं पडे । जों जों पोहेल तों तों बुडे । प्रवाहीं ईच्या ॥ १ ॥ ईमाजी जो बुडाला । बुडालों न वाटे त्याला । तरलों ह्मणे याही बोला । बोले बुडाला तोही दिसे ॥ २ ॥ सत्यलोकादिपर्यंत । बुडोनि सेवाळले अत्यंत । तरले ह्मणूनि तेथपर्यंत । चढले घसरले तेही तोंडघसीं ॥ ३ ॥ वासनासमीरें चंचळ । उठती कामनेचे कल्लोळे । धार[1] अहंकाराची लोळ । अत्यंत करी ॥ ४ ॥ काम क्रोध तिमिंगिळे[2] । गिळिती चघळिती प्रबळ । लोभ नक्र[3] अमंगळ । मिठी घाली न सोडी सर्वथा ॥५॥ मद मत्सर भुजंग । डसती वेष्टूनि सर्वांग । सर्व विषयझेंडू[4] लागतां श्रीरंग । वाचे नये जो तारणार इजपासूनी ॥ ६ ॥ हे नदी तराया उपाय । जरी अर्जुना ह्मणसी काय । तरी हेचि माझे दोन्ही पाय । इतर उपाय ते अपाय अवघेही ॥ ७ ॥ " मामेव ये प्रपद्यंते " ह्मणोनी । यांत या एव शब्दें करूनी । इतर कोणी आपणावांचूनी । तारक नाहीं हें सूचवी ॥ ८॥ ऐसें कां ह्मणसी धनंजया । तरी दैवी आणि मम माया । या दों गोष्टींकरूनियां । निमित्त येविषयीं बोलतो ॥ ९ ॥ कीं सर्वांत थोर देव । तो अर्जुना मी स्वयमेव । त्या माझी शक्ति वास्तव । दैवी ह्मणावी ॥ ६१० ॥ मी देव माझी दैवी । हे माया दैवी ह्मणावी । यावरूनि हे जाणावी । कीं असे मजआधीन ॥ ११ ॥ मजआधीन माझी माया । या कारणें धनंजया । इच्या पाशापासूनि सोडावया । समर्थ मी एक ॥ १२ ॥ यालागीं मातेंचि भज-

---

१ धारा. २ लाटा. ३ प्रवाह. ४ मोठे मासे.

ती । ते माया नदीतें तरती । ज्यास पाय माझे नाव होती । ते बुडती हें घडेना ॥ १३ ॥ आतां यानंतर श्लोक । तो कां बोले उत्तमश्लोक । त्याचें निमित्त सुज्ञ लोक । परिसोत आधीं ॥ १४ ॥ पूर्वश्लोकीं माया । नदी वर्णूनि दुरत्यया । बोलिला तीतें तरावया । उपाय एक ॥ १५ ॥ कीं आपण जगज्जीवन । धणी इचा आपण हे आपले आधीन । ह्मणूनि मातेंचि भजती जन । तेचि तरती या मायानदीतें ॥ १६ ॥ ऐसें बोलतां भवभंजन । संतुष्ट जाला अर्जुन । कीं आतां सर्वजन । तरतील या मायानदीतें ॥१७॥ कीं हे गोष्टी आजिवरी । ऐसी कळली नव्हती बरी । यातें भजोनि याउपरी । तरतील सर्व ॥१८॥ हा त्याचा मनोभाव । समजोनि साक्षी देवाधिदेव । हें खरें परी पापी मानव । न भजती मज ह्मणे या श्लोकीं ॥ १९ ॥

॥ श्लोक ॥ न मां दुष्कृतिनो मूढाः प्रपद्यंते नराधमाः ।
माययापहृतज्ञाना आसुरं भावमाश्रिताः ॥ १५ ॥

॥ टीका ॥ अगा मातें भजते । तरी सर्व जन निश्चयेंचि तरते । हें प्रकट परी अंध होते । दृष्टि रविमंडळीं दिवांधाची ॥ ५२० ॥ अगा हे दुष्कृती पापी । ते हें ऐकती जाणती तथापी । माझें नाम सोपें तेंही कदापी । न आणिती वाचे ॥ २१ ॥ गोड अत्यंत शर्करा । ते कड लागे पित्तातुरा । तेसा मूढा पापिया पामरा । गोड न वाटें मी सेव्य ॥ २२ ॥ दुष्कृता पापाचिया कोटी । ज्या पापियाच्या पोटीं । त्याचिया हृदयांत अगा किरीटी । वास माझा केंवि घडे ॥२३॥ सर्वत्र मी व्यापक असें । ते नाहींच जेथें मी नसें । परी सेव्य होऊनि हृदयीं वसें । पुण्यें अगण्यें करूनी ॥ २४ ॥ अग्नि असे काष्ठमात्रीं । परी मथिता आयता अग्निहोत्री । तैसा व्यापक हृदयेंशतपत्रीं[1] । भजती त्यांचिया वसतसें ॥ २५ ॥ परी पुण्य अगण्य ज्यांचिया पदरीं । भजनेच्छा वसे त्यांच्या अंतरीं । जे दुष्कृति पापी कोणे परी । माझें भजन त्यांला नावडे ॥ २६ ॥ हृदयांत इत्यादि भाव । तो ह्मणे देवाधिदेव । कीं जे दुष्कृति अधम मानव । ते पापी मातें न भजती ॥ २७ ॥ जे केवळ पशुसम । त्यांतें एथें पुरुषोत्तम । न निंदी कीं ते नराधम । ह्मणूनि न ह्मणे तयांतें ॥ २८ ॥ आणि "माययापहृतज्ञानां" आणि "आसुरं भावमाश्रित" ह्मणे ज्या जनां । या शब्दीं सूचवी अर्जुना । कीं केवळ पशुही ते नव्हती ॥ २९ ॥ कीं स्वहिताविषयीं तरी तत्पर । ह्मणूनि ह्मणावे ते नर । परी नरांत अधम कीं सादर । माझिया

[1] हृदयकमलीं.

भजनीं न होती ॥ ५३० ॥ मुख्य फळ मोक्ष । मोक्षप्रद अंबुजनाभ अंबु-जाक्ष । ऐसें कळोनिही काम्य पक्ष । धरिती धरूनि भाव असुरांचा ॥३१॥ करितां मुकुंदभजन । मुक्ति निश्चय ऐसें ज्ञान । असोनि झाले अज्ञान । कीं तें ज्ञान हरिलें मायेनें ॥३२॥ मोक्ष विषयापलीकडे । तो मोक्ष त्यांतें नावडे । ज्यांच्या मनाची उडी पडे । विषयांचि वरी ॥३३॥ दृष्टि देऊनि विषयावरी । मोक्ष आणि मोक्षप्रद हरी । टाकूनि काम्यकर्माच्या कुसरी । काम्यफळें श्रेष्ठ बोलती ॥३४॥ ऐसें असोनि हरिलें ज्ञान । मायेकरूनि जाले अज्ञान । दिवांधा असोनि नयन । सूर्य न दिसे ॥३५॥ देह मी ऐसा भ्रम । मायेकरूनि प्रथम । मग आवडे विषयसंभ्रम । ह्मणोनि मुक्तिप्रदातें न भजती ॥ ३६ ॥ मा ह्मणजे नसे । या ह्मणजे जे नसोनि गवसे । ते प्रत्यक्ष एथें दिसे । देह मी ऐसें वाटतां ॥ ३७ ॥ देहावेगळा देहास जाणे । तो देह आपण ऐसें ह्मणे । न शिकतां न करितां अभ्यास बाणे । देहचि मी ह्मणोनी ॥ ३८ ॥ स्वप्नीं दिसे ऐसाच देह । तोही आपण निःसंदेह । वाटे आणि ऐसाच स्नेह । त्या देहाचाही आत्मत्वें ॥ ३९ ॥ जागा होतां तो नसे । तैसा आत्मत्वेंचि हा देह दिसे । स्नेह तैसाच असे । याहि देहीं ॥५४०॥ मी काय तें शरीर । किंवा हेंचि कलेवर । ऐसा विचार कोणी चतुर । करितां दिसेना ॥ ४१ ॥ हा देह वाटे जैसा । तोही आपणचि ह्मणोनि वाटे तैसा । परी एथें विचार न कळे ऐसा । कीं दोन्ही नव्हे आपण ॥ ४२ ॥ जरी जागृति देह आपण । तरी तो आपण ही न वाणती खूण । तेव्हां दोन्ही आपण नव्हे ऐसी खूण । न कळे मोह हा मायेचा ॥ ४३ ॥ देह मी ऐसें ह्मणे । तो काय देहास देहचि जाणे । तरी शव कां आपणातें नेणे । मी देह ह्मणोनी ॥ ४४ ॥ एवं देहावेगळा आपण । ऐसी विवेकें जो धरी आठवण । तोंपर्यंत देहात्मपण । विश्व धुंडितां न सांपडे ॥ ४५ ॥ दोर जोंवरी दिसे । सर्प तोंपर्यंत नसे । एवं मी देह ऐसा प्रत्यय वसे । सर्प दोरीं जे रीती ॥ ४६ ॥ देह तो आपण नसे । आणि देह मी प्रत्यक्ष ऐसें दिसे । प्रत्यक्ष हे माया वसे । प्रति शरीरीं ॥ ४७ ॥ मनुष्य पक्षी पशु कृमी । सर्वांस वाटे देह मी । विषय-वासना या मायाभ्रमीं । वसतसे ॥ ४८ ॥ वेदशास्त्रें वाचूनी । मोक्षप्रद हरि ऐसें कळोनी । विषयसुखलालसा धरूनी । सकाम जाले ॥ ४९ ॥ इतर देवतांतें भजती । काम्यफलार्थ त्यांतें यजिती । ज्ञान असोनि अज्ञान होती मायेकरूनि ते ऐसे ॥ ५५० ॥ अत एव मूढ जाले । शास्त्रें वाचून मोहले । सहज मूढ ते भले । हे मायाहृतज्ञान पढतमूर्ख ॥ ५१ ॥ टाकूनि विष्णु

भजन। करिती क्षुद्रदेवतायजन । असुररीतिपूजन । ते करिती ॥ ५२ ॥ वेद वेदोक्त कर्म । असुरांतें असे आणि स्वधर्म । परि भूतदयेचें वर्म । नसे तयां ठाउकें ॥ ५३ ॥या भावें ह्मणे देव । कीं ते धरोनि असुरभाव । मी जो देवाधिदेव । त्या मातें न भजती ॥ ५४ ॥ कीं असुरभाव ज्याला । हिंसात्मका क्रिया घडे त्याला । शास्त्रबोध ज्यांचा व्यर्थ गेला । मायेंकरू-नी ॥ ५५ ॥ कारण यास सुकृत । कीं जे दुष्कृति पापी अत्यंत । त्यांधेंचि ऐसें सूचवूनि वर्णी भगवंत । हृतज्ञानत्व असुरत्व ॥ ५६ ॥ " एषां त्वंतग-तं पापं " ह्मणोनी । पुढें इत्यादि भगवद्वचनीं । याच अध्यायांत याच प्रक-रणीं । होईल निर्णय ॥ ५७ ॥ कीं नाशिलें ज्याचें पाप । जे पुण्यवंत नि-ष्पाप । ते गुरु देव मायबाप । मातेंचि मानिती ॥ ५८ ॥ गर्भवास जरा मरण । यापासूनि सुटावया माझे चरण । दृढ धरोनि श्रवण कीर्तन स्मरण । ते निष्पाप माझेंचि करिती ॥५९॥ ते ब्रह्म अध्यात्म कर्म । सर्व मीच असें सधर्म निर्धर्म। माझें ज्ञान पावतील हें वर्म । याच प्रकरणीं याच अध्यायांत बोलेल ॥५६०॥ कीं अभक्ताचें ज्ञान । ज या मायेनें हरोनि केलें अज्ञान । ते माया असोनिही पुण्यवंत जन । मातेंचि भजती ॥ ६१ ॥ माझ्या भज-नाच्या प्रतापें । तरोनि मायानदी तपती तपें । प्रस्तुतीं ह्मणे बहुजन्मपापें । ज्यांच्या ग्रंथीस ते पापी मातें न भजती ॥ ६२ ॥ एवं भगवद्भजन । न करिती ते पापीजन । ते ज्ञान असोनि मायाहृतज्ञान । मूढ नराधम असें स्पष्ट या श्लोकीं ॥ ६३ ॥ आतां या श्लोकानंतर । चतुर्विध भक्त सर्वेश्वर । वदेल त्यांचें निमित्त सुज्ञ चतुर । परिसोत आधीं ॥ ६४ ॥ कोणी ह्मणती हरी । मोक्षचि देतो परी । काम्यफलसिद्धि न करी । ह्मणोनि इतरांतें भ-जावें ॥ ६५ ॥ कोणी ह्मणती नसे द्वैत । हें भल्याच्या मुखें कळलें निश्चित । जो तें जाणे न ह्मणे अद्वैत । त्यास विष्णुभजनचि मुख्य कां ॥ ६६ ॥ कीं जाणों इच्छितो अद्वैत । त्याणें कां आरंभींच अवलंबावें द्वैत । विष्णुच थोर ह्मणतां अत्यंत । द्वैत करणें लागतें ॥ ६७ ॥ जें भजावें दैवत । तें ब्रह्मचि निश्चित । विष्णुच काय अत्यंत । थोर जाला ॥ ६८ ॥ कळावया निर्गुण । वेद बोलती भजावें सगुण । तें निर्गुणचि सर्व ह्मणती निपुण । जरी जें दैवत तें सगुण कां नव्हे ॥ ६९ ॥ यालागीं जिज्ञासु जन । त्यांसही नलगे विष्णुभजन । कोणी ह्मणती जालिया ज्ञान । किमर्थ भजन विष्णूचें ॥५७० ऐसे तिन्ही पूर्वपक्ष । हरावया अंबुजाक्ष । त्रिविधही स्वभक्त आहेत हा पक्ष । बोलतो आतां या श्लोकीं ॥ ७१ ॥

॥ श्लोक ॥ चतुर्विधा भजंते मां जनाः सुकृतिनोऽर्जुन।
आर्तो जिज्ञासुरर्थार्थी ज्ञानी च भरतर्षभ ॥ १६ ॥

॥ टीका ॥ अगा जे पापी जन। त्यांतेंचि नसे माझें भजन। वरकड अज्ञान सज्ञान। सकाम निष्काम मज भजती ॥७२॥ न भजतीच दुष्कृती। वरकड जेथवरी सुकृती। ते त्रिविधही मातें भजती। त्रिविध तेचि हे चतुर्विध ॥ ७३ ॥ आर्त अर्थार्थी दोघे सकाम। जिज्ञासु मुमुक्षु निष्काम। तिसरा ज्ञानी आत्माराम। त्रिविधांत ऐसे चतुर्विध ॥७४॥ सकामांत भेद दोनी। एक आर्त एक अर्थार्थी ह्मणोनी। हे द्विविधही सकामभजनीं। द्विविध फळेंही पावती ॥ ७५ ॥ परि सकामही भजती मातें। अत्यंत सुकृती ह्मणावें त्यांतें। कीं भजन माझें घडेना ज्यांतें। ते दुष्कृती पूर्व श्लोकीं निषेधिले ॥ ७६ ॥ त्या पुढिलया श्लोकीं। सुकृती ह्मणोनी बोलिलों कीं। सकाम तेही सुकृती या लोकीं। जे भजती आपणातें ॥ ७७ ॥ आतां चतुर्विधांचा अर्थ। क्रमेंचि बोलिला यथार्थ। द्विविध सकामही कृतार्थ। भगवद्भक्त चौंमाजी ॥ ७८ ॥ पीडेस ह्मणती आर्ती। ज्यास पीडा त्यास आर्त ह्मणती। रोगादि पीडा ज्यास होती। आर्त ह्मणावें तयाला ॥७९॥ आर्त शब्द प्राकृतीं। उत्कंठेतें लोक बोलती। ज्यास उत्कंठा त्यास ह्मणती। आर्त ह्मणोनी ॥ ८० ॥ हा शब्द जाणावा प्राकृत। गीता वेदवाणी संस्कृत। संस्कृतें आर्त तो निश्चित। रोगादि पीडा जयाला ॥ ८१ ॥ गीतेंत ह्मणतो भगवंत। जो रोगादि पीडेनें पीडिला अत्यंत। तो रोगादि पीडा हरू अनंत। ह्मणूनि आर्त मज भजतो ॥ ८२ ॥ जिज्ञासु ह्मणावें त्याला। कीं तत्त्व जाणावयाची इच्छा ज्याला। तो भजतो भक्तीनें मला। कीं मुकुंदा कळोंदे हें तुझें तत्त्व ॥ ८३ ॥ हा तत्त्वजिज्ञासु निष्काम। आर्त बोलिला तो सकाम। आतां अर्थार्थी तो धनकाम। अर्थ धन अर्थी अपेक्षी जो त्यातें ॥ ८४ ॥ आर्त अर्थार्थी दोघे सकाम। अनिष्टनिवृत्ति इष्टप्राप्ति दोनी सकाम। आतां चतुर्थ आत्माराम। अपरोक्षानुभवसंपन्न ॥ ८५ ॥ भरत अर्जुनाचा पूर्वज। अर्जुन ज्याचा वंशज। भरतर्षभा ह्मणूनि अधोक्षज। ह्मणे त्यातें ॥ ८६ ॥ कीं भरतकुळ तुझें श्रेष्ठ। परि त्यांतही तूं वरिष्ठ। कीं भीष्मादि झाले मद्भक्तिनिष्ठ। परि गीता तुवांचि आइकिली ॥ ८७ ॥ गीतेंत हें निर्गुण गुह्य। मद्भक्ताचा श्रेष्टत्वनिश्चय। हें आइकोनि मद्भक्त होय। धन्य तो स्ववंशांत ॥ ८८ ॥ तें गीतारहस्य तुजकारणें। मज लागलें प्रकट करणें। पुढें बहुतांतें तारणें। असे श्रवण पठण

कृपें करवूनी ॥ ८९ ॥ ऐसे चतुर्विध भक्त वर्णिले । त्रिविध पूर्वपक्ष हरिले । त्यांत भाव जे जे दाखविले । समजावे ते ते ये रीती ॥ ५९० ॥ अगा मी मोक्षाचाच दाता निश्चित । कीं कांजी न पाजी जो पाजी अमृत । परि कांजी-चाच याचक अत्यंत । त्यास काम्यफळ कांजीही पाजितों ॥ ९१ ॥ परंतु कांजीच ज्यापाशीं । तो मागितल्याही अमृत त्यासी । पाजूं शकेना ऐसि-यासी । ओळखी पडली कांजीनिमित्त ॥ ९२ ॥ मजपासूनी कांजी सांपडे । तरी ओळखी अमृतदातयासी पडे । मग मागतांचि प्राप्ति घडे । अन्यत्र अलभ्य अमृताचीही ॥ ९३ ॥ याकारणें पुण्य । जरी पदरीं असे अगण्य । सोडोनि इतर देवता कंटकारण्य । काम्यही कल्पतरूस मज जाण मागे ॥ ९४ ॥ काम्य नेदी हरी । ह्मणूनि बोलते वैखरी । ते खरी नव्हे कीं ते खरी । मी सर्व देणार कल्पवृक्ष ॥ ९५ ॥ जाणों इच्छितो अद्वैत । त्याणें भजावें भलतें दैवत । आणि मज थोर ह्मणतां लागतें द्वैत । हेंही बोलणें मूर्खाचें ॥ ९६ ॥ जें भजावें दैवत । तें ब्रह्मचि निश्चित । तरी पशु पक्षी चांडाळपर्यंत । ब्रह्मत्व सम सर्वत्रही ॥ ९७ ॥ न भजोनि ऐसियातें । उत्त-मत्वें भजावें देवातें । तेव्हां अंगीकारणें लागलेंचि यातें । उत्तम मध्यम कनिष्ठत्व ॥ ९८ ॥ तेव्हां टाकूनि सर्व देव । कां न सेवावा देवाधिदेव । तो थोर ह्मणतां द्वैतभाव । कैसा लागतो ॥ ९९ ॥ ब्रह्म सर्वत्र सम । परि उपाधि उत्तम मध्यमाधम । ईश्वरोपाधि एकचि सगुण ब्रह्म । जीवोपाधि इतर सर्वही ॥ ६०० ॥ लोखंडाची बेडी । लोखंडाचेच शस्त्रें तोडी । सर्व ब्रह्म परि माझीच गोडी । तत्त्व जाणों इच्छिती तयातें ॥ १ ॥ सर्वांहूनि उत्तमत्वें मातें । भजे आणि मज आधीं न देवतातें । उपाधिभेदें मानी तयांतें । द्वैतावलंब कां घडे ॥ २ ॥ याकारणें सकाम । आणि जिज्ञासु निष्काम । मातें भजती आणि आत्माराम । ज्ञानीही मज सेविती ॥ ३ ॥ ज्ञान जालियावरी । मज भजों नये तरी । गुरूसही त्याउपरी । भजों नये ॥ ४ ॥ गुरूतें ईश्वरातें । ज्ञान जालिया भजे त्यांतें । कांहीं प्रत्यवाय कीं त्याच्या मोक्षातें । विघ्न होणार ॥ ५ ॥ इत्यादि मूर्खांचे पक्ष । छेदी एथें अंबुजाक्ष । चतुर्विध भक्त आपले दक्ष । जेव्हां वर्णिले या श्लोकीं ॥ ६ ॥ आणि ज्ञानियाचें ज्ञान । तेंचि कोणी ह्मणती भजन । ज्ञान असोनि येथें सगुणसेवन । गोफाटोनि नेती हा अर्थ ॥ ७ ॥ तरी आर्ताचें आर्तपण । जिज्ञासूचें जिज्ञासुलक्षण । तैसें ज्ञानियाचें ज्ञान निर्गुण । सगुण भजन इत-रकियांसही ॥ ८ ॥ एवं निर्गुणाचें ज्ञान । ज्यांस त्या पुरुषांसही सगुण-

भजन । हा सिद्धांत कमलनयन । बोलिला एथें ॥ ९ ॥ चतुर्विध ह्मणजे चौं प्रकारींचे । मातें भजती ऐसें स्ववाचे । बोलोनि विध चारीही त्यांचे । बोले त्यांत ज्ञानविध चतुर्थ ॥ ६१० ॥ जे आत्माराम सिद्ध मुनी । साध्यांश कांहीं नसोनी । निर्निमित्त सगुणभजनीं । वर्तती हें श्रीभागवतीं सर्वत्र ॥ ११ ॥ हीं मागें जालीं निरूपणें । पुढें ऐसींच प्रकरणें । तेथें असेच हें बोलणें । असो ग्रंथ वाढेल बहु फार ॥ १२ ॥ भक्त वर्णिले चतुर्विध । त्यांत ज्यास सर्वात्मबोध । तो ज्ञानी श्रेष्ठ ऐसा प्रबंध । श्लोकत्रयाचा एथूनी ॥ १३ ॥ चतुर्विधांतही उत्तमपण । कां ज्ञानियास तरी त्यांचें लक्षण । आधीं बोलतो कमलेक्षण । या श्लोकीं ॥ १४ ॥

॥ श्लोक ॥ तेषां ज्ञानी नित्ययुक्त एकभक्तिर्विशिष्यते ।
प्रियो हि ज्ञानिनोऽत्यर्थमहं स च मम प्रियः ॥ १७ ॥

॥टीका ॥ अर्जुना त्या इतकियांत । ज्ञानी श्रेष्ठ चतुर्विधांत । कीं भक्तिरहस्य गुह्य अत्यंत । ज्ञान त्या रहस्याचें तया असे ॥ १५ ॥ भक्ति ह्मणजे आवडी । ते खंडों नये एक घडी । ऐसी अत्यंत जे गोडी । ते कळली तयातें ॥ १६ ॥ आवडी माझी तोच भक्त । जेव्हां नावडी तेव्हां अभक्त । ऐसा भक्त तो नित्य युक्त । कधीं न ह्मणवे ॥ १७ ॥ करितां ऐसा शोध । ज्यास सर्वात्मकत्वबोध । तो हें जाणे उरलें त्रिविध । ते या भक्तिरहस्यातें नेणती ॥ १८ ॥ एक नित्ययुक्तत्व स्मृतीनें । एक नित्ययुक्तत्व प्रीतीनें । एथें नित्ययुक्तत्व मधुसूदनें । बोलिलें भक्तिकल्नि ॥ १९ ॥ सर्वांहूनि आवडी । ते आवडी तुटेना एके घडी । आणि ज्याकरितां सर्वांची गोडी । तो प्रिय एक आत्माच आपला ॥ ६२० ॥ पुत्र दारा आणि इतर । अथवा मी सर्वेश्वर । आवडी इतकी यांचीही नर । धरी एका आपणाचकारणें ॥ २१ ॥ अपेक्षूनि आपलें कल्याण । ईश्वरातें भजे निपुण । मूर्ख तोही प्रयोजनावीण । कोणासही भजेना ॥ २२ ॥ एवं ईश्वराहूनि । आपली आवडी ह्मणोनि । भक्तिच न घडे भेदेंकरोनि । ईश्वराची ॥ २३ ॥ आधीं ह्मणावा भक्त । तेव्हां तोचि नित्ययुक्त । अन्यथा अयुक्त युक्त हा विचार होतो प्रस्तुत । तें भक्तपणचि भेदें घडेना ॥ २४ ॥ तोही आवडीकरोनी । तसा तरी भजतसे ह्मणोनी । भक्त ह्मणावा तरी मनीं । जोंवरी स्मृति तोंचि भक्त भलतसा ॥ २५॥ देव न स्मरे जे क्षणीं । तेव्हां प्रीति आपुलीच अंतःकरणीं । जे स्वप्रीति सप्रेम स्मरणीं । देवाचियाही ॥ २६ ॥ कीं त्या देवाच्या प्रीतीचें कारण । हेंच कीं हो आपुलें क-

ल्याण । तेव्हां आवडीनें त्याचें स्मरण । आपल्याच आवडीनिमित्त । ॥ २७ ॥ तैसी स्फुरतां आपुली आवडी । न पडे त्याच्या प्रीतीची उडी । आवडीनें न स्मरे ते घडी । भक्तियुक्त नव्हे तो ह्मणावा ॥ २८ ॥ ज्ञानी आणि भक्त । तो कोणे क्षणीं न अयुक्त । ज्ञानी या चौघांत नित्ययुक्त । ह्मणे श्रीकृष्ण या भावें ॥ २९ ॥ निर्निमित्त आत्मा आपला प्रिय । तोचि परमात्मा निःसंशय । ऐसिया अनुभवें त्यासि होय । सिद्ध नित्ययुक्तत्व ॥ ६३० ॥ नित्ययुक्तत्व भक्तीचें । घडों शके ज्ञानिया भक्तास साचें । नुसतिया ज्ञानियास कैंचें । नित्ययुक्तत्व ॥ ३१ ॥ नुसत्या निर्गुणींच आसक्त । त्यास तों न ह्मणवेच भक्त । तोही स्मृतीनें होऊं शके नित्ययुक्त । परी नित्यस्मृतियुक्तत्व साधेना ॥ ३२ ॥ उपासिती जे अव्यक्त । द्वादशीं त्यांस ह्मणे भक्त । तेथें भक्तातेंचि नित्ययुक्त सततयुक्त । कृष्णार्जुन दोघेही बोलती ॥ ३३ ॥ तोंपर्यंत युक्तपण । कीं जों असे स्मरण । ज्ञानी झाला तरी खूण । न साधे तया ॥ ३४ ॥ कीं पक्व योगी जाला । तरी देहप्रारब्धाचा असे उरला । एके क्षणीं तरी त्याला । पडेलचि विस्मरण ॥ ३५ ॥ जों देह तों अवस्था । निद्रा न सुटे सर्वथा । ज्या क्षणीं सुषुप्ति तेव्हां कथा । आत्मस्मृतीची हे कैंची ॥ ३६ ॥ सुषुप्ति पडतां तत्काळ । बुद्धीस विस्मृति तितका काळ । नित्ययुक्तत्व फटकाळ । ज्ञानियास भक्तीवांचूनी ॥ ३७ ॥ ज्ञानी सगुणीं नसे अनुरक्त । तथापि आत्मप्रीतींत नित्ययुक्त । परी सगुणभक्ति उपेक्षितां नव्हे भक्त । नित्ययुक्तत्व मग कैंचें ॥ ३८ ॥ आतां आत्माच आपला । जरी ज्ञानी न स्मरे त्याला । तरी तो बोलिला । नित्ययुक्त ॥ ३९ ॥ ऐसें बोलती तेही वेडे । कीं चित्तेंचि आत्मप्रत्यय घडे । स्मृति घडे विस्मृति पडे । चित्तेंचिकरूनी ॥ ६४० ॥ सुखदुःखांचा भोग । न चुके जों प्रारब्धयोग । क्षणभरी तरी वियोग । होय चिदात्मत्वस्मृतीचा ॥ ४१ ॥ प्रस्तुतीं भक्तिप्रकरण । भक्तिप्रीति हेंचि भक्तीचें लक्षण । जों अप्रीतीचें नाहीं उठाण । तों प्रीति विघडली न ह्मणवे ॥ ४२ ॥ जरी पडे विस्मृती । तरी नव्हे जों अप्रीती । तों विघडली न ह्मणवे प्रीती । अप्रीतिखंडत्व प्रीतीचें ॥ ४३ ॥ स्मृतीचें खंडत्व विस्मृती । प्रीतीचें खंडत्व अप्रीती । अप्रियाची जों असे स्मृती । तोंवरी प्रिय तो तेंही न ह्मणवे ॥ ४४ ॥ तैसी ज्याची प्रीती । त्याची पडली जरी विस्मृती । त्या विस्मृतीनें जाली अप्रीती । ऐसें न ह्मणवे ॥ ४५ ॥ एवं या प्रकरणीं नित्ययुक्त । ह्मणजे नित्य प्रीतियुक्त । आत्मत्वें भजतां नव्हे अयु-

क्त । कीं प्रीतिखंडत्व अप्रीति नसे आत्मत्वीं ॥ ४६ ॥ हे ज्ञानियाविना । खूण या तिघांतें कळेना । याकारणें अर्जुना । त्या चतुर्विधांत ज्ञानी नित्य-युक्त ॥ ४७ ॥ चतुर्विधांत याकारणें । ज्ञानी विशेषें बोलावा या गुणें । कीं खंडभक्तिदोष त्या निपुणें । टाकिला कळतां आत्मत्व ॥ ४८ ॥ भक्ति करूनि सर्वदा युक्त । तो या प्रसंगीं नित्ययुक्त । " अत एव " एकभक्ति-युक्त । तो ह्मणे ऐसें याचिपुढें ॥ ४९ ॥ कीं चराचर समूळ । जो परमात्मा सकळ । तो स्वआत्माच केवळ । जो प्रिय सदा कधीं विटेना ॥६५०॥ ऐशा भक्तीनें युक्त । तो भक्त ह्मणावा नित्ययुक्त । याकारणें ज्ञानी आणि भक्त । विशिष्ट होतो तो चतुर्विधांत ॥ ५१ ॥ चौघांसही माझें भजन । परंतु ज्ञानियावेगळे त्रिविधजन । त्यांस नाहीं आत्मज्ञान । रहस्य नेणती भक्तीचें॥५२॥कीं मातें तयांचें चित्त । प्रिय मानी त्या जीवानिमित्त । कीं आरोग्य मोक्ष अथवा वित्त । तिन्ही सुखाकारणें जिवांच्या॥५३॥ आवडी आपली आधीं । मग माझी तेही कधीं । नावडी होय जधीं । विलंब लागे फलप्राप्तीतें ॥ ५४ ॥ क्षणांत रोग जावा । आर्त भजे धरूनि या भावा । विलंब होतां ह्मणे अहा देवा । कां न पावसी अद्यापि ॥ ५५ ॥ देवांस भजलों उदंड । परि गळत चालिला पिंड । आरोग्याचें दिसेना तोंड । काय करूं ॥ ५६ ॥ जेव्हां ऐसा तळमळी । तेव्हां अप्रीतीची उकले कळी । पुन्हा प्रीतीच्या लतेची मुळी । वाळे नेदी जळें भजनाचिया ॥ ५७ ॥ इत्यादि करितां शोध । नसतां एक निजात्मबोध । नित्ययुक्तत्व एकभक्तित्व तें त्रिविध । आर्त जिज्ञासु अर्थार्थी नेणती ॥ ५८ ॥ ज्ञानी जाणे ह्या कळा । यालागीं त्याहूनि आगळा । कीं आत्मज्ञानें जिव्हाळा । सांपडला माझ्या भक्तीचा ॥५९॥ अगा सर्वेही मातें भजती । त्यांसही असेच माझी प्रीती । परि जैसी त्यांची तेचि रीती । प्रीति माझी त्यांवरी ॥६६० ॥ कीं कल्पवृक्षस्वभाव । मी देवाधिदेव । ज्यांचा जैसा आणि जितका भाव । तैसा तितका माझा त्यांवरी ॥ ६१ ॥ ज्ञानियास अत्यंत मी प्रिय । कीं सर्वभूतीं आवडें मी अद्वय । आणि मी अनंत अव्यय । ह्मणोनि प्रेमें मज अनुभवी ॥ ६२ ॥ ह्मणोनि अर्जुना अत्यंत । प्रिय मज भक्त ज्ञानवंत । त्यावरी माझी प्रीति तीसही अंत । असेचिना ॥ ६३ ॥ प्रेमदृष्टि त्याच्या अनंत । मी जेव्हां दिसतसें भगवंत । मग त्याची प्रीति तीस अंत । केवीं दिसेल मजलाही ॥ ६४ ॥ सर्वेही मी ह्मणोनी । भक्त मज पाहे ज्ञानी । उतराई होऊं काय देऊनी । भक्ता तया ॥ ६५ ॥ इत्यादि भाव पोटीं । तों

श्रीकृष्ण ह्मणे शेवटीं । कीं त्यास अत्यर्थ प्रिय मी किरीटी । प्रिय अत्यर्थ मज तो ॥ ६६ ॥ ऐसी परस्पर प्रीती । वदतां हे भक्ति सगुणाचीच हे रीती । सूचवी येथें श्रीपती । कीं प्रीतिधर्म निर्धर्मी असेचिना ॥६७॥ आणि ध्यावेंचि निर्गुण । भक्तिप्रियत्व जेथें तें सगुण । यालागीं भक्तिनिपुण । सगुणाचीच करिती ॥ ६८ ॥ परंतु सगुणाचें तत्त्व । न कळे जों न जाणे निर्गुणत्व । यालागीं ज्ञानवंता भक्ताचें महत्त्व । विशेषें एथें वर्णिलें ॥ ६९ ॥ आतां परस्परें प्रियत्व अत्यर्थ । ह्मणे या अत्यर्थाचा अर्थ । विचारील त्यास समर्थ । उत्तीर्ण नव्हे मी ऐसें सूचवी ॥ ६७० ॥ प्रयोजनातें ह्मणावें अर्थ । प्रयोजन अतिक्रमणें अत्यर्थ । हा शब्द दोंपरी समर्थ । दोहीं कडे सूचवी ॥ ७१ ॥ नसोनि कांहीं प्रयोजन । प्रीतियुक्त मजवरी मन । प्रिय अत्यर्थ मी जगज्जीवन । ऐशा भक्ता ज्ञानियातें ॥ ७२ ॥ कीं ज्यापेक्षीं मुक्ती । तेव्हां काय इच्छील तुच्छ मुक्ती । आत्मत्वें ऐसी माझी भक्ती । प्रिय अत्यर्थ मी ऐसा ॥ ७३ ॥ आत्मा कळे तोंचिवरी । मुक्तीच्या इच्छेनें भक्ति करी । मग ओंवाळूनि टाकी दुरी । मुमुक्षा मोक्षेच्छा मजवरूनी ॥ ७४ ॥ भक्तिरसीं चित्त लावी । तो मोक्षसुखास वांकुल्या दावी । आतां कोण्या निमित्तें वदावी । भक्ति त्याची ॥ ७५ ॥ माझीच लागली गोडी । माझेचिठायीं आवडी । आत्मत्वें भजे न सोडी । पाय माझे ॥ ७६ ॥ प्रिय अत्यर्थ मी ऐसा । निर्निमित्त भक्तीचा तसा । परि येउं देऊं मी कैसा । गर्भवासास ऐसियातें ॥७७॥ कैवल्य देऊं जरी । आवडी त्याची भक्तीवरी । ह्मणूनि वैकुंठनगरीं । स्वयें मी होतों त्याकारणें ॥७८॥ प्रलयकालीं ह्या मूर्ति नसती । तैसी मुक्तांसह वैकुंठाकृती । जैशा ह्या मूर्ति उमटती । प्रगटे मुक्तांसहित वैकुंठ ॥ ७९ ॥ देऊनि अपुनरावृत्तिगती । ऋणी त्याचा मी मागुती । देऊनि वैकुंठीं स्वसंगती । उत्तीर्ण नव्हें ॥ ६८० ॥ अगा मज मारावया आली । ते मुक्तिपदास पूतना नेली । अघा बकादिकांस गति दिधली । सगळेंचि गिळिलें जिहीं मज ॥ ८१ ॥ द्वेषें भयें मत्सरें कितीएक । शिशुपाळ कंस पौंड्रक । वैरें मारिले अनेक । मुक्ति त्यांसही म्यां दिधली ॥ ८२ ॥ ज्ञानी भक्त ऐसा । मोक्ष त्यासही देऊंनि तैसा । उत्तीर्ण होऊं मी कैसा । भक्तवत्सल ॥ ८३ ॥ पाहतां परम पुरुषार्थ । तो त्यास देऊनिही अर्थ । उत्तीर्ण नव्हे मी समर्थ प्रिय अत्यर्थ मज ऐसा ॥ ८४ ॥ कीं परम पुरुषार्थ दिधला । परि तो अ

१ वेडावणें; चाळविणें. २ पुनर्जन्म नाहीं अशी गति देऊन.

देऊनिही मला । अर्थ दिधलासा नाहीं वाटला । प्रिय अत्यर्थ मज ऐसा ॥८५॥ भक्त ऐसा ज्ञानी । वर्णितां अर्जुन कांहीं मनीं । ह्मणीं शंकेल ह्मणोनी । यापुढें श्लोक प्रवर्त्तला ॥ ८६ ॥ कीं प्रिय ऐसा अत्यर्थ । तेव्हां ते तिघे काय व्यर्थ । ऐसें ह्मणीं मनीं मानील पार्थ । ह्मणूनि बोलतो हा श्लोक ॥८७॥

॥ श्लोक ॥ उदाराः सर्व एवैते ज्ञानी त्वात्मैव मे मतम् ।

आस्थितः स हि युक्तात्मा मामेवानुत्तमां गतिम् ॥ १८ ॥

॥ टीका ॥ अगा हे सर्वही उदार । उदार ह्मणजे उत्कृष्ट फार । कीं होतां सुकृतें अपार । मातें भजों लागले ॥८८॥ मी चंद्र ते चकोर । मीं मेघ ते मयूर । सर्वांहूनि थोर । कीं सर्वोत्तमातें भजती ॥ ८९ ॥ त्यांत कोणी सकाम । ते क्षण न लगतां होती अकाम । ज्ञान पावोनि आत्माराम । मोक्ष निश्चयें तेही पावती ॥ ६९० ॥ आर्त गजेंद्र नक्रें धरिला । त्याणें धांवा माझाच केला । म्यां त्यांस मोक्षही दिधला । सोडवूनि नक्रातें ॥ ९१ ॥ मज गोपिका कामेंचि भजल्या । माझ्या सौंदर्यावरीच रिझल्या । सुरतलालसेनेंचि भिजल्या । माझिया प्रेमरसें ॥ ९२ ॥ रासक्रीडाप्रसंगीं । मज लंपट मानोनि रतिरंगीं । गोपिकांहीं कांहीं अंतरंगीं । गर्व केला ॥ ९३ ॥ ह्मणोनि पावलों अंतर्धान । तों वियोगें अतिशय घडलें ध्यान । मद्रूप जालिया नृत्य गायन । करूनि खेळोनि लीला माझिया ॥ ९४ ॥ मी अक्रूरसंगें । मथुरेस गेलों त्या प्रसंगें । विरहें ध्यातां अंतरंगें । वेडयाच जाल्या ॥ ९५ ॥ त्या मजकारणें सकामा । परंतु मज वाटल्या निष्कामा । कीं मूर्ति माझ्या विश्वाभिरामा । परमहंसासही आवडती ॥ ९६ ॥ ह्मणोनि आत्मज्ञानकळा । आणि आत्मयोगरीती सकळा । मी उद्धवमुखें बोधोनि अबळा । कुरुक्षेत्रीं स्वमुखेंही बोधिल्या ॥ ९७ ॥ बाळ होऊनि मजला । पदाकारणें शरण आला । ध्रुवपद दिधलें मी त्याला । परम पदचि ज्यातें याउपरी ॥ ९८ ॥ एवं अर्जुना जो मजला । कोण्या निमित्तें जरी भजला । तो मोक्षातेंचि पावला । सहज महिमा हाचि माझा ॥९९॥ रांधावया अन्न नर । पेटवी जरी वैश्वानर । तरी सीततमभयहर । होणार निश्चयें तो ॥ ७०० ॥ शाक रांधूनि पाला । दिव्य औषधीचा भक्षिला । तोही दावीच गुण आपुला । मी तों सर्वोत्तम सर्वेश देवाधिदेव ॥१॥ जरी सकाम भजती । तरी मोक्षातें पावती । कीं क्षण न लगतां होती । निष्कामही ॥ २ ॥ अमृतफळाचा वेल । लावूनि निघतांच तोडी फूल । तें

न तोडी तेव्हांच अमोल । अमृतफळ तो वेल दे तयातें ॥ ३ ॥ विषवल्लीचें पुष्पफल । सर्वही अनर्थमूळ । अंगणीं अमृतफलवेल केवळ । धन्य तो होय न तोडितांच पुष्पातें ॥ ४ ॥ मोक्षफल काम्य फूल । दोन्ही देणार मज्जनवेल । काम्यफळ न इच्छितांच होईल । मोक्ष मज्जनशीळातें ॥५॥ रायाचे पोटीं उपजला । बाळपणीं राज्य न लगे त्याला । तरुणपणीं न अपेक्षितां जाला । आयता सार्वभौम ॥ ६ ॥ दरिद्र्याचा बाळ । बाळपणींही फटकाळ । आला तरुणपणाचा काळ । तरी काय देणार तो बाप त्या पुत्रातें ॥ ७ ॥ एवं सकामही भजे मला । तरी मनीं धरितांचि मोक्ष त्याला । इतर देवतोपासकाला । मुक्ति नसेच मुक्तिही फटकाळ ॥ ८ ॥ अनेक रीति मृत्युपरिहार । हिरण्यकशिपु मागे वर । चुकवूनि तितके प्रकार । नृसिंहें नखें सांजे द्वारीं अंकीं विदारिला ॥ ९ ॥ ऐसे ब्रह्मादिकांचे वर । आणि सकामही जे मत्पर । अढळपद पावूनि परात्पर । कैवल्यपदही पावले ॥ ७१० ॥ एवं सकामही मत्पर । ते सर्वही उदार । ह्मणूनि इत्यादि भावें सर्वेश्वर । ते त्रिविधही श्रेष्ठ बोलिला ॥ ११ ॥ ते त्रिविधही उदार । परंतु ज्ञानियाचा बडिवार । अत्यंत तो वारंवार । बोलावासाच वाटे अगणितत्वें ॥ १२ ॥ ह्मणूनि ह्मणे हरी । कीं ते त्रिविधही उदार परी । नये ज्ञानिया भक्ताची सरी । कीं तो आत्माच केवळ ॥ १३ ॥ लोकांसारिखा तोही । प्रारब्धें वर्ततां दिसे देहीं । ह्मणूनि महिमा त्याचा कांहीं । नेणती लोक नेणते ॥ १४ ॥ परि आईक माझें मत । कीं माझिया मतें निश्चित । तो आत्माच अद्वय सर्वगत । अगा अर्जुना ॥ १५ ॥ जन आपणासारिखा । ते मानिती यालागीं आणिका । महिमा त्याचा न कळे एका । मजवांचूनी ॥ १६ ॥ ह्मणूनि ह्मणे माझें मत । कीं तो आत्माच निश्चित । ज्ञानी भक्त यालागीं अत्यंत । त्या सर्वश्रेष्ठा त्रिविधापरीसही ॥ १७ ॥ ऐसा ज्ञानी आत्माच निखळ । ह्मणतां वाटलें शंकास्थळ । कीं आत्मा नेणे तोही केवळ । आत्माच असे ॥ १८ ॥ अज्ञानें आत्मा नव्हे साच केला । ज्ञान होतांच आत्माच जाला । ह्मणीं अर्जुनादिकां श्रोतयांला । वाटे ऐसें ॥ १९ ॥ आतां अविद्येंकरूनी । देहास जो तो आत्माच मानी । यानें आत्मा ओळखिला ह्मणोनी । आत्मा ह्मणावा ॥ ७२० ॥ तरी आत्मा कळोनिही । चित्त आत्मत्वीं योजिलें नाहीं । त्यास वाटेच देहीं । आत्मता पूर्वसंस्कारें ॥ २१ ॥ तोही आत्मा ह्मणोनि । न ह्मणवे जरी आत्मज्ञानी । सदा दृढ अभ्यासेंकरूनी । मोडी देहात्मता तोचि आत्मा ॥२२॥ चित्त सर्वदा स्मरे आत्मा ।

तो ह्मणावा युक्तात्मा । ह्मणूनि ह्मणे श्रीकृष्ण परमात्मा । कीं तो युक्तात्मा आत्मा ह्मणतों यास्तव ॥ २३ ॥ युक्तात्मा ह्मणतां ये रीती । असे निर्गुणोपासकातेंही हे स्थिती । ज्ञानी आणि सगुणभक्त असती । महिमा त्यांचा ये स्थळीं ॥ २४ ॥ ह्मणूनि ह्मणतो देव । कीं " आस्थितः स हि युक्तात्मा मामेव " । ह्मणजे मी जो देवाधिदेव । तो युक्तात्मा या मातेंचि भजतो ॥ २५ ॥ निर्गुणयोगींही युक्त । तो युक्तात्मा आणि अनुरक्त । मज सगुणीं ह्मणूनि मद्भक्त । दाखवूनि ऐसीं दोन्हीं बोलिला ॥ २६ ॥ कीं योग योजीत असोनी । भक्त सगुणातें समग्रत्वें जाणे ह्मणोनी । तूंही जाण ऐसें अध्यायादिश्लोकें करूनी । अर्जुनातें अपरा प्रकृति बोलिला ॥ २७ ॥ ये स्थळीं ते दोन्ही प्रकार । भक्ताचे सांगे सर्वेश्वर । कीं जो मी सगुण साकार । त्या मातें युक्तात्मा तो भजतसे ॥ २८ ॥ एवं युक्तात्मा होऊनी । मातेंचि भजे ह्मणोनी । ते त्रिविध थोर परि त्यांहूनी । हा थोर कीं आत्माच हा ॥ २९ ॥ चतुर्विधांत हा ज्ञानी । केवळ आत्माच युक्तात्मा ह्मणोनी । थोरपण तेव्हां इतकियाचकरूनी । आतां सगुणभजनीं विशेष काय ॥ ७३० ॥ ऐसें पुसेल येथें श्रोता । ह्मणूनि थोरपण जें तत्त्वता । तें स्पष्ट येथें अनंता । बोलणें लागलें ॥ ३१ ॥ कीं भक्तीचेंचि त्यास कोड । भक्तीपुढें मुक्तीही न वाटे गोड । ऐसें निर्निमित्त प्रेम अवघड । नसे निर्गुणोपासकां ॥ ३२ ॥ पूर्वी भक्तमहिमा देव । बोलतां निघाला जरी हा भाव । तें स्पष्ट आतां देवाधिदेव । येथें चतुर्थचरणीं बोलतो ॥ ३३ ॥ ॥ चतुर्थचरण ॥ मामेवानुत्तममां गतिं ॥ टीका ॥ येथें " मामेव " ह्मणोनी । मां एव शब्दें करूनी । मातेंचि भजतो यावरूनी । न भजे इतरां हें दिसे ॥ ३४ ॥ तरी हे निपट पलीकडे । या वेगळें त्रिविध त्यांसही घडे । कीं न पाहोनि इतरांकडे । मज भजती उदार यालागीं ॥ ३५ ॥ येथें ' एवं ' शब्दाचा हा अर्थ । कीं मोक्षनिमित्तही तो कृतार्थ । मज न भजे यथार्थ । मातेंचि भजे ह्मणतो ह्मणोनी ॥ ३६ ॥ बंध मिथ्या जैसा । मोक्षही लटिकाचि तैसा । मजहूनि तो त्यास कैसा । आवडेल ॥ ३७ ॥ आवडी मुख्य मोक्षाकडे । तदर्थ ईश्वर आवडे । त्यास भक्त ह्मणती ते वेडे । तो भक्त आपुल्या मोक्षाचा ॥ ३८ ॥ उदरार्थ सेवा नृपाची । ते उदरसेवा राजसेवा नव्हे साची । एवं मोक्षार्थ नव्हे सेवा याची । केवळ मातेंचि हा भजतो ॥ ३९ ॥ हा अर्थ न दिसे विशद । ह्मणूनि " अनुत्तमां गतिं " ऐसें गोविंद । ह्मणे कीं माझ्या भक्तीचाच त्यास आनंद । गति उत्तम न मानी

मजहूनी ॥७४०॥ न परते जेथूनि मागुती । तेचि एक ह्मणावी गती । इतर गति तितक्या दुर्गती । कीं च्यवतां दुःख तें चुकेना ॥ ४१ ॥ परम गति मुक्ति ऐसी । तेही मजहूनि उत्तम तयासी । न वाटे कीं जयासी । गोड त्याहूनि मी वाटें ॥ ४२ ॥ ज्या मजहूनि उत्तम गती । वस्तुता नाहीं तो मी अनुत्तमगती । त्या मातेंचि तो भजे सुमती । त्याचें थोरपण त्या करितां ॥ ४३ ॥ पहिली होती जरी मुमुक्षा । सर्वात्मभक्ति त्या दक्षा । गोड वाटतां मग मोक्षा । न अपेक्षी ऐसा जो थोर ॥ ४४ ॥ मोक्षाकारणेंच तोंडवासी । न भजे मज सगुण सर्वेश्वरासी । त्या निर्गुणमात्र उपासकासी । सरी कैसी याची येणार । ॥ ४५ ॥ प्रथम दोघांसही मुमुक्षा । दोघे भजती अंबुजाक्षा । ज्ञान होतां सगुणभजनपक्षा । एकें सोडिलें ॥ ४६ ॥ एकें ज्ञान होऊनिही । सगुणभजन सोडिलें नाहीं । तो भक्ति गोड लागतां कांहीं । चाड मोक्षाचीही धरीना ॥ ४७ ॥ दोघांसही मोक्ष । परि निर्गुणोपासका बहुत सापेक्ष । यास गोड अंबुजाक्ष । नलगे ह्मणे मोक्षसिद्धी ॥ ४८ ॥ काकुळतीनें दरिद्री जन । दातया मागती भोजन । प्रार्थूनि आणिले महाजन । तेंचि तेही जेविती ॥ ४९ ॥ अन्न दोघांचें समान । परि महाजनां अधिक सन्मान । ऐसा मोक्षसुखनिधान । सम निर्गुणोपासकां आणि भक्तां ॥ ७५० ॥ एवं चतुर्विध भक्तही थोर । त्यांत ज्ञानी भक्त थोर फार । तो कां तरी ऐसा विचार । त्याच्या थोरपणाचा वर्णिला ॥ ५१ ॥ ज्ञान होऊनि केवळ । सगुणभक्ति ऐसी प्रांजळ । तो दुर्लभ कीं बहुत जन्मफळ । ऐसें ह्मणतसे या श्लोकीं ॥ ५२ ॥

॥ श्लोक ॥ बहूनां जन्मनामंते ज्ञानवान्मां प्रपद्यते ।
वासुदेवः सर्वमिति स महात्मा सुदुर्लभः ॥ १९ ॥

॥ टीका ॥ पुण्यें करितां जन्म कोटी । ज्ञानेच्छा उपजे पोटीं । त्या ज्ञानसाधनीं अगा किरीटी । लोटती बहुत जन्म ॥ ५३ ॥ ऐशाही बहुत जन्माचिया । अंतीं अगा धनंजया । ज्ञान होऊनि जया । भक्ति माझी ॥ ५४ ॥ तो दुर्लभ अत्यंत । कीं मी ईश्वरेश्वर भगवंत । त्या मज भजतो ज्ञानवंत । सर्व मी वासुदेव ह्मणोनि ॥ ५५ ॥ सर्वभूतीं माझा वास । तो मी वासुदेव जगन्निवास । इतका अनुभव जयास । तोचि तो ज्ञानी दुर्लभ ॥ ५६ ॥ ज्या माजी सर्व भूतांचा वास । ज्यांत सर्व भूतें तो जगन्निवास । वासुदेव परि भूताकार भास । ते तों माया ॥ ५७ ॥ तेव्हां वा-

१ चवतां.

सुदेव सकळ । हें नेणे जो ज्ञानीच केवळ । ज्ञानी आणि भक्ति पुष्कळ । तो वासुदेव सर्व हें जाणे ॥ ५८ ॥ कीं माया आणि निर्गुण । दोन्ही मिळोनि सगुण । तो साक्षी सर्वज्ञ निपुण । विश्वरूपें आपणातें कल्पितो ॥ ५९ ॥ हें नुसता ज्ञानी तोही जाणे । परि सगुण भजनावीण हें न बाणे । ईश्वररूपें भक्त शहाणे । पाहती विश्व ॥ ७६० ॥ यांत काय भजावें काय न भजावें । काय ध्यावें काय त्यजावें । भास मिथ्यात्व कां वर्जावें । सर्वही वासुदेव ॥ ६१ होऊनि नाना आकार । निर्गुणीं न लागे कांहीं विकार । इतकियाच कारणें विचार । कळला असावा मायेचा ॥ ६२ ॥ तथापि तो शक्त ते शक्ती । तो अव्यक्त ते त्याची व्यक्ती । ऐसें चित्तीं धरोनि भक्ती । करी सर्व वासुदेव ह्मणोनी ॥ ६३ ॥ आपण आणि भजन आपलें । देखिलें आणि न देखिलें न ऐकिलें । सगुण निर्गुण सकळ एकलें । वासुदेवाख्य तत्त्व जो पाहे ॥ ६४ ॥ आणि वासुदेवचि सर्व ह्मणे । कीं जगत्कारण वासुदेवचि ऐसें जाणे । कीं ज्याच्या प्रसादें बाणे । सर्वही तो ह्मणोनी ॥ ६५ ॥ निर्गुणोपासकाचा भाव । " सर्वं खलु ब्रह्मैव " । हा ह्मणे सर्व वासुदेव । जो सर्वसाक्षी सर्व कल्पितो ॥ ६६ ॥ निर्गुण आणि सगुण । दोन्ही जगत्कारण । इतर देवतांस कार्यपण । कारणत्व नसे ॥ ६७ ॥ ह्मणतां सर्व कनक । अलंकार न उरे कोणी एक । मुद्रिका नव्हे मुकुटकुंडलादिक । सर्व मुद्रिका ह्मणतांही ॥६८॥ ऐसा भजो तो महात्मा । ह्मणोनि ह्मणे कृष्ण परमात्मा । कीं महाथोर त्याचा आत्मा । आत्मा ह्मणावें चित्तातें ॥६९॥ महाथोर साक्षी परमेश्वर । चित्त तन्मय ज्याचें तो नर । महात्मा ह्मणावा कीं सविस्तर । विश्व वासुदेव रूपें जो पाहे॥७७०॥ ज्याच्या मतें जगत्कारण । एक श्रीकांत नारायण । इतर देवतातें कार्यपण । जाणे जरी कार्यें पाहे कारणत्वें ॥ ७१ ॥ जो भजे जें दैवत । तो तेंचि ह्मणे सर्व निश्चित । शाब्दिकत्व त्याचें अद्वैत । महात्मा सुदुर्लभ तो न ह्मणवे ॥ ७२ ॥ सर्व देवता एक । कीं सकळ अलंकार कनक । परि मुद्रिका मागतां किरीटादिक । न ये हाता तयाच्या ॥ ७३ ॥ जो मागे एक कनक । तो पावे मुकुटकुंडलादिक । भजतां वासुदेव एक । सर्वही देव वासुदेव ॥ ७४ ॥ तोचि जगत्कारण वासुदेव । बाप ज्याचा वसुदेव । तो उपदेशितो स्वयमेव । विश्ववंद्य हे गीता ॥ ७५॥ असो तें आतां ऐसा तो दुर्लभ । ह्मणोनि ह्मणे श्रीवल्लभ । कीं भाग्यें ज्यांस जाला सुलभ । ते त्यावेगळे न उरती ॥ ७६ ॥ तो दुर्लभचि मागुती । कीं कोणास न कळे ज्याची स्थिती ।

त्यांस स्वाची कळली गती । कीं तोचि जे जाले ॥ ७७ ॥ भेटी त्यांच्या शरीराची न घडे । हें बोलणें अलीकडे । कीं जनकादिकीं पूर्वत कडे । सेविले नसती ॥ ७८ ॥ कोणीं प्रारब्धें वनीं । कोणी प्रारब्धें जनीं । एवं देह न दिसे नयनीं । दुर्लभत्व ऐसें न ह्मणवे ॥ ७९ ॥ सु शब्दें शोभनपण । ह्मणिजे दुर्लभत्वाचा चांगला गुण । कीं सुलभ ज्यास त्यास आपण । करूनि मागुती दुर्लभ ॥ ७८० ॥ कीं तो कोणास भेटलाच नाहीं । देह भेटला तरी तितकाही । साडेतीन हातांच्या देहीं देही । अगा तो नव्हे कीं तो अनंत जगदात्मा ॥ ८१ ॥ तो स्वयें सर्वही परी । कळे तरी जरी अनुग्रह करी । अनुग्रह करितां नुरे उरी । वेगळेपणाची ॥ ८२ ॥ एवं जो त्या सुखांत मिळाला । तोही स्वयें तोचि जाला । पुन्हा दुर्लभ होऊनि उरला । तो जगीं ॥ ८३ ॥ ऐसें जें दुर्लभत्व । त्यास ऐसें सुदुर्लभत्व । कीं दुर्लभत्व देवूनिही सुलभत्व । परि तें दुर्लभत्व बहु बरें ॥८४॥ सुदुर्लभत्वीं हा भाव । येथें दावी देवाधिदेव । कीं त्याचें हें वैभव । संत शिष्य त्याचेचि जाणती ॥ ८५ ॥ एवं ज्ञानाविण । न कळे भक्तीची खूण । आणि तैशा भक्तांस जें थोरपण । तें नसे नुसतिया ज्ञानियातें ॥८६॥ आणि इतर उपासक जन । त्यांत ज्यांस हरीचेंचि भजन । ते थोर त्यांतही सर्वात्मकज्ञान । ते भक्त थोर अत्यंत ॥ ८७ ॥ आणि जे दुष्कृती । ते हरीतें न भजती । जे अनेक जन्म सुकृती । तेचि भजती मुकुंदातें ॥ ८८ ॥ ऐसा सिद्धांत जाला । कीं भगवंत ते दुष्कृती ह्मणोनि बोलता जाला । आपणास भजती तयातें ॥ ८९ ॥ आणि हरिभजनहीन जो मानव । तो बोलिला कीं असुरभाव । तेव्हां उपास्य ज्यास देवाधिदेव । ते दैवी संपत्तीचे हें सूचविलें ॥ ७९० ॥ स्पष्ट ऐसें बोलिला । तों संदेह कांहीं प्राप्त जाला । ह्मणूनि येथें आरंभिला । आणखी श्लोक ॥ ९१ ॥ तो संदेह ये रीती । कीं जरी दुष्कृती हरीतें भजती । तरी वेद शास्त्र पुराणें होती । सर्वही निरर्थक ॥ ९२ ॥ कीं वेद शास्त्रें पुराणें । प्रवर्त्तलीं याच कारणें । कीं स्वहित इच्छिती तिहीं करणें । भजन मुक्तिप्रदा मुकुंदाचें ॥ ९३ ॥ शुद्ध होऊनि सज्जनीं । नित्य नैमित्तिक सावधानी । संध्योपासना प्रतिदिनीं । करा ह्मणोनि वेद ह्मणे ॥ ९४ ॥ श्रुति ॥ त्रिणि पदा विचक्रमे विष्णुर्गोपा अदाभ्यः। अतो धर्माणि धायन्। विष्णोः कर्माणि पश्यत ॥ श्रुत्यर्थ ॥ श्रुति ह्मणे तीन्ही भुवनें स्वचरणें। श्रीविष्णूनें आक्रमिलीं याकारणें । या विष्णूचे धर्म धरणें।

---

१ अस्तित्व.

धर्म धरूनि पाहणें कर्मे तयाचीं ॥ ९५ ॥ गोपा ह्मणूनि श्रुती । ह्मणते येथें जनांप्रती । गो शब्दें इंद्रियें जे पाळिती । गोप शब्दें ते घ्यावे ॥ ९६ ॥ कीं इंद्रियांचविण । न भजवे ब्रह्म सगुण । इतर साधन गुण । न लगती कांहीं ॥ ९७ ॥ असलिया वित्त । वित्तशाठ्य लागेल या निमित्त । वें-चावें मुख्य इंद्रियें चित्त । यावांचूनि न घडे सगुणभजन ॥ ९८ ॥ ह्मणूनि इंद्रियवंतांप्रती । अरे गोप हो ह्मणे श्रुती । कीं भजनसाधनें ज्यांस असती। ते तुह्मी हे आज्ञा वेदाची आइका ॥ ९९ ॥ कीं जे बधिर असती । काय हें सांगोनि त्यांप्रती । एवं जे हें न आयकती । बधिरही तेचि जाणावे ॥ ८०० ॥ असो ते अरे गोप हो धर्म । विष्णुचे धरूनि विष्णूचें कर्म । पाहा ह्मणूनि सांगे वर्म । वेद हिताचें जनाचिया ॥ १ ॥ विष्णूचे धर्म धरा । ह्मणजे त्याची उपासना करा । कीं त्याचीं कर्मे त्याच्या उपासनापरा । गोड वाटती तैसीं इतर न वाटती ॥ २ ॥ असो श्रुत्यर्थाचे चमत्कार । हें विधिवाक्य एतत्प्रकार । यावरूनि जाला निर्धार । कीं विष्णुच हा भजावा ॥ ३ ॥ इतरदेवताभजन । करा ह्मणूनि वेदवचन । न देखती नेत्र अथ-वा कान । न आइकती जनांचे ॥ ४ ॥ कोठें वेदीं ' यजामहे ' । कोठें वेदीं ' भजामहे ' । पाहतां यजन भजन शब्द हे । उपासकांचे ॥५ ॥ कोठें " विद्महे, धीमही " । जप करणारांचे बोलतेही । एवं वेद आपणाहूनि कांहीं । कोणास भजा ऐसें न ह्मणती ॥ ६ ॥ " यजामहे " ह्मणजे यजूं आह्मीं । " भजामहे " ह्मणजे भजों आह्मीं । परि अरे गोपहो तुह्मी । भजा ऐसें येथेंचि वेद बोले ॥ ७ ॥ भजा ह्मणे श्रुती । त्यास विधिवाक्य ह्मणती । एवं च वेदाज्ञा नसे ये रीती । भजा आणिका अमकियातें ह्मणूनी ॥८॥आज्ञा वेदांची ये रीती । स्मरतां श्रुत्यर्थ जाल्या स्मृती । आणि श्रुति-विरुद्ध स्मृति दिसती । तेथें श्रुति प्रमाण स्मृति ह्मणे ॥९॥ स्मृति ॥ श्रुतिस्मृ-तिविरोधे तु श्रुतिरेव बलीयसी ॥स्मृत्यर्थ॥ एक पक्ष बोले श्रुती । त्यासी विरुद्ध असली स्मृती । तेथें ऋषी बलवंत बोलती । श्रुतीतें ॥८१० । याकारणें श्रु-ती । विष्णुभजन जैसें बोलती । ऐशाच बोलती स्मृती । विरुद्धपक्षीं श्रुति बोले तें साच ॥ ११ ॥ हा भजनविषयीं श्रुतिस्मृतिविचार । वरकड महिमा वर्णीत अपार । आकारमात्रीं जें निराकार । त्यास लक्षूनि महिमा बोलती ॥ १२ । सद्वस्तु एक निर्विकार । तेंचि कल्पूनि नानाकार । श्रुति ऋषि बोलती ऐसा निर्धार । श्रुतिच बोलती ॥ १३ ॥ श्रुति ॥ एकं संतं ब-हुधा कल्पयंति ॥ आणिखी श्रुती ॥ एकं सद्विप्रा बहुधा वदंत्यग्निं यमं मा-

तरिश्वानमाहुः ॥ श्रुत्यर्थ ॥ सद्वस्तु एक । नानारूपीं नामें अनेक । विप्र बोलती व्यासादिक । अग्नि यम वायु इत्यादि ॥ १४ ॥ हा श्रुतिस्मृतिनिर्णय । परी भजनविधीचा निश्चय । विष्णुभजनींच सिद्धांत होय । श्रेष्ठ सत्त्वोपाधि मुक्तिप्रद ह्मणोनी ॥ १५ ॥ हा श्रुतिस्मृतिविचार सारा । आतां इतिहासपुराणांचा पसारा । ज्या पुराणाच्या अंगीं जो वारा । तें पुराण सांगे भजन त्याचेंचि ॥ १६ ॥ शेवटीं पुराणें सकळ । विचार हाचि वदती प्रांजळ । कीं सत्त्वोपाधि निर्मळ । मोक्ष भजनें तयाच्या ॥ १७ ॥ आणि या इतिहासपुराणांत । वेद पांचवा महाभारत । तेथें व्यास सत्यवतीसुत । ऐसें बोले ॥ १८ ॥ कीं जें येथें भारताभीतरीं । तेंचि असे पुराणांतरीं । येथें न वदे जे वैखरी । ते कोठेंचि नाहीं ॥ १९ ॥ व्यासवाक्य ॥ यदिहास्ति तदन्यत्र यन्नेहास्ति न तत्क्वचित् ॥ वाक्यार्थ ॥ कीं जें येथें असे । तेंचि सर्वत्र वसे । आणि जें येथें नसे । तें नसे कोठेंही ॥८२०॥ त्या या महाभारतीं । सर्वत्र ऐसीच व्यासभारती । या विष्णुमहिमश्रवणें उभारती । रोमांच देहीं संतांच्या ॥ २१ ॥ तत्रापि उपनिषद्वाणी । मथूनि आपण चक्रपाणी । परमहंसाच्या सुखाची खाणी । ते परमहंससंहिता गीता बोलतो ॥ २२ ॥ जो सिद्धांत एथें समर्थ । बोलेल तोचि अर्थ । वेदीं भारतीं पुराणीं यथार्थ । अन्यथा असेल तो अन्यथाचि ॥ २३ ॥ सकळ शास्त्रें ये रीती । भगवद्भजन मुख्यत्वें बोलती । ऐसें असोनि जे दुष्कृती । ते न भजती मुकुंदातें ॥ २४ ॥ ह्मणूनि एथें संशय । कीं तरी शास्त्रांचा प्रताप काय । कीं तें वाचूनि आइकोनिही पाय । न धरिती जगद्गुरू श्रीपतीचे ॥२५ ॥ आतां ह्मणावें ये रीती । कीं जे वेद शास्त्र पुराणें नेणती । ते हा महिमा काय जाणती । तरी वाचिलें पढलें तेंही असे ॥२६॥ ते पंडित ह्मणावे दुष्कृती । तरी वेदशास्त्र पुराणें वांया जाती । तेव्हां जे असतील सुकृती । ते सुकृतेंच भजतील कां शास्त्र ॥ २७ ॥ कीं शास्त्र असे तें समर्थ । तरी दुष्कृतियांसही मानतां अर्थ । सुकृतचि समर्थ तरी किमर्थ । प्रवृत्ति वेदशास्त्रादिकांची ॥ २८ ॥ अथवा पुण्याचकारणें । प्रवर्तोत वेद शास्त्र पुराणें । विष्णुभक्ति सर्वाधिक्यपणें । व्यर्थ बोलती ॥ २९ ॥ या संशयाचें हें स्थळ । तत्परिहारार्थ मेघनीळ । शास्त्र समर्थूनि प्रांजळ । हेतु बोलतो अभजनीं या श्लोकीं ॥ ८३० ॥

॥ श्लोक ॥ कामैस्तैस्तैर्हृतज्ञाना प्रपद्यंतेऽन्यदेवताः ।
तं तं नियममास्थाय प्रकृत्या नियताः स्वया ॥ २० ॥

॥ टीका ॥ अगा वेदशास्त्रांचें प्रयोजन । कीं श्रवणपठणें घावें ज्ञान । मग सुकृती होती सज्ञान । हतज्ञान होती दुष्कृती ॥ ३१ ॥ ह्मणूनि जे हतज्ञान जन । ते न करिती माझें भजन । जो मीं एक भवभंजन । आत्मा दैवत परमहंसांचें ॥ ३२ ॥ शास्त्र जनांचा मायबाप । ज्ञान देणें हा त्याचा प्रताप । परी उभें राहोनि पाप । करी हतज्ञान ॥ ३३ ॥ पाहोनि बरवा पती । मायबापें कन्या उजविती । परी ते वंध्यासुत तीतें न होती । पूर्वपापें ॥ ३४ ॥ दाता देऊं जाणे धन । मूर्ख करूं नेणे जतन । कोणी तें धनसाधन । करिती नरकदुर्गतीचें ॥ ३५ ॥ करी किंबहुना पर्जन्य । सर्वा जगासही धन्य । परि ऊखर भूमीस धान्य । अथवा तृणही कोठें उपजेना ॥ ३६ ॥ आतां शास्त्रें दिधलें ज्ञान । आणि पूर्वपापें केलें हतज्ञान । ऐसें ह्मणतांही मन । साशंक होतें श्रोतया जनाचें ॥ ३७ ॥ कीं वेदीं शास्त्रीं भरले । आणि ते अध्ययन नाहीं विसरले । तेही कैसे घसरले । श्रुतिशिखरापासूनी ॥ ३८ ॥ ऐशा शंकेचें स्थळ । ह्मणूनि ह्मणे मेघनीळ । कीं ज्ञान असोनिही खळ । हतज्ञान ते जाले ॥ ३९ ॥ कीं अन्यदेवतांच्या कामना । गोड लागल्या ज्याच्या मना । त्या त्या कामीं त्यांच्या ज्ञाना । हरूनि नेलें ॥ ४० ॥ त्या देवतांचें भजन । त्या भजनाचें विधिविधान । कळों लागलें तेंचि ज्ञान । सार सर्व विद्यांचें मानिती ॥ ४१ ॥ नियम जे जे ज्या ज्या भजनीं । फलप्रद ते ते मानूनी । उक्त प्रकारें अनुष्ठूनी । भजती अन्य देवतांतें ॥ ४२ ॥ असोनिही ज्ञान । जाले कैसे हतज्ञान । तरी ते ऐसें ह्मणूनि समाधान । केलें जरी ॥४३॥ तरी उरलीच शंका कांहीं । कीं मोक्षासमान फळ नाहीं । आणि ऐसा मोक्ष तोही । न दे कोणी विना मुकुंद ॥ ४४ ॥ वेद वेदांत वाखाणिती । ते तों हे गोष्टी जागती । ऐसें असोनी बुद्धि नेणती । कैसी जाली ह्मणावी ॥ ४५ ॥ ऐसेंही असोनि ज्ञान । कैसे जाले हतज्ञान । तरी ऐसें ह्मणूनि समाधान । चतुर्थचरणीं करीतसे ॥४६ ॥ चतुर्थ चरण ॥ प्रकृत्या नियताः स्वया ॥ टीका ॥ अगा ज्याची जे नैसर्गिक मती । ती त्याची ह्मणावी स्वप्रकृती । कीं सोडितांही न सुटती । सहज स्वभाव ॥ ४७ ॥ धुतां वस्त्रांचा मळ सुटे । परी बिबव्याचा डाग न फिटे तैसा नैसर्गिक स्वभाव न सुटे । सच्छास्त्र सत्संगें करूनिही ॥ ४८ ॥ ऐशीया नैसर्गिका मती । त्या ह्मणाव्या स्वप्रकृती । कीं आत्मा वाटे अहंकृती ते त्या रंगें रंगले अत्यंत ॥ ४९ ॥ जो ज्याचा स्वभाव । त्यास तो मी

---

१ भरड, खरांट.

ह्मणोन वाटे भाव । यालागीं ह्मणे देवाधिदेव "प्रकृत्या नियता"
ह्मणोनी ॥ ८५० ॥ कीं जे नैसर्गिक मती
प्रकृतीनें नियोजिलें असती । सकामभजनीं
देवतांचे नियम । नाना व्रतें उद्यापनें संभ्रम । का
बळें नैसर्गिक स्वभावाच्या ॥ ५२ ॥ कामाचि वाटे
ह्मणती व्यर्थ । कीं विषयभोगाचे पदार्थ । मोक्षा
ह्मणती मोक्ष । एक शुक पावला दक्ष । "शुको
प्रमाण दाविती येविषयीं ॥ ५४ ॥ अरे शुकाचि
काय अमुक्त । वेदांत वाचूनि क्षुद्र देवतासक्त
प्रारब्ध जनकाचें विचित्र । शुकप्रारब्ध देह
शास्त्र । "शुको मुक्तो" ह्मणोनी ॥ ५६ ॥ घेड क
वृक्ष कदलीचा । भोग सरोनि तैसा शुकाचा । देह
॥ ५७ ॥ मुक्त जनक ही देही विदेही । परी सुखदुःख भोग
होऊनि कांहीं । जीवदशेतें जो स्पर्शी ॥ ५८ ॥ पूर्वी बोलिला हा विचा
याच टीकेंत वारंवार । एवं "शुको मुक्तो" याचा प्रकार । ऐसा ते क
जाणती ॥ ५९ ॥ कोणीं ह्मणती वेद । उगाच बोलतो अर्थवाद । वेदां
याचा वाच्य परि अभेद । कैंचा कोणीं देखिला ॥८६० ॥ स्वभाव नैसर्गि
ऐसे । मुक्तिप्रदास ते भजती कैसे । शास्त्रें वाचूनिही न दिसे । विष्णुभ
मुख्यत्वें ॥ ६१ ॥ बाईल वाटे गोड । तो सासूचें पुरवी कोड । मुक्ती
नलगे ते झोड । कां भजती मातें मुकुंदातें ॥ ६२ ॥ एवं शास्त्रें दिलें ज्ञा
परी कामें केलें हतज्ञान । या श्लोकीं समाधान । हें करी ॥ ६३ ॥ अ
यानंतर श्लोक । तो कां बोले उत्तमश्लोक । त्याचें निमित्त सुज्ञ लोक । प
सोत आधीं ॥ ६४ ॥ शास्त्रज्ञही जाले मूढ । कां ह्मणोनि हे शंका गू
ते हरूनि केलें दृढ । समाधान आह्मां अर्जुनादिकांचें ॥ ६५ ॥ तों आ
उठली शंका । कीं या जगदात्मया शेषपर्यंका । इतर देवना श्रीवत्सांक
कां वेगळ्या वाटती ॥ ६६ ॥ आणि कोण्या एका प्रसंगें । जरी वेग
मानिलीं आपलीं अंगें । तरी सर्वां जनांतें या श्रीरंगें । कां स्वभजनींच
जूं नये ॥ ६७ ॥ ऐसें संदेहाचें स्थळ । जाणोनियां नवमेघनीळ । स
धान याचें प्रांजळ ॥ करीतसे आतां या श्लोकीं ॥ ६८ ॥

---

१ नेमिले, प्रवृत्त केले. २ लोंगर, गुच्छ.

॥ टीका ॥ श्लोक ॥ यो यो यां यां तनुं भक्तः श्रद्धयार्चितुमिच्छति ।
तस्य तस्याचलां श्रद्धां तामेव विदधाम्यहम् ॥ २१ ॥
मग सुकृती होती स... हतज्ञान जन । ते न करितां ... रें । माझींच सर्वही शरीरें । परी ज्या तनूतें दैवत परमहंसांचें ॥ ३२ ॥ ... पूजूं इच्छितो ॥ ६९ ॥ त्या त्यास श्रद्धा अच- ...ताप । परी उभें राहे ठायीं केवळ । तेंचि देतों मी जगन्मंगल । अगा अर्जु- पती । मायबापें कन्या सुवृक्षस्वभाव । मी स्वयें देवाधिदेव । जो सद्बुद्धि पापें ॥ ३४ ॥ दाता देऊं देतों ॥ ७१ ॥ जे ऐसें न प्रार्थिती । जरी मी वर्त- धनसाधन । करिती नरकदु... तरी विषमफलप्राप्ति कां होती । सर्वां जनां ॥७२॥ जगासही धन्य । परि ऊर्ध्व... दरिद्री एक भूपती । जरी कर्मीं मी प्रेरित ॥ ३६ ॥ आतां शास्त्रें दिधे विषमता लागतीच मजलाही ॥ ७३ ॥ पंचमा- ह्मणतांही मन । साशंक । बोलिलों कीं "न कर्तृत्वं न कर्माणी" । "लोक भरले । आणि ते अ" इत्यादि वाणी । कीं कर्म करविता मी नव्हें ॥ ७४ ॥ रापासूनी ॥ ३ सत्तेकरूनी । बुद्धींद्रियें चळती ह्मणोनी । तेच अचळ श्रद्धा ... एसें यावरूनी । मी बोलतों ॥ ७५ ॥ कीं ज्याचा जैसा भाव । त्याचा प्रकाशक मी स्वयमेव । ह्मणोनि ज्यास जो आवडे देव । ते श्रद्धा मीच देतों ह्मणतसें ॥ ७६ ॥ बरें वाईट फळ । हे तों प्रारब्धाचेच खेळ । त्याची श्रद्धा अचळ । त्या प्रसंगें ते होते ॥ ७७ ॥ कांहीं होतां कल्याण । त्या भजनाचा मानी सफळ गुण । वाईट होतां आपण । कांहीं चुकला तें स्मरे ॥ ७८ ॥ दोहितां दुभतें लात हाणे । तें त्या देवें केलें हेंचि जाणे । आतां धरूं अनसूट ह्मणे । त्याच्या वारीं आणि नवरात्रीं ॥ ७९ ॥ तो त्याच्या नावें करी नवस । परि मीच तेथें असें जगन्निवास । प्रारब्ध त्याचें फळतां त्यास । देवपण मी कां न दाखवूं ॥ ८० ॥ जे वारीं तो चुके भक्त । दूध दिसे आरक्त । अहो पहा दुधाचें रक्त । देवें केलें तो ह्मणे ॥ ८१ ॥ देव वाटे हा खरा । आतां नलगे ह्मणे देव दुसरा । शरण मी महिषासुरा । जो सद्यः प्रचीत दावितो ॥ ८२ ॥ तों तों श्रद्धा अचळ । ते अवघे माझेच खेळ । त्याच्या प्रारब्धाचें त्यास फळ । देऊनि वाढवी ते श्रद्धा ॥ ८३ ॥ कीं तेंचि दुभतें मरों बैसे जयीं । लोळे त्याच देवतेचे पायीं । न वांचे तरी त्याचे ठायीं । अभक्ति न धरी ह्मणे कपाळ ॥ ८४ ॥ प्रतीति येतां कांहीं । तेथून मन विटत नाहीं । मी अचळ श्रद्धा देतों तेही । इत्यादि रीती ॥८५॥ एवं देवतांतरें । तींही अगा माझींच शरीरें । आणि जें जयाच्या अंगीं वारें । तेंचि अचळ मी करितों ॥ ८६ ॥ तेंचि त्यास वाटे परम । मी

बुद्धिभेद न करीं सम । त्यांतें मुरडितां मी विषम । होतों ह्मणोनि हें न करीं ॥ ८७ ॥ परि त्या रूपें भजन । माझें आणि फलप्रदान । मीच करितों ऐसें कमलनयन । बोलतसे या श्लोकीं ॥ ८८ ॥

॥ श्लोक ॥ स तया श्रद्धया युक्तस्तस्याराधनमीहते ।
लभते च ततः कामान्मयैव विहितान्हितान् ॥ २२ ॥

टीका ॥ त्या देवतांचा भक्त । त्या माझ्याच रूपीं जो आसक्त । तें श्रद्धें करूनि युक्त । जे मीच अचळ करितों बोलिलों ॥ ८९ ॥ त्या श्रद्धें करूनि तो । आराधन त्याचें करितो । आणि त्यापासूनि फळ पावतो । तेंही मीच देतसें ॥ ८९० ॥ कृष्णसंग अपेक्षित । ह्मणोनि देवी कात्यायनीचें व्रत । गोपी करिती अत्यंत । श्रद्धेंकरूनी ॥ ९१ ॥ शेवटीं द्यावया वर । शुद्ध सत्त्वोपाधि सर्वेश्वर । आपण येऊनि हा विचार । स्पष्ट तेव्हां दाखवी ॥ ९२ ॥ कीं करितां देवताभजन । फलप्रद मीच भवभंजन । ह्मणूनि वर दे जगज्जीवन । आपण स्वयें गोपींतें ॥९३॥ परि मागुती अत्यंत । त्यांतें विरहदुःख दे भगवंत । कीं अन्यरूपीं मी अनंत । नश्वर फळेंचि देतसें ॥ ९४ ॥ या कारणें भगवंत । पूज्य फलप्रद ऐसें येथपर्यंत । तत्त्व बोलोनि तें फळ अंतवंत । ह्मणूनि ह्मणतो आतां या श्लोकीं ॥ ९५ ॥

॥ श्लोक ॥ अंतवत्तु फलं तेषां तद्भवत्यल्पमेधसाम् ।
देवान्देवयजो यांति मद्भक्ता यांति मामपि ॥ २३ ॥

॥ टीका ॥ अन्यदेवतारूपें मातें । जे भजती तयांतें । मीच देतसें फलातें । सकळ फलदाता सर्वेश्वर ॥ ९६ ॥ परि तें फल अंतवंत । त्यास होतें नाशवंत । कीं विष्णुरूपेंचि मी भगवंत । नित्य फळ मोक्ष देतसें ॥ ९७ ॥ अगा ते अल्पबुद्धी । कीं ज्यांपासूनि न घडे मोक्षसिद्धी । काम्यफलाची तेही समृद्धी । जे न करिती भजती तयांतें ॥ ९८ ॥ माझेच ते रूपभेद । श्रेष्ठत्वेंही वर्णिती वेद । परि त्यास भजतां संसारखेद । न तुटे कधीं ॥ ९९ ॥ कीं एकाच पुरुषाचा देह । करचरण नेत्र कर्ण निःसंदेह । परि साधकें त्याचा धरावा स्नेह । साधे स्वकार्य ज्या अंगें ॥ ९०० ॥ जें घडावें करें करूनी । तो गुडघा करील ह्मणोनी । राहे गुडघाच धरूनी । तरि हस्तसाध्य कार्य केंवि घडे ॥ १ ॥ या लागीं अल्पबुद्धी । कीं सत्त्वोपाधि भजनें सत्त्वशुद्धी । रजतमाचीच होते वृद्धी । रजतमप्रधाना जो भजे ॥ २ ॥ आत्मत्वें मीच सारा । मीच गुणत्रयाचा पसारा । परि मीच नाशितों दुःखसंसारा । स्वसत्त्वोपाधींकरूनी ॥ ३ ॥ लोखंडाचीच

बेडी । लोखंडाचेंच शस्त्र तोडी । अल्पबुद्धि ते न धरी आवडी । मुक्तिप्रदा माझ्या सत्त्वरूपाची ॥ ४ ॥ मीचि स्वयें निर्गुण । आणि जरी मीच त्रिगुण । परि मुक्ति देणें हें समर्थपण । शुद्ध सत्त्वीं ॥ ५ ॥ एकचि असतां गुण । तरि समान असतें समर्थपण । भेद नसोनिही विलक्षण । सामर्थ्यें जालीं गुणत्रयांचीं ॥ ६ ॥ मीच जालों सर्व देव । मीच जालों देवाधिदेव । परि ज्या रूपीं ज्याचा भाव । तो तदनुरूप फळ पात्रे ॥ ७ ॥ ह्मणूनि देवातें यजिती । ते त्याचि देवतें पावती । मद्भक्तही मजप्रती येती । तैसेच ॥ ८ ॥ मीच स्वयें देव । आणि मीच स्वयें देवाधिदेव । द्विविध गति ही स्वयमेव । मीच असें ॥ ९ ॥ देवास पावोनि पुनरावृत्ती । मातें पावती ते न परतती । पाहतां दोन्ही गती । मागुती मीच असें ॥ ९१० ॥ परंतु नाशवंत । ते देव ते लोक पावती अंत । मी अनंत प्राप्तीही अनंत । माझी अगा ॥ ११ ॥ यी लागीं अंतवंत । फळ त्यांस कीं अत्यंत । अल्पबुद्धि कीं जो मी अनंत । त्या मातेंचि ते न भजती ॥ १२ ॥ आतां यानंतर श्लोक । तो कां बोले उत्तमश्लोक । त्याचें निमित्त सुज्ञलोक । परिसोत आधीं ॥ १३ ॥ इतर देवतांतें भजती । ते मूढ अल्पमती । कीं अंतवंत फळें पावती । हें पूर्वश्लोकीं बोलिलें ॥ १४ ॥ कीं आपण अनंत । फळ देतों त्यासही नसे अंत । इत्यादि पूर्वश्लोकपर्यंत । सिद्ध जालें ॥ १५ ॥ कितीएकांस एथें संदेह । कीं देवासारिखा यासही देह । देह तेथें समूह । गुणत्रयाचा ॥ १६ ॥ कीं तमोगुणावांचूनी । आकार न दिसे लोचनीं । आणि इंद्रियें रजोगुण ह्मणोनी । रजोगुणप्राप्तत्वही दिसतें ॥ १७ ॥ जेव्हां हा देह पावला । इतर देवांसमान जाला । श्रेष्ठ देवांहूनि याला । कोण्या गुणें मानावें ॥ १८ ॥ आतां ईश्वर जो श्रेष्ठ अत्यंत । त्याचे अवतार स्वेच्छाकल्पित । ऐसें ह्मणावें तरी निश्चित । त्रिगुणही तोचि कल्पितो ॥ १९ ॥ एवं जो देह पावला । तो सर्वांसमान जाला । थोर तोच कीं ज्याला । देह नसे असे निराकार ॥ ९२० ॥ ऐसें संदेहाचें स्थळ । ऐशा गोष्टी बोलती खळ । हा पूर्वपक्षही मेघनीळ । हरितो आतां या श्लोकें ॥ २१ ॥

॥ श्लोक ॥ अव्यक्तं व्यक्तिमापन्नं मन्यंते मामबुद्धयः ।
परं भावमजानंतो ममाव्ययमनुत्तमम् ॥ २४ ॥

॥ टीका ॥ मी जो अव्यक्त निराकार । तो व्यक्ति पावलों ह्मणजे पावलों शरीर । ह्मणूनि जे बुद्धिहीन नर । ते मज ऐसें मानिती ॥ २२ ॥ इतकाच पूर्वार्धाचा अर्थ । परि आकार पावला हें तों यथार्थ । ऐसें बो-

लती त्यांतें व्यर्थ । बुद्धिहीन कां ह्मणावें ॥ २३ ॥ व्यक्ती नाहीं पावला । तरी कोण ऐसें बोलिला । वदन वाणी नसे ज्याला । तो कैसा गीता हे उपदेशितो ॥ २४ ॥ आतां कर्मानुबद्धजीव । त्यासारिखा नव्हे हा देहभाव । अर्थ ऐसा करावा तरी देव । तैसेंचि बोलता ॥ २५ ॥ कीं जीवासारिखी व्यक्ति पावला । बुद्धिहीन ऐसें ह्मणती मला । ऐसें श्रीकृष्ण असता बोलिला । तरी घडता अर्थ ऐसाही ॥ २६ ॥ मी अव्यक्त त्या मला । अबुद्धि ह्मणती व्यक्ति पावला । श्रीकृष्ण ये रीती वदला । अर्थ याचा तो नव्हे ॥ २७ ॥ आतां व्यक्ति पावला तें असत्य । तरी जीवांचे देह काय सत्य । ते कर्में देह पावले अगत्य । हा लीलाविग्रह पावला ॥ २८ ॥ अव्यक्त पावला व्यक्तीतें । काय दोष या गोष्टीतें । अबुद्धि ह्मणोनी भगवंतें । ते कां निंदिले ॥ २९ ॥ आपला प्रभाव नेणती । आणि व्यक्ति पावला ऐसें ह्मणती । उत्तरार्धावरोनी ये रीती । जरी अर्थ याचा बोलावा ॥ ९३० ॥ कीं जे नेणती प्रभाव । त्यांचे दृष्टी प्राकृत मानव । तरी मानव भलता देहभाव । पावलाच असे ॥ ३१ ॥ हा परमात्मा ऐसें नेणती । आणि मनुष्य साधारण ऐसें ह्मणती । या दोषासि नसे गणती । गान्हाणें काय याच गोष्टीचें ॥ ३२ ॥ कीं अव्यक्ता मला । अबुद्धि ह्मणती व्यक्ति पावला । हा परमेश्वर असें कळेना ज्यांला । ते व्यक्ति पावला ह्मणती हेंही घडेना ॥ ३३ ॥ व्यक्ति पावला अर्जुन । व्यक्ति पावला धर्मनंदन । व्यक्ति पावला दुर्योधन । ऐसें कोणी न ह्मणती ॥ ३४ ॥ ज्यांच्या दृष्टीस माधव । दिसे प्राकृत मानव । ते हा कृष्ण एक यादव । इतकेंचि ह्मणती ॥ ३५ ॥ व्यक्ति पावला वसुदेव । हेंही कोणी न ह्मणती मानव । ते व्यक्ति पावला वासुदेव । कां ह्मणती ॥ ३६ ॥ या कारणें भलतसा । अर्थ करितां अनर्थ ऐसा । आतां अर्थ बोलावा कैसा । तो आयका श्रोते हो ॥ ३७ ॥ व्यक्ति पावती जीव । व्यक्तिच पावतो देव । मत्स्यादिरूपें देव देव । जो अवतरतो प्रतियुगीं ॥ ३८ ॥ द्विविध देहही असत्य । ज्या प्रकाशें प्रकाशती तो सत्य । प्रत्यक्षीं अगत्य । परप्रकाश्य मिथ्या मानावें ॥ ३९ ॥ तंतु सत्य मिथ्या पट । माती सत्य मिथ्या घट । तंतु माती यांकडे पाहतां निपट । पट घट धुंडितां न सांपडे ॥ ९४० ॥ तंतु असोनि बाळ नेणे । परि पासोडी ह्मणोनि जाणे । तैसा देह सत्य ह्मणे । जीव अज्ञानें करूनी ॥ ४१ ॥ शुद्धसत्त्व विद्यामय । मत्स्यकूर्मादि अवतार ऐसा निर्णय । देह दिसोनिही त्या सर्वीं निश्चय । चित्स्वरूपें आत्माचि ह्मणूनि

॥ ४२ ॥ जीवांचे कर्मज देह तेही । देह न वाटती ज्यास कांहीं । त्यास अवतारीं देहाची भावनाही । नसे हें ह्मणावेंचि लागेना ॥ ४३ ॥ एवं मत्स्यादि अवतार । हे देह ऐसें नेणे ईश्वर । अज्ञानें जीव पामर । देह ह्मणूनि देहातें जाणती ॥ ४४ ॥ जे देह ह्मणूनि जाणती । तेचि ह्मणावे कीं देहातें पावती । देह ह्मणोनि नेणे तो कोणे रीती । देहातें पावला ह्मणावा ॥ ४५ ॥ जो हार ह्मणोनि जाणे । तो काय त्यास सर्प ह्मणे । सर्पत्व ज्यांच्या दृष्टीस बाणे । ते आपणासम त्यातें मानिती ॥४६ ॥ हारास सर्पत्वें नयन । देखती तेचि दृष्टिहीन । हारचि देखे तो स्वसमान । ते मानिती ॥ ४७ ॥ तैसे बुद्धिहीन नर । सत्य जाणोनि पावले शरीर । तैसेच मत्स्यादि अवतार । मी देह पावलों ते ह्मणती ॥ ४८ ॥ जे समयीं कृष्णावतार । त्याकाळीं जे पामर नर । ते ऐसें ह्मणूनि सर्वेश्वर । न निंदी तयातें ॥४९॥ जे कृष्ण मनुष्य ऐसें जाणती । ते हा अव्यक्त व्यक्ति पावला ह्मणती । व्यक्ति पावोनी सर्व असती । तैसाच कृष्ण वाटे तयांतें ॥९५० ॥ एवं जे दुष्कृती हीं शास्त्रें पाहती । तेथें सर्वां देवांसही श्रुती । ब्रह्मभावें थोर ह्मणती । व्यक्ति चतुर्मुखादिक त्यांचिया ॥ ५१ ॥ त्यांत ज्याचे नानावतार । तोही क्षीराब्धिकन्येचा वर । देह धरितो तेव्हां ब्रह्मादि सुर । तैसाच हा ॥ ५२ ॥ आणि आपणास देह जैसे । साच वाटती मजही तैसे । वाटत असतील ह्मणूनि ऐसें । मी व्यक्तीतें पावलों ते ह्मणती ॥ ५३ ॥ इंद्रादिकांचें शरीर । तैसे माझे अवतार । मानूनि बुद्धिहीन नर । भजती इतर देवतांतें ॥५४॥ ह्मणती जें निराकार । तेंचि सर्वांत थोर । तो विष्णु ह्मणावा तरी अवतार । व्यक्ति नाना तो पावतो ॥ ५५ ॥ व्यक्ति पावतो ह्मणती । त्यांस अबुद्धि ह्मणे श्रीपती । कीं माझी देहप्राप्ति ते पाहती । आपणासमान ॥ ५६ ॥ सत्य वाटे शरीर । तरी शरीर पावलों ह्मणे नर । तैसें मी पावतों आकार । ऐसें मानिती ॥ ५७ ॥ आणि अवलंबूनि सर्वज्ञपण । ह्मणती आकार तितुका त्रिगुण । द्रव्यशक्ति तमोगुण । तीवीण खूण शुद्धसत्त्वीं न दिसे आकृतीची ॥ ५८ ॥ हे शुद्धसत्त्वाची कल्पना । अवतारमूर्ति नाना । ऐसें बोलतां त्रिगुणरचना । काय कल्पना त्याची न ह्मणावी ॥ ५९ ॥ एवं च जैसी त्रिगुणरचना । तैसीच अवतारशरीरकल्पना । ऐसें साधूनि नाना । कुयुक्ति बोलती ॥ ९६० ॥ पूर्वपक्षसीमा येथवरी । सिद्धांत तयाचा याउपरी । पूर्वपक्ष हरूनि श्रीहरी । बोलतो उत्तरार्धें श्लोकाचिया ॥ ६१ ॥ उत्तरार्द्ध ॥ परंभावमजानंतो ममाव्ययमनुत्तमम् ॥

॥ टीका ॥ माझा परमभाव । जो अत्यंत थोर प्रभाव । अवघा हरि ऐसें वैभव । ते नेणती ॥ ६२ ॥ अव्यय ह्मणजे ज्यास नाश नसे । अनुत्तम ह्मणजे उत्तम ज्यापरीस न दिसे । ऐसा प्रभाव माझा समरसे । अवतार-व्यक्तिरूपें करूनी ॥ ६३ ॥ ऐसा माझा परंभाव । ह्मणजे थोर प्रभाव । जो अविद्या नासोनि जीव ब्रह्मचि करी ॥ ६४ ॥ ते त्या प्रभावातें नेणती । त्रिगुण व्यक्ति पावला ह्मणती । त्रिगुण कल्पनेसमान गणिती । दिव्य अवतार व्यक्ति माझिया ॥ ६५ ॥ प्रभाव नेणती ह्मणे । यांत सुज्ञ याचें समाधान जाणे । कीं निंदेनेंचि तोंड त्याचें घाणे । प्रभाव विष्णुव्यक्तीचा नेणतां ॥ ६६ ॥ कीं त्रिगुण ही ईश्वरकल्पना । आणि कल्पनाच अवतार नाना । महिमा नेणोनि हा तनांना । ते करिती ॥ ६७ ॥ कीं कल्पनाच जीवांची अविद्या । आणि कल्पनाच अविद्यानाशिनी विद्या । भवरोगा आणि भवरोगवैद्या । सम मानिती प्रभाव न कळोनी ॥ ६८ ॥ कल्पनाच दुःख । आणि कल्पनाच दुःखनाशक सुख । दोन्ही सम ह्मणती मूर्ख । महिमा ऐसा न कळोनी ॥ ६९ ॥ कल्पिली त्रिगुणसृष्टी । कीं हे सत्य वाटावी जीवदृष्टी । कांहीं सुखी कांहीं कष्टी । कर्मानुरूप होती ते जीव ॥ ९७० ॥ जीवदृष्टी अनुसरोनी । हे सृष्टि कल्पिली ह्मणोनी । अहंकार भूतें इंद्रियें होऊनी । त्रिगुण मोहिती जीवातें ॥७१॥ त्रिगुणें जीव मोहती । त्रिविध कर्में आचरती । त्रिविध गति पावती । अनादि गुणप्रवाह हा ऐसा ॥ ७२ ॥ हे अनादि माया । तिच्या पोटीं कल्पना या । ते शुद्धसत्त्वरूपिणी गुणत्रया । जीवांकारणें कल्पिती ॥ ७३ ॥ तिचींच रूपें दोनी । आपण ब्रह्म ह्मणोनी । असे अखंडानंदानुभवें करूनी । तो ईश्वरोपाधि सर्वसाक्षी सर्वज्ञ ॥ ७४ ॥ परंतु तीस सत्ता नसे । ब्रह्मींच ईश्वरत्व दिसे । आपणास आपण अनुभवीतसे । मायें करूनि ह्मणावें ॥ ७५ ॥ काष्ठादियोगें अग्नि दिसे । मायायोगें ब्रह्म उल्लसे । एवं च ईश्वरत्व ब्रह्मीं असे । परंतु मायायोगें करूनी ॥ ७६ ॥ ते सृष्टि स्थिति संहार । ब्रह्मीं प्रवेशे प्रलयानंतर । तेव्हां योगनिद्रा करी ईश्वर । वेद ऐसें बोलती ॥ ७७ ॥ प्रतिदिनीं असत्य पाणी । निघे असे प्रवेशे किरणीं । तैसी माया निघे असे प्रवेशे निर्गुणीं । अनादि मायाप्रवाह ये रीतीचा ॥ ७८ ॥ जरी नाशतेंचि निर्गुण । तरी मोडता प्रवाह न होते गुण । यालागीं सृष्टि कल्पूनि आपण । सम सदय सगुण नव्हे विषम निर्दय ॥ ७९ ॥ हे माया-

१ गार्गे, वाग्जल्प. २दृष्ट होई.

कल्पना समूळ । परी आपण ब्रह्म हा अनुभव केवळ । ज्या मायेंकरूनी त निखळ । शुद्ध माया ह्मणावी ॥ ९८० ॥ जेथूनि उठे कल्पना । तें हे त्रिगुणसृष्टिरचना । तेथें संकल्प ऐसा कीं हें विश्व नाना । जीव कर्मफळ भोगावया ॥ ८१ ॥ अविद्याबंधप्रवाह जैसा । अनादि विद्याप्रवाहही तैसा । कळे विचार ज्यांस ऐसा । ते अवतार त्रिगुण कां ह्मणती ॥ ८२ ॥ जीवास मोह करीती । ह्मणूनि त्रिगुण कल्पिले ये रीती । ते त्रिगुणाचि होती । पंचभूतें आणि इंद्रियें अहंकार ॥ ८३ ॥ त्यांत कल्पिला सत्त्वगुण । सहज त्याचें निर्मळपण । परि रज तम सहज आपण । मलिन तत्संगें मलिन सत्त्वही ॥ ८४ ॥ ईश्वरें त्या सत्त्वाचें करावें शुद्ध । तेव्हां ब्रह्म विद्येनें होय प्रबुद्ध । कल्पुनियां संकल्पें प्रसिद्ध । केले अवतार आपले ॥८५॥ कल्पनाच जरी अवतार । तो न ह्मणवे त्रिगुणविकार । प्रभाव अव्यय अनुत्तम याचा विचार । तो ऐसा नेणती ॥ ८६ ॥ जे ह्मणती हरी । मत्स्यादि व्यक्ति पावला तरी । देवांस त्यास समता सरी । देह साम्यें करूनी ॥ ८७॥ जोचि मी निराकार । तोचि मी साकार । सोनें आणि अलंकार । कोण वेगळे ह्मणों शके ॥ ८८ ॥ ऐसीच सर्वही सृष्टी । परि कल्पिली लक्षूनि जीवदृष्टी । ते देह साच मानूनि कष्टी । होती पावती देह ऐसें ॥८९॥ व्यक्ति पावले ह्मणावें त्याला । तैसें न ह्मणवे अर्जुना मला । आणि व्यक्ति पावला । अबुद्धि बुद्धिहीन ऐसें ह्मणती ॥ ९९० ॥ थोर मानूनि निराकार । उपेक्षिती माझे आकार । दिव्य माझे जे अवतार । ते त्रिगुण पांचभौतिक मानिती ॥ ९१॥ श्लोकार्थ ऐसा सिद्ध जाला । तों प्रभावकाश एथें देखिला । कीं अवतार दिव्यत्वें ऐसें जनाला । कां न कळे ॥ ९२ ॥ जे गुणत्रयावेगळे । अवतार सर्वांहूनि आगळे । त्या सर्वांचे देखती डोळे । आणि कां न कळे हा महिमा ॥ ९३ ॥ या प्रश्नाचें हें स्थळ । जों अर्जुन पुसे तों प्रांजळ । स्वयें आपण घननीळ । बोलतो या श्लोकीं ॥ ९४ ॥

॥ श्लोक ॥ नाहं प्रकाशः सर्वस्य योगमायासमावृतः ।
मूढोऽयं नाभिजानाति लोको मामजमव्ययम् ॥ २५ ॥

॥ टीका ॥ ज्या सामर्थ्यें मी जगीं वसें । तैसाच अवताररूपी असें । परी जनदृष्टी प्रगट न दिसें । झांकलों योगमायें करूनी ॥ ९५ ॥ ज्या युक्तिरचनेनें जग । मी निर्मितों तो ह्मणावा योग । त्या योगमायेंकरूनि सांग । अवतारांचें दावितों ॥ ९६ ॥ अविद्यासृष्टि कल्पिली । ती त्रिगुणसृष्टि योगशब्दें बोलिली । तो योग कल्पूनि शुद्धसत्त्वें उरली । ते योगमा-

या ॥ ९७ ॥ ते योगमायें करूनी । मी वेष्टित ह्मणोनी । दिसें अवताररूपें
नयनीं । परी नव्हें प्रगट सर्वांतें ॥ ९८ ॥ आतां ह्मणसी अर्जुना । कीं सूर्य
उगवला झांकेना । तरी प्रगट परि दिसेना । डोळां दिवांधाचिया ॥ ९९ ॥
तैसा अविद्येंकरूनी । लोक हा मूढ होऊनी । मज देखोनीहि नयनीं । हा
अज अव्यय ह्मणोनी न जाणे ॥ १००० ॥ अज ह्मणजे जन्मरहित । अ-
व्यय ह्मणजे नाशवर्जित । ऐसियास मज मूढ अत्यंत । ह्मणती उपजतों ना-
शतों ॥ १ ॥ मी अज मी अव्यय परम । त्या मज मानिती आपणासम ।
नेणती कीं हा पुरुषोत्तम । अज अव्यय अनंतशक्ती ॥२॥ हें न जाणायाचें मूळ ।
अविद्या त्रिगुण ओंगळ । आणि आपण सर्वज्ञ केवळ । विद्याशक्ति
शुद्धसत्त्वें करोनी ॥३॥ तो त्रिगुणोपाधि जीवसमुदाय । जरी पुण्यें अगण्यें
निष्पाप होय । आणि शास्त्रदृष्टीं दृढ धरी माझे पाय । तरी ज्ञानदृष्टीं ओळखे
मजलागीं ॥ ४ ॥ ऐसें अध्यायपर्यंत । आतां बोलेल भगवंत । त्यांत आपण
सर्वज्ञ जीव भ्रांत । आधीं बोलतो या श्लोकीं ॥ ५ ॥

॥ श्लोक ॥ वेदाहं समतीतानि वर्तमानानि चार्जुन ।
भविष्याणि च भूतानि मां तु वेद न कश्चन ॥ २६ ॥

॥ टीका ॥ जीं होऊनि गेलीं तीं हीं सारीं । आणि आहेत भूतें ज्या
ज्या प्रकारीं । आणि पुढें जीं भूतें होणारीं । हीं सर्व मी जाणें ॥ ६ ॥ पं-
चभूतांश मिळती । त्या देहास भूतें ह्मणती । ब्रह्मयाच्या शरीराची व्यक्-
ती । यांत कीं ब्रह्मादि स्तंबवरी भूतेंचि ॥ ७ ॥ ब्रह्मांड ब्रह्मयाची मूर्ती ।
चतुर्मुख त्या मूर्तीपुढील भोगमूर्ती । आवरणरूपें ब्रह्मांडाहि वरती । भूतें
तीहीं भूतें ह्मणावीं ॥ ८ ॥ भूत भविष्य वर्तमान भूतें । जाणतो ह्मणतां
भगवंतें । बोलिलीं ब्रह्मांड अनंतें । भूतशब्दें करूनी ॥ ९ ॥ ऐसा स्वयें
सर्वज्ञ । परि मज नेणती जीव अज्ञ । तेहि होती अभिज्ञ । बहुपुण्यें मातें
जे भजती ॥ १०१० ॥ हें पुढें बोलेल निवडुनी । परि या चतुर्थचरणा-
पासूनी । मज नेणती अविद्येंकरूनी । ऐसें पुढिल्या श्लोकवरी बोलतो
॥ ११ ॥ "मां तु वेद न कश्चन" । ह्मणजे ते तो मज नेणती कोण्ही जन ।
कां ह्मणसी तरी भ्रांत मन । त्रिगुणभ्रमें ह्मणतसे या श्लोकां ॥ १२ ॥

॥ श्लोक ॥ इच्छाद्वेषसमुत्थेन द्वंद्वमोहेन भारत ।
सर्वभूतानि संमोह सर्गे यांति परंतप ॥ २७ ॥

॥ टीका ॥ गोडां विषयांवरी प्रीति । वाइटांवरी अप्रीति । इच्छा आणि
द्वेष ह्मणती । याच दोहीं गोष्टींतें ॥ १३ ॥ या इच्छाद्वेषापासूनी । जीं द्वंद्वें

उपजलीं तिहीं करूनी । मोह जाला ह्मणोनी । या त्रिगुणीं वाढविला संसार ॥ १४०॥ कीं जेव्हां जीवोपाधि प्रगटती । त्यास एक सृष्टिकाळ ह्मणती । किंवा नवा देह धरूनी उपजती । तोहि सृष्टिकाळ ॥ १५ ॥ एवं जेव्हां जसे जन्मती । तेव्हां संमोह पावती । कीं देह जड तो आपण मानिती । पूर्विल्या द्वंद्वमोहें करूनी ॥ १६ ॥ दों दों गोष्टींचें जोडें । द्वंद्व नाम त्यातें घडे । त्यांत एक आवडे एक नावडे । मानापमान लाभहानि इत्यादि ॥ १७ ॥ एक आवडे एक नावडे । तदर्थ कर्म करणें घडे । त्या कर्में करूनि जोडे । देहांतर सुखदुःखभोग ॥ १८ ॥ तेथें अत्यंत जो मोह । तो ह्मणावा संमोह । आपण कोण हा संदेह । ते जाणती मज काय ॥ १९ ॥ आपणास आपण नेणे । तो भ्रांत मज काय जाणे । ज्यास आपला बोध बाणे । तोच जाणे मजलागीं ॥ १०२० ॥ पूर्वश्लोकीं मी सर्व जाणें । आणि मज ऐसिया कोणीच नेणे । ह्मणतां नेणती ज्यांस ह्मणे । ते ऐसे वर्णिले ॥ २१ ॥ एवं विद्योपाधि आपण सर्वज्ञ । आणि अविद्योपाधि जीव वर्णिले अज्ञ । आतां स्वभजनें होती अभिज्ञ । ते ऐसे ह्मणूनी वर्णील ॥ २२ ॥ ते कैसे होउनी । कोणे रीती करूनी । भजती तरी ऐसें ह्मणोनी । बोलतसे या श्लोकीं ॥ २३ ॥

॥ श्लोक ॥ येषां त्वंतगतं पापं जनानां पुण्यकर्मणाम् ।
ते द्वंद्वमोहनिर्मुक्ता भजंते मां दृढव्रताः ॥ २८ ॥

॥ टीका ॥ ज्या पापें करूनी मला । जन न भजतां वायां गेला । त्या पापाचा नाश जाला । पुण्यकर्में आचरतां ॥ २४ ॥ अनेक पुण्यकर्में करूनी । द्वंद्वें मानापमान इत्यादि त्यांपासूनी । सुटोनि दृढव्रत होउनी । भजती मातें ॥ २५ ॥ जे परम दुष्कृती । ते आपणातें न भजती । ह्मणूनी मागें बोलिला श्रीपती । कीं पाप तेथें भजन आपलें घडेना॥२६॥येथें चतुर्मुखाचा बाप । ह्मणतो ज्याचें सकळ गेलें पाप । आणि पुण्यकर्में पुण्याचा प्रताप । वाढला भजती तेचि मातें ॥ २७ ॥ ते मज भजतां अत्यंत । होउनियां दृढव्रत । द्वंद्वापासूनि सुटोनि निश्चित । मग मज भजती ऐसेही ॥ २८ ॥ अनेक जन्म पुण्यकोटी । तेव्हां मज भजायाची इच्छा पोटीं । भजतां भजतां शेवटीं । सुटती द्वंद्वांहीपासूनी ॥ २९ ॥ भजतां चित्तशुद्धि अत्यंत । होतां धरिती दृढ व्रत । कीं भजनींच सर्वदा रत । इतर कांहीं न इच्छिती ॥ १०३० ॥ दृढ होतां ऐसें व्रत । होऊं लागती द्वंद्वातीत । जे पिऊं लागती अमृत । ते आंविलीनिमित्त कां लाळ घोटिती ॥ ३१ ॥ ते लाभ धनलाभें

न मानिती । ते हानि धनहानीनें न जाणती । ते मानें सुखी न होती । दुःखी न होती अपमानें ॥ ३२ ॥ धनमानादिलाभें सुख । इत्यादि हानि-करूनि दुःख । या निश्चयाहूनि आणिक । मोह कोणता ॥ ३३ ॥ ज्यासी गोडी हरिभजनीं । भजनींच लोटे दिवसरजनी । चित्त लागलें भगवद्भजनीं । त्या दृढव्रतास कैंचा हा मोह ॥ ३४ ॥ पाप गेलिया माझें भजन । मग ते दृढ-व्रत होती पुण्यकर्मे जन । मग द्वंद्वमोहापासूनि मोचन । पावोनि मातें भजती ॥ ३५ ॥ श्लोकार्थ ऐसा जाला । परि पदाचा अन्वय नाहीं दाविला । ह्मणु-नि संशय श्रोतयांला । पडेल तरी पदें हीं ऐसीं योजावीं ॥ ३६ ॥ "पुण्य-कर्मणामंतगतं पापं ते"।"दृढव्रता मां भजंते"। आधीं ऐसें वदे ते भगवद्वाणी ॥३७॥ "ते तु द्वंद्वमोहनिर्मुक्ताः" ॥ "मां भजंते मुक्ताः" । कीं विना भजन मुक्तता । घडेचि ना ॥३८॥आतां यानंतर श्लोक। तो कां बोले उत्तमश्लोक। त्याचें निमित्त सुज्ञ लोक। परिसोत आधीं ॥३९॥ जे आपणासि भजती। ते ऐसे निष्पाप सुकृती। ह्मणूनि अर्जुनाप्रती। श्रीकृष्ण ऐसें बोलिला॥ १०४० ॥ ते दृढव्रत भक्त । द्वंद्वमोहापासूनि मुक्त । हें आयकोनि संशययुक्त। चित्त जालें अर्जुनाचें ॥ ४१ ॥ कीं यातें न भजती दुष्कृती । आणि भज-ती भले सुकृती । परि सकामा ज्यांच्या प्रकृती । ते द्वंद्वमोहातीत होती हें घडेना ॥ ४२ ॥ मागें वर्णिले चतुर्विध भक्त। त्यांत आर्त अर्थार्थी काम-नायुक्त । जो कामनायुक्त तो द्वंद्वमोहनिर्मुक्त। कोणी न होय ॥४३॥ विचार ऐसा असोनी । सगट हे द्वंद्वमोहरहित ह्मणोनी । कृष्ण बोलिला पूर्वपदें करूनी । येथें अर्जुन शंकला ॥ ४४ ॥ तरी हें जिज्ञासुप्रकरण । याचें पूर्वी राहिलें विवरण । त्रिविधाचें सगट श्रेष्ठपण । "उदाराः सर्व एवैते" ह्मणोनि वर्णिलें ॥ ४५॥ परि ते दोघे सकाम। जिज्ञासु हा अत्यंत निष्काम। ज्ञान होतांच सिद्ध आत्माराम । होणार हाही ॥ ४६ ॥ ते दोघे निष्काम होती । तेव्हां जिज्ञासुपदवी पावती । इतरदेवताभक्ताहूनि अति । श्रेष्ठ सुकृती जरी अत्यंत ॥ ४७ ॥ तत्त्वज्ञानेच्छा जयाला । आत्मबोधाकारणें भुकेला । जिज्ञासु ह्मणावें त्याला । प्रकरण हें तयाचें ॥ ४८ ॥ पूर्वश्लोकीं हा अर्थ । समजला नाहीं पार्थ । ह्मणूनि त्याचें जिज्ञासूपण समर्थ । स्पष्ट अर्धश्लोकें दाखवितो ॥ ४९ ॥ उत्तरार्द्धापासूनी । स्वप्रसादें तो होतसे ज्ञानी। आणि सातां प्रकारें करूनी । तो आपणातें जाणतो ॥ १०५० ॥ ऐसें अध्यायपर्यंत । बोलेल आतां भगवंत । तिन्हीं प्रकारें त्या सातांत । बोल-तसे श्रीभगवान् या श्लोकीं ॥ ५१ ॥

॥ श्लोक ॥ जरामरणमोक्षाय मामाश्रित्य यतंति ये ।
ते ब्रह्म तद्विदुः कृत्स्नमध्यात्मं कर्म चाखिलम् ॥ २९॥

॥ टीका अगा पूर्वश्लोकीं भक्त । जे वर्णिले द्वंद्वमोहनिर्मुक्त । जे आर्थी जिज्ञासु बुद्धीनें युक्त । कीं सुटावें अविद्यापाशापासूनी ॥ ५२ ॥ ज्या अविद्येकरूनी । जें नश्वर जड वाटे आपण ह्मणोनी । दुःख तितकें सुख मानूनी । दुःखींच पचती ॥ ५३ ॥ आजन्म मानिलें सुख । तें सर्वही वाटे दुःख । जेव्हां ह्मातारपणीं मुख । देखे जरेचें ॥ ५४ ॥ तेव्हांही केवळ । जो सुखी ज्याचें सुकृताचेंचि फळ । त्यासही मरणाची तळमळ । सर्वदा चुकेना ॥ ५५ ॥ खांदियावरी सूळ । त्यास चारिती खोबरें गूळ । सुळीं घालायाचें स्थळ । जवळी होतसे पदोपदीं ॥ ५६ ॥ पुण्यफळें सदा सुख । तरी न चुके जरामरणदुःख । गर्भवासादि दुःखें आणिक । न स्मरती तरी हीं ठाउकीं सर्वांसी ॥ ५७ ॥ एवं पाहतां जरामरण । होतें सकळ दुःखांचें स्मरण । कीं मरण आणि ह्मातारपण । विदित असे सकळांसही ॥ ५८ ॥ विचार ऐसा ह्मणोनी । कृष्ण ह्मणे जरामरणापासूनी । सुटावया माझा आश्रय धरूनी । यत्न करिती जिज्ञासु जे ॥ ५९ ॥ ते ब्रह्मकर्मादि सात । जाणती ह्मणे भगवंत । जाणणें ह्मणजे विद्या निश्चित । अविद्यानाशें हे जाणावी ॥ १०६० ॥ तेव्हां जरामरणादी । दुःखमूळ अविद्या अनादी । एवं येथें भजन उपपादी । अविद्या नाशाकारणें ॥६१॥ अविद्येस विद्या संहरी । त्या ब्रह्मविद्येचा धनी हरी । या कारणें नव्हे अविद्या दुरी । हरिभजनावांचूनी ॥ ६२ ॥ या भावें ह्मणे श्रीपती । कीं जे सुकृती मजला भजती । त्या भजनें पावती । ब्रह्मविद्या ॥ ६३ ॥ माझा आश्रय धरोनी । माझ्या प्रसादें ज्ञान होईल ह्मणोनी । दृढनिश्चय ऐसा करोनी । करिती प्रयत्न ॥ ६४ ॥ उपनिषद्भाग ऐकती । ईश्वरभावें गुरूतें भजती । यत्न इत्यादि करिती । जिज्ञासु ब्रह्म कळावया ॥ ६५ ॥ ते जाणती ब्रह्म । हें व्यतिरेकज्ञान परम । तेंचि सर्व स्थावरजंगम । हें अन्वयज्ञान त्याउपरी ॥ ६६ ॥ तें ब्रह्म आत्मत्वें जाणावें । मग सर्व तेंचि हें अद्वैत बाणावें । अध्यात्म ऐसें ह्मणावें । त्या ज्ञानातें ॥ ६७॥ तरी अध्यात्मही ते जाणती । "स्वभावोऽध्यात्ममुच्यते" ऐसें श्रीपती । पुढील अध्यायांत अर्जुनाप्रती । स्वयेंचि बोलेल ॥ ६८ ॥ सर्व आपण हा भाव । यास ह्मणावें स्वभाव । अध्यात्मशब्दार्थ देव । बोलेल ऐसा ॥ ६९ ॥ आणि ते जाणती कर्म । कीं निर्माण होती स्थावरजंगम । हें कर्म तेंही ब्रह्म । सर्व कर्मे ज्या कर्मी आटतें ॥ १०७० ॥

ह्मणोनि कर्म अखिल । ते जाणती ह्मणे मेघनीळ । अखिल ह्मणजे अशेष सकल । गहन भाव हा पुढें विशदही होणार ॥ ७१ ॥ सातांत तीन जालीं । जीं ब्रह्म अध्यात्मकर्में बोलिलीं । आतां चार जीं उरलीं । तीं बोलतसे या श्लोकीं ॥ ७२ ॥

॥ श्लोक ॥ साधिभूताधिदैवं मां साधियज्ञं च ये विदुः ।
प्रयाणकालेपि च मां ते विदुर्युक्तचेतसः ॥ ३० ॥

इति श्रीमद्भगवद्गीतासूपनिषत्सु ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे श्रीकृष्णार्जुन संवादे अर्जुनविषादयोगो नाम सप्तमोध्यायः ॥

॥ टीका ॥ अधिभूत हें दृश्य नश्वरस्वभाव । जीव पुरुष तो अधिदैव । अधियज्ञ तो साक्षी स्वयें देव । हें पुढें देवाधिदेव बोलेल ॥ ७३ ॥ परि यांत जीव अधिदैवत । त्यातें ऐसें जाणती ह्मणे अच्युत । कीं अधिभूता नश्वरा जडासहित । आणि मी जो अधियज्ञ त्यासह ॥ ७४ ॥ साधिभूत आणि साधियज्ञ । अधिदैव मी जो त्यातें जाणे अभिज्ञ । ह्मणोनि ह्मणे सर्वज्ञ । गीतार्थ येथें विरळ जाणती ॥ ७५ ॥ बहुतीं हा अर्थ टाकिला । नेणोनि टीकाशब्दें झांकिला । विचार येथें नाहीं केला । कीं या दों पदींच का सकार सह शब्द ॥७६॥ या सह शब्दीं तत्त्व खोल । तें स्फुरे तरी हे समजती बोल । सगर्भ शब्द मानिले फोल । दृष्टी तत्त्वीं न पडतां ॥ ७७ ॥ या अधिभूतादि शब्दांचे अर्थ । पुढें बोलेल जो समर्थ । त्याच अर्थी अर्थ यथार्थ । होती या सकारासह शब्दाचे ॥ ७८ ॥ पुढिल्या अध्यायांत देव । अधिभूत ह्मणेल क्षरभाव । क्षरभाव ह्मणजे नश्वर स्वभाव । चराचर स्थूल देह जीवांचे ॥ ७९ ॥ या अधिभूतांसहित । अधिदैवातें जाणती ह्मणे अच्युत । अधिदैवाचा अर्थ भगवंत । ह्मणेल पुरुष ह्मणोनी ॥ १०८० ॥ पुर देह अधिभूत त्यांत । अविद्येनें जो निद्रित । तो पुरुषांश प्रतिबिंब निश्चित । अधियज्ञा ईश्वराचा ॥ ८१ ॥ त्या अधियज्ञासहित । अधिदैव जाणती ह्मणे भगवंत । कीं बिंबावांचूनि न कळे निश्चित । अंश प्रतिबिंबरूपत्वें ॥८२॥ प्रतिबिंबांश ईश्वराचा । जीव ह्मणोनि बोलती वेदवाचा । निर्णय मागें जाला पुढेंही याचा । होणार निर्णय ॥ ८३ ॥ ज्यांत प्रतिबिंब तें निर्मळ । सत्त्व जैसें निवळ जळ । प्रतिबिंबयोगें तेंचि केवळ । जीव जालें ह्मणावें ॥ ८४ ॥ कीं ज्या उदकीं दिसे प्रतिमुख । तें उदकचि तें मुख । कीं उदकावांचूनि आणिक । न सांपडे कांहीं तयांत ॥ ८५ ॥ ह्मणोनि परा प्रकृती । जीवत्वें वर्णितो श्रीपती । आणि

" ममैवांशो जीव" हेंही जगत्पती । पंचदशीं बोलेल ॥ ८६ ॥ एवं पुरुष ह्मणतां अधिदेव । तदर्थ सत्त्व जळही सूचवी देव । परि जळास घट तैसा स्थूलदेहभाव । अधिभूत चराचर क्षरभाव ॥ ८७ ॥ आणि सत्त्वाचे वृत्तिभेद । बुद्धि अव्यक्त ह्मणती वेद । त्या वृत्तिभेदातें गोविंद । त्रयोदशीं वर्णील क्षेत्र ह्मणोनी ॥ ८८ ॥ " महाभूतान्यहंकारो बुद्धिरव्यक्त " । इत्यादि पंचभूतां क्षरांसंयुक्त । क्षेत्र बोलेल जें क्षरत्वें उक्त । " अधिभूतं क्षरो भावः" ह्मणोनि या प्रसंगीं ॥ ८९ ॥ लिंगदेहासहित । क्षेत्र नश्वर निश्चित । कीं अंतीं ज्ञान परिपाकीं अंत । होतसे जयाचा ॥ १०९० ॥ एवं जीवोपाधि निश्चित । अधिभूत क्षरभाव त्यासहित । प्रतिबिंब पुरुष अधिदैवत । अधियज्ञ बिंबासहित जाणावा ॥ ९१ ॥ कीं दर्पण आणि बिंब । तरीच दिसे प्रतिबिंब । नसतां हे दोन्ही अवलंब । तें नसे ॥ ९२ ॥ याकारणें साधिभूत । ह्मणजे अधिभूत स्थूल सूक्ष्म त्यांसहित । आणि साधियज्ञशब्दें बिंब स्वयें अच्युत । त्यासहित प्रतिबिंबा अधिदैवातें जाणती ॥ ९३ ॥ अधियज्ञाचा अर्थ देव । बोलेल कीं अधियज्ञ 'अहमेव' । 'अहमेव' ह्मणजे मीच देवाधिदेव । बिंब स्वयें त्या प्रतिबिंबाचा ॥ ९४ ॥ कीं अधिदैव जैसा प्रतिबिंब । तैसा नव्हे मी बिंब । मीच त्याचा अवलंब । अंशा अधिदैवा आणि अधिभूता उपाधीचा ॥ ९५ ॥ कीं प्रतिबिंबयुक्त नीर । घट पाहिजे त्यास आधार । तैसें जीवा सत्त्वास शरीर । स्थूल अधिभूत क्षरभाव पाहिजे ॥ ९६ ॥ आणि जडनिषेधाविण । न कळे तयाची खूण । हेंही सर्वज्ञ सगुण । सूचवी एथें ॥ ९७ ॥ ह्मणोनी साधिभूत । अधिदैव जाणे ह्मणे अच्युत । आणि बिंबाविणें न दिसे निश्चित । प्रतिबिंब तें ॥ ९८ ॥ या कारणें साधियज्ञ । कीं अधियज्ञासह ते अभिज्ञ । अधिदैव जाणती ह्मणे सर्वज्ञ । एवं प्रतिबिंब अधिदैव हें बोले ॥ ९९ ॥ आतां तेंचि प्रयाणकाळीं । मातें जाणती ह्मणे वनमाळी । तरी आपण सकळ सकळीं । हे जाणती तिहीं हेंचि प्राणप्रयाणीं स्मरावें ॥ ११०० ॥ ऐशा प्रकारीं जे जाणती । तेचि प्रयाणकालीं स्मरती । जेव्हां धरूनि आत्मस्मृती । सोडिती शरीर ॥ १ ॥ एवं स्मरती ह्मणावें ये स्थळीं । ऐसें असोनिही वनमाळी । जाणती ह्मणे प्रयाणकाळीं । हें कां एथें विचारावें ॥ २ ॥ कां जें नसेल विदित । त्यास जाणती ह्मणों नये निश्चित । विदित असेल जें अत्यंत । तें स्मरती ऐसें ह्मणावें ॥ ३ ॥ स्मरती ह्मणावें जेथें । जाणती ह्मणों नये कां तेथें । ऐसे विचार एथें । करितां तत्त्वार्थ सांपडे ॥ ४ ॥ आतां जा-

णियानें स्मरावें। या भावें जाणती ह्मणे ह्मणावें । तरी जाणणियानेंचि विसरावें। सर्वही त्याणेंचि होतसे ॥ ५ ॥ जाणती ह्मणजे स्मरती । अगत्याच बोलावें ये रीती। कीं अर्थ न लागे ह्मणूनि गती। कल्पावी भलतैसी ॥ ६ ॥ दुसरें जया प्रयाणकाळीं जाणती। तें प्रयाण साधे कोणे रीती। ब्रह्म आपण तोचि उरती। उरी कैंची प्रयाणातें ॥ ७ ॥ ज्ञानियाचें चित्त। देहादि चेतवी प्रारब्धानिमित्त । जोंवरी वायु तोंचि पर्यंत । तरंग जैसा सागरीं ॥ ८ ॥ वायु राहतां सागरीं । सागरचि होय ते लहरी। ब्रह्मीं चित्त यापरी। ब्रह्म होय सरतां प्रारब्ध ॥ ९ ॥ आतां कैचें प्रयाण। हेंही न विचारी जरी निपुण । एथेंही अगत्यपण । लागे गीता वाखाणितां ॥ १११० ॥ मुख्यार्थ न सांपडे। तेव्हां ऐसें संकट पडे । भलतसा अर्थ योजणें घडे। टीकाकारासही तो ॥ ११ ॥ याचा अर्थ भगवंत। बोलेल पुढील अध्यायांत। तेथें याहूनि श्रीकांत। प्रयाण बळकट बोलेल ॥ १२ ॥ कीं अंतकाळीं मातें। स्मरत सोडील शरीरातें। आणि जाय तो माझ्या भावातें। पावे एथें संशय असेना ॥ १३ ॥ मोक्ष एथें निर्गुण। कोणी वाखाणिती निपुण। मुक्तिसुखाची हे खूण । नुरे जेथें ॥ १४ ॥ पक्वज्ञानियास सद्य मोक्ष। आणि अपक्व ज्ञानी हटयोगीं दक्ष । याच्या मोक्षातें क्रममोक्ष। शास्त्रें ह्मणती ॥ १५ ॥ ते ब्रह्मरंध्र भेदोनि जाती। ब्रह्मयासह मोक्ष पावती। कोणी एथें ते गती। वाखाणिती टीकाकार ॥१६॥ तरी या श्लोकीं या ज्ञानी। युक्तचित्त ह्मणोनी। श्रीकृष्ण ह्मणे यावरूनी । सद्य मोक्षचि युक्त चित्तातें॥१७॥उत्तराध्यायांत कमलेक्षण। वेगळेंचि त्या मोक्षाचेंही लक्षण। बोलेल तेथेंही विवरण। विशद टीकेंतही होणार ॥ १८ ॥ एवं एथें मोक्ष सगुण। बोले सर्वज्ञ आपण। दृष्टि तिकडे देती निपुण। मुख्य अर्थ त्यांत सांपडतो ॥ १९ ॥ सगुणमोक्षीं प्रयाणसिद्धी। वैकुंठगमन हेंही प्रसिद्धी। त्या मोक्षीं अनुभवसमृद्धी । मुक्त असती जाणती ते ऐसें ॥ ११२० ॥ " प्रयाणकालेपि " ह्मणोनी । व्याकरणें या सप्तमीविभक्तीकरूनी । प्रयाणकालीं जाणती हा अर्थ होउनी। अर्थ आणिकही होतसे ॥२१॥ "प्रयाणकालेपि" ह्मणे श्रीपती। ह्मणजे प्रयाणकाले 'सत्यपि' ऐसे रीती। अर्थ वाखाणितां सिद्ध होती। मुख्य अर्थ सर्वत्र ॥ २२ ॥ आणि 'अपि' शब्देंकरूनी । कैवल्यमोक्ष जाणणें नसे ह्मणोनी। सूचवूनि बोले या वचनीं। कीं या मुक्तींतही मज जाणती ॥ २३ ॥ कीं जाला असतांही प्रयाणकाळ। त्यावरी जेव्हां मुक्तीचा सुकाळ। तेव्हांही मातें जाणती के-

वळ । कीं अनुभव बुडेना भक्तांचा ॥ २४ ॥ निर्गुण मोक्षापरीस । सगुण मोक्षामृत बहुत सुरस । ह्मणूनि सूचवी जगन्निवास । कीं प्रयाणकाळ जाला असतांही जाणती ॥ २५ ॥ कीं जाला असतां प्रयाणकाल । मुक्त होऊनि असती सकळ । तेव्हांही जाणती केवळ । मातें अखंडानंदानुभवें ॥ २६ ॥ हें भक्तांच्या गतीचें प्रकरण । निर्गुणमोक्षास विलक्षण । ऐसें सूचवी कमलेक्षण । कीं निर्गुणमोक्षीं हें नसे ॥ २७ ॥ वैकुंठीं स्वानंदानुभव । निर्गुणीं नसे सधर्मभाव । ज्या सत्त्वें अनुभवावें सर्व वैभव । तें वैभव असोनिही सत्त्व नसे ॥ २८ ॥ अमृतास नाहीं रसना । त्याची गोडी त्याला कळेना । अद्भुत सगुण मोक्षरचना । कीं स्वरूपामृतीं सत्त्वमूर्ति रसना ते ॥ २९ ॥ चित्ताचें जाय चित्तपण । उरे अनुभववर्जित निर्गुण । काय जाणेल येथें खूण । स्थिति ब्रह्मात्मत्वाची तेही जाय ॥ ११३० ॥ त्याचें जाणणें ओसरे । यास निर्गुणत्वें सगुण स्फुरे । विष्णुरूप पावोनि उरे । सत्त्व अक्षय्यपणें वैकुंठीं ॥३१॥ जैसें ईश्वरोपाधि सत्त्व । तैसेंच याच्या सत्त्वासही अक्षयत्व । मुक्त वैकुंठ विष्णुरूप यांचें तत्त्व । हेंच कीं सत्त्वानित्यत्व सम सर्वांचेंही ॥ ३२ ॥ योगनिद्रेच्या अवसरीं । जैसा ईश्वर तैसे परी । निर्गुणत्वेंचि उरती आणि जेव्हां हरी । साकार होतां हेही होती साकार ॥ ३३ ॥ येथें नश्वरत्वप्रसंग । बोलती त्यांचा पुढें मुखभंग । चतुर्दशीं होईल जेव्हां श्रीरंग । परिहरील उत्पत्तिनाश या मुक्तांचा ॥ ३४ ॥ टीका चतुर्थाध्यायाची । तेथें यज्ञप्रसंगें या मोक्षाची । रीति वर्णिली ते साची । मोक्ष शब्देंचि होतसे ॥ ३५ ॥ मोक्ष ह्मणावें ज्याला । नश्वर ह्मणावें त्याला । तेव्हां नित्य ह्मणावें याही बोला । अनित्य ह्मणोनि कां न वाखाणावें ॥ ३६ ॥ तेज ह्मणावें ज्याला । तम मानावें त्याला । यास आणि मोक्ष अनित्य या बोला । नव्हे काय एककोटित्व ॥३७॥ तें असो या प्रस्तुतीं । येथें ह्मणे श्रीपती । कीं प्रयाणकाल जाला असतांही जाणती । मातें ह्मणोनि त्याचा हा इत्यर्थ ॥ ३८ ॥ कोणी ह्मणती भगवंत । याचा अर्थ अष्टमाध्यांत । बोलेल कीं प्रयाणसमयांत । स्मरोनि मातें जे जाती ॥ ३९ ॥ ते सद्भावातें पावती । तरी जाणती ह्मणजे स्मरती । हा अर्थ कां घडेना ये रीती । ह्मणतील जरी या प्रसंगीं ॥ ११४० ॥ तरी याहीपुढें जो श्लोक । तेथें बोलेल उत्तमश्लोक । कीं ज्या ज्या भावातें जे लोक । स्मरती अंतीं पावती तो भाव ॥ ४१ ॥ त्याही पुढें ह्मणेल कीं या कारणें । अर्जुना युद्धही करी माझ्याच स्मरणें । कीं माझ्या स्मरणशील अंतःकरणें । निःसंदेह मज पावसी

॥ ४२ ॥ स्मरणभक्तीचा महिमा हरी । कळावया बोलेल या उपरी । कीं माझ्या स्मरणें देह सोडिल्यावरी । पावे माझ्या भावातें ॥ ४३ ॥ पावे माझ्या भावातें । ह्मणतां सूचवी या अर्थातें । कीं भाव ह्मणजे सारूप्यातें । पावे तो जाणेच मातें मुक्तींतही ॥४४॥ कीं आणिकही जो जो भाव । अंतकाळीं स्मरे जीव । तोचि भाव पावे हें देव । बोलेल भावशब्दें आकार ॥ ४५ ॥ हा स्मरणमहिमा । कीं अंतकाळीं स्थावर अथवा जंगमा । स्मरतां पावे तयां तैसा पुरुषोत्तम । मजही स्मरतां पावसी ॥ ४६ ॥ एवं भाव शब्दें आकार । आणि बोलावया स्मरणाचा बडिवार । स्मरत सोडिती कलेवर । ऐसें ह्मणे ॥ ४७ ॥ आणि जाला असतां प्रयाणकाळ । मज जाणती ह्मणे मेघनीळ । यावरूनी प्रश्न होतां त्याचें उत्तर प्रांजळ । मद्भावातें पावती हें ह्मणतां होणार ॥४८॥ "कथं ज्ञेयोसि" ह्मणोनी । अर्जुन पुसेल यावरूनी । समजेल कीं साकार मोक्षेंकरूनी । जाणती ह्मणतों आपणातें ॥ ४९ ॥ प्रयाणकाल जालियानंतर कैसा । जाणावया योग्य आहेसि ऐसा । प्रश्न होईल त्यास आकाराचा ठसा । मद्भावशब्दें सूचवील ॥ ११५० ॥ हे भावार्थ गहन । कृपादृष्टि सूचवी कमलनयन । तें बहुतेक समजे अर्जुन । न समजे तेथें प्रश्न करी ॥ ५१ ॥ ते प्रस्तुत सात प्रकार । याचा न कळतां अर्थविचार । प्रश्न करील हा चमत्कार । कृपासिंधु जगद्गुरूचा ॥ ५२ ॥ कीं अपरोक्षाकारणें । या अर्जुनें यावें शरण । " किं तद्ब्रह्म " ह्मणतां विवरण । अपरोक्षाचें करावें ॥ ५३ ॥ हें पुढें बोलणेंचि असे । एवं मोक्ष सगुण येथें दिसे । इतर अर्थ येथें न वसे । विचार करितां ॥ ५४ ॥ आरंभीं ज्ञान सगुण । ज्ञानी सगुण भक्तामध्यें वर्णिले निपुण । अंतीं सगुण भक्तीची खूण । सर्वोत्कर्षे या अध्ययांत बोलिली ॥ ५५ ॥ ऐसा अध्याय सप्तम । आणि या सातांत जो सप्तम । तो पुरुषार्थ याकरितां उत्तम । कीं भक्ति हातींची नव जाय ॥५६॥ ज्ञान असोनि अनुरक्ती । श्रीकृष्णचरणीं हे भक्ती । अत्यंत थोर चारी मुक्ती । ओंवाळिल्या इजवरोनी ॥ ५७ ॥ सकळां उपनिषदांचें सार । हे गीता हरी दुःखसंसार । ते वाखाणितां मूळानुसार । भक्ति सम कांहीं चुकेना ॥ ५८ ॥ जो स्वयें गीताकार । तोचि स्वयें टीकाकार । भगवत्सुवर्ण वामन आकार । विकार नसे सुवर्णत्वीं ॥ ५९ ॥ तथापि कांहीं तो जरी न करी । सर्व सम अकर्ता परी । भक्ति करिती ते तों हरी । करी प्रार्थिला कल्पवृक्ष ॥ ११६० ॥ जो मागे जें फळ । कल्पवृक्ष दे तेंचि केवळ । गीता केली तैसा प्रांजळ । अर्थ करी

ह्मणतां करीतसे ॥ ६१ ॥ ज्यांस अनन्य शरणागती । ते हेंचि या कल्पवृक्षा मागती । ह्मणोनि यथार्थ अनुसंधानगती । तोचि ऐशा करीतसे ॥६२॥ कीं नसे देवतांतराची भीड । अथवा कांहीं फळाची चाड । कीं अभक्तास वाटेल अवघड । हेही शंका असेना ॥ ६३ ॥ टीका उदंड जाल्या । परी देवतांस तदुपासकास भ्याल्या । यथार्थ अर्थ नाहीं बोलिल्या । तैसी नव्हे हे टीका ॥ ६४ ॥ ह्मणोनि यथार्थदीपिका । नांव पावली हे टीका । कीं अद्वैत आणि भजावें एका । श्रीवत्सांका जगद्गुरूतें ॥ ६५ ॥ विघ्न न हो ह्मणोनी । आरंभीं देवा एका प्रार्थुनी । स्फूर्ती देईल हे इच्छा धरोनी । प्रार्थना एका आणिकाची ॥ ६६ ॥ टीका ऐसी आरंभते । आणि भक्ति अव्यभिचारिणी बोलिजेते । आणि पदोपदीं निषेधिजेते । उपासना अन्य देवतांची ॥ ६७ ॥ त्यांचें परोपदेशपांडित्य । गीताच प्रकट करिते सत्य । कीं टीकेंत बोलणें लागे अगत्य । तुच्छत्व इतर देवताभजनाचें ॥ ६८ ॥ आणि जेथें गहन अर्थ । तेथें घडेना यथार्थ । जरी मानिती कृतार्थ । टीका आपुली ॥ ६९ ॥ "अंतवत्तु फलं तेषां" ह्मणोनी । याच अध्यायांत या श्लोकें करोनी । जें बोलिलें तें येतें दिसोनी । तुच्छफळप्रदत्व त्यांतें ॥ ११७० ॥ कीं टीका निर्विघ्न जाली । आणि रचना स्फूर्तीही आली । तथापि होऊनि आली । ते विरुद्ध मूळासी ॥ ७१ ॥ इतरदेवताभजन । टीकेंत निषेधिती महाजन । आणि आरंभीं करिती नमन । त्या इतर देवांतें ॥ ७२ ॥ वाखाणावी गीता । तींही आदि अंतीं एका अनंता । वंदावें मध्यें ज्या भगवंता । मुख्य सेव्यत्वें वर्णावें ॥ ७३ ॥ त्यांस सर्वही ब्रह्म दिसे । ह्मणोनी त्या देवां वंदिती ऐसे । ऐसें ह्मणावें तरी ह्मणतसे । कृष्ण काय गीतेंत ॥ ७४ ॥ सर्व मी सर्व माझे उपासक । परि तें भजन अविधिपूर्वक । उपास्यदैवत मीच एक । इतरें पहावींच मद्भावें ॥ ७५ ॥ ब्रह्म जरी विघ्नाचाच हर्ता । तरी ह्मैसासूर काय परता । अद्वैताश्रयें या वार्ता । फोल अवघिया ॥ ७६ ॥ असो तें हे टीका शेषशयन । स्वयें करी आकर्णनयन । गीताटीका तो आणि वामन । भिन्न अणुही न दिसती ॥ ७७ ॥ आत्मत्वें भजतां तया । त्या जगदात्मयाची होतां दया । हात जोडिती सर्व देवता या । परि कोण पाहे त्यांकडे ॥ ७८ ॥ कोणाची नसे भीड । आणि कोणाची नसे चाड । अनन्यभक्ति लागतां गोड । या भगवद्गीतेंत ये रीती ॥ ७९ ॥ वाचोत जे वाचिती । न वाचोत जे वाईट मानिती । संतुष्ट होय एक जगत्पती । या यथार्थ निरूपणें ॥ ११८० ॥ जे अनुभवी

आणि भक्त । जे इतर फळीं विरक्त । आणि जे समजती युक्तायुक्त । ते क्षणही न सोडिती हे टीका ॥ ८१ ॥ भ्रमरा कमळें प्रार्थावें । कीं चकोरा चंद्रें आमंत्रण द्यावें । कीं मयूरास मूळ पाठवावें । धराधरीं ॥ ८२ ॥ चंद्र नावडे तस्करा । ह्मणोनि वीट येना चकोरा । कुमुदें लाजती भास्करा । ह्मणोनि कमळें मुख न झांकिती ॥८३॥ जगद्वंद्य श्रीमद्भागवत । तेथें अप्रीति धरिती कुत्सित । अभक्त आणि कुमार्गरत । त्यांस तैसी हे टीका॥८४॥बौद्धीं वेद दूषिले । तरी काय ते वांयां गेले । स्वहिततत्पर रसज्ञ भले । तेच वाचिती हे टीका ॥ ८५ ॥ असो तें आतां अर्जुनरथाचे ठायीं । जो गीता उपदेशितो शेषशायी । प्रतिपदीं अर्पिली त्याच्या पायीं । हे यथार्थ दीपिका वामन ह्मणे ॥ ११८६ ॥

॥ वामनकृतसंस्कृत श्लोक ॥

भक्तिर्मुकुंदे जगदात्मनीशे नान्यत्र कस्मिन्फलदेस्त्वनीशे ।
यः सप्तमे सप्त जगाद पार्थं सर्वं तदस्माकमहो कृतार्थम् ॥ १ ॥

इति श्रीमद्वामनपंडितविरचितायां यथार्थदीपिकायां सप्तमोऽध्यायः ॥

## अध्याय ८.

श्रीमते भगवते भगवत्तमाय जगदादिगुरवे सर्वोत्तमाय नमः॥ जय जय सर्व सर्वापरोक्ष । जय जय पारोक्ष्यहेतुहरणदक्ष । जय जय कृष्ण पुंडरीकाक्ष । अर्जुनगुरो जगद्गुरो मद्गुरो ॥ १ ॥ जय जय ब्रह्मात्मसाक्षात्कार । जयजयाध्यात्मविद्याविचारसार । जय जय भूतभावोद्भवविसर्गकर । कर्मब्रह्मभावनाबोधा ॥ २ ॥ अधिभूतक्षरतरंगसागर । अधिदैव प्रतिबिंब बिंबेश्वर । सकळ शरीरगत परात्पर । सर्वज्ञ अधियज्ञ ॥३॥ जाते सति प्रयाणकालेंपि । अखंडत्वें न वेद्योसि मुक्तावपि । आब्रह्मलोकाः पुनरावर्तिनोपि । कोपि त्वां प्राप्य वैकुंठं न निवर्तते ॥४॥ जयजयानन्यभक्तिगम्य । जय जय साम्य हृतसकलवैषम्य । जय जय रमामनोरम्य । सगुण सुंदर भक्तवत्सल ॥ ५ ॥ जय जय स्मरणलभ्यचरण । जय जय जगत्पावनाचरण । जय जय जगत्कारणाकारण । नारायण जगत्पते ॥ ६ ॥ जय जय प्रपन्नसुलभ । जय जय दुग्धसिंधुदुहितावल्लभ । जय

१ मेघानीं.

जय सजलजलदसन्निभ । श्रीवत्सांक शेषपर्यंक ॥ ७ ॥ जय जय दशाव-
ताराष्टम । जय जय देवकीतनयाष्टम । जय जय सप्तोपदिष्टाष्टम । जय
जयाष्टैश्वर्य ॥ ८ ॥ देवा वेदवाणी संस्कृत । लोकवाणी प्राकृत । परि
यथार्थ अर्थ व्याकृत । जोडती त्याणेंचि पद तुझे ॥९॥ ते तुझे चरणकमल ।
जे निववितो श्रीकरतळ । ध्यातां करिती शीतळ । त्रिपाततप्ता हृदयातें
॥ १० ॥ करूनियां पायांतें नमन । तुझीं रूपें श्रोते जन । तूं अर्थ दाविसी
निवेदन । तें त्यांप्रती करीन अष्टमाध्यायाचें ॥ ११ ॥ श्रुति ह्मणे आत्मा
रथी । देह रथ बुद्धि सारथी । बुद्धिस्थानीं पार्थ रथी । साराथि जाला जग-
द्गुरु ॥ १२ ॥ बाह्य सारथ्याकारणें । नरें प्रार्थिला नारायण । अमृत क-
रीच आपला गुण । पितां उदक मानूनिही ॥ १३ ॥ बुद्धिस्थानीं बसे हरी ।
मग बोद्धव्यास काय उरी । जाणायाची सीमा जेथवरी । तेथवरीच पावे
बुद्धीतें ॥ १४ ॥ बुद्धींत सर्वांच्या असे । परि जैसा काष्ठीं सर्वत्र अग्नि
बसे । मथिला प्रगट अग्निहोत्रीं दिसे । तैसा रथीं अर्जुनाच्या ॥ १५ ॥
काष्ठीं काष्ठ प्रकाशक । परि न दावी महिमा कौतुक । तैसे जे भजनहीन
लोक । त्यांच्या बुद्धींत तैसा परमात्मा ॥ १६ ॥ जैसा अर्जुनाचे रथीं ।
तैसा भक्तियुक्त मनोरथीं । बुद्धिस्थानीं होतो सारथी । जो सारथि
अर्जुनाचा ॥ १७ ॥ जेथें न पावे वेदवाणी । परते मागें लाजिरवा-
णी । तेथें पाववी चक्रपाणी । बुद्धि आपुल्या भक्तांची ॥ १८ ॥ तो
स्वयें सारथि जाला । काय उणें मग तयाला । गीतोपदेश आरंभि-
ला । याच लागीं ॥ १९ ॥ परंतु अपरोक्ष ब्रह्मविद्या । जे उपदेशितां
नासे अविद्या । जिणें जगत्कारणा आद्या । परोक्ष केलें अपरोक्षास-
ही ॥ २० ॥ दृष्टीस रज्जु दिसे । तेव्हां भ्रम उठे सर्प भासे । अपरोक्ष अ-
सोनि न गवसे । परोक्ष आत्मा ऐसा अविद्यें करोनी ॥ २१ ॥ त्या मिथ्या
सर्पातें निषेधी । सत्य रज्जु त्यातें बोधी । ऐसा गुरु भेटे तरी अवधी ।
शरणागताची तो पाहे ॥ २२ ॥ कीं क्षुधा असेल जया । तो काकुळती
अन्नदातया । करिल तैसा गुरुराया । मागेल ब्रह्मविद्या मुमुक्षु ॥ २३ ॥
क्षुधा नसेल ज्याला । मिष्टान्न घालितां त्याला । न रुचे न पचे व्यर्थ गेला ।
तैसा गुरूचा उपदेश ॥ २४ ॥ चतुर्थाध्यायटीकेंत या रीती । वर्णिल्या
त्याच वदतां मागुती । ग्रंथ वाढेल एवं गुरुप्रती । शरण न येतां करूं नये
उपदेश ॥ २५ ॥ अर्जुन अपरोक्षाचें पात्र । कृपेनें ओळ्हला कमलनेत्र ।
परि संप्रदायपालनार्थ मात्र । वाट पाहे प्रश्नाची ॥२६ ॥ द्वितीयाध्यायांत-

शरण । आला वंदूनि चरण । मी शिष्य ह्मणूनि दीनपण । निवेदिलें ॥२७॥ परंतु भीष्मादिकां मारूं कैसा । मनीं याच शोकाचा वळसा । तें बोलतां प्रसंग ऐसा । ग्रंथ आला येथवरी ॥ २८ ॥ अध्यायांत तिसरिया । ह्मणे बुद्धिपरता आत्मा धनंजया । जाणूनि मग मारीं या । वैरिया कामातें ॥ २९ ॥ ज्ञानाचें श्रेष्ठपण । प्रतिपदीं आपण । बोलोनि ह्मणे ब्रह्म सगुण । कीं तें तूं जाण अर्जुना ॥ ३० ॥ चतुर्थी "तद्विद्धि प्रणिपातेन" । या श्लोकें जगज्जीवन । ह्मणे संतांपासूनि तें ज्ञान । जाण अर्जुना ॥ ३१ ॥ षष्ठाध्यायांत लक्षण । योगाचें बोलिला कमलेक्षण । आणि पूर्वाध्यायांत समपण । आपलें जाणशील ऐसेंचि बोलिला ॥ ३२ ॥ कीं आतां सांगतों परोक्ष । हेंचि होईल अपरोक्ष । जेव्हां पुसतील तूं दक्ष । ब्रह्म कैसें ह्मणोनि हा भाव ॥ ३३ ॥ यांत तत्त्वसाक्षात्कार अपरोक्ष । होय ऐसें न बोले अंबुजाक्ष । जें जें वदला तें तें परोक्ष । उपदेश अपरोक्ष हा नव्हे ॥ ३४ ॥ ब्रह्म अध्यात्मकर्मादि सात । शेवटीं सप्तमाध्यायांत । तेथेंही बोलिला भगवंत । मज ऐसें जाणती ह्मणोनी ॥ ३५ ॥ एवं च येथपर्यंत । जें जें बोलिला भगवंत । तें ऐकोनि जाला बुद्धिमंत । परि ब्रह्म अनुभवा न आलें ॥ ३६ ॥ शब्दपीयूषाची वृष्टी । मेघश्यामाच्या वाटल्या गोष्टी । ब्रह्म पहावें आत्मदृष्टीं । हे अपेक्षाच उपजेना ॥ ३७ ॥ ह्मणोनि ब्रह्म अध्यात्म इत्यादि रीति । भक्त सप्तप्रकारें जाणती । हें चमत्कारें बोलिला श्रीपती । कीं प्रश्न अर्जुनें येथें करावा ॥ ३८ ॥ कीं या सातां प्रकारांतें । अर्जुन नेणेचि तो आपणातें । प्रश्न करील मग तयातें । या मिसें सांगावें अपरोक्ष ॥ ३९ ॥ सहज बोलतां ब्रह्मस्थिती । तरी प्रश्नापेक्षा होती अथवा न होती । ब्रह्म अध्यात्मादि सुकृती । जाणती ह्मणूनि बोलिला ॥ ४० ॥ तरी कोण्याप्रकारें जाणती । हें पुसूं या कृष्णाप्रती । प्रश्नापेक्षा ये रीती । दाटूनि निर्मिली स्वयें येथें ॥ ४१ ॥ पान्हा दाटला स्तनीं । निद्रिता बाळातें जननी । पाजी दाटूनि उठवूनि । कृपाळु तैसा श्रीकृष्ण ॥ ४२ ॥ सांगों नये प्रश्नाविणें । तो तरी न करी प्रश्न आपण । या कारणें ब्रह्म सगुण । करी येथें चमत्कार ॥ ४३ ॥ कीं ब्रह्म जाणती सुकृती । तें ब्रह्म कैसें ये रीती । प्रश्न करील आपणाप्रती । येथें अर्जुन ॥ ४४ ॥ प्रश्न ऐसा करील पार्थ । तेव्हांच करावा तो कृतार्थ । हा संप्रदायपालनार्थ । उपाय करी जगद्गुरू ॥ ४५ ॥ ऐसें बोलोनि सप्तम । अध्याय संपवी सर्वोत्तम । उगा राहे तों पांडवोत्तम । प्रश्न हा करी अर्जुन ॥ ४६ ॥

अर्जुन उवाच ॥ किं तद्ब्रह्म किमध्यात्मं किं कर्म पुरुषोत्तम।
अधिभूतं च किं प्रोक्तमधिदैवं किमुच्यते ॥ १ ॥
अधियज्ञः कथं कोऽत्र देहेऽस्मिन्मधुसूदन ।
प्रयाणकाले च कथं ज्ञेयोऽसि नियतात्मभिः॥२॥

॥ टीका ॥ अर्जुन ह्मणे " किं तद्ब्रह्म " । प्रश्न सातांत हा प्रथम । प्रश्ननिमित्त हे कीं पुरुषोत्तम । तें "ब्रह्म तद्विदुः कृत्स्नं" ह्मणोनि बोलिला॥४७॥ ब्रह्म जाणती केवळ । आणि तें ब्रह्मचि सकळ । दों प्रकारें तें सुकृती कुशळ । ब्रह्म जाणती ॥ ४८॥ पूर्वाध्यायांत अधोक्षज । बोलिला ऐसें प्रश्नबीज । त्यावरूनी कुंतीचा आत्मज । दों प्रकारें पुसतो तें ब्रह्म ॥ ४९ ॥ "किं तद्ब्रह्म " हीं चारी अक्षरें । वाखाणावीं दों प्रकारें । "किं ब्रह्म किं तत् " ऐसा आदरें । प्रश्न करितो येथें ह्मणावा ॥ ५० ॥ " किं ब्रह्म " ह्मणजे कैसें ब्रह्म। 'किं तत्' ह्मणजे कैसें तें जें तूं सर्वोत्तम । बोलिलासि संपतां सप्तम । " तद्विदुः कृत्स्नं " ह्मणोनी ॥ ५१ ॥ जें पूर्वी बोलिलें । त्यांत पुसतां जें उरलें । तें तत् शब्दें सूचविलें । कीं तेंचि सर्व ह्मणूनि बोलिलासि तें कैसें ॥ ५२ ॥ दों परी ब्रह्म जाणती । ऐसें बोलिला श्रीपती । दोहीं परी तें कैसें ऐसें त्याप्रती । पुसतसे श्रोताही ॥ ५३ ॥ ऐसेंच या प्रश्नाचें उत्तर । दों परी ब्रह्म सर्वेश्वर । बोलेल यालागीं ऐसा प्रकार । प्रश्नाचाही बोलावा ॥ ५४ ॥ व्याकरणसिद्ध अर्थ । प्रश्नबीजानुरूप बोले पार्थ । श्रीकृष्ण सूचवी तें कां व्यर्थ । टाकूनि वरिच्यावरी उडावें ॥ ५५ ॥ प्रश्न प्रथम ऐसा बरा । कैसें अध्यात्म हा दूसरा । कैसें कर्म हा तिसरा । प्रश्नबीजां सातांत ॥ ५६ ॥ आणि बोलिलें अधिभूत । तें कैसें सांग निश्चित । हा चौथा प्रश्न आणि अधिदैवत । कैसें बोलिजेतें हा पांचवा ॥ ५७ ॥ सहावा प्रश्न ऐसा । कीं अधियज्ञ एथें या देहीं कैसा । एथें कांहीं समजोनिसा । अर्जुन पुसे ॥ ५८ ॥ साधियज्ञ ह्मणजे अधियज्ञासहित । मज अधिदैवा जाणती ह्मणूनी भगवंत । बोलिला इतकेंचि ऐसियांत । अधियज्ञ देहीं आहे ऐसें समजला ॥ ५९ ॥ तरी हा संवाद सन्मुख । बोलतां हस्त नेत्र मुख । तदनुरूपें चेष्टतां अंतर्मुख । बुद्धि अर्थी होतसे ॥ ६० ॥ अधिभूतासह जाणती निपुण । ऐसें बोलतां ब्रह्म सगुण । हातें करूनी दाखवी खूण । देहाकडे अर्जुनाच्या ॥ ६१ ॥ आणि ह्मणतां साधियज्ञ । हात आपणाकडे सर्वज्ञ । दावितां समजला श्रोता अभिज्ञ । कीं अधियज्ञ हा स्वयें श्रीकृष्ण ॥ ६२ ॥ अधिदैव मी त्या मातें जाणती ह्मणे । परि दावितां नये

त्याचे खुणे । बिंबात्मता समजे तोचि जाणे । प्रतिबिंबचैतन्या तयातें ॥ ६३ ॥ एवं साधिभूत ह्मणतां देहासहित । जें काय असेल अधिदैवत । त्यातें जाणत असतील आणि निश्चित । अधियज्ञ हा स्वयें श्रीकृष्ण ॥ ६४ ॥ कीं मी अधियज्ञ त्या मजसहित । अधिदैवातें जाणती हें भगवंत । खुणेनें दावितो अत्यंत । स्पष्ट उघडूनी ॥ ६५ ॥ अधिदैव अधिभूतासहित । ह्मणतां देहाकडे दाविला हात । तेव्हां समजला कीं अधिदैव याच देहांत । असेल जे रीती असेल ॥ ६६ ॥ कीं अधिभूत ह्मणतां हात । देहाकडे दावितो भगवंत । अधिदैव नसतां या देहांत । या देहासहित कोठें ह्मणूनि जाणावा ॥ ६७ ॥ देह देहापरता न दिसे । ऐसिया देहासहित जेव्हां गवसे । तेव्हां जाणावें कीं वसे । अधिदैव कोण तो याच देहांत ॥ ६८ ॥ आणि हा अधियज्ञ आपण । यासहित त्या अधिदैवाची खूण । जाणती तेव्हां निपुण । तेव्हां हाही असेल याच देहांत ॥ ६९ ॥ कीं हा जरी या देहीं नसे । तरी देहीं यासहित कैसें । अधिदैव जाणती ऐसें । तर्क करूनि पुसे ह्मणावा अर्जुन ॥ ७० ॥ ऐसें न ह्मणतां या देहीं । मी अधियज्ञ आहे हें कांहीं । प्रश्नबीज बोलतां नाहीं । श्रीकृष्ण बोलिला ॥७१॥ "साधियज्ञं च ये विदुः" ह्मणोनी । ह्मणतां या देहीं अधियज्ञ ये रीती करूनी । न समजतां "अधियज्ञः कथं कोत्र देहेस्मिन्" ऐशा वचनीं । कैशावरूनि हा पुसे ॥ ७२ ॥ एवं करादिसंकेत । दाविता जाला श्रीनिकेत । त्यावरूनि ह्मणावा पांडुसुत । "अधियज्ञः कथं कोत्र देहेस्मिन्" ह्मणुनी पुसतसे॥७३ ॥ तरी हे गोष्टी त्यातें समजली । समजोनि मागुती कां पुसिली । शंका ऐशी उपजली । तेव्हां न घडे ह्मणावा जरी हा अर्थ ॥ ७४ ॥ तरी करिती या शंकेचा परिहार । अर्जुनप्रश्नशब्दाचे चमत्कार । कीं अधियज्ञ कोण कैसा हा प्रकार । सांग अजी मधुसूदना ॥७५॥ कीं देहीं अधियज्ञ आहे ये रीती । समजलों जी श्रीपती । तथापि शंका उपजली चित्तीं । अधियज्ञ कैसा या देहीं ह्मणोनी पुसतो हा भाव ॥ ७६ ॥ ब्रह्म कैसें अध्यात्म कैसें । कर्म कैसें अधिभूत कैसें । अधिदैव कैसें ह्मणवूनि ऐसें । येथवरी पुसे कैसें कैसें ह्मणूनि इतकेंचि ॥७७॥ अधियज्ञ कैसा कोण । येथें देहीं याच देहीं ह्मणूनि बोले निपुण । भाव कीं तूं ह्मणसी तो आपण । हें कैसें घडे ॥ ७८ ॥ कीं तूं मधुसूदन । ज्याणें केलें मधुदैत्यहनन । तोचि तूं यदुनंदन । अवतरलासि या रूपें ॥ ७९ ॥ जेथें तेथें रूपवंत । तूं सगुण भगवंत । निर्गुण ह्मणों तरी तें अत्यंत । निर्धर्म धर्म कोणी त्याला लागेना ॥ ८० ॥ अधियज्ञ यज्ञाचा अधिष्ठाता । तो

निर्गुण नव्हे कीं ते उगीच सत्ता । सगुण तूं मधुदैत्यहंता । तो कैसा देहवंत या देहीं ॥ ८१ ॥ या रूपें मधुसूदना । या देहीं कैसा तूं हें कळेना । या कारणें यदुनंदना । तो कोण ॥ ८२ ॥ "कथं कोत्र देहेस्मिन्मधुसूदन" । कैसा कोण येथें देही याच देहीं ह्मणे अर्जुन । येविषयींच अत्यंत शंकित मन । दाखवी या प्रश्नशब्दप्रवहांत ॥ ८३ ॥ येथें देहीं याच देहीं । आश्चर्य सूचवी तिन्ही शब्दींही । कीं माझिया मतें घडत नाहीं । कीं या देहीं ह्मणावास तूं अधियज्ञ ॥ ८४ ॥ अत्र ह्मणजे येथें या प्रसंगांत । कीं या सातांत अधियज्ञ या देहांत । कैसा कोण आणि तूं भगवंत । ह्मणावा तरी देहांत याच तूं कैसा ॥ ८५ ॥ तूं वैकुंठीं अथवा जेथें । अवतरोनि फिरसी अससी तेथें । तो कोणे रीती येथें । ह्मणावयास या देहीं ॥ ८६ ॥ आणि मजसमोर दिससी । तो देहांत कैसा अससी । आणि याच देहीं निघालासी । श्रीकृष्णा काय तूं ॥ ८७ ॥ ऐसें मानूनि नवल । अर्जुन बोलिला हे बोल । भावार्थ त्यांत अत्यंत खोल । ये रीती ॥ ८८ ॥ कीं ऐको न जाणे निर्गुण । आणि अवतरतो तो हा कृष्ण सगुण । कीं युगायुगीं अवतरतो आपण । हें चतुर्थी येथें श्रीकृष्ण बोलिला ॥ ८९ ॥ तिसरें व्यापक सगुण । तें न कळे कळेना जों निर्गुण । तें कळेल आतांच जेव्हां खूण । कळेल अपरोक्षें ब्रह्मात्मतेची ॥ ९० ॥ " किं तद्ब्रह्म " याचें उत्तर । " अक्षरं ब्रह्म परमं " ऐसें सर्वेश्वर । देतां अपरोक्षसाक्षात्कार । होतां व्यापक सगुणही कळेल ॥ ९१ ॥ कीं शुद्धसत्त्वें अनुभव । हेंचि सगुणत्त्वाचें वैभव । मग मीच अधियज्ञ ह्मणेल देव । संदेह उरेल मग कैंचा ॥ ९२ ॥ या देहीं अधियज्ञ कोण कैसा । प्रश्न अर्जुनाचा ऐसा । देहीं अधियज्ञ पुसावा हा ठसा । कोठूनि बैसला त्याच्या चित्तांत ॥ ९३ ॥ ऐसा करितां विचार । बोलणें लागलें हें गुह्यसार । श्रीकृष्ण वक्ता हें वारंवार । काय ह्मणवूनि बोलावें ॥ ९४ ॥ आतां अर्जुन सर्व जाणे । हें लोकांकारणें सांग ह्मणें । ऐसें ह्मणतां सद्य वाणे । अश्रद्धा सकळांसही ॥ ९५ ॥ लटिकाच पुसतो अर्जुन । लटिकेंचि त्याचें समाधान । त्यास गीतोपदेशें जालें ज्ञान । सर्व मिथ्या ॥ ९६ ॥ सप्तमपर्यंत परोक्ष । अष्टमीं तत्त्व अपरोक्ष । एकादशीं आरंभींच दक्ष । अर्जुनही बोलेल ॥ ९७ ॥ हा विचार सकळीं सांडिला । तो भगवंतें एथें मांडिला । उगाचि गीतासिंधु ओलांडिला । तरी त्यांतील रत्नें कैसीं सांपडती ॥ ९८ ॥ कूर्मरूपें मंदर । पाठी धरी सगुण सुंदर । अजितरूपें अमृतसागर । मथूनि रत्नें वो काढी ॥ ९९ ॥ असो आतां यावरी । सा-

तवा प्रश्न अर्जुन करी । कीं प्रयाणकाळीं कैसे परी । जाणिजेतोसि तूं देवा ॥ १०० ॥ कीं साहा प्रकारें तूतें । जाणती सुकृती जया चित्तें । नियत केलें त्या चित्ततें । सर्वदा जिहीं तुझ्या ठायीं ॥ १ ॥ नियतचित्त जे ऐसे असती । तेचि जाणती तूतें जी श्रीपती । पुन्हा प्रयाणकाळीं कोणे रीती । तूं तिहीं जाणिजेतोसी ॥ २ ॥ जाला असतां प्रयाणकाळ । त्यावरी मुक्तिदशेचीच वेळ । ते समयींही सगुणमुक्ति केवळ । जाणती हा अर्थ पार्थ नाहीं समजला ॥ ३ ॥ नेणोनि ऐसें हा प्रश्न केला । तरी याचें उत्तर देव त्याला । देईल कीं सगुण मोक्षांत मजला । जाणती न बुडे अनुभव हा त्याचा भाव ॥ ४ ॥ सातही प्रश्न ये रीती । आइकता जाला श्रीपती । अनुक्रमें उत्तरें त्याप्रती । देतसे प्रश्नानुरूप ॥ ५ ॥ प्रश्न सातांतही प्रथम । ऐसा कीं ' किं तद्ब्रह्म' । याच्या उत्तराच्या मिसें परम । स्वरूपसाक्षात्कार-उपदेश ॥ ६ ॥ ज्यानिमित्त प्रश्नबीज । पुर्वाध्यायांत अधोक्षज । बोलता जाला कीं अर्जुन मज । पुसो 'किं तद्ब्रह्म' ह्मणानी ॥७॥ त्या प्रश्नाचें उत्तर । व्यतिरेक अन्वयरीती परमेश्वर । बोलतो जगद्गुरुतर । षड्गुणसंपन्न ऐसें श्रीभगवान् ॥ ८ ॥

॥ श्रीभगवानुवाच ॥ अक्षरं ब्रह्म परमं स्वभावोध्यात्ममुच्यते ॥

॥ टीका ॥ जें नव्हे क्षर । तें ह्मणावें अक्षर । तें ब्रह्म ह्मणे गुरुवर । व्यतिरेक उपदेशी इतकियांत ॥ ९ ॥ कीं ब्रह्म तें अक्षर । ह्मणजे तें नव्हे जितकें क्षर । जडभाग तितका क्षर नश्वर[१] । आत्मा नव्हे ॥ ११० ॥ निषेधिला जड अनात्मभाव । तेव्हां क्षर नव्हे ह्मणोनि बोलिला देव । वाच्यांश निरसतां स्वयमेव । लक्ष्यांश आत्माच उरला ॥ ११ ॥ कीं शब्द अहंकारापासुनी । तोही निषेधिला जेथूनी । शब्द परतला तेथूनी । उरलें निःशब्द तें ब्रह्म ॥ १२ ॥ " यतो वाचो निवर्तंते " । हे श्रुति तें ब्रह्म बोलते । बुद्धि अनुभवें त्यास जाणते । तें ऐसें कीं तैसें न बोलवे ॥ १३ ॥ यालागीं तें अक्षर । ह्मणजे तें कीं जें नव्हे क्षर । हें व्यतिरेकमुखें उत्तर । दे शाखाचंद्रन्यायें श्रीगुरु ॥ १४ ॥ उपदेश अनिर्वाच्य आत्मयाचा । कैसी करूं शकेल वाचा । शब्द मूळ शाखेसहित जड वृक्षाचा । निषेध होतां उरे दिसे तोचि चिच्चंद्र ॥ १५ ॥ ह्मणूनि वाच्य जितकें । क्षर जड ह्मणावें तितकें । तें सर्व नव्हे ह्मणतां श्रीवत्सांकें । दाविलें निषेध शेषस्वरूप शिष्यातें ॥१६॥ ब्रह्म पुसों लागला । तो स्वयेंचि ब्रह्म होऊनि उरला । राजा स्वप्नीं राजद-

---

१ नाशवंत, नश्वर.

र्शना गेला । जागा होतां राजा आपण ॥ १७ ॥ नवल गुरुराजवाणी । नवल गुरुराज अभय वाणी । नवल गुरुरायाची करणी । कीं ब्रह्मचि करी जीवातें ॥ १८ ॥ लोहास लागे परिस । मग काळिमा कैंची तयास । गुरुकृपा होतां जीवास । जीवत्व कैंचें ॥ १९ ॥ लोहत्व करूनि दूरी । परिस लोहास सोनें करी । परी देऊं शकेना सरी । आपुली तया ॥ १२० ॥ कीं लोहांतराचें हेम । करूं न शके परिसासम । जीव होय स्वयें ब्रह्म । ब्रह्म करी आणिकातें ॥ २१ ॥ काय वर्णवेल गुरुमहिमा । वेदास ज्याची वाणी सीमा । जें न बोलवे निगमा । तें निःशब्दशब्दें जो दावी ॥ २२ ॥ शब्द राहे शाखेवरी । दृष्टि चंद्रातें धरी । श्रीगुरुरूपी ऐसा हरी । शब्दें दावी निःशब्द ॥ २३ ॥ शाखेवरी चंद्र पाहे । ह्मणतां शब्द शाखेवरीच राहे । पुढें काय खूण आहे । कीं तेथें चंद्रमा सांगावा ॥ २४ ॥ गळे जें अक्षर । तेणें दाविलें अक्षर । बाप समर्थ गुरुवर । शब्दें दावी निःशब्द ॥ २५ ॥ श्रीगुरुमहिमा अपार । वर्णितां ग्रंथ वाढेल फार । हे गीताटीका जो जो प्रकार । बोले तो तो महिमा तयाचाच ॥ २६ ॥ एवं निषेधूनि क्षर । उरला आत्मा तो दाविला अक्षर । आणि 'किं तद्ब्रह्म' याचें दिधलें उत्तर । कीं हें अक्षर अगा ब्रह्म ॥ २७ ॥ क्षरभाग निषेधितां अनेक । कळलें अक्षर ब्रह्म एक । हा क्षराअक्षरांचा विवेक । व्यतिरेक बोध बोलावा ॥२८॥ नेणे आपणातें आपण । हें अविद्येचें होतें आवरण । याच्या परिहाराचें कारण । व्यतिरेकबोध हा केला ॥२९॥ ब्रह्म ह्मणतां अक्षर । तें अक्षर कळलें निषेधितां क्षर । भगवत्कृपा पात्र चतुर । ब्रह्मात्मखुणे तें पावला॥१३०॥परि क्षरभाग जड निषेधिला । तो दृश्यत्वें दिसों लागला । ह्मणोनी नाहीं बिंबला अद्वैतबोध ॥३१॥ बुद्धि घेऊनि इंद्रियविकार । देखे जडभाग नानाकार । हा जो अविद्येचा प्रकार । विक्षेप ह्मणावें यालागीं॥३२॥या विक्षेपाचा परिहार । कीं सोनेंचि दिसे अलंकार । ऐसें ब्रह्मचि दिसे नानाकार । तो अन्वयबोध बोलावा ॥ ३३ ॥ या दोंपरी ब्रह्म जाणे । त्यातेंचि अद्वैत बोध बाणे । यालागीं सप्तमीं कृष्ण ह्मणे । कीं ब्रह्म जाणती । दोंपरी ॥ ३४ ॥ ब्रह्म जाणती सुकृती । आणि तेंचि सर्व ऐसें जाणती । हें प्रश्नाचें बीज श्रीपती । सप्तमीं शेवटीं बोलिला॥३५॥तदनुरूप प्रश्नही जाला। प्रश्न दोंश्लोकीं तो वाखाणिला । तदनुरूप कृष्णही बोलिला । "अक्षरं ब्रह्म परमं" ह्मणोनी॥३६॥यांत हा 'अक्षरं ब्रह्म' हें एक । उत्तर देतां उपदेशिला व्यतिरेक । आतां एक तेंचि अनेक । समजे ऐसें परमशब्दें उपदेशितो ॥३७॥ " अक्षरं ब्रह्म परमं " ह्मणोनी ।

यांत दीधलीं उत्तरें दोनी । व्यतिरेक 'अक्षरं ब्रह्म' येणें करूनी । परमश-ब्दें अन्वय आतां दावितो ॥ ३८ ॥ अक्षर ह्मणतां निषेधिलें क्षर । कीं सोनें नव्हे कुंडलाकार । जे अलंकार होऊनि निर्विकार । त्या आकारांत तें परम ॥ ३९ ॥ परम तंतु पटीं । परम माती घटीं । परम सोनें ज्याणें गो-मटीं । दिसती भूषणें ॥ १४० ॥ "तद्विदुःकृत्स्नं" ह्मणोनी । प्रश्नबीज या भावें करूनी । सप्तमीं बोलिला त्यावरूनी । परम शब्दें क्षरांतही दांखवी ब्रह्म ॥ ४१ ॥ सर्व तें ब्रह्म जाणती । कीं कारण कार्यांत पाहती । कार्याहूनि परम ह्मणती । कारणातें ॥ ४२ ॥ तंतु रूपातें न सोडी । जे ऐसी पासोडीची दुसोडी । ते दावितां पासोडी । लटकी होऊनि तंतुचि दिसे ॥ ४३ ॥ पटांत तंतु परम । तैसें जडीं ब्रह्म । तंतुचि पट तैसें स्थावरजंगम । ब्रह्म सकळ ॥ ४४ ॥ प्रथम तंतुरूपें दिसे आत्मा । पटरूपें तेव्हां दिसे अनात्मा । परम या कारणें ह्मणे जगदात्मा । कीं जें माहीं त्यातें दावी आणि प्रकाशी तें पर-म ॥ ४५ ॥ सोनियाविण अलंकार । न दिसे असत्य आकार । तैसें ज्या-वीण चराचर । न दिसे परम कैसें तें नव्हे ॥ ४६ ॥ परि आधीं दिसे दु-सोडी । मग त्यास दावितां पासोडी । तींत परम ह्मणतां न सोडी । दृष्टि मग तंतूतें ॥ ४७ ॥ तैसें ओळखोनि अक्षर । आहे द्वैतरूपें क्षर । तो परम ह्मणतां सर्वेश्वर । ब्रह्मचि सर्वही तो देखे ॥ ४८ ॥ होती जाती तरंग आकार । ते आकार बोलावे क्षर । परि पाणी परम त्यांत तें अक्षर । आदिमध्यांतहीं तरंगीं जें ॥ ४९ ॥ मृगतृष्णा नीर । उपजे असे तें नासे क्षर । परम किरण सूर्याचे अक्षर । आदिमध्यांत त्या मिथ्या जलाचे ॥ १५० ॥ वेदीं इत्या-दि हे दृष्टांत । ते सूचवूनि भगवंत । परम शब्दें अनंत । अन्वय ऐसा उप-देशी ॥ ५१ ॥ ब्रह्म जाणती केवळ । मग तेंचि ब्रह्म जाणती सकळ । ऐसें बोलोनि घननीळ । व्यतिरेक अन्वय बोलिला सप्तमींच ॥ ५२ ॥ तरी तेव्हां होतें परोक्ष । अष्टमीं जालें अपरोक्ष । परम शब्दें समजला दक्ष । कार्य क्ष-रांत अक्षर कारण ॥ ५३ ॥ कार्य न दिसे कारणाविण । परम ह्मणतां कळ-ली खूण । दृष्टांतकोटी विचक्षण । समजला इतकियांत ॥ ५४ ॥ या दृष्टां-ताचे विचार । द्वितीयाध्यायटीकेंत निर्धार । जाले आसतां वारंवार । बो-लतां ग्रंथ वाढतो ॥ ५५ ॥ न कळे दृष्टांतावांचूनी । बोलावें अगत्य या गोष्टीवरूनी । कोण्ही कुयुक्ति चाळिती ह्मणोनी । पूर्वी सिद्ध केलेच हे दृष्टां-त ॥ ५६ ॥ प्रथम प्रश्न उत्तर । ऐसें देवूनी सर्वेश्वर । द्वितीयप्रश्नीं श्रीधर । आतां उत्तर देतसे ॥ ५७ ॥ अध्यात्मशब्दें स्वभाव । बोलिजे तो ह्मणे

देव । स्वभाव ह्मणिजे आपला भाव । उत्तर इतकेंचि परम शब्दासारिखें ॥ ५८ ॥ परम शब्दें करूनी । कार्य तितकें कारण ह्मणोनी । दाविलें तें स्वयें ज्ञाताच यावरूनी । पूर्वोक्त अद्वैत दृढ करितो ॥ ५९ ॥ कीं स्वर्वेचि आपण । या जगाचें उपादान कारण । स्वभाव ह्मणजे कार्यपण । आपलाचि भाव ॥ १६० ॥ ह्मणिजे दृश्य तितकें जग। तें आपणाचि सोनेंचि जेवीं नग। अलंकारीं सुवर्णाची झगमग । तैसा सर्वत्र आपण ॥ ६१ ॥ तेव्हां सर्वही आपण । कीं अलंकार तोही सुवर्ण । अध्यात्में बाणे अद्वैतपण । आपलें ऐसें पाहतां ॥ ६२ ॥ कारणचि कार्य आहे । ऐसें उगाचि जरी पाहे । द्रष्टा आपण राहे । द्वैत अवलंबूनी ॥ ६३ ॥ ह्मणूनि जो द्रष्टा आपण । तोचि जगाचें कारण । आपला भावचि कार्यपण । नग सोनेंचिही स्वभाव अध्यात्म ॥ ६४ ॥ एवं प्रथम प्रश्न उत्तर । तेथें ज्ञान जें द्विप्रकार । तेंचि अध्यात्म ज्ञानसार । आत्मप्रत्ययें अनुभवावें हा विशेष ॥ ६५ ॥ या ज्ञानाचा विचार । तोही ब्रह्मीं हेमीं अलंकार । शेवटीं हाचि निर्धार । कीं ब्रह्मचि अध्यात्मज्ञानहीं॥ ६६ ॥ अधिष्ठूनि आत्माच असे। ऐसें स्थावरजंगम दिसे । अध्यात्म शब्दें होतसे । अर्थ ऐसा ॥ ६७ ॥ दृष्टि पावे जेथें । नगीं सोनेंचि दिसे तेथें । दार्ष्टांतीं आत्माच एथें । जगीं जेथें मन पावे ॥ ६८ ॥ आत्माचि तें चित्स्वरूप । जो जडप्रकाशक स्वयंज्योति दीप । हा जो अनुभवाचा प्रताप । याला ह्मणावें अध्यात्म ॥ ६९ ॥ जडीं चैतन्य मात्र स्मरे । तेव्हां आपण वेगळा उरे । आणि सर्व आपण ऐसें स्फुरे । तें अद्वैत अध्यात्म बोलावें ॥ १७० ॥ यालागीं जाणती ब्रह्म । आणि जाणती सर्व तेंचि परम। तथापि जाणती अध्यात्म। या विशेषें ऐसें बोलिला॥७१॥ आतां तृतीय 'प्रश्न किं कर्म' । त्यास उत्तर कर्मही ब्रह्म । हें समजावया गुह्य वर्म । सर्व कर्म ज्यांत तें बोलतो उत्तरार्धें ॥ ७२ ॥

॥ उत्तरार्ध ॥ भूतभावोद्भवकरो विसर्गः कर्मसंज्ञितः ॥ ३ ॥

॥ टीका ॥ भूतें आणि भूतांचे भाव । या सकळांचा जो उद्भव । उद्भव ह्मणजे ज्यापासूनि उत्कर्षें संभव । ह्मणजे कारणसमुदाय त्यांचा ॥ ७३ ॥ ऐसा कारणसमुदाय उद्भव । त्याही उद्भवातें करी जो स्वयमेव । विसर्ग ह्मणूनि त्याचें नांव । कर्मसंज्ञा तयाला ॥ ७४ ॥ भूतें हींच पंचभूतें । भाव ह्मणावें भूतांश देहातें । उद्भव बोलिजे कारणातें । या सर्वांचिया ॥ ७५ ॥ त्या उद्भवातें निर्माण करी । विसर्ग ह्मणे त्यातें हरी । गहन भावें वैखरी । चाली ऐशी ये स्थळीं ॥ ७६ ॥ त्यास ह्मणावें कर्म ।

तें कर्म जाणावें ब्रह्म । कीं सर्व ब्रह्म हा अवगम । पूर्वींच बोलिला ॥ ७७ ॥ यांत सर्वही कर्म आटे । आणि कर्म पाहतां ब्रह्म वाटे । कीं कार्य तितकें ऐक्यें भेटे । कारणासी ॥७८॥ कर्म ह्मणावें विसर्गातें । विसर्ग तो जो करी उद्भवातें । उद्भव ह्मणावें उपजण्यातें । देहाच्या आणि भूतांच्या कारणांच्या ॥ ७९ ॥ विसर्ग आणि उद्भव । अर्थ एक भिन्न नांव । तेव्हां उद्भवास उद्भव करी ऐसें देव । सर्वज्ञ अयुक्त कां बोलेल ॥ १८० ॥ विविध सृजी जग । अनादि सृष्टिकाळ तो विसर्ग । निमित्त कारण जगाचें श्रीरंग। बोले यथार्थ हा अर्थ ॥ ८१ ॥ कुंभार आणि माती । घटासि दोनी कारणें असती । त्यांत निमित्तकारण बोलती । कुंभारातें ॥ ८२ ॥ कराया मृत्तिकापात्र । कुंभार होतो निमित्तमात्र । माती न सोडी सर्वत्र । उपादान कारण ते ह्मणावी ॥ ८३ ॥ ब्रह्मीं अनादि सृष्टीची वेळ । तेव्हां पहिला प्रगटतो काळ । महत्तत्त्वादि कारणें तत्काळ । उपजती ॥ ८४ ॥ पंचभूतांपासूनि ज्याचा संभव । भूतांश हे देह जे ह्मणावे भाव । उत्पन्न होती हे सर्व । त्या महदादिकांपासनी ॥ ८५ ॥ देह भूतांचे होती । त्या भूतांची महदादिकांपासूनि उत्पत्ती । उद्भव शब्दें श्रीपती । सूचवी महदादिकारणांतें ॥ ८६ ॥ देहाचीं कारणें भूतें । त्यांचा उद्भव ह्मणावें त्याच्या कारणातें । तें महदादिकें त्यांतें । करी विसर्ग ह्मणजे सृष्टिकाळ॥ ८७ ॥ त्यास ह्मणावें कर्म । कीं त्यामुळें सर्व क्रिया धर्म । आटलें कर्माकर्म विकर्म । जीवींचें सामर्थ्यें ॥ ८८ ॥ कीं जीव कर्मानुसार । रचे पंचभूतांचें शरीर । आणि देहयोगें जोडती संस्कार । पुढें कर्में होती तदनुरूपें ॥ ८९ ॥ एवं कर्म विसर्गपर्यंत गेलें । यांत जीव काळ ईश्वर कर्तृत्वही आलें । तें ब्रह्मीं पाहतां जालें । किरणीं जैसें मृगजल ॥ १९० ॥ किरणचि तें मृगजल । चलन तरंगांचें तेंही जल । उपजणें अलंकारांचें तेंही केवळ । सोनेंचि ज्याविण किमापिही नसे तयांत ॥ ९१ ॥ तीं प्रश्नांचें उत्तर । या श्लोकीं देता जाला सर्वेश्वर । उरले चार त्यांत जगदाधार । तीनी उत्तरें देतसे या श्लोकीं ॥ ९२ ॥

॥ श्लोक ॥अधिभूतं क्षरो भावःपुरुषश्चाधिदैवतम् ।

॥ टीका ॥ अगा अधिभूताचा अर्थ । प्रश्न तुझा चतुर्थ । कीं क्षररूप भावमात्रचि यथार्थ । अधिभूत तूं जाण ॥ ९३ ॥ ब्रह्म ह्मणतां अक्षर । दृश्य तितुकें कळलें क्षर । क्षर ह्मणजे नश्वर। नाशवंत ॥ ९४ ॥ नव्हे क्षर तें अक्षर । ऐसें ब्रह्म ह्मणतां कळलें क्षर । परि जरी क्षरशब्दें नश्वर।

कळलें तेथेंचि अर्जुना ॥ ९५ ॥ पुन्हां बोलणें यास्तव । कीं अधिभूतांसहित अधिदैव । जाणावें ह्मणोनि बोलिला देव । प्रश्नबीज सप्तमीं बोलतां ॥९६॥ तरी अधिदैव अधिभूताहूनी । विलक्षण प्रतिबिंबांश ह्मणोनी । हें बोलतो सूचवूनी । जें स्पष्ट पंचदशीं बोलेल ॥ ९७ ॥" द्वाविमौ पुरुषौ लोके " या श्लोकें करूनी । क्षर सर्व भूतें आणि कूटस्थ अक्षर ह्मणोनी । पुढें बोलेल तें येथें सूचवूनी । अधिभूत अधिदैवशब्दें बोलतसे ॥९८॥ ब्रह्म अक्षर कीं जें नव्हे क्षर । प्रतिबिंबांशही ह्मणावा अक्षर । त्यासारिखें नव्हे शरीर । अधिभूत जो क्षरभाग ॥९९॥ यालागीं अधिभूत क्षरभाव । आणि पुरुष ह्मणावा अधिदैव । पंचदशीं यालाचि देव । ह्मणेल कूटस्थ ह्मणोनी ॥ २०० ॥ आणि अधिभूतास सर्वेश्वर । ह्मणेल कीं क्षर नश्वर । यालागीं येथें जगदाधार । ह्मणे अधिभूत क्षर भाव ॥ १ ॥ आणि नश्वर तितुकें क्षर । ब्रह्म तें नित्य अविनाशी अक्षर । दोहींस ऐक्य न घडे पामर । ह्मणती तेही शंका हरीतसे ॥ २ ॥ उगेंच क्षर अधिभूत । येथें न ह्मणोनि अच्युत । क्षरभाव ह्मणतां अत्यंत । गहन भाव या भावशब्दीं दाखवी ॥ ३ ॥ कीं भाव भास मात्र क्षर । वस्तुतः आहे ब्रह्म अक्षर । कीं स्त्रीभाव दावी नर । क्षरभाव भासमात्र तो ह्मणावा ॥ ४ ॥ नाचतां नाचतां नट । पदर करी उत्तरीय पट । स्त्रीभाव दावूनी निपट । पुरुषभाव दावितां नासे तो भाव ॥ ५ ॥ सुवर्णांत जो अलंकार । नश्वर ह्मणावा तो आकार । भाव आकार भिन्न प्रकार । शब्द दीसती परि अर्थ एक ॥ ६ ॥ तरंगांचा आकार । तो भावचि ह्मणावा क्षर । तो भाव पावे जें नीर । तें नश्वर न ह्मणवे त्यासह ॥७॥अधिभूत क्षरभाव । या भावें ह्मणे देव । जयासहित जाणती अधिदैव । ह्मणूनि सप्तमीं बोलिला ॥ ८ ॥ एवं व्यापक जें ब्रह्म अक्षर । त्याचा भाव अधिभूत क्षर । यासचि ह्मणावें नवद्वार पुर । यांत वसे तो तोचि पुरुष अधिदैवत ॥ ९ ॥ आधिष्ठूनि सकळ अधिदैवतें । जो देहीं असे तयातें । अधिदैव ह्मणावें कीं सर्वांतें । जीववितो पुरुष हा जीव ॥ २१० ॥ कीं इंद्रियांचे देव । देहीं निघाले सर्व । तऱ्ही विना एक जीव । देह शवरूपें हा असे ॥ ११ ॥ आणि देव तेही । इंद्रियें वर्तविती जें कांहीं । ते शक्तीही त्यांस नाहीं । विना जीव ॥ १२ ॥ एवं जीवविती सकळां देहीं । यावांचूनि सर्वथा नाहीं । कीं व्यापक अक्षर ब्रह्म तेंही । क्षरभाव दावी शवाचाच ॥ १३ ॥ शव व्यापूनि तें असे । जाणें येणें त्याला नसे । बाहेर निघतां प्रवेशतां दिसे । पुरुष अधिदैव हाचि ॥ १४ ॥ " उत्क्रामंतं स्थितं वापि "

ह्मणोनी । पंचदशीं या श्लोकेंकरूनी । उत्क्रमण ह्मणिजे निघणें देह सांडूनी । "ममैवांशो" ह्मणूनि बोलिला त्यातेंचि ॥ १५ ॥ एवं व्यापकही तें न जीववी देहातें । चेतवूं न शके इंद्रियदैवतें । ह्मणूनि अधिष्ठूनि असे दैवतांतें । अधिदैवत पुरुष हा जीव ॥ १६ ॥ आणि इंद्रियदेवतासमूह । त्यांसही असती देह । त्या देहांस निःसंदेह । अधिदैव पुरुष जीववी ॥ १७ ॥ ऐसा पांचवा प्रश्न जाला । आतां अधियज्ञ कैसा कोण याच देहीं ह्मणोनी पूशिला । तो अधियज्ञ अनुभवें त्याला । सांगतो उत्तरार्धें करूनी ॥ १८ ॥

॥ उत्तरार्ध ॥ अधियज्ञो हमेवात्र देहे देहभृतांवर ॥ ४ ॥

॥ टीका ॥ "अधियज्ञोहमेव" । ह्मणजे अधियज्ञ मीच स्वयमेव । कीं अधिदैव मीच परि तो अंश जीव । स्वयेंचि देवाधिदेव मी अधियज्ञ ॥ १९ ॥ अत्र ह्मणजे येथें । या जगीं तूं पहासील जेथें । मी स्वयेंचि आहें तेथें । अधियज्ञ नामें ॥ २२० ॥ या देहीं तूं कैसा । आणि याच माझ्या देहीं कैसा ह्मणूनि ऐसा । अर्जुनें प्रश्न केला तैसा । बोलतो श्रीगुरू त्याप्रती ॥ २१ ॥ 'अत्र' या जगीं ह्मणूनि मागुती । देहीं ह्मणे श्रीपती । तें तुझ्या देहीं ह्मणूनि त्याप्रती । सूचवी येथें ॥ २२ ॥ परि वरकडा देहीं । अगा अर्जुना मी ऐसा नाहीं । प्रसन्न होऊनि जैसा कांहीं । देहीं तुझे मी असें ॥ २३ ॥ हा भाव दावी सर्वेश्वर । ह्मणे तो 'देहभृतांवर'। कीं सर्वा देहधारियांत श्रेष्ठतर । तूं अगा अर्जुना ॥ २४ ॥ गौरवितां एक अर्जुन । गौरविले सकळ भक्तजन । कीं प्रसन्न मी भवभंजन । तुह्मां भक्तांचिया हृदयांत ॥ २५ ॥ कळतां अधियज्ञशब्दार्थ । कळेल हे प्रसन्नता यथार्थ । यज्ञ ह्मणजे होमिला पदार्थ । अग्निच होय अग्नींत ॥ २६ ॥ तैसें सर्व कर्म जीव कर्म । ब्रह्मचि देखे सगुणसाक्षी सधर्म । अधिष्ठूनि जीवाचें कर्माकर्म विकर्म । ये रीती असे साक्षी अधियज्ञ ॥ २७ ॥ त्यांत इतराचें कर्म । उगेंचि पाहे फळ दे सर्वोत्तम । प्रार्थिल्यावीण कल्पद्रुम । फळ नेदी आपण न मागतां ॥ २८ ॥ आपुलाली शिदोरी । कल्पवृक्षातळीं जेविती जरी । तो नेदी लवणही परी । अलवण अन्नें जेवितां रडतही ॥ २९ ॥ जाणेल कल्पवृक्षपणें । आणि मागेल त्यासी काय उणें । भक्त श्रेष्ठ या गुणें । कीं जाणोन भक्ति त्याचीच त्यातें मागती ॥ २३० ॥ देवा नको विषयवासना । गोडी तुझीच लागो मना । तोडी सकळही कामना । दे भक्तीच तुझिया पायांची ॥ ३१ ॥ जे ऐसे मागती अभिज्ञ । त्यांस तैसेंचि दे कल्पवृक्ष सर्वज्ञ । ज्याच्या देहीं ऐसा अधियज्ञ । देहभृतांवर ह्मणावें त्यातेंचि ॥ ३२ ॥

अर्जुनालागीं या भावें । ऐसें कृपेनें देवें । आळविलें देवाधिदेवें । 'देह भृतांवर' ह्मणोनी ॥ ३३ ॥ ऐशीं साहा उत्तरें । दीधलीं कृपेच्या आदरें । आतां सप्तम प्रश्नाचेंही बरें । उत्तर देतो या श्लोकीं ॥ ३४ ॥

॥ श्लोक ॥ अंतकाले च मामेव स्मरन्मुक्त्वा कलेवरम् ।
यः प्रयाति स मद्भावं याति नास्त्यत्र संशयः ॥ ५ ॥

॥ टीका ॥ आतां अंतकाळींही नर । जो स्मरत मातेंचि कलेवर । सोडोनि जातो मृत शरीर । तो माझ्या भावातें पावतो ॥ ३५ ॥ येथें संशय नाहीं ह्मणे देव । कीं निश्चयेंशीं माझा पावतो भाव । कीं चतुर्भुज मी देवाधिदेव । तो तैसाच पावतो भाव माझा ॥ ३६ ॥ जाला असतांही प्रयाणकाळ । माझ्या अनुभवाचा सुकाळ । या भावें बोले सप्तमीं मेघनीळ । कीं "प्रयाणकालेपि च मां ते विदुः" ॥३७॥ हें तेथें पार्थ न समजला । ह्मणूनि प्रश्न ऐसा केला । कीं ते ज्ञानीच आणि तुजला । प्रयाणीं जाणती तें काय ॥३८॥ तें ये स्थळीं सूचविलें । माझ्या भावातें पावती ऐसें जेव्हां बोलिलें । कीं निर्गुणीं निर्गुणत्व मात्र उरलें । तो नव्हे हा मोक्ष ॥ ३९ ॥ हें ऐकोनि लाळ घोटी । गुदगुल्या होऊं लागल्या पोटीं । परि ह्मणी निर्गुण मोक्ष होय ऐसा किरीटी । संशय मानूं लागला ॥ ४० ॥ कीं कळलें जें निर्गुण । तें निर्गुणचि आपण । यावरूनि निर्गुणपण । मी बहुतेक मोक्षीं पावेन ॥ ४१ ॥ हा त्याचा संशय । दूरि होय ऐसा निश्चय । दाखवी कीं येथें नाहीं संशय । माझ्या भावातेंचि पावतो ॥ ४२ ॥ त्यास हेंचि कारण । कीं देह सोडितां सगुणमूर्तिस्मरण । ह्मणूनि मी जो साकार सगुण । त्या मातें स्मरत देह सोडावा ॥४३॥ या भावें ह्मणे देव । "अंतकाले च मामेव" । ह्मणजे मातें सगुणातें स्मरे तो मद्भाव । पावे येथें संशय असेना ॥४४॥ आतां याउपरी । श्लोक बोलेल जो हरी । तो कां ह्मणूनि तरी । पूर्वानुसंधानें निमित्त ऐसें तयाचें ॥ ४५ ॥ कीं ज्ञानावांचूनि नाहीं मुक्ति । त्यांत ज्ञान होऊनिही ज्यांस भक्ति । त्यांस सगुण मोक्षीं व्यक्ति । सगुणासारिखी निश्चित ॥४६॥ परंतु देहावसानीं । जरी सगुण स्मरत देह सोडी ज्ञानी । तरीच सारूप्य पावे ह्मणोनी । ज्ञानीही ध्याती सगुण श्रुति ह्मणे ॥ ४७ ॥ श्रुति ॥ यदा-पश्यत्पश्यते रुक्मवर्णं कर्तारमीशं पुरुषं ब्रह्मयोनिम् । तदा विद्वान्पुण्यपापे विधूय निरंजनः परमं साम्यमुपैति दिव्यम् ॥श्रुत्यर्थ॥ वाखाणिला अध्याय मागें चतुर्थ । तेथें विशद या श्रुतीचा अर्थ । बोलिला मुख्य हा इत्यर्थ । कीं सगुण ध्यातां परम साम्य सगुणाचें ॥ ४८ ॥ हेंचि बोलिलें सप्तमीं ।

विशद त्याच्याच प्रश्नमिसें अष्टमीं । बोलतो स्वयें स्वामी । वैकुंठींचा ॥४९॥ कीं स्मरत मातें सोडी शरीर । तो मद्भाव पावे नर । येथें संशय नाहीं ह्मणे सर्वेश्वर । संशय वाटतां अर्जुनातें ॥ २५० ॥ स्मरण तेथें निमित्त । कीं देहावसानीं मातें स्मरे चित्त । तरी माझें सारूप्य पावे निश्चित । मद्भाव ह्मणतां हें सूचवी ॥ ५१ ॥ कीं स्मरे जरी ज्ञानी । मद्भाव देहावसानीं । तरी मद्भावचि पात्रे ह्मणोनी । सिद्धांत केला ॥ ५२ ॥ कीं ज्ञान नाहीं त्याला । मोक्ष नाहींच बोलिला । आणि हा प्रसंग ज्याचा त्याला । ब्रह्म अध्यात्मादिकें ठाउकीं ॥ ५३ ॥ आतां मद्भाव ह्मणतां स्वरूपता । हाचि कां अर्थ तत्त्वतां । तरी पुढिल्या श्लोकीं अनंता । भावशब्दार्थ बोलणें असे हाची ॥ ५४ ॥ कां एथें नसे संशय । ह्मणूनि पूर्वश्लोकीं बोलिला निश्चय । तरी मनीं धनंजय । निःसंशय जालाचि नाहीं ॥ ५५ ॥ कीं देह सोडितां स्मरे यातें । तो पावेलचि याचि भावातें । ये विषयीं कांहीं मातें । प्रमाण न दिसे ॥ ५६ ॥ कीं जो सगुण । तो काय नव्हे निर्गुण । अलंकारीं सुवर्णाविण काय असे ॥ ५७ ॥ निर्गुणत्वही याचाच भाव । कीं निर्गुणचि हा देवाधिदेव । बहुतेक या भावेंचि बोलतसे देव । माझ्या भावातें पावे ह्मणोनी ॥ ५८ ॥ चुकोनिही जन्ममरण । मुक्तींत आत्मानंद स्फुरण । एव्हडें सभाग्यपण । अघटित अत्यंत वाटतें ॥ ५९ ॥ एथें नाहीं संशय । ह्मणूनि बोलिला निश्चय । तो निर्गुण प्राप्तीच्या विषयींच निर्णय । असेल दृढ केला ॥ २६० ॥ हा हृदयांतील भाव । जाणोनि देवाधिदेव । तो पुसतां स्वयमेव । पूर्वोक्त दृढ करीतसे या श्लोकीं ॥ ६१ ॥

॥ श्लोक ॥ यं यं वापि स्मरन् भावं त्यजत्यंते कलेवरम् ।
तं तमेवैति कौंतेय सदा तद्भावभावितः ॥ ६ ॥

॥ टीका ॥ अगा जो जो आणीकही भाव । स्मरत देह सोडी जीव । त्या त्याच भावातें तो पावतो ह्मणे देव । अनादिप्रवाह हा ऐसा ॥ ६२ ॥ अज्ञानी अथवा ज्ञानी । जें स्मरे देहावसानीं । रूप तेंचि पावे ह्मणोनी । स्मरे मद्भाव तो मद्भावचि पावतो॥६३॥हा अनादि प्रवाह । कधीं न मोडे हा निर्वाह । कीं जें आठवे सुटतां देह । त्या रूपातेंचि तो पावे॥६४॥ऐसीं अनादि सृष्टी । अचूक होय तैशा कितीएक या गोष्टी । अचूक होतीच लोक कष्टी । व्यर्थ होती कीं कां ऐसें ह्मणोनी ॥ ६५ ॥ बंध तो जो अज्ञान । मोक्ष तेव्हां जेव्हां ज्ञान । कर्म फलरूपें करी बंधन । ईश्वरीं अर्पितां तें चुके ॥ ६६ ॥ सृष्टि स्थिति संहार । प्रपंच हा वारंवार । ऐसीं होतो हे प्रकार । न मोडती

मोडिल्याही॥६७॥ तैसें हेंही न मोडे । कीं अंतीं स्मरण जें जें घडे । रूप तें तेंचि जोडे । प्रवाह हाही अनादि॥६८॥जो जें स्मरे तेचि गती । पावे या लागीं मातें स्मरती । ते माझ्याच भावातें पावती । नियम अनादि हा ऐसा॥६९॥ ज्या भावाचें स्मरण । त्या भावातें पावतो ह्मणतां खूण । अर्जुनास वाणली कीं रूप सगुण । भाव शब्दें पूर्वश्लोकीं बोलिला ॥ २७० ॥ हें ऐकोनि अर्जुन । पावला जरी समाधान । कांहीं एक शंकित मन । मागुतीं जालें ॥ ७१ ॥ कीं ज्यास निर्गुणमात्र उपासना । देहासावनीं त्याच्या मना । सगुण आठवे तरी त्या जना । सगुण मोक्ष नलगे तो होय कीं ॥ ७२ ॥ आणि ज्या ज्ञानियातें सगुणभक्ती । जे न अपेक्षिती निर्गुण मुक्ती । त्यांस लागे प्रवेशणें अव्यक्तीं । अंतीं अव्यक्त निर्गुणचि जरी आठवे ॥ ७३ ॥ कीं रूप स्मरतां पावे रूप । तरी निर्गुण स्मरतां निर्गुण स्वरूप । पावेच कीं ऐसा प्रतापें । मरणकाळींचिया स्मरणाचा ॥ ७४ ॥ आणि एका देवाचा उपासक । त्यास आठवे आणिक एक । तरी तो नव्हे ज्याचा सेवक । पावे तयातें ॥ ७५ ॥ इत्यादि शंका मनीं । ते सर्वसाक्षी जाणोनी । श्लोकचतुर्थचरणें करूनी । समाधान करितो ॥ ७६ ॥ ॥ चतुर्थचरण ॥ सदातद्भावभावितः ॥ ॥ टीका ॥ अगा तेंचि आठवे देहावसानीं । कीं सदा त्याच्या भावनें करूनी । चित्त रंगेल दिवसरजनीं । भलतें न आठवे ते वेळे ॥ ७७ ॥ भाव शब्दें भावना ह्मणजे ध्यान । ध्यान त्याचेंचि ज्याचें भजन । किंवा विषयप्रीति विषयचिंतन । तेंही ध्यान कीं आठवे तें रूप ॥ ७८ ॥ एवं ज्याची आवडी जया । तेंचि देहावसानीं आठवे तया । गतीही तेंचि धनंजया । आवडी ज्याची अत्यंत ॥ ७९ ॥ निर्गुणोपासका निर्गुण मुक्ती । सगुणमुक्ति ज्याला सगुणभक्ती । अन्यदेवताभक्तां व्यक्ती । त्याच देवाची ॥ २८० ॥ तैसाच ज्यास जो प्रिय । मनीं ध्यानीं दिसे तोचि विषय । त्याचेंचि त्याला स्मरण होय । प्राणप्रयाणीं ॥ ८१ ॥ भरत राजा विवेकी उदंड । ज्याच्या नांवें हें भरतखंड । तो हरिणशिशु आठवितां अखंड । हरिणचि अंतीं जाला ॥ ८२ ॥ इत्यादि भाव धरून पोटीं । तो कृष्ण ह्मणे अगा कीरिटी । देहावसानसंकटीं । जें स्मरे तेंचि रूप तो पावे ॥ ८३ ॥ कीं सर्वदा ज्याची भावना । ध्यान लागलें असे मना । तेंचि आठवे मग अर्जुना । देह सोडोनि पावे तें रूप ॥ ८४ ॥ तूं जालासि अपरोक्षज्ञानी । आतां भक्त माझा होऊनी । मज सगुणास पावेन ह्मणोनी । अपेक्षितोसि अत्यंत ॥ ८५ ॥ तरी सांगेन तें आइक । ह्मणूनि

आपला वेध उत्तमश्लोक । लागे ऐसा आणिक एक । श्लोक बोलतो याविषयीं ॥ ८६ ॥

॥ श्लोक पूर्वार्ध ॥ तस्मात्सर्वेषु कालेषु मामनुस्मर युध्य च ।

॥ टीका ॥ अर्जुना सदा ज्याचें स्मरण । तेंचि आठवे होतां मरण । देह सोडूनि तो आपण । पावे तयातें ॥ ८७ ॥ हें तों तुवां अर्जुना । ऐकिलें आणि बिंबलें मना । आतां माझ्या या वचना । दृढ धरीं हृदयांत॥८८॥ ज्ञानें पावोनिही मुक्ती । मुक्तींत घडे माझी भक्ती । जरी देह सोडोनि पावे व्यक्ती । माझी दिव्य ॥ ८९ ॥ त्यास हेंचि कारण । कीं सदा माझें अनुस्मरण । तरीच देहास येतां मरण । स्मरण माझें घडेल ॥ २९० ॥ स्मरणास कारण प्रीती । ज्याची प्रीति त्याची स्मृती । स्मृति ज्याची अंतीं गती । तेंचि त्याला ॥ ९१ ॥ तस्मात्कारण अर्जुना । अवघियाही काळीं पांडुनंदना । अरे मज भवभंजना । अनुस्मर प्रीतीनें हा भाव ॥ ९२ ॥ अगा माझी विस्मृतीच फटकाळ । पवित्रपणाचा दुष्काळ । माझें स्मरण तोचि सुकाळ । पवित्रपणा सर्वांचा ॥ ९३ ॥ चांडाळाचा स्पर्श जाला । गंगास्नान वर्ज त्याला । जो बोलेल या बोला । चांडाळ तोचि ॥ ९४ ॥ माझ्या स्मरणास काळ । कोणी एक फटकाळ । ऐसें नसे एकचि विटाळ । विस्मरणाचा होऊं नये ॥ ९५ ॥ काळ असो भलतसा । आपण असो जैसा तैसा । माझ्या स्मरणाचा वेध मानसा । लागला असो ॥ ९६ ॥ याभावें शेषशायी । ह्मणे सर्वां काळांचियाहि ठायीं । चित्त लावूनि माझ्या पायीं । स्मरे मातें ॥ ९७ ॥ माझ्या भक्ति नवविधा । स्मरणेंचि पावल्या जीवनसुधा । माझिया सर्वां भजनातें क्षुधा । अखंड माझिया स्मरणाची ॥९८॥ केंवी घडे श्रवणकीर्तन । अथवा पादसेवन अर्चन वंदन । दास्य सख्य आत्मनिवेदन । स्मरणावीण घडे कैसें परी ॥९९॥ विविध अन्न घृतपाचित । तरी वेगळेंही वाढिती घृत । स्मरण तैसें नवविधांत । जरी स्मरणें श्रवणादि भक्ति साधती ॥ ३०० ॥ देह असतांचि कौतुक । स्मरतां भृंग होतो कीटक । देह सोडोनि कांहीं एक । होणें स्मरणें नवल काय ॥ १ ॥ या भावें ह्मणे हरी । कीं सर्वकाळीं स्मरण करीं । पावों इच्छितोस जरी । माझिया भावा ॥ २ ॥ आयकोनि ऐसी गोष्टी । अर्जुन पावला परम तुष्टी । शरीर पावलें पुष्टी । तटतटी कवच सर्वांगीं ॥ ३ ॥ कृष्णाकडे पाहात असे । निर्गुण सगुण भिन्न न दिसे । सुवर्णावांचूनि केंवि गवसे । दृष्टीस मूर्ति सोन्याची ॥ ४ ॥ यथास्थित निर्गुणपण । दिसोनि दिसे मूर्ति सगुण । अनुभ-

वा आली खूण । निर्गुण सगुण ऐक्याची ॥ ५ ॥ उदकाचें द्रवत्व मृदुत्व । तेंचि गारेचें घनत्व कठिणत्व । तैसें चित्स्वरूपचि शुद्धसत्त्व । अवयवरूपें अलंकारासह दिसे ॥ ६ ॥ निर्गुणोपासकां नसे सगुण । परि सगुणभक्तां विना निर्गुण । न कळे सगुण मूर्तीची खूण । विना सुवर्ण न दिसे प्रतिमा सुवर्णाची ॥ ७ ॥ दृष्टीस न दिसे पाणी । तों प्रत्यय न उपजे गारपणीं । बुद्धि स्पर्शे निर्गुणीं । तेव्हां चक्रपाणि तीस कळे ॥ ८ ॥ ज्ञानियाचें स्मरण । निर्गुणेंचि सगुणमूर्तिस्फुरण । आत्मा निर्गुण अंतःकरण । देह जितांच पावे सगुणता ॥ ९ ॥ जळे मेण ओते रस । आयती मूर्ति पडतां मूस । देह पडतां मानस । भगवद्रूप करणेंचि नलगे ॥ ३१० ॥ निर्गुणीं होऊनि निर्गुण । त्या प्रकाशें पाहे मूर्ति सगुण । मनीं बाणली हे खूण । निर्गुण सगुण दोन्ही तोचि ॥ ११ ॥ ऐशा सुखें अर्जुन । पाहे दृष्टी कमलनयन । तल्लीन जालें मन । निजानंदीं ॥ १२ ॥ कृष्ण अर्जुनातें पाहे । कीं अर्जुन कृष्णाचि जाला आहे । तों प्रारब्ध त्याचें उभें राहे । कीं कौरववध राज्यभोग अदृष्टीं तयाच्या ॥ १३ ॥ प्रारब्धकर्माचा क्षय । भोगेंचि घडे हा निर्णय । जरी जाला धनंजय । कृष्णरूप ॥ १४ ॥ तीं प्रारब्धाचीं फळें । ईश्वर भोगवी आपल्या बळें । तीं तया समयांत सकळें । देखिलीं त्याच ईश्वरें अर्जुनाचीं ॥ १५ ॥ त्यास मूळ हें युद्ध । ज्या कारणें दोन्हीं दळें सिद्ध । आणि जें युद्ध वाटलें विरुद्ध । अर्जुनातें ॥१६ ॥ ते याच कृष्णाची करणी । दया वातली अंतःकरणीं । कीं अविद्या नाशूनि आपुल्या स्मरणीं । अपरोक्षानुभवें तो योजावा ॥ १७ ॥ जरी उगाच युद्ध करिता । तरी कां बोलणें लागतें अनंता । कां प्रगट होती गीता । नाव तारक जगाची ॥ १८ ॥ तो सत्यसंकल्प जाला । जेव्हां ग्रंथ येथपर्यंत आला । अपरोक्षानुभवें निवाला । तोही अर्जुन ॥ १९ ॥ ज्याच्या प्रसादें मोह गेला । अपरोक्ष साक्षात्कार जाला । आतां श्रीगुरूच्या कोणत्या बोला । शिरीं न वंदी तो शिष्य ॥ ३२० ॥ पूर्वी अर्जुना तया । युद्ध करीं ऐसें ह्मणावया । बोलणें लागलें देवराया । बहुतां परी ॥ २१ ॥ या समयांत जों पाहे । तों केवळचि आज्ञाधारक जाला आहे । ह्मणूनि एकचि गोष्टि बोलिला हे । कीं युद्धही करीं ॥ २२ ॥ सर्व काळीं मातें । स्मर आणि करीं युद्धातें । भोग पूर्वकर्माचा हा ऐसें त्यातें । अष्टादशीं स्पष्ट बोलेल॥ २३ ॥ " स्वभावजेन कौंतेय " । " निबद्धः स्वेन कर्मणा " ह्मणूनि निश्चय । बोलेल कीं करूं न इच्छिसी जें काय । तें करिसी प्रकृतीस वश होउनी ॥ २४ ॥ कीं तो निरूपणाचा

शेवट । आणि युद्धाचा काळ अति निकट । म्हणूनि हें रहस्य प्रकट । करी-ल तेव्हां ॥ २५ ॥ येथें निर्गुणीं मन । होउनियां तल्लीन । प्रेमें परिपूर्ण नयन । बैधले रूपीं आपुल्या ॥ २६ ॥ म्हणूनि मातें सर्व काळींहि स्मर । ऐसें बोलतांच जाला तत्पर । तों त्यास म्हणे सर्वेश्वर । कीं युद्धही करीं ॥२७॥ हे गोष्टी पडतां कानीं । आज्ञा शिरसा वंदूनी । युद्ध करावेंचि हें मनीं । धरिता जाला ॥ २८ ॥ परि जैशी मुलगी धाकुटी । सासरियां जाय अति संकटीं । ऐसा विठ्ठळ पोटीं । किरीटी जाला ॥ २९ ॥ हृदयांत भाव ऐ-सा । कीं होईल युद्धाचा वळसा । स्मरणभक्तीचा लाभ कैसा । घडेल तेव्हां ॥ ३३० ॥ मनीं काय काय भावना । दृढ जडती हें कळेना । देहावसानीं या भवभंजना । स्मरणें मग कैंचें ॥ ३१ ॥ हृदयांतील हा भाव । जाणोनि सर्वसाक्षी देव । भरंवसा देतो देवाधिदेव । या उत्तरार्धें ॥ ३२ ॥

॥ श्लोकोत्तरार्ध ॥ मय्यर्पितमनोबुद्धिर्मामेवैष्यस्यसंशयम् ॥ ७ ॥

॥ टीका ॥ अर्जुना घाबिरा जरी होसी । आगा तूं मातेंचि पावसी । मन बुद्धि जेव्हां अर्पिसी । माझ्या ठायीं ॥ ३३ ॥ मन आणि बुद्धि निश्चित । माझ्या ठायीं तुझीं अर्पित । तेव्हां मी जो भगवंत । त्या मातेंचि पावसी ॥ ३४ ॥ दृढ धरीं हा निश्चय । या गोष्टीस कांहीं नाहीं संशय । ऐसा करु-णावरुणालय । देताजाला भरंवसा ॥ ३५ ॥ इतकाच अर्धाचा अर्थ । परि कांहीं यांत भावार्थ । कृष्णेंचि दाविला तो यथार्थ । संक्षेपें तरी बो-लावा ॥ ३६ ॥ बुद्धि एकली अर्पित । होतां मनही निश्चित । अर्पित होणार भगवंत । मन बुद्धि दोन्हीं कां बोले ॥ ३७ ॥ मन राहेल वेगळें । म्हणतां चित्त काय न असेल निराळें । इंद्रियें अनर्थमूळें । तीं काय अर्पितें नसावीं ॥ ३८ ॥ तेव्हां कांहीं गूढ भाव । या गोष्टींत दावी देव । आणि तोचि देवाधिदेव । सूचवीहि ॥ ३९ ॥ कीं युद्ध होतां दारुण । लक्ष लक्षितां हाण-तां बाण । लक्ष लक्षा शरांचें उडाण । क्षणामाजीं ॥ ३४० ॥ होतां ऐसें रण । कैचें तेव्हां राहे स्मरण । हा तों मनाचा सहज गुण । कीं एक स्मरतां एक विसरावें ॥ ४१ ॥ परि जो मनीं स्वार्थ धरिला । आणि तदर्थेचि यत्न मांडिला । त्याच यत्नांत त्याला । तो स्वार्थही आठवतो काय सर्वदा ॥ ४२ ॥ ज्या राज्यानिमित्त रण । आरंभिलें अंगीकारूनि मरण । नसे तेव्हां त्या राज्यलाभाचें स्फुरण । ज्या कारणें हे प्रयास ॥ ४३ ॥ परि संस्काररूपें मनीं । राज्य प्राप्त हो म्हणूनी । गोष्टी जैसी असोनी । जरी न स्फुरे सर्वदा ॥ ४४ ॥ तरी बुद्धीचा निश्चय । कीं राज्यप्राप्ति आणि जय ।

हो ह्मणूनि तैसा आशय । भगवत्स्मरणीं असावा ॥ ४५ ॥ ऐसा अंतरीं आशय । तेंचि बुद्धि जो ऐसा निश्चय । जरी स्मरणास गोचर न होय । मन लोकधंद्याकडे लागतां ॥ ४६ ॥ ज्या गोष्टींत सुख आहे ह्मणोनी । बुद्धि असे निश्चय करूनी । मन चहूंकडेही भोंवोनी । मागुतीं तेथेंचि तें थारे ॥ ४७ ॥ प्रस्तुतीं ऐसा भाव । येथें दाखवी देवराव । कीं युद्धादिकर्मीं विसरे तरी ठाव । मनाचा आशयांत बुद्धीच्या ॥ ४८ ॥ कोणी स्वार्था आपलिया । विसरोनि बोलतां आठवी तया । तेव्हां तो आला ठाया । लोक ऐसें बोलती ॥ ४९॥ एवं बुद्धीचा निश्चय । तेथेंचि मन कल्पनामय । स्थिर होय हा निर्णय । अर्जुनातें कळावा ॥ ३५० ॥ एवंच निश्चय पोटीं । मन फिरोनि ये तेथें शेवटीं । मन बुद्धि दोनी यासाठीं । येथें बोले श्रीकृष्ण ॥५१॥ कीं बुद्धि निश्चयरूपिणी । ते अर्पिली ज्याच्या चरणीं । मन घालीच तेथें लोळणी । ओढोनि नेलें तरी परते तेथेंचि ॥ ५२ ॥ आणि रक्षील या निश्चयें शरण । जो ज्यास असेल त्याचे चरण । विसरला तरी मन स्मरण । संकटीं करील निश्चित तयाचें ॥ ५३ ॥ कीं तो रक्षील ह्मणोनी । असे बुद्धि निश्चय धरूनी । संकटीं मन त्यावांचूनी । स्मरेल कोणा आणिका ॥ ५४ ॥ तरी संकटांत थोर संकट । मरण येतां अति निकट । तेव्हां जो रक्षक उत्कट । स्मरेच मन तयातें ॥ ५५ ॥ तेधवां जें आठवे । तो तयातेंचि पावे । भगवत्स्मरणाची सवे । अगत्य असावी याकरितां ॥ ५६ ॥ ऐसा बुद्धीचा निश्चय असे । तरी मनातें स्मरण कां न गवसे । आणि जे सर्वदा स्मरती ऐसे । ते कां न पावती तयातें ॥५७॥ ह्मणूनि ह्मणे भगवंत । कीं मन बुद्धि माझ्याठायीं अर्पित । करीं ह्मणजे पावसी निश्चित । मातेंचि अगा धनंजया ॥ ५८ ॥ जीवाचा जाला धणी । मग काय चिंता आहे रणीं । तैसा भरंवसा अंतःकरणीं । धरिला अर्जुनें या गोष्टीनें ॥ ५९ ॥ कीं याच्या स्मरणें याला । पावेन ऐसा भरंवसा त्याला । होतां तो संशय उपजला । आज्ञा करितां युद्धाची ॥ ३६० ॥ कीं युद्धीं अंतःकरण । लागतां कैचें याचें स्मरण । स्मरणाभ्यास राहतां चरण । मरणकाळीं कां आठवती ॥ ६१ ॥ अंतकाळीं याचे चरण । आठवावयास जें कारण । युद्ध करितां तें स्मरण । न घडे संशय हा होता ॥ ६२ ॥ संशय होता अंतःकरणीं । याकरितां चक्रपाणी । संशय नाहीं ह्मणूनि वाणी । या अर्धश्लोकें बोलिला ॥ ६३ ॥ कीं मी तुझा संशय । जाणोनि तुझा आशय । संशय नाहीं ह्मणूनि निश्चय ।

बोलतां ऐसें हा भाव ॥ ६४ ॥ आतां यानंतर श्लोक । तो कां बोलेल उत्तम श्लोक । त्याचें निमित्त सुज्ञ लोक । परिसोत आधीं ॥ ६५ ॥ मोक्ष ज्ञानेंचि करूनी । त्यांत ज्ञान अपरोक्ष होउनी । जो तत्पर सगुण भजनीं । तो पावतो सगुण सारूप्य ॥ ६६ ॥ कीं सर्वकाळीं जें स्मरे । तेंचि देहावसानीं स्फुरे । निर्गुण स्मरतां निर्गुणचि उरे । सगुण स्मरतां सारूप्य ॥ ६७ ॥ परि देहांतीं स्मरे सगुणास । तोचि कीं ज्यास तोचि अभ्यास । ह्मणूनि पूर्वश्लोकीं अर्जुनास । स्मरण आपलें बोलिला ॥ ६८ ॥ परि हें मोक्षसाधन । न घडे विना निर्गुणात्मज्ञान । तें सोडोनि उगलें ध्यान । करितां पडे बहुत दूरी ॥६९॥ आत्मप्रीती सहज । तोचि आत्मा वाटे अधोक्षज । तरीच भक्ति निर्दोष निर्व्याज । आत्मसाक्षात्कार भजनींही ॥ ३७० ॥ हा सदा स्मरणभक्तियोग । घडे तरीच होतां कर्मज देहाचा त्याग । घडे स्मरणसंयोग । आत्मत्वें सगुण मूर्तीचा ॥ ७१ ॥ अर्जुनासही देवें । स्मरण सांगीतलें याचि भावें । कीं प्रारब्ध युद्धादि भोगावें । आणि मातें स्मरावें सर्वदा ॥ ७२ ॥ कीं बुद्धि माझे पायीं अर्पित । तरी मन विसरोनिही स्मरे निश्चित । ऐसें तुझें जेव्हां व्रत । तेव्हां निःसंशय मातेंचि पावसी ॥ ७३ ॥ त्या पावण्याचें निमित्त । देहावसानीं जरी स्मरे चित्त । जें सांगीतलें निश्चित । पुनः पुन्हा ॥ ७४ ॥ तें ऐसें स्मरण । कीं सगुणध्यानीं आत्मत्वस्फुरण । ह्मणूनि आतां विवरण । करीतसे या श्लोकीं ॥ ७५ ॥

॥ श्लोक ॥ अभ्यासयोगयुक्तेन चेतसा नान्यगामिना ।
परमं पुरुषं दिव्यं याति पार्थानुचिंतयन् ॥ ८ ॥

॥ टीका ॥ पुनःपुन्हा जे चित्तास । चिदात्मस्फूर्ती तो अभ्यास । एतद्रूप योग जो त्यास । अभ्यासयोग ह्मणावा ॥ ७६ ॥ ज्ञानी आणि सगुणभक्त । त्याणें त्या अभ्यासयोगें युक्त । चित्त करावें जें अनुरक्त । सगुणध्यानयोगीं ॥ ७७ ॥ तें चित्त ते चिदात्मस्फूर्ती सोडूनी । अन्यत्र न जाय ऐसें करूनी । त्या चिदात्मस्फूर्तीस घेउनी । ध्यावें परमपुरुषा सगुणातें ॥ ७८ ॥ चित्त जें जें स्मरे । तेथें चिदात्मत्व आधीं स्फुरे । परि अविद्यासंस्कारें नुरे । स्मृति ऐसी ज्ञानियासही ॥ ७९ ॥ यालागीं जो ज्ञानी भक्त । त्याणें अभ्यासयोगयुक्त । चित्त करूनि नित्य मुक्त । ध्यावा परमपुरुष त्या चित्तें ॥३८०॥ अविद्याकृत अशेष । तैसा नव्हे जो साकार पुरुष । जो परम आणि निर्दोष । दिव्य चित्स्वरूपरूप जो ॥ ८१ ॥ चराचर हीं चित्स्वरूप । परि जीव मानिती जडरूप । रज्जू न कळोनि आरोप । साच

मानिती सर्पाचा ॥ ८२ ॥ एथें तैसें कांहीं नसे । प्रत्यय निर्गुणाचाच गवसे । आकारकल्पना दिसे । जे ज्ञानें सगुण पाहती त्यांतें ॥ ८३ ॥ ज्या अनुभवें ईश्वर । कल्पितो आपुलें शरीर । त्याचि अनुभवें ध्यातां सादर । सगुण साक्षात्कार ध्यान तें ॥ ८४ ॥ ज्यास नाहीं ज्ञान । दूरि पडिलें त्याचें ध्यान । साक्षात्कारें चिंतन । तें ऐसें ॥ ८५ ॥ ह्मणूनि अनुभवैक्य सेव्य । परमपुरुष जो दिव्य । तो ऐसा ह्मणूनि ध्यान कर्तव्य । ऐसेंचि त्याचें तो बोले ॥ ८६ ॥ कीं चित्त अभ्यास योगें करूनी । मुक्त ह्मणजे चित्स्वरूप स्मरोनी । दिव्य परमपुरुष कल्पूनी । ध्यावा चित्तें ऐशिया ॥ ८७ ॥ ऐसेंचि करितां चिंतन । जो देह सोडी करी गमन । तो पावे तया जो कमलनयन । परमपुरुष दिव्य वैकुंठनाथ ॥ ८८ ॥ मज पावसी ह्मणोनी । बोलिला पूर्वश्लोकें करोनी । तो ऐसा ध्यातां आणि देहावसानीं । ऐसें चिंतितां पावसी हा भाव ॥ ८९ ॥ ज्ञानी जाणोनि निर्गुण । ध्याती भक्तियोगें सगुण । तिहीं ऐसें ध्यावें हे खूण । या श्लोकीं श्रीकृष्ण बोलिला ॥ ३९० ॥ जे या गीतेचा अर्थ । जाणों इच्छिती यथार्थ । आणि जे अनुभवी कृतार्थ दोघांस संमत अर्थ हा ॥ ९१ ॥ व्यतिरेक मात्र जाणती । अन्वयें जडही चैतन्य ऐसें नेणती । ते न समजोनि एथें ह्मणती । कीं निर्गुणें ध्यावें सगुण हें न घडे ॥९२॥ उगेंचि मानिती मिथ्या जग । परि नगीं सुवर्ण देखोनि नग । मिथ्या ह्मणावी झगझग । अंतर्बाह्य कनकचि तें साच ॥९३॥ दिसे सोन्याची झगझग । तेव्हां दिसे मिथ्या नग । तैसें चैतन्य देखोनि जग । मिथ्या ह्मणती ते ज्ञानी ॥ ९४ ॥ तरी काय डोळां दिसतें । इतकेंचि बोलती नुसतें । नगीं सोनें तैसें गवसतें । नेत्रीं आणि रूपीं हें कळेना ॥ ९५ ॥ गार दृष्टीस वाटे दगड । जलत्व समजे जिव्हाचि सुघड । इंद्रियांस वाटे प्रचंड जड । बुद्धि ब्रह्मत्वें देखे त्या इंद्रियांसहित ॥९६॥ जे हा अनुभव नेणती । ते हे ध्यानकळा काय जाणती । आत्मांश मात्र कळला ते ह्मणती । ऐसें ध्यान केंवी घडे ॥ ९७ ॥ ऐसियांस या ध्यानगोष्टी । न कळती कीं एथें न पावे दृष्टी । आणि निखळ निर्गुणोपासक कष्टी । होती एथें जे साभिमान ॥ ९८ ॥ कीं ज्ञानियास पाहिजे निर्गुण । त्यास कां ह्मणती ध्यान सगुण । त्यांत जे निरभिमान ते हे खूण । जाणती अन्वयबोधें करून ॥ ९९ ॥ कीं विश्व जें त्रिगुण । तेंही तरंगनीरन्यायें[1] निर्गुण । शुद्ध सत्त्वमय सगुण । ध्यान कां न घडे ऐसें तयाचें ॥ ४०० ॥ परि दिव्य परमपुरुष ।

---

१ जलतरंगन्याया

या श्लोकीं तो निर्गुण निर्विशेष । सगुण कां ह्मणावा ह्मणोनि दोष । हेंचि ती लटिके वरी ॥ १ ॥ परंतु ते निरभिमान । मागुती पावतील समाधान । जेव्हां पूर्वापर अनुसंधान । पाहती बरें ॥ २ ॥ कीं सातांपरी भक्त जाणती । सप्तम संपतां ह्मणे श्रीपती । त्यांत सप्तमप्रश्नीं बोलतां गती । ग्रंथ येथवरी चालिला ॥३॥ देह सोडोनि जातो । तो तेचि गति पावतो । कीं देह सोडितां जें स्मरतो । देह सोडोनि जातो त्याप्रती ॥ ४ ॥ येथवरी येचि रीती । मोक्ष बोलिला जगत्पती । विचारितां हे पूर्वरीती । निर्गुण मोक्ष हा न घडे ॥ ५ ॥ देह सोडोनि जातो । कैवल्य मोक्ष न घडेच तो । कीं प्रारब्ध सरतां उरतो । आत्मा केवळ निर्गुण ॥ ६ ॥ या प्रसंगें देह सोडितो । आणि जातो आणि पावतो । एवं सगुण मोक्ष सिद्ध होतो । पूर्वानुसंधानें करूनी ॥ ७ ॥ एथें " याति पार्थानुचिंतयन् " ह्मणोनी । निर्गुणचि पावतो हें या श्लोकें करूनी । बोलावें तेव्हां त्यावरूनी । चिंतन निर्गुणाचें बोलावें ॥ ८ ॥ कीं सदा स्मरे अंतःकरण । तेंचि देहांतीं स्फुरण । देहांतीं जें स्मरण । तें पावे हेंही प्रकरणीं याचि बोलिलें ॥९॥ चिंतनही निर्गुणाचें बोलावें । शब्दातें तदनुरूप योजावें । तरी हें चिंतन देवें । पुढिल्या श्लोकीं विशद बोलिजेतें ॥४१०॥ चिंतन सगुणाचें श्रुती । बोले आणि प्राप्तिही जे रीती । या श्लोकें आणि पुढिल्या श्लोकें श्रीपती । सगुणचिंतन सगुणप्राप्ति बोलतो ॥११॥

॥ श्लोक ॥ कविं पुराणमनुशासितारमणोरणीयांसमनुस्मरेद्यः ।
सर्वस्य धातारमचिंत्यरूपमादित्यवर्णं तमसः परस्तात् ॥ ९ ॥

॥ टीका ॥ पुरुष दिव्य परम । चिंतितां पाविजे सर्वोत्तम । ह्मणूनि बोलिलों मी पुरुषोत्तम । पूर्वश्लोकीं ॥ १२ ॥ त्याचा समजोनि महिमा । जो स्मरे त्या पुरुषोत्तमा । तोचि पावे त्या सर्वोत्तमा । तरी महिमा स्मरे तो या रीती ॥ १३ ॥ कीं तो कवि ह्मणजे ज्ञानी । ज्ञानी ह्मणावा सर्वज्ञ ह्मणोनी । आणि तें ज्ञान कोणापासूनी । प्राप्त जालें न ह्मणवे ॥ १४ ॥ एकापासून एक । ज्ञान पावले ऐसे अनेक । ज्ञानी हा उत्तमश्लोक । स्वतःसिद्ध ऐसें श्रुती हीं बोलती ॥ १५ ॥ श्रुति ॥ स्वाभाविकी ज्ञानबलक्रिया च ॥ श्रुत्यर्थ ॥ स्वाभाविकी ह्मणजे स्वभावसिद्ध । ज्ञानबलक्रियादि शक्ति प्रसिद्ध । कर्मे सर्वे समृद्ध । इतरांचिया ॥ १६ ॥ स्वभाव ह्मणजे वस्तुस्वभाव । कीं बीजापासूनि अंकुराचा उद्भव । किरणांपासूनि संभव । स्वयेंचि मिथ्या जळाभासाचा ॥ १७ ॥ माया ईश्वरोपाधि । सर्वज्ञत्वादि गुणें आधीं । प्रगट होतां ब्रह्मयास निर्मूनि बोधी । इतरांस परंपरेनें हें ज्ञान ॥ १८ ॥ येचि रीतीकरू-

नी । ब्रह्मादिकांस त्याचपासूनी । सृष्टिसामर्थ्यादि शक्ति ह्मणोनी । हें ईश्वर तो ईश्वरेश्वर सर्वज्ञ ॥ १९ ॥ स्वतःसिद्ध ज्ञानी जरी । एक ईश्वर नसता तरी । न येतेंचि या भूमीवरी । ज्ञान हें ऐसें ॥ ४२० ॥ त्यावेगळे जीव सकळ । अविद्योपाधि ओंगळ । आत्मज्ञान जगन्मंगल । कोणा कोणास सांगता ॥ २१ ॥ मग कैंचा मोक्ष निर्गुण । अथवा कैंचा मोक्ष सगुण । आत्मत्वाची आधीं खूण । कोण जाणता ॥ २२ ॥ यालागीं स्वतःसिद्ध कवी । ब्रह्मा त्यापासूनि तो आदिकवी । ज्याच्या उपदेशें अनुभवी । ब्रह्मा जाला श्रुति ह्मणे ॥ २३ ॥ श्रुति ॥ ॥ यो ब्रह्माणं विदधाति पूर्वं यो वै वेदांश्च प्रहिणोति तस्मै । तं ह देवमात्मबुद्धिप्रकाशं मुमुक्षुर्वै शरणमहं प्रपद्ये ॥ ॥ श्रुत्यर्थ ॥ मुमुक्षू ह्मणे त्या पुरुषोत्तमा । शरण मी जो उपजवितो ब्रह्मा । आणि वेद देतो त्या ब्रह्मया सुरसत्तमा । बुद्धिप्रकाशक जीवांचा जगद्गुरू ॥ २४॥ यालागीं आदिकवी । तो ब्रह्मा प्रथम अनुभवी । ऐसें पुराणें बोलती कवी । स्वतःसिद्ध पिता ब्रह्मयाचा ॥ २५ ॥ सकळ वेदसार । श्लोकचतुष्टयें सर्वेश्वर । ब्रह्मयातें उपदेशी हा विचार । श्रीमद्भागवतींही पहावा ॥ २६ ॥ "ब्रह्मणोऽप्यादिकर्त्रे" ह्मणोनी । अर्जुनही स्वमुखेंकरूनी । गीतेंत बोलिला यावरूनी । कवि आपण ऐसें श्रीकृष्ण सूचवी ॥ २७ ॥ हा कवि शब्द निर्गुणाकडे । लागेल हें तों न घडे । पुराण शब्दें सांपडे । अर्थ निर्गुण ह्मणूनिही ॥ २८ ॥ पुरातनास ह्मणती पुराण । तेंचि निर्गुण तेंचि सगुण । परि पुढिल्या पदीं न सांपडे खूण । निर्गुणपणाची ॥ २९ ॥ कर्मानुरूप शासन करी । तो अनुशासिता चराचरीं । कर्मसाक्षित्व असेल तरी । अनुशासिता ह्मणावा ॥ ४३० ॥ एवं ह्मणतां अनुशासिता । सगुणत्व सिद्ध जालें तत्त्वतां । देहांतीं चिंतितां सगुणता । सगुणमोक्ष तेव्हां सगुणमुक्तिप्रकरण हें सिद्ध ॥ ३१ ॥ आतां अनुशासिता मानिला जरी । चैतन्यभेद मानावा तरी । कीं जीवैक्य मानितां शासन करी । काय आपणातेंचि आपण ॥३२॥ ह्मणूनि मानावा भेद । तरी ऐक्य बोलती सर्व वेद । परि शास्ता ह्मणतां न घडे अभेद । शासनार्हास शास्तयासी ॥ ३३ ॥ परंतु हे शंका करिते खेद । कीं जरी ऐक्य मोडोनि होता भेद । ऐक्य असोनिही वेद । भेद भोगापुरताच बोलती ॥ ३४ ॥ कीं एक सूर्य बहुतां जळीं । प्रतिबिंबोनि जैसा डळमळी । तैसा सत्त्वीं निर्मळीं । प्रतिदेहीं जगदीश ॥ ३५ ॥ त्यांत कर्मानुरूप जीव । घावे अति सूक्ष्मही देहभाव । प्रतिबिंबोनि त्या उपाधींतही देव । तितकाच सुखदुःखें भोगितो

॥ ३६ ॥ तो लहान दिसे देहा लहानांत । थोरांत थोरही दिसे अत्यंत । आणि बिंब स्वयें अनंत । तो लहान थोरही न ह्मणवे ॥ ३७ ॥ त्यास लहान लहानाहुनी । थोर थोराहुनी ह्मणोनी । प्रतिबिंबत्वेंकरूनी । श्रुति वर्णिती ॥ ३८ ॥ श्रुति ॥ अणोरणीयान् महतो महीयानात्मा गुहायां निहितोऽस्य जं तोः ॥ श्रुत्यर्थ ॥ ॥ अणु अणुहीहुनी । थोर जो थोराहीहुनी । तो आत्मा आणि याचे गुहेंत असे ह्मणोनी । गुहा शब्दें बुद्धि श्रुति बोले ॥ ३९ ॥ गुहा जीव अहंबुद्धी । ते देहापुरतीच हे प्रसिद्धी । मी लहान होतों तो वृद्धी । पावलों जालों एव्हडा ह्मणोनी ॥ ४४० ॥ देहाइतकाच अभिमान । तितकाच मी हें ज्ञान । प्रतिबिंब बुद्धींत जीस अज्ञान । बिंब प्रतिबिंब दोहींचें ॥ ४१ ॥ देह लहान जितका । जीव त्यांत भोक्ताही तितका । प्रतिबिंबरूपें देवा एका । लहान थोरपण तदनुरूप ॥ ४२ ॥ ह्मणूनि अणुहुनीही सूक्ष्म । आणि थोराहुनीही थोर परम । ऐसें बोले निगम । अर्थ न घडे अन्यथा ॥ ४३॥ कीं तुटोनि वेगळा न पडे । तोंवरी अंश सूक्ष्मत्वें न सांपडे । जैसें हें बोलणें न घडे । कीं पर्वत मोहरीहूनिही अति सूक्ष्म ॥ ४४ ॥ मोहरीहूनि सूक्ष्म अत्यंत । पर्वताचा भाग तोही पर्वत । परि पर्वत मोहरीहूनि सूक्ष्म ह्मणतां संमत । गोष्टी कोणास वाटेल हे ॥ ४५ ॥ तोचि आरासियांत पर्वत । सूक्ष्म दिसे अत्यंत । तैसा सूक्ष्म उपाधींत अनंत । सूक्ष्म सूक्ष्माहुनी दिसे ॥ ४६ ॥ यालागीं वेदांचा अर्थ । युक्तिसिद्ध तोचि यथार्थ । युक्ति विरुद्ध तो व्यर्थ । येथें तरी युक्ति ही वेद बोलती ॥ ४७ ॥ एवं ऐक्य आणि भेद । प्रतिबिंबत्वें बोलती वेद । आतां अनुशासनीं ऐसा खेद । न उपजे कांहीं ॥ ४८ ॥ एवं शासनकर्ता ह्मणोनी । जो बोलिला आणि जे त्याच्या शासनीं । त्यांस ऐक्यत्व या श्रुती करूनी । स्मरे ऐसें प्रस्तुतीं भगवंत बोलतो ॥ ४९ ॥ सूक्ष्मत्व अणोरणीन् यास ह्मणोनी । आणि "सर्वस्य धातारं" या शब्दें करूनी । थोरपण श्रुत्यर्थ बुद्धींत धरूनी । अनुस्मरे ऐसें बोलतो ॥ ४५० ॥ अणुहूनि अणुत्व हें सूक्ष्मत्व । आणि सर्वांचा धाता हें महत्व । कीं जीवत्व आणि जडत्व । दोन्ही तोचि ऐसें जो स्मरे ॥ ५१ ॥ ब्रह्मांड सर्वांत थोर । तें चतुर्मुखा ब्रह्मयाचें शरीर । या ब्रह्मांडकोटीस आधार । तो धाता सर्वांचा ॥ ५२ ॥ धाता ह्मणजे धर्ता जो धरी । जेंवि समुद्र धरी सर्व लहरी । सर्व शब्दें ब्रह्मांड कोटी यापरी । जो धरी तो धाता तो सर्वांचा ॥ ५३ ॥ "महतो महीयान्" या श्रुतीचा अर्थ । "सर्वस्य धाता" या शब्दीं सूचवी यथार्थ । थोराहूनि थोर तोचि तोचि

समर्थ । थोरां सर्वां ब्रह्मांडातें जो धरी ॥ ५४ ॥ ब्रह्मांड थोराही परीस । थोरपणं असे, जयास । प्रतिबिंबत्वे प्रवेश त्यास । ब्रह्मांड पिंड सर्वांत ॥ ५५ ॥ घटा मृत्तिके नसे भेद । तैसा जडा चैतन्या अभेद । एवं दोन्ही भेद खेद । हरूनि स्मरे हा भाव ॥ ५६ ॥ एवं लहान लहानाहुनी । आणि थोर थोराहुनी । तो स्वयें अनंत ह्मणोनी । अचिंत्यरूपें जो स्मरे ॥ ५७ ॥ हें अचिंत्यरूपत्व । दावी सगुणत्व आणि निर्गुणत्व । परि या पुढिल्या पदें जें सगुणत्व । निर्गुणत्व तेथें न बोलावें ॥ ५८ ॥ कीं स्मरे आदित्यवर्ण । ह्मणजे आदित्यासारिखा वर्ण । विश्वरूप दिसेल तेव्हां परिपूर्ण । सूर्यसहस्रदीप्ति पार्थ देखेल ॥ ५९ ॥ "दिवि सूर्यसहस्रस्य" ह्मणोनी । सहस्र सूर्यप्रकाश या श्लोकें करूनी । अर्जुन देखेल दिव्य नयनीं । तें तों निर्गुणत्व न ह्मणवे ॥ ४६० ॥ कीं अनेक वक्त्र नयन । अनेकाद्भुतदर्शन । ऐसें देखेल अर्जुन । तें काय निर्गुण ह्मणों ये ॥ ६१ ॥ ह्मणतां लक्षवादियाचें कश्मल मत । तें सिद्ध होतें नियत । इंद्रियगोचरत्व अत्यंत । साधतें निर्गुणासी ॥ ६२ ॥ एवं आदित्यवर्ण । ह्मणावाच सगुण । आणि तमापरता तो आपण । अविद्येपरता ह्मणोनी ॥ ६३ ॥ केवळ अविद्येच परता ह्मणोनी । न ह्मणवे तम शब्दें करूनी । कीं ईश्वरत्व चिंतितो जाणोनी । तेथें शंकाचि अविद्येची लागेना ॥ ६४ ॥ शंकेचा अवकाश नसतां । कां ह्मणावा अविद्येपरता । तेथें निर्दोष साकारता । स्मरतो ऐसें ह्मणावें ॥ ६५ ॥ जेथवरी देहाकृती । तम त्या पांचभौतिकां ह्मणती । पंच भूतें उत्पन्न होती । तमापासूनी ॥६६॥ एवं स्थावर जंगम । देह तितकेहि तम । तैसा नव्हे साकार पुरुषोत्तम । देह तमापरता त्याचा ह्मणावा ॥ ६७ ॥ आदित्यवर्ण आणि तमापरता । देह ईश्वराचा स्मरे कीं जो धाता । लीलाविग्रह तोचि तत्त्वता । स्वेच्छा कल्पित ह्मणोनी ॥ ६८ ॥ श्रुति ह्मणे "रुक्मवर्ण" । रुक्मवर्ण ह्मणजे सुवर्ण । गीता ह्मणे आदित्यवर्ण । बाळसूर्य सुवर्ण दोन्ही सारिखे ॥ ६९ ॥ जरी सजल मेघनील । तरी स्वप्रकाश जैसा इंद्रनील । वर्ण कोणी तरी हो प्रांजळ । प्रकाशयुक्त तेजस्वी रूप तें ॥४७० ॥ बहुविध बोलावें लक्षण । त्यांत एक लक्षण बोले विचक्षण । त्यास ह्मणावें उपलक्षण । कीं त्या उपलक्षणें बहु लक्षणें जाणावीं ॥ ७१ ॥ ब्राह्मण सर्व साधारण । थोर ह्मणतां एक ब्राह्मण । जरी वर्णिला गौरवर्ण । तरी त्यांत श्याम काय न घ्यावा ॥ ७२ ॥ जो रूप आपुलें दाउनी । मातें स्मरा ध्यानीं ह्मणोनी । ह्मणतो तो कृष्ण मेघश्याम यावरूनी । आदित्यवर्ण उप

लक्षण ॥ ७३ ॥ एवं सर्वसाक्षीही निराकार । रूप तितके अवतार । कोण तरी एक वर्ण आकार । ध्यातां त्यातेंचि पाविजे ॥ ७४ ॥ या दों श्लोकेंकरूनी । सगुण चिंतनानुरूप प्राप्ति ह्मणोनी । श्रीकृष्ण बोलिला येथूनी । मोक्षविषयीं दुसरें प्रकरण ॥ ७५ ॥ जिहीं गुरुकुळीं केला वास । अपरोक्ष पावले करूनी शास्त्राभ्यास । आणि सगुणभक्ति करितां ज्या पदास । पावले हें संक्षेपें ऐसें वर्णिलें ॥७६॥ आतां शूद्रादिक जाती । वेदशास्त्र अभ्यास नेणती । आणि संतांचे कृपेनें पावती । व्यतिरेकअन्वयबोधातें ॥ ७७ ॥ कोणी तैसेच होऊनिही ब्राह्मण । शास्त्राभ्यासावीण । ओळखती आपलें चिदात्मपण । गुरुकृपेनें ॥ ७८ ॥ त्यांत कोणीं धरिलें निर्गुण । कोणी भजों लागले सगुण । ते शास्त्राभ्यासाहीविण । दोघे दोनी गति पावती ॥ ७९ ॥ कीं ज्ञान भक्ति वैराग्य । ज्यांस ते मुक्ति पावती सभाग्य । विशेष शास्त्र असिलिया योग्य । गुरुत्वपदवीस ते होती ॥ ४८० ॥ कैसा तरी हो परी । ज्ञान पावोनि अभ्यास करी । तो मुक्ति पावे लौकरी । निर्गुण अथवा सगुण हो ॥ ८१ ॥ कोणी ज्ञान पावले । आणि हटयोगाकडे लागले । सगुण निर्गुण दोन्ही टाकिले । जिहीं अभ्यास ॥ ८२ ॥ त्यासही मोक्ष परी । सावधान देह सोडिती जरी । ब्रह्मयासह तेही वरी । पावती मुक्ति निर्गुण ॥ ८३ ॥ हें चौं श्लोकें करूनी । श्रीकृष्ण बोलेल येथुनी । जो अनंत वेद मथुनी । हे गीता उपदेशितो ॥ ८४ ॥

॥ श्लोक ॥ प्रयाणकाले मनसाचलेन भक्त्या युक्तो योगबलेन चैव । भ्रुवोर्मध्ये प्राणमावेश्य सम्यक् स तं परं पुरुषमुपैति दिव्यम् ॥ १० ॥

॥ टीका ॥ प्राप्त होतां प्रयाणकाळ ॥ तेव्हां मन करूनि अचळ । आणि आत्मप्रीती जे निर्मळ । युक्त होय त्या भक्तीनें तेधवां ॥८५॥ हो आपणातें सद्वृत्ती । हे जे आपली प्रीती । तेचि भक्ति ऐसे रीती । भक्तीनें युक्त तेधवां ॥ ८६ ॥ साहाही चक्रें भेदुनी । ब्रह्मरंध्र भेदिती क्रमें करूनी । त्यांत आज्ञाचक्र ह्मणोनी । दों दळांचें ॥ ८७ ॥ दोंही भोंवयांत त्याचें स्थळ । तें चक्र तेथें द्विदळ । करूनियां योगबळ । त्या चक्रीं घाली प्राणातें ॥८८॥ योगबळ ह्मणतां यावरूनी । पांच चक्रें पंचभूतें भेदुनी । प्राण आज्ञाचक्रास ने ह्मणोनी । सूचवी योग मार्गातें ॥८९॥ गुह्य द्वारावरी । मूळाधार चक्रदळें चारी । पृथ्वीतत्त्व त्या भीतरी । असे आधार होऊनि देहाचें ॥४९०॥ त्यावें भेदूनियां प्राण । षट्दळ चक्र स्वाधिष्ठान । तें जलतत्त्वाचें स्थान । भेदी तथा ॥ ९१ ॥ त्यावरी नाभिस्थल । तेथें मणिपूरचक्र दश-

दल । तत्त्व तेथें अनल । भेदी तया ॥ ९२ ॥ त्यावरी तेथूनि हृदयांत । चक्र द्वादशदळ अनाहत । वायुतत्त्व तेथें नियत । भेदी तया ॥ ९३ ॥ तयावरी कंठस्थानीं । षोडशदळ विशुद्धचक्र ह्मणोनि । तेथें आकाशतत्त्व त्यातें भेदुनी । भोंवयांत ने प्राणातें ॥ ९४ ॥ तें आज्ञाचक्र द्विदळ । मन तेथें तत्त्व केवळ । त्या मनातें करूनि अचळ । प्राण तेथें प्रवेशवी ॥ ९५ ॥ या भावें ह्मणे भगवंत । कीं प्राण प्रवेशवूनी भोंवयात । जो जातो तो पावतो योगरत । त्या दिव्य पुरुषातें ॥ ९६ ॥ जो पुढिल्या श्लोकीं पुरुष । बोलिजेल निर्विशेष । जो गुरुमुखें निषेधशेष । चित्स्वरूप तेंचि वळखिल ॥ ९७ ॥ ज्ञानावांचूनि न घडे मोक्ष । सर्व जाणती हा पक्ष । हें न बोलत अंबुजाक्ष । प्राप्तीच त्याची बोलतो यालागीं ॥९८॥ ज्ञान होऊनि अभ्यास । टाकूनी धरी हटयोगास । षट्चक्र भेदायाचे आयास । सूचवी प्राणप्रवेश भोंवयांमध्यें बोलतां ॥ ९९ ॥ तेथूनि प्राण मस्तकीं । ठेवी ह्मणूनि तिसरिया श्लोकीं । श्रीकृष्ण बोलेल या भावें कीं । भेदूनि जातो ब्रह्मरंध्र ॥ ६०० ॥ ब्रह्मयासह त्याला । ब्रह्मलोकीं मोक्ष बोलिला । परि सगुणभाव नसे जोडला । तो निर्गुणातें पावे यालागीं ॥१ ॥ ह्मणोनि त्या दिव्य पुरुषातें । पावतो ह्मणूनि भगवंतें । या श्लोकीं बोलियेलें अनंतें । हटयोग त्याचा दाखवूनी ॥ २ ॥ पावतो दिव्यपुरुषा तया । तो तों कैसा ह्मणसी धनंजया । तरी ऐसा ह्मणूनि बोलतो या । पुढिलिया श्लोकीं ॥ ३ ॥

॥ श्लोक ॥ यदक्षरं वेदविदो वदंति विशंति यद्यतयो वीतरागाः ।
यदिच्छंतो ब्रह्मचर्यं चरंति तत्ते पदं संग्रहेण प्रवक्ष्ये ॥ ११ ॥

॥ टीका ॥ अगा जे वेदवेदांत जाणती । ते अक्षर ह्मणूनि ज्यातें ह्मणती। तो त्यातें पावे ह्मणूनि श्रीपती । आणि हा शास्त्रहीन ऐसें सूचवी ॥ ४ ॥ वीतरागी होऊनि यती । ते ज्या स्वरूपीं प्रवेशती । हा पावतोच त्याप्रती । कीं हाही पुढें प्रवेशेल हा भाव ॥ ५ ॥ वीतरागी हाही । परंतु सद्यःप्रवेश नाहीं । यति संन्यासी अथवा कांहीं । काम्य न करी यति ऐसाही बोलिला ॥ ६ ॥ आणि ज्या प्राप्तीकारण । सर्वदा सेविती गुरुचरण । ब्रह्मचर्य ह्मणती निपुण । गुरुगृहवास तयातें ॥ ७ ॥ जे इच्छूनि सुमती । गुरुगृहीं ब्रह्मचर्य आचरती । आणि जितांच पावती । तयातें ॥ ८ ॥ ते सद्य अनायासें मुक्ति पावती । हा आयासें पावे ब्रह्मलोकाप्रती । हा भाव दावी संतांचा पती । इतरांतें वर्णितां ॥ ९ ॥ जाणोनि वेदवेदांत । करूनि गुरुसेवा भाग्यवंत । पावती त्या पुरुषास हा अत्यंत । प्रयासें पावतो ह्मणतां हा तैसा नव्हे

हें सूचवी ॥५१० ॥ तीं चरणीं हा भाव । दाखवूनि देवाधिदेव । पुढें याचे प्रयास बोलेल देव । ते सांगेन ह्मणतो चरणीं चौथिया ॥ ११ ॥ चतुर्थ चरण ॥ 'तत्ते पदं संग्रहेण प्रवक्ष्ये ॥ टीका ॥ पाविजे तें जें स्थळ । तें पद ह्मणावें केवळ । आणि ज्या प्रयत्नें यत्नशील । पावती त्यासही पद ह्मणावें ॥ १२ ॥ पद सांगतों ह्मणूनी । प्राप्त्युपाय बोलेल पुढिलिया श्लोकेंकरूनी । प्राप्ती उपायाच वरूनी । पद शब्दार्थ बोलावा ॥ १३ ॥ कीं पढोनि वेदांत । गुरुसेवा ब्रह्मचर्य अत्यंत । ते उपाय तों निश्चित । नाहीं तयाला ॥ १४ ॥ आतां याचे उपाय । देव बोलेल काय । ह्मणूनि विचारी धनंजय । तो ह्मणे "संग्रहेण प्रवक्ष्ये" ह्मणोनी ॥ १५ ॥ संग्रह ह्मणिजे संग्रहण । ह्मणिजे आवरावे प्राण । प्राणायामक्रमें ग्रहण । करणें प्राणांचे ॥ १६ ॥ षट्चक्र भेदूनि मस्तकपर्यंत । न्यावा प्राण योगबळें त्यांत । साहावें चक्र भोंवयांत । तेथवरी मागें वर्णिलें ॥ १७ ॥ आतां ब्रह्मरंध्र भेदूनी । जावें तें पुढिल्या श्लोकें करूनी । कांहीं त्या पुढिल्या श्लोकें वदूनी । नीट हटयोगरीती बोलेल ॥ १८ ॥ या कारणें प्राणसंग्रह । करूनि सोडोनि देह । जाणार तो निःसंदेह । ह्मणूनि "संग्रहेण प्रवक्ष्ये" ह्मणतसे ॥ १९ ॥ 'संग्रहेण' या शब्दाचा अर्थ । संक्षेपें ह्मणूनि बोलती तो व्यर्थ । संक्षेपेंचि करूनि कृष्ण समर्थ । सर्वत्र बोलतो गीतेंत ॥ ५२० ॥ तथापि न ह्मणोनि संक्षेप । जरी बोलेल संक्षेपरूप । तरि काय अर्जुनास कोप । येणार येथें ॥ २१ ॥ संग्रहेण प्राणसंग्रह । त्या संग्रहें करूनि सोडोनि देह । गति पावतो यास तों संदेह । नसतां अर्थ हाचि कां न घडे ॥ २२ ॥ आतां हटयोग धारणा धरूनी । भोंवयाही वर्ता कोणे रीती करूनी । प्राण नेतो तरी ऐसा ह्मणोनी । बोलतसे ॥ २३ ॥ भोंवयापर्यंत प्राण नेला । चक्रें भेदूनी ह्मणूनि या बोला । श्रीकृष्ण सूचवी परि नाहीं बोलिला । क्रममार्ग योगाचा ॥ २४ ॥ भोंवयांपर्यंत नेतां पहिलें । योगबळ कैसें करणें लागलें । आणि भोंवयांपर्यंत नेऊनि काय केलें । हें बोलतसे या श्लोकें ॥ २५ ॥

॥ श्लोक ॥ सर्वद्वाराणि संयम्य मनो हृदि निरुध्य च ।

॥ टीका ॥ अगा आज्ञाचक्र भोंवयांत । योगबळें प्राण तेथपर्यंत । ज्या रीती नेतसे अत्यंत । निरोध प्रकार तो ऐसा ॥ २६ ॥ दारें प्राणाचीं सर्व कोंडी । त्यांत दोन खालीं सात तोंडीं । महातटाकीं जैशा सांडी[1] । पर्जन्यकाळीं जळाच्या ॥ २७ ॥ सांडी असती उदंड । त्या कांहीं वाहती अखंड ।

---

[1] पाणी जाण्याच्या वाटा.

जळ तुंबतां प्रचंड । फोडी सांडी बुजाल्याही॥२८॥मुख एक नासिका दोनी । प्राण या द्वारत्रयेंकरूनी । सदा वाहे अपानीं । समय विशेषें गुह्यद्वारींही तो भरे॥२९॥ परि निरोधितां तुंबळ । भलत्या द्वारें फुटे प्रवळ । याकारणें द्वारें सकळ । कोंडावीं कोंडितां प्राणातें ॥ ५३० ॥ श्रवण नेत्र नासिका तीनी । रंध्रें एक एकास दोनि दोनी । हीं साहा आणि सातवें वदनीं । मळमूत्रद्वारांसह नव ॥३१॥ एका पायांची टांच । दडपूनि बुजिती गुदद्वाराची खांच । नखांसहित बोटें पांच । स्पर्शती उफराटीं आसनातें ॥ ३२ ॥ तैसीच टांच दुसरी । ठेविती शिश्नाउपरी । दडपूनि त्या द्वारातें बरी । असे ऐसी ॥ ३३ ॥ मुखीं द्वारें सात । दोन्ही अंगुष्ठ दों श्रवणांत । दोहीं नेत्रांवरी अत्यंत । दृढ तर्जनीद्वय ठेविती ॥ ३४ ॥ घ्राणद्वारें दोनी । दोनी मध्यांगुळीं करूनी । ओष्ठ दोन्हीं दोहींकडोनी । अनामिका कनिष्ठिकायोगें ॥ ३५ ॥ ऐशींही नवही द्वारें । करचरणयोगें एकसरें । कोंडोनि योगधारणा आदरें । अनुष्ठी ऐसा ॥ ३६ ॥ सिंह पुढें जातो । मागें परतोनि पाहतो । योगरीति ऐसी बोलतो । सिंहावलोकनन्यायें ॥ ३७ ॥ संयम ऐसा नव द्वारीं । करूनि प्राण त्यावरी । भोंवयापर्यंत न्यावा परी । तेंचि आधीं बोलिला ॥ ३८ ॥ बोलोनि भोंवयांत प्राण । मग हें त्यांचें बोले कारण । आणि हृदयीं मनाचें स्फुरण । तेंच कीं प्राण हृदयावरी न चाले ॥ ३९ ॥ मन हृदयीं निरोधूनी । सर्वद्वारें कोंडूनी । प्राण भोंवयांत घालितो ह्मणोनी । ह्मणतां पूर्वार्धीं सूचविला हा क्रम ॥ ५४० ॥ चक्र मस्तकीं जैसें कमळ । अधोमुख तें सहस्रदळ । भोंवयांत आज्ञाचक्र द्विदळ । तें भेदितां तेथें निघे तो प्राण ॥ ४१ ॥ भोंवयांपर्यंत ऐसा क्रम । या पूर्वार्धपर्यंत पुरुषोत्तम । बोलोनि मोक्षस्थान उत्तम । प्रवेश तेथें उत्तरार्धें बोलतो ॥ ४२ ॥

उत्तरार्ध ॥ मूर्ध्न्याधायात्मनः प्राणमास्थितो योगधारणाम् ॥१२ ॥

॥ टीका ॥ मस्तकीं ठेवूनि आपल्या प्राणा । अनुष्ठी ऐसी योगधारणा । ब्रह्मरंध्र भेदावयाच्या खुणा । सूचवी येथें ॥ ४३ ॥ कीं नवही द्वारें कोंडी । कोंडिती जैशा जळाच्या सांडी । तें जळ जेव्हां फुगारा मांडी । निर्बळस्थळीं फोडी पाळीतें ॥ ४४ ॥ तैसें दशम द्वारीं । चर्ममात्र असतें शिरीं । जें बाळपणीं टाळूवरी । स्पष्ट रंध्र झांकलें दिसतें ॥ ४५ ॥ अस्थि जेथें आड नसे । चर्म मात्र त्यावरी वसे । थोरपणीं रंध्रसें न दिसे । कठिण होतां तें चर्म ॥ ४६ ॥ मस्तकीं कोंडतां प्राण । बळें जेव्हां करी उठाण । भेदूनि तें करी प्रयाण । सत्यलोकातें ॥ ४७ ॥ मस्तकीं प्राण धरी । या

कारणें ह्मणे हरी । तें पुढिल्या श्लोकें मुरारी । सूचवील बोलतां प्रयाण॥४८॥ पूर्वार्धीं सिंहावलोकनरीती । बोलिला जे योगगती । त्याचा अभ्यास श्रीपती । सिंहावलोकनेंच पूर्वदशेचा बोलेल ॥ ४९ ॥ कीं अर्जुन ह्मणेल मनीं । अत्यंत चंचळत्व या पवनीं । मुख नासिका रंध्रें करूनी । बहिर्मुख वावरे ॥ ५५० ॥ तो अंतर्मुख समीर । होऊनि मूळाधारीं स्थिर । कैसा जाला कीं सोडूनि शरीर । मस्तकाकडे चालों लागला ॥ ५१ ॥ हा प्रकार अर्जुनातें । चतुर्थाध्यायीं अनंतें । सांगतां विविधा यज्ञांतें । प्राणायामयज्ञ सांगितला ॥ ५२ ॥ प्राणायाम अति पावन । प्रथम या योगास साधन । प्राणसंयमें शुद्ध मन । आणि प्रणवावृत्तिनें स्मरण देवाचें ॥५३॥ हें योगसाधन प्रथम । येथें बोलिला नाहीं पुरुषोत्तम । ह्मणूनि प्राणसंयम । स्वस्मरणरूप पूर्वार्द्धें बोलतो या श्लोकीं ॥ ५४ ॥

॥ श्लोक ॥ ओमित्येकाक्षरं ब्रह्म व्याहरन्मामनुस्मरन् ॥

॥ टीका ॥ अगा अर्जुना ओंकार । हें ब्रह्म एकाक्षर । जैसीं रामकृष्णादि रूपें साकार । तैसें अक्षररूपी ब्रह्म हें ॥ ५५ ॥ या एकाच अक्षराचा महिमा । ऐसा कीं जैसी शुद्धसत्त्वप्रतिमा । आधीं प्रणव मग सर्वांनिगमां । उच्चारिता जाला ईश्वर ॥ ५६ ॥ जैसी शुद्धसत्त्वमाया प्रथम । ब्रह्मीं प्रकटतां सर्वोत्तम । पद्मनाभरूप पुरुषोत्तम । त्या मायेनें प्रथम अवतरला ॥५७॥ मग त्या मायेनें कल्पना । केली ते हे त्रिगुणरचना । तैसा ओंकार मग नाना । शब्द आणि भाषा प्रगटल्या ॥ ५८ ॥ मग नाना अवतार । त्याच सत्त्वें करी ईश्वर । तैसे अनंत वेद अपार । त्रिगुणसृष्टीपूर्वीं प्रगटले ॥५९॥ प्रणव एकचि अक्षर । ह्मणूनि हें ब्रह्म एकाक्षर । तैसेंच ब्रह्म चतुरक्षर । वासुदेव नारायण ह्मणोनी॥ ५६० ॥ तैसेंच उपनिषदीं । दोनि अक्षरें हरिपदीं । हें द्व्यक्षर ब्रह्म वेदीं । जैसा प्रणव एकाक्षर ब्रह्म ॥ ६१ ॥ ऐशींच जीं जीं हरिनामें । जैसीं रामकृष्णादिरूपें अभिरामें । तैसीं ध्वनिरूपरूपें सर्व सुगमें । अक्षर ब्रह्म नामें समस्तही ॥६२॥ परंतु वेदीं पुराणीं । प्रसिद्ध ज्या ज्या नामें चक्रपाणी । तें तेंचि अक्षर ब्रह्म लोकवाणी । नामें वदे तीं ऐसीं ह्मणूनि न ह्मणवे ॥ ६३ ॥ रण सोडी कान्होबा गोंवळ । इत्यादि लोकवाणी केवळ । भावेंचि करूनि फळ । परि तारकशक्ति नसे तैसी स्वतःसिद्ध ॥ ६४ ॥ स्वयेंचि गोड केळ । त्यांत दूध तूप गूळ । मेळवितां होय केवळ । अमृतरूप ॥६५॥ तैसीं नामें वेदसिद्धें । किंवा वेदवेत्ते बोलती पुराणप्रसिद्धें । तीं स्वयें तारकशक्ति समृद्धें । भक्तिनें स्मरती विशेष अत्यंत ॥६६॥

लावूनिया गूळ । दगड चोंखिजे केवळ । तैसें रण सोडी कान्होबा गोवळ । गोड भक्तीच करूनी ॥ ६७ ॥ महिमा शर्करेचा न कळे । तरी गोडी देऊनि ते गिळे । दगड गुळावांचूनि चघळे । तैशीं भक्तीवांचूनि हीं नामें ॥ ६८ ॥ एवं वेदीं पुराणीं नामें अनेकें । तीं महिमा न कळे तरी तारकें । लोकवाणींत नाम तितुकें । सफळ भक्तीनें होत न स्वतां ॥ ६९ ॥ कीं महाभारतीं भीष्म । धर्मास सांगे सहस्रनाम । तेथें करी प्रथम नियम । ऐसाच या श्लोकें ॥ ५७० ॥ महाभारतश्लोक ॥ यानि नामानि गौणानि विख्यातानि महात्मनः । ऋषिभिः परिगीतानि तानि वक्ष्यामि भूतये ॥१॥ टीका ॥ भीष्म ह्मणे अगा भूपती । हरिनामें सांगेन तुजप्रती । जीं नामें ऋषि गाती । गुणानुरूपें हरीचीं ॥ ७१ ॥ तींचि नामें ऋषि गाती । ज्यांची वेदीं असे ख्याती । पुराणीं वेदव्यासादि वर्णिती । आणि गाती कीर्तनें करूनी ॥७२॥ एवं च नामें लोकवाणी । तीं नव्हती स्वयें सुखाचिया खाणी । वेदीं पुराणीं काय वाणी । कीं सावळ्या गोवळ्या जगजेठी ह्मणावें॥ ७३ ॥ एवं पुराणप्रसिद्धें । तीं नामें वेदसिद्धें । तारकशक्तीनें समृद्धें । रूपें सगुण ब्रह्मांचीं ॥ ७४ ॥ प्रणवास एकाक्षर ब्रह्म । या भावें ह्मणे सगुणब्रह्म । कीं प्रणवही एक नाम । हें सप्तदशीं स्वयेंचि बोलेल ॥ ७५ ॥ सप्तदशाध्यायश्लोक ॥ ओं तत्सदिति निर्देशो ब्रह्मणस्त्रिविधः स्मृतः ॥ टीका ॥ 'ओं तत् सत्' शब्द तीनी । त्रिप्रकार ब्रह्म ह्मणोनी । कृष्ण ह्मणेल यावरूनी । ओंकारही हरिनाम ॥ ७६ ॥ ओंकार नाम वेदसिद्ध । 'तत् सत्' हेंही वेदींच शुद्ध । आणि वेदींच ऐसें प्रसिद्ध । कीं इतिहास पुराणेंही वेद पांचवा ॥ ७७ ॥ एकाक्षरब्रह्म ओंकार । तैसें 'तत् सत्' एकएकचि अक्षर । हरिनाम ब्रह्म अक्षर । वेदप्रसिद्ध ॥ ७८ ॥ श्रुति ॥ हरिं हरं तमनुयंति देवाः ॥श्रुत्यर्थ॥ वाईट तितकें परिहरी । ह्मणूनि हरितो तो हरी । त्यातें देव अनुसरती ऐसी वरी । टीका श्रुतीच करी हरिनामाची ॥ ७९ ॥ हरितो जो तो हरी । श्रुति इतकेंच बोले परी । वाईट तितकें परि हरी । ऐसें तों न बोले ऐसें जरी ह्मणावें ॥५८०॥ तरी वाईट कीं बरें । हरायास नसे तिसरें । तेव्हां वाईट तितकें हरी सारें । हें स्वयेंचि साधतें ॥ ८१ ॥ आतां बरेंही हरितो । ऐसें ह्मणतां अर्थचि न घडे तो । कीं सूर्य तमातेंचि संहरितो । प्रकाशही हरितो न ह्मणवे ॥ ८२ ॥ सूर्य जैसा प्रकाशरूप । हरि तैसा सुखस्वरूप । सुखाचे आंगीं हाचि प्रताप । कीं दुःखचि तें परिहरी ॥ ८३ ॥ ऐसेंचि नाम

१ हरण करितो.

अनंत । हें त्र्यक्षरब्रह्म निश्चित । चतुरक्षरही वेदसंमत । नारायण वासुदेव इत्यादि ।। ८४ ।।एवंच जैसीं वेदसिद्धें । तैशींच नामें पुराणप्रसिद्धें । जैसीं भगवद्रूपें तारकें शुद्धें । तैशींच नामेंही रूपेंचि त्याचीं ।। ८५ ।। रूपें बुद्धीस कळती लोचनीं । नामें बुद्धीस कळती कानीं । आणि उच्चारितां वाचें करूनी । बुद्धि जाणे ।। ८६ ।। नेत्र जैसें इंद्रिय । कानही इंद्रियाचि हा निश्चय । जे जिव्हा नामें गाय । वागिंद्रिय नव्हे काय तेंही ।। ८७ ।। दृष्टीस न दिसे वारा । तरी कळतो लागतां शरीरा । आणि आइकों येतो भरारा । श्रोत्रेंद्रियातें ।।८८ ।। दृष्टीस वारा न दिसे । तरी काय ह्मणावा न असे । तैसा वाचेस कानास गवसे । तो काय नव्हे स्वयें ईश्वर ।। ८९ ।। ईश्वर स्वयें निराकार । तो नेत्रांस दाखवी शरीर । ते अवतार तैसेच हे अवतार । कानास वाचेस जाणवी ।। ५९० । अवताररूपीं अधिकपण । आणि नामपणीं उणा आपण । ऐसें वेद अथवा स्मृति पुराण । कोणीच न ह्मणे ।। ९१ ।। ऐसें असोनि जन । नाम न मानिती रूपासमान । हेंही हरिलें ह्मणावें ज्ञान । अविद्येनें जनांचें ।। ९२ ।। तें अविद्येतें जाळी । ऐसी गीता श्रीवनमाळी । प्रकट करितो ये काळीं । गुह्य हेंही बोलतो ।। ९३ ।। परि मिळाली अणीस अणी । तेव्हां गीता हे चक्रपाणी । उपदेशितो ह्मणोनी वाणी । न वदे सविस्तर ।। ९४ ।। शब्द थोडे अर्थ फार । गीतेचा ऐसा प्रकार । परि शब्द ऐसें कीं टीकाकार । जे हरिभक्त ते समजती भावार्थ त्यांतील ।। ९५ ।। प्रणवमहिमा या या प्रस्तुती । जरी उगाचि बोलता जगत्पती । तरी ह्मणतां " ओमित्येकाक्षरं ब्रह्म " येचि रीती । 'एकाक्षरं' ऐसें न बोलता एथें ।।९६।। उगेंचि अक्षर ब्रह्म । ह्मणता तरी अक्षररूप हें ब्रह्म । ऐसा होतां अर्थावगम । एकाक्षरब्रह्म ह्मणणें किमर्थ ।। ९७ ।। आपल्या नामाचा महिमा । गीतेंत बोलणें पुरुषोत्तमा । कीं मथूनि सर्वां निगमागमां । हे गीता उपदेशितो ।। ९८ ।। ह्मणूनि उगेंचि अक्षरब्रह्म । न वदोनि ह्मणे एकाक्षरब्रह्म । स्वनाममहिमा पुरुषोत्तम । एकाक्षर ब्रह्म ह्मणतां सूचवी ।। ९९ ।। कीं ओंकारीं एकचि अक्षर । ह्मणूनि हें ब्रह्म एकाक्षर । तेव्हां कृष्णनाम द्व्यक्षर । ब्रह्मरूप तेंही ऐसें सूचवी ।। ६०० ।। कीं ओंकारही बोले निगम । निगमचि बोले कृष्णनाम । हें एकाक्षर तेव्हां द्व्यक्षरब्रह्म । कृष्णनामही विराजे श्रुतिशिरीं ।। १ ।। श्रुति।। उद्धृतासि वराहेण कृष्णेन शतबाहुना।। श्रुत्यर्थ ।। श्रुत्यर्थ श्रुतीचा असो । कारण कृष्णनाम उपनिषदीं दिसो । आणि भावार्थ ऐसा गवसो ।

कीं द्व्यक्षरब्रह्म कृष्णनाम ॥ २ ॥ आतां प्रणव नव्हे नाम । कोणी ह्मणतील यालागीं पुरुषोत्तम । सप्तदशीं बोलेल सर्वोत्तम । कीं "ओं तत् सत्" हें त्रिविध नाम । ब्रह्मा सगुणाचें ॥ ३ ॥ एकाक्षर ब्रह्म येथें । कीं ज्या नामीं जितकीं अक्षरें जेथें । तें तितकिया अक्षरांचें तेथें । ब्रह्म अक्षररूप बोलावें ॥ ४ ॥ कोणी ह्मणतील वेदब्रह्म । तें गीतेंत जें एकाक्षरब्रह्म । त्याचा अर्थ एकाक्षर निगम । तरी हें उत्तम त्याहुनी ॥ ५ ॥ कीं "वेदो नारायणः साक्षात्" ह्मणोनी । हें प्रमाणसिद्ध यावरूनी । ब्रह्मरूप वेदरूप महिमे दोन्ही । प्राप्त जाले नामातें ॥ ६ ॥ कीं एकाक्षर वेद ओंकार । कृष्णनाम हरिनाम वेदद्व्यक्षर । अनंतनाम वेद त्रिक्षर । निगम चतुरक्षर नारायण ॥ ७ ॥ कोणी ह्मणती प्रथम । प्रणव जाला तोचि एकाक्षरब्रह्म । तरी पद्मनाभ प्रथम पुरुषोत्तम । तोचि ब्रह्मरूप आणि काय कृष्ण नव्हे ॥ ८ ॥ फटकाळ जैसे हे बोल । तैसाच बोल हाही फोल । भावार्थ टाकूनि खोल । कां वरिच्या वरी उडावें ॥ ९ ॥ कोणी उपदेशूनि ओंकार । सांगती ब्रह्मविद्यासार । प्रणवार्थ तदनुसार । वाखाणिती ॥ ६१० ॥ तरी गायत्री ब्रह्मचि सारी । नारायण वासुदेव इत्यादि नामांतरीं । ब्रह्मसाक्षात्कार होय यापरी । नसती अर्थ काय ॥ ११ ॥ नर जीव अंश प्रतिबिंब । नारें जडतत्त्वें त्यांचा त्यांस अवलंब । आश्रय अधिष्ठान बिंब । अनुभव नारायणपणाचा । ये रीती ॥ १२ ॥ मंत्र संन्यासी यांचा ओंकार । तिहीं त्याचा वाढविला बडिवार । पाहतां अनुभवप्रकार । कोठें नसे ॥ १३ ॥ व्यतिरेकें कळे निःशब्द । तें प्रणव नव्हे अथवा वेद । अन्वयें सर्व अभेद । तेथें प्रणवचि काय एकला ॥ १४ ॥ आतां लोकवाणी बंध करी । वेदवाणी बंध हरी । त्यांत प्रणव थोर तरी । कीं तें नाम ब्रह्माचें ॥ १५ ॥ ज्यास न कळे ब्रह्म । आणि संन्यास घेतला परम । त्यास एकचि अक्षरब्रह्म । थोर सांगीतलें सर्वांत ॥ १६ ॥ जडचैतन्यविवेक । प्रणव न सांगतां व्यतिरेक । उपदेशिला अद्वितीय एक । न कळे काय शिष्यासी ॥ १७ ॥ तैसाच अन्वय । अलंकार जैसा सुवर्णमय । तैसें कार्य कारणचि हेंहि काय । विना प्रणव न कळे शिष्यासी ॥ १८ ॥ एवं च संन्यासी याचा हा मंत्र । तिहीं थोर केला प्रणव मात्र । पाहतां हरिनाम सर्वत्र । वेदीं तितकें ब्रह्मरूप ॥१९॥ हें सुचवाया पुरुषोत्तम । ह्मणावें जें उगेंचि अक्षरब्रह्म । तें एकाक्षरब्रह्म । ह्मणुनी येथें बोलिला ॥ ६२० ॥असो हें बोलतां फार । ग्रंथ वाढेल अपार । प्रस्तुत बोले सर्वेश्वर । प्राणायाम अंग योगाचें ॥ २१ ॥ त्यास अंतर्में

ओंकार । त्याचा वर्णिला बडिवार । कीं त्याचा करितां उच्चार । मातें स्मरे ॥ २२ ॥ सिंहावलोकनन्यायें । प्राणायाम येथें देवरायें । सूचविला कीं धनंजयें । प्रथम अभ्यास हाही समजावा ॥ २३ ॥ कीं सोळा प्रणवीं पूरक। आणि बत्तिसां प्रणवीं रेचक । चौसष्ट प्रणव होती तो कुंभक । प्राणायाम एक हा ऐसा ॥ २४ ॥ अभ्यासें समीर । राहों लागे स्थिर । द्विगुण त्रिगुण इत्यादि सधीर । प्राणायाम योगी वाढविती॥ २५ ॥ द्विगुण करितां रेचक । द्विगुण करावा पूरक । द्विगुण धरावा कुंभक । द्विगुण ऐसा प्राणायाम हा ॥ २६ ॥ ऐसा त्रिगुण चतुर्गुण । प्राणायाम करिती योगनिपुण । जों जों वाढे तों तों प्राण । अंतर्मुख होतसे ॥ २७ ॥ गुदद्वाराच पासीं । मूळाधार तेथें प्राणासीं । स्थिरता तों ब्रह्मरंध्रासी । जावयासि मार्ग होतसे ॥ २८ ॥ जैसा लागतां वारा । वाळोनि चिखलाचा थारा । मोकळा होतो मार्ग सारा। ये रीती ॥ २९ ॥ वेळू जैसा पोकळ । परि कांडोकांडीं ग्रंथि पुष्कळ । तैसीं चक्रें सकळ । ब्रह्मरंध्रपर्यंत ॥ ६३० ॥ लोहशलाकेंकरूनी । जैसीं कांडीं भेदूनी । मार्ग करिती तैसा भरोनी । प्राण षट्चक्रें भेदितो ॥ ३१ ॥ तो क्रम पूर्वीं दाविला । हा उपाय बोलतां राहिला । तो स्मरणप्रसंगें बोलिला । सूचविला प्रणव उच्चारें करूनी ॥ ३२ ॥ कीं करितां प्राणायाम । षट्चक्रमार्ग होतो सुगम । आणि आपलें स्मरण परम । प्रणवाच्या करितां आवृत्ती ॥ ३३ ॥ नाकपुडी डावी धरी । पूरक उजविया रंध्रें वारा धरी । सोळा संख्या आवृत्ति जोंवरी । ओंकाराच्या ॥ ३४ ॥ दोहीं पुटांसहित प्राण । धरितां मूळाधारीं कोंडे प्राण । त्यास ह्मणती योग निपुण । कुंभक ह्मणोनी ॥ ३५ ॥ प्रणवाचिया आवृत्ती । चौसष्टी जेव्हां होती । त्यास कुंभक ह्मणती । योगशास्त्रीं ॥ ३६ ॥ धरूनि उजवी नाकपुडी । डावेवाटे हळु हळु वारा सोडी । प्रणवाच्या आवृत्ति मांडी । बत्तीस तेव्हां ॥ ३७ ॥ तो प्रणव एकाक्षरब्रह्म । त्यातें जपत साधकोत्तम । मातें स्मरे ह्मणे पुरुषोत्तम । या भावें करूनी ॥ ३८ ॥ प्राण ब्रह्मरंध्रपर्यंत । जायास उपाय हा अत्यंत । स्मरणप्रसंगें भगवंत । सिंहावलोकनें हें वदे ॥ ३९ ॥ येथें टीकाकार इतर । अर्थ हा प्राणायामपर । न करिती ह्मणती सर्वेश्वर । ह्मणतो जपत ओंकार मातें स्मरतो ह्मणोनी ॥ ६४० ॥ तरी ओंकार एकाक्षर । जपत स्मरत मातें नर । हें पूर्वार्धीं बोलोनि दामोदर । गति बोलतो उत्तरार्धें ॥ ४१ ॥ कीं ऐसा जपत मातें स्मरत । जो देह सोडोनि असे ज्यांत । तो परमगतीतें असे पावत । दोहीं अर्थीं दिसतसे अर्थ हा ॥ ४२ ॥ आणि याहूनी पूर्वश्लो-

कीं । बोलोनि प्राण मस्तकीं । या श्लोकीं ह्मणतो कीं । प्रणव उच्चारित स्मरत जातो ह्मणोनी ।। ४३ ।। तेव्हां प्राण चढला मस्तकावरी । राहिल्या परा पश्यंती मध्यमा वैखरी । प्रणव उच्चार त्याउपरी । घडे कैसा ।। ४४ ।। प्राण भेदूनि चक्रें साही । मस्तकासि जातां तळीं देहीं । प्राणचि जेधवां नाहीं । उच्चार करी कोण तेव्हां ।। ४५ ।। तैसेंचि पूर्वश्लोकीं पूर्वार्धी । मन हृदयांत बोलोनि उत्तरार्द्धीं । प्राण मस्तकीं ह्मणे हेही प्रसिद्धी । ऐसीच टीकेंत वर्णिती ।।४६।। हेही गोष्टी अघटित । कीं प्राण तेथें मन निश्चित । प्राणमनाचें बंधन असे अत्यंत । प्रसिद्ध वेदीं पुराणीं योगींही ।। ४७ ।। येथें पुढील बोलोनि योगगती । सांगे मागील साधनरीती । सिंहावलोकनन्यायेंच श्रीपती । सिद्धि बोलोनि साधनें बोलतो।।४८।।प्राण मस्तकास नेती । ते भूमींतही पुरोनि घेती । ऐशा समाधींत कोणे रीती । उच्चार करील ओंकाराचा ।। ४९ ।। नवनीतादि मर्दन । करूनि समाधि त्याचा जन । उतरिती ऐसिया समयीं मन । कैंचें हृदयांत कैंचा प्रणवोच्चार ।। ६५० ।। समाधि न ह्मणावा तैसा । तरी मस्तकीं प्राण चढला कैसा । आणि "आस्थितो योगधारणां" ऐसा । श्रीकृष्णही कां ह्मणे ।। ५१ ।। ज्ञानयोगधारणा ह्मणावी । तरी सर्वद्वारें कां कोंडावीं । एवं च इतर क्लिष्टकल्पना सांडावी । बोलावी हटयोगधारणाच हे ।। ५२ ।। प्रणवोच्चार करीत । प्राण मस्तकीं ठेवूनि असे जात । हा अर्थ येथें विरुद्ध अत्यंत । बोलतां नये।। ५३ ।। येथें सिंहावलोकनन्यायें । प्राणायामचि सांगतो ह्मणावा निश्चयें । कीं मस्तकीं प्राण जावयाचें धनंजयें । प्राणायामसाधन समजावें हा भाव ।। ५४ ।। आतां असो हे खटपट । जे विवेकी ते समजतील नीट । विरुद्धार्थ निपट । कैसा अंगिकारावा ।। ५५ ।। योगधारणाधरूनी । मस्तकीं प्राण ठेवुनी । पुढें काय करितो तें उत्तरार्धें करूनी । बोलोनि बोलतो गति त्याची ।। ५६ ।।

उत्तरार्ध ।। यः प्रयाति त्यजन्देहं स याति परमां गतिम् ।। १३ ।।

।। टिका ।। मस्तकीं प्राण ठेवुनी । असे ऐसें पूर्वश्लोकेंकरूनी । बोलिलों आतां ऐसा जो प्रकर्षेंकरूनी । देह सोडोनि जातसे ।। ५७ ।। तो परमा गतीतें । पावतो ह्मणूनि भगवंतें । ब्रह्मरंध्र भेदूनि जातो गतीतें । सूचविलें हेंही ।। ५८ ।। कीं कोंडी द्वारें सकळ । हें पूर्वींच बोलिला मेघनीळ । आणि प्रयाति ह्मणजे जातो करूनि प्रकृष्टबळ । ऐसें येथें बोलिला ।। ५९ ।। भाव कीं मस्तकीं वारा यथेष्ट । कोंडितां बळ करूनि प्रकृष्ट । जें दशमद्वार बाळपणीं स्पष्ट । दिसे तें फुटे बळें प्राणाच्या ।। ६६० ।। यालागीं कीं मस्तकीं

प्राण शिरे । तो इतरांच्या प्रयासें उतरे । तो स्वयें मस्तकींहूनि न फिरे । समाधी उतरिती लोक त्याचा ॥ ६१ ॥ ज्यास करणें काळवंचना । तो दशमद्वार भेदूनि जाईना । हां ज्ञानवंत यास वासना । परमागतीची ॥६२॥ ह्मणूनि दशमद्वार पवित्र । ज्यावरी असे चर्म मात्र । तें भेदूनि सोडोनि गात्र । परमागतीतें पावतो ॥ ६३ ॥ तो सत्यलोकास जातो । तेथें ध्यान-योगातें दृढ करितो । मग ब्रह्मा चतुर्मुख जेव्हां मुक्ति पावतो । मुक्ति पाव-तो हाही तेव्हां ॥ ६४ ॥ होईल हें पुढें स्पष्ट । याच्या जावयाची वाट । उत्तरायण शुक्लगति उत्कट । पुढें प्रसंगें भगवंत बोलेल ॥ ६५ ॥ कीं ज्ञानी आत्मज्ञ खरा । परि आत्मयोग साधिला नाहीं बरा । तरी कष्टेंकरूनि मस्त-कासि वारा । नेऊनि बांधिली मोट वायूची ॥ ६६ ॥ ज्ञानावांचूनि नाहीं मोक्ष । यासि तों मोक्ष बोलिला अंबुजाक्ष । ह्मणूनि आत्मज्ञ मानवापरी दक्ष । हटयोगी जैसा तैसा आत्मयोगी न ह्मणवे ॥ ६७ ॥ जो पक्क आ-त्मज्ञानी सुजाण । प्रारब्ध सरतां त्याचे प्राण । न निघती समुद्रीं लवण । लय पावती तैसे स्वरूपीं श्रुति ह्मणे ॥ ६८ ॥ श्रुति ॥ न तस्य प्राणा उत्क्रा-मंति इहैव स विलीयते ॥ श्रुत्यर्थ ॥ प्राण त्याचे न निघती । येथेंचि लय पावती । ऐसें स्पष्ट बोले श्रुति । तेणें मस्तकीं प्राण कां न्यावा ॥६९॥ ब्रह्म मस्तकींच त्यास । तेव्हां देह सारा पडला काय ओस । स्वदेहासह चराचर जयास । ब्रह्मचि दिसे ॥ ६७० ॥ तो कां सर्व द्वारें कोंडी । कां तो योग-धारणा मांडी । अखंडत्व ज्याला अखंडीं । अखंड बाणे ॥ ७१ ॥ एवं च पक्कज्ञानी असता । तरी या खटपटीतें न झोंबता । तेव्हां तो मानिजेता । कीं सद्यचि पावलें मुक्तीतें ॥ ७२ ॥ अथवा ज्ञानी आणि भक्त । असतां सगुणचरणीं अनुरक्त । तरी देह सोडितां ध्यानयुक्त । सगुणमुक्तीतें पावता ॥ ७३ ॥ कीं जो जें सर्वदा स्मरे । तें त्यास देहावसानीं स्फुरे । एवं सगु-णभक्त ज्ञानी बरे । ते सगुणस्मरणें कृतकृत्य ॥ ७४ ॥ त्यांसही मुक्ति तत्काळ । ज्यांस ज्ञानभक्तीचा सुकाळ । त्यांच्या दृष्टीस फटकाळ । हटयोग हा ॥ ७५ ॥ ते जरी हटयोग जाणती । तरी न अनुष्ठिती या यो-गरीती । प्रारब्ध सारायातेंच जिती । देह ज्यांचे ॥ ७६ ॥ ते आत्मत्वें कृष्णचरण । स्मरती अंतीं तेंचि स्मरण । भगवद्रूप ज्यांचें अंतःकरण । भृंग-कीटन्यायें जितांचि ॥ ७७ ॥ एवं मोक्ष निर्गुण । त्यांत सद्यमुक्ती पावती

१ यथा पेशस्कृता विद्धः कुड्यायां तमनुस्मरन् । तीव्रेण ध्यानयोगेन विशते त-त्स्वरूपताम् ॥ १ ॥

पक्व निपुण । त्यांचें देह त्यजूनि उत्क्रमण । हटयोगें बोलिलें ॥७८॥ यासही कैवल्यमोक्ष । कीं नव्हे भक्तियोगीं दक्ष । ज्ञानी अपक्व होऊनि धरिला पक्ष । हटयोगाचा ॥ ७९ ॥ ब्रह्मरंध्र भेदूनि गेला । पुन्हा जन्म न घडे त्याला । आणि पक्वज्ञानी नाहीं जाला । ह्मणूनि मुक्तिही न घडे तत्काळ ॥ ६८० ॥ जन्म योगभ्रष्टास मागुतीं । मागें बोलिला जगत्पती । यालागीं कीं ब्रह्मरंध्र भेदूनि हे गती । तो नाहीं पावला ॥ ८१ ॥ जाय ब्रह्मरंध्र भेदूनी । तो नये पुन्हा परतोनी । परंतु मोक्षज्ञानावांचूनी । न घडे सर्वथा ॥ ८२ ॥ यालागीं हा ज्ञानी । परंतु अपक्व ह्मणोनी । गेला ब्रह्मरंध्र भेदूनी । ब्रह्मलोका ॥ ८३ ॥ तो दों परार्धांचे अंतीं । ब्रह्मयासह पावेल कैवल्यगती । ऐसे अनेक असती । ब्रह्मलोकीं ॥ ८४ ॥ ते ब्रह्मयाचा दिवस आणि रजनी । मोजिती मोक्षप्रतीक्षा करूनी । सत्यलोकीं असती ह्मणोनी । पुढें चतुर्थश्लोकीं बोलेल ॥ ८५ ॥ "तेहोरात्रविदो जनाः" ह्मणोनी । चतुर्थ श्लोकें करूनी । बोलेल भगवंत त्यावरूनी । गति याची एथें ऐशी वदावी ॥ ८६ ॥ ये विषयीं श्लोक । या पुढेंचि बोलणार उत्तमश्लोक । परि आयकोनि याचे कष्ट आत्यंतिक । ह्मणी शंकेल अर्जुन ॥ ८७ ॥ कीं ब्रह्मरंध्र भेदिल्यावीण । मोक्ष नव्हे सगुण अथवा निर्गुण । ह्मणूनि व्याकुळ अंतःकरण । ह्मणी होय आपल्या भक्ताचें ॥ ८८ ॥ ह्मणूनि भक्तास आपण । सुलभ आणि सुलभत्व लक्षण । बोलतां प्रकरण । वाढेल श्लोकत्रयपर्यंत ॥ ८९ ॥ ह्मणूनि "तेहोरात्रविदो जनाः" । ऐसें चतुर्थश्लोकीं या अनुसंधाना । योजूनि बोलेल प्रस्तुत स्वजना । सुलभ आपण हें बोलतो या श्लोकीं ॥ ६९० ॥

॥ श्लोक ॥ अनन्यचेता सततं यो मां स्मरति नित्यशः ।
तस्याहं सुलभः पार्थ नित्ययुक्तस्य योगिनः ॥ १४ ॥

॥ टीका ॥ अगा जडभाग तितका अन्य । अन्य नव्हे आत्मा चैतन्य । तथापि जडातरंगीं धन्य । त्या चित्समुद्रातें देखती ॥ ९१ ॥ ज्या चित्तें हा अनुभव । त्या चित्तास अनन्यवैभव । ऐसें चित्त ज्याचें तो मानव । अनन्यचेता ह्मणावा ॥ ९२ ॥ ऐसा अनन्यचेता सर्वदा । स्मरे नित्य मज मुकुंदा । निर्गुण ज्ञानी आणि चरणारविंदा । स्मरे माझिया ॥ ९३ ॥ पार्था मी श्रीवल्लभ । त्यास अत्यंत सुलभ । त्याला मोक्ष नसे दुर्लभ । सुलभ मोक्षस्वरूप मी जेव्हां ॥ ९४ ॥ होऊनि दुर्लभ आत्मज्ञान । जे मोक्षार्थ मांडिती इतर साधन । त्यांस दुर्लभ मी जगज्जीवन । ह्मणूनि मोक्षकष्ट [illegible]-

सी ॥ ९५ ॥ होऊनिही ज्ञानी । मातें त्या अनन्यचित्तें करूनी । स्मरे त्यास न उरती दोनी । एक मी आणि एक मोक्ष ॥ ९६ ॥ चित्त चैतन्य जालें । तेव्हांच निर्गुणात्मत्वें धालें । स्मरतां मातें त्यालाचि आलें । मद्रूपत्व अर्जुना ॥ ९७ ॥ चित्ता चित्स्वरूपत्व स्फुरे । तेव्हां अनन्यत्वें तें नुरे । मग मज सगुणातें स्मरे । चित्प्रकाशें मदाकार होउनी ॥ ९८ ॥ कां त्याणें निरोधावीं द्वारें । कां मस्तकास न्यावें वारें । देह पडतां माझिया आकारें । शुद्धसत्त्व उरे तें चित्त ॥ ९९ ॥ आत्मा तरी जगद्व्यापक । मद्रूप चित्त मदात्मक । देह पडतां हेंचि कौतुक । दिसों लागे अनायासें ॥ ७०० ॥ ज्ञानींच होय पूर्वी बोलिला जो तोही । परंतु ज्ञानयोगीं प्रयत्न केला नाहीं । प्राणनिरोधप्रवाहीं । क्रमिलें आयुष्य ॥ १ ॥ हा नित्ययुक्त योगीं । चित्त नित्य चैतन्यसंयोगीं । आणि मातें स्मरे यालागीं । त्यास मी सुलभ अत्यंत ॥ २ ॥ अनन्यचित्त सतत । आणि नित्यशः मातें स्मरत । 'सतत, नित्य' या दों शब्दीं भगवंत । दोन्ही सूचवी ॥ ३ ॥ अनन्यचित्त सतत । सतत म्हणजे सर्वदा अनन्यचित्त । आणि नित्यशः मातें असे स्मरत । नित्यशः म्हणजे प्रतिदिनीं ॥ ४ ॥ नित्यशः म्हणजे नित्य नित्य । म्हणजे प्रतिदिनीं अगत्य । जैसें प्रतिमादिपूजाकृत्य । तैसा प्रतिदिनीं ध्यातो मातें हा भाव ॥ ५ ॥ म्हणजे विश्व भगवद्रूपें । लक्षितो अनन्यचित्स्वरूपें । या अनुभवाच्या प्रतापें । अनन्यचित्त सतत सर्वकाळीं ॥ ६ ॥ आणि नित्य नित्य प्रतिदिनीं । ध्यानीं श्रवणीं कीर्तनीं । नित्यशः स्मरे मातें म्हणोनी । सूचवी भाव॥७॥सतत म्हणजे अखंड । अनन्यत्वीं चित्तास न पडे खंड । कीं सगुण भजनही करी उदंड । तरी अनन्यत्व खंडेना ॥ ८ ॥ कीं भगवद्रूप सगुण । तद्रूपें चित्त आपणातें आपण । कल्पी आत्मप्रकाशें निपुण । अनन्यत्वेंचि चित्त तें ॥९॥ आत्मप्रत्ययाविण । चित्त काय कल्पूं शकेल सगुण । सुवर्णमूर्तीविना सुवर्ण । सिद्धचि नव्हे ॥ ७१० ॥ सुवर्णें सुवर्णमूर्ति जाली सिद्ध । सुवर्णावांचूनि न दिसे हेंही प्रसिद्ध । आंत बाहेर अवघें समृद्ध । सोनेंचि तें ॥ ११ ॥ तैशी आत्मप्रकाशाविना । कल्पनाचि चित्ताची घडेना । कल्पिली मूर्ति अनुभवा येना । आत्मप्रकाशावांचूनी ॥ १२ ॥ ऐसा स्मरे नित्य सगुण । तरी अनन्यत्वाची न तुटे खूण । अखंड अनन्यचित्तें ऐसा निपुण । आणि नित्य नित्य स्मरे सगुणही ॥१३ ॥ ऐसा योगी नित्ययुक्त । आणि सगुणभजनेंकरूनि भक्त । तो देह असतांचि मुक्त । जेव्हां सुलभ भगवंत ऐसा ॥ १४ ॥ परंतु प्रारब्धाचा देह । सकळ दुःखाचें गृह ।

अशाश्वत पडणार । निःसंदेह कर्मफळ पूर्वील भोगवी ॥ १५ ॥ ह्मणू-
नि तो पडल्यावरी । मज पावणें हे एक उरी । तो मज पावे तदुपरी । कार्मी
न पडे कर्मदेहवार्ताही ॥१६॥ याकारणें आपणातें । पावलियावरी तयातें ।
पुन्हा या दुःखरूपा कर्मलोकातें । येणेंचि न घडे ह्मणतसे या श्लोकीं ॥१७॥

॥ श्लोक ॥ मामुपेत्य पुनर्जन्म दुःखालयमशाश्वतम् ।
नाप्नुवंति महात्मानः संसिद्धिं परमां गताः॥ १५ ॥

॥ टीका ॥ पावोनियां मातें । पुन्हा न पावती जन्मातें । मद्रूप होऊनि
ज्यांतें । असणें मजसमीप ॥ १८ ॥ उपशब्दें समीप ऐसा अर्थ । दावू-
नि सगुणमोक्षभावार्थ । येथें दावी समर्थ । निर्गुणमोक्ष चरणीं चौथिया
॥ १९ ॥ "संसिद्धिं परमां गताः" ह्मणोनी । परमा सिद्धीतें पावले येणेंकरू-
नी । कैवल्यनिर्गुणमोक्ष सूचवुनी । हठयोगियाहूनि उभयगतिश्रेष्ठत्व वर्णि-
तो ॥ ७२० ॥ कीं पावोनि मातें सगुणातें । आणि परम संसिद्धीतें पावले
त्यांतें । पुनर्जन्म नाहीं या उभयांतें । जें पुनर्जन्म गृह दुःखाचें ॥ २१ ॥
मातें ह्मणिजे सगुणातें । येथें कोणी ह्मणतील हेंही निर्गुणातें । ह्मणूनि योजी
उप शब्दातें । उप ह्मणिजे समीप ॥ २२ ॥ निर्गुणीं निर्गुणचि उरे । तेथें
दूरत्व अथवा समीपत्व न स्फुरे । सायुज्यमोक्षीं न शिरे । अर्थ उप श-
ब्दाचा ॥ २३ ॥ सामीप्य सारूप्य सालोक्य गती । उप शब्दें सूचवी श्रीप-
ती । कीं वैकुंठ आणि वैकुंठाचा पती । दोन्ही एक ॥ २४ ॥ जैसे रामकृ-
ष्णादि अवतारदेह । नगराकार रूप तेंही निःसंदेह । परि नगराकारीं न
बसे स्नेह । उपासकांचा ॥ २५ ॥ ह्मणूनि रामकृष्णादि अवतार । ह्याती
हेंचि भगवदाकार । जन्मकर्म दिव्यें परि मनुष्यानुसार । गोड मनुष्यां
लागती ॥ २६ ॥ ह्मणूनि हे अवतार । जनास वाटती भगवदाकार । वैकुं-
ठनगर स्वयें सर्वेश्वर । शास्त्रसिद्ध आणि अनुभवी जाणती ॥ २७ ॥ हे
त्रिगुणरचना । भगवद्रूपावीण असेना । तथापि हे त्रिगुणकल्पना । अनादि
जीवकर्मभोगार्थ[1] ॥ २८ ॥ त्यांतचि भगवदवतार । मुक्तिप्रदें[2] भगवदाकार ।
आणि मुक्तिरूप सर्वेश्वर । अनादि वैकुंठरूप स्वयें प्रगटतो ॥ २९ ॥ ए-
वं च वैकुंठातें पावला । ऐक्य आणि समीपत्वही त्याला । त्यांत कोणास
सामीप्य मोक्ष बोलिला । कोणास सारूप्य सालोक्य ॥ ७३० ॥ त्यांत वैकुं-
ठनाथाचें रूप । सामीप्य ह्मणिजे त्यासमीप । वैकुंठ लोकही भगवत्स्वरूप ।
तेव्हां समीपत्व हें सकळांसही ॥ ३१ ॥ वैकुंठनाथसमरूप[3] । वैकुंठीं त्यास

१ जीवाला कर्मांच्या भोगाकरितां. २ मुक्ति देणारा. ३ विष्णूसारखें रूप.

ह्मणती सारूप्य । तें वैकुंठही भगवत्स्वरूप । तेव्हां समीपत्व त्यासही ॥३२॥ वैकुंठींच वैकुंठाकार स्थळ । ज्यांत वैकुंठरचना सकळ । मुक्त तेथें नांदे जाणों केवळ । नित्यमुक्त वैकुंठनाथचि नांदतो ॥ ३३ ॥ हा सालोक्यमोक्ष बोलिला । तोही समीपचि पावला । कीं वैकुंठीं त्याला । तें वैकुंठचि वैकुंठनाथ तो ॥ ३४ ॥ उपशब्दें ऐसें सूचवुनी । "संसिद्धिं परमां गताः" या वरूनी । निर्गुण कैवल्यमोक्ष बोलोनी । पुनर्जन्म नाहीं ह्मणूनि बोलतो ।।३५॥ या दोहीं मोक्षांस पावले । ते महात्मशब्दें थोर केले । कीं महा थोर अत्यंत जाले । आत्मे ह्मणिजे चित्तें जयांचीं ॥३६ ॥ "यो वै भूमा तत्सुखं" ह श्रुती । ह्मणे जो भूमा त्यास सुख ह्मणती । ज्यास आदि मध्य अंत नसती । तो भूमा अनंत तोचि आनंद ॥ ३७ ॥ महा शब्दें भूमा । चित्तास ह्मणावें आत्मा । तदाकार चित्तें अनुभविती तो महिमा । महात्मशब्दें ते पुरुष ॥ ३८ ॥ एवं च देहपतनपर्यंत । आनंद ऐसा अत्यंत । यावरूनी सूचवी भगवंत । कीं थोर त्या हटयोगियापरीस हे ॥ ३९ ॥ कीं हे पावले शाश्वत । पुन्हा जन्मदुःखालय[1] अशाश्वत । न पावती ह्मणे यावरूनि भगवंत । ब्रह्मलोकगति त्यांची अशाश्वत ऐसें सूचवी ॥ ७४० ॥ कीं हे ज्ञानी दक्ष । सद्यचि पावले मोक्ष । तो ज्ञानी परि धरूनि हटयोगपक्ष । ब्रह्मलोकास पावला ॥४१॥ तो ब्रह्मलोक आणि ब्रह्मा । होतां त्यांच्या शतवर्षांची सीमा । नाश पावती या साधकोत्तमा । मोक्ष तेव्हां जरी होणार ॥४२॥ मुक्ति होय तों पर्यंत । सत्यलोकीं दिवस मोजित । गति पावोनि शाश्वत । असावें तेणें ॥ ४३ ॥ ह्मणूनि नश्वर गती । ह्मणावें हटयोगी पावती । या भावें सर्व जगत्पती । श्लोकद्वय बोलतो ॥ ४४ ॥ आणि इतर देवतोपासक । त्या त्या देवांचेच पावती लोक । परंतु न चुके पुनर्जन्म शोक । प्रसंगें हेंही सूचवी या श्लोकीं ॥ ४५ ॥

॥ श्लोक ॥ आब्रह्मभुवनाल्लोकाः पुनरावर्तिनोऽर्जुन ।
मामुपेत्य तु कौंतेय पुनर्जन्म न विद्यते ॥ १६ ॥

॥ टीका ॥ ब्रह्मयाचें भुवन । सत्यलोक ज्याचें अभिधान[2] । तें धरूनि जें जें स्थान । ज्या ज्या ब्रह्मादिदेवांचें ॥ ४६ ॥ अर्जुना हे लोक सकळ । थोरा थोरा पुण्याचें फळ । तथापि पुनरावृत्तिशील । जे पावले पुन्हां जन्मलेच ते ॥ ४७ ॥ हे गोष्टी आयकोनी । शंकित जाला अर्जुन मनीं । ऐसाच वैकुंठही लोक ह्मणोनी । शंका उपजली ॥ ४८ ॥ कीं लोक मात्र

---

१ जन्म आणि दुःख यांचें घर. २ नांव.

जितका । पुनरावृत्ति देणार तितका । तेव्हां पुनरावृत्तीचा ढका । वैकुंठवासीं यासही ॥ ४९ ॥ हा अर्जुनाचा भाव । जाणोनियां देवाधिदेव । संदेह निरसे ऐसें वासुदेव । उत्तरार्धें बोलतो ॥ ७५० ॥ कीं मातें पावोनि कुंतीसुता । पुनरावृत्तीची वार्ता । कानीं पडे हें न घडे तत्त्वता । कीं लोक माझा तो मीच हा भाव ॥ ५१ ॥ सकळ लोक आणि लोकपती । मीच स्वयें जगत्पती । परि ते लोकपाळ मानिती । कीं आह्मीं धनी या लोकांचे ॥ ५२ ॥ कीं गुण अविद्यामय । ते लोक हा निश्चय । मी ईश्वर अद्वय । मीच माझा लोक मज वाटे ॥ ५३ ॥ जे ऐसे मद्रूप होती । तेचि त्या लोकातें पावती । वैकुंठ अपुनरावृत्ति गती । यालागीं बोलतो अर्जुना ॥५४॥ मातें ह्मणतां हा भाव । एथें सूचवी देवाधिदेव । एथेंही उपशब्द देव । पूर्वोक्त भावें बोलतो ॥ ५५ ॥ कीं मातें ह्मणतां मी निर्गुण । त्या मातें पावती ह्मणती सगुण । ऐसें ह्मणी कोणी शब्द निपुण । बोलती एथें ॥ ५६ ॥ ह्मणोनि ह्मणतां उप । अर्थ याचा समीप । तेव्हां मी वैकुंठनगररूप । त्या मातें ऐसें सूचवी ॥ ५७ ॥ वैकुंठ माझें स्वरूप । तेथें जे असती पावोनि मद्रूप । तितकेही मजसमीप । हें उप शब्दें सूचवी ॥ ५८ ॥ आणि या प्रकरणींच पुरुषोत्तम । यापुढें जो श्लोक पंचम । तेथें ह्मणेल कीं "तद्धाम परमं मम" । आधीं "यद्गत्वा न निवर्तंते" ह्मणोनी ॥ ५९ ॥ ज्यास अव्यक्त[1] अक्षर[2] ह्मणती । ज्यास ह्मणती परमगती[3] । ज्यातें पावोनि न परतती । तें परम धाम गृह माझें ऐसें बोलल ॥ ७६० ॥ तो अव्यक्त अक्षर आपण । तोचि धाम आपलें ह्मणे हे एथें खूण । सूचवी सर्वज्ञ निपुण । जें मातें ह्मणूनि या श्लोकीं बोलिला ॥६१॥ ऐसें ज्या पंचम श्लोकीं । त्यासही कोणी ह्मणतील कीं । सगुणाचें धाम निर्गुण इतकी । गोष्टी तेथें बोलतील ॥ ६२ ॥ ह्मणूनी त्याही पुढें श्लोक । तेथें ऐसें बोलेल उत्तमश्लोक । कीं "तद्धाम परमं मम" ह्मणजे वैकुंठलोक । अर्थ हाचि सिद्ध होय ॥६३॥ "पुरुषः स परः पार्थ । भक्त्या लभ्यस्त्वनन्यया" ऐसें समर्थ । बोलेल याचा विशदही अर्थ । होईल पुढें ते स्थळीं॥ ६४ ॥ एवं च पावेल मातें । हें ह्मणे वैकुंठ लोकातें । कीं जो पावला त्यातें । पुनर्जन्म न घडे ॥ ६५ ॥ कीं वैकुंठनाथ आणि वैकुंठवासी । चिद्रूपचि वैकुंठ वाटे इतकियांसी । मातें पावे ह्मणूनी अर्जुनासी । आणिका गहन भावेंही बोलिला ॥ ६६ ॥ कीं वैकुंठीं स्थळें दोनी । मुक्तस्थळ अमुक्तस्थळ ह्मणोनी । मुक्तस्थळास भक्त

१ अगोचर. २ अविनाश. ३ ज्या गतीस पोंचल्यावर पुनः जन्म येत नाहीं.

ज्ञानी । जाती न परतती ते पुन्हा ॥६७॥ ज्यांस नसोनि आत्मज्ञान । तीव्र घडलें सगुणध्यान । होतां देहावसान । तेंचि आठवे ॥ ६८ ॥ जो जें स्मरे देहांवसानीं । तो तेंचि रूप पावे ह्मणोनी । याच अध्यायीं स्वमुखेंकरूनी । मागें श्रीकृष्ण बोलिला ॥ ६९ ॥ देहावसानीं हरिस्मृती । त्या स्मरणें भगवदाकृती । परि संसारबीज प्रकृती । आत्मयोगें न भाजली ज्ञानाग्नींत ॥ ७७० ॥ अमुक्तस्थळ त्यांकारणें । तैसेंचि अनादि कल्पिलें नारायणें । तेथें त्यांस भेद स्फुरणें । आपण आणि तो लोक भिन्न ह्मणोनी ॥ ७१ ॥ तेथें द्वारपाळ जय विजय । त्यांसि अविदित ब्रह्म अद्वय । शाप ज्यां दोघांस होय । सनकादिकांचा ॥ ७२ ॥ तयांस भेदाचा प्रत्यय । ह्मणूनि च्यवले जय विजय । उगेंच वैकुंठ ह्मणतां संशय । पुनरावृत्तीचा पडेल ॥ ७३ ॥ हा पुराणोक्त त्यांचा इतका परिहार । बोलतां गीता वाढेल फार । ह्मणूनि मातें पावती ते न जन्मती मत्पर । इतकेंचि बोले ॥७४॥ कीं अद्वैत अनुभविती भक्त । तेचि त्या वैकुंठांचे मुक्त । ज्यांस न वाटे विभक्त । आपण वैकुंठ वैकुंठनाथही ॥ ७५ ॥ जेथें नसे द्वैतस्फुरण । तितकेंचि मी नारायण । आपले दृष्टीनें तो आपण । नव्हे ऐसें कांहीं असेचिना ॥ ७६ ॥ ह्मणूनि मातें पावले । ते पुन्हा जन्मास नाहीं आले । इतकेंचि भगवंत बोले । वैकुंठ न ह्मगे यास्तव ॥ ७७ ॥ प्रस्तुतां हटयोगियांस । साधनीं सांगोनि अति आयास । सिद्धीही जे तयांस । तेही ऐसी जेथूनि पुन्हा परतती ॥ ७८ ॥ आतां जे कर्मफळें । ब्रह्मलोकास गेले पुण्यबळें । त्यांतेंचि पुनरावृत्ति काळें । योगिया ऐसिया तों परतणें असेना ॥७९॥ त्यांत हाही हटयोगी । ब्रह्मरंध्र भेदूनि जगीं । पावोनि राहिला मोक्षालागीं । ब्रह्मलोकीं तया ॥ ७८० ॥ पुनरावृत्ति यास नसे । आणि ब्रह्मयासह मुक्ति गवसे । गति तों वाईट न दिसे । हटयोगिया ज्ञानियाची ॥ ८१ ॥ तेव्हां ज्ञानी आणि भक्त त्याहुनी । बरे बहुत काय ह्मणोनी । हेही शंका या श्लोकें करूनी । परिहारितो श्रीकृष्ण ॥ ८२ ॥

॥ श्लोक ॥ सहस्रयुगपर्यंतमहर्यद्ब्रह्मणो विदुः ।
रात्रिं युगसहस्रां तां तेऽहोरात्रविदो जनाः ॥ १७ ॥

॥ टीका ॥ युगें चारि क्रमती । त्यास एक युग ह्मणती । ऐसीं सहस्र युगें होती । तो ब्रह्मयाचा दिवस एक ॥ ८३ ॥ तैसा युग सहस्रांचा अंत । होय इतका काळ पर्यंत । रात्रीही थोर अत्यंत । ब्रह्मयाची ॥ ८४ ॥ ऐसे

---

१ देह समाप्ति, मृत्यु. २ द्वैताभास. ३ मी तूं पण.

दिवस ऐशा राती । अगा अर्जुना ते जाणती । जे प्राण मस्तकास नेऊनि जाती । परम गतीतें ह्मणूनि तूतें बोलिलों ॥ ८५ ॥ याकारणें ते । जन भगा अहोरात्र जाणते । दिवस जाला रात्रि होते । सत्यलोकीं ऐसें जाणती ॥ ८६ ॥ ऐसा क्रमतां काळ अत्यंत । होती ब्रह्मयाचीं वर्षे शत । काळाच्या मुखीं तोंपर्यंत । असावें तिहीं ॥ ८७ ॥ ऐसिया युगांच्या कोटी । क्रमितां भगा किरीटी । जेथें त्यांचे देह तो लोक शेवटीं । पडेल दाढेस काळाच्या ॥ ८८ ॥ जरी त्यांस पुनरावृत्ति नाहीं । असती काळाचिया चपेटियांत तेही । हे वार्ताही नेणती कांहीं । सद्य निर्गुण सगुण मोक्ष ज्यांला ॥ ८९ ॥ अगा जोंवरी काळाच्या प्रवाहीं । तोंवरी त्यांस सुख नाहीं । सुख जें वाटतें कांहीं । तेंही दुःखचि नश्वरत्वें ॥ ७९० ॥ अहोरात्र जाणती ते । ह्मणूनि भगवद्वाणी बोलते । त्यांत पूर्वानुसंधानें दाविते । भावार्थ इत्यादि ॥ ९१ ॥ कीं ज्ञानावांचूनि मोक्ष न घडे । तें ज्ञान होऊनि हटयोगाकडे । भरले ते वापडे । उकले ऐसा हा भाव ॥ ९२ ॥ देऊनि हातींचा विडा । तांबूल मागे वेडा । ज्यास होता ज्ञानें मोक्ष रोकडा । तो दाढेस पडला काळाच्या ॥ ९३ ॥ मोजूं लागला दिवस राती । युगसहस्रें ज्यांत जाती । हारवूनि हातींचें मोतीं । खडे मोजूं लागला ॥ ९४ ॥ घर पुसत नवरी आली । ते सेजारियास अनुकूळ केली । तीस कन्या होईल ते आपली । स्त्री करीन धरिली हे आशा ॥ ९५ ॥ ज्ञानें मोक्ष तत्काळ । तो टाकूनि योग फटकाळ । धरूनि मोजूं लागला काळ । ब्रह्मलोकीं मोक्षाकारणें ॥ ९६ ॥ योगभ्रष्ट मागें बोलिला । तो याहुनी कोटिगुणें भला । कीं एक जन्म जरीं अपक्क वायां गेला । दुसरेच जन्मीं तो सिद्ध ॥ ९७ ॥ एवं च हटयोगगती । ज्ञानियांस मागें वदला श्रीपती । "तेऽहोरात्रविदो जना" ह्मणूनि मागुती । ते ह्मणूनि तेथें पूर्वोक्त दाखविले ॥ ९८ ॥ कोणीं टीकाकार । हें अनुसंधान पूर्वापर । सोडोनि उगेंच इतर । "तेऽहोरात्रविदो" ह्मणोनी वाखाणिती ॥ ९९ ॥ पूर्वी बोलिले असावे । तरी ते ह्मणोनि सूचवावे । ज्यास जे मागें नसतीच ठावे । त्याणें ते ह्मणतां समजावे ते कोण ॥ ८०० ॥ न अनुसंधान सांपडे । भलतीकडे भरती बापडे । अनन्यशरणागततेंचि ठायीं पडे । यथार्थ अर्थ भगवद्वाणीचा ॥ १ ॥ इतर देवता पोटीं । भगवद्भक्ति ओठीं । भक्ति ह्मणावी तेथें थोटी । हाता गीतार्थ केवीं लागे ॥ २ ॥ तत्रापि हटयोगाचा बडिवार । ज्यास मिरवणें वारंवार । त्यास एथें चमत्कार । दृष्टी न पडती ॥ ३ ॥ हटयोगें पावले सिद्धी । हटयोगें आपल्या केल्या प्रसिद्धी । त्यांस हट-

योगेंचि वाटे समृद्धी । मोक्षाची ॥४॥ असो आतां हा श्लोक जाला । श्लोक दुसरा पुढें आला । तो हा श्लोक कां बोलियेला । तें निमित्त आधीं विचारावें ॥ ५ ॥ ब्रह्मयाचे दिवस आणि राती । जागती जे पावले ब्रह्मलोकगती । ह्मणूनि बोलिला वैकुंठपती । तरी तेथें कोणे रीती दिवस रातीही ॥ ६ ॥ उदय अस्त सूर्याचा नसे । दिनरात्री जाणती ते कैसे । ह्मणूनि ऐसें अर्जुन पुसे । तों स्वयेंचि बोलतो या श्लोकीं ॥ ७ ॥

॥ श्लोक ॥ अव्यक्ताद्व्यक्तयः सर्वाः प्रभवंत्यहरागमे ।
रात्र्यागमे प्रलीयंते तत्रैवाव्यक्तसंज्ञके ॥ १८ ॥

॥ टीका ॥ अगा ब्रह्मयाच्या दिवसाचा आगम । होतां सकळां भूतांचा उगम । प्रकृतीपासूनि होतां अवगम । ते जाणती त्याच्या दिवसाचा ॥८॥ आगम होतां रात्रीचा । लय होतो भूतांचा । तो रात्रिभाग ब्रह्मयाचा । जाणती ते ॥ ९ ॥ हीं भूतें दिवसा कोठोनि आलीं । आणि रात्रीं कोठें लय पावलीं । जेथूनि उपजलीं तेथें निमालीं । तें काय ॥ ८१० ॥ ऐसें पुसेल धनंजय । ह्मणूनि येथेंचि जगन्मय । हा ब्रह्मयाचा दिनप्रलय । आणि सृष्टि प्रतिदिवसाची हे सांगतो ॥ ११ ॥ अव्यक्तापासूनी । व्यक्ति होती ह्मणोनी । कारणापासूनि कार्य उपजे हें सूचवुनी । प्रतिदिनसृष्टि सांगतो ॥१२॥ व्यक्ति ह्मणजे आकृती । जीपासूनि होती ते प्रकृती । स्वयें आकृतिहीन यालागीं ह्मणती । अव्यक्त तीतें॥ १३ ॥ त्या अव्यक्ततत्त्वप्रकृतीपासूनी । स्थावरजंगमरूपें करूनी । व्यक्ति उपजती ह्मणोनी । अव्यक्त कारण व्यक्तींचें॥१४॥अव्यक्तापासूनी व्यक्ति होती । तो ब्रह्मयाचा दिवस ह्मणती । उपजल्या क्रमें लय पावती । त्याच अव्यक्तीं रात्री ते ॥ १५ ॥ युगें सहस्र क्रमती । तेव्हां आरंभे राती । मेघ पर्जन्यवृष्टि न करिती । मानवी वर्षें शतपर्यंत ॥ १६ ॥ अग्नीहूनि तीक्ष्ण । सूर्य तपेल ऐसें उष्ण । ते शोषितील किरण । रस वृक्षौषधिधान्यांचे ॥ १७ ॥ अन्नापासूनि उत्पन्न । तीं शरीरेंचि होती अन्न । अन्नावांचूनि क्षुधापन्न । एक एकांस भक्षिती ॥ १८ ॥ अन्नें भूमीपासूनि उपजती । तीं पुरिलीं पेरिलीं होतात माती । आपल्या कारणीं लय पावती । अन्नें ऐसीं ॥१९॥ शेषाचीं मुखें दशशत । विषाचा अग्नि त्यांतूनि अत्यंत । निघेल तो स्वर्गपर्यंत । करील भस्म ॥ ८२० ॥ मानवी शत वर्षेंपर्यंत । ऐसें अवर्षण होतां अत्यंत । त्यावरी वर्षती वर्षें शत । प्रलयमेघ दिनरात्री ॥ २१ ॥ हस्तीचे जेंवि शुंडादंड ।

१ इंद्रियागोचर जें तत्त्व ह्म० ब्रह्म त्याच्या आश्रयेपासून.

धारा स्थूळ ऐशा अखंड । मेघ वर्षतां जळ उदंड । आणि समुद्र तेव्हां सर्व लोटती॥ २२ ॥ स्वर्ग मृत्यु पाताळ । तिहीं लोकीं तेव्हां एक जळ । असंही नाहीं ऐसें सकळ । लोक तिन्ही विघरती ॥२३॥ महर्लोकापासूनी । वरील लोक प्रतिदिनीं । न जळती न बुडती ह्मणोनी । शास्त्र बोले ॥ २४ ॥ तेव्हां जीवोपाधि सकळ । अव्यक्ततत्त्वीं केवळ । तन्मय होती जैसें आटतां जळ । प्रतिबिंबें बिंबीं तैसे ब्रह्मीं जीवांश ॥२५॥ सृष्टि प्रलय ऐसा जगीं । तेचि दिवस आणि रात्री ते योगी । जाणती ह्मणूनि बोलणें लागलें याला-गीं । सृष्टि आणि प्रलय हा ॥ २६ ॥ ऐसा सृष्टिसंहार । विशद वर्णितां ग्रंथ वाढेल फार । परंतु अर्जुन समजला सविस्तर । महिमा चरणसंनिधा-नाचा ॥ २७ ॥ विश्वरूपीं श्लोक दुसरा । तेथें अर्जुन बोलेल सर्वेश्वरा । कीं सृष्टि संहार विस्तारें बरा । म्यां आइकिला तुजपासुनी ॥ २८ ॥ एवं च महत्तत्त्व आदिकरूनी । एक एकापासूनी तत्त्वें उपजोनी । सर्व एकत्र मि-ळोनी । उद्भवलीं भूतें ॥ २९ ॥ जें ज्यापासूनि जालें । तें प्रलयीं त्यामध्यें मिळालें । प्रलयलक्षण बोलिलें । याप्रकारें ॥ ८३० ॥ शेवटीं उरे प्रकृती । अव्यक्त तत्त्व तीस ह्मणती । तीपासूनी मागुतीं उपजती । त्याचि क्रमें व्यक्त तत्त्वें ॥३१॥ होतां महाप्रलय । हें अव्यक्ततत्त्वही पावे ब्रह्मीं लय । महासृष्टिकाळीं पुन्हा उदय । होय या अव्यक्तरूपिणी मायेचा ॥ ३२ ॥ अव्यक्ताचा लय उदय । न सांगतां दाखवी अभिप्राय । कीं सृष्टिसंहार ऐसा होय । ब्रह्मयाच्या प्रतिदिनीं प्रतिरात्रीं ॥ ३३ ॥ मागील हा प्रकार । पुढेंही वारंवार । ऐसेंचि होणार । ह्मणूनि ह्मणतो या श्लोकीं ॥ ३४ ॥

॥ श्लोक ॥ भूतग्रामः स एवायं भूत्वा भूत्वा प्रलीयते ।
रात्र्यागमेऽवशः पार्थ प्रभवत्यहरागमे ॥ १९ ॥

॥ टीका ॥ अगा पूर्वी भूतग्राम नाशला । तोचि हा जो दिसतो तुजला । उद्भव तरंगांस आतां जाला । परि मागील तरंगही हेच ॥ ३५ ॥ जें कालचें मृगजळ । तेंचि आजिचें हें केवळ । तैसा तोचि हा भूतांचा मेळ । खेळ त्याच प्रकृतीचा ॥ ३६ ॥ तें मृगजळ होत होत । अकस्मात् लयातें असे पावत । उपजे मध्यान्हकाळीं निश्चित । अवश्य लयातें पावे सायान्हीं ॥ ३७ ॥ तैसा भूतग्राम हा अत्यंत । वृद्धीतें पावत पावत । अवश्य लयातें असे जात । रात्रि आरंभतां ब्रह्मयाची ॥३८॥ ज्या अव्यक्त तत्त्वापासूनि-होय । त्याचिमध्यें पावे लय । हा प्रतिदिन उद्भव प्रलय । प्रवाह ऐसा सर्वदा ॥३९॥मागुती दिवसाचा आगम । होतां उपजतो हा भूतांचा ग्राम । अनादि

मायाप्रवाह नियम । अगा पार्था ये रीती ॥ ८४० ॥ आइकोनि हा उद्भव लय । शंकित जाला धनंजय । कीं सर्वही भगवंत अद्वय । तरी काय हाचि उपजतो नाशतो ॥ ४१ ॥ आणि हा तों अविनाशी नित्य । आणि हाचि नश्वर विश्व । सर्व हें सत्य । विश्व नाशतां भगत्य । नश्वरत्व लागे यासी ॥४२॥ ऐसा त्याचा भाव । जाणोनिहि देवाधिदेव । तो पुसे तों स्वयमेव । संशय परिहरितो या श्लोकीं ॥ ४३ ॥

॥ श्लोक ॥ परस्तस्मात्तु भावोऽन्योऽव्यक्तो व्यक्तात्सनातनः ।
यः स सर्वेषु भूतेषु नश्यत्सु न विनश्यति ॥ २० ॥

॥ टीका ॥ अगा जो भाव ह्मणिजे सत्ता । सनातन ह्मणिजे ज्यास नित्यता । तो अव्यक्त ज्याला व्यक्तता । कधींच नसे ॥४४ ॥ अव्यक्त ह्मणूनि येथवरी । जें मी बोलिलों तें तरी । मायातत्त्वविकार कारण परी । कारण तेंही अव्यक्त ॥ ४५ ॥ त्या मायातत्त्वा अव्यक्ताहूनी । हें वेगळें जें सत्तारूप अव्यक्त ह्मणोनी । तुज सांगतों यावरूनी । सत्ताहीन माया अव्यक्तत्व जाण ॥ ४६ ॥ सत्ताहीन अव्यक्त । तें कार्यरूपें होतें व्यक्त । व्यक्त ह्मणजे नानाकारें दिसे विभक्त । तें नश्वर कार्यरूप त्या अव्यक्त तत्त्वाचें ॥ ४७॥ एवं च सत्ताहीन । अभाव त्याचें अभिधान । ह्मणूनि भाव शब्द गहन । सत्तावाचक यालागीं ॥ ४८ ॥ कारणीं सत्ता नाहीं । तेव्हां कार्यास सत्ता नाहींच कांहीं । ज्यास सत्ता तें न पडे प्रवाहीं । कार्याचिया ॥ ४९ ॥ ब्रह्मही कारण माया प्रवाहाचें । परि माया मिथ्या ब्रह्म साचें । त्यास कार्यरूप होणें कैंचें । रज्जू जाला कधीं सर्प ॥ ८५० ॥ यालागीं अव्यक्त सत्ता मात्र चैतन्य । तें सत्ताहीना अव्यक्ततत्त्वाहूनि अन्य । परि सत्तेवांचूनि सत्ताहीन शून्य । कांहींच नसे ॥ ५१ ॥ ऐसें जतन होऊनि अद्वैत । नित्या अनित्यास साधे द्वैत । ऐसा चमत्कार भगवंत । बोलतसे या प्रसंगीं॥५२॥ कीं जो भाव सनातन । नश्वरा भूतीं असोन । भूतें नश्वरें पावतीं निधन । तो सत्तास्वरूप भाव नित्य नासेना ॥ ५३ ॥ सत्तास्वरूप तोचि भाव । सत्ताहीन भाग तो अभाव । यांत मायाशब्दार्थ देव । सूचवी टीकाकारातें ॥५४॥ मा ह्मणजे नसे । या ह्मणजे नसोनि दिसे । न दिसे तीच ते तरी ऐसे । विचार तिचे कां होते ॥ ५५ ॥ यालागीं जें दिसे । आणि विचारितां न गवसे । त्यास अभाव ह्मणती जैसे । अलंकार ॥ ५६ ॥ ज्यास सत्ता असे । स्वप्रकाशें स्वयें दिसे । त्यास भाव ह्मणावें ऐसे । दृष्टांत सूचवी एथें भगवंत ॥ ५७ ॥ कीं भाव जैसें कनक । भाव नाना अलंका-

री एक । हेमें असे ते नसती अनेक । अभाव नांव त्या अलंकारांचें ॥५८॥ सुवर्ण भाव तें नित्य । अभाव नग ते अनित्य । सोनें नित्य आणि सत्य । अनित्य असत्य ते अलंकार ॥ ५९ ॥ अलंकार नासती सकळ । सोनें त्यांत नासेना निखळ । यालागीं अव्यक्त मानावें केवळ । सुवर्ण तें ॥ ८६० ॥ आणि त्या सुवर्णी जे शक्ती । जे पावली या अहंकाराची व्यक्ती । ते स्वयेंचि पावली अभिव्यक्ती । नाना स्वकार्यरूपाची ॥ ६१ ॥ कार्यरूपें होते व्यक्त । परि कारणरूपें तेंही अव्यक्त । एवं अव्यक्त ह्मणणें युक्त । सुवर्णास सुवर्णशक्तीसही ॥ ६२ ॥ सुवर्णी शक्ति नसे । तरी सुवर्णत्वचि नासे । अलंकाररूपें जेव्हां दिसे । नासे दुग्धत्व जैसें दधि होतां ॥ ६३ ॥ दुधाचें जालें दहीं । दूधपण तेव्हां त्यास नाहीं । अलंकार होऊनिही कांहीं । विकार न घडे सुवर्णातें ॥ ६४ ॥ ऐसी चालतां युक्ती । सुवर्णी सांपडे शक्ती । किरीटकुंडलादि व्यक्ती । विलास कार्यरूपें हे तिचे ॥ ६५ ॥ तेही माया ह्मणावी ऐसी । कीं सुवर्णांत न दिसे जैसी । नाहीं ह्मणावी तरी कसी । अलंकारसृष्टि होते तीविण ॥ ६६ ॥ जें दुग्धाचें दधिपण । तें ह्मणावें शक्तिविण । विकारी निर्विकार सुवर्ण । शक्ती ऐसी दुग्धीं असेना ॥ ६७ ॥ ऐसी ब्रह्मीं माया । ते अव्यक्त ह्मणावी धनंजया । ती अभाव तीपरता भाव जो तया । अव्यक्त सनातन ह्मणावें ॥ ६८ ॥ जैसें नश्वरा अलंकारीं सुवर्ण । तैसें नश्वरा भूतीं तें पूर्ण । भूतें नाशतां तें आपण । नाश न पावे अलंकार नाशतां सोनें कदापिही ॥ ६९ ॥ जैसा हा दृष्टांत । तैसेंच अनुभविती संत । तैसिया टीकाकारास भगवंत । तैसे दृष्टांत येथें सुचवी ॥ ८७० ॥ जों सुवर्णाची झगमग । दृष्टी दिसेना तो नग । न दिसे तैसें दिसेना जग । जों न दिसे जग नगप्रकाशक सुवर्ण ॥ ७१ ॥ तेव्हां सोनेंचि आहे नग । ब्रह्मचि आहे जग । कार्य कारण दोनी प्रसंग । उडती ऐसे ॥ ७२ ॥ घट आणि जेंवि माती । कीं सुवर्ण आणि अलंकारजाती । ब्रह्म आणि जग तैसें ह्मणती । उपनिषद्भाग ॥ ७३ ॥ हे वेदोक्त दृष्टांत । अनुभव जाणती भक्त संत । परि भेदवादी विवादी अत्यंत । ते कोणकोणि युक्ति काढिती ॥ ७४ ॥ कीं सुवर्ण घडतें मोडतें । ब्रह्मसाम्य त्याला केंवि घडतें । ऐसें ह्मणती कीं न ह्मणतां उडतें । भेदवाद मत तयांचें ॥ ७५ ॥ नाहीं दृष्टांतीं सर्व साम्य । हें तरी केवळ अनुभवगम्य[1] । कमलासारिखे नेत्र रम्य । ह्मणतां येतें अंधत्व ॥ ७६ ॥ सिंह मारूनियां गजातें । ये पर-

[1] अनुभवानें समजतें.

तोंन आपल्या स्थळातें । शत्रु जिंकोन नगरातें । राजा पावला या दृष्टांतें ॥ ७७ ॥ क्रूरत्व शूरत्व सिंहाचें । दृष्टांतीं साम्य इतकेंचि साचें । सर्व साम्य घडणार कैंचें । दृष्टांत दार्ष्टांतिक दोहींस ॥ ७८ ॥ सिंह गेला आला एकला । राजा सेनेसहित गेला आला । सिंहास पुच्छ राजयाला । पुच्छ नसे ॥ ७९ ॥ घडे मोडे सुवर्ण । ब्रह्म अखंड परिपूर्ण । परि जगा नगा असत्यपण अनित्यपण । सत्यत्व नित्यत्व कनकातें ॥ ८८० ॥ ब्रह्मचि सर्व जग । सोनेंचि सर्वही नग । ब्रह्मत्व सुवर्णत्व दोहींस भंग । नसे दुग्धत्वभंग जैसा दधित्वीं ॥८१॥ आपल्या पाडें न नासे हेम । आपल्या पाडें न नासे ब्रह्म । निर्विकारत्वीं दोन्हीं सम । अनित्यांत नित्यें सम दोन्हीं ॥८२॥ विश्व अलंकार असत्य । ब्रह्म सोनें दोन्ही सत्य । विश्व अलंकार अनित्य । ब्रह्म हेम नित्य हे दोन्ही ॥८३॥ आयता घडला सुवर्णाचा नग । तैसें ब्रह्मीं ह्मणतां जग । अद्वैताचा मानूनि उबग । कां पूर्वदशा स्मरावी सुवर्णाची ॥८४॥ गोड जैसा गूळ । तैसेंचि गोड हें केळ । ऐसें बोलती सकळ । विरुद्ध सर्वथा ह्मणवेना ॥८५॥ पूर्वदशा स्मरावी गुळाची । मग गूळ समता केळास कैंची । ऊंस रस पाक पिळणी क्रिया साची । गुळाची नये केळातें ॥ ८६ ॥ हें विरुद्धत्व जैसें । कनक घडमोडीचें तैसें । अत एव सर्व शास्त्रें बोलती ऐसें । नाहीं दृष्टांतें सर्व साम्य ह्मणोनी ॥८७॥घडमोडी पूर्वदशा सुवर्णाची । ऊंस रस पिळणी पाक पूर्वदशा गुळाची । हें केळास नसोनि उपमा साची । केळ गुळाची पावतें ॥८८॥घडमोडी नसे ब्रह्मीं । घडमोडी असे हेमीं । तथापि उपमा निगमीं । हे प्रसिद्ध ॥८९॥ अरे आह्मांस सहाय वेद । कीं सहाय वेदवक्ता गोविंद । अनुभवगम्यही अभेद । संहारी प्रत्यक्ष भेदास तुमचिया॥८९०॥ जे अनुभवाचे अधिकारी । ते आशंका हे होऊनि वरी । गोष्टी येथवरी येतां शिरीं । धरिती अनुभवाहूनि पूर्वींही ॥९१॥ तुह्मीं होऊनेही निरुत्तर । सोडणार न व्हा करकर । कीं पित्तातुरास साकर । कडू लागे ॥९२॥ चंद्र नावडे तस्करा । प्रिय अत्यंत जो चकोरा । सूर्य पक्षिया[1] रजनीचरा । दिसेचि ना ॥९३॥ असो ते प्रस्तुतीं संदेह । हरतां पार्थ निःसंदेह । जग नश्वर तेव्हां ब्रह्म नश्वर हा मोह । पळे रज्जू कळतां सर्प जैसा ॥९४॥ नश्वरीं असोनि नव्हे नश्वर । तो सत्तास्वरूपभाव ऐसें सर्वेश्वर । वर्णूनि त्याचे ठायीं आदर । श्रोत्यास उपजवितो या श्लोकें ॥९५॥

---

१ घुबडास.

॥श्लोक॥ अव्यक्तोऽक्षर इत्युक्तस्तमाहुः परमां गतिम् ।
यं प्राप्य न निवर्तंते तद्धाम परमं मम ॥२१॥

॥ टीका ॥ अगा सत्तास्वरूप भाव । जो पूर्वश्लोकीं मी देवाधिदेव । तुज बोलिलों त्याचा प्रभाव । आईक पार्था ॥ ९६ ॥ याभावें ह्मणे सर्वेश्वर । कीं तो भाव अव्यक्त अक्षर । ह्मणूनि वेदांतवेत्ते चतुर । बोलती ॥ ९७ ॥ व्यक्ति नाहींच जया । अव्यक्त ह्मणावें तया । व्यक्ति तितकिया माया । तेही माया त्या वेगळी असेना ॥ ९८ ॥ ह्मणूनि सर्वही तो । वेदीं वेदांतीं बोलिजेतो । युक्ति अनुभवेंही दिसतो । अव्यक्तभाव तोचि सर्व ॥ ९९ ॥ परि पाहतां मागुती । यथास्थित त्याची स्थिती । अव्यक्त ह्मणावें ये रीती । कीं ते सत्ताच आकार विकार मायेचे ॥ १०० ॥ तो तीहूनि जेव्हां परता । मायेच्या कार्यरूपास येते क्षरता । यालागीं तो अक्षरही तत्त्वता । वेदां वेदांतीं बोलिला ॥ १ ॥ इति ह्मणजे याप्रकारें । अव्यक्त अक्षर या विचारें । तो बोलिजेतो निर्धारें । वेदीं आणि वेदांतीं ॥ २ ॥ आणि कैवल्य परम गती । ते तोचि जो भाव सत्तामात्र बोलती । कीं पावोनि कोण्ही न परतती । त्या सत्तास्वरूप भावातें ॥ ३ ॥ गति उदंडा असती । परि तेथूनि मागुती परतती । ह्मणूनि हे परमागती । न परतती पावोनि ज्या गतीतें ॥ ४ ॥ जेथूनि कोण्ही न परतती । मुक्ति ह्मणावी ते गती । ते चतुर्विध चतुर्विधांतही होती । प्रकार दोन्ही ॥ ५ ॥ कीं सायुज्यमोक्ष तो निर्गुण । सामीप्य सारूप्य सालोक्य सगुण । इतर गति स्थळें त्रिगुण । पुनरावृत्ति यालागीं ॥ ६ ॥ त्यांत तिसरिया चरणपर्यंत । निर्गुणमोक्ष बोलिला भगवंत । चतुर्थ चरणीं अनंत । सगुण मोक्षही तोचि भाव ऐसें बोलतो ॥ ७ ॥ चतुर्थचरण ॥ " तद्धाम परमं मम " ॥ टीका ॥ अगा माझें धाम । धाम ह्मणिजे गृह वैकुंठ परम । तेंही तेंचि सत्तामात्र निर्गुण ब्रह्म । कीं इतर प्रत्यय जेथें असेना ॥ ८ ॥ कीं जेथें रज तम । तेथें न स्फुरे सत्तामात्र निर्गुण ब्रह्म । शुद्ध सत्त्वें तेंचि परम । स्फुरे यालागीं तेंचि तें ॥ ९ ॥ धाम शब्दें घर । वैकुंठ शुद्ध सत्त्वाकार । तें सत्त्व आणि अव्यक्त अक्षर । न स्फुरती जेथें भिन्नत्वें ॥२१०॥ यालागीं तेंचि आपलें धाम । वैकुंठनगराकार परम । जैसें त्रिगुण अविद्यारचित स्थावर जंगम । धाम तैसें नव्हे तें माझें ॥ ११ ॥ आब्रह्मभुवन लोक । तेथें पुनरावृत्तीचा असे शोक । मातें पावोनि कोण्ही एक । न परते ऐसें मागें बोलिला ॥ १२ ॥ आणि मीच वैकुंठ लोक । या भावें त्या श्लोकीं उत्तमश्लोक । बोलिला कीं

मातें पावोनि तो कोणी एक। पुनर्जन्म नाहीं पावला ॥ १३ ॥ तेंचि येथें स्पष्टतर । बोलतसे सर्वेश्वर । कीं जें अव्यक्त अक्षर । मझें परम धाम तें तेंचि ॥ १४ ॥ कीं मीच तें अव्यक्त अक्षर । तें अव्यक्त अक्षरचि माझें घर । तेव्हां त्यातें जे पावले नर । ते मातेंचि पावले ॥ १५ ॥ मोक्ष बोलोनि निर्गुण । त्यापुढेंचि बोलतो मोक्ष सगुण । हे येथें दावूनि खूण । स्पष्ट चतुर्दशीं बोलेल ॥ १६ ॥ "परं भूयः प्रवक्ष्यामि" । या श्लोकीं मुमुक्षूचा स्वामी । या ज्ञानें मोक्ष निर्गुण ब्रह्मीं । सर्वही मुनि पावले ह्मणेल ॥ १७ ॥ "इदं ज्ञानमुपाश्रित्य" या श्लोकीं । सगुण मोक्ष बोलेल कीं । माझें साधर्म्य वैकुंठलोकीं । याचि ज्ञानें पावले ॥ १८ ॥ ते सृष्टिकाळीं न जन्मती । ते प्रळयीं व्यथेतें न पावती । तेंचि या मोक्षप्रकरणीं श्रीपती । द्विविध मोक्षही बोलतो ॥ १९ ॥ अर्थ ऐसा असोनी । जे अभक्त निर्गुण ज्ञानी । ते सगुणाचें धाम निर्गुण ह्मणोनी । "तद्धाम परमं मम" व्याखाणिती ॥ ९२० ॥ पुढिलिया श्लोकें करूनी । तो पुरुष अनन्यभक्तिलभ्य ह्मणोनी । बोलेल त्यावरूनी । समाधान याही शंकेचें होणार ॥ २१ ॥ आतां सगुण टाकूनि निर्गुण एक । उपासिती अभक्त निर्गुणोपासक । त्यांस वैकुंठ नसे हें वैकुंठनायक । त्या पुढिलिया श्लोकीं बोलेल ॥ २२ ॥ आणि सगुण भक्त ज्ञानहीन । तेही न पावती कीं विना ज्ञान । मोक्ष नसे जे ज्ञानी भक्तजन । तेचि पावती ह्मणतसे या श्लोकीं ॥ २३ ॥

॥ श्लोक ॥ पुरुषः स परः पार्थ भक्त्या लभ्यस्त्वनन्यया ।

॥ टीका ॥ जो वसे त्या वैकुंठपुरीं । तो पुरुष ह्मणावा यापरी । ज्ञानियास वास वैकुंठनगरीं । त्याच्या अनन्य भक्तीनें ॥ २४ ॥ या भावें ह्मणे पार्था आइक । जो वैकुंठ वैकुंठनायक । जो वैकुंठपुरवासी वैकुंठदायक । लभ्य तो पुरुष तों अनन्य भक्तीच करूनी ॥ २५ ॥ अन्य नव्हे आपला आत्मा । तोंचि अपरोक्ष होतां परमात्मा । जे आत्मत्वप्रीति परमा । तेचि परमात्मयाची होतसे ॥ २६ ॥ बृहदारण्य उपनिषद्भागीं । याज्ञवल्क्य मैत्रेयी स्वस्त्रियेलागीं । आत्मत्व उपदेशी महायोगी । भक्तियोगेंचि करूनी ॥ २७ ॥ कीं भ्रतारास बाईल । स्वनिमित्ताचि प्रिय होईल । सुत धन वित्त सकळ । आवडे ज्या आत्मयाच कारणें ॥२८॥ तो आत्मा जाणावा । तो श्रवण मनन निदिध्यासें पहावा । एवं पावणें सर्वात्मभावा । याच भावडी करूनी ॥ २९ ॥ प्रिय आत्मा सर्वांहुनी । तो सर्व तोंचि आत्मा ह्मणोनी । उपासिती भक्त जे ज्ञानी । मानूनि तेंचि सर्व गुणत्व

॥ १३० ॥ त्या आत्मप्रीतीनें तें सगुण । अनन्यत्वें भजतां तेंचि निर्गुण । ऐसे जे ज्ञानी भक्त निपुण । वैकुंठपुरपति पुरुष लभ्य त्यांतेंचि ॥ ३१ ॥ पूर्व श्लोकीं "तद्धाम परमं मम" । ह्मणतां सूचविलें वैकुंठ धाम । येथें ह्मणे पुरुषोत्तम । तो पुरुष 'अनन्यभक्तिलभ्य' ह्मणोनी ॥ ३२ ॥ वैकुंठीं मुक्ति सगुण । मुक्ति तेही नसे ज्ञानाविण । चतुर्दशीं बोलेल हे खूण । "इदं ज्ञान-मुपाश्रित्य" या श्लोकीं ॥ ३३ ॥ ज्ञान ज्यास भक्तीवांचूनी । निर्गुण मोक्ष पावती ते ज्ञानी । ज्ञानें आणि भक्तीकरूनी । वैकुंठ लभ्य ॥ ३४ ॥ सगुणीं ज्ञानियां भक्ती । ते अनन्य भक्ती दे सगुण मुक्ती । त्या सगुण मुक्तीची अभिव्यक्ती । वैकुंठ लोकीं मग नित्य ॥३५॥ यालागीं "तद्धाम परमं मम" । ऐसें पूर्वश्लोकीं वैकुंठधाम । स्वस्वरूप बोलोनि येथें पुरुषोत्तम । अनन्य भक्तिलभ्य ह्मणतसे तो पुरुष ॥ ३६ ॥ भक्ति शब्द गीतेंत जेथें । सगुणो-पासना सिद्ध तेथें । ह्मणूनि ह्मणे भगवंत येथें । "भक्त्या लभ्य" ह्मणोनी ॥ ३७ ॥ तथापि भक्ति जे ज्ञानावांचूनी । मुक्ति नव्हे ते भक्तीकरूनी । अनन्य पद येथें ह्मणोनी । भक्ति शब्दीं योजिलें ॥ ३८ ॥ आतां अनन्य भक्तीकरूनी । निर्गुणोपासकचि पावती ह्मणोनी । ह्मणतां सगुण भजना-वांचुनी । भक्त न ह्मणवे तयांतें ॥ ३९ ॥ कीं भक्तीची खूण । जे ते नेणे निर्गुण निर्धर्मपण । त्याच्या भक्तीनें कवण । फलप्राप्ती ॥ १४० ॥ मागें चतुर्थी हा विचार । जाला पुढेंही होणार । चित्तचि करणें निर्गुणाकार । भक्ति करणें साक्षिया सगुणाची ॥ ४१ ॥ ज्ञान ज्याचें तो निर्गुण । भक्ति ज्याची तो सगुण । ऐसा भगवदुपदेशें होऊनि निपुण । द्वादशीं अर्जुन ऐसें बोलेल ॥४२॥ द्वादशाध्याय श्लोक ॥ एवं सततयुक्ता ये भक्तास्त्वां पर्यु-पासते । ये चाप्यक्षरमव्यक्तं तेषां के योगवित्तमाः ॥ टीका ॥ ऐसे सर्वदा युक्त । जे तूतें उपासिती भक्त । आणि जे उपासिती अक्षर अव्यक्त । यांत कोण अधिक योगवेत्ते तें सांग ॥ ४३ ॥ एवं च उपासिती अव्यक्त अक्षर । अर्जुन भक्त न ह्मणे ते नर । जे सगुणभजनीं तत्पर । भक्त तेचि ॥ ४४ ॥ हे आलीकडील अध्याय । येथें संकेत हे धनंजय । समजूनि क-रूनि निश्चय । भक्त ते सगुण भक्तचि ह्मणतसे ॥ ४५ ॥ कीं भक्ताची भक्ति जैसी । प्रीति देवाची त्यावरी तैसी । सप्तमीं स्पष्ट रीति ऐसी । बोलि-ली आणि चतुर्थी "ये यथा मां" या श्लोकीं ॥४६॥ सप्तमीं ह्मणे भगवंत । कीं प्रिय ज्ञानिया भक्तास मी अनंत । आणि तोही प्रिय मज अत्यंत । ...

"प्रियो हि ज्ञानिनोत्यर्थमहं" या अर्थी ॥ ४७ ॥ निर्गुणीं भक्ति तरी घडती । कीं परस्पर प्रीति जरी दिसती । एवं च निर्गुणध्यान सगुणीं प्रीती । प्रस्तुतीं प्राप्ति सगुणाची बोलिली अनन्यभक्तीनें ॥ ४८ ॥ कीं येथें भक्तीच करूनी । लभ्य तो पुरुष ह्मणोनी । श्रीकृष्ण ह्मणे यावरूनी । तो पूर्वश्लोकोक्त सगुणचि लेखावा ॥ ४९ ॥ तो तरी अव्यक्त अक्षर । ह्मणूनि ह्मणे सर्वेश्वर । उगाच अर्थ त्याचा करावा सगुणपर । तरी माझें धाम जो पूर्वश्लोकीं ह्मणतो तो श्रीकृष्णही सगुण ॥ ९५० ॥ तेव्हां सगुण सगुणाचें धाम । तें ह्मणावें वैकुंठचि परम । जरी अव्यक्त अक्षर निर्गुण ब्रह्म । तरी भक्तिलभ्य तो न ह्मणवे ॥ ५१ ॥ "ये यथा मां प्रपद्यंते" या श्लोककरूनी । "तांस्तथैव भजाम्यहं" ह्मणोनी । कृष्ण ह्मणे यावरूनी । निर्धर्म भक्तीनें फलप्रद सगुणही होईना ॥ ५२ ॥ आतां भक्तीनें ज्ञान होतें ह्मणोनी । लभ्य तो पुरुष भक्तीकरूनी । ह्मणावें तरी प्रकरणावरूनी । अर्थ बोलावा ॥ ५३ ॥ ज्ञानप्राप्तिप्रकरणीं । योजेल तैसी गोविंदवाणी । ज्ञानियां भक्तास भक्तपणीं । मुक्ति येथें बोलतो ॥ ५४ ॥ भक्ति न फळे निर्गुणीं । आणि ते भक्ति पावेना सगुणीं । एवं भक्ति ह्मणतां काहणी । नव्हे निर्गुणाची आणि प्रसंग मुक्तीचा ॥ ५५ ॥ कीं त्यास ह्मणती परमागती । ज्यास पावोनियां न परतती । तो भक्तीनें लभ्य ह्मणे श्रीपती । प्रसंगचि मुक्तिप्राप्तीचा ॥ ५६ ॥ एवं तो पुरुष भक्तीकरूनी । लभ्य ह्मणतां यावरूनी ।"तद्धाम परमं मम" ह्मणोनी[1] । वैकुंठचि वर्णिलें हें स्पष्ट ॥ ५७ ॥ आतां अनन्य भक्तीकरूनी । बोलिला तो लभ्य ह्मणोनी । तें अनन्यत्वचि स्वमुखेंकरूनी । उत्तरार्धें विशद बोलतो ॥ ५८ ॥

॥ उत्तरार्ध ॥ यस्यांतःस्थानि भूतानि येन सर्वमिदं ततम् ॥ २२ ॥

॥ टीका ॥ अगा तो पुरुष असता अन्य । तरी भक्ति न घडती अनन्य । अनन्य भक्ती करिती धन्य । कीं तो अनन्य ह्मणोनी ॥ ५९ ॥ तरंग जैसे सागरीं । ऐसीं भूतें ज्या अंतरीं । तरंग सागरें व्यापिले यापरी । ज्याणें व्यापिलें हें सर्व ॥ ९६० ॥ ऐसा अनन्यत्वें भजती । सुलभ त्यांस तो वैकुंठपती । आत्मत्वें पूर्वोक्त रीती । ध्याती जयातें ॥ ६१ ॥ भृंगकीटकन्यायें करूनी । ध्येयचि होती जीवंत असोनी । देह पडतां तद्रूप होउनी । त्यास पावती नवल काय ॥६२॥ जों विश्वात्मत्व न कळे मना । तों आत्मत्वें ध्यान बाणेना । विश्वात्मत्वें जाणोनि जगज्जीवना । आत्मत्वें

---

[1] श्लोकार्धांत.

ध्यातां तोचि तें ॥ ६३ ॥ ऐसें मोक्षप्रकरण । प्रसंगें अन्या गतींचेंही विवरण । करितो. जगद्वंद्यचरण । कीं त्यांत पुनरावृत्ति कळाव्या ॥ ६४ ॥ त्या गति पुनरावृत्ती । आणि मोक्ष पावले ते न परतती । त्या मोक्षांत दोन रीती । एक निर्गुण सगुण एक ॥ ६५ ॥ ज्ञानावांचूनि मोक्ष न घडे । त्यांत सगुणमोक्ष लागला भक्तांकडे । निर्गुणोपासकां निर्गुण आवडे । त्यांस निर्गुण मोक्ष कैवल्य ॥ ६६ ॥ त्या निर्गुणमोक्षीं भिन्न रीती । यद्यपि कोणासही नसती । परि प्राप्ति त्यांची बोलती । एक सद्य एक क्रमें करूनी ॥ ६७ ॥ ज्ञानयोगींच ज्यांचा श्रम । ते देह पडतांचि पावती ब्रह्म । जे हटयोगीं मांडिती आक्रम । क्रममुक्ती बोलिली तयांसी ॥ ६८ ॥ कीं हटयोगाकडे भरले । ज्ञानी अपक्क होऊनि उरले । ते ब्रह्मलोकास अनुसरले । ब्रह्मरंध्र भेदूनी ॥ ६९ ॥ त्यांचा बोलतां श्रमप्रसंग । ह्मणी सभय होथि अर्जुनाचें अंतरंग । ह्मणूनि "अनन्यचेता" या श्लोकीं श्रीरंग । भक्तांस सुलभ आपण ऐसें बोलिला ॥ ९७० ॥ सुलभ होऊनि अत्यंत । सुख जें देतो त्यास नाहीं अंत । ह्मणूनि "मामुपेत्य" या श्लोकें अनंत । अपुनरावृत्ति आपली प्राप्ति बोलिला ॥ ७१ ॥ ज्या हटयोगियांच्या कष्टावरूनी । भक्तांस अनायासें लभ्य ह्मणोनी । बोलिला ते हटयोगीही ब्रह्मलोक पावोनी । कैवल्य अपुनरावृत्तीच पावती ॥ ७२ ॥ गति भक्तांची न पावले । तरी निर्गुणोपासकांसमान आले । ह्मणूनि "आब्रह्मभुवनाल्लोका" हा श्लोक बोले । त्या श्लोकापुढेंचि उत्तमश्लोक ॥ ७३ ॥ कीं हटयोगी ब्रह्मलोकाप्रती । डोई फोडोनि घेऊनि जाती । परि तेथें इतर पावले ते च्यवती । कीं ब्रह्मादि सर्व देवतास्थानें ऐसींच ॥ ७४ ॥ बरें ज्या ब्रह्मलोकातें पावले । तेथूनि इतर जरी च्यवले । हे तों महाप्रलयपर्यंत राहिले । तेव्हां तरी पावलेच कैवल्य ॥ ७५ ॥ ह्मणूनि मागुतीं निर्गुणोपासकांसमान । त्यांतें ह्मणी मानील अर्जुन । यद्यपि या प्रसंगींच्या हटयोगियांसही ज्ञान । तरी अपक्कमोक्ष बहु विलंबेंकरूनी ॥ ७६ ॥ ह्मणूनि ब्रह्मयाचा दिवस । लांबच लांब क्रमणें तयांस । लांबच लांब रात्रीही जयांस । क्रमणें मोक्षेच्छें करूनी ॥ ७७ ॥ एक अमृतपान करिती । एक त्याकारणें लाळ घोंटिती । बहुता विलंबें तेही पिती । तरी बहु उणें त्याहूनी ॥ ७८ ॥ या भावें ब्रह्मयाच्या दिनराती । सहस्र युगपर्यंत या श्लोकें श्रीपती । वर्णी तेथें खुणावी अर्जुनाप्रती । कीं "तेऽहोरात्रविदो जनाः" ह्मणोनी॥७९॥ तों ब्र-

---

१ ज्याचे चरण जगाला वंद्य. २ पुनर्जन्म नाहीं अशी. ३ चलन पावतात.

ब्रह्म्याचें अहोरात्र कैसें । ते जाणती ह्मणूनि अर्जुन पुसे जों ऐसें । "अव्यक्ताद्यक्त" या श्लोकें जगन्निवासें । केलें त्याचें समाधान ॥ ९८० ॥ त्या प्रसंगें उत्तमश्लोकें । "भूतग्रामः स एवायं" या श्लोकें । सांगितलें अर्जुनास इतुकें । कीं तोच हा ग्राम भूतांचा ॥ ८१ ॥ प्रतिदिनीं प्रकृतीपासूनि उपजतो । प्रतिरात्रीं तीमाजीं लय पावतो । परि हटयोगियाचा प्रसंग तो । तुटला नाहीं ॥ ८२ ॥ या प्रसंगें भूतें नश्वर । परि भूतात्मा अविनाशी अक्षर । ऐसें बोलिला सर्वेश्वर । परि प्रसंग त्याच हटयोगियाचा ॥ ८३ ॥ कीं तदर्थ ब्रह्मयाच्या दिनराती । सांगतां भूतें उपजती नाशती । त्या प्रसंगें ह्मणे जगत्पती । कीं भूतें क्षर तो अक्षर ॥ ८४ ॥ ह्मणूनि अव्यक्ताक्षर । या पूर्वश्लोकीं सर्वेश्वर । त्याच्या ठायीं उपजवी आदर । कीं तोचि परमगती तोचि धाम माझें ॥ ८५ ॥ या श्लोकीं अनन्यभक्तीकरूनी । तो पुरुषलभ्य ह्मणोनी ॥ बोलिला स्वमुखें करूनी । परि प्रसंग त्याच हटयोगियाचा ॥ ८६ ॥ आतां ब्रह्मलोकास जाती । ते ह्मणावी उत्तरायणगती । कीं ते उत्तरायणकाळही अपेक्षिती । त्या काळीं भेदिती ब्रह्मरंध्र ॥ ८७ ॥ अपक्क तरी ज्ञानी । आणि उत्तरायणीं ब्रह्मरंध्र भेदूनी । जाती ते परतती । ब्रह्मलोक तो ॥ ८८ ॥ न सांपडे उत्तरायण । आणि त्याकाळीं दक्षिणायन । तरी योगी परतती हें जगज्जीवन । येथूनि पुढें बोलेल ॥ ८९ ॥ परि हटयोगियांचें प्रकरण । बोलतां मध्यें आलें ऐसें विवरण । ह्मणूनि जगद्वंद्य चरण । प्रसंगें अनुसंधान लावितो या श्लोकीं ॥ ९९० ॥

॥ श्लोक ॥ यत्र काले त्वनावृत्तिमावृत्तिं चैव योगिनः ।
प्रयाता यांति तं कालं वक्ष्यामि भरतर्षभ ॥ २३ ॥

॥ टीका ॥ यत्र ह्मणजे ज्या मार्गीं । काले ह्मणजे ज्या काळीं ते योगी । गेले ते जाती अपुनरावृत्तिलागीं । ह्मणूनि त्या मार्गातें त्या काळातें सांगेन ॥ ९१ ॥ आणि ज्या मार्गीं ज्या काळीं योगी । गेले ते जाती पुनरावृत्तीलागीं । तो मार्ग तो काळही यथाविभागीं । सांगेन तुज ॥ ९२ ॥ एथें भरतर्षभा ह्मणूनी । अर्जुनातें या नांवें करूनी । आळवी हृदयीं धरूनी । गूढभाव ॥ ९३ ॥ कीं सोमदत्ताचा पुत्र । वाल्मीकाचा पौत्र । तोही भरतकुलोत्पन्न पवित्र । युद्धीं हटयोगें शरीर सोडील ॥ ९४ ॥ द्रोणपर्वीं जयद्रथवधीं । सात्यकी अर्जुनातें व्यूहांत शोधी । त्याशीं भूरिश्रवा भांडे तधीं । छेदील बाहु त्याचा अर्जुन ॥ ९५ ॥ त्यागें ऐसा उचलिला कर । त्या घायें तुटे सात्यकीचें शिर । तों दुरूनि अर्जुनें हाणोनि शर । बाहूच

त्याचा उडविला ॥ ९६ ॥ बाहू गेलियावरी । तो रणींच बाण पसरी । बैसोनि त्या आसनावरी । जाय ब्रह्मरंध्र भेदूनी ॥९७॥ त्यास देखोनि नव-नीं । अर्जुन हा प्रसंग स्मरेल मनीं । तेव्हां भक्त थोर हटयोगियाहुनी । तेंही स्मरेल ॥ ९८ ॥ हे खूण अर्जुनातें एथें न वाणे । परि भविष्य भगवंत जाणे । त्या भावेंकरूनि ह्मणे । अगा भरतर्षभा ह्मणोनी ॥ ९९ ॥ श्लो-कार्थ एतत्प्रकार । परि एथें टीकाकार । यत्र शब्द काळ शब्द यांचा अर्थ-विचार । वेगळा न करिती ॥ १००० ॥ एथेंचि वाट चुकती । पुढें भोंवों लागती । मग जैसी तैसी गती । कल्पिती पुढिल्या श्लोकांची ॥ १ ॥ एथें ह्मणे सांगतों काळ । आणि पुढें बोलेल जंजाळ । अग्निज्योती ज्वाळ । आणि धूमादिकें मार्गीं दुसरिया ॥ २ ॥ आणि पूर्वानुसंधानप्रसंग । मागी-ल हटयोगियाचा योग । त्यातें ब्रह्मलोकीं क्रममुक्तियोग । हें कांहींच न सुचे तयांसी ॥ ३ ॥ सद्यमुक्ती ज्यांला । त्यांचा हा प्रसंग वाटे त्यांला । तेव्हां उत्तरायणच ज्ञानियांला । अगत्य नसे हें श्रुतिसिद्ध ॥ ४ ॥ आणि या शुक्ल कृष्णगती । सांगोनि त्यापुढें श्रीपती । ह्मणेल कीं " नैते सृती । पार्थ जानन् योगी मुह्यति कश्चन " ॥५॥ कीं पार्था या गती । जाणोनि योगी न मोहती । तरी तूं अगा महामती । होईं योगयुक्त सर्वदा ॥ ६ ॥ एवं च सद्य मोक्षातें पावती । त्यांचा प्रसंग न वदे हा श्रीपती । ऐसें पूर्वापर न पा-हती । आणि सगट वाखाणिती हे गीता ॥ ७ ॥ असो तें पुढें वाईट बरें । अवघेंचि कळेल खोटें खरें । परंतु निर्मत्सरीं आदरें । पाहावा अर्थ ॥ ८ ॥ जैसें बोलतो चक्रपाणी । तदनुरूपचि त्याची वर्णिजेल वाणी । तें सोडोनि कल्पित काहाणी । बोलती त्यांची भीड काय॥९॥ पुढें काळ आणि मार्ग । दोन्ही वर्णील श्रीरंग । तो सांगेन ह्मणतो प्रसंग । यत्र आणि काळ ह्मणूनि या दों शब्दीं ॥ १०१० ॥ " यत्र प्रयाता गच्छंति " । आणि " यत्र काले प्रयाता " ऐसे रीती । यत्र शब्दाचे अन्वय ऐसें सूचविती । मार्ग आणि काळ दोहींतें ॥ ११ ॥ "न तद्भासयते सूर्यो " या श्लोकांत । " भासयते " हा शब्द सूर्याजवळींच भगवंत । बोले परि शशांक पावकपर्यंत । तिहीं ठायीं दावी " भासयते " योजावें ये रीती ॥ १२ ॥ ये रीती दोहींकडे । यत्र शब्दाचा अन्वय घडे । तरी यथास्थित अर्थ सांपडे । पुढिलिया श्लोकांचा ॥ १३ ॥ आणि ब्रह्मलोकास जाऊनि मुक्ति । पावती ह्मणतां साधे भगवं-ताची उक्ती । उत्तरायणीं अपुनरावृत्ती । त्या हटयोगियास ॥ १४ ॥

आतां काळ उत्तरायण । तेव्हां जातां मार्गीं कोण कोण । देवता भेटती हें नारायण । नरास सांगतो या श्लोकीं ॥ १५ ॥

॥ श्लोक पूर्वार्ध ॥ अग्निर्ज्योतिरहः शुक्लः षण्मासा उत्तरायणम् ।

॥ टीका ॥उत्तरायणीं ब्रह्मरंध्र फुटे । तो योगी ब्रह्मलोकास जातां वाटे । त्यास मूर्तिमंत अग्नि भेटे । आणि ज्योतिर्देवता मूर्तिमंत ॥ १६ ॥ या मार्गाच्याच देवता । अग्नि ज्योति दोघी मूर्तिमंता । एथूनि काळ देवता आतां । अहः शुक्ल इत्यादि ॥ १७ ॥ उत्तरायण सामास । तो देवतांचा एक दिवस । ह्मणूनि वाटेस भेटे त्यास । मूर्तिमंत दिवसही ॥ १८ ॥ ऐशा देवांचिया प्रतिदिनीं । ब्रह्मलोकमार्ग मोकळा होतो ह्मणोनी । जो जातो ब्रह्मरंध्र भेदूनी । त्यास त्या देवता पाववितीं ब्रह्मलोका ॥ १९ ॥ या मार्गीं देवता जितकिया । प्रकाशरूपा तितकिया । अग्नि ज्योति दिवस इतकिया । प्रकाशरूपा प्रत्यक्ष ॥ १०२० ॥ तैसाच शुक्लपक्ष । मूर्तिमंत त्या मार्गीं त्यास होय प्रत्यक्ष । जो उत्तरायणीं जातो दक्ष । ब्रह्मरंध्र भेदूनियां ॥२१॥तैसेंच मकरसंक्रांतीपासूनि मिथुनपर्यंत । सौरमास साहा प्रकाशवंत । देवांचिया दिवसाचे भाग अत्यंत । प्रकाशरूप मूर्तिमंत ते साही ॥ २२ ॥ तैसाच उत्तरायण काळ । देवांचा दिवस मूर्तिमंत अति उज्ज्वळ । ब्रह्म भवन विशाळ । पाववितीं तेथें योगिया तयातें ॥ २३ ॥ उत्तरायणाचि साहामास । उत्तरायणचि देवांचा दिवस । परि उत्तरायण काळ मानवांस । ह्मणूनि वेगळालीं तद्रूपें ॥ २४ ॥ दिवसा मार्ग वाहती । देव उत्तरायणीं ये रीती । आपल्या दिवसांत पाववितीं । ब्रह्मलोकीं योगियास ॥ २५ ॥ एवं ब्रह्मलोकास तो पावला । जो उत्तरायणीं योगी ज्ञानी गेला । ब्रह्मया सांगातें त्याला । ब्रह्मप्राप्तीही ॥ २६ ॥ परंतु या श्लोकीं जरी । ब्रह्म जाणे गुरुमुखें तरी । ब्रह्मयास मोक्ष होतेअवसरीं । निर्गुण ब्रह्मसायुज्य तो पावे ॥ २७ ॥ हा भाव उत्तरार्धेकरूनी । दाखवितो स्पष्टही वंदूनी । परि तो अपक्व आणि हटयोगी ह्मणोनी । उत्तरायण अपेक्षित तयासी ॥ २८ ॥

॥ श्लोकोत्तरार्ध ॥ तत्र प्रयाता गच्छंति ब्रह्म ब्रह्मविदो जनाः ॥ २४ ॥

॥ टीका ॥ तत्र ह्मणजे तेथें । मार्गीं देवता या जेथें । आणि तत्र शब्दीं येथें । त्या काळीं हाही अर्थ ॥ २९ ॥ कीं 'तत्र प्रयाता' ह्मणजे त्या मार्गीं गेले । ते ब्रह्मवेत्ते ब्रह्म पावती ऐसें बोले । आणि "यत्र काले त्वनावृत्तिं" ऐसें श्लोकीं पहिले । बोलिला ह्मणूनि तत्र त्या काळींही ह्मणावें ॥ १०३० ॥

आणि ज्या काळीं न परते ह्मणोनी । बोलिला तो काळ उत्तरायण शब्दें करूनीं । बोले आणि दैवतें कालाभिमानी । त्या प्रसंगें त्या मार्गीचीं वर्णि-लीं ॥ ३१ ॥ एवं तत्र शब्दें त्या मार्गी त्या काळीं । जे गेले ह्मणे वनमा-ळी । ते पावती ब्रह्मीं केवळीं । ब्रह्मवेत्ते जन ह्मणोनी ॥ ३२ ॥ ऐसे जे ब्रह्मवेत्ते पावती ब्रह्म । ह्मणूनि विरोध बोले पुरुषोत्तम । कीं तो विरोध परिहरितां अवगम । व्हावा यथार्थ अर्थाचा ॥ ३३ ॥ कीं ब्रह्मवेत्ते याचे प्राण । देहाबाहेर न करिती प्रयाण । ऐसें श्रुति बोलती ब्रह्मनिर्वाण । ब्रह्म-ज्ञानियाचें ॥ ३४ ॥ प्रयाणचि मिथ्या त्याचें । त्यास वाटे देवता भेटणें कैंचें । "तत्र प्रयाता गच्छंति ब्रह्म" ह्मणूनि साचें । भगवद्वचन तों ये रीती ॥ ३५ ॥ एवं नव्हे हे सद्यमुक्ती । क्रममुक्तीविषयीं हेंच उक्ती । येथें युक्ति प्रयुक्ती । राहिल्या सर्व ॥ ३६ ॥ एवं क्रममुक्ति ज्याला । उत्तरा-यण पाहिजे त्याला । सद्यमुक्तीच्या अधिकारियाला । श्रुति नलगे ह्मणती उत्तरायण ॥ ३७ ॥ ब्रह्मसूत्र वेदश्रुती । ज्ञानियास उत्तरायण नलगे ह्मण-ती । तरी हे सद्यमुक्तीस आणि जो प्रस्तुतीं । पाहिजे याला उत्तरायण ॥ ३८ ॥ तेव्हां "यत्र काले" ह्मणे चक्रपाणी । ते यथास्थित नव्हे कां भग-वद्वाणी । अर्थांतराची नसती काहणी । कां मिरवावी ॥ ३९ ॥ आणि मागें चौं श्लोकेंकरूनी । "मूर्ध्न्याधायात्मनः प्राणं" ह्मणोनी । ज्याची गति वर्णिली ज्यावरूनी । प्रसंग चालिला येथवरी ॥ १०४० ॥ तो हटयोगी हें तों खरें । कीं कोंडोनि सर्वही द्वारें । मस्तकास ने वारें प्राणांचें ॥ ४१ ॥ आणि "तें ऽहोरात्रविदोजना"। ह्मणूनि पूर्वोक्त तेंचि तच्छब्दें सूचवी अर्जुना । तेच उत्तरायण मार्गगमना । अधिकारी कां नव्हती ॥ ४२ ॥ कीं सद्यमोक्ष ज्याला । मस्तकास कां प्राण नेणें लागे त्याला । कां द्वारें कोंडावीं बोला । त्या पक्वज्ञानियानें ॥ ४३ ॥ आणि कां उत्तरायण । त्यांस जे जितांच अनुभविती निर्गुण । आणि संपतां हें प्रकरण । श्रीकृष्णही हेंचि बोलेल ॥ ४४ ॥ "नैते सृती" या श्लोकेंकरूनी । ह्मणे हे दोन्ही मार्ग आईकोनी । योगी न मोहती ह्मणोनी । कीं हे दोन्ही मार्ग नलगती पक्वज्ञानियां तयांसी ॥ ४५ ॥ "नैसे सृती" याही श्लोकीं । अर्थ सद्यमुक्तीविषयीं योजिला कीं । परि हा विचार नाहीं सूचला कीं । काळ आणि मार्ग हा कां तयाला ॥ ४६ ॥ आणि या श्लोकेंकरूनी । वर्णिले न परतती ह्मणोनी । ते ब्रह्मवेत्ते स्वमुखें करूनी । श्रीकृष्ण ह्मणे ॥ ४७ ॥ ब्रह्मशब्दें जरी ह्मणावें वेद । तरी जों न कळे ब्रह्मीं अभेद । तोंवरी न तुटे खेद । पुनरावृत्तीचा ॥ ४८ ॥ आत्म-

त्वें ब्रह्म जों कळेना । शब्दज्ञानें पुनरावृत्ती जनां । त्यांस अपुनरावृत्तिगमना[1] । अधिकार केंचा ॥ ४९ ॥ एवं हे ब्रह्मवेत्ते । ह्मणावे ब्रह्म जाणते । आणि जे ब्रह्म जाणती ते । प्राण न सोडितां येथेंचि उरती निर्गुणत्वें ॥ १०५० ॥ आतां अपक्कज्ञानी । या मार्गे गेले ह्मणोनी । तरी योगभ्रष्ट येती परतोनी । यांतें अपुनरावृत्ति बोलतो ॥ ५१ ॥ एवं अपक्कज्ञानी । आणि ब्रह्मरंध्र भेदूनी । या मार्गें जाती ह्मणोनी । नसे पुनरावृत्ति हें बोलिला ॥ ५२ ॥ तेव्हां ब्रह्मयासह । मुक्ति हेंही निःसंदेह । कीं सोडोनि जाती देह । ब्रह्मीं न मिळती तत्काळ ॥ ५३ ॥ लिंगदेहाचा न जाला ध्वंस । तरी देवतामार्ग बोलिला त्यास । लिंगदेह नसे जयास । काळ मार्ग देवता हे त्यास केंचे ॥ ५४ ॥ ब्रह्मप्राप्ति सद्य ज्याला । देह सोडोनि कोठे जाणें घडे त्याला । क्रममुक्ति बोलतां तरी बोला । ब्रह्मलोक ॥ ५५ ॥ ऐसा गीतेचा अर्थ । न कळोनि वाखाणिती व्यर्थ । हटयोगबळें समर्थ । ह्मणविती सिद्धि दावूनी ॥ ५६ ॥ कोणी पुरूनि घेती । कोणी गगनपंथें जाती । नाना चमत्कार दाविती । चेटकी जैसे ॥ ५७ ॥ त्यांत कोणी विरळ । ब्रह्मात्मता ओळखती केवळ । ब्रह्मरंध्र भेदूं जाणती कुशळ । त्यांस गाते ऐसी बोलिली ॥ ५८ ॥ ब्रह्मरंध्र ही भेदूं जाणती । आणि ब्रह्मात्मता नेणती । ते पुन्हा परतती । हें न बोलतां सिद्ध होय ॥ ५९ ॥ ऐसी अपक्क ज्ञानिया हटयोगियाची गती । सांगतों कीं तेही दक्षिणायनीं जरी जाती । चंद्रामृत सेवूनि परताती । तो मार्ग बोलतो या श्लोकीं ॥ १०६० ॥

॥ श्लोक ॥ धूमो रात्रिस्तथा कृष्णः षण्मासा दक्षिणायनम् ।
तत्र चांद्रमसं ज्योतिर्योगी प्राप्य निवर्तते ॥ २५ ॥

॥ टीका ॥ ज्या काळीं ज्या मार्गीं गती । पुनरावृत्तीची योगी पावती । तेही सांगेन तुजप्रती । ऐसें बोलिलों होतों तें आइक ॥ ६१ ॥ धूममार्गीं मूर्त्तिमंत । मूर्तिमंत रात्रि तैसाचि तम अत्यंत । कृष्ण पक्ष आणि मकर संक्रांतीपर्यंत । कर्क संक्रांतीपासूनि मास सहा ॥ ६२ ॥ दक्षिणायन देवांची राती । साहा मास साही भाग तीचे होती । तेही अंधकाररूप असती । कर्कापासूनि धनुर्मासपर्यंत ॥ ६३ ॥ मास साही मूर्तिमंत । आणि साही मिळतां तें एक दैवत । कीं देवांची रात्रि आंधारीं अत्यंत । दक्षियाणनीं ते भेटे ॥ ६४ ॥ दक्षिणायन मार्ग ये रीती । या देवता चंद्रज्योतीस पावविती । दक्षिणायनीं जे जाती । अपक्क ब्रह्मवेत्ते हटयोगी तयातें

[1] पुनर्जन्म नाहींसा होण्यास.

॥ ६५ ॥ ते उत्तम लोकातें जाउनी । चंद्रज्योतीतें पावोनी । ह्मणजे चंद्रकलामृत सेवूनी । देवांत असती ॥ ६६ ॥ पावोनि गति ऐसी । होय मागुती गर्भवासी । परतूनि ये हटयोगियासी । पुनरावृत्ति दक्षिणायनीं होतसे ॥ ६७ ॥ येथें बोलिला योगी । तो कर्मयोगी ह्मणोनि त्यालागीं । टीकाकार बहुतेक जगीं । वाखाणिती ॥ ६८ ॥ मार्ग आणि गती । हीं कर्मयोगियाचींच दिसती । कीं धूमादि मार्ग श्रुती । बोलती कर्मयोगियातेंचि । ॥६९॥ तरी योगभ्रष्टलक्षण । षष्ठाध्यायांत कमलेक्षण । बोले तेथें ह्मणे आपण । कीं पुण्यकृतांच्या लोकास तो पावतो ॥ १०७० ॥ "प्राप्यपुण्यकृतॉल्लोकान्" ह्मणोनी । श्रीकृष्ण या श्लोकें करूनी । ह्मणे पुण्यकर्त्यांच्या लोकातें पावोनी । शुचि श्रीमंतगृहीं जन्मतो ॥ ७१ ॥ हाही धूमादि मार्गेंकरूनी । चंद्रज्योतीतें पावोनी । पुन्हा येतो परतोनी । परि ब्रह्मात्मवेत्ता अपक्वयोगी ह्मणावा ॥ ७२ ॥ कीं कर्मयोगियांस दक्षिणायनीं । पुनरावृत्ति तैसीच उत्तरायणीं । दक्षिणायन विशेष चक्रपाणी । काय येथें वदला ह्मणावा ॥ ७३ ॥ ज्ञानहीनास अपुनरावृत्ती । कर्मयोगियास जरी उत्तरायणीं असती । तरी दक्षिणायनीं पुनरावृत्ती । उचित दिसती बोलतां ॥ ७४ ॥ अमृत विष दोहींचे दोन्ही । गुण सांगतां अमर अमृतें न मरे ह्मणोनी । मरणारचि तो मरे विषेंकरूनी । या बोलासारिखा अयोग्य या अर्थी हा बोल ॥ ७५ ॥ जो अमृतें होय अमर । तोचि विषें मरे नर । ऐसें सांगेल चतुर । मूर्ख ह्मणावा अन्यथा ॥ ७६ ॥ अमृतविषाचे गुण । सांगेन ह्मणे निपुण । आणि ज्यांची सांगे अमरत्वाची खूण । ह्मणे अमृतें तो अमर होय ॥ ७७ ॥ जो मरणारचि आपण । तो ह्मणे विष भक्षितां पावे मरण । ऐशा गोष्टी जो निपुण । तो न बोले कदापि ॥ ७८ ॥ उत्तरायण मार्गें जाती । ते ब्रह्मवेत्ते ब्रह्म पावती । जे ब्रह्मीं येथेंचि मिळती । किमर्थ उत्तरायण हा मार्ग त्यांला ॥ ७९ ॥ ते त्या पंथें न जाती । तरी ब्रह्मचि ते पावती । किमर्थ हे उत्तरायणगती । तयांला ॥ १०८० ॥ तैसेच कर्मयोगी । पुनरावृत्ति आहेच त्यांलागीं । काळ अथवा उभयमार्गविभागीं । गुण काय येथें देखिला ॥ ८१ ॥ आतां दोघांच्या दोन्ही गती । कळाया कारणें सांगे ह्मणावा श्रीपती । तरी दों प्रकारीचे योगी ये रीतीं । अधिकारी वेगळे न बोले ॥ ८२ ॥ जरी अधिकारी वेगळे बोलता । तरी तदनुरूपें अर्थही योजिता । या श्लोकीं तो सकळ गतिदाता । बोलतो इतकेंचि ॥ ८३ ॥ कीं ज्या काळीं जातां योगी न परतती । तो सांगेन तुजप्रती

आणि ज्या काळीं जातां परतोनि येती । तोही तूतें सांगेन ॥ ८४ ॥ भेद बोले काळाचे । तैसे भेद न दावी योगियाचे । योग्य अर्थ सोडोनि वाचे । अयोग्य अर्थ कां आणावा॥ ८५ ॥ जे उत्तरायणीं न परतती । तेचि दक्षिणायनीं परतोनि येती । अर्थ वदतां ये रीती । मूळानुरूपचि दिसतो ॥८६॥ जरी दोन्ही काळ न लेखिले । क्लिष्टकल्पनेनेंचि मार्ग वाखाणिले । तरी जे या मार्गें नाहीं परतले । तेचि परतले त्या मार्गें ॥ ८७ ॥ आतां काळ नलेग ज्ञानियास । ह्मणूनि मार्गचि बोलावा ब्रह्म पावावयास । तरी जितांचि ब्रह्म जाले तयांस । कां हा मार्ग कां या देवता ॥ ८८ ॥ एवं नलगे जेव्हां काळ । मार्ग देवताही फटकाळ । ज्ञानी अपक्व हटयोगी कुशल । तो ब्रह्मलोकास या काळीं या मार्गें जातो हा अर्थ ॥ ८९ ॥ अर्थ हाचि अनुकूळ । इतर अर्थ प्रतिकूळ । बलात्कारें टीका आणि मूळ । यासि एकवाक्यता घडेना ॥ १०९० ॥ ते ब्रह्मवेत्ते परतती । कैसें वदावें ह्मणोनि भीति । ज्या ब्रह्मवेत्त्यांस ऐशी गती । त्यांस दक्षिणायनीं एक जन्म पुनरावृत्तीही घडो ये॥९१॥ कीं पक्वज्ञानियाचे प्राण । न करितीच कधीं प्रयाण । हें अपक्वयांस हटयोग उत्तरायण । सांपडे तरीच मुक्ति ब्रह्मया सांगातें ॥ ९२ ॥ उत्तरायण जया न सांपडे । त्यास पुनरावृत्ति घडे । पूर्वसंस्कारें बुद्धि पडे । पुन्हा ज्ञानमार्गींच ॥ ९३ ॥ मग सद्यमुक्ति घडो । अथवा क्रममुक्तींत मागुती पडो । पूर्वसंस्कार नेदी बुडों । मृत्युसंसारसागरीं ॥ ९४ ॥ "नहि कल्याणकृत् कश्चित्" ह्मणोनी । षष्ठाध्यांत या श्लोकेंकरूनी । कृष्ण ऐसें बोलिला यावरूनी । तो वायां जाय न ह्मणावा ॥ ९५ ॥ षष्ठाध्यायांत योगभ्रष्ट । तो सद्यमुक्तिमार्गीं जाला भ्रष्ट । हा पूर्वसंस्कारें पुन्हा कष्ट । हटयोगीं करूनि अपुनरावृत्ति साधील ॥ ९६ ॥ आतां यापुढें जो श्लोक । तेथें ऐसेंचि बोलेल उत्तमश्लोक । कीं पुन्हा अपुनरावृत्ति लोक । पावेल हा ह्मणूनी ॥ ९७ ॥ एवं च या श्लोकीं योगी बोलिला । ज्ञानी अपक्व आणि हटयोगी ह्मणावें त्याला । जरी दक्षिणायनीं ब्रह्मरंध्र भेदूनि गेला । तरी परतेल हाचि सिद्धांत ॥ ९८ ॥ अनादि हे मार्ग दोनी । हें बोलेल या पुढिल्या श्लोकेंकरूनी । तेथेंही अधिकारी एकचि ह्मणोनी । बोलेल तो हा यापुढील श्लोकीं ॥ ९९ ॥

॥ श्लोक ॥ शुक्लकृष्णे गती ह्येते जगतः शाश्वते मते ।
एकया यात्यनावृत्तिमन्ययाऽऽवर्तते पुनः ॥ २६ ॥

॥ टीका ॥ शुक्लकृष्ण दोन्ही गती । शुक्ल उज्ज्वल प्रकाशास ह्मणती ।

उत्तरायण मार्गे अग्नि ज्योती । इत्यादि सर्व तेजोमय ॥ ११०० ॥ कृष्ण गतिकाळीं । धूमादि तमोरूप दक्षिणायनकाळीं । या जगास ह्मणे वनमाळी । या शाश्वता गति अनादि हा भाव ॥१॥ या दोनी गति संमत मला । कीं उत्तरायणीं मोक्षचि ज्ञानियाला । दक्षिणायनीं जरी परतला । तरी जन्मीं दुसरियातेंचि गति पावेल ॥ २ ॥ तेंचि उत्तरार्धे बोलतो । कीं एके गतीनें न परतेचि तो । आणि दुसरे गतीनें तो परततो । परि पुन्हा तोहि जातो अपुनरावृत्तीतें ॥ ३ ॥ " अन्ययाऽऽवर्तते पुनः " ह्मणोनी । या शेवटिल्या पुनःशब्दें करूनी । " यात्यनावृत्ति " या अक्षरांसी योजूनी । श्लोक वाखाणावा हें सूचवी ॥४॥ कीं "अन्ययाऽऽवर्तते" । इतकियानेंचि अर्थसिद्धि होते । पुनःशब्दें भगवद्वाणी होते । न कळे तया व्यर्थ येथें ॥ ५ ॥ कीं " अन्ययाऽऽवर्तते" ह्मणोनी । ह्मणतां अन्यगति कृष्णगति तीकरूनी । योगी येतसे परतोनी । हा अर्थ सिद्ध होतो ॥ ६ ॥ जरी पुन्हा न ह्मणे हरी । आणि " अन्ययाऽऽवर्तते" इतकेंचि ह्मणे जरी । दुसरे गतीनें परततो ऐसेंपरी । तरी होयच सिद्ध अर्थ ॥ ७ ॥ परततो ह्मणतांच होता अर्थ । परततो पुन्हा ह्मणणें व्यर्थ । एवं पुन्हा जन्मांतरीं होऊनि कृतार्थ । अपुनरावृत्तीतें पावतो हेंचि सत्य ॥ ८ ॥ पुन्हा धूमादि कृष्णगतीतें तो । पावोनियां परततो । कर्मयोगियास ऐसें ह्मणतो । श्रीकृष्ण ह्मणोनि जरी ह्मणावें ॥९॥ तरी स्वर्गास जाऊनि च्यवला । तो जन्मांतरीं पापी जाला । दुष्टसंगें नरकास गेला । ऐसे उदंड ॥१११० ॥ नरकास जाउनी आला । सत्संगें पुण्यें करूं लागला । तो उत्तमा स्वर्गगतीस पावला । ऐसेही उदंड ॥ ११ ॥ पुन्हा पावोनि चंद्रज्योती । परतोनि येईल मागुती । पुनःपुन्हा कर्मयोगियास ते गती । होणार हेंही प्रसिद्ध ॥ १२ ॥ स्वर्गास राजा नहुष गेला । तो अजगर होऊनि पडिला । ज्यास जैसा प्रसंग घडला । तो पावला तैसे गतीतें ॥१३॥ हे प्रसंग बोलतां फार । ग्रंथ वाढतो अपार । पुनः शब्दाचा निर्धार । कोठें न लागे ॥ १४ ॥ आणि हा कर्मयोगी हेंही न घडे । पुनरावृत्तीही हटयोगिया ब्रह्मवेत्त्याकडे । लागते कीं सेवूनि चंद्रामृतातें मुरडे । दक्षिणायनीं ॥ १५ ॥ पुन्हा शुक्लगतीनें तो । अपुनरावृत्तीतें पावतो । ब्रह्मवेत्ता योगी जरी परततो । दक्षिणायनीं देह सोडितां ॥ १६ ॥ टीकाकारीं येचि रीतीं । टीका करावी ह्मणूनि श्रीपती । पूर्वार्धाच्या अंतीं । दोनी अक्षरें वदे मतें ह्मणोनी ॥ १७ ॥ मत ह्मणजे संमत । मज संमता दोनी गति ह्मणे भगवंत । षष्ठाध्यायीं योगभ्रष्टजन्म अत्यंत । श्रेष्ठत्वें जैसा वर्णिला

॥ १८ ॥ तैसी एकदा जरी पुनरावृत्ती । तरी पुन्हा पावेल अपुनरावृत्ती । यालागीं देवताचक्रवर्ती । ह्मणे दोन्ही गति मज संमत ॥ १९ ॥ पुनरावृत्ति कर्मयोगियाची अत्यंत । निंदी स्थळस्थळीं भगवंत । मागें निंदिलें द्वितीयाध्यायांत । पुनरावृत्ति अधिकारी आणि गतीही ॥ ११२० ॥ "यामिमां पुष्पितां वाचं" "या श्लोकापासूनी । "कामात्मानः स्वर्गपरा " ह्मणूनी । गति आणि गतीस जाणार निंदूनी । बोलिला ॥२१॥ पुढेंही बोलेल नवमीं । ऐसेंच मुमुक्षूंचा स्वामी । कीं गतागती पावती कामकामी । "गतागतं कामकामा लभंते " ह्मणोनी ॥ २२ ॥ आतां निष्कामकर्मगती । ह्मणूनि संमत ह्मणतो ह्मणावें श्रीपती । तरी हेंही बंधक ह्मणे जगत्पती । निंदा नव्हे हे काय ॥ २३ ॥ "यज्ञार्थात्कर्मणोन्यत्र" । या श्लोकीं कमलनेत्र । ह्मणे कृष्णार्पणाविण कर्ममात्र । बंधक ह्मणोनी॥२४॥ एवं हे योगियाची पुनरावृत्ती । पुनः देणार अपुनरावृत्ती ।ह्मणूनि दोन्ही संमता ह्मणे श्रीपती ।आणि कर्मयोगीही हा नव्हे॥२५॥आतां या संमता दोन्ही गती। ह्मणूनि ह्मणे जो श्रीपती । मोहली अर्जुनाची मती । तो मोह परिहरितो या श्लोकीं ॥ २६ ॥

॥ श्लोक ॥ नैते सृती पार्थ जानन्योगी मुह्यति कश्चन ।
तस्मात्सर्वेषु कालेषु योगयुक्तो भवार्जुन ॥ २७ ॥

॥ टीका ॥ अर्जुना या दोन्ही गती । जाणोनि काय योगी मोहती । कोण योगियाची ही मती । मोह येथें न पावे ॥ २७ ॥ अगा जे स्वरूपीं चित्त योजिती । जे ब्रह्मचि होऊनि जाती । ते कां दिवस रात्रि मोजिती । ब्रह्मयाची ॥ २८ ॥ त्यांसि कां पाहिजे उत्तरायण । त्यांस कां ब्रह्मलोकप्रयाण । अग्नि ज्योति इत्यादि देवतागण । चरणरजही न लाहती तयाचे ॥ २९ ॥ न त्यांस उत्तरायण दक्षिणायन । न त्यांस अग्न्यादि धूमादि मार्ग देवतागण । अपुनरावृत्ति पुनरावृत्ति दोहींची खूण । ते न जाणती जे ब्रह्म जाले देहींच ॥ ११३० ॥ ते या दोन्ही गती । पूर्वोक्ता योगियांच्या जाणती । परि आपुल्या अनुभवापुढें ते ह्मणती । कीं या दोन्ही गति फटकाळ ॥३१॥ कर्मयोगियाच्या गतीहुनी । या गति उत्तमा या भावेंकरूनी । मज संमत ह्मणोनी । मी ह्मणतसें हा भाव ॥ ३२ ॥ परंतु ज्ञाननिष्ठा योगिया । जे सद्यगती धनंजया । तींवरूनि दोनी गति या । ओंवाळिल्या तरी महत्त्व याही कांहीं पावती ॥ ३३ ॥ मज संमता ह्मणोनी । गोष्टी पडली तुझिया कानीं । घाबिरा जालासि यावरूनी । कीं न वाटती दोन्ही तुज उत्तमा ॥ ३४ ॥ अगा दुष्काळें जे मरती । त्यांस कांजी आंबील वरी ह्मणावी

ये रीती । तैसी दोहीं गतींची करितो स्तुती । अमृतपान करणारिया तुज-पासीं ॥ ३५ ॥ त्या गति योग्या तुजला । मी नाहीं बोलिलों या बोला । या गति जाणोनिही योगियाला । कदापि कोणासही मोह नव्हे ॥ ३६ ॥ अर्जुना तूं तों माझा भक्त । माझ्या चरणीं अनुरक्त । ह्मणूनि ह्मणतों कीं होय योगयुक्त । तस्मात्कारण अर्जुना ॥ ३७ ॥ कीं जो योगी त्याची मती । न मोहे जाणोनि या गती । ह्मणूनि योगयुक्त तूंही सुमती । होय सर्वकाळीं अर्जुना ॥ ३८ ॥ इत्यादि सूर्यापुढें खद्योग होती । योगी पावे तो ऐशा पदाप्रती । ह्मणूनि बोलतो जगत्पती । अध्यायांतीं हा श्लोक ॥ ३९ ॥

॥ श्लोक ॥ वेदेषु यज्ञेषु तपस्सु चैव दानेषु यत्पुण्यफलं प्रदिष्टम् ।
अत्येति तत्सर्वमिदं विदित्वा योगी परं स्थानमुपैति चाद्यम् ॥ २८ ॥

इति श्रीमद्भगवद्गीतासूपनिषत्सु ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे श्रीकृष्णार्जुनसंवादे अक्षरपरब्रह्मयोगो नाम अष्टमोऽध्यायः ॥

॥ टीका ॥ अगा या दोन्ही गती । त्यांस कीं जे हटयोगी ब्रह्म जाणती । उत्तरायणमार्गें जाणारे तुजप्रती । ब्रह्मवेत्ते ह्मणूनि जे बोलिलें ॥११४०॥ तेचि जातां दक्षिणायनीं । जरी येतो परतोनी । तरी पुन्हा ब्रह्मवेत्ते ह्मणोनी । जाती अपुनरावृत्तीतें ॥ ४१ ॥ ब्रह्मीं कळणें अभेद । तें गुरुमुखें निबंधितां भेद । तेथें कारण वेद । हाचि वेद शब्दाचा अर्थही ॥ ४२ ॥ "वेदयंतीति वेदा" ह्मणोनी । जाणविती ते वेद या अर्थावरूनी । पूर्वोक्त मार्ग ज्यांस दोनी । ते मार्ग ते ब्रह्मवेत्ते त्या गति सूचवी ॥ ४३ ॥ कीं वेद यज्ञ तप दान । यांचे ठायीं जें जें निदान । तें अतिक्रमूनि पावतो मुख्य स्थान । योगी ह्मणूनि या लोकीं ॥ ४४ ॥ तरी हा योगी तोचि निश्चित । कीं ब्रह्मीं ब्रह्ममय करी चित्त । "यतो वाचो निवर्तंते" हा अद्भुत । योग जया योगियाचा ॥ ४५ ॥ त्याचा योग योजतो जेथें । परा वाचा नसे तेथें । हे वेद तों वर्तती एथें । परे आलीकडे वैखरीपर्यंत ॥४६॥ ह्मणूनि सद्यमुक्ति याला । क्रममुक्ति हटयोगें त्याला । ब्रह्म जाणती परि ज्याला । नसे वेदवाणीपरता हा अनुभव ॥ ४७ ॥ यालागीं त्यांचें ज्ञान आणि त्यांची गती । वेदींच आहे कीं वेद बोलती । वेदवाणी टाकूनि आरती । परती वृत्ति नाहीं निमाली तयांची ॥ ४८ ॥ स्थिति गति त्यांची बोलवी श्रुती । याची स्थिति वेदाहूनि परती । कीं वेद जेथूनि परतती । हा त्या आनंदीं निमग्न ॥ ४९ ॥ यालागीं जें सर्वां निगमीं । तें हा योगी अ-

तिक्रमी । आणि पद पावे ह्मणूनि ह्मणतो स्वामी । निर्गुण सगुण मोक्षाचा ॥ ११५० ॥ वेदीं ज्ञान वेदीं ध्यान । इत्यादि जें जें मुक्तिसाधन । तें अति क्रमितो ऐसें वचन । बोलतां नये ॥ ५१ ॥ नदी लंघूनि गेलियावरी । नाव नलगे तयास परी । नाव अतिक्रमूनि जातो हे वैखरी । बोलतां विरुद्ध होय ॥५२॥ नावेस लावूनि कर । बाहुबळें तरती सागर । मागती राहती नर । द्वीपांतरीं॥५३॥ जे नावेंत बैसले । ते त्यांस अतिक्रमूनि गेले । पैलतिरीं जाऊनि ठ्याले । दिव्यामृतातें ह्मणों ये ॥ ५४ ॥ ब्रह्मयाची नाव तीरा । जातां हेही पावतील पैलपारा । परि खोळंबा बहुकाळ त्या नरां । अतिक्रमिलें योगियानें तयांतें ॥ ५५ ॥ वेदीं ह्मणतां श्रीपती । सूचवी कीं अतिक्रमी या गती । त्या गतीची वाट पाहती । योगी पावे ज्या पदा ॥ ५६ ॥ तेंच ह्मणतो स्वामी । कीं जें सर्वां वेदीं अतिक्रमी । आतां कर्मफळें बोलिलीं निगमीं । ते अतिक्रमी जरी ह्मणावें ॥ ५७ ॥ तरी ते वेगळी करूनी । या श्लोकींच बोलतो ह्मणोनी । जे सर्व वेदीं ते अतिक्रमितो या वचनीं । हाचि अर्थ हा सिद्धांत ॥५८॥ यज्ञ तप दानें सकळ । याचेठायीं बोलिलें पुण्यफळ । तें सर्व अतिक्रमूनि केवळ । पर जें परब्रह्म त्यातें पावतो ॥ ५९ ॥ "परं स्थानमुपैति चाद्यं" ह्मणोनी । बोलतो दोनी मोक्ष या शब्देंकरूनी । उप शब्द आणि चकार योजूनि । स्पष्ट मुक्ति दोनी बोलतो ॥ ११६० ॥ पर ह्मणजे पलीकडे । शुद्ध सत्त्वही ज्या आलीकडे । तेथें पावतो ह्मणतां घडे । केवळ निर्गुण निर्वाण ॥ ६१ ॥ पर शब्दें निर्गुण मोक्ष दावुनी । जरी सगुणभक्त असे योगी ऐसा होउनी । तरी " स्थानमुपैति चाद्यं " ह्मणोनी । या शब्दीं बोले सगुणमोक्ष ॥ ६२ ॥ प्रकटे पहिलें सर्वांहुनी । त्यास ह्मणावें आद्य ह्मणोनी । तोचि सगुण वैकुंठरूपें करूनी । स्थान जाला मुक्ताचें ॥ ६३ ॥ "आद्यं स्थानं च उपैति" । पदें एथें ऐसीं योजिती । अर्थ याचा ये रीती । कीं आद्यस्थान जें त्यांतेंही पावतो । ॥ ६४ ॥ आणि उप ह्मणजे समीप । आद्यस्थान वैकुंठ भगवद्रूप । तेथें सत्त्वरूपें स्वानंदस्वरूप । अखंड अनुभविती समीप ते सर्व ॥ ६५ ॥ निर्गुणीं उपशब्द न घडे । आणि आद्य शब्दही न लागे तिकडे । आद्य ह्मणतां सगुण सांपडे । सर्वांहूनि आदिकाळीं प्रगटे ह्मणोनी ॥ ६६ ॥ करितां क्लिष्टकल्पना । केले तैसे अर्थ होती नाना । परि शब्दशक्ति पाहतां लागेना । निर्गुणाकडे आद्य शब्द ॥ ६७ ॥ तैसेंचि निर्गुण स्वरूप । तें न दुरी अथवा समीप । उप शब्दशक्तीचाही प्रताप । सगुण मोक्षाच प-

येंत ॥६८॥ शब्दमात्रें करूनी । निर्गुणपक्ष मात्र जो तो धरूनी । गीता वाखाणिती ह्मणोनी । झांकोनि राहिले स्पष्टार्थ ॥ ६९ ॥ च्यवले जय विजय । ज्या त्यांस हाचि संशय । ह्मणूनि सगुण मोक्षाचा निर्णय । निर्गुण मोक्षींच योजिती ॥ ११७० ॥ जय विजय च्यवले हें पुराणीं । आणि महाभारतीं हे भगवद्वाणी । एथें चतुर्दशीं चक्रपाणी । बोलेल हें सत्य कीं तें अधिक ॥ ७१ ॥ "सर्गेपि नोपजायंते" । ह्मणजे सृष्टिकाळींही न जन्मती ते । आणि " प्रलये न व्यथंति ते" । ह्मणजे प्रलयीं न पावती ते व्यथा ॥ ७२ ॥ पांचवा वेद भारत । पुराणांसही प्रमाणभूत । त्यांत सर्व वेद मथूनि भगवंत । हें गीतामृत स्वमुखें बोलतो ॥ ७३ ॥ जें महाभारतीं । तेंचि पुराणें बोलती । येथें नसे कोठेंच नाहीं ऐसे रीती । व्यास कर्ता पुराणांचाच बोलतो ॥ ७४ ॥ भारतीं जयविजयांस । असुरत्वप्राप्ति वर्णी व्यास । आणि गीता भगवद्वाणीहि जनास । व्यासचि तो ऐकवी ॥७५॥ येथें सगुणमोक्ष । ये रीती वर्णी अंबुजाक्ष । तेव्हां सर्वांत थोर हा पक्ष । आणि तेंही नव्हे अन्यथा ॥ ७६ ॥ याचा निवाडा व्यासवाणी । करी कूर्मपुराणीं आणि पद्मपुराणीं । कीं अज्ञ आणि सगुणस्मरणीं । ते दुर्गाभागीं भूभागीं राहती ॥ ७७ ॥ श्रीभाग मुक्तिस्थान । तें भक्तपावती ज्यांस आत्मज्ञान । भक्त आणि ज्ञानहीन । भूभाग दुर्गाभाग पावती ॥७८॥ देहांतीं जो स्मरे ज्यास । तो तद्रूप होय पावे त्यास । तैसेंचि ज्ञानहीन भक्तांस । तद्रूपत्व परि तो मोक्ष नव्हे ॥ ७९ ॥ जो ज्ञानी भक्त । तो श्रीभागीं ह्मणवा मुक्त । हा पक्ष भगवद्वाणीसंयुक्त । आणि संमत पुराणांसही ॥ ११८० ॥ इतिहासपुराणीं नवी ग्रंथरचना । स्वमतानुरूप करिती कल्पना । आणि मिसळिती श्लोक नाना । व्यासवाणी वाटे लोकांतें ॥८१॥ गीता आणि वेद । जगीं पाठशाखाभेद । तेथें कल्पितपणाचा संदेह खेद । न उपजे सर्वथा ॥ ८२ ॥ भेदमती श्रुतीही बहुत । कल्पिती परि त्या न होती संमत । कल्पितपण दिसे अत्यंत । शाखाभेद पाठकांकरितां ॥ ८३ ॥ वेदश्रुती आणि हे । भगवद्वाणी जो पाहे । त्यास सिद्धांत जो आहे । तो कळे निःसंदेह ॥ ८४ ॥ स्थळ स्थळीं श्रुती । सगुणमोक्ष बोलती । हें तों सर्वही जाणती । तैसीच गीता ॥ ८५ ॥ प्रस्तुतीं परशब्दें मोक्षनिर्गुण । "स्थानमुपैति चाद्यं" ह्मणूनि सगुण । मोक्ष सांगे दावूनि खूण । तदनुरूप ॥ ८६ ॥ त्यांत जे योगी चित्त अव्यक्तीं । योजिती त्यांस निर्गुणमुक्ती । जे वासुदेव सर्व ऐसी भक्ती । करिती ते सगुणमुक्ति भक्त.

पावती ॥ ८७ ॥ येथें नुसता योगी पावे निर्गुण । सर्वात्मभक्त पावे स्थान आद्य सगुण । ह्मणूनि सर्वात्मभक्ति आपण । श्लोकीं याच बोलतो ॥ ८८ ॥ कोण्या भक्तीकरूनी । भक्त पावतो आद्यस्थानीं । तरी सर्व हें जाणोनी । पावतो ह्मणे ॥ ८९ ॥ "वासुदेवः सर्वमिति"। "स महात्मा सुदुर्लभः" ह्मणे श्रीपती । हें सप्तमाध्यायांत अंतीं । स्पष्ट भक्तश्रेष्ठत्व वर्णिलें ॥ ११९० ॥ सर्वदा सर्वात्मतेचें स्मरण । हेंच सगुण भजनाचें लक्षण । या ज्ञानाचें नांव सगुण । धर्म्य पदें उत्तराध्यायांत बोलेल ॥ ९१ ॥ निर्गुणज्ञान सगुणभक्ती । आणि परमपुरुषार्थ सगुणमुक्ती । ऐसी गीता भगवदुक्ती । सार सकळां वेदांचें ॥ ९२ ॥ ऐसा अध्याय आठवा । बोले अवतार आठवा । तो देवकीचा आठवा आठवा । वामन ह्मणे ॥ ९३ ॥ ऐसी हे यथार्थदीपिका । श्रीभगवद्गीतेची टीका । त्यांत अष्टमाध्यायाची हे श्रीवत्सांका । वैकुंठनायका तया अर्पिली ॥ ९४ ॥ आतां राजविद्याराजगुह्योपदेश । करील उत्तराध्यायीं हृषीकेश । ज्याची टीका करितां क्लेश । थोर थोरही पावले ॥ ९५ ॥ नेणें कांहीं ज्ञान । नेणें कांहीं भजन । एक शेषशायी कमलनयन । दैवत इतकें जाणतों ॥९६॥ हा भावही देऊनि जतन । करितो तोचि शेषशयन । ह्मणूनि गीतार्थ अतिगहन । तोचि कमलनयन सूचवितो ॥ ९७ ॥ ज्यांस इतर टीकाकारांचे अभिमान । ते न देतील या टीकेस मान । हरिभक्त निर्मत्सर निरभिमान । तेचि देतील सन्मान या टीकेतें ॥ ९८ ॥ जे हरिचरणीं अभक्त । क्षुद्रकाम क्षुद्रदेवताभक्त । त्यांस काय वाटेल युक्त । हे टीका ॥ ९९ ॥ ज्यास कृष्णचरणांची चाड । त्यास काय अभक्तांची भीड । हे त्यातेंचि वाटेल गोड । जे बाह्यांतरींही हरिभक्त ॥ १२०० ॥ हरिभक्ताचें अंतःकरण । तेथेंचि वैकुंठनाथाचे चरण । त्यास मी अनन्यभावें शरण । वामन ह्मणे ॥१॥

॥ वामनकृतसंस्कृत श्लोक ॥

सर्वदा स्वचरणस्मरणाय पार्थमादिशदपि स्मरणाय ।
यद्व्रतस्य न हि संसृतिचक्रं तं स्मरामि सततं धृतचक्रम् ॥ १ ॥

इति श्रीमद्वामनपंडितविरचितायां यथार्थदीपिकायां अष्टमोऽध्यायः ॥

# अध्याय ९.

श्रीमते भगवते भगवत्तमाय ॥ स्वजनमनोद्यानकल्पतरवे राजविद्याराजगुह्यगुरवे जगदादिगुरवे चरमगुरवे परमगुरवे श्रीकृष्णाय नमः ॥ जय जय करुणासुधाजलनिधे । जय जय सविज्ञान ज्ञाननिधे । जय जय जडजगदूर्मिचिन्महोदधे । श्रीसच्चिदानंद ॥ १ ॥ जय जय राजविद्योपदेशक । जय जय राजगुह्यप्रकाशक । जय जय निर्गुण सगुण त्रिगुणभेदनाशक । धर्मविज्ञानबोधमूर्ते ॥ २ ॥ जय जय जलजदलायताक्ष । जय जयातींद्रिय सकलेंद्रिय परोक्ष । जय जय जगद्रूप प्रत्यक्ष । ऐश्वर्ययोगमूर्ते ॥ ३ ॥ जय जय धृतजगदशेष । जय जय चित्प्रकाश परिहृतजडतमोदोष । जय जय चित्तंतुकपटजडपटवेष । शेषशयना शेषगुरो ॥ ४ ॥ जय जयानल्पकल्पक । जय जयाजल्पजल्पक । जय जयाशेषशेषतल्पक । स्वजनकल्पतरो जगद्गुरो ॥ ५ ॥ जय जयानादिमायाध्यक्ष । जय जय माया त्रिगुणपरोक्ष । जय जय मायासत्वापरोक्ष । मोक्षानंद सहजानंद ॥ ६ ॥ जय जय सकलसुरावतंस । जय जय सुरसंपत्समृद्धमानसराजहंस । जय जय कंसाद्यसुरभावविध्वंस । परमहंसगुरो ॥ ७ ॥ जय जय सत्कीर्तनार्हगुण । जय जय सदुपास्यसगुणनिर्गुण । जय जय सद्वृंदवंद्यचरण । एकत्वाद्युपासनोपास्य ॥ ८ ॥ जय निजजनपालनैकचतुर । निजजनयोगक्षेममंदरधर । निजजनावनप्रतिज्ञोद्धृतकर । सर्वेश्वर कृपानिधे कृष्ण पाहि पाहि ॥ ९ ॥ जी जी देवाधिदेवा । प्राकृत भाषें करितां तुझी सेवा । वेदवाणीस उपजे हेवा । तुझ्या स्वरूपाचा ठेवा जीमाजीं ॥ १० ॥ मुख्य तुझें नाम गोड । पुरवीं सर्वा भाषांचें कोड । तें कानीं मुखीं येतां मोड । देहीं उपजती प्रेमाचे ॥ ११ ॥ काय वेदशास्त्र जाणे व्रज । त्यांची भक्ति देखोनि तुझा आत्मज । ब्रह्मा वेदवक्ता शिरीं पदरज । वंदी व्रजनारीनरांचे ॥ १२ ॥ गजेंद्र कोण शास्त्र पढला । बाळ कोण्या पांडित्यें ध्रुवपदा चढला । दासी कुब्जा तिला घडला । काय अभ्यास संस्कृताचा ॥ १३ ॥ व्रजीं चारितां गायी । कुचकुंकुमें गोपिकांचीं पायीं । तदंकित तृणें कृतार्थ ठायीं ठायीं । बल्लवस्त्रिया पढलिया त्या काय ॥ १४ ॥ अभिमानें बुडाले पंडित । यज्ञपत्न्यांनीं अर्चितां वैकुंठमंडित । न पढतां न वाचितां अखंडित ।

---

१ गौळणी.

आनंद भक्तीनें पावल्या ॥ १५ ॥ भक्ति थोर भक्ति थोर । तूं चंद्रमा भक्त तुझे चकोर । तूं मेघ भक्त मयूर । मेघश्याम समोर । त्यांस तूं सर्वज्ञही ॥ १६ ॥ एवं पावावया तुझे चरण । भाषा कोणी नव्हे कारण । कारण सप्रेम अंतःकरण । देवाधिदेवा ॥ १७ ॥ जैसें भजनास कारण नव्हे वित्त । मुख्य सादर असावें चित्त । तथापि वित्तवंत वेंचिती यानिमित्त । कीं अन्यथा वित्तशाठ्य लागेल ॥ १८ ॥ मंगलाचरण ह्मणोनी । करितों देवा संस्कृतें करोनी । कोणी अर्थी दृष्टीही नेदुनी । सुखें उगेचही वाचोत ॥ १९ ॥ जेथोनि टीकेचा आरंभ । तेथोनि गीतार्थ जो स्वयंभ । तो होय अत्यंत सुलभ । शब्द ऐसे योजितों ॥ २० ॥ परंतु गीतार्थाच्या कडोविकडी । अर्थानर्थाच्या घडामोडी । ह्मणोनी वाटे कठिण रोकडी । परि विचारितां सुलभ तुझ्या कृपेनें ॥ २१ ॥ आतां सकळ विद्येचा राणा । ऐसी विद्या तेही नारायणा । या अध्यायीं सांगसी स्वशरणा । आणि गुह्य राजा गुह्यां सर्वांचा ॥ २२ ॥ सर्व ज्ञानाचा कळस । मुक्ति देऊनिही ज्याच्या दानीं आळस । त्याचा द्यावयाचा वोरस । भक्ताच्या ठायीं येथें दाखविसी ॥ २३ ॥ रहस्य ऐसें उत्कट । या अध्यायीं करिसी जरी प्रकट । तरी अनन्यभक्तीवांचूनि संकट । पडिलें टीकाकारांसही ॥ २४ ॥ वंदिती पूजिती तुझे चरण । तरी अंतरीं इतर देवताशरण । करिती क्षुद्रदेवता मंगलाचरण । इच्छोनि निर्विघ्न कवितास्फूर्तीही ॥ २५ ॥ राजविद्या राजगुह्याचा । उकल नव्हे त्यांस साचा । जैसी तैसी युक्तवाचा । योजोनि गेले ॥ २६ ॥ जगीं मिरवोनिया सिद्धी । आपल्याल्या टीकांची केली प्रसिद्धी । तथापि नाहीं झाली अर्थसिद्धी । यथार्थ गीतारहस्याची ॥ २७ ॥ सिद्धि कर्मजनिता । क्षिप्र या मनुष्यलोकीं येती हाता । ह्मणोनि बोले हेचि गीता । चतुर्थाध्यायांत॥२८॥चतुर्थाध्यायश्लोकार्ध॥ क्षिप्रं हि मानुषे लोके सिद्धिर्भवति कर्मजा ॥ टीका ॥ मागें याची जाली । कर्मसिद्धि भलत्याचिया हाता आली । परि अनन्यभक्तीवांचूनि बोली । हे भगवंताची कळेना ॥ २९ ॥ आतां देवादिदेवा । श्रोते वक्ते तूंचि देवा । टीकाप्रवाह वासुदेवा । त्याकडे चाले ऐसा चालतों ॥ ३० ॥ भूमीचवरी चाले जळ । वाफे तेही भूमीच केवळ । श्रोते वक्ते तूंचि सकळ । पूर्वानुसंधान त्यांप्रति निरूपितों ॥३१॥ अष्टमाध्यायांत देव । अर्जुनास अपरोक्षानुभव । देऊनि आतां स्वऐश्वर्य विभव । दावीतसे या नवमांत ॥ ३२ ॥ व्यतिरेक अक्षर ब्रह्म । या शब्दीं उपदेशिता जाला पुरुषोत्तम । अक्षरब्रह्मापुढें शब्द परम । अन्वय बो-

धिला त्या शब्दीं ॥ ३३ ॥ विश्वावेगळें निर्गुण । आणि निर्गुणाचि विश्व त्रिगुण । हे व्यतिरेकान्वयाची खूण । अष्टमीं उपदेशिली ॥ ३४ ॥ अनुभव तितकाच हें यथार्थ । मुमुक्षु इतकियानें कृतार्थ । परि मोक्षही न इच्छी पार्थ । अनन्यभक्तसखा आपुला ॥ ३५ ॥ निर्गुणोपासकाहूनी । भक्त ज्ञानी थोर ह्मणूनी । द्वादशीं स्वमुखें करोनी । भगवंत बोलेल ॥ ३६ ॥ तरी आत्मज्ञानाविण । उगेंचि भजती सगुण । थोर त्याहूनि निपुण । अनुभवी निर्गुणाचे ॥ ३७ ॥ आतां भक्तही ज्ञानी भला । तरी निर्गुणोपासकासमान बोला । त्याहूनिहीं अधिक जाला । कोण्या ज्ञानें ॥ ३८ ॥ नुसतें जें सगुणसाकारभजन । त्याहूनि थोर आत्मज्ञान । ज्ञानांतही ज्ञान गहन । भक्तास असे त्यापरिस थोर हें ॥ ३९ ॥ तरी याही गुणें भक्त अधिक । कृष्णकृपाजलधराचे चातक । त्याहूनि उणे निर्गुणोपासक । कीं विश्व भगवद्रूप हें नेणती ॥४०॥ तें आतां सांगों अर्जुना । ऐसी कृपा उपजली कमलनयना । तदर्थ सावध करून त्याच्या मना । बोलों आरंभितों तें ज्ञान ॥ ४१ ॥ मागील अष्टमाध्याय । तेथें बोलिला व्यतिरेक अन्वय । ब्रह्म आणि जग याचा ऐक्यनिर्णय । परम रहस्य अर्जुना ॥ ४२ ॥ परंतु आतां सांगेन ह्मणोनी । ह्मणतो हें गुह्य सकळ गुह्याहूनी । भाव ऐसा दाखवूनी । बोलता जाला श्रीभगवान ॥ ४३ ॥

॥ श्रीभगवानुवाच ॥ इदं तु ते गुह्यतमं प्रवक्ष्याम्यनसूयवे ।

॥ टीका ॥ अगा जें गुह्य सकळ गुह्याहुनी । तें ह्मणावें गुह्यतम ह्मणोनी । आतां सांगेन ह्मणतो येथूनी । हें तों गुह्यतम अत्यंत ॥ ४४ ॥ कीं तूं दोषरहित । ह्मणोनि हें गुह्य अत्यंत । सांगेन ह्मणतो ऐसा भगवंत । भाव येथें दाखवी ॥ ४५ ॥ " अनसूयवे " ह्मणोनी । गहन भाव हृदयीं धरोनी । ह्मणे कीं मजवरी नसता दोष ठेवुनी । लोक दोषी होती तूं निर्दोष ॥ ४६ ॥ मी सर्वसम धनंजया । समान सर्वांवरी दया । निर्दोषा मज ऐशिया । दोष लाविती ॥ ४७ ॥ माझें थोरपण बोलों जाती । परि मज दोष लागतो हें नेणती । सर्वकर्ता ईश्वर ह्मणती । तेव्हां जनास दुःख काय मी देतों ॥ ४८ ॥ स्वयें पाप आचरती । ईश्वर करवितो ह्मणती । पापें करूनि दुर्गती । मी देतों काय सर्वांतें ॥ ४९ ॥ हें पंचमाध्यायांत विस्तारें । तुज म्यां सांगीतलें बरें । कीं न करवी ईश्वर खरें । पाप अथवा पुण्यही ॥५०॥ तें तुवां धरिलें मनीं । ईश्वर विषम निर्दय नव्हे ह्मणोनी । आणि अनादि वासनेकरूनी । पाप पुण्य आचरती हेंही समजलें ॥५१॥ हा भाव तूतें समज-

ला । हें बरें कळलें मजला । ह्मणोन हें गुह्य अत्यंत तुजला ।-सांगेन ह्मणतो ॥५२॥ "अनसूयवे" ह्मणोनीं । या भावें करूनी । येथें अर्जुनास आळवूनी । गुह्य सांगेन ह्मणतसे ॥ ५३ ॥ येथें इतर टीकाकार । ह्मणती कीं तुज वारंवार । आपण सांगतों तत्त्वविचार । हा दोष मजवर न ठेविसी ह्मणूनी ॥ ५४ ॥ ह्मणती "अनसूयवे" ह्मणूनी । कृष्ण ह्मणे या भावेंकरूनी । परि अमृत वारंवार पिउनी । दोष दातयातें कोण लावी ॥ ५५ ॥ अष्टादशीं श्रीपती । ऐसेंच ह्मणेल अर्जुनाप्रती । कीं "नच मां योभ्यसूयति" ह्मणोनी ॥ ५६ ॥ ह्मणजे जो मजवरी दोष । ठेवील कुत्सित पुरुष । त्यास हे गीता माझें वचनपीयूष । सांगूं नको ॥ ५७ ॥ त्या गीतेंत भगवंत । सांगेन ह्मणतो गुह्य अत्यंत । हें पाजितां अमृत । दोषारोपणाची कां शंका ॥ ५८ ॥ न स्मरे पूर्वापर। न कळे तों हा विचार। ज्यास अनन्य दैवत हा गीताकार । त्यातेंच हा अर्थ सूचवी ॥ ५९ ॥ एवं च ईश्वर सम सदय । तो हा कृष्ण नव्हे विषम निर्दय । ऐसें समजला धनंजय । ह्मणूनि अनसूयवे ह्मणे तयातें ॥ ६० ॥ ऐसियास गुह्य सांगेन ह्मणतां । अर्जुन ह्मणेल गुह्य काय आतां । उरलें असे कीं जें सांगावें शरणागता । तें अष्टमींच सांगितलें ॥ ६१ ॥ निर्मूल जालें द्वैत । बरवें बिंबलें अद्वैत । आतां याहूनि गुह्य काय अत्यंत । सांगों पाहतो ॥ ६२ ॥ उत्तरार्धाचा उद्भव । यानिमित्त करितो देव । परि अंतरीं भाव । ये रीती ॥ ६३ ॥ कीं ह्मणसी व्यतिरेकान्वयज्ञान । ज्याणें जालें अविद्यानिरसन । याही परीस गुह्य गहन । असेल काय ॥ ६४ ॥ तरी अगा ज्ञान तों तेंचि निश्चित । परि तेंचि ज्ञान विज्ञानासहित । सांगेन याकरितां गुह्य अत्यंत । कीं हें ज्ञानी भक्तचि माझे जाणती ॥ ६५ ॥ कीं विविधरूप जें ज्ञान । त्यास ह्मणावें विज्ञान । अन्वयें ब्रह्मचि सर्व परि भान । प्रतीतीस येते ते माया ॥ ६६ ॥ आणि विविधही हें ब्रह्म । ऐसें कळलें बुद्धीस वर्म । ते बुद्धीही मायाधर्म। ब्रह्मनिर्धर्म ते सर्वथा वृत्ति नव्हे ॥ ६७ ॥ आतां माया तेंही ब्रह्म । हे प्रतीतीही मायाधर्म । निर्गुणोपासका आवडे निर्धर्म । बाळास जैसी शर्करा ॥ ६८ ॥ शर्करामाधुर्यसीमा । त्याच साकरेच्या ओतिल्या प्रतिमा । माधुर्य आणि कौशल्यमहिमा । जाणती प्रौढ ॥ ६९ ॥ माधुर्य चाखे त्याची रसना । आकार गोड त्याच्या लोचना । तैसें निर्गुण आणि मायारचना । सगुण भगवद्रूप भक्तांतें ॥ ७० ॥ त्याज्य मायांश त्यांस नाहीं । भगवद्रूपें सेव्य तेंही । ऐसें विविधमायामयाच जें कांहीं । ज्ञान तें विज्ञान हा भाव ॥ ७१ ॥ तरी न कळोनि अध्यात्म-

त्व निश्चय । ह्मणोनि व्यतिरेक अन्वय । शब्दबोधेंचि मायामय । सगुण ह्मणतां अविद्या नासेना ॥ ७२ ॥ ह्मणोनि विज्ञानासहित ज्ञान सांगेन । जें जाणोन अशुभापासोनि मोचन । पावसी ह्मणोन कमललोचन । बोलतो उत्तरार्धें करोनी ॥ ७३ ॥

उत्तरार्ध ॥ ज्ञानं विज्ञानसहितं यज्ज्ञात्वा मोक्ष्यसेऽशुभात् ॥१॥

॥ टीका ॥ विज्ञानसहित येथुनी । ज्ञान सांगेन स्वमुखेंकरूनी । अशुभा अविद्या तीपासूनी । ज्ञान जाणोनी सुटसी तूं ॥ ७४ ॥ व्यतिरेक अन्वय तुजला । शब्देंच अर्जुना समजला । परि तुज बोध जाला वाटेल मजला । अभ्यास जेव्हां बाणेल ॥ ७५ ॥ गुरु सांगे वेदऋचा । तैसीच ह्मणे शिष्य-वाचा । परि पाठ जालें ह्मणोनि त्याचा । भरंवसा गुरूतें वाटेना ॥ ७६ ॥ अष्टमीं ज्ञान उपदेशुनी । मागुती ह्मणे या भावें करोनी । कीं विज्ञानसहित जें ज्ञान जाणुनी । अविद्येपासुनी तूं सुटसी ॥ ७७ ॥ जें ज्ञान बोललों निश्चित । तेंचि ज्ञान विज्ञानसहित । सांगेन कीं त्रिगुणरचना ही भगवंत । त्या ज्ञानेंच तुज वाटे हा भाव ॥ ७८ ॥ अगा ज्याची अविद्या गेली । त्यातेंच समजे हे बोली । ह्मणोनि ज्ञानेंचि कळे किली । विज्ञानाची ऐसिया ॥ ७९ ॥ ह्मणोनि विज्ञानसहित । ज्ञान सांगेन ह्मणतो भगवंत । जैसें अन्न-चि गोड अत्यंत । परि लवणासहित बहुगोड ॥ ८० ॥ अष्टमीं कोरडें अन्न पहिलें । आपणचि अर्जुनातें दिधलें । तेंचि लवणासहित रांधिलें । ऐसें सिद्धान वाढीन आतां हें ह्मणतो ॥ ८१ ॥ लवणावांचूनि गोडी नसे । तरी क्षुधा अन्नचि नासे । विश्व भगवद्रूप तेव्हां समरसे । जेव्हां व्यतिरेकान्व-यें नासे अविद्या ॥ ८२ ॥ नुसतें भक्षितां लवण । तृप्त जाला ऐसा कवण । आणि लवणावांचोनि जेवण । कोण गोडीनें जेविला ॥ ८३ ॥ ज्ञान या विज्ञानासहित । थोरपण पावतें अत्यंत । ह्मणोनि त्याचा महिमा भगवंत । सादर बोलतो या श्लोकीं ॥ ८४ ॥

॥ श्लोक ॥ राजविद्या राजगुह्यं पवित्रमिदमुत्तमम् ।
प्रत्यक्षावगमं धर्म्यं सुसुखं कर्तुमव्ययम् ॥ २ ॥

॥ टीका ॥ अगा निर्गुणात्मत्वें नासे अविद्या । ते निर्गुणाद्वैत शुद्ध विद्या । जें सांगेन ह्मणतो राजविद्या । राजा सकळ विद्यांचा ॥ ८५ ॥ वेदांताचें श्रवण । विद्या नव्हे ह्मणेल कवण । न कळे जया शास्त्राविण । मुख्य सि-द्धांत वेदाचा ॥ ८६ ॥ वेगळें जड वेगळें चैतन्य । कळतां ब्रह्म आपण अनन्य । ज्या व्यतिरेकें होय ऐसा धन्य । नव्हे काय विद्या ते व्यतिरेक

॥ ८७ ॥ चैतन्याहूनि विलक्षण । त्या जडीं चैतन्य लक्षण । सांपडे अलंकारीं जेसें सुवर्ण । ते अन्वयविद्या नव्हे काय ॥ ८८ ॥ ऐशा अद्वैतबोधरूपा सुविद्या । ज्या नाशिती अनादिमाया अविद्या । परि राजा इतक्या विद्यांत राजविद्या । जे सांगेन ह्मणतो श्रीकृष्ण ॥ ८९ ॥ सर्व शास्त्रें बोलती द्वैत । वेदांत बोले अद्वैत । तें शास्त्र तों गुह्य अत्यंत । ह्मणावेंच कीं ॥ ९० ॥ देह आत्मा ह्मणे चार्वाक । ज्ञानगुण ह्मणे नैयायिक । ज्ञानपरिणाम ह्मणे मीमांसक । तो आत्मा आत्मानुभवव्यतिरेकें येतसे ॥ ९१ ॥ गुह्य ऐसें हाही व्यतिरेक । आतां जड जें दिसे नश्वर अनेक । हें अन्वय कळ ब्रह्म एक । गुह्यपरम अन्वय ऐसा ॥ ९२ ॥ इत्यादि गुह्य सकळ । कीं ज्याकरितां कळे अकळ । परि हें राजगुह्य केवळ । राजा सर्वां गुह्यांचा ॥ ९३ ॥ जें आतां भगवंतें । सांगों आरंभिलें अर्जुनातें । सर्वांहूनि थोर त्यातें । आदींच ह्मणतो ॥ ९४ ॥ तरी काय त्यांत विशेष । कीं एवढा त्याचा उत्कर्ष । ऐसें अर्जुन पुसे तों परमहंस । ह्मणतो प्रत्यक्षावगम ह्मणोनी ॥ ९५ ॥ प्रत्यक्ष स्थावर जंगम । हें सर्वही पुरुषोत्तम । ऐसा होय अवगम । तें प्रत्यक्षावगम बोलावें ॥ ९६ ॥ कीं जें जें इंद्रिय । तें तें घेत आपला विषय । हे दोनी प्रत्यक्ष यांतें जें अतींद्रिय । प्रकाशितें ब्रह्म दोनीही ॥ ९७ ॥ "सर्वं खल्विदं ब्रह्म" । इत्यादि बोलती निगम । तरी प्रत्यक्षावगम । न ह्मणवे तें ज्ञान ॥ ९८ ॥ एक सर्व आणि एक ब्रह्म । दोहींस ऐक्य बोलती निगमें । परि दोनी ह्मणतां उपजे भ्रम । द्वैताचा ॥ ९९ ॥ सर्व शब्दें विश्व त्रिगुण । ब्रह्म विलक्षण निर्गुण । ऐक्य न घडे परि बोले आपण । वेदवाणी भगवंत ॥१००॥ तेव्हां प्रत्यक्ष तें असत्य । आणि अतींद्रिय ब्रह्म तें सत्य । ऐसें वेदोक्त पांडित्य । करितां वेदोक्त सर्व ब्रह्म साधावें ॥ १ ॥ एवं प्रत्यक्ष जें दिसे । तें मिथ्या ह्मणोनी मानावें कीं नसे । त्याचें प्रकाशक त्यांत गवसे । तेंचि तें मानूनि अनुभवावें ॥२॥ किरीटकुंडलादि अनेक । तें सर्वही 'खलु' निश्चयें कनक । तैसें हें सर्व आणि ब्रह्म एक । परि आकार सोनें हें न घडे ॥ ३ ॥ सोनें किरीटाचा आकार । तरी सोनें न ह्मणवे इतर अलंकार । कीं जरी किरीटाकारचि प्रकार । स्वरूपाचा त्याच्या नेमिला ॥ ४ ॥ एवं सुवर्ण आकाररूप । नव्हे कीं तें प्राप्तप्रभास्वरूप । रूप पावलें जरी अरूप । तरी रूप ऐसें त्यातें न ह्मणावें ॥ ५ ॥ परि आकाररूपी द्वैत नाहीं । कीं तें मिथ्या त्यांविण नसे

१ जें प्रत्यक्ष दिसतें तें सर्व ईश्वरस्वरूप. २ वेद. ३ सोनें.

कांहीं । तथापि ज्याकरितां जें दिसे नाहीं । तेंचि, ह्मणावें अद्वितीय ॥ ६ ॥ परि सोनें प्रिय बहु कीं तें सत्य । अलंकार तैसा प्रिय नव्हे असत्य । कांहीं मोडतां अगत्य । पिटिती आटिती ॥ ७ ॥ अलंकार दिसती फार । वाटेस नागवितील चोर । ह्मणोनि मोडिती अलंकार । मूस करोनि ते नेती ॥ ८ ॥ जरी केली मूस । आकार आहेच त्यास । लांब लाटा ह्मणावें ज्यास । आकार नव्हे तो काय ॥ ९ ॥ वाटोळा गोळा केला । तरी आकार ह्मणती त्याला । सोनें न कळेच कोणाला । कांहीं एक आकारावांचुनी ॥ ११० ॥ जडावेगळा व्यतिरेक । पाहती जरी निर्गुणोपासक । ब्रह्मीं ब्रह्ममय जाला तोहि एक । सत्त्वांश मायेचा ॥ ११ ॥ त्यास नलगे माया । परि ते न सोडी तया । प्रपंच तो मायेच्या गुणत्रया । वांचूनि न घडे ॥ १२ ॥ ज्यासी एकचि आवडे निर्गुण । त्याज्य त्यास मायागुण । जरी निर्गुणचि ते निपुण । त्रिगुणीं पाहती ॥ १३ ॥ ज्यास पाहिजे सगुण । त्यास विश्व सकळ हें त्रिगुण । सगुण ईश्वरचि वाटे हें खूण । 'प्रत्यक्षावगमं' ह्मणतां सूचवी ॥ १४ ॥ प्रत्यक्ष जडत्व इंद्रियांतें कळे । चित्स्वरूप बुद्धीतें आकळे । परि इंद्रियद्वारा जें आढळे । तेंही बोद्धव्य बुद्धीचें ॥ १५ ॥ जडीं चित्स्वरूप देखे बुद्धी । तीतेंचि इंद्रियद्वारा जडत्वबोधसिद्धी । बुद्धि तेचि अनुभवसमृद्धी । उभय प्रकारें ॥ १६ ॥ गुळाचा भेला दिसे दृष्टी । परि जों रसना लागली आहे उष्टी । तोपर्यंत दृष्टी कष्टी । नव्हे भेला मातीचा ह्मणोनी ॥ १७ ॥ प्रत्यक्षीं बुद्धि चिद्वस्तू पाहे । आणि इंद्रियां जडत्वही दिसताहे । तेव्हां जडत्व काय लाहे । हें जड प्रत्यक्षही ॥ १८ ॥ तथापि जडत्व मायांश । चित्प्रकाशें त्याचा प्रकाश । हाही त्याज्यांशलेश । नुरे या ज्ञानीं विज्ञान मेळवितां ॥ १९ ॥ कीं ज्या शुद्धसत्त्वें कल्पना । ईश्वराची अवताररचना । त्याच सत्त्वें प्रत्यक्ष नाना । ईश्वर कल्पितो ॥ १२० ॥ अविद्योपाधि जीव । ते अविद्याकर्मे त्रिगुणभाव । भोगीत ह्मणोनि देव । त्याच शुद्धसत्त्वें कल्पितो ॥ २१ ॥ 'ममात्मा भूतभावनः' ह्मणोनी । प्रकरणीं याच या श्लोकचरणें करोनी । माझी बुद्धि भूतें कल्पिते ह्मणेल यावरूनी । ईश्वरकल्पना हे प्रत्यक्ष ॥ २२ ॥ धाता यथापूर्व कल्पितो ऐसी श्रुती । वेद अन्यत्रही स्थळीं बोलती । हें पुढें विशदरीती । बोलणें असे ॥ २३ ॥ एवं ईश्वराची कल्पना । जैसी श्रीरामकृष्णाद्यअवताररचना । तैसें विविध हें प्रत्यक्ष नाना । कल्पना ईश्वराचीच ॥ २४ ॥ राजमुद्रांकित

१ पूर्वीप्रमाणें हें जगत् निर्मितो. नवें नाहीं.

सुवर्णद्रव्य अमित । त्यांत कांहीं भांडारीं संचित । हाटोहाट कांहीं फिरतसे ॥ २५ ॥ तथापि भांडारीं तें उत्तम । हाटोहाट फिरतें तें अधम । ऐसें न ह्मणावें तेंचि हेम । आणि त्याच मुद्रा रायाच्या ॥ २६ ॥ तैंवी शुद्ध चित्स्वरूप । तेंचि कल्पनेचें रूप । जगीं न दाखवी ईश्वरत्वप्रताप । अवतारीं दाखवी ॥ २७ ॥ राजद्रव्य भांडारीं । रत्नांकित मंदिरीं । तेंचि जनासि देतां दारोदारीं । फिरे परि तेंचि तें ॥ २८ ॥ ऐसें ज्ञान तें विज्ञान । प्रत्यक्ष मायामयही चित्स्वरूप हें ज्ञान । या विज्ञानयुक्त ज्ञानें अनुसंधान । राहे प्रत्यक्षही हें भगवंतचि ह्मणोनी ॥ २९ ॥ दृष्टि न पडे कारणीं । तरी जडत्व वाटे कार्यपणीं । या अन्वयज्ञानावांचुनी । त्रिगुणीं काय भगवद्भाव वाटेल॥१३०॥ ह्मणोनि मुख्य पाहिजे ज्ञान । परि माया त्याज्यांश वाटे जडत्वभान । त्यांत सगुणत्व पाहणें हें विज्ञान । मेळवितां प्रत्यक्ष भगवद्रूप वाटे॥३१॥ ऐसें ज्ञान विज्ञानसहित । तेव्हां प्रत्यक्षावगम निश्चित । कीं प्रत्यक्ष दिसतें हेंही भगवंत । कल्पूनि आपणा आपण दावितो ॥ ३२ ॥ उभा राहोनि निरंतर । स्तंभरूप दावी शरीर । पुरुषाचि तो स्तंभाकार । तें शरीर कल्पना तयाची ॥ ३३ ॥ तथापि ते माया । त्याज्य वाटे धनंजया । कीं सुवर्णाचिया क्रयविक्रया । चाड अलंकाराची असेना ॥ ३४ ॥ परि सुवर्णें सधन अलंकारें सुंदर । दोनी अपेक्षिती जे चतुर । ते आयत्या नगीं परम तत्पर । त्याज्यांश त्याला दिसेना ॥ ३५ ॥ आतां वेगळी कैंची माया । जड भास कैंचा धनंजया । पाहे आतां जगास या । योग ऐश्वर रूप ऐसें पुढें बोलेल ॥ ३६ ॥ ह्मणोनि हें प्रत्यक्ष जें स्थावरजंगम । स्वयें मीच साकार पुरुषोत्तम । ऐसें ज्ञान तें प्रत्यक्षावगम । यास राजविद्याराजगुह्य मी ह्मणतों ॥ ३७ ॥ जें प्रत्यक्ष तेंचि अवगम । या भावें ह्मणे प्रत्यक्षावगम । दुसरा अर्थ याचा प्रत्यक्षीं अवगम । मिथ्या संपत्ति अवगम[३] जैसा रज्जूचा ॥ ३८ ॥ जड सर्प निषेधितां असत्य । कळे चित्स्वरूप रज्जु सत्य । हा अर्थ टाकोनि काय अगत्य । कीं तो अर्थ अंगीकारावा ॥ ३९ ॥ ऐसें कोणी ह्मणती । हें सर्वज्ञ जाणे जगत्पती । यालागीं खूण सांगे अर्जुनाप्रती । कीं हें धर्म्य ह्मणोनी ॥ १४० ॥ कीं जडसर्प निषेध घडे । चित्स्वरूप रज्जू ठायीं पडे । तैसा प्रत्यक्षीं अवगम सांपडे । प्रत्यक्ष निषेधितां निर्गुण रज्जूचा ॥ ४१ ॥ तें नैर्धर्म्य ह्मणावें ज्ञान । कीं निर्धर्मीं लागे अनुसंधान । या ज्ञानांत मिसळितां विज्ञान । हें सगुणज्ञान धर्म्य ऐसें ह्मणावें ॥ ४२ ॥

१ बाजारांत. २ ईश्वरपण. ३ ज्ञान.

प्रत्यक्ष नाना धर्मरूप । अवगम त्याचा कीं तें भगवत्स्वरूप । नव्हे निर्धर्म निर्गुण अरूप.। या प्रत्यक्षासारिखें ॥ ४३ ॥ जेथें कांहीं तरी गुण । तेथें लागतें धर्मपण । केवळ गुणातीत निर्गुण । निर्धर्म त्यातें ह्मणावें ॥ ४४ ॥ जेथें माया तेथें धर्म । मायेपरतें तेंचि निर्धर्म । विश्व आणि ईश्वर दोन्ही सधर्म । हें ज्ञान धर्म्य यालागीं ॥ ४५ ॥ आतां पुण्यजनक कर्म । त्यासही ह्मणावें धर्म । तरी ज्ञान नैष्कर्म्य हें वर्म । कर्मातीतास धर्म लागेना ॥४६॥ कर्म लागलें अविद्येकडे । ज्ञानियास त्या अविद्येच्या संस्कारें घडे । कीं प्रारब्धही अविद्येंत पडे । फळ अविद्यारचित कर्माचें ॥ ४७ ॥ पुण्य आणि पाप । दोनीही अविद्यारूप । कर्मधर्मदाहकस्वरूप । ज्ञानाग्नि हा ॥ ४८ ॥ धर्म ह्मणतां पुण्यकर्म । ज्ञानीं न लगे तो धर्म । या धर्म्यं पदांचें न कळोनि वर्म । प्राकृत टीकाकार धर्म्य इतकेंचि बोलती ॥ ४९ ॥ आतां आत्मा पहावा हाचि परम । याज्ञवल्क्य बोलिला धर्म । तरी तें स्मृतींत बोलतां कर्म । पुरुषार्थ धर्म शब्दें उपपादिती ॥ १५० ॥ तरी कर्ममार्गीं जो पुरुषार्थ । तो मुख्य पुरुषार्थ न ह्मणावा हा अर्थ । कीं पुरुषार्थ थार तोचि यथार्थ । जेथें योगें घडे आत्मदर्शन ॥ ५१ ॥ ॥ याज्ञ० स्मृ० ॥ इज्याचारदमाहिंसादानस्वाध्यायकर्मणाम् ॥अयं तु परमो धर्मो यद्योगेनात्मदर्शनम् ॥ स्मृत्यर्थ ॥ इज्या यज्ञ आणि देवतापूजन । आचार स्वधर्म शौच सोवळें स्नान । दम इंद्रियदमन । परपीडा टाकणें अहिंसा ॥ ५२ ॥ सत्पात्रीं देणें हें दान । स्वाध्याय वेदशास्त्राध्ययन । कर्में इत्यादि आचरती जन । धर्म ह्मणावे हे सर्व ॥ ५३ ॥ परंतु योगें करोनी । आत्मदर्शन साधिती मुनी । परम धर्म तो हा ह्मणोनी । परम पुरुषार्थ सूचवी ॥ ५४ ॥ कर्मशास्त्ररूपा स्मृती । आचार व्यवहार प्रायश्चित्तें सांगती । तेथें धर्म पुरुषार्थ बोलती । प्रसंगें ह्मणे मुख्य पुरुषार्थ आत्मज्ञान ॥ ५५ ॥ हे ज्ञानशास्त्र गीता । येथें ज्ञान नैष्कर्म्य हेंचि तत्त्वतां । नैष्कर्म्य नैष्कर्म्ये ह्मणोन बोलता । जाला बहुतां स्थळीं ॥५६॥ गीतावचन ॥ न कर्मणामनारंभान्नैष्कर्म्यं पुरुषोऽश्नुते ॥ नैष्कर्म्यसिद्धिं परमां संन्यासेनाधिगच्छति ॥ प्रस्तुतटीका ॥ ऐसें नैष्कर्म्य शब्दें करोनी । ज्ञान कर्मातीत ह्मणोनी । स्वयें सर्वत्र बोलोनी । ज्ञानास धर्म्य कां तो ह्मणेल ॥ ५७ ॥ एवं प्रत्यक्ष विश्व हें भासतें । ज्या ज्ञानें सगुणरूपचि दिसतें । प्रत्यक्षावगम त्यास ह्मणिजेतें । धर्म्य ह्मणावें या लागीं ॥ ५८ ॥ ऐसें विज्ञानसहित ज्ञान । ज्ञानियास हेंचि सगुणभजन । द्वादशीं धर्म्यामृत ह्मणोनि जगज्जीवन । सगुणभक्त वर्णोनि बोलेल ॥ ५९ ॥

अष्टादशीं शेवटीं । गीता सगुणपर हा भाव पोटीं । मुखें ह्मणेल अगा किरीटी । संवाद माझा तुझा हा धर्म्य ॥१६०॥'अध्येष्यते च य इमं' या श्लोकें-करोनी । 'धर्म्यं संवादमावयोः' ह्मणोनी । विश्व सगुणब्रह्म हें ज्ञान यावरूनी । धर्म्य ह्मणावें या स्थळीं ॥ ६१ ॥ सगुणभक्त ऐसे ज्ञानी । अर्जुना हा भाव हृदयीं धरोनी । 'एवं सतत युक्ता ये' या श्लोकें करोनी । हे थोर कीं ते थोर द्वादशीं पुसेल ॥ ६२ ॥ या प्रसंगाचेंचि उद्घाटण । तेथें करोनि जगज्जीवन । अंतीं हें धर्म्यामृत ह्मणोनि वचन । द्वादशीं या भावेंचि बोलेल ॥ ६३ ॥ निर्गुणज्ञानाचा मुकुट । हें सगुण ज्ञान उत्कट । त्याज्यांश जेथें नुरे निपट । रामकृष्णरूपें तैसें चराचर पाहतां ॥ ६४ ॥ समुद्रांत उठला कल्लोळ । त्या कल्लोळीं त्या समुद्राचेंचि जल । जो त्याचा आकार त्याचेंही मूळ । कैंचें सागरावेगळें ॥ ६५ ॥ तरंगां प्रकाशी सागर । ब्रह्म प्रकाशी चराचर । माया जे चराचराकार । ब्रह्मचि मूळ तीचेंही ॥ ६६ ॥ बीज आणि अंकुर । दोनी मिळोनि जाला तरुवर । तैसें ब्रह्ममाया मिळोन चराचर । प्रत्यक्ष भगवद्रूप हें ॥ ६७ ॥ बीजा अंकुरा वेगळेपण । तेवीं वेगळी माया आणि निर्गुण । दोनी पृथक् आणि एकपण । प्रत्यक्ष भगवद्रूप हें ॥ ६८ ॥ ऐसें जें कां अत्यंत । भगवद्भक्तिरूप अद्वैत । धर्म्य पदें भगवंत । उपपादितो ॥ ६९ ॥ धर्म्य नांव या ज्ञानाचें । महत्व सर्वांहून याचें । या अध्यायमुखें वर्णी साचें । अन्यत्र ऐसी प्रशंसा करीना ॥ १७० ॥ गीतेंत हेंच ज्ञान थोर । हेंचि भक्ति वर्णी सादर । ह्मणोनि अष्टादशीं सर्वेश्वर । अवघाच धर्म्य संवाद हा ह्मणे ॥ ७१ ॥ गीतेंत आहे कर्मकांड । तेथें धर्मही बोलिला उदंड । परि प्रति अध्यायांतीं अखंड । "उपनिषत्सुब्रह्मविद्यायां योगशास्त्रे च" ह्मणतसे ॥ ७२ ॥ वरीं कुणबी आणि कुणबिणी । परि ब्राह्मण घरचा धनी । तें ब्राह्मणगृह ऐसीच वाणी । सर्वांची निघतसे ॥ ७३ ॥ तैसें गीतेंत सकळ । परि अध्यात्म आद्यंत पुष्कल । त्यांत ब्रह्म बोलोनिही निष्कल । अतिशय महिमा याच सगुणज्ञानाचा ॥ ७४ ॥ आतां धर्म्यपदाचा निर्णय । बहुत बोलोनि काय । निर्गुण तों बोलिलें न जाय । ज्ञान धर्म्य पदेंकरूनी॥ ७५ ॥ एक सगुणज्ञानेंच घडे । कीं लागे पुण्यकर्माकडे । तरी कर्मप्रशंसा न सांपडे । या प्रकरणीं सर्वथा ॥ ७६ ॥ आणि ज्या अर्जुनाप्रती । हें ज्ञान बोलतो श्रीपती । तो विश्वरूपीं प्रथमश्लोकीं विनंती । काय करितो ॥ ७७ ॥ कीं माझ्या अनुग्रहाकारणें अत्यंत । गुह्य अध्यात्मसंज्ञित । जें बोलिलासि

तूं भगवंत । त्याणें गेला माझा मोह हा ॥ ७८ ॥ येथें धर्माची कां कथा । धर्म्य पदें निर्गुणही नव्हे सर्वथा । सगुणज्ञानावांचोनि अन्यथा । न लागे हें धर्म्यपद ॥ ७९ ॥ आतां या श्लोकीं कमलनेत्र । ह्मणतो हें उत्तम पवित्र । तरी पवित्र पदार्थ मात्र । ज्ञानासारिखा असेना॥१८०॥"नहि ज्ञानेन सदृशं" या श्लोकें करोनी । ज्ञानासारिखें पवित्र नाहीं ह्मणोनी । मागें श्रीकृष्ण बोलिला यावरूनी । पवित्र शब्दें सोंवळें जें नातळे द्वैतातें ॥ ८१ ॥ पवित्र उगेंचि ज्ञान निर्धर्म । आणि हें पवित्र ह्मणे उत्तम । कीं माया ह्मणावें स्थावर जंगम । हेंही जेथें असेना ॥ ८२ ॥ हे राजविद्या राजगुह्य परम । हें पवित्र उत्तम । हें ज्ञान प्रत्यक्षावगम । आणि धर्म्य यालागीं ॥ ८३ ॥ ऐसें श्रेष्ठत्व याचें तीं चरणीं । आयकोनि अर्जुन अंतःकरणीं । भ्याला कीं षष्ठीं योगप्रकरणीं । मनोनिग्रह कठीण वाटला ॥ ८४ ॥ तें मी बोलिलों याप्रती । तेथें वैराग्य अभ्यास हा जगत्पती । उपाय सांगोनि ह्मणे मागुती । कीं योग मनोनिग्रहावांचूनि असाध्य ॥ ८५ ॥ त्या सकळां योगाहूनी । हें ज्ञान थोर ह्मणोनी । मज ह्मणतो यावरोनी । साधन याचें कठीण असेल ॥ ८६ ॥ अर्जुन ऐसा शंकला मनीं । तों देव मंद हास्य करोनी । "सुसुखं कर्तुं" ह्मणोनी । या पांचा अक्षरीं बोलतसे ॥ ८७ ॥ कीं उपजोनिही वैराग्य । अभ्यास करी सभाग्य । तथापि त्यास वाटे अभाग्य । प्रत्यक्ष हें दिसतसे ॥ ८८ ॥ कीं वाटतां फुलांचा हार । संतोष वाटे अपार । पूर्वसंस्कारें सर्पाकार । भासतां भयें तोचि कांपे ॥ ८९ ॥ गारोडियास हार । सुखावह आणि सर्पाकार । भय न करी ह्मणोनि लावितां कर । सुखस्पर्श हार तो साच लागे ॥ १९० ॥ हें प्रत्यक्षही वासुदेव । स्वयें दिसतो देवाधिदेव । हें समजला तो स्वयमेव । हें प्रत्यक्ष सकळही ॥ ९१ ॥ ज्यास ऐसा प्रत्यक्ष अवगम । त्यास तो पूर्वोक्त योगही सुगम । हें पुढिल्या अध्यायीं पुरुषोत्तम । बोलेल या श्लोकीं ॥ ९२ ॥ उत्तराध्याय श्लोक ॥ एतां विभूतिं योगं च मम यो वेत्ति तत्त्वतः। सोऽविकंपेन योगेन युज्यते नात्र संशयः ॥टीका॥ हे माझी विभूती । आणि योग माझा बरवे रीतीं । जो जाणेल त्याची वृत्ती । योजेल योगीं न कांपतां ॥ ९३ ॥ पुढें टीका होईल सविस्तर । येथें बोलणें हेंचि सार । कीं योगीं वृत्ति होय स्थिर । अनायासें करितां ॥९४॥ ह्मणोनि हा उत्तराध्यायश्लोक । बोलेल ऐसा उत्तमश्लोक । कीं हे महर्षि सप्त चत्वारि सनकादिक । विभूति माझी॥९५॥आणि बोलेल 'पश्य मे योगमैश्वरं' ह्मणोनी । नवमाध्यायीं ईश्वरत्व योग स्वमुखें करोनी । हे विभूति आणि तो

योग जो ज्ञानी । तत्त्वतां जाणेल ॥ ९६॥ तो अविकंपयोगें करीनी । योजेल येथें संशय नसे ह्मणोनी । ह्मणे कीं चित्त स्वरूपीं लागोनी । न कांपे अविकंपयोग तो ह्मणावा ॥ ९७ ॥ षष्ठाध्यायांत अर्जुन । दुर्निग्रह ह्मणूनि ह्मणे मन । तरी सगुण भक्तीवांचून योग कठिण । या भावें श्रीकृष्णही बोलिला ॥ ९८ ॥ ते सगुणभक्ति ज्ञानहीन । अविद्यायुक्त तिचें भजन । परि त्या भक्तीनें होणार आत्मज्ञान । त्या ज्ञानें सगुणज्ञान हें उमजे ॥ ९९ ॥ या सगुणज्ञानाचें नांव योग ऐश्वर । कीं ईश्वरत्व योग हें चराचर । तें जो जाणेल ह्मणे सर्वेश्वर । तो अविकंपयोगें योजेल॥२००॥तंतुरूपें पाहणें पट । मृत्तिका मात्र पाहणें घट । ब्रह्मचि विश्व निपट । हा योग बाणे या ज्ञानें ॥१॥ आत्मा तंतु सत्यत्वें पहावा । जड पटाकार मिथ्यात्वें त्यजावा। हें येथें नसे परि चित्प्रकाशें भजावा । चराचररूपें भगवंत ॥२॥ त्या चित्प्रकाशाविण । न कळे हें ज्ञान सगुण । तेव्हां अनायासें बाणे खूण । त्या योगाचीही ॥३॥एवं तो योग या ज्ञानें बाणे । आणि मग या योगेंचि हें ज्ञान जाणे । प्रत्यक्ष भगवद्रूप या खुणें । जो पावला ॥ ४ ॥ या ज्ञानाचा प्रताप । ऐसा कीं जड जग दिसे भगवद्रूप । तेव्हां अनायासें चित्स्वरूप । पटीं तंतू ऐसें जडीं ब्रह्म दिसों लागे ॥ ५ ॥ तेव्हां न करितां कष्ट । साधन न लगे उत्कृष्ट । निर्गुण विश्वरूपें स्पष्ट । दिसे तें सगुणज्ञान हें धर्म्य प्रत्यक्ष ॥ ६ ॥ "सुसुखं" ह्मणजे अतिशय सुख । जेथें साधन यत्न न दिसे दुःख । जें तें "विश्वतोमुख", भगवद्रूप प्रत्यक्ष हें ॥ ७ ॥ प्रत्यक्ष भगवद्रूप हें ज्ञान । जालें परि करावें जतन । त्यासही ह्मणे कृपाळू कमलनयन । "सुसुखं कर्तुं" ह्मणोनी ॥ ८ ॥ जरी विश्वात्मअन्वययोगाविण । हें प्रत्यक्ष धर्म्य ज्ञान सगुण । नोहे परि तेंही जडचैतन्य एकत्वखूण । या ज्ञानेंचि दृढ बाणते ॥ ९ ॥ याविषयीं उत्तमश्लोक ॥ उत्तराध्यायांत बोले जो श्लोक । त्याचा निर्णय सुज्ञ लोक । पूर्वापर विचारदृष्टी पाहोत ॥ २१० ॥ आतां प्रत्यक्ष हें जें दिसे । हेंचि धर्म्यज्ञान असे । तरी हें प्रत्यक्ष नाशतें ऐसें । शोधक कोणी ह्मणती ये स्थळीं ॥ ११ ॥ हें सर्वज्ञशिखामणी । जाणोनि ह्मणे चक्रपाणी । शेवटीं श्लोकाचिया चतुर्थचरणीं । ह्मणे कीं हें अव्यय ॥ १२ ॥ अव्यय ह्मणजे नव्हे जें नाशवंत । आणि हें तरी नासोनि असे उपजत । आणि अव्यय ह्मणतो भगवंत । तेव्हां युक्तीनें हें साधावें ॥ १३ ॥ जें कालचें मृगजळ । तें आजचें दिसे पुष्कळ । तैसें भगवद्रूप हें केवळ । आविर्भाव तिरोभाव दावितें ॥ १४ ॥ दृष्टी दिसे देव । त्यास ह्मणावें आविर्भाव । न दिसे तेव्हां ति-

रोभाव। पावला ह्मणावें ॥ १५ ॥ रासक्रीडा प्रथम राती। गोपी गर्व करितां जगत्पती। अंतर्धान पावोन मागुती। प्रगट जाला ॥ १६ ॥ तैसेंचि विश्व पावोनि लय। पुन्हा पावतां उदय। तेंचि ह्मणावें हें अव्यय। प्रत्यक्ष हें ॥ १७ ॥ येथें हें प्रत्यक्षचि अव्यय। कृष्ण ह्मणतो हा पोटीं निश्चय। समजोनि धरी धनंजय। कीं प्रश्न करील ऐसाच विश्वरूपा ॥ १८ ॥ "मन्यसे यदि तच्छक्यं" या श्लोकें करोनी। "दर्शयात्मानमव्ययं" ह्मणोनी। अव्यय देह आपला दावी याचि वरोनी। विश्वरूपास हाही अव्यय ह्मणेल ॥ १९ ॥ कीं चित्स्वरूप कळलें खरें। परि विश्वरूप न दिसे बरें। ह्मणोनि हेंचि जग पाहेल आदरें। दिव्यचक्षू करोनी ॥२२०॥ एवं प्रत्यक्ष हें स्वयें पुरुषोत्तम। ह्मणोन या ज्ञानाचें नांव प्रत्यक्षावगम। हें अव्यय ह्मणोनि सर्वोत्तम। हें ज्ञानही अव्यय ह्मणतसे ॥ २१ ॥ ज्ञान तेंचि ज्ञेय। तेंचि ज्ञाता हा निश्चय। एक अविद्या जातां अव्यय। सर्वही ॥ २२ ॥ हा सकळ जगाचा लय उदय। परि शरीरें नाशती हा निश्चय। तो देह पुन्हा नये तेव्हां अव्यय। कैसें ह्मणावें ॥ २३ ॥ तरी नाचत नाचत नट। पांघरला असे जो पट। घुंगट घेवोनि निपट। बायको स्वशरीरचि दाखवी ॥ २४ ॥ तेव्हां ते बायको उपजली। पदर काढितां मागुतीं मेली। पुनः घुंगट घेतां जन्मली। काय ते ह्मणावी ॥ २५ ॥ अवघें मिळोन तो नट। किंवा त्याचा तो पट। दोहींची जे खटपट। ते ही तो नट आणि तो पटचि त्याचा ॥ २६ ॥ गर्भापासोनि जों स्मशान। आपणास आपण जो जगज्जीवन। कल्पून दावी होऊनि जननयन। स्वयेंचि पाहे ॥ २७ ॥ या धर्म्यज्ञानरज्जूवरी। अविद्या सर्प निर्माण करी। जन्ममरण षड्भाव कूसरी[1]। सत्यत्वें जग दोरीच दाविते ॥ २८ ॥ ते ही शक्ति त्याची। त्याच्या प्रकाशाविण ते कैंची। परि ते जों आहे तों साची। संसारबाधा आणि जीवत्व जीवातें ॥ २९ ॥ एवं हें ज्ञान ह्मणतां अव्यय। भाव इतका समजे धनंजय। पिकलें पीक अतिशय। भाग्याचें जयाचिया ॥२३०॥ परि एक उपजली शंका। ते तत्काळ कळली श्रीवत्सांका। ह्मणोनि पुढिलिया श्लोका। बोलों पाहे ॥ ३१ ॥ सुखसाध्य अत्यंत हें ज्ञान। जें सांगों पाहतो कमलनयन। तरी कां मृत्युमुखीं सर्वजन। दीसती ॥ ३२ ॥ त्यांत केवळ मूढ अंध। ते वेदशास्त्रांचा नेणतीच कीं गंध। जे वाचिती वेद शास्त्र पुराण प्रबंध। कां तेही पडती मृत्युमुखीं ॥ ३३ ॥ हा दयाळु जगत्पती।

[1] नाहींसा होणें.

वेदीं शास्त्रीं या ज्ञानरीती । बोलिला असे तें जे वाचिती । ते कां पडती मृत्युमुखीं ॥३४॥ हा अर्जुनाचा भाव । समजोनि उत्तर देतसे देव । कीं स्वघात स्वयमेव । ते लोक करिती ॥ ३५ ॥ कीं ज्याच्या प्राप्तीस जें द्वार। त्या द्वारें न जाती पामर । ह्मणोनि मृत्युमुखीं पडती नर । हें सर्वेश्वर बोलतो या श्लोकीं ॥ ३६ ॥

॥ श्लोक ॥ अश्रद्दधानाः पुरुषा धर्मस्यास्य परंतप ।
अप्राप्य मां निवर्तंते मृत्युसंसारवर्त्मनि ॥ ३ ॥

॥ टीका ॥ अगा या ज्ञानाचा धर्म । ह्मणिजे या ज्ञानप्राप्तीस मार्ग सुगम । त्याची अश्रद्धा ज्यास त्यातें दुर्गम । कैसें नव्हे ज्ञान हें ॥ ३७ ॥ ज्या धर्मे हें ज्ञान । पाविजे तेंचि याचें साधन । त्या धर्माचे अश्रद्दधान । श्रद्धाहीन केंवी यातें पावती ॥३८॥ चहूंकडोनि कांटे । कल्पवृक्षास पावणें ज्या एकेच वाटे । त्या वाटे न जातां केंवी भेटे । तो कल्पवृक्ष ॥३९॥ जरी ह्मणों मार्ग चुकले । नेणोनि सर्वांस मुकले । तरी वेद शास्त्र पुराणें शिकले । भागवतधर्म काय ठाउके नसती ॥२४० ॥ एक श्रीकांत सर्वेश्वर । नव्हती मुक्तिप्रदा देवता इतर । ऐसे अव्यभिचार भजनीं तत्पर । होती तरी या धर्मेच मज पावती ॥४१॥ मीच राजविद्याराजगुह्यस्वरूप । मीच प्रत्यक्ष आणि प्रत्यक्षावगम बोधरूप । नानारूप मीच अरूप । असें आपणा आपण कल्पूनी ॥ ४२ ॥ त्या मातें पावणें अर्जुना । हेंच कीं पावणें या ज्ञाना । तरी याच्या धर्मानुष्ठानाविना । प्राप्त नव्हे हें ज्ञान मद्रूप ॥ ४३ ॥ या भावें ह्मणे सर्वेश्वर । कीं याच्या धर्माचे अश्रद्दधान नर । मातें न पावोनि पामर । मृत्युसंसारमार्गीं परतती ॥ ४४ ॥ ज्यास जें ठाउकेंच नाहीं । तो अश्रद्दधान ह्मणवेना कांहीं । एवं भागवतधर्म जाणोनिही । अश्रद्दधान जे श्रद्धा न धरिती ॥ ४५ ॥ आणि याच्या धर्माचे अश्रद्दधान । ह्मणजे प्रस्तुतीं बोलों पाहतों जें ज्ञान । ते या ज्ञानाच्या धर्माचे अश्रद्दधान जन । ते मातें न पावोनि मृत्युसंसारमार्गीं परतती ॥ ४६ ॥ ह्मणिजे प्रत्यक्ष स्थावर जंगम । हेंचि मी ऐसा अवगम । हा न होतां प्रत्यक्षावगम । मृत्युसंसारमार्ग हेंचि प्रत्यक्ष ॥ ४७ ॥ आतां निवर्तंते ह्मणिजे परतती । तरी काय पावोनि फिरती मागुती । मृत्युसंसारमार्गीं पहिलेच असती । परतती ते कैसे ॥ ४८ ॥ हा संदेह तरी उत्पन्न होता । कीं अश्रद्दधान जरी न ह्मणता । आणि याच्या धर्माचे अश्रद्दधान तत्त्वता । हेंही बोले ॥ ४९ ॥ कीं या ज्ञानातें पावला ।

१ ज्ञान.

तो तों अमृतचि प्याला । मृत्युसंसारमार्गीं त्याला । परतणें कैचें ॥२६०॥ आतां मृत्युसंसारमार्गींच असती । परि अमृत पावेल जेथें सुमती । त्या गृहाच्या द्वारास पावती । आणि परतती अमृत येथें नसेल ह्मणोनी ॥६१॥ गीता भारत भागवत । यांत या ज्ञानप्राप्तीचे धर्म विहित । ते वाचोनि आयकोनि ह्मणती यांत । काय आहे ह्मणोनी ॥ ६२ ॥ नेत्रीं रोग केवळ । पिंवळा दिसे चंद्र उज्ज्वळ । ताकासारिखेंचि दूध धवळ । ज्यास वाटे ॥ ६३ ॥ इतरदेवतापूजन । आणि भागवतधर्में भगवद्भजन । समान मानूनि ते जन । श्रद्धा न धरिती या ज्ञानप्राप्तिधर्मांची ॥ ६४ ॥ अमृत-सत्रद्वारास जाती । आणि कांजीच असेल मानिती । आणि अन्यत्र जाऊ-नि कांजीच पिती । जे पीतचि होते सर्वदा ॥ ६५ ॥ तथापि अमृतप्राप्तीचें द्वार । पावोनि परतले ह्मणावे ते नर । ऐसे परतती ह्मणे सर्वेश्वर । अश्र-द्दधान या ज्ञानप्राप्तिधर्माचे ॥ ६६ ॥ येथें अगा परंतप ह्मणोनी । बोले अर्जुनातें आळवूनी । गहनभाव हृदयीं धरोनी । परंतप ह्मणतसे ॥ ६७ ॥ कीं पर जे वैरी । त्यांतें युद्धीं संताप करी । त्यातें संस्कृत वैखरी । परंतप ह्मणतसे ॥ ६८ ॥ तरी शत्रुसंहारकर्म । क्षत्रियाचा स्वधर्म । तें कृष्णार्पण करितां तुटे भ्रम । कृष्णप्रसादें अविद्येचा ॥ ६९ ॥ हें तृतीयाध्यायीं कळलें वर्म । कीं विना कृष्णार्पण इतर कर्म । बंधक ह्मणोनि जो जो स्वधर्म । तो या कृष्णास अर्पावा ॥२६०॥ " यज्ञार्थात्कर्मणोन्यत्र " ॥ या श्लोकीं बोलिला कमलनेत्र । कीं कृष्णार्पणाविण कर्ममात्र । बंधक ह्मणोनी ॥ ६१ ॥ शत्रुसंतापरूप कर्म । भगवंतीं अर्पितां भागवत धर्म । आणि भगवंत तोचि सगुणब्रह्म । कृष्णरूपें हा अवतरला ॥ ६२ ॥ हें चतु-र्थाध्यायांत अर्जुन । समजला जेथें कमलनयन । " परित्राणाय साधूनां " इत्यादि वचन । स्वावताराविषयीं बोलिला ॥ ६३ ॥ सप्तमीं इतरदेव-ताराधन । नश्वर फलाचेंचि साधन । अनंतफल अनंताचेंच भजन । हेंही अर्जुन समजला ॥ ६४ ॥ " कामैस्तैस्तैर्हृतज्ञाना । प्रपद्यंतेऽन्यदे-वता " ह्मणोनि अर्जुना । बोलिला इत्यादि श्लोकरचना । बिंबली हृदयीं अर्जुनाच्या ॥ ६५ ॥ अष्टमीं मातें स्मरोनी । युद्ध करीं ह्मणोनी । " तस्मा-त्सर्वेषु कालेषु " या श्लोकें करोनी । तें दृढ धरिलें मनीं अर्जुनें ॥ ६६ ॥ कीं सर्वदा यातें स्मरणें । आणि स्वधर्म युद्ध हें करणें । आणि स्वधर्म समर्प-णें । चरणीं याचिया ॥ ६७ ॥ आणि देवता सर्वांत । थोर हा भगवंत । या भावें स्वधर्मविहित । समर्पणें चरणीं याचिया ॥ ६८ ॥ सर्वांत थोर

नारायण । ह्मणोनि या भावें स्मरोनी समर्पण । स्वकर्माचें करणें हें प्रथम लक्षण । भागवत धर्माचें ॥ ६९ ॥ हे भागवतधर्मपदवी । जनकरायास नव योगियांत कवी । श्रीमद्भागवतीं बोलिला बरवी । या श्लोकें करोनी ॥२७०॥ एकादश स्कंधश्लोक ॥ कायेन वाचा मनसेंद्रियैर्वा बुध्यात्मना वानुसृतस्वभावात् । करोति यद्यत्सकलं परस्मै नारायणायेति समर्पयेत्तत् ॥ ॥ श्लोकार्थ ॥ कवी ह्मणे भागवतधर्म । राया पुसतोसि तरी सकळ कर्मे । नारायणाकारणें समर्पावें हें वर्म । भागवतधर्माचें ॥ ७१ ॥ काया वाचा मन इंद्रियें बुद्धी । ज्या ज्या करितां ज्या ज्या कर्मांची समृद्धी । अथवा अहंकारेंहि कर्मसिद्धी । अनुसरला संस्कार त्यास्तव ॥ ७२ ॥ ऐशा ज्या ज्या करितो क्रिया । त्या त्या नारायणाकारणें जनकराया । अर्पण कराव्या नारायणा देवराया । सर्वांत थोर ऐसें स्मरोनी ॥ ७३ ॥ "परस्मै नारायणाय इति"। "समर्पयेत्" ऐसें पदा पुढें पद योजी [1]सुमती । आणि बोले जनकरायाप्रती । कीं सर्वांत थोर नारायण ह्मणोनि अर्पावें॥७४॥ या श्लोकीं आत्म शब्दें अहंकार । अनुसृतस्वभाव ह्मणिजे पूर्वसंस्कार । जो निरहंकार त्यासही हा प्रकार । कर्मसमर्पणीं बोलिला ॥ ७५ ॥ कीं काया वाचा इंद्रियें । मनाच्या संकल्पें बुद्धिनिश्चयें । कर्म करिती कांहीं स्वयें । करीत नाहीं ॥ ७६ ॥ कर्तृत्व मानी अहंकार । त्यावेगळा आत्मा कळला निर्विकार । तो अकर्ता परि पूर्वसंस्कार । अनुसरला असे बुद्धीतें ॥ ७७ ॥ "अनुसृतस्वभावात्" या वचनें करोनी । हा अर्थ दावी वदोनी । उगेंचि अनुसरल्या संस्कारें ह्मणोनी । अर्थ येथें न वदवे ॥ ७८ ॥ कीं उगाच कांडिया मोडी । कीं उगाच रेघा ओढी घेऊनि कांडी । उगाच दांतें नखें तोडी । बुद्धिपूर्वक नव्हे हें कर्म ॥ ७९ ॥ कोणी जे ते कीं जे तें कीं ह्मणोनी । इत्यादि वृथा शब्द प्रतिवचनीं । बोलती लटक ऐसी वाचेची जनीं । बुद्धिपूर्वक नव्हे हेंही ॥२८० ॥ हा अनुसृतस्वभाव । ह्मणोनि जरी काढावा भाव ॥ तरी तेंही काया वाचा मन इंद्रियांत सर्व । कर्म आढळे ॥ ८१ ॥ बुद्धिपूर्वक कर्में न होती । तथापि काया वाचा इंद्रियेंचि तीं करिती । अर्थ अन्यथा कोणे रीती । न योजे येथें ॥ ८२ ॥ निरहंकारियासही अहंकारें । आत्मविस्मृतींत पूर्वसंस्कारें । मी कर्ता वाटे तें याप्रकारें । अबाधित अर्थ अनुसृतस्वभावाचा ॥ ८३ ॥ तें असो या प्रस्तुतीं । "परस्मै नारायणायेति" ह्मणोनि ये रीती । कर्मे समर्पावीं ऐसें

[1] अनुकरण केलला.

जनकाप्रती । कवी वडील नव योगियांत तो बोले ॥ ८४ ॥ हें समजला अर्जुन । कीं सर्वांत थोर हा कमलनयन । स्वधर्म यास अर्पूनि नमन । स-र्वदा यातें करावें ॥ ८५ ॥ प्रथम भागवतधर्म । कीं कृष्णचरणीं समर्पावें कर्म । परि हा सर्वांत थोर हें वर्म । " परस्मै नारायणायेति " ह्मणजे या प्रकारें ॥ ८६ ॥ त्यांत अर्जुनाचा स्वधर्म । शत्रुसंहार शौर्य कर्म । इतका अर्थ सगुण ब्रह्म । स्मरोनि ह्मणे अगा परंतपा ह्मणोनी ॥ ८७ ॥ कीं पुढें बोलों पाहतो जें ज्ञान । त्यात्या धर्माचे जे अश्रद्दधान । ते मातें न पावोनि मरण जनन । या संसारमार्गीं निघाले ॥ ८८ ॥ ह्मणोनि बोलिलों मी अ-र्जुना । तरी ह्मणी वाटेल तुझ्या मना । कीं भागवतधर्म जरी मजही घडे-ना । तरी मीही पावेना ज्ञान हें ॥ ८९ ॥ तूं युद्ध स्वकर्म टाकावया । सिद्ध होतासि धनंयजा । आतां परांतें ताप युद्धीं कराया । सिद्ध जालास या गीताश्रवणेंच कीं ॥ २९० ॥ एवं गीतार्थ तुजला । जेव्हां हृदयांत बिंब-ला । तेव्हां स्वधर्म अर्पिसील निश्चित मला । ज्या धर्मे ताप शत्रूंतें ॥ ९१॥ मज समर्पी सर्व कर्म । तयास घडलेच भागवतधर्म । या ज्ञानप्राप्तीचें वर्म । सांपडलेंचि तुजला ॥ ९२ ॥ या गूढभावें करोनी । त्यातें परंतप ह्मणो-नी । स्वमुखें श्रीकृष्ण आळवूनी । बोलावें तें येथोनि बोलेल ॥ ९३॥ एवं बोलों पाहतो ज्ञान । याच्या साधनरूप धर्माचा अश्रद्दधान । होय श्रोता पांडुनंदन । हें मधुसूदन बोलिला ॥ ९४ ॥ याच्या धर्माचे अश्रद्दधान । ऐसें स्पष्ट येथें बोले कमलनयन । कोणी वाखाणिती कीं श्रद्धाहीन[1] । या ज्ञा-नाचेच ह्मणोनी ॥ ९५ ॥ नीट अर्थ ऐसा सोडूनी । धर्म शब्दें ज्ञान मानू-नी । वाखाणिती या वरोनी । संमत नव्हे तो अर्थ ॥ ९६ ॥ भागवतधर्म नेणती । ते भलतैसी गति कल्पिती । परि एकेपरी घडे हेही रीती । अर्थ वदती जरी तैसा ॥ ९७ ॥ कीं परम भागवतधर्म । हें ज्ञान जेथें विश्वाचें हें सगुणब्रह्म । जरी ऐसें घडे तरी परम उत्तम । संमतचि आह्मां अत्यंत ॥ ९८ ॥ असो तें आतां ज्ञान विज्ञानसहित । सांगेन तूतें ह्मणोनि बोलि-ला भगवंत । तें दों श्लोकीं अनंत । बोलों पाहतो ॥ ९९ ॥ त्यांत पुढिलिया श्लोकाचा एक चरण । तेथवरी आदीं ज्ञानाचें विवरण । दुसरिया चरणीं जगद्वंद्यचरण । विज्ञान बोलेल पुढिलिया श्लोकांत ॥ ३०० ॥ त्याच्या उत्त-रार्धें करोनी । तें विज्ञानचि सांगेल विवरोनी । प्रस्तुत ज्ञान आरंभोनी । बोलतसे श्लोक ॥ १ ॥

---

१ अश्रद्दधान.

॥ श्लोक ॥ मया ततमिदं सर्वं जगदव्यक्तमूर्तिना ।
मत्स्थानि सर्वभूतानि न चाहं तेष्ववस्थितः ॥४॥
न च मत्स्थानि भूतानि पश्य मे योगमैश्वरम् ।
भूतभृन्न च भूतस्थो ममात्मा भूतभावनः ॥ ५ ॥

॥ टीका ॥ अगा म्यां हें जग सकळ । व्यापिलें असे पाहें निवळ । जे अव्यक्तमूर्ती केवळ । त्या चित्स्वरूपें करोनी ॥ २ ॥ पुढिलिया श्लोकीं 'पश्य' ह्मणोनी । बोलेल त्या शब्दें करोनी । पांचां प्रकारें तत्त्व विवरूनी । पाहें पाहें ऐसें पांचाठायीं बोलतो ॥ ३ ॥ पूर्वाध्यायीं अपरोक्ष । अर्जुनास उपदेशी पद्मपत्राक्ष । तो हें पहायास जाला दक्ष । ह्मणोनि पाहें पाहें ह्मणतसे ॥ ४ ॥ चतुर्थाध्यायांत मागें । ज्ञानार्थ संतवंदनप्रश्नसेवाप्रसंगें । बोलियेलें ऐसें श्रीरंगें । कीं त्या ज्ञानें व्यापका आपणांत सर्व भूतें देखसी ॥ ५ ॥ त्यास अष्टमीं अव्यक्त मूर्तीची खूण । चिदात्मत्वें कळे ऐसा केला निपुण । आतां व्यापक अव्यक्त मूर्ती निर्गुण । पाहें ह्मणतसे अपरोक्ष ॥६॥ "येन भूतान्यशेषेण" । या श्लोकीं चतुर्थी कमलेक्षण । अपरोक्ष साक्षात्कार-लक्षण । परोक्षरीती ऐसें बोलिला ॥ ७ ॥ कीं ज्या ज्ञानें करोनी । आपणांत सर्व भूतें देखसी त्यावरोनी । मजसीं ऐक्य देखसी ह्मणोनी । शब्दबोधें बोलिला ॥ ८ ॥ अष्टमीं 'अक्षरं ब्रह्म' । या श्लोकीं क्षरातीत आत्मा तोचि ब्रह्म । हा बोध करूनि निर्गुण ब्रह्म । येथें व्यापकत्व त्याचें आदीं दाखवी ॥ ९ ॥ परि ह्मणतां म्यां हें व्यापिलें । ह्मणी चतुर्भुजरूप आपलें । ये स्थळीं पाहेल जें बैसलें । रथीं याच्या एकत्र ॥३१०॥ आणि म्यां व्यापिलें न ह्मणे जरी । गुरु देव याचा मीच हरी । माझें ऐक्यानुसंधान तरी । अंतरेल ॥ ११ ॥ आणि आत्मयांत सर्वां भूतांसी । पाहसी तेव्हां ऐक्य मजसीं । देखसी ऐसें चतुर्थी यासी । "येन भूतान्यशेषेण द्रक्ष्य स्यात्मन्यथो मयि" ऐसें बोलिलों ॥ १२ ॥ तरी हें आणि तें एक । श्रोते समजोत पार्थादिक । ऐसें बोलतो श्रीवत्सांक । "मयाततमिदं सर्वं जगदव्यक्तमूर्तिना" ह्मणोनी ॥ १३ ॥ कीं व्यक्ति पावली सगुण मूर्ती । हे चतुर्भुज माझी पवित्र कीर्ती । तेही न दिसे जेथें ऐसी चिदात्मस्फूर्ती । शुद्धशुद्धसत्त्वेंकरोनी ॥ १४ ॥ परि तें सत्त्व आणि तेंचि ब्रह्म । सगुण साकारिलें सधर्म । आतां पाहसी त्या सत्त्वें तेंचि निर्धर्म । तों तेथें नसे व्यक्त हे मूर्ती ॥ १५ ॥ मीच तें शुद्ध चित्स्वरूप । परि अव्यक्तमूर्ति बोलावें अरूप । कीं नाहीं व्यक्त हें अवताररूप । त्या निजस्वरूपीं माझिया अर्थ ऐसा ।

॥ १६ ॥ कोणी येथें ऐसें ह्मणती । कीं अव्यक्तमूर्त्ति ह्मणजे अतींद्रियमूर्ती । ऐसी मूर्त्ति ह्मणजे अमूर्तिस्फूर्ती । ऐसें वाखाणिती हें पद ॥ १७ ॥ तरी जे स्वस्वरूपस्फूर्ती । ते उगीच ह्मणावी अमूर्ती । अमूर्तीस ह्मणोनि मूर्ती । मूर्तित्वपरिहारार्थ अव्यक्त पद योजावें ॥ १८ ॥ इतके आढे वेढे घेउनी । कां ह्मणावें अव्यक्तमूर्त्ति ह्मणोनी । हा बाधित अर्थ यावरोनी । अबाधित अर्थ येथें सूचवी ॥ १९ ॥ अर्थ हाचि कीं म्यां व्यापिलें । ह्मणतां पाहेल मूर्तिमंत हें रूप आपलें । तें हें नव्हेचि ह्मणतां आलें । भिन्नत्व दोहींसही ॥३२०॥ तरी म्यांच व्यापिलें परी । त्या स्वरूपीं व्यक्त नाहीं मूर्ति बरी । जरी अवतारमूर्ति नानापरी । व्यक्ति त्याच्याच बोलाव्या ॥ २१ ॥ एवं म्यांच त्या अव्यक्तमूर्त्तीकरोनी । जग सर्व व्यापिलें ह्मणोनी । पाहे ह्मणतां भगवदैक्य त्यावरोनी । चिदात्मत्व आपलेंचि तो पाहे ॥ २२ ॥ सहज ज्या चिदात्मत्वस्फूर्तिविना । चराचर कांहींच दिसेना । तो अव्यक्तमूर्ति आत्मा अर्जुना । सर्वांभूतीं दिसों लागला ॥ २३ ॥ तंतु न दिसे दृष्टी । तो काय दिसेल पट सृष्टी । होणेंचि न लगे कष्टी । सर्वभूतीं आत्मा पाहतां ॥ २४ ॥ व्यापकत्व पार्थ पाहे । याच अनुभवीं गुंतोन राहे । तों देव ह्मणत आहे । “ मत्स्थानि सर्वभूतानि ” ह्मणोनी ॥२५॥ कीं पाहे व्यापकत्वाकडे । परि अनंतत्वीं दृष्टि न पडे । तृतीय चरणीं हेही दृष्टि उघडे । सर्वभूतें मज माजीं ऐसें बोलतां ॥ २६ ॥ कीं ब्रह्मांड आवरणासहित । मन धांवे तेथपर्यंत । पुढें धांवतां अत्यंत । तेंचि पंगुत्व अवलंबी ॥ २७ ॥ मनास त्याच्या प्रकाशें मनपण । त्या प्रकाशींच या चराचराची खूण । ऐसें ब्रह्मांडासहित सप्तावरण । आयकोन मन जाणें धांवे तेथवरी ॥ २८ ॥ पर्वताचें उंच शिखर । तेथोनि दृष्टि चाळी नर । तों सूर्यप्रकाशाचा वरी पसर । पसरे त्याच्या दृष्टीचा ॥ २९ ॥ त्याच तेजें प्रकाशली । त्याच तेजें जग पाहों लागली । पाहतां तेचि भागली । तेज उरलेंचि तें असे ॥३३०॥ अनंतत्वाच कारणें । हा दृष्टांत लागला घेणें । हें नव्हे अद्वैत बोलणें । कीं दृष्टांतीं सर्वसाम्य न घडेच ॥ ३१ ॥ समुद्राच्या अनंत लहरी । दृष्टि धांवतां त्यांवरी । दृष्टि भागे परि असेच उरी । पुढेंही समुद्राची ॥ ३२ ॥ इत्यादि दृष्टांत एकदेशी । प्रस्तुत श्रीकृष्ण उपदेशी । चैतन्य मनीं आणि सर्वदेशीं । सर्व भूतें मजमध्यें ह्मणोनी ॥ ३३ ॥ तीं सर्वभूतें अर्जुनें । स्वरूपीं पाहतां मनें । अनंतत्व अनुभवितां जगज्जीवनें । पुढें बोलों आरंभिलें ॥ ३४ ॥ कीं ह्मणी आकाशीं भूतें जैशीं । चित्स्वरूपीं जडें पाहे तैशीं । किंवा जळीं भिजलीं

वर्ते ऐशीं । व्यापकता परि भिन्नत्व ॥ ३५ ॥ या भेदाचा परिहार । करी चतुर्थचरणीं जगदुद्धार । कीं मजमाजी आहेत भूतें चराचर । परि त्या भूतांत मी असेना ॥ ३६ ॥ सर्वांत व्यापकता प्रथम बोलोनी । तीं मजमध्यें आहेत हें अंगीकारोनी । आतां मी त्यांत नाहीं ह्मणोनी । बोलतां विरोध अत्यंत ॥ ३७ ॥ हें बोलिला सर्वेश्वर । ज्या युक्तीनें घडे विरोधपरिहार । त्या युक्तीचा करोनि विचार । एकवाक्यता साधावी ॥ ३८ ॥ आतां भूतें मजमाजी असती । परि मीं नसें तयां भूतीं । जैसे फेस उदकीं तरंगती । परि उदक नसे तया फेसांत ॥ ३९ ॥ ऐसें कोणी बोलती । ह्मणोनी हेचि अंगीकारावी रीती । तरी येथेंचि ह्मणतो जगत्पती । कीं तीं भूतेंही नसती मजमध्यें ॥ ३४० ॥ जरी फेंसही जळीं नसे । तरी हा दृष्टांत युक्त असे । आतां फेंस जळाबाहेरही गवसे । परि तो जळीं नाहीं ह्मणावा ॥ ४१ ॥ तरी भूतें मजमाजी असती । हें जें बोलिला जगत्पती । विरोध येतसे त्याप्रतीं । वचन सर्वज्ञशिखामणीचें तेंही कीं ॥ ४२ ॥ आतां दृष्टांत साधेल तरी । कीं सोडोनि गोष्टी तिसरी । धरावी पहिली आणि दुसरी । कीं भूतें मजमाजीं मी भूतीं असेना ॥ ४३ ॥ उरली गोष्टी तिसरी । ते वेगळीच साधावी बरी । हे युक्त वाटे संतांस जरी । तिहीं संतीं दृष्टांत वेगळेच कां न बोलावे ॥ ४४ ॥ सर्व भूतें मजमाजी । घटांत जैसी भरली असे कांजीं । मी नसें त्या भूतांच्या समाजीं । जैसा घट नसे काजींत ॥ ४५ ॥ दोहीं गोष्टींस एक दृष्टांत घडे । तिसरीस तो दृष्टांत उडे । तरी एकचि दृष्टांत एकीचकडे । लागे आणि दोंकडें न लागे न लागो ॥ ४६ ॥ ऐसा बोलतां अर्थ । होतो सर्वही अनर्थ । तीनीं गोष्टी बोलिला समर्थ । कीं तिहीं गोष्टींत तत्त्व एक जाणावें ॥ ४७ ॥ एवं च तीनीं गोष्टी । न साधतां एक दृष्टांत दृष्टी । अर्थ न लागे वृथा कष्टी । वैखरी करावी किमर्थ ॥ ४८ ॥ आतां ते थोर त्यांचा भाव । न कळे ह्मणावा तरी देवाधिदेव । जें गूढ बोलिला स्वयमेव । भाव त्याचा कैसा उकलतो ॥ ४९ ॥ शोधकांसही न कळे अर्थ । तरी टीका करावी किमर्थ । एवं उदंड जाले
विना अनन्यभक्ति हें न कळे ॥ ३५० ॥ पूर्वश्लोकीं पुरुषोत्तम । बोलिला कीं या ज्ञानप्राप्तीचे धर्म । टाकितां न सांपडे हें प्रत्यक्षावगम । धर्म्यज्ञान विज्ञानसहित जें ॥ ५१ ॥ जे मंगलाचरणीं । लागती इतर देवतांचे चरणीं । त्यांस भगवंताचे जगद्वंद्यचरणीं । कैचें अनन्यभक्तित्व ॥ ५२ ॥ द्वारचि ज्याचें न सांपडे । त्या गृहांतील निधि

कैंवी ठायीं पडे । या ज्ञानाचें कवाड उघडे । अनन्यचरणशरणातें ॥ ५३ ॥ आतां असो ते काहणी । प्रस्तुत काय वदे भगवद्वाणी । मजमाजी भूतें ह्मणे चक्रपाणी । परी त्या भतीं मी नसें ॥ ५४ ॥ आणि मजमाजीही तीं भूतें । नाहींत पाहें ह्मणे अर्जुनातें । या तिहीं विरुद्ध गोष्टीस होतें । एकवाक्यत्व एकाच दृष्टांतें ॥ ५५ ॥ सागरीं जेवीं कल्लोळ । तैसे मजमाजी भूतांचे खेळ । कोटि कोटि ब्रह्मांडगोळ । मजमाजी ऐसे ॥ ५६ ॥ किंवा किरणीं जैसें मृगजळ । नाना नगीं कनक केवळ । कीं [illegible]त जैसा व्याळ । तैसीं भूतें विवर्तरूपें अधिष्ठानीं मजमाजीं ॥ ५७ ॥ ५१९ तरंगीं नसे सागर । कीं ते तरंग सागराचेंच नीर । उदय लय पावती आकार । ते कैंचे कीं त्यांत सिंधु असे ॥ ५८ ॥ एकचि पाहतां जल । सिंधु आणि त्याचे कल्लोळ । तरंगाकारें दिसे लोळ । नाहींच तो ॥ ५९ ॥ एवं सागरीं तरंगाकार । तरंगीं नसे सागर । तैसें मजमाजी चराचर । त्या चराचरीं मी नसें ॥ ३६० ॥ किरणांत पाणी दिसे । परि किरणप्रभा-त्यांत नसे । कीं किरणावांचोनि न गवसे । वेगळें सत्यत्वें किमपिही ॥ ६१ ॥ तेव्हां मृगजळीं नसती किरण । तैसेंच भूषणीं नसे सुवर्ण । कीं सुवर्ण तों पीतवर्ण । आकार नसती तया वेगळे ॥ ६२ ॥ सर्प रज्जूंत भासे । परि तो रज्जू त्या सर्पी नसे । कीं रज्जू कळतां जरी तो दिसे । तरी रज्जु त्या सर्पी होता ह्मणावा ॥ ६३ ॥ ऐशा दृष्टांताच्या कोटी । श्रीकृष्ण धरूनि पोटीं । ह्मणे भूतें मजमध्यें किरीटी । परि त्या भूतीं मी नसें ॥ ६४ ॥ ऐसें बोलिला हरी । तों शंका उपजली यावरी । कीं भूतें मिथ्या ह्मणोनि जरीं । त्यांत मी नाहीं ह्मणतसे ॥ ६५ ॥ तरी जीं मिथ्या तीं मज-[illegible] असती । हें विरुद्ध बोलिला जगत्पती । ऐसी ह्मणे जों अर्जुनाची मती । तों ह्मणे भूतेंही नसती मजमध्यें ॥ ६६ ॥ मजमाजी सर्व असती या बोलें । अर्जुना यालागीं बोलिलों पहिलें । कीं हीं भूतें ह्मणोनी होतें आलें । प्रतीतीस तुझ्या ॥ ६७ ॥ धरून तुझी हे प्रतीती । बोलिलों कीं भूतें मजमाजी असती । मी भूतीं नसें ह्मणोनि मागुतीं । तीं मिथ्या ह्मणोनि आपल्या प्रतीतीनें बोलिलों ॥ ६८ ॥ माझी प्रतीति तूतें कळली । तेव्हां भूतें असत्य हे किल्ली आकळली । मग तुझी बुद्धि खवळली । असत्य तरी आहेत हें कां बोलिलासी ॥ ६९ ॥ तरी माझिया मतें । मीच आहें नाहींत भूतें । मिथ्या प्रतीति याची तंतें । वाणतां गुह्य हें वदलों जें तत्त्व ॥ ३७० ॥ अगा एक रज्जूस जाणतो । एक त्यास सर्प ह्मणतो । जाणे त्याच्या मुखें

बोध बाणतो । कीं सर्प कधींच नव्हता रज्जूंत ॥ ७१ ॥ सुवर्णाचें केळें केळ । नेणतां ह्मणे कदलीफळ । त्याची प्रतीति धरून केवळ । सुवर्ण सत्य आणि फळ मिथ्या सांगावें ॥ ७२ ॥ कीं फळ कदलीचें तुज दिसतें । हें सुवर्णें व्यापिलें सुवर्णींच असतें । परि हें पीतप्रभ सुवर्ण नुसतें । केळांत न असे कीं नाहींच तें केळें ॥ ७३ ॥ ऐसें ह्मणतां नेणतां । सुवर्णत्वीं जाला जाणता । तो ह्मणे केळें नाहीं तत्त्वतां । तरी आदीं आहे कां ह्मणावें ॥ ७४ ॥ तो या गोष्टीस पावला । तेव्हां केळेंही नाहींच ह्मणावें त्याला । पूर्वीं आहे ह्मणोन या बोला । तुझ्या प्रतीतीनें बोलिलों ह्मणावें ॥ ७५ ॥ तथापि केळासारिखें दिसे केळ । आणि केळ नाहीं आहे कनक केवळ । त्यास बोध बाणे ऐसा प्रांजळ । ये रिती ब्रह्मीं हीं भूतें ॥ ७६ ॥ एवं तत्त्वप्रकार च्यारी । पाहें ह्मणोनि श्रीहरी । दाविता जाला येथवरी । तें ऐसें ॥ ७७ ॥ म्यां अव्यक्तमूर्तीनें सकळ । व्यापिलें पाहे निवळ । पटीं विणिलिया प्रतिमा समूळ । व्यापिल्या जैशा तंतूतें ॥ ७८ ॥ ऐसें पाहे ह्मणोनि पहिलें । व्यापकत्व भूतां दाविलें । त्या उपरी ऐसें बोलियेलें । कीं मजमाजी भूतें हीं असती ॥ ७९ ॥ मजमाजी हीं अमितें । पाहें अर्जुना सर्व भूतें । जैसीं विणिलीं प्रतिमाशरीरें बहुतें । तंतुमध्यें दिसती ॥ ३८० ॥ तंतूंत त्या प्रतिमा नाना । परी तंतु प्रतिमारूपीं असेना । कीं जे पाहसी प्रतिमारूपरचना । ते तंतूच असे ॥ ८१ ॥ प्रतिमेचें जें जें गात्र ॥ करचरणादि तें तें आहे तंतुमात्र । तंतुच असे तुझे नेत्र । जे अवयव देखती ॥ ८२ ॥ ऐसें पाहतां तंतूचि दिसे । तेव्हां प्रतिमा कैंच्या कीं त्यांत तो असे । ऐसें चित्स्वरूपीं[1] दृष्टि वसे । तेव्हां नसेंच तें भूतीं कीं भूतेंच नसती ॥ ८३ ॥ आतां चैतन्याकडे सत्त्वदृष्टी । देऊनि पाहें सर्व सृष्टी । ऐसी करोनि करुणावृष्टी । चौथी गोष्टी बोलतसे ॥ ८४ ॥ चौथे गोष्टीचें ये रीती । निमित्त बोलावें कीं भूतें समूळ नसती । ह्मणोनि त्यांत नाहीं हा जगत्पती । तरी आहेत ह्मणे पहिलें किमर्थ ॥ ८५ ॥ तरी शिष्यदृष्टी अंगीकारोनी । मजमाजी भूतें ह्मणे त्यावरोनी । यालागीं भूतेंहि नसती मजमाजी ह्मणोनी । बोल हें निमित्त पूर्वींच बोलिलों ॥ ८६ ॥ परंतु ' पश्य ' ह्मणिजे पाहें । हा शब्द पांचा ठायीं वर्तताहे । भूतें हीं मजमाजी नसती ह्मणे हे । गोष्टी चौथी ॥ ८७ ॥ अर्जुना जो जो आकार । दावी दृष्टी अलंकार । तो तो सोनेंचि निर्विकार । कनकपरीक्षक पाहतो ॥ ८८ ॥ तंतूकडे देतां दृष्टी । तंतूचि असे नसे

[1] चित्स्वरूप.

पटप्रतिमा सृष्टी । ये रीती पाहें ह्मणे हे चौथी गोष्टी । कीं भूतें नसतीच चित्स्वरूपांत ।।८९।। ऐसा एक श्लोक एक चरण । दुसरिया श्लोकाचा येथवरी विवरण । सांगे जगद्वंद्यचरण । निधर्म निर्गुण ज्ञानाचें।।९०।।येथवरी जें'पश्य' शब्दें पाहें ह्मणे । तें बुद्धीनें पाहें ह्मणतसे ऐसेंचि जाणे । विषय इंद्रियांसहित अर्जुन जाणे । कीं चित्स्वरूपचि हें जड प्रत्यक्ष ।। ९१ ।। प्रत्यक्ष कांहींच नसे । प्रत्यक्षांत बुद्धीस चित्स्वरूप गवसे । तथापि इंद्रियद्वारा दिसे । भास मात्र बुद्धीतें ।। ९२ ।। जें चित्स्वरूपाचें लक्षण । त्याहूनि जड हें विलक्षण । जरी मिथ्या ह्मणोनि कमलेक्षण । प्रतिपदीं सूचवितो ।। ९३ ।। जड मिथ्या होय परी । शरीर आहे जोंवरी । हा प्रत्यय नव्हे दूरी । तरी उगेंचि काय मिथ्या ह्मणावें ।। ९४ ।। यास काय ह्मणोनि म्यां पहावें । ऐसें जों अर्जुनें पुसावें । तों स्वयेंचि बोलिलें देवें । दुसरिया श्लोकीं चरणीं दुसरिया ।।९५।। द्वितीयचरण ।। ।।पश्य मे योगमैश्वरं ।। टीका।। अर्जुना जो भास दिसतो । माझा योग ह्मणोनि पाहें सर्व तो । आणि योगही तो ह्मणिजेतो । ऐश्वर ह्मणोनी ।। ९६ ।। नसोनि दिसती रूपें नाना । अघटित ह्मणावी हे घटना । अघटित घटनेस अर्जुना । योग ह्मणोनि बोलावें ।। ९७ ।। आहे सकळ चित्स्वरूप । नसे कांहींच जडरूप । तथापि भास जड भासे हा प्रताप । सामर्थ्याचा माझ्या ह्मणावा ।। ९८ ।। हें मज ईश्वराचें चातुर्य । सामर्थ्य माझें ऐश्वर्य । वेद आणि मुनिवर्य । हेंचि रूप माझें वर्णिती ।। ९९ ।। "सहस्रशीर्षा पुरुष" । इत्यादि ये विषयीं वेदघोष । मी जो ईश्वर परम पुरुष । तोचि अघटित घटनायोग हा।।४००।। अत एव याच योगातें मुनी । ह्मणती ऐश्वर ह्मणोनी । हा योग ईश्वराचेंचि रूप या भावें करोनी । ऐश्वर ह्मणावा हा योग ।। १ ।। एवं प्रत्यक्ष जें दिसे । तें ईश्वराचेंचि रूप असे । ह्मणोनि हे प्रत्यक्ष विलास ऐसे । पाहें माझा योग आणि स्वरूप ह्मणोनी ।। २ ।। योग ह्मणजे युक्तिचातुर्यप्रकार । तरी योगचि माझे हे अवतार । ऐश्वररूपें हें जैसें तैसें चराचर । ऐश्वररूप माझें हें तूं पाहें ।।३।। उगाच मायाभास । त्याज्यांश मानूनि यास । कां पहावें प्रत्यक्षास । ह्मणोनि ईश्वररूप माझें तूं पाहें ।।४।। " योगमैश्वरं " ह्मणोनी । या पांचां अक्षरें करोनी । ईश्वराची योगमाया ऐसेंचि बोलोनी । बहुत गेले ।।५।। तरी ईश्वराचा देह । योगमायाच निःसंदेह । हेंचि तेही ह्मणती परि स्नेह । सगुणभजनीं बाहिरंगें ।। ६ ।। ह्मणोनि ह्मणती स्वयोगमाया । पाहें ह्मणतो धनंजया । कीं

प्रत्यक्षावगमबोधास या । ते नाहीं पावले ॥ ७ ॥ पाहें पाहें म्हणोनी । येथ-वरी निर्गुणतत्त्व दावुनी । पाहें योग ऐश्वर या शब्दें करोनी । म्हणती माया पाहें म्हणतसे ॥ ८ ॥ यांत प्रत्यक्षावगमपण । आणि धर्म्य शब्दें ज्ञान सगुण । याची अणुमात्रही खूण । सांपडली नसे तयांतें ॥ ९ ॥ योग आणि ऐश्वर । या दों शब्दीं सर्वेश्वर । रूप आपलें हें चराचर । पाहें म्हणोनी म्हणतसे ॥४१०॥ पाहतां दोनी अर्थ । व्याकरणसिद्ध यथार्थ । त्यांत माझें रूप पाहें हा समर्थ । अर्थ त्याहोनि होतसे ॥ ११ ॥ एकादशीं विश्वरूप । दाखवी तें तों ईश्वराचें होय रूप । तोही योगमायारचित आरोप । ब्रह्मीं निर्गुणीं ॥ १२ ॥ योग ऐश्वर म्हणोनी । त्या रूपाचें नांव याच दों पदीं करूनी । बोलेल एकादशीं त्यावरूनी । नवमीं प्रमाणसिद्ध हा अर्थ ॥ १३ ॥ विश्वरूपाध्याय श्लोक॥ नच मां शक्यसे द्रष्टुमनेनैव स्वचक्षुषा । दिव्यं ददामि ते चक्षुः पश्य मे योगमैश्वरम् ॥ टीका ॥ अर्जुना मातें विश्वरूपेंकरोनी । पाहों न शकसी या स्वचर्मचक्षूंनीं । कीं सूर्यचंद्रांचीं रूपें दुरोनी । वीत वीत मंडलें दिसती ॥ १४ ॥ हे अविद्याकर्मरचित दृष्टी । ईस मद्रूपचि दिसते हे जरी सृष्टी । परि कामलेरोगें जे कष्टी । ते शंखचंद्र पिंवळा देखते ॥ १५ ॥ आणि भिंतीआड असे । तें या चर्मचक्षूंस न दिसे । एकसरेंचि या नेत्रांसि केवीं गवसे । विश्व सर्व रूप माझें ॥ १६ ॥ हेंचि विश्वरचना परी । समग्र एकसरें आणि बरी । तूं देखसी ऐशा परी । दिव्यचक्षु तुज मी देतसें ॥ १७ ॥ त्या चक्षूकरोनी । योग ऐश्वर पाहें म्हणोनी । बोलेल विश्वरूपी त्यावरोनी । योग ऐश्वर म्हणजे अघटितघटना रूप ईश्वराचें ॥ १८ ॥ या दृष्टीं पाहों न शकसी मातें । तरी दिव्य दृष्टि माझा योग ऐश्वर त्यातें । पाहें म्हणोनि अर्जुनातें । पुढें बोलेल ॥ १९ ॥ तेव्हां जें पाहणें योग ऐश्वरातें । हेंचि पाहणें मातें । ऐसें योग ऐश्वर शब्दें भगवंतें । स्पष्ट विश्वरूप आपलें बोलिलें ॥ ४२० ॥ दिव्य चक्षूचें कारण । एकसरें पाहणें समग्रपण । अन्यथा सूर्य चंद्र ग्रह दिसोनि ही खूण । या दृष्टीस न दिसे त्याच्या रूपाची ॥ २१ ॥ खाटप्रमाण वावडी गगनीं । ते वितीएवढी दिसे येथूनी । तैसेंचि चर्मचक्षूंस विश्व दिसोनी । बरें न दिसे आणि आड तें दिसेना ॥ २२ ॥ पुढें याचे विचार । उदंड होतील येथें सर्वेश्वर । पाहें म्हणे योग ऐश्वर । प्रत्यक्ष विश्व ईश्वररूप म्हणोनी ॥ २३ ॥ व्यतिरेकें आत्मा समजोनी । अन्वयें ब्रह्मचि सर्व उमजोनी । भास म्हणावा माया

---

१या प्रत्यक्ष ज्ञानाच्या बोधाला. २काविळीच्या रोगानें जी दृष्टि कष्टी होत आहे.

ह्मणोनी । ते भक्त भगवद्रूपें पाहती ॥ २४ ॥ याचें नांव विज्ञान । यामागें बोलिलें तें ज्ञान । हें प्रत्यक्षावगम धर्म्य हें श्रद्धान । पावती भागवत धर्माचे ॥२५॥ हें अनन्य भक्तांतें आकळे । इतरांतें अर्थेचि न कळे । सयुक्त मुखरस चांगला गळे । परि नव्हे भगवद्भाव पीयूष तें ॥२६॥ एवंयोग अघटित घटना । कीं नसोनि दिसे विश्वरचना । तेंचि ऐश्वर रूप ईश्वराचें अर्जुना । पाहें ह्मणे ॥२७॥ यास काय विरुद्ध। अद्वैत साधतां शुद्ध । प्रत्यक्ष पाहतां होते सिद्ध । भक्ति ईश्वराची ॥२८ ॥ चित्स्वरूप नव्हे इंद्रिय प्रत्यक्ष । तें बुद्धीस दिसे अपरोक्ष । इंद्रियांस कृष्ण अंबुजाक्ष । दिसे तैसीं चराचर तद्रूपें॥२९ ॥ बुद्धीस डाउका नट नर । स्त्रीवेष दृष्टीस दिसे शरीर । त्याच्या प्रतीतीकडे पाहती चतुर । तैसा साक्षिप्रत्यक्ष भक्त पाहती ॥४३०॥ तो ज्या त्या रूपें सगुण । कल्पूनि आपणातें आपण । दावितो जडत्वें परि स्वयें पूर्ण । चित्स्वरूप अखंड अनुभव तयाचा ॥ ३१ ॥ चिदात्मत्व अनुभवाकडे दृष्टी । दिसे इंद्रियांस भगवद्रूप सृष्टी । विना भगवत्कृपापीयूषवृष्टी । हें अचाट पीक सर्वथा पिकेना ॥ ३२ ॥ आतां योग ऐश्वर हें रूप माझें पाहें । ह्मणोनि ज्ञान बोलोनि हें विज्ञान बोलताहे । ऐसी अर्जुनास दाखवी स्वपदवी हे । तो कृष्ण भगवान्नाम त्याचें ॥ ३३ ॥ आणि सर्वत्र 'भगवानुवाच'। आणि भगवद्गीता नाम साच । कृष्णगीता 'कृष्ण उवाच' । वेदव्यास ऐसें ह्मणेना ॥ ३४ ॥ नामें सकलही त्याचीं । पदवी समान सर्वांची । परि गीतेंत प्रसिद्धि भगवन्नामाची । या प्रत्यक्षावगम धर्म्यज्ञानाच करितां ॥ ३५ ॥ भगवद्भक्त तेचि भागवत । भगवद्धर्म तोचि धर्म भागवत । भगवच्छास्त्र तेंचि भागवत । भागवत पुराण अर्थ याच भगवद्गीतेचा ॥ ३६ ॥ उभे कौरव पांडव रणीं । मिळाली असे अगीस अणी । हे भगवद्गीता चक्रपाणी । उभयदळामध्यभागीं रथीं उपदेशितो ॥ ३७ ॥ सूत्रप्राय हे बोल । अर्थ भावार्थ अति खोल । धरूनिया गीतामृताची ओल । निगमकल्पतरु लाविला श्रीभागवत ॥ ३८ ॥ तें श्रीमद्भागवत । जेथें सर्वोत्कृष्ट धर्म भागवत । त्रिविध भगवद्भक्त भागवत । एकादश स्कंधीं बोलिले ॥ ३९ ॥ त्यांत उत्तम भागवत । बोलतां अनुभव तयाचा जो भागवतांत । तोचि या अध्यायांत भगवंत । प्रत्यक्षावगम धर्म्य ह्मणोनि बोलतो ॥४४०॥ येथें स्थळोस्थळींहि हेंच सूचवी । परि न वाखाणिती टीकाकार कवी । तो जों बुद्धीतें न शिकवी । तोंवरी बुद्धि न पावे या अनुभवा ॥ ४१ ॥ परि सर्व-

१ अमृत. २ ओलावा, आधार.

म हेच सूचना । करी उमजे तेच अर्जुना । हे गीता धर्म्यसंवादरचना । तरीच अष्टादशीं त्यातें बोलेल ॥ ४२ ॥ तुझा माझा हा संवाद । धर्म्य ह्मणेल गोविंद । धर्म्य शब्दें प्रत्यक्षावगम ऐसें विशद । तो उमजला तरीच हे खूण दाखवी ॥ ४३ ॥ एवं प्रत्यक्ष हें भगवद्रूप । ह्मणोनि हें ज्ञान धर्म्य-स्वरूप । कीं नव्हे नुसतें बुद्धिगम्य अरूप । चित्स्वरूप कीं तें अतींद्रिय प्र-त्यक्ष ॥ ४४ ॥ भजन जिज्ञासूचें परोक्ष । त्यास भगवत्प्रसादें निर्गुण अप-रोक्ष । होतां मग हें पाहे प्रत्यक्ष । भगवद्रूप कृष्णरूप जेवीं ॥ ४५ ॥ तो उत्तम भागवत । ह्मणोनि बोले भागवत । येथें सूत्र प्राय बोले भगवंत । हें ज्ञान त्या उत्तमाचें ॥ ४६ ॥ ऋषभ नामें भगवंत । अवतरला त्याचे पुत्र शत । त्यांत नव योगी परम भागवत । त्रिभुवनीं संचरती ॥ ४७ ॥ जनक राजा करी यज्ञ । त्या यज्ञमंडपीं ते सर्वज्ञ । नवही भागवतधर्मी अभिज्ञ । जनक पुसे भागवतधर्म तयांतें ॥ ४८ ॥ त्यांत कवि यांचें उत्तर । देता जाला अति सादर । त्यांत आकाश वायु अग्नि इत्यादि चराचर । ह्मणे हरिरूपें वंदावें ॥ ४९ ॥ एवं शेवटील श्लोकीं । कवि ऐसा बोलिला कीं । ऐसें अद्वैतबोधें भजतां लोकीं । भगवत्प्रबोध होय भागवतां तयांतें ॥५०॥ तों राजा जनक पुसे तें वर्म । कीं कैसा तो भागवत कोण त्याचा धर्म । तों हरिनामा त्याधाकटा यथाक्रम । उत्तम भागवतधर्म सांगे या श्लोकीं ॥ ५१ ॥ श्रीमद्भागवतश्लोक ॥ ॥ सर्वभूतेषु यः पश्येद्भगवद्भावमात्मनः । भूतानि भगवत्यात्मन्येष भागवतोत्तमः ॥ श्लोकार्थ ॥ हरि ह्मणे जनक-राया । जो प्रत्यक्ष सर्वभूतांत या । पाहे आत्मया आपलिया । तोच भगव-द्भाव ॥ ५२ ॥ आणि आपला आत्माच भगवंत । सर्वभूतें पाहें तयांत । हा ह्मणावा उत्तम भागवत । शब्दार्थ तो हाचि इतका ॥ ५३ ॥ आतां भगवद्भावाची खूण । ऐश्वर्यादि षड्गुण । ऋषि बोलती निपुण । त्याची खूण या श्लोकीं ॥५४॥ श्लोक ॥ ॥ ऐश्वर्यस्य समग्रस्य धर्मस्य यशसःश्रियः। ज्ञानवैराग्ययोश्चैव षण्णां भग इति स्मृतिः ॥ श्लोकार्थ ॥ समग्र ह्मणजे सकल निःसीम । ऐसें समग्र ऐश्वर्य आणि धर्म । यश श्री ज्ञान वैराग्य यथा-क्रम । समग्र निःसीम षड्गुण पाहें ॥ ५५ ॥ भग ह्मणावें या सा गुणांतें । हे साही गुण असती जयातें । वडे श्रीभगवन्नाम हें तयातें । तो हाचि आत्मा जो हें ज्ञान जाणतो ॥ ५६ ॥ प्रस्तुत कवि धाकटा हरि ह्मणताहे । कीं सर्वभूतीं आत्मयाचा भगवद्भाव पाहें । सर्वां भागवतांत तोचि लाहे । पदवी उत्तम भागवतपणाची ॥ ५७ ॥ त्यांत ऐश्वर्य साम

र्थ्याचें नांव । जो अघटितघटनारचनाप्रभाव । कीं कांहीं नसोनि नाना भाव । स्वयेंचि सर्वेश्वर होतसे ॥ ५८ ॥ दृष्टीस जरी पट दिसे । बरें पाहतां तंतु मात्र असे । विश्व आत्मयांत समरसे । ये रीती अन्वयें पाहतां ॥ ५९ ॥ तथापि इंद्रियद्वारा मती । पावती मिथ्याभासप्रतीती । तो ऐश्वर्यभाव सर्वभूतीं । आत्मयाचा ॥ ४६० ॥ परि हाही आत्मयाविण । अनुभव न घडे ऐसी खूण । जतन करावया ह्मणे निपुण । कीं भूतें देखे आत्मा जो भगवंत त्यामाजी ॥ ६१ ॥ एवं नसोनि भूतें दिसती । हे अघटित घटना दिसे त्याच भूतीं । कीं चित्र विचित्र लेखकाची हस्त-कौशल्यरीती । चित्रींच तथापि त्यास दिसतसे ॥ ६२ ॥ हे ईश्वराची मायाकल्पना । परि जीवास अविद्येनें सत्यरचना । आणि राजविद्येनें तें विश्व नाना । भगवंताचें ऐश्वर्य दिसतसे ॥ ६३ ॥ तेंचि जीव अविद्याकर्मबळें । पावती सुखदुःखरूपें विषमफळें । परि विद्यादृष्टींत हीं केवळें । भगवद्रूपेंचि दिसती ॥ ६४ ॥ तरी भगवंत षड्गुण । नव्हे निधर्म निर्गुण । सर्वसाक्षी सर्वज्ञ सगुण । विषम निर्दय केवीं ह्मणावा ॥ ६५ ॥ जो निर्दय आणि विषम । येथें ह्मणावा मुख्य तो अधर्म । या वैषम्यनिर्दयत्वपरिहारें धर्म । गुण हा लागतो ईश्वरीं ॥ ६६॥ कीं जीवाची अनादि वासना । वासनेनें कर्में घडती नाना । कर्मानुरूप फळ हेंचि रचना । चराचराची ॥ ६७ ॥ नरक नाना दुष्ट योनी । हें सर्व भगवद्रूप ह्मणोनी । विषम निर्दय नव्हे कीं कर्में करोनी । फळें त्या कर्माचीं पावती ते जीव ॥ ६८ ॥ स्वर्गभोग देवादि योनी । हेंही सर्व भगवद्रूप ह्मणोनी । विषम निर्दय नव्हे कीं तैसीं सत्कर्में करोनी । तीं फळें तेसमयीं ते पावले ॥ ६९ ॥ तेव्हां धर्मही हें चराचर । कीं चराचररूपेंचि सम-सदय ईश्वर । तथापि हा मायागुणही शरीर । ईश्वराचें ॥ ४७० ॥ प्रत्यक्ष हें धर्मरूप । प्रकाशक त्याचें शुद्ध चित्स्वरूप । तो आत्मा अरूप । या भक्त ज्ञानियाचा ॥ ७१ ॥ कीं याचिया आत्मयाविण । न दिसे चराचराची खूण । अन्यबोधीं हें वर्म निपुण । समजला ॥ ७२ ॥ तेव्हां साही गुणांचा भाव । आत्माच या भक्ताचा स्वयमेव । कीं समुद्रचि तें वैभव । जे आकार नाना तरंगांचे ॥ ७३ ॥ आतां ईश्वर देवाधिदेव । त्याचें स्वतःसिद्ध षड्गुण वैभव । त्याच्या प्रसादातें पावती मानव । ते स्वात्मयाचेच ते भाव देखती ॥ ७४ ॥ प्रस्तुत हा ऐसा धर्मगुण । गीतेंत पंचमीं याचें जालें विवरण । ‘ न कर्तृत्वं न कर्माणि ’ इत्यादि श्लोकीं खूण । सम सदयपणाची

बोलिली ॥ ७५ ॥ कीं ईश्वर नें करवी कांहीं हें निश्चित । जीव वासनेनें घडे सुकृत दुष्कृत । तदनुरूप त्यांचें कर्मसंचित । भोगिती फळें प्रारब्धें क-रोनी ॥ ७६ ॥ तें फळ हेंच चराचर । तें ईश्वराचें शरीर । फळरूप हो-ऊनि सम सदय ईश्वर । निरूपण पंचमीं हें जालें ॥ ७७ ॥ पंचमीं धर्म सगुण । नवमीं ऐश्वर्य दावी स्वयें षड्गुण । योग पाहें माझा ह्मणतां खूण । यशाचीही दाखवी ॥ ७८ ॥ अघटितघटना हृषीकेश । पाहें ह्मणे हेंचि यश । जो जें दावी स्वकौशल्यलेश । तो तें यशाचि आपलें दावितो ॥ ७९ ॥ एवं हे चराचराची रचना । अघटित ईश्वराची घटना । तेव्हां जें विश्व दिसे नाना । हेंचि यश ईश्वराचें ॥ ४८० ॥ चित्स्वरूपेंचि हेंही वैभव । प्रकाशलें तेव्हां हाही भाव । आत्मयाचाच पाहे भक्तराव । जो उत्तम भागवत भागवतीं बोलिला ॥ ८१ ॥ ऐसें ऐश्वर्य यश धर्म ह्मणो-नी । स्मृत्युक्त गुण हे तीनी । आतां श्री ह्मणजे माया कीं याच भावें करो नी । विरुद्ध तीनी गोष्टी अविरुद्ध दाविल्या ॥ ८२ ॥ कीं मजमध्यें भूतें सकळ । तीं व्यापूनि त्यांत मी नाहीं केवळ । तींही मजमाजी नुसतीं निव-ळ । पाहें ह्मणे हें रूप मायेचें ॥ ८३ ॥ मिथ्या सर्पातें व्यापी दोर । दोरीं असें सर्पआकार । दोर त्या सर्पीं नसे कीं तें सर्पशरीर । नसेच त्या रज्जूंत ॥ ८४ ॥ एवं रज्जूंत जैसा सर्प । ब्रह्मीं तैसें मायारूप । ते माया श्रीरूपि-णी आणि ब्रह्मस्वरूप । श्रीधररूपें प्रकटतें ॥ ८५ ॥ श्री यालागीं हृदयाव-रीं । श्रीधर साकाररूपें धरी । कीं श्री माया आणि मी ब्रह्म यापरी । सम-जोत लोक ॥ ८६॥ श्री आणि श्रीधर । दोनी मायेचेच आकार । दोहीं देहीं निर्विकार । प्रकाशक ब्रह्म चिन्मात्र ॥ ८७ ॥ परि मी मायाच ऐसा निश्च-य । श्रीरूपीं आणि आपण ब्रह्म ऐसा प्रत्यय । श्रीधररूपी ह्मणोनि अद्वय । तो सगुण ब्रह्म ते श्रीरूपिणी माया ह्मणावी ॥८८ ॥ तो श्रीधर चित्स्वरूप । चराचरधारी मायारूप । रूप तितकें माया तो अरूप । चराचरचि तेव्हां श्रीही गुण चतुर्थ ॥ ८९ ॥ जों जों अधिक नारी नर । जों जों अधिक-पशुभूचर । अधिक पक्षी अधिक तरुवर । तों तों अधिक तो श्रीमंत॥४९०॥ भूमीं नाना धातु नाना तळीं जल । इत्यादि श्रीच सकळ। बहुत चुली बहुत अनल । तों तों श्रीमंत गृह तें ॥ ९१ ॥ गृहासी माडिया खिडकिया फार । श्रीमंताच्या घरींच वारा फार । उंच वर माडिया अपार । फार आकाश फार तों तों श्रीमंत ॥ ९२ ॥ बोलोनि काय बहुत । जे करिती मळे शेत । ते मलमूत्रयुक्त जें खत । द्रव्य वेंचूनि शकटावरीतें नेती ॥ ९३॥

श्रीमंत नव्हे तो कांहीं । नाम रूप पदार्थचि नाहीं । जे निःश्रीक ह्मणविती घरीं तयांच्याही । जें असे तेंही श्रीरूप ॥ ९४ ॥ अर्थ नासे तृष्णा उरे । तो श्री गेली ह्मणोनि झुरे । कीं अधिक श्री देखोनि मरे । मत्सरें आणि मानी कीं आपण श्रीहीन ॥ ९५ ॥ निःश्रीकता असंगल । ते हे तृष्णाच ओंगळ । तृष्णारहित जे सुमंगल । ते स्वयें श्रीधर जो आत्मा चराचराचा ॥ ९६ ॥ हेंचि वर्णितां लांब । प्रस्तुतप्रसंगास होतो विलंब । एवं चराचरा या श्रीरूपास अवलंब । चित्स्वरूप आत्मा भक्तांचा ॥ ९७ ॥ तो हा चतुर्थ गुण । आत्मयाचाच भाव पाहे निपुण । प्रत्यक्ष भगवद्रूप ऐसी खूण । सांपडली जया ॥ ९८ ॥ आतां पांचवा गुण ज्ञान । हें ज्ञान सत्त्ववृत्ति मायासत्ताहीन । आणि ज्ञान चित्स्वरूप निरंजन । तें प्रकाशक या वृत्तिरूप सात्त्विक ज्ञानाचें ॥ ९९ ॥ भग शब्दें हे सहा गुण । त्या साहांमध्यें या ज्ञानाची लेखिली खूण । चित्स्वरूप आत्मा निर्गुण । या षड्गुणांमार्गे युक्त तो भगवान ॥ ६०० ॥ ईश्वरत्व प्रत्यय । निर्गुणीं मायायोगें हा निर्णय । तयासि सृष्टिसंकल्पनिश्चय । साक्षित्व तेथूनी ॥ १ ॥ तो आपणास आपण ईश्वर । कल्पी जैसा नट नर । नारीरूपें दावी चतुर । जननादि षड्भावांचा साक्षी कल्पी ऐसे षड्भाव ॥ २ ॥ प्रथम जननभाव दावितो । मग उपजोनि आहे या अस्तित्वभावा दाखवितो । मग 'वर्धते' ह्मणजे वृद्धि पावतो । मग 'परिणमते' ह्मणजे पावतो परिणाम ॥ ३ ॥ वाढतां वाढतां राहिला । आतां वृद्धि पावणें नसे ज्याला । चतुर्थ भाव परिणाम त्याला । षड्भावांत बोलती ॥ ४ ॥ मग 'अपक्षीयते' । ह्मणजे दंतादि अंगरचना क्षयातें पावते । 'नश्यति' ह्मणजे तनु नासते । षड्भाव शास्त्रीं ये रीतीं ॥ ५ ॥ साही ऐसे भाव । कल्पितो आपणास आपण देव । सा भावांचा साक्षी देवाधिदेव । ऐसे षड्भाव जाणणें हें ज्ञान ॥ ६ ॥ या गुणांचें नांव ज्ञान । चित्स्वरूप याचें अधिष्ठान । तो आत्मा ज्यावरी भान । जननादि षड्भावांचें ॥ ७ ॥ आपल्या आत्मयाचा ऐसा भाव । भागवत पाहे जो स्वयमेव । तो षड्गुण भगवान्देवाधिदेव । एवं ज्ञानगुणही चराचर हेंचि तेव्हां ॥ ८ ॥ कीं तो ज्ञानगुण षड्विकार । दावुनी जीवदृष्टीस साही प्रकार । तरंग होउनी उरे सागर । तैसा ज्ञानगुण निर्विकार तो उरतो ॥ ९ ॥ भगवद्भाव उत्तम भागवत । आत्मयाचा पाहे ह्मणे भागवतांत । त्यांत ज्ञानगुण ऐसा गीतेंतही या भगवंत । याच श्लोकीं उत्तरार्धीं बोलेल ॥ ६१० ॥ उरला वैराग्यगुण एक । तोही या प्रकरणींच उत्तमश्लोक । बोलेल तो

नवम श्लोक । जवळीच असे या नवमीं ॥ ११ ॥ कीं रचोनि इतकी रचना । इच्छा कोठें त्याला असेना । सुवर्णास अलंकार नाना । काय वांटती त्यावेसे ॥ १२ ॥ आपण मायाविवर्ताचें अधिष्ठान । हें अखंडित ज्याचें ज्ञान । करावें जड पटाचें परिधान । त्या ज्ञानतंतूस काय वाटेल ॥ १३ ॥ मृगजळीं सूर्य बुडे । हे गोष्टी काय घडे । कीं समुद्र चाले तरंगांकडे । तृषित होऊनि पानार्थ ॥ १४ ॥ शुक्तीवरी रजत भासे । शुक्ति धरील काय त्या रुप्याचे आशे । स्वयें स्त्रीवेष दावीतसे । काय इच्छील तिचा अंगसंग तो ॥१५ ॥ ऐसें अनादि वैराग्य । शुकसनकादिक ज्याच्या अंशें सभाग्य । प्रपंचसत्यत्व हेंचि अभाग्य । बीज विषयवासनेचें ॥ १६ ॥ मिथ्यात्व कनकीं नगाचें । तैसें मिथ्यात्व ईश्वरीं जगाचें । हेंचि बीज वैराग्याचें । तेव्हां चराचर त्याचें वैराग्यही ॥ १७ ॥ कीं सत्य वाटे कामिनी । ती भोगानुरागें आठवे मनीं । अनुराग विषयाचा म्हणोनी । विषयरूपचि लेखावा ॥ १८ ॥ विषय जोंवरी न ये ध्यानीं । तों अनुराग त्याचा न उपजे मनीं । परि जो वाटे मिथ्या म्हणोनी । वैराग्य त्याचें त्यारूपें ॥ १९ ॥ हाटांत जें देखिलें रजत । त्याचा अनुराग उपजे निश्चित । शुक्तिरजत मिथ्या अत्यंत । वैराग्य त्याचें ॥५२०॥ एवं सत्यरजतरूप प्रीती । असत्यरजतरूपें अप्रीती । तेव्हां चराचररूपें दिसे स्थिती । मिथ्या म्हणोनि वैराग्याची तयाच्या ॥ २१ ॥ मजमाजीं भूतें परि त्या भूतीं । मी नसें तींही मजमध्यें नसती । ऐसें प्रस्तुत बोले जगत्पती । हाचि वैराग्यगुणही तयाचा ॥ २२ ॥ कीं रौप्य शुक्तींत दिसे । परि शुक्ति सत्य जे नाहींच त्या रजतीं नसे । आणि तें रजतही न वसे । कालत्रयीं शुक्तींत ॥ २३ ॥ एवं जगचि वैराग्यगुण । कळे व्यापका आत्मयाकरितां त्याची खूण । तेव्हां आत्मयाचा भाव हाही तो निपुण । वैराग्य गुण भागवत उत्तम देखतो ॥ २४ ॥ ऐसें श्रीमद्भागवत । बोलतां उत्तम भागवत । बोले परम धर्म भागवत । कीं तो प्रत्यक्ष भगवद्रूप पाहे हें विश्व ॥ २५ ॥ त्या प्रत्यक्षाचें नांव योग ऐश्वर । आपलें रूप हें चराचर । पाहें म्हणोनि सर्वेश्वर । 'पश्य मे योगमैश्वरं' या चरणें म्हणतसे ॥ २६ ॥ योग म्हणजे अघटित घटना । ऐश्वर म्हणजे मज ईश्वराचें हें रूप विश्व नाना । जो बोलतो याअनुभवाची रचना । भगवन्नाम तयाचें ॥ २७ ॥ भगवद्रूप त्याचें । भगवद्रूपीं रूप सगुणाचें । रूप त्या साऐश्वर्यादिकांचें । भागवत श्लोकें

---

१ शिंपीवर रुप्याचा भास होतो. २ भोगाचे इच्छेनें. ३ प्रीति.

निरूपिलें ॥ २८ ॥ हे गीता भगवद्गीता । ' भगवानुवाच ' ह्मणजे भगवान जाला बोलता । तो प्रत्यक्ष आपलें रूपचि हें पाहें ह्मणे तत्त्वतां । एवं भगवद्रूप हें प्रत्यक्ष ॥ २९ ॥ ऐसें पूर्वापरविचारेंकरोनी । हें चराचर भगवद्रूप ह्मणोनी । युक्त्यनुभवें उपपादिलें परि मनीं । अर्जुन अद्यापि नाहीं समजला ॥५३०॥ तो ह्मणे मायेनें विश्व केलें । तें याचें रूप केवीं झालें । हें समाधान एकाच बोलें । श्रीकृष्ण या उत्तरार्धें करीतसे ॥ ३१ ॥

उत्तरार्ध ॥ भूतभृन्न च भूतस्थो ममात्मा भूतभावनः ॥ ५ ॥

॥ टीका ॥ मीं भूतांचा धरणार ।परि भूतीं नसें मी त्याचा विचार । ऐसा कीं हा नानाकार । बुद्धि माझी कल्पिते ॥ ३२ ॥ यांत प्रथमचरणीं पूर्वानुसंधान । दुसरिया चरणीं समाधान । त्या समाधानें होतां ज्ञान । चराचर भगवद्रूप ह्मणोनी ॥ ३३ ॥ मी भूतें धरणार ह्मणिजे म्यां जीं व्यापिलीं । तीं मजमाजीं बोलिलों तेव्हां म्यां धरिलीं । त्या भूतीं मी नसें कीं तुज कळलीं । नाहींतशीं तीं भूतें मजमध्यें ॥ ३४ ॥ ऐसें रज्जुसर्पन्यायेंकरूनी । भूतें मजमाजीं ह्मणोनी । हीं भूतें मायामात्र ऐसें यावरूनी । सिद्ध जालें ॥ ३५ ॥ ते माया ह्मणोनि ह्मणावी । त्याज्यांशांत जे गणावी । ते माझी कल्पना ह्मणोनि जाणावी । योग ऐश्वररूप माझें हीं भूतें ॥ ३६ ॥ रामकृष्णाद्यअवतारकल्पना जैसी । कल्पना चराचराची तैशी । तेव्हां माझी तनू न होती कैशी । हीं भूतें सकळही ॥ ३७ ॥ या भावें ह्मणे जगज्जीवन । कीं माझा आत्मा ' भूतभावन ' । आत्मा बुद्धि माझी ह्मणे मधुसूदन । बुद्धि चिच्छक्ति कल्पनाशक्ति ईश्वराची ॥ ३८ ॥ ते भूतभावना अर्जुना । ह्मणजे भूतांची करी भावना । भावना ह्मणजे कल्पना । एवं शक्ति माझी भूतें कल्पिते हा अर्थ ॥ ३९ ॥ " संभवाम्यात्ममायया " । ह्मणोनि चतुर्थाध्यायांत धनंजया । ह्मणे माझी जी आत्ममाया । ती करोनि मी संभवतों ॥५४०॥ तेथेंचि कळलें अर्जुना । कीं अवतार मायाकल्पना । येथें चराचरभूतरचना । बुद्धि माझी कल्पिते ह्मणतसे ॥ ४१ ॥ आणि पूर्वार्धीं बोले सर्वेश्वर । कीं हा प्रत्यक्ष पाहें माझा योग ऐश्वर । भगवत्कृपापात्र चतुर । तत्त्व अर्जुन समजला ॥ ४२ ॥ कीं चित्स्वरूपीं चराचर । स्वशक्तीनें कल्पितो ईश्वर । तैसेचि कल्पितो अवतार । तेव्हां हा कमलपत्राक्ष तैसे प्रत्यक्षही ॥ ४३ ॥ आतां सामर्थ्य अवतारीं दिसे । तैसें चराचरीं कां नसे । हेंही अर्जुन अभिज्ञ न पुसे । तत्त्व कळलें ॥ ४४ ॥ कीं कृष्ण जरासंधभयें पळे । तरी काय सामर्थ्यापासूनि तेव्हां चळे । तैसें चराचरीं असू-

नि न कळे । सामर्थ्य बाळपणीं जैसें कृष्णाचें ॥ ४५ ॥ शयन शेषपर्यंकीं करी । तो मुते बाळांतियावरी । जो उदर विश्वाचें भरी । स्तन्यार्थ वि-श्वंभर तो रडे ॥ ४६ ॥ ब्रह्मांड भेदोनि गंगा आणी । गोपी न्हाणिती तो चक्रपाणी । पालथा घालोनि ओतिती पाणी । स्वपायांवरी विश्ववंद्यचरणातें ॥ ४७ ॥ अनादि बंध तोडी नामें । यशोदा त्यास बांधी दामें । गोरसचौर्ये आत्मारामें । करावें पळावें निर्भयें भिऊनियां ॥ ४८ ॥ इत्यादि बाल[1] लीला । करितां तया नवमेघनीला । देखतां गोपगोपिका मुलांमुलींला । काय समर्थ ईश्वर तो वाटे ॥ ४९ ॥ सामर्थ्य तो चराचरीं । आच्छादोनि असे यापरी । सुखदुःख भोग तो शिरीं । स्थापिला प्रतिबिंबांश जीवाचियां ॥ ५५० ॥ एवं जरी सामर्थ्य न दिसे । तरी चराचररूपें ईश्वर असे । हा अर्थ अर्जुना गवसे । ह्मणतां " ममात्मा भूतभावनः "ह्मणोनी॥५१ ॥ आतां कल्पना समजावी कैसी । अर्जुन पुसेल गोष्टी ऐसी । तरी पंचविध रीति बोलिली जैसी । ज्ञानविज्ञानसहित सांगतां ॥ ५२ ॥ एक भूतें म्यां व्यापि-लीं ह्मणोनी । भूतें मजमाजी यासहित दोनी । मी भूतीं नसें या सकट तीनी । भूतेंही मजमाजी नसती चतुर्थ ॥ ५३ ॥ पांचवें माझें योग ऐश्वर । रूप पाहें ह्मणे सर्वेश्वर । कल्पना चौं गोष्टींत समजोनि चतुर । पांचवें भगवद्रूपें दर्शन जगाचें ॥ ५४ ॥ ह्मणोनिया अर्धाचा पूर्वचरण । तेथें या पूर्वोक्त रीतींचें विवरण । सूचवी जगद्वंद्यचरण । " भूतभृन्न च भूतस्थो " ह्मणोनी ॥ ५५ ॥ या पूर्वचरणें पूर्वानुसंधान । यानिमित्त कीं विश्व ईश्वरकल्पना याचें ज्ञान । होय ऐसें जगज्जीवन । सूचवोनी बोलतो ॥ ५६ ॥ कीं मनीं कल्पिलीं भूतें अनेक । त्यांत आंत बाहेर तो कल्पक । त्यावेगळा आकार कोण एक । कल्पिला जाय कळे कल्पकातें ॥ ५७ ॥ तेव्हां ते कल्पिली रचना । कल्पकामाजीचि असे नाना । परि कल्पक त्यांत तो असेना । जैसा सर्पी रज्जुकल्पना मिथ्या ह्मणोनी ॥ ५८॥ मिथ्या कल्पना जेधवां । कल्पकामाजी नाहींच तेधवां । कीं जें मेलें जाळिलें तेंही मानवां । कल्पिता दिसे तरी काय आहे ते ह्मणावें ॥ ५९ ॥ परि तें रूप कल्पकाचें । ह्मणतां जनां न वाटे साचें । कीं पूर्वकर्मरचित जीवाचें । शरीर ह्मणोनि कल्पना निराळी वाटते ॥ ५६० ॥ परि जागृतीची जे कल्प-ना । तेचि स्वप्नीं स्वदेहरचना । ईश्वरासी तों देहचि असेना । कल्पनाचि त्याची त्याचे अवतार ॥ ६१ ॥ एवं कल्पनासामर्थ्य त्या कल्पकाचें ।

---

१ बाळंताच्या वस्त्रावर. २ दांव्यानें.

आणि रूपचि ह्मणावें तयाचें । हें शरीर जरी कर्माचें । तरी कर्म उपजे त्या कल्पनेच पासूनि ॥ ६२ ॥ कर्म करी कल्पूनी । ते कल्पना उपजे आदीं मनीं । पाहतां ऐसें विचारूनी । कल्पनाच देह जीवाचा ॥ ६३ ॥ दृष्टांतीं जीवकल्पना । ईश्वराचा तों देह कर्माचा असेना । जे त्याच्या कल्पनेची रचना । तोचि देह ईश्वराचा ॥ ६४ ॥ प्रस्तुत 'ममात्मा भूतभावनः' ह्मणोनी । ह्मणतां इत्यादि भाव मनीं । अर्जुन समजला त्यावरूनी । चराचर भगवद्रूप तो पाहे ॥ ६५ ॥ कीं जननभाव कोठें कल्पितो । कोठें जन्मोनि आहे या अस्तित्वभावा दावितो । कोठें वृद्धि कल्पोनि वाढतो । कोठें परिणामें अपक्षयकल्पना दाखवी ॥ ६६ ॥ दंतकेशादिक्षीणता । कोठें बधिरता अंधता । इत्यादि अपक्षयता । कोठें कल्पितो ॥ ६७ ॥ कोठें भाव'नश्यति' । कल्पूनि दाखवी शवाकृती । कोठें भस्मादिरूप जगत्पती । कल्पी आपण आपणा ॥ ६८ ॥ प्रतिशरीरीं षड्भाव । या रीती कल्पी देव । ऐसीच ब्रह्मांडरचना स्वयमेव । उत्पत्तिनाशपर्यंत कल्पितो ॥ ६९ ॥ जें जैसें कल्पितो । तें तैसें लक्षितो । साक्षी ये रीती ह्मणवितो । प्रत्यक्षज्ञान गुण भगवत्कल्पना ॥ ७० ॥ इतकें कल्पूनि कांहीं । मागुती त्याच्या स्वरूपीं नाहीं । इतकी रचना रचोनि तेही । नाहींच ह्मणोनि जो जाणे ॥७१॥ हा शेवटील वैराग्यगुण । तोही समजला तो निपुण । आणि या साही गुणाची खूण । सर्वव्यापका आत्मयाच करितां ॥ ७२ ॥ तेव्हां आत्मा आपुला । तोचि षड्गुण अनुभवें वाटला । भगवद्भाव आंगीं बाणला । एकसरां अर्जुनासी ॥ ७३ ॥ श्रीकृष्ण एक भगवंत । अर्जुन भगवद्भक्त भागवत । देशधडी जालें हें द्वैत । परम अद्वैत बिंबलें ॥ ७४ ॥ नवल भाग्याचा उदय । कृष्णचि जाला धनंजय । बोध बिंबला अद्वय । उभयत्र भगवद्भाव सारिखा ॥ ७५ ॥ मनीं पाहे अर्जुन । तों भगवद्रूप हें त्रिभुवन । अनुभवीं होऊनि तल्लीन । दचकला मागुती ॥ ७६ ॥ सर्व संशय निरसला । तों संदेह कांहीं एक उद्भवला । कीं विश्व आत्मा आपुला । परि यथास्थित विश्व मजला कळेना ॥ ७७ ॥ जितक्या जगाचा मज आठव । तितक्यांचा प्रतीतीस येतो भगवद्भाव । जें आठवे तें मी स्वयमेव । ऐसें वाटतें ॥७८॥ जें जें मातें न स्मरे । तेथें आत्मा मजसी मजला न स्फुरे । स्मरतां विश्व जें उरे । काय तेथें मी नसें ॥ ७९ ॥ आत्मा तरी अखंडित । हाचि वाटे भगवंत । जें न स्मरेही जग तयांत । हाचि आत्मा स्वयें नांदतो ॥ ८० ॥ परि ज्याचा नव्हे आठव । तेथें आत्मयाचा नव्हे

अनुभव । आणि नाठवे तेंही स्ववैभव । तरी तें कोणे रीती जाणावें ॥८१॥ आणि मजमाजी सर्व भूतें । तूं पाहें ह्मणोनि मातें । 'मत्स्थानि सर्वभूतानि' या चरणीं भगवंतें । आज्ञा केली कीं पश्य पाहें ह्मणोनी ॥ ८२ ॥ ऐक्य मज आणि यास खरें । परि यास सर्वभूतें दिसती एकसरें । मज तें पाहणें नाकळे बरें । म्यां आपणांत कैसीं पाहावीं तीं सर्व ॥ ८३ ॥ मज जै जितकें आठवतें । तितकेंचि तें प्रत्ययास येतें । विश्व अपरिमित उरतें । तें कैसें मजमाजी म्यां अवधारावें हें सर्व ॥ ८४ ॥ हें पुसों ह्मणोनि । अर्जुन चिंती मनीं । तों अंतरसाक्षी तें समजोनी । ऐसीं आपणांत भूतें अवधारीं ह्मणतो या श्लोकीं ॥ ८५ ॥

॥ श्लोक ॥ यथाकाशस्थितो नित्यं वायुः सर्वत्रगो महान् ।
तथा सर्वाणि भूतानि मत्स्थानीत्युपधारय ॥ ६ ॥

॥ टीका ॥ अगा आकाशीं वायु नित्य वसे । तो सर्वत्र गगनीं असे । तोचि महाथोर चंचल होतां गवसे । अनुभव येतसे हा वारा थोर होय ह्मणोनी ॥ ८६ ॥ आणि नित्य सर्वत्र गगनीं समीर । तो न कळे कीं न स्पर्शे शरीर । जरी प्रत्यया नये वायु स्थिर । तरी आकाशीं आहेच तो ह्मणावा ॥ ८७ ॥ महावायु तो जो वारा । चंचळ होऊनि लागतो शरीरा । तो गगनीं असे तैसाच पांडुकुमारा । नये प्रतीतीस तोही गगनींच आहे ह्मणावा ॥ ८८ ॥ घरांत होतो उबारा । अणुमात्र नाहीं साच वाटे वारा । परि विजणा वस्त्र कांहीं हालतां शरीरा । लागे गगनीं असे ह्मणोनी ॥ ८९ ॥ येविषयीं तों अर्जुना । संदेह नुपजो तुझ्या मना । या भावें आकाशवायु-दृष्टांतरचना । पूर्वार्धीं ऐसी निरूपिली ॥ ५९० ॥ आकाशीं द्विविध वायु जैसा । सर्वभूतें आपणांत तूं अवधारीं तैसा । कीं सर्वत्र वायु अनुभवा ये तरी कैसा । नाहीं ह्मणावा कीं त्याच गगनीं तो असे ॥ ९१ ॥ यथा ह्मणजे जैसें । तथा ह्मणजे तैसें । दृष्टांतदार्ष्टांतीं समाधान ऐसें । शिष्य-भक्तांचें जगद्गुरु करीतसे ॥ ९२ ॥ वारा नित्य सर्वत्र गगनांत । भूतेंही स्थितिकाळीं नित्य आत्मयांत । परि श्रवणेंद्रिया त्वगिंद्रिया प्रत्यया असे येत । जो चंचळ महा वायु तोचि ॥ ९३ ॥ तथापि त्याच गगनीं । प्रत्यया न ये तोही वायु असे ह्मणोनी । जन न जाणती या दृष्टांतें करोनी । सर्व भूतें तूं आपणांत अवधारीं ॥ ९४ ॥ कीं नभीं वायु तैसीं भूतें सर्वत्र आत्मयांत । जितकीं बुद्धीस विदित तीं प्रत्यया येती तयांत । ते जैसा महावायु प्रत्यया

असे येत । श्रवणेंद्रियां त्वगिंद्रियासी ॥ ९५ ॥ प्रत्यया न येतां उरला । तो वायु त्याच गगनीं असे भरला । जैसें हें सत्य वाटतें तुजला । तैसीं तींहि भूतें त्याच आत्मयांत हें समज ॥ ९६ ॥ स्मरतां प्रत्यया आलें चराचर । आणि उरलें जें नव्हे प्रत्ययगोचर । तेंही तूं आपणामाजी अवधारीं ऐसें सर्वेश्वर । अप्रतीत जगीं ही अद्वैतधारणा बोलतसे ॥ ९७ ॥ कीं आत्मयाविण । न कळे जड जगाची खूण । परि तो निर्धर्म निर्गुण । तो या बुद्धीवांचून तों न ये ॥९८॥ काष्ठ गोंवरी काशा एकाविना । नुसता अग्नि दृष्टी दिसेना । बुद्धीविना प्रत्यया येईना । निर्धर्म आत्मा देहींहि ॥ ९९ ॥ देहीं सर्वत्र आत्मा भरला । हें तों ठाउकें भलतियाला । परि जें जग तेव्हां नाठवे ज्याला । त्याच्या प्रत्ययांत तें तेव्हां असेना ॥६००॥ आणि अजाणोनि त्या अंगीं आपण । तेथें आपली आपणास न कळे खूण । तें स्मरतांचि अंग तोंचि निपुण । तेथें जो आत्मा त्या आत्मयाच कारितां तें जाणे ॥ १ ॥ एवं बुद्धि जेथें पावते । तेथेंचि आत्मयाची प्रतीति येते । जड सृष्टि तेव्हां दिसते । तेथें तयाच आत्मयाकारितां गुरुमुखें ॥ २ ॥ आत्मयांत भूतें सकळ । आत्मा भूतीं तरंगीं जैसें जळ । परि दृष्टि जेथें पाहे निवळ । तेथें जलतरंग दोन्ही दिसती ॥ ३ ॥ आणि जेथें न पावली दृष्टी । तेथेंही जळींच असे तरंगसृष्टी । प्रस्तुतीं कृपामृताची वृष्टी । याचि भावें या श्लोकीं होतसे ॥ ४ ॥ कीं सर्वगत आकाश पोकळ । त्यांत वायु सर्वत्र तो अकळ । कळतो जो महावायु ह्मणिजे चंचळ । परि अकळही तोचि वायु त्याच आकाशीं ॥ ५ ॥ तैसा आत्मा सर्वगत । त्यांत भूतें सर्व एकसरें न कळती निश्चित । कळती तीं जेथवर्यंत । दिसे इंद्रियां अथवा स्मरे बुद्धी ॥ ६ ॥ बुद्धि इंद्रियें जाणती । तीं भूतें ज्या आत्मयांत असती । त्यावेगळीं प्रत्यया न येतां उरती । तींही तेंच त्याच आत्मयांत हा अर्थ ॥ ७ ॥ आत्मा नव्हे वेगळा । प्रकृतिभागही नव्हे निराळा । अन्योन्य जडभागा सकळा । भेद नसे ॥८॥ आत्मा सर्वत्र परि निर्धर्म । तों तों प्रत्यय जों जों बुद्धीचा आक्रम । न स्मरे तेंही स्थावरजंगम । अवधारीं आपणांत अर्जुना ह्मणतसे ॥ ९ ॥ "तथा सर्वाणि भूतानि" । "मत्स्थानीत्युपधारय" ह्मणोनी । कृष्ण ह्मणे कीं मजमाजी ह्मणजे ये रीतीकरोनी । तूं आपणांतही सर्व भूतें अवधारीं ॥ ६१० ॥ पूर्वी "मत्स्थानि सर्वभूतानि" । ह्मणे पाहें पश्य ह्मणोनी । येथें "तथा सर्वाणि भूतानि" । "मत्स्थानीत्युपधारय" ह्मणतसे ॥ ११ ॥ कीं पूर्वी मजमाजी सर्वभूतें । पाहें ह्मणोनि बोलिलों तूतें ।

तीं एकसरें तुझ्या बुद्धीतें । न आकळती हें सत्य ॥ १२ ॥ तरी आकाशीं त्रिधा वायु दृष्टांतें । आपणाचि माजी स्मृतें आणि अस्मृतें आहेत सर्वही भूतें । अवधारीं ऐसें अर्जुना ॥१३॥ अगा मजशीं ऐक्य जालें । परि माझें ईश्वरत्व तुज नाहीं आलें । ह्मणोनि सर्वसाक्षित्व राहिलें । त्यामुळें तुज हा संदेह ॥ १४ ॥ अगा राजा दरिद्रता हरी । सभाग्य आपणासारिखें करी । तोही तैसाच जाला परी । समग्र पृथ्वीशासन तें तों नये तयाते ॥ १५ ॥ आणि जरी नये तें शासन । तैसाच जाला सभाग्य सधन । परि ते [illegible] त्याणें जतन । तैसा भगद्भाव हा ध्यावा तुवां सर्वदा ॥ १६ ॥ त्या ध्यानें सर्वही भूतें । न आठवती जरी तूतें । या भावें आकाशवायुदृष्टांतें । "तथा उपधारय" ह्मणोनि बोलिलें हें ध्यान ॥ १७ ॥ भगवद्वाक्यार्थ ये रीती । परि इतर टीकाकार ऐसें न बोलती । पूर्वी ज्ञान बोलिला त्यास ह्मणती । यथाकाश हा दृष्टांत ॥ १८ ॥ तरी मागिल्या तिन्ही गोष्टी । पाहतां तिकडे देऊनि दृष्टी । वृथा जाले सर्वही कष्टी । दृष्टांत त्या तिहीं गोष्टींस लागेना ॥ १९ ॥ म जमाजी सर्व भूतें । जरी इतकेंचि बोलिलें असतें । तरी या दृष्टांतास येतें । साम्य कांहींसें ॥६२० ॥ कीं मजमाजी ह्मणतो तो अव्यक्तमूर्ती सत्य । आणि भूतें जरी जडें असत्य । तरी दृष्टांत एकदेशी घ्यावा अगत्य । कीं आकाशीं वायु तैसीं भूतें त्यामाजी ॥ २१ ॥ परि प्रस्तुतीं ह्मणतो कीं मी नसें त्या भूतीं । आणि तीं भूतेंहि मजमाजी नसती । तैसा आकाशवायूंत नसे ये रीती । आणि वायुही नसे नभीं तरी हें घडे ॥ २२ ॥ आकाश जड पोकळ । ब्रह्म चिन्मात्र इंद्रियां अकळ । तथापि आकाशवत्सर्वगत केवळ । श्रुति एकदेशी दृष्टांत बोलती ॥२३॥ येथें गीतेंतही त्रयोदशीं । आकाशासारिखें व्यापक ह्मणोनि एकदेशी । व्यापकत्वीं दृष्टांत उपदेशी । श्रीकृष्ण ॥ २४ ॥ परि मजमाजी भूतें असतीं । आणि मी नसें त्या भूतीं । तींही मजमाजी नसती ह्मणे श्रीपती । यास दृष्टांत आकाशीं वायु केंवी घडे ॥ २५ ॥ आकाशीं वायु असे । वायूतही आकाश वसे । आतां सादृश्य केंवी गवसे । दृष्टांतीं आणि दार्ष्टांतिकीं ॥ २६॥ "आतां भूतभृन्न च भूतस्थो" या चरणीं । पूर्वश्लोकीं भूतें धरोनि भूतीं नसे ह्मणे चक्रपाणी । इतकिया दृष्टांतीं वाणी । योजावी तरी योजेना ॥ २७ ॥ कीं आकाश वायूतें धरी । आणि असेच त्या समीरीं । गगन समीरीं नसे यापरी । न घडे तों न लगे दृष्टांत ॥ २८ ॥ आतां वारा चळेना गगनीं । तेव्हां गगनच असे वारा नसे ह्मणोनी । दृष्टांत साधिला

ऐसा दांत चावुनी । तरीही व्यर्थ ॥ २९ ॥ कीं चळेना वायु जेधवां । वारा नसे जरी ह्मणावा तेधवां । तरी विंजणा हालतां मानव । त्वचेस लागे तो उपजला कोठोनी ॥ ६३० ॥ जें तरंगरूप जळ । तेंचि जळ ह्मणावें अचळ । जो स्थिर तोचि चंचळ । वारा गगनीं सर्वदा ॥ ३१ ॥ आणि " यथाकाशस्थितो नित्यं "ह्मणोनी । अचळ वायुही या नित्यशब्दें करोनी । घेतला कीं न हाले तेधवांही गगनीं । नित्य असे ॥ ३२ ॥ अचळ वारा न दिसे । तथापि तो गगनीं असे । भूतग्राम ऐसा वसे । तरी न ह्मणावें कीं [illegible] नसती मजमाजी ॥ ३३ ॥ अकळ वायु गगनीं अचळ । तैसीं भूतें ब्रह्मीं ह्मणतो सकळ । ऐसें ह्मणावें तरी जो नव्हे चंचळ । असेच गगन त्यांत तोही गगनीं असेच ॥ ३४ ॥ कीं भूतें जैशीं त्यांत असती । तो नसे ह्मणावा तैसा भूतीं । अचळ वायु न कळे तरी व्यापकगती । आकाशाचि असे त्या वायूंत ॥ ३५ ॥ तेव्हां मी भूतीं नसें ह्मणे ऐसें । हें दृष्टांतीं साधेल कैसें । कीं ब्रह्मीं भूतांचें असणें जैसें । तैसें अकळ वायूचें असणें आकाशीं ॥ ३६ ॥ आतां भूतेंही ह्मणे मजमाजी नसती । यास अकळ वायु गगनीं नाहीं न ह्मणवे ये रीती । कीं जरी ब्रह्मीं भूतांची वसती । जो अचळ न कळे त्या वायूसारिखीं लेखिलीं ॥३७॥ ह्मणे भूतें हीं मजमाजी नसती । तेव्हां सकळ वायु गगनीं नसे जरी ये रीती । तरी अवश्य दृष्टांत हा मानिती । संत विवेकी शोधक ॥ ३८ ॥ दोंहींपरि अघटित । पूर्वोक्त ज्ञानास न लागे हा दृष्टांत । कीं स्मृता अस्मृता भूतांचें अद्वैत । ऐसें अवधारीं ह्मणजे ध्यान करीं ह्मणतसे ॥ ३९ ॥ आणि वायूचीं रूपें दोनी । ये स्थळीं निरर्थक काय ह्मणोनी । " यथाकाशस्थितो नित्यं " इतकिया वचनीं । निर्वाह दृष्टांताचा होतसे ॥६४०॥ 'सर्वत्रगो' आणि 'महान्' ह्मणोनी । रूप [illegible] दोनी । आणि दृष्टांत पूर्वोक्तास लागेना यावरूनी । स्पष्ट भगवद्भाव हा नव्हे ऐसा श्लोकचि दावितो ॥ ४१ ॥ सर्वभूतीं आत्मा ध्यावा । हा बोध ज्यास असेल ठावा । त्यालाचि हा संदेहही उठावा । कीं ध्यातां उरलीं तीं आत्मयांत कैसीं पहावीं ॥ ४२ ॥ क्षुधा असेल ज्याला । अन्नाची इच्छा उपजेल त्याला । त्याच वरी कृपा अन्नदातयाला । उपजेल अन्न द्यावयाची ॥ ४३ ॥ त्यालाच त्या अन्नाचा रस । अनुभवास येतो सुरस । तैसा हा अर्थही जगन्निवास । सर्वभूतीं भगवद्भाव ज्यास त्यालाचि देतसे ॥ ४४ ॥ या अनुभवाचा ज्यांस ठाव नसे । ते हा अर्थ काढितील कैसे । लागेचि ना तेथें जैसे तैसे । गेले निर्वाहसा करूनियां ॥ ४५ षष्ठीं " सर्व

भूतस्थमात्मानं " या श्लोकांत । सर्वभूतीं आत्मा सर्व भूतें आत्मयांत । तेथें सर्वघटीं जळ सर्वघट जळांत । बुडाले या दृष्टांतें हा अर्थ साधिती॥४६॥ऐसें द्वैत उरवूनि बोलती। प्रस्तुतीं मजमाजी भूतें मी नसें भूतीं । येथें फेस आणिला दृष्टांतीं । असे भगवद्भाव भूतीं तरी हें कळे॥४७॥प्रस्तुतीं त्या टीकेचे भक्त अत्यंत । ते येथें ह्मणतील एकदेशी दृष्टांत । तरी आकाश जड चित्स्वरूप भगवंत तेथें एकदेशी ह्मणावें ॥ ४८ ॥ भूतें मजमाजी त्या भूतीं । मी नसें तींही मजमाजी नसतीं । असोनि नसणें इतकी तों रीती । दृष्टांताची मिळावी ॥ ४९ ॥ जळामाजी फेंस दिसे । परि फेसीं जळ नसे । जिहीं इतकें तरी साधिलें तेंचि कैसें । हा दृष्टांत तिकडे लाविती ॥ ६५० ॥ वायु आकाशीं वसे । परि आकाश वायूंत नसे । ऐसा फेंस जळासारिखाही न दिसे । दृष्टांत येथें ॥ ५१ ॥ भूतें असोनि नसती । हें मुख्य साधितो येथें यदुपती । तो नवरा सोडोनि मिरवती । वराडी व्यर्थ ॥ ५२ ॥ अधिष्ठान असे सत्य । विवर्त भासे असत्य । ऐसे कोटि दृष्टांत सोडोनि अगत्य । काय हाच दृष्टांत सर्वज्ञास आठवला ॥ ५३ ॥ भगवंत ह्मणा वेडा । अथवा त्या टीकेची श्रद्धा सोडा । गीता सोडोनि व्यर्थ पवाडा । गोष्टींचा वाचणें तरी वाचा गोड गोष्टी ॥ ५४ ॥ गीता जाते पश्चिमेकडे । टीका चढे पूर्वदिशापर्वताचे कडे । दोहींस हात लाविती बापुडे । अर्थ सांपडे केंवी तयां ॥ ५५ ॥ दृष्टांत लागला कोणे अंशीं । कीं उरल्या साम्यास मानावें एकदेशी । सर्वज्ञ तत्त्व उपदेशी । दृष्टांत अयोग्य तो कां बोलेल ॥ ५६ ॥ भूतें मजमाजी असती । हे प्रथम गोष्टी बोले श्रीपती । आकाशीं वायु ये रीती । दृष्टांत एके गोष्टीस मानावा ॥ ५७ ॥ तरी भूतें आपणांत नसती । हें सिद्ध करावया आदीं ह्मणे असती । वरास लावाया आदीं आणिती । हरिद्रा जैसी ॥ ५८ ॥ दवडोनियां त्या वरा । हरिद्राच ह्मणती नवरा । अंतरपट ह्मणती धरा । नवरी आणि हरिद्रा यांमाजी ॥ ५९ ॥ भूतें असोनि नसती । हें सिद्ध करितो श्रीपती । या दृष्टांतें भूतें निश्चित असती । बळकटी होती या गोष्टीची ॥ ६६० ॥ मी त्यांत नाहीं । तीं मजमाजी नसती कांहीं । उडाल्या या गोष्टी दोनीही । प्रथम गोष्टीस दृष्टांत हा देतां ॥ ६१ ॥ नसे गगन पवनीं । नसेच पवनही गगनीं । हें न घडे तेव्हां गेलिया उडोनी । दोनीही गोष्टी या दृष्टांतें ॥ ६२ ॥ भगवंतीं असावीं भूतें । भूतीं नसावें भगवंतें । पुन्हां भूतेंही भगवंतीं नसती ऐशा दृष्टांतें । हा अर्थ साधावा ॥ ६३ ॥ येथें तत्त्व दावूनी अपरोक्ष । भगवद्रूप दावी प्रत्य-

क्ष । हातींच्या कांकणास कोण दक्ष । अपेक्षी आरसा ॥ ६४ ॥ ह्मणोनि विना दृष्टांत । तत्त्व दावी भगवंत । अपरोक्षानुभवासही अशक्य अत्यंत । तेंविषयीं दृष्टांत हा दावी ॥ ६५ ॥ कीं जाला अपरोक्ष साक्षात्कार । भगवद्रूप देखे चराचर । तरी अशेष विश्व निरंतर । न दिसे तया ॥ ६६ ॥ एक ईश्वरच हें जाणे । ज्ञानियास सर्वही ब्रह्म इतकेंच बाणे । विश्वरूप दावितां पार्थासि ह्मणे । कीं या दृष्टीनें मातें पाहों न शकसी ॥ ६७ ॥ देऊनियां दिव्य दृष्टी । मग एकदांचि दाविली सर्व सृष्टी । अपरोक्ष उपदेश करुणावृष्टी । असोनि दिव्यदृष्टींच दाविलें विश्वरूप ॥ ६८ ॥ पावला अपरोक्ष साक्षात्कार पार्थ । प्रथम श्लोकीं विश्वरूपीं हा स्पष्ट अर्थ । या नवमीं तो समर्थ । पाहें पाहें ह्मणतसे ॥ ६९ ॥ राजा सकळ विद्यांचा । राजा सकळ गुह्यांचा । ज्ञानविज्ञानसहित सांगतों ह्मणे स्ववाचा । आणि पाहें ह्मणोनि साक्षात्कारें दाखवी तें ॥ ६१० ॥ एवं अपरोक्षसंपन्न पार्थ । तथापि विश्वरूप या दृष्टीं न दिसे यथार्थ । ह्मणोनि सिद्ध होतो अर्थ । कीं न स्मरती तींही भूतें ये रीती पाहें आपणांत ॥ ७१ ॥ कीं चंचळ आणि अचळ । द्विविधही एकाच गगनीं अनिल । तैसीं स्मृतें अस्मृतें भूतें सकळ । एकाच निर्धर्मा स्वात्मयांत अवधारीं ॥ ७२ ॥ कीं अवधारणें बुद्धीचे शिरीं । परि तें तेजें दृष्टी प्रकाशे यापरी । आत्मयाकरितां सचेतन होतां चराचरीं । तो आत्मा पवन गगनीं ये रीती ॥ ७३ ॥ सूर्यतेजें प्रकाश पावे । ते दृष्टी तेजावरी धांवे । धांवतां तेज उरलें न ह्मणवे । वेगळें तेज सूर्याचें ॥ ७४ ॥ तेजांत जेथवरी धांवे दृष्टी । तेथवरी देखे त्या तेजें प्रकाशली सृष्टी । पुढें तेंच तेज तेंचि सृष्टी न दिसतां कष्टी । तदर्थ कोण होय ॥ ७५ ॥ आत्मयानें प्रकाशली बुद्धिदृष्टी । आत्मप्रकाशित चित्तें स्मरे [illegible] ऊा आत्मा आणि सृष्टि तदर्थ कष्टी । न कळे आत्मत्वें ह्मणोनि कां व्हावें ॥ ७६ ॥ तोचि आत्मा उरला जैसें गगन । तेचि सृष्टी उरली गगनीं जैसा पवन । सर्वत्र आपण सर्व आपणांत ऐसें समाधान । या श्लोकीं केलें ऐसें अवधारीं ह्मणोनी ॥ ७७ ॥ उदंड टीकाकार जाले समर्थ । परि या श्लोकांचा अचुंबितार्थ[1] । या यथार्थदीपिकेनेंच प्रगटला यथार्थ । अनन्यशरणगतिप्रतापें ॥ ७८ ॥ मंगलाचरणीं क्षुद्रदेवता । त्यांस कठीण अत्यंत हे गीता । विना गीताकार अनंता । कोण टीकाकार टीका करील गीतेची ॥ ७९ ॥ अद्वैताच्या आश्रयें । ब्रह्मचि सर्व देवता या निश्चयें । आह्मीं ज्ञानी

---

१ अननुभूत किंवा न समजलेला अर्थ.

जगद्गुरु स्वयें । ऐसें मानूनि वर्म चुकले भक्तीचें ॥६८० ॥ ब्रह्म सर्वत्र सम । तरी घरची वटिक काय नव्हे ब्रह्म । कां तीचें श्रवणकीर्तन न करावें परम । कां मंगलाचरण तीचें करूं नये ॥ ८१ ॥ देवता विघ्न हरी । तेंचि मंगलाचरणीं वंदावी कां परी । एवं ब्रह्म सर्व परि उंच नीच पायरी । एक एकाची उ-पाधिभेदें ॥ ८२ ॥ एवं ईश्वरोपाधियुक्त निर्गुण । तेंचि एक भजावें सगुण । हे न कळोनि गीताप्रोक्त खूण । तक्र पिती दुग्ध ह्मणोनी ॥ ८३ ॥ असोत त्या गोष्टी । अनन्यभक्तीवांचूनि दृष्टी । गीतार्थ न पडे वृथा कष्टी । टीकाकार जाले कितीएक ॥८४॥ हें परटीकादूषण । आणि स्वटीका[illegible] अभिमानें किंवा न्यायें हें विचक्षण । पाहोत पूर्ण दीर्घदृष्टी ॥८५ ॥ न करितां मृषा जडाचें रूप । न कळे सत्य चित्स्वरूप । शास्त्रविरुद्ध पक्ष विरूप । न दूषितां नव्हे रूप अर्थां यथार्थाचें ॥ ८६ ॥ श्रोते हा सिद्धांत यथार्थ । परिसोनि तेही देखतील अर्थ । त्या बाधितार्थी श्रद्धा धरोनि व्यर्थ । च्य-वतील तत्त्वापासूनी ॥८७॥ यालागीं ते अर्थ बाधित । अगत्यस्थळीं दूषूनि हा अबाधित । अर्थ बोलावा लागतो हेंही भगवंत । कां ऐसें करितो तो जाणे ॥ ८८॥ सिद्धांत होतां यथार्थ । सहज उडती कित्येक अर्थ । ते दूषूनि कां व्यर्थ ग्रथ । अत्यंत वाढवावा ॥ ८९ ॥ येथवरी राजविद्याप्रकरण । प्रत्यक्ष हें भगवद्रूप ऐसें विवरण । जालें आतां जगद्वंद्यचरण । काय बोलेल तें पहावें ॥६९०॥ सा श्लोक या अध्यायांत । बोलिला ऐसे भगवंत । राज-विद्याप्रसंग येथपर्यंत । अनन्यशरणें वाखाणिला ॥ ९१ ॥ यांत प्रथम श्लोक दोनी । राजविद्या अत्यंत थोर ते सांगतो ह्मणोनी । तिसरिया श्लोकीं ज्या धर्मावांचूनी । हें प्राप्त नव्हे वर्णिलें त्याचें अश्रद्धधान ॥ ९२ ॥ पुढें जें राजगुह्य होतें बोलणें । तें दो श्लोकीं नारायणें । बोलोनि ये रीती आपणें अवधारणें । ह्मणोनि या एका श्लोकीं तें निरूपिलें ॥ ९३ ॥ ऐसी षट् श्लोकीं बोलिली । प्रत्यक्षही भगवद्रूपाची किल्ली । प्रकट करितां नाहीं उरली । उरी कांहीं गुह्य बोधाची यापुढें ॥ ९४ ॥ अशेष गेलें द्वैत । बिंबलें परम अद्वैत । प्रत्यक्ष जडभागही भगवंत । ऐसें बिंबलें ॥ ९५ ॥ प्रत्यक्षही हें भगवद्रूप देखे अर्जुन । याचें नांव पूर्वी बोलिलें विज्ञान । आणि भूतें दिसोनि नसती हें ज्ञान । या ज्ञानेंचि विज्ञान हें होय ॥ ९६ ॥ ह्मणोनि विज्ञानासहित । ज्ञान सांगेन ह्मणे भगवंत । आणि या ज्ञानाचें साधन अत्यंत । भागवतधर्म ॥ ९७ ॥ ह्मणोन याच्या धर्माचें अश्रद्धधान । तें न पावोनि मातें श्रद्धाहीन । मृत्युसंसारमार्गी बहुत जन । परतले ऐसें मागें बोलिला ॥ ९८ ॥ एवं

विना भगवद्भजन । सर्वथा नव्हे आत्मज्ञान । त्यांत कोणी मुमुक्षु जन । आत्मा कळतां सगुण सोडिती ॥ ९९ ॥ ते क्लेश अधिकही पावले । तथापि मुक्त तों जाले । जे ज्ञानें सगुण भजों लागले । ते पावले या भगवत्प्रबोधातें ॥७००॥परंतु होय आत्मज्ञान । त्यास साधन भगवद्भजन । त्या भगवद्भजनीं अश्रद्धान । ते पढतमूर्ख संसारीं परतले ॥ १ ॥ मातें न पावोनि ते परतले । ऐसें मागें श्रीकृष्ण बोले । एवं आत्मस्वरूप कृष्णास पावले । ते न परतले कदापि ॥ २ ॥ त्यांत कोणी धरिलें निर्गुण । काणी निर्गुणज्ञानें [illegible] सगुण । परि स्वरूपातें पावले ते निपुण । न परतती कोणीही ॥३॥ [illegible] सिद्धांत जाला केवळ । परंतु एका संशयाचें हें स्थळ । कीं प्राप्त होतो प्रलयकाळ । ब्रह्मीं मिळे सर्वही ॥४॥ कीं सूर्य शोषी थिल्लर जळें । त्यांत सूर्याचीं प्रतिबिंबें केवळें । तीं सूर्यांत मिळती सकळें । प्रलयीं ब्रह्मां उपाधिसहित ये रीती ॥ ५ ॥ प्रळयीं उपाधिसहित जीव । मिळती उरे निर्गुण स्वयमेव । तेथोनि पुनः होतसे उद्भव । उपाधीचा आणि जीवाचा ॥ ६ ॥ ऐसे ब्रह्मीं पावले । ते जेव्हां परतले । तेव्हां हेही जरी ज्ञानी भले । तरी परतीच ऐसें ह्मणावें ॥ ७ ॥ ते कां परतती ब्रह्म पावोनी । हे कां न येती परतोनी । ज्ञानी आणि अज्ञानी । ब्रह्मचि होती प्रलयीं दोघेही ॥८ ॥ एवंच न पावले मातें । ते परतले ऐसें बोलिलें भगवंतें । तरी तेही प्रलयीं तयातें पावती निश्चत ॥ ९ ॥ जे पावले ते न परतती । तरी हेही प्रलयकाळीं पावती । जरी हे पावोनि परतती मागुती । तरी तेही परतती ह्मणावें ॥ ७१० ॥ पावोनिही परतणें घडे । तेव्हां भगवंत बोलिला तें उडे । कीं मातें न पावोनि पडे । मृत्युसंसारमार्गांत ॥ ११ ॥ न पावतां जेव्हां परतले । तेव्हां न परतती जे पावले । ऐसें दाटूनि भगवंत बोले । येथें उडाली [illegible] ॥ १२ ॥ प्रलयीं ब्रह्म केवळ । पावती जीव सकळ । तेव्हां हे गोष्टी निष्फल । कीं पावले ते न परतती ॥ १३ ॥ एवं पूर्वपक्ष सबळ । हा परि हरूं पाहे मेघनीळ । प्रलयसृष्टिप्रकरणारंभमूळ । पूर्वपक्ष ऐसा वर्णिला ॥ १४ ॥ कीं प्रलयीं सर्वही ब्रह्मस्वरूपीं । मिळती हें अन्यथा नव्हे कदापी । पुनरावृत्तिहेतु तथापि । त्यास असे तो बोलतो या श्लोकीं ॥१५॥

॥ श्लोक ॥ सर्वभूतानि कौंतेय प्रकृतिं यांति मामिकाम् ।
कल्पक्षये पुनस्तानि कल्पादौ विसृजाम्यहम् ॥ ७ ॥

॥ टीका ॥ अगा कुंतीसुता माझी प्रकृती । जी करी प्रलयोत्पत्ती । हीं भूतें तीतें पावती । कल्पक्षयीं याकारितां पुनर्भव ॥ १६ ॥ कल्पाचिया आ-

दिकाळीं तया । पुनः निर्मितों धनंजया । मज न पावोनियां जया । प्रलयीं पावणें प्रकृतीतें ।। १७ ।। माझिया प्रकृतीतें पावती । या गोष्टींत संशयनिवृत्ती । कीं बीजांतूनि वृक्ष ये रीती । सृष्टिकाळीं उपजे प्रकृतीपासूनि हा प्रपंच ।। १८ ।। तेव्हां उपाधि प्रकटती । जळें होतां प्रतिबिंबें दिसती । जे प्रकृतीतें पावती । त्यांतें निर्मितों या भावें ह्मणतसे ।। १९ ।। ज्ञान नाहीं तयांतें । हें सूचवी ह्मणतां सर्व भूतें । प्रकृतींत मिळतीं ते कीं जयांतें । अभिमान देहा जडाचा ।।७२०।। आत्मा जिहीं ओळखिला । जडभाग मिथ्या लेखिला । तिहीं तो नाहींच देखिला । प्रलयकाळ ।। २१।। ते कां प्रकृतीतें पावती । ज्यांस बाणली ब्रह्मात्मत्वस्थिती । त्यांची गणना नसे सर्वभूतीं । मातें पावले ते ऐसे ।। २२ ।। एवं सकळ वेदवेदांत बोलती हाचि सिद्धांत । कीं ब्रह्म पावले जे भाग्यवंत । ते प्रलयीं न मिळती प्रकृतीतें ।। २३ ।। उपाधि पावले ज्या प्रकृतीतें । ब्रह्मीं लय बोलिजेतो तीतें । पुन्हा उदय बोलिला ते गुणवतीतें । सृष्टिकाळीं ।। २४ ।। प्रलयकाळीं जें जें गिळी । सृष्टिकाळीं तें तें उगळी । लय पावती जैशीं तैशींच सगळीं । सृष्टिकाळीं प्रकटती ।। २५ ।। प्रलयकाळीं मिळालीं तीतें । तीं सर्वही ह्मणावीं भूतें । प्राकृतें पावती प्रकृतीतें । ब्रह्म पावले ते ब्रह्मज्ञ।।२६।। ज्यांची अविद्या गेली । जिहीं ब्रह्मीं ब्रह्ममय बुद्धि केली । ब्रह्मींच ते त्यांची निमाली । बुद्धिलहरी आनंदसिंधूंत ।। २७ ।। जोंवरी प्रारब्धाचा वारा तों बुद्धिवृत्ति जडतरंगाकार । होत होत्या तो सरतां सारा । लहरी बुद्धीचीही निमाली ।। २८ ।। बुद्धीच जीवोपाधी । ते ब्रह्मीं मिळे प्रलयाआधीं । तरी चिदंशास मग कधीं । प्राप्त नव्हे जीवत्व ।। २९ ।। दिनांतीं लय मृगजळाचा किरणीं । प्रकृतीऐसी मिळे निर्गुणीं । ज्याचा उपाधि तिच्या त्रिगुणीं । न मिळे तो सृष्टिकाळीं उपजेना ।।७३० ।। घट फुटे नासे जल । त्यांत कैसें प्रतिबिंबे सूर्यमंडळ । अविद्या नाशितां अविद्यामूळ । उपाधि नासे न मिळे प्रलयीं प्रकृतीतें ।। ३१ ।। अविद्या आहे ज्यांची । प्रलयीं प्रकृतीतें बुद्धि त्यांची । मिळे ते सृष्टिकाळीं प्रकटतां जीवाची । जीवदशा मागुतीं प्रगटते ।। ३२ ।। त्यांस भूतें शरीरें । आत्मा वाटती चराचरें । ह्मणोनि त्यांस एकसरें । सकट भूतें ह्मणे श्रीकृष्ण ।। ३३ ।। आतां क्रममुक्ति ज्यांला । प्रलयकाळीं ब्रह्मयासह मोक्ष त्याला । परि अविद्यानिवृत्ति करूनि असे जाला । ब्रह्मात्मबोध ।। ३४ ।। जीवोपाधि ब्रह्मयाचा । ब्रह्मीं मिळे तैसाच त्यांचा । प्रकृतींत न मिळे ज्यांला साचा । आत्मा उपाधि मृषा ज-

डावेगळा विदित ॥ ३५ ॥ एवं च अज्ञानयुक्त उरले । ते प्रकृतीतें पावले । तेंचि येथें बोलिले । सर्व भूतें ह्मणोनी ॥ ३६ ॥ कल्पक्षयीं प्रकृतीतें मिळ-ती । त्यांस कल्पादिकाळीं ह्मणे जगत्पती । मी निर्मितों कीं मातें पावती । निर्मित नसें तयां हा भाव ॥ ३७ ॥ ह्मणतां कल्पक्षय सूचवी महाप्रलय । कल्पादि शब्दें मायेचा उदय । तो प्रथम सृष्टिकाळ ॥ ३८ ॥ कल्प शब्दें ब्रह्मयाचा दिवस । ह्मणोनि दिनप्रलय दिनसृष्टि यास । ह्मणों नये कीं सर्व शब्दार्थरस । वायां जातो या अर्थें ॥ ३९ ॥ होतां महाप्रलय । तोही ब्रह्मयाचा समाप्तिदिन होय । आणि मायेचा जो उदय । तो प्रथम दिवस कल्पाचा ॥ ७४० ॥ ऐसा करावा अर्थ । अन्यथा सर्व शब्द होतो व्यर्थ । आणि अष्टमीं दिनकल्प लय उदय पार्थ । सांगतां समजला त्याचीही पुनरु-क्ती ॥ ४१ ॥ आणि लोकत्रयाचाच क्षय । होय होतां दिनप्रलय । सर्वांही भूतांचा लय उदय । तो नव्हे हें सर्व शब्दें अति स्पष्ट ॥ ४२ ॥ एवं प्रकृती-तें पावती । त्यातें पुन्हा निर्मितों ह्मणे श्रीपती । यावरून मातें पावतां न परतती । सूचवी हें समाधान ॥ ४३ ॥ आतां यानंतर श्लोक । तो कां बो-ले उत्तमश्लोक । त्याचें निमित्त सुज्ञ लोक । परिसोत आदीं ॥ ४४ ॥ पूर्व-श्लोकीं भगवंतें । ऐसें बोलिलें कीं सर्वभूतें । कल्पक्षयीं प्रकृतीतें पावती त्यां-तें । मी कल्पादिकाळीं निर्मितों ॥ ४५ ॥ लय पावती प्रकृतींत । आणि मी निर्मितों ह्मणतो भगवंत । कीं सत्ता तेथें निश्चित । ईश्वरत्व बोलावें ॥ ४६ ॥ कीं शूर भांडोनि गड घेती । रायें गड घेतला ह्मणती । या भावें ह्मणे जगत्पती । मी निर्मितों ह्मणोनी ॥ ४७ ॥ तथापि अकर्ता आपण । सृ-ष्टि स्थिति संहार हा प्रकृतिगुण । अधिष्ठान आपण निर्गुण । हे समस्त विवर्त मायाप्रकृति माझी तीचे ॥ ४८ ॥ तथापि ते सत्ताहीन । आपण तीचें अधिष्ठान । जेथें सत्ता तेथें ईश्वरत्व अर्जुन । समजे ऐसें बो-लतो या श्लोकीं ॥ ४९ ॥

॥ श्लोक ॥ प्रकृतिं स्वामवष्टभ्य विसृजामि पुनः पुनः ।
भूतग्राममिमं कृत्स्नमवशं प्रकृतेर्वशात् ॥ ८॥

॥ टीका ॥ अगा आपली प्रकृती । अधिष्ठूनि तीतें मी जगत्पती । पुनः पुनः हा भूताचा ग्राम ये रीती । मी निर्मितों ॥७५०॥ प्रकृति अधिष्ठूनि नि-र्मितों ह्मणे । तों अर्जुनास खूण बाणे । विवर्तातें अधिष्ठी अधिष्ठान हें जाणे पात्र भगवत्कृपेचें ॥ ५१ ॥ रज्जु अधिष्ठी सर्पातें । शुक्ति अधिष्ठिते रुप्यातें । तंतु अधिष्ठी पटातें । घटातें मृत्तिका ॥ ५२ ॥ हे कार्यरूपिणी

प्रकृती । सूचवी मायाधिपती । प्रलयावसानीं जगत्पती । योगनिद्रा करी तेव्हां हे नसे ॥ ५३ रज्जूवरी सर्प दिसे । तेव्हां कीं द्रष्टा असे । कर्तयाविण न भासे । पट तंतूत घट मृत्तिकेंत ॥ ५४ ॥ जे प्रलयकाळीं नव्हती । ते सृष्टिकाळीं कोठोनि आली प्रकृती । या गोष्टीच्या समाधानार्थ मायापती । " प्रकृतिं स्वां " ह्मणतसे ॥ ५५ ॥ कीं ते कारणरूपिणी । अगम्यत्वें तेव्हां होती निर्गुणीं । मध्यान्ह टळतां किरणीं । जैसा असे जळभास ॥ ५६ ॥ वृक्षाचें पत्र पुष्प फळ पडे । तें अन्यत्र कोठें तरी सांपडे । मध्यान्ह टळतां कोणीकडे । जलाभास गेला ह्मणावा ॥ ५७ ॥ जरी ह्मणावा [illegible] जाला । तरी दुसरे दिनीं कैंचा आला । ह्मणावा आणीक उपजला । तरी नाश पूर्विल्याचा देखिला कोठें ॥ ५८ ॥ एवं जळाभास कालचा । ह्मणावा प्रश्न हाचि साचा । परि प्रातःकाळीं भास त्याचा । लेशाही मध्यान्हापूर्वी दिसेना ॥ ५९ ॥ तेव्हां किरणरूपें किरणीं । होतें ह्मणावें तें मृषा पाणीं । तैसी प्रकृति निर्गुणरूपें निर्गुणीं । सृष्टिकाळापूर्वी होती ह्मणावी॥६०॥तेव्हां ते ह्मणों ये स्वप्रकृती । "प्रकृतिं स्वामधिष्टाय" ह्मणोनि मायाधिपती । ह्मणे आणि तीतें अधिष्ठानीं मागुती । सृष्टिकाळीं निर्मितों भूतांतें ह्मणतसे ॥६१॥ एवं प्रकृतिपुरुष एक । हें सूचवी उत्तमश्लोक । प्रकृतिपुरुषव्यतिरेक । तो एकत्वकळाया अन्वयें गुरु बोले ॥ ६२ ॥ एवं वाईट ते अविद्या । बरी सर्वथा ते ब्रह्मात्मविद्या । ऐक्यही न सोसे गुरुवराद्या । प्रलयादिकीं ज्या ऐक्यांत अविद्या वसतसे ॥६३॥ ह्मणोनि मी देह । हा देहीं आत्मतेनें स्नेह । अविद्याजनित न तुटे संदेह । जडचैतन्यऐक्याचा ॥ ६४ ॥ ऐक्य जडचैतन्याचें । अन्वय ब्रह्मविद्येनें घडे तें साचें । अहंकारें देहा प्रतिबिंबाचें । ऐक्य तें ऐक्य ह्मणों नये ॥ ६५ ॥ ते अहंकाररूपें ग्रंथी । जडचैतन्यास हे [illegible] । प्रसिद्ध असे मोक्षपंथीं । ते गांठी पहिली छेदावी ॥ ६६ ॥ त[illegible] [illegible] त्रिगुण । तेही प्रलयीं निर्गुणीं निर्गुण । त्यांतही " प्रकृतिं स्वामधिष्ठाय " ह्मणतां खूण । कारण प्रकृतीची सूचवी ॥ ६७ ॥ ते अकस्मात प्रगटे निर्गुणीं । जळभास जैसा किरणीं । हे अनादि स्वशक्ति ऐसें चक्रपाणी । पुनः पुनः निर्मितो ह्मणतां सूचवी ॥ ६८ ॥ कीं प्रतिदिनीं जलभास किरणीं । प्रतिसृष्टिकालीं माया निर्गुणीं । पुनः पुनः ह्मणोनि चक्रपाणी । प्रतिदिन मृगजळदृष्टांतें सूचवी ॥ ६९ ॥ कीं सृष्टीह्मनि पूर्वकाळीं श्रुती । कांहींच नव्हतें ह्मणती । येथें भेदवादी बोलती । कीं ते काळीं कांहीं नव्हतें ह्मणतां असे तो काळ ॥ ७७० ॥ तरी तें प्रलयशेष ब्रह्मच काळ । [illegible] मिथ्या

द्वैतकाळाचाही नसे विसाळ । म्हणूनि पुनः पुनः निर्मितों म्हणे मेघनीळ । दृष्टांत दिनदिनीं मृगजळाचा सूचवी ॥ ७१ ॥ सृष्टीहून पूर्वी निर्गुण । तेंचि काळ ऐसी खूण । ऋग्वेदीं श्रुतिमुखें ब्रह्म सगुण । बोलतसे ॥ ७२ ॥ " नासदासीन्नोसदासीत्तदानीं " म्हणोनी । हे श्रुति म्हणे त्या काळीं कांहीं नव्हतें यावरूनी । ब्रह्मचि तो काळ हें ' तदानीं ' । शब्देंकरूनी श्रुति बोले ॥ ७३ ॥ जरी ब्रह्मीं ते काळीं कांहीं । श्रुति म्हणती नाहीं । तरी ब्रह्म एक आणि काळही । दुसरा एक सिद्ध होतो ॥ ७४ ॥ मागुती त्याहूनि अन्य कांहीं । पुढें श्रुति म्हणे नाहीं । तों म्हणतां पूर्वोक्त मागुतीही । काळच हा अर्थ सिद्ध असे ॥ ७५ ॥ " तस्माद्धान्यन्नरः किंचनास " । हे श्रुति शेवटीं तच्छब्दें त्यास । जो ' तदानीं म्हणोनि बोलिला त्याच काळास । सूचवोनि म्हणे त्यावेगळें अन्य नसे ॥ ७६ ॥ एवं अखंड काळ ब्रह्म निर्गुण । तेथें कालशक्ति माया त्रिगुण । प्रगटे सृष्टिस्थितिसंहारखूण । कालत्रयाची तीकारितां ॥ ७७ ॥ ऐसे द्विविध काळ असती । पुढिलिया अध्यायांतही जगत्पती । सांगेल सांगतां विभूती । द्विविधकाळ तेथें ॥७८॥ "कालः कलयतामहं " म्हणोनी । " अहमेवाक्षयः कालः " म्हणेल मागुती यावरोनी । क्षयरूप अक्षयरूप काळ दोनी । सूचवील पुढें स्पष्टार्थही होणार ॥ ७९ ॥ एवं काळही नव्हे कारण । ब्रह्मीं प्रकृतीचें होतां चलन । ती करूनि द्रष्टा सगुण । सृष्टि निर्माण कारितसे तो सृष्टिकाळ ॥७८० ॥ मिथ्या होऊनि मृगजळ । नव्हे जैसा रज्जूवरील व्याळ । कीं टळतां मध्यान्हकाळ । द्रष्टा असे मृगजळ दिसेना ॥ ८१ ॥ जेव्हां द्रष्टा पाहे । तेव्हां रज्जूवरी सर्प आहे । द्रष्टा पाहे तरी न राहे । मृगजळ टळतां मध्यान्ह ॥८२ ॥ द्रष्टा पाहे तरी जेव्हां न दिसे । तेव्हां द्रष्टा न पाहे तरी असे । प्रतिसृष्टिकाळीं ऐसे । ब्रह्मीं लय उदय मायेचे ॥ ८३ ॥ माया प्रगटे प्रथम । तिच्या योगें सगुण होय ब्रह्म । तेधवां द्रष्टृत्वधर्म । आणि इच्छा सृष्टीची तेधवां ॥ ८४ ॥ तेव्हां अधिष्ठूनि ते प्रकृती । स्वयें अधिष्ठान तिचें जगत्पती । सृष्टीकरितां उत्पन्न होती । भूतें स्थावर जंगमे ॥ ८५ ॥ जिव्हेनेंच जिव्हा म्हणे । तो जिव्हेस आपणासही द्रष्टा जाणे । जिव्हा आपणास त्यास दोहींसही नेणे । मायेनें ईश्वर द्रष्टा मायेचा ये रीती ॥ ८६ ॥ मायेनेंच मायेस आपणास पाहे । तीमाजूनि निर्धर्म जो आहे । तो निर्गुणीं निर्गुणच होऊनि राहे । सृष्टिकाळापूर्वी कारणीं आपल्या ॥ ८७ ॥ एवं बीजांत वृक्ष वसे । ऐसी सृष्टीहूनि पूर्वी प्रकृती असे । तें जडकारण तिचेंहि कार्य दिसे ।

वृक्षबीजांतूनि उपजे जे रीती ॥८८॥ तें ब्रह्मीं ऐसी कीं किरणीं जैसें जळ । कीं ब्रह्मरज्जूंत ते जैसा व्याळ । कीं सागरीं जैसे कल्लोळ । तैसें कार्य हें विश्व ब्रह्मीं त्याकारण प्रकृतीचें ॥ ८९ ॥ "प्रकृतिं स्वामधिष्ठाय" ह्मणोनी । प्रकृति भिन्न नसे ऐसें स्वशब्दें करोनी । सूचवी कीं कार्य कारणावस्था दोनी । प्रकृतीच्या मज वेगळ्या नसती हा भाव ॥ ७९० ॥ ये रीती हा भूतग्राम । पुनः पुनः निर्मितों ह्मणे घनश्याम । नाना रूप नाना नाम। सकळ भूतग्राम मी निर्मितों ॥ ९१ ॥ प्रतिबिंब जीवांश त्यासहित । स्थावर अथवा जंगम शरीर तें भूत । त्यांचा ग्राम समुदाय ह्मणे भगवंत । पुनः पुनः ये रीती निर्मितों ॥ ९२ ॥ निर्मितों प्रकृतीतें अधिष्ठूनी । आणि पुनः पुनः ह्मणोनी । सचवी या दों गोष्टींकरोनी । अनादित्व प्रकृतीचें ॥ ९३ ॥ आतां प्रकृति पुनः पुनः प्रगटते । तरी तेच प्रगटो भूतसृष्टि कां होते । शंका ऐसी ये स्थळीं येते । ते चतुर्थचरणीं परिहरतो ॥ ९४ ॥

॥ चतुर्थचरण ॥ अवशं प्रकृतेर्वशात् ॥ ॥ टीका ॥ अगा जो दुसरिया एकास वश । स्वतंत्रपण नसे लेश । तयास ह्मणाव अवश । तरी अवश भूतग्राम हा ॥ ९५ ॥ कीं स्ववश असतां स्वतंत्र । तरी न उपजतां भूतग्राम हा विचित्र । तरी कोणास वश ज्यास्तव परतंत्र । भूतग्राम हा जरी ह्मणसी ॥ ९६ ॥ तरी अर्जुना हे अनादि प्रकृती । जे तुज सांगतों प्रस्तुतीं । वश भूतें तीतें असती । अवश भूतग्राम यास्तव ॥ ९७ ॥ वश भूतें प्रकृतीतें । ह्मणोनि पुनः पुनः होती भूतें । मी अधिष्ठूनि तीतें । निर्मित असें ॥९८॥ अधिष्ठुनि निर्मितों ह्मणे । यांत आपलें अकर्तृत्व बाणे । पुनः सत्ता तेथें कर्तृत्व हेंही जाणे । स्वभक्त ऐसें बोलिला या श्लोकीं ॥ ९९ ॥ हें आयके धनंजय । तो मागुता सशंक होय । कीं जीवाचिया कर्मीही हाचि निश्चय । कीं प्रकृति अधिष्ठूनीच करिती जीवही॥८००॥ जीवत्वींही चिदंशातें । कर्तृत्व ऐसेंच येतें । तथापि बंधक होतें । कर्म तें ॥ १ ॥ जरी न कळे तरी चिदात्मा अकर्ता । प्रकृति करी स्वयें तो नव्हे कर्ता । तथापि जीवांस बंध ऐसी वार्ता । आयकावी याचियाही अकर्तेपणाची ॥ २ ॥ या शंकेचा परिहार । करावया सर्वेश्वर । बोलतसे यानंतर । स्ववैराग्यसूचक श्लोक हा॥३॥

॥ श्लोक ॥ न च मां तानि कर्माणि निबध्नंति धनंजय ।
उदासीनवदासीनमसक्तं तेषु कर्मसु ॥ ९ ॥

॥ टीका ॥ अगा धनंजया तींही । कर्में न बाधती मातें कांहीं । कीं मी आसक्त होत नाहीं । त्या कर्मांच्या ठायीं कदापि ॥ ४ ॥ एक कर्ता एक

पारखा । उगा उदासीन असे त्यासारिखा । मी उदासीन असतों सखा । तुजसारखिया भक्ताचा ॥ ५ ॥ धनंजया ह्मणोनी । ये स्थळीं या नांवें करूनी । आळवी सूचवोनी । अर्थ ऐसा ॥ ६ ॥ कीं ह्मणतां उदासीन । ह्मणी घाबिरा होय अर्जुन । ह्मणोनि सूचवी भाव गहन । कीं तूं तरी अगा धनंजय ॥ ७ ॥ मी सर्वत्र उदासीन । परि आकिंचनाच्या मंथींचें धन । धनलोभी धन करी जतन । प्रेमपाशें ऐसें मज ते बांधती ॥ ८ ॥ प्रेम तेथें मी वसें । धन अकिंचनाचें मी असें । तो रथीं सारथी होऊनि वैसे । घोडे तुझे हांकित ॥ ९ ॥ मज ऐशा आकिंचनाच्या धना । तुवां जिंकिलें अर्जुना । कीं तुजसारखिया आणिका सधना । लभ्य सर्वथा मी नव्हें ॥८१०॥ जें अलभ्य लभ्य जालें । तें त्याणें ह्मणावें जिंकिलें । एवं धनंजय ह्मणतां या बोलें । मजचि जिंकिलें तुवां हें सूचवी ॥ ११ ॥ भाव हा कीं उदासीन । मी होय परि जे भक्तजन । त्यांच्या ठायीं मी जगज्जीवन । उदासीन नव्हे सर्वथा ॥१२॥ " ये यथा मां प्रपद्यंते " । या श्लोकीं हे गोष्टी साधते । उदासीनताही जतन होते । भजती तैसा भजतों या स्वभावें ॥ १३ ॥ " ये यथा मां प्रपद्यंते" या श्लोकें करोनी ।"तां तथैव भजाम्यहं" ह्मणोनी । चतुर्थाध्यायांत सिद्धांत जाला यावरोनी । उदासीन परि भजनानुरूप फळ देतों ॥ १४ ॥ प्रस्तुतीं माझ्या पायीं आसक्त मन । त्यावरी मी नव्हें उदासीन । ह्मणोनि तुवां जिंकिलें धन । अकिंचनाचें धनंजया ॥ १५ ॥ भक्तावेगळा अन्यत्र । आपण उदासीन सर्वत्र । ह्मणोनि हें सूचवूनि ह्मणे कमलनेत्र । धनंजया मी उदासीनें ह्मणोनी ॥ १६ ॥ एवं जीवत्वींही चित्स्वरूपीं । कर्तृत्व न लागे तथापी । वासना त्याची पापी । असे त्यांच्या बुद्धींत ॥ १७ ॥ बंध मोक्ष दोनी । उपाधीच्या शिरीं ह्मणोनी । अहंकर्तृत्वाभिमानीं । बुद्धि जीवांची करी जीवांस कर्मबद्ध ॥ १८ ॥ जीवोपाधीस अज्ञान । ह्मणोनी वासनायुक्त त्याचें मन । जीवा तया विना विषयचिंतन । प्रवृत्ति कर्मीं घडेना ॥ १९ ॥ करिती वासनेनें ऐसें । उदासीन ते ह्मणावे कैसें । रजतरूपें शुक्ति दिसे । ते रजतार्थी रजतीं उदासीन कां होती ॥ ८२० ॥ विश्व विषयाकारें भासे । ते वासनाबद्ध नव्हती कैसे । अज्ञानें विषयासक्त ऐसे । वैराग्य कैचें तयांतें ॥ २१ ॥ जे वैराग्यहीन । ते कर्मीं नव्हती उदासीन । यालागीं कर्म करिती बंधन । जीवांसी ॥ २२ ॥ आपण नित्य विरक्त । ह्मणोनी सृष्टयादि कर्मीं नसे आसक्त । नित्य ज्ञानी मुक्त । उदासी-

---

१ कंगालाच्या, द्रव्यहीनाच्या.

ना सारिखा यालागीं ॥ २३ ॥ भगवच्छब्दीं वैराग्यगुण । तो भगवान्ष-ड्गुण । हे गोष्टी बोलतो आपण । भगवद्गीतेंत ॥ २४ ॥ एवं कृपाळू स्ववै-राग्यगुण । समजोन भजोत भक्त निपुण । ह्मणोनि या प्रसंगसंगतीनें आपण वैराग्यगुण । आपला येथें बोलतो ॥ २५ ॥ कीं वैराग्यगुणयुक्त । सम-जोनि भजती भक्त । तेही होती विरक्त । हें चतुर्थाध्यायांत बोलिला ॥२६॥ चतुर्थाध्यायश्लोक ॥ न मां कर्माणि लिंपंति न मे कर्मफले स्पृहा । इति मां योभि जानाति कर्मभिर्न स बध्यते ॥ टीका ॥ ॥ हे मार्गेंचि पूर्ण जाली । प्रस्तुत गोष्टी ऐसी आली । कीं वैराग्यगुणपूर्वक उपासना केली । तरी वैराग्यलभ्य होय त्यातें ॥ २७ ॥ यास प्रमाण हा चतुर्थाध्यायश्लोक । येथें ह्मणे उत्तमश्लोक । कीं मज नव्हे कर्म बंधक । कर्मीं स्पृहा नसे ह्मणोनी ॥ २८ ॥ स्पृहा कर्मीं नसे यास्तव । मातें कर्में न लिंपती ह्मणे देवाधिदेव । ऐसा आपला गुण जाणे मानव । तोही कर्मीं नव्हे बद्ध ह्मणतसे ॥ २९ ॥ एवं वैराग्यगुण जाणे । त्या भगवदुपासकासही वैराग्य बाणे । या चतुर्थाध्यायश्लोकांत ह्मणे । उत्तरार्धीं ऐसें भगवंत ॥८३० ॥ मज कर्मीं नसे स्पृहा । जो जाणतो माझा वैराग्यगुण हा । तोही निस्पृह होतां त्या फलनिस्पृहा । कर्मबंध नव्हे हा अर्थ ॥ ३१ ॥ तोचि वैराग्यगुण । या नवमाध्यायांत नवमश्लोकीं सगुण । श्रीकृष्ण बोलतो येथें खूण । पहावी जे या चतुर्थाध्यायश्लोकीं उत्तरार्धीं ॥ ३२ ॥ ऐसेच षड्गुण । समजोनि भजे ब्रह्म सगुण । षड्गुणांश लाभे तोचि निपुण । भगवत्पदातें पावतो ॥३३॥ प्रसंग बोलिला गुण । त्या प्रसं-गाची हे खूण । कीं जीवत्वींही आत्मा निर्गुण । परि कर्मबंध त्यातें कर्में होतसे ॥३४॥ तरी ईश्वरासही असेल बंध । त्याच्या परिहारार्थ हा नवम पद्यप्रबंध । कीं मी उदासीन ह्मणोनी गंध । न लागे मातें कर्मबंधाचा ॥ ३५ ॥ त्या कर्मांचीं कळें जरी । मी इच्छितों आसक्त होतों तरी । मजही बंध होता परी । अनादिवैराग्यगुणें नसे मज बंध ॥ ३६ ॥ मी अनादि विरक्त । ह्मणोनि त्या कर्मीं नसे आसक्त । जीवही कर्मबंधापासूनि मुक्त । होती फलासक्ति टाकितां हा भाव ॥ ३७ ॥ आतां यानंतर श्लोक । तो कां बोले उत्तमश्लोक । त्याचें निमित्त सुज्ञलोक । परिसोत आदीं ॥ ३८ ॥ चित्स्व-रूपीं कर्तृता । जीवासही नसे तरी बंधवार्ता । असेचि तैसी अकर्तृता । अ-सेल ईश्वराची ही ॥ ३९ ॥ ऐशिये शंकेचें स्थळ । देखोनि परिहरिता जाला मेघनीळ । कीं मी विरक्त उदासीनासारिखा केवळ । ह्मणोनि मातें न बाधती कर्में ॥ ८४० ॥ कर्मीं आसक्त न होणें । आणि उदासीनासारिखें

असणें । हाही गुणधर्म कीं निर्गुणपणें । ऐसा आपण ऐसें न ह्मणावें ॥ ४१ ॥ ज्यास हा वैराग्यगुण । त्यास ह्मणवेना निर्गुण । आणि प्रकृतीचें तों अधिष्ठानपण । निर्गुणातें ॥ ४२ ॥ तेव्हां जगाचें उपादानकारण । ब्रह्म तें ह्मणावें निर्गुण । जयासि हे वैराग्यादि गुण । जगत्कारण न ह्मणवे तयातें ॥ ४३ ॥ येथें संशय ये रीती । उपजेल हें जाणे जगत्पती । ह्मणोनि मी सगुण जो मायाधिपती । तोचि जगत्कारण ह्मणतसे या श्लोकीं ॥ ४४ ॥

॥ श्लोक ॥ मयाध्यक्षेण प्रकृतिः सूयते सचराचरम् ।
हेतुनानेन कौंतेय जगद्विपरिवर्तते ॥ १० ॥

॥ टीका ॥ अगा मी अध्यक्ष मायेचा धनी । अध्यक्षता न घडे निर्गुणीं । युक्त होऊनि तिच्या सत्त्वगुणीं । धनी तिचा मी होतसें ॥ ४५ ॥ आणि मज अध्यक्षाच्याच योगें करोनी । प्रकृति चराचरसहित लोक तीनी । प्रसवे ते स्वयें प्रसवों न शके ह्मणोनी । मी सगुणत्वींही कुंतीसुता जगत्कारण ॥ ४६ ॥ या हेतूकरोनी । जग विविध होऊनी । वर्ततसे ह्मणोनी । कुंतीसुता मी सगुणत्वींही जगत्कारण ॥ ४७ ॥ कौंतेय ह्मणजे कुंतीसुत । या नांवें गहनभावें आळवी भगवंत । कीं जननीपासूनि पुत्र उपजतो निश्चित । परि ते प्रसवते स्वपतीच्या हेतूकरोनी ॥ ४८ ॥ पति ह्मणावा केव्हां । कीं वाईल करील जेव्हां । तिच्याच योगें तेव्हां । पति तिचा ॥ ४९ ॥ ते जेव्हां वाईल जाली । त्यास पति ह्मणों लागली । आणि त्याच करिता व्याली । विविध संतान ॥ ८५० ॥ येथें कुंतीसुता कौंतेया । ह्मणे हा अर्थ सुचवावया । कीं प्रकृतियोगेंच धनंजया । अध्यक्ष मी प्रकृतीचा ॥ ५१ ॥ आणि माझ्याच सत्तेंकरूनी । प्रसवते चराचर ह्मणोनी । कौंतेया ह्मणतां यावरूनी । सूचवी हा अर्थ ॥ ५२ ॥ याचा ऐसा विचार । कीं ब्रह्ममायायोगेंच ईश्वर । तीपासूनि होतें चराचर । परि संकल्पें त्याचि सर्वज्ञाचिया ॥ ५३ ॥ तिच्या योगेंचि तीतें । ईश्वर प्रवर्तवी प्रकृतीतें । प्रजांचे धनें प्रजांतें । वर्तवी जैसा भूपती ॥ ५४ ॥ प्रजांपासोनि घेऊनि धन । त्या धनें ठेवोनि सेवक जन । प्रजा वर्तवी करी शासन । ऐसा प्रकृतिगुणें प्रकृति गुणातें वर्तवी ॥ ५५ ॥ लोखंड पिटायाचें साधनं । लोखंडाचाच चिमटा अरणी घन । तैसा प्रकृतीतें वर्तवी जगज्जीवन । त्याच प्रकृतीकरूनी ॥ ५६ ॥ एवं प्रकृतीचे भाग दोनी । एक ब्रह्म आपण ह्मणोनी । या अखंड प्रत्ययें करूनी । निर्गुणीं सगुणत्व ॥ ५७ ॥ हा ईश्वर प्रत्यय । जो अविच्छिन्न अखंडानंदमय । सृष्टयादि शक्तीचा उदय ।

त्यापासूनि आणि लयही तयाच सगुणांत ॥ ५८ ॥ कीं तो लयकाळही सरे । तेव्हां अभाव साक्षित्व स्फुरे । कांहीं उरलें नाहीं ऐसें स्मरे । उपाधि ब्रह्मात्मप्रत्यय ईश्वराचा ॥ ५९ ॥ तेही माया पावे लय । तो योगनिद्रा-समय । पुन्हा ब्रह्म आपण ह्मणोनि उदय । प्रथम त्याच मायांशाचा ॥ ८६० ॥ तेथें ब्रह्म निर्गुण आपण । इतकेंचि मात्र स्फुरण । त्या स्फुरणीं सर्वज्ञपण । भूतभविष्यस्मरणरूप प्रगटतें ॥ ६१ ॥ ब्रह्म आपण ऐसें अखंड जाणे । तेंचि मायायोगें ब्रह्मीं ईश्वरत्व बाणे । तेंचि माया मी माया ह्मणे । ब्रह्म-योगें ते शक्ति परदेवता शाक्तांची ॥ ६२ ॥ ब्रह्मात्मत्वाचें स्फुरण । तेथेंही वृत्ति माया आणि चैतन्य निर्गुण । मी माया येथेंही वृत्ति मायागुण । प्र-काशक तेंचि चैतन्य निर्गुण ॥ ६३ ॥ प्रथम स्फुरे ब्रह्म आपण । तो ईश्व-र तें ब्रह्म सगुण । माया मी ह्मणवोनि दुसरें स्फुरण । ते प्रकृति तो ईश्वर तिचा अध्यक्ष ॥ ६४ ॥ ईश्वरांशीं सर्वज्ञपण । मायांशीं जड सृष्ट्यादि-काच स्फुरण । ते त्या अधीन ब्रह्म जो सगुण । आपण ब्रह्म ह्मणे मायांशें करोनी ॥ ६५ ॥ तो ती करोनी जे सृष्टी करी । ते होणारच तीपासूनि परी । त्यावांचोनि तिच्या कुसरी । न प्रगटती तिच्या स्वसामर्थ्यें ॥ ६६ ॥ दुग्धांत असे घृत । त्याच पासोनि उपजे तें निश्चित । परि तावीं विरजी मथी तदुचित । क्रिया जाणणार कारण त्या घृताचें ॥ ६७ ॥ अथवा जैसा लोहार । लोहाचेच करितो नानाकार । परि घडमोडीसाधनप्रकार । या लोहाचेचि सर्व ॥ ६८ ॥ लोहाचे सर्व आकार । लोहाचपासूनि उपजती ते प्रकार । तथापि लोहसाधनें युक्तचि लोहार । कारण ह्मणावा ॥ ६९ ॥ लोहाचपासोनि होती नग । मायेचपासोनि होतें जग । ते लोहारा-कारणाकरितांच परि योग । लोहसाधनाचा त्यापाशीं ॥ ८७० ॥ या लागीं ह्मणे श्रीपती । कीं चराचर प्रसवे तेच प्रकृती । परि मायायोगेंचि अध्यक्ष मी मायाधिपती । त्या मजकरितां ह्मणे कीं तें प्रसवतें ॥ ७१ ॥ एवं जगत्कारण निर्गुण । तेंचि आपण ह्मणोनि ज्यास वाटे तो सगुण । तो सर्व जाणे ह्मणोनि जगाचें द्विविधही कारण । ईश्वर ह्मणावा ॥ ७२ ॥ घ-टास कारण माती । घटास सोडीना ये रीती । ब्रह्म सर्वत्र सर्वभूतीं । उपा-दान कारण तें ह्मणावें ॥ ७३ ॥ तें निखळ निर्गुण । परि तेंचि मायांशें जाणे । कीं ब्रह्म आपण । हा अखंडानुभव तें सगुण । सगुणचि उपादान कारण ये रीती ॥ ७४ ॥ घटीं सबाह्य माती । तैसें जगीं ब्रह्म तें आपण ये रीती । अनुभव ज्याचा तो मायाधिपती । उपादान कारण जगाचें कां तो

नव्हे ॥ ७५ ॥ आणि घटास कारण कुंभार । जो घडी घटाचा आकार । तो निमित्तकारण तैसा सर्वेश्वर । तोचि निमित्तकारण सर्वज्ञ ॥ ७६ ॥ भूत भविष्य जाणे सुजाण । जीव कर्मानुरूप भूतें करी निर्माण । दोहींपरी कुंतीसुता जाण । मी जगत्कारण ह्मणे या श्लोकीं ॥ ७७ ॥ राजविद्याविवरण । तें षट्श्लोकप्रकरण । तेथें आपणातें न पावतां जन्ममरण । पावती ह्मणून बोलिला ॥ ७८ ॥ तों संशयाचें देखिलें स्थळ । कीं सृष्टीहूनि पूर्वीं ब्रह्मचि केवळ । तेव्हां ब्रह्मचि पावले सकळ । तरी पावले तेही परतती संसारीं ॥ ७९ ॥ याच्या परिहाराकारणें । सृष्टिप्रलयप्रकरण लागलें बोलणें । तेथेंही नरास नारायणें । सूत्रप्राय बहुविस्तार सूचविला ॥८८० ॥ संक्षेपें सविस्तर । अर्थ सूचवी सर्वेश्वर । श्रीकृष्णकृपापात्र चतुर । विस्तार तितका समजला ॥ ८१ ॥ अन्यथा शब्द तों थोडे निपट । सृष्टिप्रलयाची बहुत खटपट । आणि अर्जुन जोडोनि अंजलिपुट । पुढें ह्मणेल विस्तारें ऐकिलें ह्मणोनी ॥ ८२ ॥ विश्वरूपदर्शनार्थ । प्रार्थील पुढें जेथें पार्थ । तेथें ह्मणेल कीं विस्तार म्यां यथार्थ । सृष्टि प्रलय तुजपासूनी ऐकिले ॥ ८३॥ विश्वरूपाध्यायश्लोक ॥ भवाप्ययौ हि भूतानां श्रुतौ विस्तरशो मया । त्वत्तः कमलपत्राक्ष माहात्म्यमपि चाव्ययम् ॥ ॥ टीका ॥ पुढें होणार याची । प्रस्तुत उपयोगीं ते हे गोष्टी साची । कीं सृष्टिप्रलय विस्तारें ह्मणे सव्यसाची । तुजपासोनि म्यां ऐकिले दोनी ॥ ८४ ॥ एवं च गीता सूचवी पदोपदीं विस्तार । परि तो बोलतां ग्रंथ वाढेल फार । ह्मणोनि संक्षेपरूप विचार । बहुत विस्तार बोलावा त्याचा बोलिजेतो ॥ ८५ ॥ हा विस्तार वाचितील सज्जन । त्यांचें तृप्त नव्हेच मन । ते प्रतिपदीं करितील नमन । त्याच सर्वेश्वरातें ॥ ८६ ॥ तृप्ति नव्हे पीतां अमृत । ये रीती हें ऐकतील वाचितील संत । परि जे व्यासंगी आणि परमार्थीही रत । संक्षेपेंचि मथितार्थ प्रिय तयां ॥ ८७ ॥ ते ऐसें ह्मणतील कीं । पदें थोडीं असोनि श्लोकीं । विस्तारें अर्थरचना इतकी । कां वाढवावी ।। ८८ ॥ तरी सृष्टीप्रलय । अतिसंक्षेपें बोले अव्यय । तें ऐकोनि ह्मणे धनंजय । सृष्टि प्रलय विस्तारें ऐकिलें ह्मणोनी ॥ ८९ ॥ तेव्हां अर्थी जे भावार्थ । ते समजला पार्थ । तरी विस्तारें ऐकिलें ह्मणे यथार्थ । एवं गहन भावार्थ गीतेचे ॥ ८९० ॥ येथें सृष्टिप्रलयविचार । बोलावे करून अतिविस्तार । परि ग्रंथ वाढेल फार । ह्मणोनि संक्षेपें वर्णिलें ॥ ९१ ॥ त्यांत जीं जीं संशयाचीं स्थळें । त्यांचें समाधान मेघनीळें । सूचविलें तैसें कृपाबळें । त्याच्या वा-

ह्मणितलें संक्षिप्त ॥ ९२ ॥ एवं उपादानकारण निमित्तकारण । दोनी जगाचीं स्वयें सगुण । ऐसें या श्लोकीं नारायण । नरावतार अर्जुनातें उपदेशी ॥ ९३ ॥ ऐसा सर्वोत्कृष्ट सर्वेश्वर । तो करावया जीवांचा उद्धार । निमित्त करोनी भूभार । अवतरला भूतळीं ॥ ९४ ॥ कामें तरल्या गोपांगना । भय द्वेषें तारिलें कंसशिशुपालादिदुर्जनां । सारथ्यपणें अर्जुना । गीतोपदेशें जो तारी ॥ ९५ ॥ सकळ जनांचा उद्धार । हा परमात्मा करणार । परंतु दाटोनी जे बुडणार । ते ऐसे ॥ ९६ ॥ कीं दुर्योधनादि मूढ जन । न करिती त्याचें भजन । जो स्वयें परमात्मा भवभंजन । मनुष्य मानिती तयाला ॥ ९७ ॥ पांडुकुमर भीष्म विदुर । हे जाणती कीं हा सर्वेश्वर । दैवी संपत्तीचे पुरुष चतुर । इत्यादि भजती ॥ ९८ ॥ आसुरीसंपत्तीचे नर । ते महिमा न जाणती पामर । ह्मणोनि दोनी संपत्तींचे पुरुष सर्वेश्वर । बोलेल आतां ॥ ९९ ॥ त्यांत आसुरीसंपत्तीचे पुरुष । आपणावरी ठेविती दोष । तो प्रसंग परमपुरुष । बोलतसे याश्लोकीं ॥ १०० ॥

॥ श्लोक ॥ अवजानंति मां मूढा मानुषीं तनुमाश्रितम् ।
परं भावमजानंतो मम भूतमहेश्वरम् ॥ ११ ॥

॥ टीका ॥ अगा जे कां मूढमती । ते मातें अवमानिती । कीं मनुष्यतनूची आकृती । तिचा आश्रय म्यां केला ॥ १ ॥ ह्मणोनि माझा अवमान । करिती ते मूढ जन । थोरास नीचियासमान । मानणें अपमान तो हाचि ॥ २ ॥ मूढां तुच्छांस शक्ति किती । कां ते अपमान थोरांचा करूं शकती । त्यांस नीच्यासमान मानिती । हाच अपमान ॥ ३ ॥ थोरपण ठेवोनि गूढ । फिरे त्यास नीच मानिती मूढ । त्याचें श्रेष्ठत्व जाणती प्रौढ । ते गूढपणीं तो भाव त्याचा आठविती ॥ ४ ॥ एवं जो माझा परमभाव । कीं मी सर्वभूतांचा महेश्वर देवाधिदेव । तो माझा भाव ह्मणिजे तें माझें अभिनव । रूप ते मूढ नेणती भूतांचे ईश्वर । ब्रह्मादि देव ज्यांच्या हातीं चराचर । त्यांहीहूनि समर्थ तो महेश्वर । मीच एक सर्वां भूतांचा ॥ ५ ॥ माझा तो भाव नेणोनी । हाही एक आह्मांसारिखा ह्मणोनी । मानिती मनुष्यतनुभाव माझा हा देखोनी । अवमानिती मातें ॥ ६ ॥ एवं द्विविधही जगाचें कारण । तो मी अवतरलों नारायण । हा परमभाव नेणोनि जे अवलक्षण । ते मूढ मनुष्यभावें अवमानिती हा अर्थ ॥ ७ ॥ येथें शंकला अर्जुन । कीं दुर्योधनादिक दुर्जन । यांचिया विवेकाचे नयन । कां झांकिले ॥ ८ ॥ आतां ते ह्मणावे

मूढ । तरी आम्हीही नेणों याचें ऐश्वर्य गूढ । परि नारदव्यासादि सर्वज्ञ प्रौढ । जाणों त्यांच्या मुखें ऐकोनी ॥ ९ ॥ ऐसें हेही जाणती । मागुती मनुष्यच यास म्हणती । कां जाली ऐसी नेणती । बुद्धि यांची ॥ १० ॥ उद्योगपर्वीं थोर थोर मुनी । दुर्योधनातें हा सर्वेश्वर म्हणोनी । नाना आख्यानें करोनी । विशद अत्यंत बोलिले ॥ ११ ॥ धृतराष्ट्र साक्षात्कारें बापि । तो दुर्योधनातें याचा महेश्वरत्वप्रताप । सांगे म्हणे अपजय आणि महत्पाप । आज्ञा या सर्वेश्वराची मोडितां ॥१२॥ आइके इत्यादि गोष्टी । [illegible]रूप सभेस देखे दृष्टी । जेव्हां धरावा कृष्ण म्हणोनि दुष्टीं । विचार केला ॥ १३ ॥ कर्ण दुःशासन दुर्योधन शकुनी । हें दुष्ट चतुष्टय मिळोनी । कृष्णास बांधितां पांडव जिंकिले म्हणोनी । विचार करूनि चारे मांडिले ॥१४॥ तेव्हां सभेंत सर्वत्र । मागें पुढें कृष्ण कमलनेत्र । धृतराष्ट्रास देऊनि दिव्य नेत्र । दाखवी आणि दुर्योधनादिकांहीं ॥ १५ ॥ ऐसें जयांस कळे । कां त्यांची बुद्धि न वळे । मनुष्यरूप देखोनि खवळे । मनुष्य हाही म्हणोनी ॥ १६ ॥ ऐसी अर्जुनाची शंका । तत्काळ कळली शेषपर्यंका । याचें निमित्तही श्रीवत्सांका । बोलणें लागलें ॥ १७ ॥ यावरोनि या वेगळेही नर । वेद शास्त्र पुराणें वाचूनिहि पामर । अवतारमहिमा समजोनिही आदर । न धरिती अवताररूपीं ईश्वराच्या ॥ १८ ॥ तेही ऐसेच रीती । श्रद्धा कळत कळत न धरिती । हें किमर्थ तरी यांचें त्यांचें जगत्पती । वृत्त मिसळोन सांगतो या श्लोकीं ॥ १९ ॥

॥ श्लोक ॥ मोघाशा मोघकर्माणो मोघज्ञाना विचेतसः ।
राक्षसीमासुरीं चैव प्रकृतिं मोहिनीं श्रिताः ॥ १२ ॥

॥ टीका ॥ अगा बरें वाईट दोहींचें निमित्त । केवळ हें आपुलें चित्त । [illegible] विपरीत होतां वृत्त । व्यर्थ होतें सर्वही॥९२०॥आशा जयाची व्यर्थ । कीं प्रारब्धीं नाहीं तो पुरुषार्थ । आपणास होऊ म्हणोनि तदर्थ । मज टाकोनि भजती क्षुद्रदेवतातें ॥ २१ ॥ आणि जें प्रारब्धीं असे । तें यथाकाळें फळ दिसे । तदर्थ काम्यकर्म केलें तें बैसे । पुढें वज्रलेप बंधन करोनी ॥ २२ ॥ धनमानसंतानाकारणें सेवा । करोनी भजतो क्षुद्रदेवा । नसे प्रारब्धीं तेधवां । आशा होते ते व्यर्थ ॥ २३ ॥ प्रारब्धानुरूप कपाळीं । होणार होतें त्याकाळीं । जालें आणि या काम्यें पाडिला जाळीं । बंधाचिया ॥२४॥ येच जन्मीं मज संतान । हो म्हणोनि करी भजन । तें पुढें जालें बंधन

१ पोरखेळ. २ लहान.

दोहीं परी ॥ २५ ॥ ये जन्मीं नव्हे परी । फळ होईल जन्मांतरीं । आशा व्यर्थ नव्हे ह्मणावी यापरी । तरी खरीच गोष्टी हेही ॥२६॥ परंतु सूकरादियोनी । जन्मांतरीं मज हो ह्मणोनी । ये रीती तों त्याच्या मनीं । नव्हती आशा सर्वथा ॥ २७ ॥ वहु काळ नांदो ह्मणोनी । प्रवेशला स्थिर मुहूर्तें करोनी । तों शृंखळा पायीं त्या सदनीं । पडली शाश्वत बहु काळ ॥ २८ ॥ त्या स्थिरा मुहूर्ताची । फळसिद्धि तों जालीच साची । परि आशा नव्हती याची । ऐसें व्हावें ह्मणोनी ॥ २९ ॥ प्रयत्नें देवता भजोनी । न मागे सूकरादि योनी । अथवा जन्मांतरीं फळ हो ह्मणोनी । हेंहो न मागे ॥ ९३० ॥ एवं च देवताभजन । करी इच्छी धन मान संतान । तें प्रारब्धानुरूप होतां सेवन । ह्मणावें काय त्या देवांचें ॥ ३१ ॥ त्या देवें हें दीधलें । ह्मणोनी याला जरी वाटलें । तें याचें यास लभ्य होतां जालें । व्यर्थ भजन त्या देवाचें ॥३२॥ यास न कळे हा अर्थ । तथापि आशेतें तो गोंवे व्यर्थ । याचा यास सांपडला पदार्थ । त्याची आशा वृथाचि ते जाली ॥३३॥ हें रहस्य जन नेणे । त्यापासोनि आशा फळली ह्मणे । परंतु साक्षी सर्वज्ञ जाणे । तो ह्मणे मोघाशा ह्मणोनी ॥ ३४ ॥ प्रारब्धीं फळ नसे । ते मोघाशा तों त्यासही दिसे । जन्मांतरीं फळाचे फांसे । गळां पडती आशा वृथा करूनियां ॥ ३५ ॥ आतां पुढिले जन्मींच होयाचें फळ । ह्मणोनि आशा धरिली केवळ । तों पूर्वसंचित त्याहूनिही प्रबळ । जन्म शतही फळ तें न पावे ॥ ३६ ॥ तेही मोघाशाच तेव्हां मागुतीं । कीं देव न दे जें जे काळीं मागती । अथवा सूकरादि अधमा गती । पावोनि तें फळ जन्मांतरींच पावेल ॥३७॥ पुढिले जन्मीं क्षत्रिय । होईन ह्मणोनि धरिला आशय । देवताभजनीं दृढनिश्चय । तपस्वी मोठा ॥ ३८ ॥ आणि कृत्तिका नक्षत्रीं कार्त्तिकमासीं । स्वामिदर्शनही घडलें होतें तयासी । सप्तजन्म विप्रजन्मासी । जाणें तया ॥ ३९ ॥ क्षत्रियत्व देतें देवताभजन । व्यर्थ तेव्हां स्वामिदर्शन । विप्र वेदपारग सधन । होतां देवताभजन तें व्यर्थ ॥९४०॥ तो मातापितृश्राद्धें चुकला । तेव्हां कोटि जन्म चांडाळ जाला । दोहीं गतींतें विलंब लागला । व्यर्थ आशा दोहींची ॥ ४१ ॥ याचे पूर्वपक्ष सिद्धांत । विशद बोलतां ग्रंथ वाढेल अत्यंत । एवं टाकोनि भगवंत । ऐसे जे क्षुद्रदेवता भजती ॥ ४२ ॥ युगांतरीं यागादि कर्में केलीं । पुत्रादि फळें तत्काळ जालीं । तीं पूर्वपुण्येंच फळा आलीं । हें पुढें फळ होणार

१ गोप्य. २ व्यर्थ आशा.

॥ ४३ ॥ कांहीं न करी याहुनी । काम्यकर्ता बरा ह्मणोनी । जैसें तैसें काम्यकर्मीं जनीं । प्रवर्तावें तात्पर्य शास्त्रकाराचें ॥ ४४ ॥ ते तत्काळ फळ बोलती । तत्काळ फळें जालीं ऐसेंही ह्मणती । जन्मांतरावांचूनि फळ नाहीं जाणती । तरी रुचि दाविती जनप्रवृत्तिनिमित्त ॥ ४५ ॥ बीजाचा होय तरुवर । फळ तेव्हां हें प्रत्यक्ष गोचर । कर्माचें फळ विना जन्मांतर । नव्हे सर्वथा ॥ ४६ ॥ हे मूढाकारणें प्रवृत्ती । शास्त्र बोले कीं जे मोक्षमार्ग न जाणती । ते मुक्तिप्रदा[1] मुकुंदा कां भजती । प्रस्तुतीं कळत इतर देवता भजती प्रसंग त्यांचा ॥ ४७ ॥ कीं ते मोघाशा[2] ह्मणावे । सकामदेवतांतर उपासक गणावे । मोघकर्म ह्मणतां आणीकही जाणावे । निष्काम या वेगळे दोंपरी ॥ ४८ ॥ एक टाकोनि कामना । निष्काम देवतांतरोपासना[3] । कर्म करिती मोक्षार्थ तों होईना । एका मुकुंदावांचूनी ॥ ४९ ॥ एक उगीच निष्कामकर्में । करिती वर्णाश्रमोक्त धर्में । तृतीयाध्यायांत बोलिलें त्या नेमें । विष्णुचरणीं न अर्पिती ॥ ५५० ॥ " यज्ञार्थात्कर्मणोन्यत्र " । या श्लोकीं बोलिला कमलनेत्र । कीं विष्णूस न अर्पितां कर्ममात्र । बंध करी ह्मणोनी ॥ ५१ ॥ नव्हे मोक्ष न चुके बंध । निष्काम कर्मेंही होय फळसंबंध । न लागे बंधाचा गंध । कर्म अर्पितां भगवंतीं ॥ ५२ ॥ चुकोनि तें वर्म । निष्काम अनुष्ठिती स्वधर्म । त्याणें बंधचि होतां कर्म । व्यर्थ जालें ॥ ५३ ॥ कीं ज्याकारणें केलें । तें जेव्हां नाहीं होऊनि आलें । तें व्यर्थ ह्मणावें जालें । मोघकर्में इत्यादि ॥ ५४ ॥ आतां मोघज्ञान । त्यांत दों प्रकारींचे जन । एक वेदश्रद्धाहीन । एक वेदाश्रित ॥ ५५ ॥ चार्वाक बौद्ध इत्यादि । यांस श्रद्धा नसे वेदीं । जे वेदप्रमाण आणि भेदवादी । भेद त्यांचे त्यात कितीएक ॥ ५६ ॥ कोणी इतर देवताभजन । करिती आणि अद्वैतही बोलती जन । मोघ त्यांचेंही ज्ञान । कीं अपरोक्ष न फळे तयांतें ॥ ५७ ॥ शब्दज्ञानीच ते होती । कळली जरी आत्मानात्मविवेकरीती । न बाणे स्वरूपसाक्षात्कारस्थिती । भगवत्प्रसादावांचुनी ॥ ५८ ॥ श्रीमद्भागवतीं वारंवार । बोलिला असे हा प्रकार । न बाणे अपरोक्षसाक्षात्कार । साकार भगद्भजनावांचुनी ॥ ५९ ॥ श्रीकृष्ण देवकीच्या उदरीं । ब्रह्मादि देवीं स्तविला नाना परी । तेथें ब्रह्मा आणि शंकरवैखरी । बोले ऐसें या श्लोकीं ॥५६०॥ ॥ भागवतश्लोक ॥ सत्त्वं न चेद्धातरिदं निजं भवेद्विज्ञानमज्ञानभिदापमार्जनम् ॥ गुणप्रकाशैरनुमीयते भवान्प्रकाशते यस्य च येन वा-

---

१ मुक्तिदेणाऱ्या. २ व्यर्थ आशा. ३ अन्यदेवतांची.

गुणः ॥ ॥ टीका ॥ शुद्धसत्त्वें अवतार । देवा तूं करितोसि हा विचार । बोलतां ब्रह्मा आणि शंकर । अग्रगण्य देवांत हे वदती ॥ ६१ ॥ कीं हें निजसत्त्व तुझें हरी । प्रगट न होय रामकृष्णादि रूपें जरी । अज्ञाननाशक विज्ञान तरी । नव्हे जनांतें जी देवा ॥ ६२ ॥ कीं श्रवण कीर्तन । तुझ्या गुणांचें चिंतन । आणि सत्त्वमूर्तीचें भजन । न करितां मन निर्मळ न होय ॥ ६३ ॥ निर्मळ न होतां मन । नव्हे साक्षात्कार अनुभवज्ञान । तेव्हां न नासे अज्ञान । हा विचार मार्गें पुढें तेंचि वदले ॥ ६४ ॥ या भावें ह्मणती या श्लोकीं हरी । सत्त्व तुझें न अवतरे जरी । अज्ञाननाशक विज्ञान तरी । नव्हे कधीं ॥ ६५ ॥ आतां आपणास आपण । न जाणणें हें अज्ञानाचें लक्षण । आणि जड प्रकाशक आत्मपण । कळणें ज्ञान हें ॥ ६६ ॥ यास सत्त्वमूर्ती अवतार । कां लागले ह्मणावे तेव्हां हा विचार । व्यर्थ होतो ह्मणोन हा पूर्वपक्षप्रकार । परिहरिती ब्रह्मा आणि सदाशिव ॥ ६७ ॥ कीं जडतत्त्वें भेद तिहीं गुणांचें । स्वयें यातें प्रकाश कैंचे । ऐसें असोनि प्रकाश यांचे । दिसती ज्या करितां तो आत्मा स्वप्रकाश ॥ ६८ ॥ ऐसें जड आणि जडप्रकाशक ज्ञान । हें नव्हे अपरोक्ष हा अनुमान । साक्षात्कार तेव्हां कीं मन । तन्मय होऊनि पाहे तयातें ॥ ६९ ॥ ज्याचा जो गुण । तो त्या वेगळा ह्मणती निपुण । माझें त्याचें ह्मणावें तें तों आपण । नव्हे सर्वथा ॥ ९७० ॥ प्रस्तुतीं अनुमानरीतीं । आत्मा जडावेगळा दाविती । ज्याचा गुण ज्याकरितां ह्मणती । प्रकाशक तो ह्मणोनी ॥ ७१ ॥ जो आत्मयातें विचारितो । त्याचा देहादि गुण ज्याणें प्रकाशतो । तो त्यास आपला आत्मा ह्मणतो । हाही तर्क ॥ ७२ ॥ बुद्धि मन देह इंद्रियगण । इत्यादि जो जो ज्याचा गुण । तो ज्याणें प्रकाशतो तो आत्मा हे खूण । कळली तरी हा तर्क ॥ ७३ ॥ तो आत्मा असता वेगळा । तरी तर्कही दिसता निराळा । वाटते साक्षात्कारकळा । तो आत्मा आपणाचि ह्मणोनी ॥ ७४ ॥ परि नव्हे हा साक्षात्कार । कीं बुद्धि न जाली तदाकार । शब्दज्ञानी हा आत्मविचार । साक्षात्कार मानिती ॥ ७५ ॥ एवं प्रकाशी जो जड गुण । कळली तया आत्मयाची खूण । तरी सत्त्ववृत्ति तन्मयपण । न पावे तर्कचि तोंवरी तो ॥ ७६ ॥ गातां आइकतां अवतारगुण । ध्यातां शुद्धसत्त्वमूर्ति सगुण । सत्त्ववृत्ति चिन्मयपण । पावे तेव्हां साक्षात्कार तो ॥ ७७ ॥ एवं मुक्तिप्रद हरी । उपासना त्याची न करी । आणि आत्मस्थिति शब्दें बोले जरी । तरी मोघज्ञान तो ह्मणावा ॥ ७८ ॥ कर्मा-

र्पणप्रसंग संगतीं । आणि ऐसेंचि भागवतीं । शुक ह्मणे परिक्षितीप्रती । या श्लोकीं ॥ ७९ ॥ भागवतश्लोक ॥ नैष्कर्म्यमप्यच्युतभाववर्जितं न शोभते ज्ञानमलं निरंजनम् । कुतः पुनः शश्वदभद्रमीश्वरे न चार्पितं कर्म यदप्यकारणम् ॥ ॥ टीका ॥ कर्मातीत नैष्कर्म्यज्ञान । जें अतिशयें निर्मळ निरंजन । तेंही अच्युतभक्तिहीन । न शोभे कीं न पावे साक्षात्कारातें ॥ ९८० ॥ तेव्हां कर्म अमंगळ । जें सर्वथा बंधक ओंगळ । तें निष्काम ही नव्हे मंगळ । जें न अर्पिलें ईश्वरीं ॥ ८१ ॥ एवं भगवद्भक्तिहीन । ह्मणावें व्यर्थचि तें ज्ञान । कीं न पावे शांति समाधान । भगवद्भक्तीवांचुनी ॥ ८२ ॥ आतां निर्गुणोपासक । भगवद्भक्तीवांचूनिही कित्येक । पावले ज्ञानाचा परिपाक । ते तों मोघज्ञानी न ह्मणवती ॥ ८३ ॥ येथें शंका ऐसी मानील जरी मन । तरी त्यांस पूर्वी होतें भगवद्भजन । सर्वथा जे भगवद्भजनहीन । प्रसंग येथें तयांचा ॥ ८४ ॥ राजा करी भूमिदान । तैसें भगवंतें दिधलें ज्ञान । भूदान घेऊनि सोडी राजसन्निधान । तरी प्रयत्नें पिकेलचि ते भूमी ॥ ८५ ॥ तैसें ज्ञान जालियावरी । सगुण भजन न लगे ह्मणती परी । सगुण भजनें पूर्वीच बरी । वृद्धि जाली तयां निर्गुणोपासकांची॥८६॥ सकाम आणि निष्कामही जे सर्वेश्वर । न भजती सर्वथा आणि देवता इतर । भजती आणि ज्ञानमार्गीहि चतुर । व्यर्थ तें ज्ञान त्यांचें हा अर्थ ॥ ८७ ॥ प्रस्तुत " विचेतसः " ह्मणोनि । पूर्वार्धी शेवटीं या पदें करूनी । सर्वत्र हेतु सूचवूनी । अभक्त ऐसें बोलिला ॥८८ ॥ तों अर्जुन ह्मणे मनीं । यातें न भजतां अनर्थ ऐसें ह्मणोनी । हींही शास्त्रें ऋषि बोलती यावरूनी । सद्बुद्धि न धरिती किमर्थ ॥ ८९ ॥ या शंकेचा परिहार । कीं नैसर्गिक[1] ज्याचे दुष्ट संस्कार । त्याच्या कानीं हाकलती ऋषि शास्त्रकार । तरी ते अधोमुखघटीं वृष्टि होतसे ॥ ९९० ॥ अनेक जन्मकर्मानुसार । दृढतर जोडला जो संस्कार । तो नैसर्गिक ह्मणती शास्त्रकार । बरा हो अथवा वाईट ॥ ९१ ॥ त्यांत उत्तम संस्कारस्थिती । त्यास ह्मणती दैवी प्रकृती । अधम नैसर्गिकास ह्मणती । आसुरी ह्मणोनी ॥ ९२ ॥ तिये आसुरीचे भेद तीनी ॥ राक्षसी आसुरी मोहिनी ह्मणोनी । जे बोलिले पूर्वश्लोकें करोनी । आश्रय प्रकृतित्रयाचाही तयांसी ॥ ९३ ॥ सर्वथा हिंसाकारांची हे प्रकृती । राक्षसी प्रकृति ईस ह्मणती । कीं असुरांत मनुष्य भक्षिती । तेचि ह्मणावे राक्षस ॥ ९४ ॥ दैत्य आणि दानव । हे असुर परि मानव । केवळ विषयासक्त भाव । बु-

---

१ स्वभावता.

द्वीचा तयांच्या ॥ ९५ ॥ असुर शब्दीं अक्षरें तीनी । त्यांत असु अक्षरें दोनी । रकार तिसरा वेगळा करूनी । अर्थ विचारितां हा अर्थ ॥९६॥ असु ह्मणिजे इंद्रियें । र ह्मणिजे रमणें निश्चयें । इंद्रियद्वारा विषयासक्त अत्यंत स्वयें । असुर ते भगवद्भक्तिरहित जे ॥९७॥ देवही विषयासक्त । परंतु सर्वेश्वराचे भक्त । क्षण न लगतां होती विरक्त । प्रतापें भगवद्भक्तीच्या ॥ ९८ ॥ असुर ते जे भगवद्भक्तिरहित । सर्वथा विवेकज्ञानवर्जित । ह्मणोनि मोहिनीप्रकृतिसहित । तिहीं प्रकृतींचे आश्रित अभक्त ते ॥ ९९ ॥ भगवद्भक्तिवर्जित । ते भूतदयारहित । या भावें राक्षसी प्रकृतींचे आश्रित । तेचि ह्मणतो श्रीकृष्ण ॥१०००॥ अन्यायें विषय सेविती । तेचि सर्वथा परपीडा करिती । ह्मणोनि आसुरी प्रकृती । राक्षसी प्रकृति पुढें त्यांची बोलिली ॥ १ ॥ बरें वाईट युक्तायुक्त कळे । तरी शास्त्रें सत्संगें सन्मार्गीं वळे । मोहिनी प्रकृति अधिक खवळे । सांगों जातां विवेक ॥ २ ॥ करावें न करावें हा विवेक । याच्या विपरीत भाव मोह अविवेक । ऐसा संस्कार नैसर्गिक । मोहिनी प्रकृति ते ह्मणावी ॥ ३ ॥ ऐसिया तिहीं प्रकृतींचे आश्रित भगवद्भक्तिवर्जित । मोघाशा मोघकर्में मोघज्ञानें निश्चित । त्यांचीं कीं विषयविक्षिप्तचित्तें ह्मणोनी ॥ ४ ॥ पूर्वश्लोकीं ह्मणे भगवंत । कीं मातें अवमानिती मूढ अत्यंत । ते ऐसे प्रकृतित्रय आश्रित । या श्लोकीं वर्णिले "विचेतसः" ह्मणोनी॥५॥या तिन्ही प्रकृती । तिन्ही मिळोनी आसुरी संपत्ति । याचा विस्तार यदुपती । षोडशाध्यायांत बोलेल ॥६॥ तेथें ह्मणेल अर्जुना । तूं शोक ह्मणीं लागों देशी मना । कीं तूं दैवी संपत्तीचाच गा पांडुनंदना । न होसी आसुरी संपत्तीचा॥७॥कीं सांगतां आसुरी संपत्ती। त्यांतील कांहीं लक्षणें आपणाकडे लागती । ह्मणोन शंकित होईल अर्जुनाची मती । तरी तूं तैसा नव्हेसी ऐसें पुढें बोलेल ॥८ ॥ कीं गुणत्रयाच्या जाती । बहुतेक आसुरीच प्रकृती । परि जे भजती रमापती । ते सकळ दैवी प्रकृतीचेच हा सिद्धांत ॥ ९ ॥ अत एव पूर्वश्लोकीं अभक्तजन । जे बोलिला श्रीशेषशयन । ते राक्षसी आसुरी मोहिनी ह्मणोन । या श्लोकीं बोलिला ॥१०१० ॥ येथें संक्षेप प्रकार । षोडशीं याचा विस्तार । दैवी संपत्तीचा विचार । येथें बोलोनि तेथें बोलेल संक्षेपें ॥ ११ ॥ तेथें ह्मणेल जगत्पती । कीं विस्तारें मागें बोलिलों दैवी प्रकृती । आतां आसुरी संपत्ति तुजप्रती । विस्तारें सांगतों तें तूं आइक॥ १२ ॥ एवं अभक्त प्रसंग । बोलतां येथें ह्मणे श्रीरंग । कीं राक्षसी आसुरी मोहिनी प्रकृतींत अंतरंग । रंगलें त्याचें ॥ १३ ॥ संक्षेप इतकाच

बोलोनी । तयांचा विस्तार पुढें सांगणें ह्मणोनी । दैवी प्रकृतीचे स्वभक्त येथूनी सांगतो प्रथम त्यांत हा श्लोक ॥ १४ ॥

॥ श्लोक ॥ महात्मानस्तु मां पार्थ दैवीं प्रकृतिमाश्रिताः ।
भजंत्यनन्यमनसो ज्ञात्वा भूतादिमव्ययम् ॥ १३ ॥

॥ टीका ॥ पार्था महा थोर ज्यांचीं चित्तें । ते तों अवलंबूनि दैवी प्रकृतीतें । अनन्य मनें करूनि मातें । भजती तत्त्व माझें जाणुनी ॥१५॥ चित्त जयांचें थोर । महात्मे ह्मणावे ते नर । या शब्दें सूचवी सर्वेश्वर । गहन भाव ॥ १६ ॥ अभक्तांच्या प्रकृति तीनी । राक्षसी आसुरी मोहिनी । महात्म शब्दें विलक्षण त्याहुनी । दैवी प्रकृति याची सूचवी ॥ १७ ॥ कीं चित्त-त्यांचेंच थोर । शांति अखंड ज्यांसमोर । न करिती ऐसे दयाळू नर । परपीडा कदापि ॥ १८ ॥ पराचा अपराध सोशिती । ऐसा अवकाश असे ज्याचिया चित्तीं । अवकाश फार त्यास ह्मणती। थोर घर ह्मणोनी ॥ १९ ॥ यावरून न असे तयासी । हिंसा प्रकृती राक्षसी । कीं अन्याय विषयासक्ति जयासी । सर्वथा असेना ॥ १०२० ॥ जे न्यायमार्गें वर्तती । ते परपीडा किमर्थ करिती । यावरोनि आसुरी प्रकृती । नसे हेंही सूचवी ॥ २१ ॥ जे अत्यंत उदार । चित्त त्यांचें ह्मणावें थोर । स्पृहा नसणें हा प्रकार । उदारत्वाचा ॥ २२ ॥ स्पृहेंकरोनि युक्त मन । आणि वेंचितो धन । तें त्याचें स्पृहेचें साधन । न ह्मणावें औदार्य ॥ २३ ॥ स्पृहा धरोनि लाभाची । व्यवहारें उदंड धन वेंची । तेही काय तयाची । उदारता ह्मणावी ॥ २४ ॥ एवं नसे विषयस्पृहा । उदार ह्मणावें त्या निस्पृहा । जो उदार त्याचेंच चित्त महा । थोर ह्मणोनि जन ह्मणती ॥ २५ ॥ विषयनिस्पृह तों तोचि दिसे । कीं विवेक ज्ञान ज्यास असे । विवेक जेथें तेथें न वसे । मोह अविवेक जो ह्मणावा ॥ २६ ॥ मोह नसे ह्मणोनी । नसे ह्मणावी प्रकृति मोहिनी । एवं अभक्तांस ज्या प्रकृती तीनी । त्याहूनि विलक्षण प्रकृति यांची ॥२७॥अत एव जे महात्मे ऐसे ।ज्यांस दैवी प्रकृतीचाच आश्रय असे । माझिया भजनावांचूनि न वसे । चित्त अन्यत्र त्यांचें ह्मणे भगवंत ॥ २८ ॥ ह्मणोनि ज्यांचें अनन्य मन । मजवांचूनि अन्याचें न करिती भजन । पार्था मातेंच भजती ते जन । तत्त्व माझें जाणुनी ॥ २९ ॥ जाणोनि मातें भजती । ह्मणोनि ह्मणे जगत्पती । ज्ञानियास नलगे भजन ह्मणती । ते न जाणत बोलती सूचवी ऐसें ॥१०३०॥ जे जाणोनि निर्गुण । मग न भजती सगुण ।

---

१ इच्छा.

ते तों ह्मणावेच निपुण । क्लेश अधिक जरी तयांसी ॥ ३१ ॥ ते निर्गुण मात्र उपासिती । कीं निर्गुणींच दृढ लागली त्यांची प्रीती । परि सगुण भजोंच नये ये रीती । ते न बोलती अपसिद्धांत ॥ ३२ ॥ जे स्वयें शब्दज्ञानी। उगेच निर्गुण वादाचे अभिमानी । ते ज्ञानियास सगुण न लगे ह्मणोनी। वृथा पांडित्य मिरविती ॥ ३३ ॥ सगुणभक्त जे ज्ञानी । या गीतेंत बोलिले थोर ह्मणोनी । तेथें पांडित्य बळें ते भक्त अज्ञानी । ह्मणोनी वाखाणिती ॥३४॥ त्यांचें मत जगत्पती । निषेधी कीं जाणोनि मातें भजती । ते जाणती जे रीती । ते या चतुर्थ चरणीं बोलतो ॥३५॥ चतुर्थचरण ॥ ज्ञात्वा भूतादिमव्ययम् ॥ टीका ॥ आदि सकळां भूतांची । ते सत्य निर्गुणसत्ता साची । आदि सुवर्ण मुकुटादिकांची । आदि मृगजळा सूर्यकिरण ॥ ३६॥ मुकुटादि आकाराचा होतां व्यय । सोनें मागुती उरे अव्यय। तैसीं भूतें नाशतां उरे अद्वय । ब्रह्मप्रलयानंतर ॥ ३७ ॥ ऐसींचि घट जेथूनि उपजती । ते नाशतां उरे आदि त्याची माती । आणि घट जोंपर्यंत असती । तोंवरी प्रकाशती तेचि मृत्तिकेंकरूनी ॥ ३८ ॥ एवं जो आदि जो अंत । तोच मध्य त्याचा निश्चित । त्यांत सबाह्य आंत । एकचि कारण स्थितिकाळीं याचें ॥ ३९ ॥ एवं घटीं जेंवि माती । ये रीती भूतांची आदि सर्व भूतीं । जाणोनि भक्त मातें भजती । ह्मणे श्रीकृष्ण ॥१०४०॥ आतां ऐसें जाणोनि भजती । त्यांची कैसी भजनरीती । तें सांगतो जगत्पती । यानंतरांचिया श्लोकीं ॥ ४१ ॥

॥ श्लोक ॥ सततं कीर्तयंतो मां यतंतश्च दृढव्रताः ।
नमस्यंतश्च मां भक्त्या नित्ययुक्ता उपासते ॥ १४ ॥

॥ टीका ॥ अर्जुना पूर्वश्लोकोक्त । जे जाणोनि मातें भजती भक्त भक्तीकरून नित्ययुक्त । सर्वदा कीर्तिती मातें ॥ ४२ ॥ नित्ययुक्त भक्ति करूनी । आणि सर्वदा कीर्तन करिती ह्मणोनी । कीर्तन आणि प्रेम हेंही दोनी । अखंडत्वें सूचवी ॥ ४३ ॥ आणि आपणास कीर्तनाचा सोहळा । तो आठवला मेघनीळा । प्रेमें दाटला गळा । सविस्तर न बोलवे ॥ ४४ ॥ माझिया नामाचें कीर्तन । ह्मणावें तें ह्मणे कमलनयन । मातेंचि कीर्तिती ऐसें वचन । वाचेस आलें ॥ ४५ ॥ कीर्तनी भक्तांची प्रेमकळा । वदतां आपला सोहळा । बोलतां आला कळवळा । ह्मणे कीं सर्वेही काळ मातें कीर्तिती । ॥ ४६ ॥ आपणच आपलें नाम । ऐसें सूचवी घनश्याम । मातेंचि

---

१ उत्कट इच्छा.

कीर्तिती ते आत्माराम । ऐसें ह्मणे ॥ ४७ ॥ भक्तांकरून नित्य युक्त । आणि नित्य गाती मातें भक्त । यांत आपण नित्य विरक्त । तरी असो-सी कीर्तनाची सूचवी ॥ ४८ ॥ कीं प्रेमयुक्त सर्वदा । आणि सर्वदा गोविंदा मुकुंदा । अच्युता अनंता आनंदकंदा । ऐसे कीर्तिती मातें ॥ ४९ ॥ सर्वदा कीर्तन करिती । ह्मणतां सूचवी कीर्तनाच्या विविध रीती । कीं सर्वदा जरी गाती नाचती । प्रारब्धनिष्ठ शरीरधर्मही चालावे ॥१०५०॥ भोजनादि काळ । तेथें अयोग्य नृत्य मांदेळ ताल । याच्या जि-भेसी विटाळ । नव्हे नामविस्मरणाचा कदापि ॥५१ ॥ एवं च सर्वदा नाम वाचे । समयविशेषें गाय नाचे । जागृतींत जे भाव कीर्तनाचे । ते स्मर-ती स्वप्नींही हें सत्य ॥ ५२ ॥ जागरीं जिव्हा जैसी वळे । स्वप्नीं त्याच श-ब्दीं चळे । त्याची साक्षी कीं देहीं जिव्हा चावळे । रामकृष्ण गोविंद अच्युत इत्यादि ॥ ५३ ॥ जो रंगीं गाय नाचे । आणि सर्वदा नये नाम वाचे । ते विलास पोट भरायाचे । निष्टा नसे कीर्तनीं हेंही सतत शब्दें सूचवी ॥ ५४ ॥ तोही इतरांहूनि बरा । कीं फुलांचा करी विकरा । सर्वथा नामीं विमुख त्या खरा । उद्धार नाहीं ॥ ५५ ॥ निष्ठा कीर्तनीं असे । नाम त्याचे वाचे वसे । नामें उठे नामें बैसे । टेकळी जिव्हेस नामाची ॥ ५६ ॥ शिंकेसरिसें नाम । ढेंकरासरिसा राम । जांभईसरिसा मेघश्याम । वाचेस ह्मटे ॥ ५७ ॥ श्वासोश्वासीं भोजनीं । पसरितां पाटीं शयनीं । राम कृष्ण नारायण ह्मणोनी । निजेला उठे ॥ ५८ ॥ स्नान करितां हरि हरि । ह्मणो-नि गर्जे वैखरी । अशुचि ह्मणोनि न करी । नामास विमुख वाचेतें ॥ ५९ ॥ मलमूत्राचें विसर्जन । करितां झांकी नासिका वदन । तों ना-मप्रवाह जैसें नदीजीवन । तुंबे धरण बांधितां ॥ १०६० ॥ जल कोंडितां माघारें फेरे । तैसें मनीं नाम स्मरे । परंतु त्याही अशुचिकाळीं न विसरे । नाम जगन्निवासाचें ॥ ६१ ॥ एवं कीर्तनाच्या रीती । येथें सूचवी जगत्प-ती । जे भोजनादिकाळीं नाम वर्जिती । मुखभंग त्यांचा या सतत शब्दें ॥ ६२ ॥ अशुचि गंगा आतळे । स्नान पानें अशुचिता जळे । कोणी होऊ-नि सोंवळे । न करिती स्नान गंगेचें ॥ ६३ ॥ चरणांगुष्ठमात्र । स्पर्शि-ली ते गंगा करी परम पवित्र । नाम त्याचें सर्व गात्र । कोण महिमा वर्णी तयाचा ॥ ६४ ॥ पादांगुष्ठा स्पर्शिली परी । गंगा नव्हे आंगें हरी । नाम आणि मुरारी । दोन नसती ॥ ६५ ॥ तनू घट शब्दाची । मृत्तिका घटरू-

१ मृदंग. २ ढंर. ३ स्वच्छ नव्हे असी.

पिणीच साची । गंगा पावेल सरी नामाची । हें न घडे ॥ ६६ ॥ वेद ह्मणे-ती सर्वांहूनी । थोर नाम तुझें ह्मणोनी । पुत्रा नारायणा ह्मणतां ज्या नामें करोनी । मुक्ति अजामिळ पावला ॥ ६७ ॥ न कळतां अरण्यशाक । भक्षितां करोनी पाक । रोगी आरोग्य पावे हें कौतुक । सकळ देखती॥६८॥ न कळतांही नामप्रताप । वाचेस येतां नाशी पाप । न कळे बाळासि दीप । परि तम नाशितां अवलोकी मातेतें ॥ ६९ ॥ नामें अज्ञान नासे । नामें आत्मा प्रकाशे । पावले जीवन्मुक्तदशे । नामेंचि करूनी ॥१०७०॥ मेघश्याम जगज्जीवन । सर्वत्र वर्षे कृपाजीवन । परि पापझोंपडींत जे जन । बिंदु न पडे त्यांवरी ॥ ७१ ॥ वीज नामाची कडकडी । ते पडतां कैंची पापाची झोंपडी ॥ बारा वाटा होतां तेच घडी । शिरीं पडे कृपावृष्टि घननीळाची ॥७२॥ऐसा ज्या नामाचा प्रताप । तें अशुचि ह्मणतां ह्मणणें पाप । ओवळियानें गंगेचें ओप । शिवों नये ह्मणणें जे रीती ॥७३॥ जे हरिनामीं विमुख-पाहों नये त्यांचें मुख । त्यांस नाहीं स्वर्गसुख । मोक्ष तो नाहींच कीं तयांतें। ॥ ७४ ॥ नामें सांग होय कर्म । अंगहीन नामें सांग धर्म । नाम दृष्टांतें शब्द ब्रह्म । वेद पावले श्रेष्ठत्व ॥ ७५ ॥ नामासमान जें तें अक्षर । ह्मणो-नि नामें वेदांस बडिवार ।काशीसमान कोल्हापुर। पुराणें ह्मणती जे रीती ॥ ७६ ॥ विमुख हरिनामीं तया । न फळती सकळही सत्क्रिया । प्रायश्चि-त्तें जाती वायां । विमुख होतां हरिनामीं ॥ ७७ ॥ गंगादितीर्थमात्र । यद्यपि ह्मणावें पवित्र । परि न शुद्ध मद्यपात्र । नामविमुख प्रायश्चित्तें ये रीतीं ॥ ७८ ॥ नामावांचूनि सदाचार । ते सकळही । वेडेचार[1] पाय उचलोनि मूत्राची धार । निराळी सोडी श्वानही ॥ ७९ ॥ नामावांचोनि आंघोळी । त्या बेडुकाच्या बुड्या जळीं । जळीं सर्वदा असे मासोळी । दुर्गंध आंगीं अनिवार ॥ १०८० ॥ हरिनाम न ह्मणे वाचा । निराहार उपवास एकादशीचा । बाशिंग अलंकार मस्तकाचा । बांधिजे जे रीतीं पाठीसी ॥ ८१ ॥ अहोरात्र जागर उपवास। उपयोगी हरिनाम कीर्तनास । ह्मणोनि निद्राऽऽहार जनास । ऋषि ते दिवसीं वर्जिती ॥ ८२ ॥ हें स्पष्ट बो-लतां जन । कीर्तन करिती करोनि भोजन । ह्मणोनि करिते जाले शासन । उपवासाचें ॥ ८३ ॥ त्यांच्या मुखीं जें निघालें । तें सत्यच फळ होऊं लागलें । राजवर्जित कर्म केलें । तिहीं गमाविलें जीवित्व ॥ ८४ ॥ विशेषें एकादशी दिनीं । ऋषि ह्मणती करावीं दोनी । अहोरात्र जागरणीं । एवं

१ बरोबरी. २ उदक.

कीर्तनीं तात्पर्य ॥ ८५ ॥ उपवास करी निराहार । सोंकटीं खेळोनि जागर । तो नव्हे व्रताचा वडिवार । मुख्य हरिकीर्तन ऋषि बोलती ॥ ८६ ॥ सासूसुनांचें भांडण । घडला उपवास जागरण । तें पुण्य एकादशीचें कारण । जालें विमान जावया ॥ ८७ ॥ ह्मणोनि हरिकीर्तनाविण । निराहार आणि जागरण । करिती त्यांसही व्रतगुण । होय अमृतें अमरता जैसी [१]काकासी ॥ ८८ ॥ कावळा अमृत प्याला । वंश अवघा अमर जाला । ह्मणोनि अमृत मिळतां मानव भला ॥ न करी पान कावळा ह्मणोनी ॥ ८९॥ टाकोनी हरिकथामृत । निराहारी बसे जागत । फळ देईलही व्रत । परि नव्हे कृपापात्र देवाधिदेवाचें ॥ १०९० ॥ वाणीही मेळवी धन । धनचि मेळवी रायाचा प्रधान । परि तो रायासमान । [२]ग्राम्य तुच्छ धनिक हा ॥ ९१ ॥ क्षण निद्रा येतां दिवसा । भंग जाला उपवासा । हरिनामप्रताप नव्हे ऐसा । कीं नाम पूर्ण करी न्यूनातें ॥ ९२ ॥ व्रत सफळ नामें परम । विना नाम सकळ अंगहीन कर्म । एकादशी तों भागवतधर्म । नामावांचूनि [३]शव जैसें विनाप्राण ॥ ९३ ॥ एवं नामें सकळ काळ सफळ । त्यास वर्जिती भोजनादि काळ । ते नाममहिमा नेणती खळ । जाणती ते ऐसें न ह्मणती कदापि ॥ ९४ ॥ इत्यादि भावें सतत । ह्मणजे प्रेमें सर्वदा अत्यंत । कीर्तन करिती ह्मणिजे भगवंत । या श्लोकीं ॥ ९५ ॥ जे ऐसे त्यांची दैवी प्रकृती । एवं च याहूनि विपरीत ते असुरजाती । जे नामकीर्तनाचा महिमा निंदिती । ते असुर कीं विपरीत या प्रकृतीस प्रकृति त्यांची ॥ ९६ ॥ जे कर्ममात्र श्रेष्ठ ह्मणती । त्यांस स्पष्ट असुरांत ऋषि गणिती । आतां जे गीता भागवत वेदांत जाणती । आणि न भजती हरीतें ॥ ९७ ॥ ते ह्मणती पुराण वेद । [illegible] बोलती तो अर्थवाद । महत्त्व नसोनियांही महत्त्वाचा अनुवाद । अर्थवाद ह्मणती शास्त्रीं तयासी ॥ ९८ ॥ बडबड करिती ऐसी परी । दूषणास युक्ति न सांपडे खरी । प्रमाण नाहीं ह्मणावें तरी । पुराणें श्रुति स्मृतिही बोलती ॥९९॥ दूषण युक्तीकरोनि घडे । परंतु युक्ति बरी न सांपडे । मग ह्मणती ते वेडे । कीं संस्कार नामें कां न होती ॥ ११०० ॥ ह्मणती नाम थोर हा निर्वाह । तरी नामें न घडे कां मुंजी विवाह । तेथें लागे कर्मप्रवाह । हे कुयुक्ति ये स्थळीं बोलती ॥ १ ॥ या युक्तीचाही परिहार । येथें सूचवी सर्वेश्वर । सतत कीर्तन ह्मणतां जेव्हां प्रकार । करावा तेव्हां तो काळ ॥ २ ॥ स्नानकाल संध्याकाल । होमकाल पूजाकाल । मुंजीकाल वि-

---

१ कावळयास. २ गांवढळ हलकट हावाणी. ३ प्रेत.

वाइकाल । कर्मसंस्कारकाल सकळ आले ॥३॥ " यस्य स्मृत्या च नामोक्त्या " ह्मणोनी । नामें न्यून तितकें पूर्ण होतें या स्मृतीकरूनी । सर्वकर्मकाळीं नाम स्मरोनी । सफळ सर्व कर्मे करिती हें सूचवी ॥ ४ ॥ " ओम् तत्सदिति " निर्देश । त्रिविध निजनामें हृषीकेश । सप्तदशीं करील उपदेश । कर्म सफळ या नामें ह्मणोनी ॥५॥ " ओम् तत्सद्ब्रह्मार्पण " ह्मणोनी । उदक सोडिती सर्व कर्मे करूनी । कर्म सांग नामावांचूनी । सर्वथा नव्हे ॥ ६ ॥ जीवाकरितां देह सफल । तैसें नामें सफळ कर्म सकळ । अमंगळ देह जीवें मंगळ । तेवीं नामेंचि कर्म सुमंगळ॥७॥ तथापि नामेंचि केवळ । न होती संस्कार सकळ । तेव्हां नाममहिमा हा विफळ । कर्म थोर ते ह्मणती ॥ ८ ॥ तरी लक्षाचा मुकुट । पायीं बांधितां न चालवे वाट । पादरक्षा निकृष्ट निपट । पायीं घालितां कांटे न रुतती ॥ ९ ॥ जे कर्मसिद्धि पादरक्षेंकरोनी । ते नव्हे मुगुटें ह्मणोनी । मुकुट उणा पादरक्षेहूनी । हें काय घडे ॥१० ॥ मुकुट मस्तकींच घालावा । मार्ग पादरक्षेनेंच चालावा । नामें मोक्ष बोलावा । कर्मे वर्णाश्रम-संस्कार ॥ ११ ॥ कर्म वेदमंत्रें चाले । तरी नामेंही वेदवाणीच बोले । दोनी मार्ग प्रकट जाले । वेदाच पासूनी ॥ १२ ॥ संस्कार कर्मे बोलती श्रुती । मोक्ष नामें वेदचि बोलती । जनास दोनी प्रकार सांगती । अनादि वेद । ॥ १३ ॥ कन्या आणि दासी । श्वशुर दे जामातासी । नाम आणि कर्म दोनी जनांसी । वेदचि देती ये रीती ॥१४ ॥ क्षयरोग नाशी रसराज । त्या रसराजें नासे खाज । ह्मणोनि रसमहिमा वर्णितां लाज । वाटेल काय धन्वंतरियासी ॥ १५ ॥ नामें भगवत्प्रसादें कैवल्यानंद । संस्कार नव्हती ह्मणोनि वेद । भीती काय वर्णितां महिमा नामाचा ॥ १६ नाममहिमा नये कर्मातें । नये वर्णाश्रमत्वसिद्धि धर्मातें । नाम पाववी वैकुंठधामातें । कर्मे न चुके गर्भवास ॥ १७ ॥ लोहार शस्त्रें घडूं जाणे । तींच शस्त्रें शूर हाणे । तो शस्त्र घडूं नेणे । हाणों नेणे लोहार ॥ १८ ॥ तथापि शूर राजमान्य । लोहार सन्मानार्हही सामान्य । नामास भगवत्प्राप्तिप्राधान्य । गर्भवास कर्मे न चुकती ॥ १९ ॥ शूराकरितां सफळ । विद्या लोहाराची सकळ । तैसें कर्म सुमंगळ । नामाकरितां ॥ २० ॥ तथापि शस्त्रें न करी शूर । तीं घडितोचि लोहार । तैसे वर्णाश्रम संस्कार । न होती नामें ॥ २१ ॥ सफळचि शूरांच्या हातीं । लोहाराच्या विद्या सकळ होती । तैशा वर्णाश्रमादि सिद्धि साधती । नामप्रतापें कर्मांच्या ॥ २२ ॥ ह्मणोनी सर्व कर्मांचिया काळीं । मातें कीर्तिती ह्मणे वनमाळी । सतत शब्दें बुद्धि चाळी । सूचवूनि भाव

इत्यादि ॥ २३ ॥ कोणी ह्मणती कीं नाम थोर जरी । कर्म टाकाना कां तरी । त्यांस ह्मणावें कीं आरूढ हस्तीवरी । तो काय पायीं पादरक्षा घालीना ॥ २४ ॥ सांग नामनिष्ठाचेंचि कर्म । उत्तम नामनिष्ठाचाचि धर्म । ते यथाविधि कर्म करूनि वर्म । जाणती कीं नाम थोर ह्मणोनी ॥ २५ ॥ असो तें आतां ऐसा प्रथम चरण । बोले जगद्वंद्यचरण । आतां दुसरिया चरणाचें विवरण । प्रयत्नहीं करिती ते दृढव्रत ह्मणोनी ॥ २६ ॥ ह्मणोनि पूर्वचरणीं सतत । मातें कीर्तिती ह्मणे भगवंत । आणि पूर्वश्लोकीं भूतादि अव्यय अनंत । [illegible]नि मातें भजती बोलिला ॥ २७ ॥ तरी ज्यास जालें ज्ञान । त्यास अन्वयें सर्वत्र भगवद्दर्शन । व्यतिरेकें निखळ स्वरूपध्यान । याचें तों कीर्तनच वर्णिलें सर्वदा ॥ २८ ॥ तरी काय ज्ञानसमाधि टाकुनी । सर्वदा असतो नुसत्या कीर्तनीं । शंका ऐसी ह्मणोनी । "यतंतश्च दृढव्रताः" ह्मणतसे । ॥ २९ ॥ "यतंतश्च" ह्मणजे यत्नहीं करितीं । ह्मणजे यत्न करीतचि मातें कीर्तिती । "यतंतश्च" ह्मणतां चकारें श्रीपती । स्वरूपसमाधि दोनीही सूचवितो ॥ ११३० ॥ करणें स्वरूपाकार अंतःकरण । इतकेंचि यत्न शब्दाचें विवरण । त्यांत चित्स्वरूप तंतुस्फुरण । जडपटीं स्मरणें हा अन्वयसमाधी ॥ ३१ ॥ तरी मुखीं नाम अर्थीं दृष्टी । त्या ज्ञानदृष्टीस भगवद्रूपसृष्टी । पाहे गाय नाचे करी अमृतवृष्टी । जे आयकती तयांतें ॥३२॥ सर्वभूतीं वसे देव । तो ह्मणावा वासुदेव । नाम गातां देवाधिदेव । विश्वरूपें जो पाहे ॥ ३३ ॥ ह्मणे अच्युत अच्युत । देखे जड तरंगीं चित्सिंधु नाशरहित । ह्मणतां अनंत अनंत । देखे उरला आत्मा व्यापूनि जड सारें ॥ ३४ ॥ भगवान् भगवान् ह्मणतसे । तों भगवद्रूप हें प्रत्यक्ष दिसे । स्त्री रूप नटवेष जो भासे । ज्ञाता पाहे प्रत्ययाकडे तयाच्या ॥ ३५ ॥ आपण [illegible]तो स्त्रीवेष । हा स्त्रीवेषें असे मीच पुरुष । तैसा चराचररूपें अशेष । आपण असे हा प्रत्यय भगवंताचा भागवतांचाही ॥ ३६ ॥ कीं ज्या प्रकाशें चराचर ज्याला । प्रतीतीस येतो आत्माच आपला । ऐसा अन्वय समाधि बाणे तयाला । ज्ञानी भगवन्नामकीर्तन जो करी ॥३७॥ आतां देवकीनंदन । उचलितो गोवर्धन । गोवर्धनोद्धर कमलनयन । सगुण साकार नामें इत्यादि ॥ ३८ ॥ नामें उच्चारितां वाचे । मनीं स्फुरती अर्थ नामाचे । आविर्भाव त्या त्या रूपाचे । मनीं होती ॥ ३९ ॥ त्या त्या भगवद्रूपवृत्ती । स्वरूपसत्तेनें स्फुरती चित्तीं । पटीं तंतु घटीं माती ये रीती । आत्मसत्ता देखे त्या स्वरूपीं ॥ ११४० ॥ या रीतीचें कीर्तन । सूचवी जगज्जीवन ।

आतां करितां निर्गुणध्यान । शब्द माघारां परततो ॥ ४१ ॥ सुषुप्ति आणि निर्गुणध्यान । येथें नसे शब्दाचें ज्ञान । जों शब्द तों कीर्तन । निरर्थक नव्हे सतत शब्द ॥ ४२ ॥ शब्द असे जोंपर्यंत । तोंवरी कीर्तन अखंडित । कीर्तनावांचूनि कोणे काळीं निश्चित । शब्द वायां त्याचा नव जाय ॥४३॥ कीर्तन आणि यत्नही करिती । भगवंत ह्मणे ये रीती । आणि पूर्वश्लोकीं ह्मणे मातें भजती । जाणोनि भूतादि अन्वय ॥ ४४ ॥ तरी ज्ञानी आणि भक्तराव । त्यांच्या कीर्तनादिकांचा ऐसा भाव । आतां उरल्या नवविधाभक्ति देवाधिदेव । तृतीय चरणीं सूचवितो ॥ ४५ ॥ " नमस्यंतश्च " ह्मणे । चकाराचा अर्थ पार्थ जाणे । त्यास खूण ऐसी बाणे । कीं नवविधाभक्तीही बोलिला ॥ ४६ ॥ " नमस्यंतश्च " ह्मणे श्रीपती । कीं नमस्कारही मातें करिती । नवविधा भक्ति करून नमस्कारेंही भजती । नमस्कारही करिती या शब्दीं हा अर्थ ॥ ४७ ॥ उगेंच नमस्कार करिती ह्मणावें । तेथें नमस्कार करिती या भावें । नमस्कारही ह्मणतां जाणावें । कीं नवविधा भक्ति करूनही वंदिती ॥ ४८ ॥ प्रथम भक्ति श्रवण । कीर्तन न घडे श्रवणाविण । चरितश्रवण नसतां कवण । करूं शके कीर्तनातें ॥ ४९ ॥ एवं त्याचें वर्णितां कीर्तन । श्रवण स्मरण दोनी भक्ति कमलनयन । सूचवी कीं नाम स्मरेना जों मन । केंवी कीर्तन ते करितील ॥ ११५० ॥ एवं कीर्तनाहूनि पहिलें श्रवण । आणि कीर्तनकाळीं स्मरण । कीर्तन ह्मणतां विवरण । भक्तित्रयाचें ॥ ५१ ॥ सप्तमस्कंधीं भागवतीं । नवविधा भक्ति ज्या श्लोकीं असती । त्या पुढिलिया श्लोकीं दिसती । सफळ अर्पितां मुकुंदातें ॥ ५२ ॥ सप्तमस्कंधश्लोकद्वय ॥ श्रवणं कीर्तनं विष्णोः स्मरणं पादसेवनम् ॥ अर्चनं वंदनं दास्यं सख्यमात्मनिवेदनम् ॥ १ ॥ इति पुंसार्पिता विष्णोर्भक्तिश्चेन्नवलक्षणा ॥ क्रियते भगवच्छ्रद्धा तन्मन्ये धीतमुत्तमम् ॥ २ ॥ ॥ टीका ॥ यांत श्लोकें प्रथमें । नवविधा भक्तीचीं बोलिलीं नामें । दुसरिया श्लोकीं निष्कामें । अर्पितां भगवंतीं त्या भक्ति ह्मणाव्या हा अर्थ ॥५३॥ भक्ति करूनि भगवंतीं । अर्पी निष्काम तरीच भक्त ह्मणवती । एवं भक्तिसमर्पण प्रस्तुतीं । बोलणें असे ॥ ५४ ॥ बोले समर्पणाची रीति । "यस्य मृत्या" हे स्मृती । "सद्यो वंदे" ह्मणोनी वंदिती । भक्त कर्मे करून अच्युतातें ॥ ५५ ॥ एवं च नवविधा भक्ति करूनी । समर्पिती भक्त वंदूनी । प्रस्तुत "नमस्यंतश्च" ह्मणोनी । चकारें सर्व भक्ति येथें सूचविबो ॥ ५६ ॥ नमस्कारही करिती । ह्मणजे भक्ति करून वंदूनि अर्पिती । या कारणें दृढव्रत ते ह्मणे जगत्पती ।

कीं ढळणें नसे जयांतें ॥ ५७ ॥ भक्ति केली जैसी तैसी । ही बुद्धि नाहीं ज्यांपासीं । या भावें दृढव्रत ते ह्मणोनि ऐसी । वाणी चक्रपाणी बोलतो ॥ ५८ ॥ कीं श्रवणादि भक्ति करिती । आणि वंदूनि मातें अर्पिती । दृढव्रत ऐसें भजती । भक्तियुक्त हा भाव ॥ ५९ ॥ त्यांत एक भक्तींत दुसरी । भक्ति न घडे परी । कीर्तन सर्व भक्तींत घडतें ह्मणोनि हरी । कीर्तनींच बोले सतत शब्द ॥ ११६० ॥ कीं श्रवणकाळीं कथा । गोड लागतां चित्तीं सर्वथा । रामकृष्ण अनाथनाथा । उद्गार उदरांतुनि निघती नामाचे । ॥ ६१ ॥ श्रवणकाळीं मौन धरिती । भोजनकाळीं मौनीही न बोलती । परंतु सर्वथा न आवरती । उद्गार निघती डरडरां ॥ ६२ ॥ सावध असे श्रवणीं । तरी गोड वाटे अंतःकरणीं । तरी उद्गाररूपें वाणी । जय राम जय वासुदेव ह्मणतसे ॥ ६३ ॥ ऐसेंचि स्मरण पादसेवन । अर्चन आणि वंदन । दास्य सख्य आत्मनिवेदन । सर्वत्र मुखीं नाम देवाधिदेवाचें ॥ ६४ ॥ एवं सतत शब्द स्वकीर्तनीं । बोले आणिकही गहन भावें करोनी । खंडित नव्हे कीर्तन ह्मणोनी । आपण अखंड त्यापासीं हा भाव ॥ ६५ ॥ नारदास ह्मणे हरी । मी सर्वत्र असें परी । जो माझें कीर्तन करी । असें मी सर्वदा त्यापाशीं ॥ ६६ ॥ कीं भलत्या काष्ठीं अनल । परि मथिला आयता केवळ । अग्निहोत्रीं सांपडे तैसा मी सर्वकाळ सकळ । परि कीर्तनापासीं वसतसें ॥ ६७ ॥ ऐसे भक्तीकरूनि नित्ययुक्त । माझे गुणीं रूपीं स्वरूपीं अनुरक्त । मातें उपासिती माझे भक्त । दैवी प्रकृतीचे अर्जुना ॥ ६८ ॥ ऐशा दैवी प्रकृती । यांच्या आणखीही भजनरीती । बोलतसे जगत्पती । या श्लोकें ॥ ६९ ॥

॥ श्लोक ॥ ज्ञानयज्ञेन चाप्यन्ये यजंतो मामुपासते ।
एकत्वेन पृथक्त्वेन बहुधा विश्वतोमुखम् ॥ १५ ॥

भक्त भक्त त्यावेगळे अन्य । मातें ज्ञानयज्ञेंही यजती धन्य । पूर्वोक्तांस हा यज्ञ सामान्य । त्यांस विशेषें भजन हेंचि ॥ ११७० ॥ बहुतेक जे भक्तिमार्गचतुर । वासुदेव सर्व या अन्वय बोधीं तत्पर । "वासुदेवः सर्वमिति" ह्मणोनि सर्वेश्वर । सप्तमीं मागें तें बोलिला ॥७१॥ श्रवण कीर्तनादि तत्पर । सर्वत्र भगवद्भाव अवलोकिती सादर । ते व्यतिरेक निर्गुणसमाधींत निरंतर । न असती ॥७२॥ प्रस्तुतीं सगुणभक्ति असोनि चित्तीं । स्वरूपाकार करिती वृत्ती । श्रवणकीर्तनींही प्रवृत्ती । परि गोडी व्यतिरेकसमाधीची अत्यंत ॥७३॥ " ज्ञानयज्ञेन चाप्यन्ये " ह्मणोनी । "चापि" या दों अक्षरें करूनी । पूर्वोक्त भक्तिही सूचवूनी । विशेषें ज्ञानयज्ञें यजती

भ्रमतसे ॥ ७४ ॥ ज्ञानें आत्मस्वरूप । अनुभवितां जळे पुण्यपाप । म्हणे आत्मा अग्निरूप । चित्तवृत्ति आहुति हविष्य ॥ ७५ ॥ आतां चैतन्यें करूनी । प्रथम सचेतन होउनी । सर्व वृत्ति चेतवी म्हणोनी । सत्त्ववृत्ति म्हणावें तें चित्त ॥ ७६ ॥ त्या चित्ताच्या दोन वृत्ती । प्रपंचाकडे पाहे ते पराक् वृत्ती । स्वरूप लक्षी ते उफराटी प्रत्यकवृत्ती । ते स्वरूपीं थारतां समाधी । ॥ ७७ ॥ तें स्वरूपीं होय स्थिर । तेव्हां नसती वृत्ति इतर । तेव्हां वृत्ति समुदायसार । होमिलीच जाणों स्वरूपीं ॥ ७८ ॥ चतुर्थाध्यायांत उत्तम श्लोक । " सर्वाणींद्रियकर्माणि " हा श्लोक । या यज्ञाविषयींच बोलिला तो- ही समाधिव्यतिरेक । यज्ञरूपें वर्णिला ॥ ७९ ॥ प्रस्तुत नवमीं म्हणे सर्वज्ञ । कीं कोणी यजूनि ज्ञानयज्ञ । मातें उपासिती अभिज्ञ । कोणी एकत्वें॥११८०॥ तरी आत्मज्ञानें उपासना । ते एकत्वाविण असेना । ज्ञानयज्ञ म्हणतां दिसे- ना । उपासना भिन्नत्वें ॥ ८१ ॥ ज्ञानयज्ञांत जें ज्ञान । तें जरी म्हणावें शास्त्रज्ञान । तेव्हां नसोनि अपरोक्ष ज्ञान । ज्ञान चाळी तो जिज्ञासु म्हणावा ॥ ॥ ८२ ॥ तरी या तृतीय चरणीं । पृथक्त्वेंही भजती म्हणे चक्रपाणी । त्यास अद्वैत विश्वास अंतःकरणीं । भजे दास्यें भावें कळावया अद्वैत ॥ ८३ ॥ पृथक्त्वें भजती म्हणे भगवंत । तें भजन म्हणावें द्वैत । तरी द्वैत भजन नि- षिद्ध अत्यंत । बोले श्रुती ॥ ८४ ॥ श्रुति ॥ अथ योन्यां देवतामुपास्तेन्यो- सावन्योहमस्मीति न स वेद यथा पशुः । श्रुत्यर्थः ॥ अन्य मानूनि दैवत । जो उपासक असे भजत । तो कांहीं नसे जाणत । श्रुति म्हणे पशु जैसा ॥८५॥ तरी एकत्व कळलें ज्याला । ऐक्य उपासना घडे त्याला । जिज्ञासु ऐक्य नाहीं समजला । ऐक्य उपासना तो नेणे ॥ ८६ ॥ त्यास पृथक्त्वें करून भजन घडे म्हणोन । तोही कांहीं नेणे जैसा पशु यावरून । म्हणावा काय ॥ ८७ ॥ तरी जिज्ञासु ऐक्य नेणे । परि देव अन्य मी अन्य ऐसें न म्हणे ; अद्वैतनिश्चय ज्यास बाणे । अपरोक्ष नसोनिही शास्त्रबळें ॥ ८८ ॥ जे अन्यत्वें उपासिती । ते पशु कांहीं न जाणती । जरी इतकेंच बोलती श्रुती । तरी जिज्ञासूकडेही लागतसे हे निंदा ॥ ८९ ॥ देव वेगळा आपण वेगळा म्हणोनी । ऐसें म्हणे बुद्धिपूर्वक दाटुनी । तो जैसा पशु श्रुति म्हणे यावरूनी । निष्ठा भेदींच त्याला श्रुति निंदिते ॥ ११९० ॥ जो भेदवादी अमंगळ । तो देवता वेगळी मी वेगळाच म्हणे केवळ । ऐसें मानून भजे खळ । त्यास येथें श्रुति म्हणे पशु जैसा ॥ ९१ ॥ आतां प्रस्तुतीं गीतेंत । पृथक्त्वें भजती म्हणे भगवंत । ते दैवी प्रकृतीचे स्वभक्तिरत । त्यांत मेळ-

वूनि सांगतसे ॥ ९२ ॥ तेव्हां न ह्मणावें हे भेदवादी । जे निषेधिले पशू-समान वेदीं । हे जिज्ञासु अद्वैतवादी । अपरोक्षानुभव इच्छिती ॥ ९३ ॥ ते ऐक्य नेणती बापुडे । ह्मणोनि एकत्व कळा न सांपडे । एकत्व न कळे तेव्हां सहजेंचि घडे । पृथक्त्वें भजन तें ॥ ९४ ॥ पृथक्त्वें भजती ह्मणोनी । बोले दैवी प्रकृतींत लेखूनी । अद्वैतजिज्ञासु ते यावरूनी । ह्मणावें ऐसें सूचवी । ॥ ९५ ॥ एवं ज्ञानयज्ञें उपासिती । ते अनुभवीच ऐसें बोले श्रीपती । ते एकत्व भजन काय नेणती । कीं एकत्वें भजती ते वेगळे लेखावे ॥ ९६ ॥ [illegible] [illegible]भजनाची मती । साधावी येथें ये रीती । कीं समाधिसुखाची स्थिति [illegible] [illegible]आविती एकत्व मात्र ॥ ९७ ॥ तत्पद आणि त्वंपद । यांच्या वाच्यांशीं असे भेद । तो परिहरोनि वेद । असि पदें एकत्व सूचविती ॥९८॥ तत्पदीं ईश्वरोपाधि उत्तम । जीवोपाधि त्वंपदीं अधम । परि दोहींचें प्रकाशक तें सम । चित्स्वरूप कळलें आत्मत्वें॥९९॥या एकत्वाचेंच चिंतन । आणि सगुणाचें श्रवण कीर्तन । एकत्वें भजती ह्मणे कमलनयन । ते ये रीती ॥ १२०० ॥ एवं निर्गुण समाधिज्ञानयज्ञ । एकत्व तत्पद त्वंपद ऐक्यमात्र जाणते आत्मज्ञ । आणि पृथक्त्वें जिज्ञासु जे नव्हती अभिज्ञ । एकत्व उपासनेचे ॥ १ ॥ आतां बहुधा ह्मणजे बहुप्रकार । कीं इंद्रादिरूपें एक ईश्वर । ह्मणूनि यज्ञ करिती चतुर । कर्मकांडीं ॥ २ ॥ आतां बहुधा ह्मणतां चराचर । स्वयें जाला ईश्वर । ऐसा अर्थ बोलावा तरी जगदीश्वर । यापुढेंचि "विश्वतोमुख" उपासना तेही बोलतो ॥ ३ ॥ आतां मत्स्यकूर्मादिरूपें हरी । भजावा तें बहुधा भजन ह्मणावें जरी । तरी अवतार अनंत ह्मणोनि वैखरी । वेदीं पुराणीं प्रसिद्ध अघटित उपासना अनंतत्वें ॥ ४ ॥ चराचर [illegible] [illegible]ष्टि दिसतसे । तरी तो अर्थ विश्वतोमुखें भजतां येतसे । [illegible] अवतार नाना कैसे । भजावे न दिसती जे दृष्टी॥५॥एका ईश्वराचे अवतार । श्रवणें हे पूर्वोक्त सकळही उपासक चतुर । जाणती आतां बहुधा उपासनाप्रकार । कोणते या वेगळे लेखावे॥६॥ चरित्रें जीं नाना अवतारीं । तीं कीर्तनांत आटलींच या उपरी । बहुधा उपासना अंतरीं । ध्यान मत्स्यादि मूर्तीचें जरी ह्मणावें ॥ ७ ॥ तरी काय दहाच मत्स्यादि अवतार । अवतार दिव्य ईश्वराचे अपार । ध्यावे कोण टाकावे कोण हा विचार । युक्त न दिसे सर्वथा ॥ ८ ॥ कोणी ऐसाचि अर्थ बोलती । तरी ते बोलिले यथामती । बहुधा भजनाची हे रीती । कीं इंद्रादि रूपें यजन एका सर्वेश्वराचें ॥ ९ ॥ आतां "विश्वतोमुख" उपासना । "विश्वतश्चक्षु"

इत्यादि वेदार्थरचना । हृदयीं धरोनि ह्मणे अर्जुना । "विश्वतोमुख" भजती कित्येक ॥ १२१० ॥ चैतन्य तंतु जग अंबर । मूर्ती पटीं विणिल्या चराचर । नेत्र मुख कर चरण मांडिया उदर । अंग अंगतंतूच तो अवघा ॥ ११ ॥ विना तंतु न दिसे मूर्ती । ऐसी चराचराची आत्मस्फूर्ती । "विश्वतोमुख" विश्वमूर्ती । हेचि उपासना एकासी ॥ १२ ॥ ऐसे वर्णिले भक्त । यांत कोणी अपरोक्षसाक्षात्कारयुक्त । कोणी ज्ञान नसोनि अनुरक्त । स्वचरणीं ऐसे वर्णिले ॥ १३ ॥ एवं ज्यांच्या दैवीप्रकृती । ते आपणातें भजती । आणि आसुरी प्रकृति मानवजाती । न भजती आपणातें ॥ १४ ॥ ऐसें बोलतां येथवरी । "विश्वतोमुख" उपासना हरी । शेवटीं बोलिला याउपरी । तें विस्तारूनि बोलेल या श्लोकापासुनी ॥ १५ ॥

॥ श्लोक ॥ अहं क्रतुरहं यज्ञः स्वधाहमहमौषधम् ।
मंत्रोऽहमहमेवाज्यमहमग्निरहं हुतम् ॥ १६ ॥

॥ टीका ॥ अगा क्रतु मी अर्जुना । यज्ञ मी पांडुनंदना । क्रतु ह्मणजे श्रुत्युक्त होमरचना । यज्ञ ते स्मृत्युक्त ॥ १६ ॥ अथवा क्रतु त्यास ह्मणती । कीं यूपस्तंभ जेथें उभारिती । यूपस्तंभावांचूनि यजिती । यज्ञ त्याला ह्मणिजेतें ॥ १७ ॥ आतां क्रतुयज्ञीं देवतांच्या नामें आहुती । होमितां स्वाहा ह्मणोनि ह्मणती । पितरांस पिंड तिळ जळ देती । स्वधा ह्मणोनी ॥ १८ ॥ येथें स्वधा मी ह्मणोनी । श्रीकृष्ण ह्मणे यावरूनी । श्राद्धें तर्पणें पितृकार्यें या स्वधा शब्दें करूनि । भगवद्रूपें पहावीं हा भाव ॥ १९ ॥ आतां ओषधि मी ह्मणतसे । कीं धान्यें शेतीं उगवतां वाढतां जें दिसे । त्या ओषधि आणि धान्य गवसे । औषध ह्मणावें तयातें ॥१२२०॥ अन्नें क्षुधा हरती । अन्नें पुष्टीही करिती । तीं अन्नें औषधें आणि नाना रीतीं । रोगहर औषधाच्या जातीही ऐशाच ॥ २१॥ एवं क्रतु यज्ञ देवांकारणें । आणि श्राद्धादि पितरांनिमित्त जें करणें । क्रतुयज्ञ स्वधा शब्दाचें हें विवरण । सूचवूनि मी ओषधा ह्मणे हें हविर्द्रव्य ॥ २२ ॥ आतां मंत्र आज्य अग्नीही मी । ह्मणे सकळां यज्ञाचा स्वामी । आणि हुतें जालें जें होमीं । तेंही मी ह्मणतसे ॥ २३ ॥ हें बोले स्वयें भगवान्षड्गुण । जें तें ह्मणे आपण । भगवच्छब्दीं ज्ञानगुण । ते खूण सूचवी ये स्थळीं ॥ २४ ॥ उत्पत्ति वृद्धि परिणाम अपक्षय । शेवटीं नाश त्याचा तो क्षय । सर्वही स्वकल्पनामय । जाणे कल्पक आपण ॥ २५ ॥ वेष नट दाखवी निपुण । तैसा विश्वरूप आपणातें आ-

---

१ यूप. २ आहुति.

पण । कल्पी भगवान्षड्गुण । ज्ञानगुण त्या कल्पनेच्या साक्षित्वें ॥ २६ ॥ प्रस्तुतीं क्रतु यज्ञ श्राद्ध तर्पण । क्रियारूप कल्पूनी आपणा आपण । जालों मी स्वयें षड्गुण । हें सूचवी ॥ २७ ॥ तैसाच ओषधींचा उद्भव । वृद्धि परिणाम कणिस धान्यादि भाव । कल्पूनि जालों स्वयमेव । मी देवाधिदेव हें सूचवी ॥ २८ ॥ ऐसेंचि मंत्र आज्य हुत । इत्यादि यज्ञप्रकार बहुत । तें स्वयें मीच जालों भगवंत । आपणांस आपण कल्पूनी ॥ २९ ॥ ब्राह्मण कल्पिले मनें । त्यांच्याच हातें यज्ञसाधनें । कल्पून करविलीं कल्पकानें । [illegible] याचीच ॥ १२३० ॥ ब्रह्मीं मायेचा उगम । होतां सृष्टि सकळ पुरुषोत्तम । मनें करून स्थावर जंगम । कल्पूनि आपण होतसे ॥ ३१ ॥ तत्त्वें आधीं निर्मिलीं । मग अनंतानंत ब्रह्मांडें केलीं । तीं तत्त्वें ब्रह्मांडें जालीं । त्यास काय सामग्री होती तेधवां ॥ ३२ ॥ नाना धातु आणि माती । ईश्वरकृत सांपडे आयती । तरीच त्यांचे घटादि पदार्थ घडती । कुंभार सोनार लोहार तांबट ॥ ३३ ॥ श्रुति पूर्वी सृष्टीहूनी । ह्मणती कांहींच नव्हतें ह्मणोनी । आणि ऊर्णनाभिदृष्टांतें करूनी । सृष्टि ईश्वर करी हेंही श्रुति वर्णिती ॥ ३४ ॥ किडा ऊर्णनाभि तंतु उगळी । त्यांत खेळे पुन्हा गिळी । तैसी हे सृष्टि सगळी । निर्मी संहारी ईश्वर ॥ ३५ ॥ राहाट अथवा चाती । कापूस वांख ताग पोटांत नसती । माशीएवढा किडा कोणे रीती । तंतु अपार पोटांतूनि काढितो ॥ ३६ ॥ ऐसा ईश्वर सर्वेश्वर । कल्पोनि निर्मि । तो चराचर । येविषयीं प्रमाणें अपार । बोलतां ग्रंथ वाढेल फार ॥ ३७ ॥ मन मायेचेंचि केलें । त्या मनें पद्मनाभरूप आपणातें कल्पिलें । नाभिपद्मीं तेथें निर्मिलें । ब्रह्मयानें [illegible] ॥ तो ईश्वराचा पुत्र मानस । ब्रह्मा लोक- [illegible] । सनकादि मरीचि कर्दमादि त्यास । जाले मानस सुत सकळ ॥ ३९ ॥ त्यांत पुरुष एक मनु ह्मणोनी । शतरूपा ह्मणोनि त्याची कामिनी । मनेंचि दोनी निर्मुनी । ब्रह्मा ह्मणे सृष्टि करा । ॥ १२४० ॥ तीं दोघें भूतळा आलीं । भूतळीं अन्नें भक्षूं लागलीं । तीं अन्नें ही निर्माण केलीं । मनेंचि करूनिया ब्रह्मयानें ॥ ४१ ॥ निर्गुणीं मायेचा अंकुर । तेव्हां ईश्वर सगुण परि तोही निराकार । पद्मनाभ रूप त्याचा अवतार । मनोमय कल्पना ईश्वराची ॥ ४२ ॥ शरीर ब्रह्मयाचें त्यापासुनी । त्याणें मनु शतरूपा त्याची कामिनी । धान्यें आणि सकळ लोक मनेंच करुनी । सृष्टि केली परि अपूर्ण ॥ ४३ ॥ भगवद्भक्ति पूर्वी ज्यांस ।

१ कोळी. सूत काढणारा जंतु. २ अंबाडी.

आणि विना ज्ञान पावले नाहीं मोक्षास । तितके विना गर्भवास । मानस मनेंचि उपजले ॥ ४४ ॥ परंतु गर्भवासाविना । ज्यांस उत्पत्ति सर्वथ असेना । ऐसे जीव अनंत नाना । ते उपजतां न वसती लोक चतुर्दश ॥ ४५ ॥ चतुर्दश लोकरचना । धान्यें आणि मानस सृष्टीही नाना । मनु शतरूपा हे सकळही कल्पना । स्वस्वरूपीं सर्वेश्वराची ॥ ४६ ॥ ब्रह्मा त्या-चेंचि रूप कल्पित । सनकादि मनु शतरूपापर्यंत । धान्यें चतुर्दशलोकही भग-वंत । जाला आपणास आपण कल्पुनी ॥ ४७ ॥ मानससृष्टि येथवरी । मैथुनसृष्टि या उपरी । शुक्रशोणितापासूनी जाली परी । हेही ईश्वरकल्प-ना । ४८ ॥ स्वप्नीं मनेंचि कल्पिली कामिनी । तीस स्वप्नकल्पित पुरुषापासु-नी । संतान जालें मैथुनें ह्मणोनी । मनें कल्पिलें नव्हे तें काय ॥४९॥ स्वप्नीं नगर नद्या पर्वत । जैसीं सकळ मनःकाल्पित । स्वप्नीं मिथुनापासूनि जाले सुत । तेही तैसेच कल्पित जे रीती ॥ १२५० ॥ ऐसा प्रपंच सकळ । मनु शतरू-पापर्यंत कल्पित केवळ । मिथुन सृष्टी तेथोनि पुष्कळ । हेही कल्पना ईश्व-राची ॥ ५१ ॥ मानस मनु शतरूपा मिथुन । मानस अन्न शुक्र शोणित मथुन । शुक्र शोणितापासूनि तेथुन । मिथुनसृष्टिकल्पना हेही मानस॥५२॥ परि हे मिथुनसृष्टी । उपजतां दिसते जे जे दृष्टी । या सृष्टिवृद्धीस मूळ वृष्टी । पर्जन्याची ॥५३॥ देवां अधीन ते वृष्टी । ते आहुतिद्वारा पावोनि तुष्टी । वृष्टि करितां मिथुन सृष्टी । वृद्धि पावते यथाकाळें ॥ ५४ ॥ आणि संतान-वृद्धीस हेतु पितर । यज्ञें तोषती ते पितर आणि सुर । त्यास साधन ओष-धि ह्मणोनि सर्वेश्वर । इतकेंही पूर्वश्लोकीं बोलिला ॥ ५५ ॥ ते सृष्टिवृद्धि हेतुरचना । आपण आणि आपली कल्पना । ह्मणोनि क्रतु यज्ञ स्वधा ओषधि मी अर्जुना । मंत्र आज्य अग्नि हुत मीच ऐसें सूचवूनि बोलिला ॥५६ ॥ ऐसी देव पितर करितां वृष्टी । वाढली हे मिथुन सृष्टी । आणि मानस मनु शतरूपा ब्रह्मा न दिसती दृष्टी । हे दृष्ट अदृष्ट मीच ह्मणतो या श्लोकीं ॥५७॥

॥ श्लोक ॥ पिताहमस्य जगतो माता धाता पितामहः ।
वेद्यं पवित्रमोंकार ऋक्साम यजुरेव च ॥ १७ ॥

॥ टीका ॥ अगा मीच या जगाचा पिता । मीच या जगाची माता । मीच पितामह ज्याचें नाम धाता । अर्जुना जाण ॥ ५८ ॥ चौऱ्यांशीं लक्ष योनी । जगीं वसती ह्मणोनी । चौऱ्याशीं लक्षयोनि यावरूनी । जग ह्मणावें । ॥५९॥ त्या चौऱ्याशीं लक्ष योनी । मनुष्यदेहाची जोडी ह्मणोनी । सर्वां-मनुष्यांस जे मायबाप दोनी । तींचि मायबापें चौऱ्याशी लक्ष योनींची

॥ १२६० ॥ " कर्मानुबंधीनि मनुष्यलोके " ह्मणोनी । पंचदशीं या श्लोकच-रणें करूनी ।. कर्मबंध या मनुष्यदेहींच यावरूनी । सर्वयोनिकर्में मनुष्य-देहाचीं ॥ ६१ ॥ मनुष्यमात्राचा उपज । मनूपासूनि ह्मणती मनुज । माता शतरूपा पिता मनु तेव्हां सहज । पितामह धाता ब्रह्मा सकळांचा ॥ ६२ ॥ बाप आपल्या बापाचा । पितामह तोचि ज्या त्या मानवाचा । ऐसें असोनि कां वेदवाचा । लोकपितामह ह्मणे ब्रह्मयातें ॥ ६३ ॥ मनु मनुष्यजातीचा पिता । शतरूपा सकळ मनुजांची माता । पिता त्या पित्याचा स्वयंभु धाता । स्वायंभुव मनु नाम त्याचें ॥ ६४ ॥ पद्मनाभ विष्णु स्वयें ब्रह्मा जाला । ह्मणोनि स्वयंभु ह्मणावें ब्रह्मयाला । ब्रह्मरूपें मनें कल्पिलें आपणाला । तो स्वयंभु मनें कल्पी मनूतें ॥ ६५ ॥ स्वायंभुव मनुजजातीचा पिता । त्या जातीचा पितामह स्वयंभु ब्रह्मा तत्त्वता । ह्मणोनि आजा पितामह विधाता । सकळा जगाचाही ॥ ६६ ॥ कीं चौऱ्याशीं लक्षयोनी । मनुष्य स्वकर्में होतो ह्मणोनी । जगाचा पितामह आजा यावरूनी । ब्रह्मा पिता मनुजजातीच्या बापाचा ॥ ६७ ॥ एवं ब्रह्मा मनु जैसी मनाची कल्पना । तैसीच मिथुन सृष्टिरचना । ऐसें सूचवूनी अर्जुना । जगद्गुरु श्रीकृष्ण बोले ॥ ६८ ॥ कीं औषधशब्दें औषधि अन्नें । आपणचि आणि ऋतु यज्ञ त्यांचीं वृष्ट्यादि साधनें । आपणचि तेव्हां त्या अन्नापासूनि उत्पन्नें । तीं हीं भूतें आपण हा भाव ॥ ६९ ॥ कीं हीं भूतें मानसा अन्नापासुनी । आणि मानसा मनुमरीच्यादिकांपासूनि ह्मणोनी । हींही मानसाचीं जाण यावरूनी । ऐसें येथें सूचवी ॥ १२७० ॥ मिथुनसृष्टीस कारण । ते मानसच अवघे मनु ऋषिगण । त्यांचें संतान जग ऐसी स्पष्टही खूण । विभूति-अध्यायांत बोलेल या श्लोकीं ॥ ७१ ॥

॥ दशमाध्यायश्लोक ॥ महर्षयः सप्त पूर्वे चत्वारो मनवस्तथा ।
मद्भावा मानसा जाता येषां लोक इमाः प्रजाः ॥

॥ टीका ॥ सप्तऋषी भृग्वादिक । त्यांहूनि पूर्वी चौघे सनकादिक । आणि मनु अगा ज्याच्या संततीनें लोक । भरले चतुर्दशही ॥ ७२ ॥ एवं आजा बाप माय अन्नें । ज्यांपासूनि भूतें सर्वेही उत्पन्नें । हीं सर्व मानसें तैसींच मनें । हीं भूतें कल्पिलीं हा भाव ॥ ७३ ॥ मनें कल्पिलीं मिथुनें । मनेंचि कल्पिलीं त्यांचीं मैथुनें । मनें गर्भ मनें संतानें । भलतीही कल्पील ॥७४॥ परि क्षणिक भलतियाची कल्पना । अमोघ ईश्वरकल्पनेची रचना । एवं चतुर्दश लोक देह नाना । कल्पना सर्व भगवंताची ॥ ७५ ॥ पिता

माता अन्नें माझी कल्पना । म्हणोनि त्या त्या वेषें मीच आहें अर्जुना । तैसी-च चराचराची रचना । माझी कल्पना मीच हा अर्थ ॥ ७६ ॥ "ममात्मा भूतभावनः" म्हणोनी । राजविद्याप्रकरणीं बोलिला त्यावरूनी । विश्व कल्पितो बुद्धीकरूनी । बुद्धि कल्पिते म्हणे या भाव ॥ ७७ ॥ सर्वही भूत-रचना । माझे उपाधीची कल्पना । तिचें अधिष्ठान मी चित्स्वरूप अर्जुना । तेव्हां विश्व मीच हें कृष्णरूप मी जैसा ॥ ७८ ॥ म्हणोनि उत्तरार्धी जग-त्स्वामी । आदीच म्हणतो कीं वेद्य मी । म्हणजे जडीं पटीं स्थावरजंगमीं । वद्य मी तंतु चित्स्वरूप ॥ ७९ ॥ तेव्हां चराचराची रचना । मज माजी माझ्या मायेची कल्पना । जाणावें तें इतकेंचि अर्जुना । वेद्य म्हणजे तें जें जाणावें ॥ १२८०॥ चित्स्वरूप सुवर्णमात्र । चराचर अलंकार हें विचित्र । वेद्य जें परम पवित्र । तें उपादान सर्व जाणणें इतकेंचि ॥ ८१ ॥ अविद्या-निर्मित विचित्र । जडभास अवघा अपवित्र । वेद्य त्या मिथ्या सर्पी पवित्र । हार दिव्य सुमनाचा ॥ ८२ ॥ दृष्टि आदीं शिवे हार । तेव्हां देखे भुजंगा-कार । चराचर प्रपंच सार । प्रतीतिगोचर मजकारितां ॥ ८३ ॥ तेव्हां हार दिसे तोचि असे । सर्प नाहीं जरी भासे । एवं वेद्य आत्माचि गवसे । प्रपंच नाहींच तो कैंचा ॥ ८४ ॥ पवित्र ऐसें तें मी गोविंद । त्यास साधन चारीही वेद । ऋग्वेद यजुर्वेद सामवेद । अथर्वणा संग्रह तिहींचा ॥८५॥ त्यांत श्रेष्ठ ओंकार । तो मीच वर्णरूप सर्वेश्वर । कीं सृष्टि स्थिति संहार । त्रिमूर्तिप्रतिपाद्य ओंकारीं ॥ ८६ ॥ ऐसी मानस आणि मिथुनसृष्टी । दोहींकडे मानसकल्पनारूप दृष्टी । अर्जुना देऊनि पाहें ऐशा गोष्टी । वि-श्वतोमुख उपासना प्रसंगें येथवरी बोलिला ॥ ८७ ॥ हीं भूतें जडें यांत जीव । तेही मीच अंशरूपें स्वयमेव । परि ते अविद्येनें युक्त सर्व । नेणती रहस्य ऐसें ॥ ८८ ॥ त्यांस कर्मानुरूप फळ । तीं फळें फळदाता मीच स-कळ । या प्रसंगें ईश्वरत्व घननीळ । आणि सर्वात्मत्वही वदतो या श्लोकापासुनी ॥ ८९ ॥

॥ श्लोक ॥ गतिर्भर्ता प्रभुः साक्षी निवासः शरणं सुहृत् ।

॥ टीका ॥ अगा जग मी स्वयें जगत्पती । तेव्हां मीच सर्वां जीवांची गती । बहुविधा गति परंतु रीती । तीनीच सर्वां गतींच्या ॥१२९०॥ एक मुक्ति अपुनरावृत्ती । स्वर्गादि लोक पुनरावृत्ती । तिसरी चराचररूपें उत्प-त्ती । सर्व मीच तेव्हां मीच गति सर्वांची ॥ ९१ ॥ ज्ञानें मुक्ति कर्मे गती ।

१ जाणतां येतो असा.

परि देणार मीच जगत्पती । ह्मणोनि मीच मायाधिपती । भर्ता धनी सर्वांचा ॥ ९२ ॥ जो जयाचा पालनकर्ता । तो ह्मणावा त्याचा भर्ता । पुढिलिये श्लोकीं विश्वभर्ता । भर्तृपणही बोलेल ॥ ९३ ॥ ह्मणसी तूं विश्व अंश तुझे जीव । कर्मेंकरून गतिही स्वयमेव । तेच कां न पावती तूं देव । कां देसी गति तयातें ॥ ९४ ॥ तरी मी प्रभु समर्थ भगवंत । ते अविद्येनें बद्ध असमर्थ अत्यंत । आणि जें करिती तें मी साक्षी अनंत । जाणतों कर्में तयांचीं ॥ ९५ ॥ समर्थ आणि साक्षीपण । ह्मणोनि गतिदायकही मी आपण । तूं कां पाहतोस जीवांचें आचरण । ह्मणोनि ह्मणसी तरी मी निवासचि त्या सर्वांचा ॥ ९६ ॥ साक्षित्व माझा सहज गुण । आणि ते मज माजी वसती जीवगण । त्या साक्षित्वीं समर्थपण । फळ द्यावयाचें अनादी ॥ ९७ ॥ साक्षित्व प्रभुत्व हे दोनी । उपाधि अनादि माझे ह्मणोनी । गतिप्रदत्व त्या दों गुणेंकरूनी । ईश्वरत्वीं लागलें ॥ ९८ ॥ आतां कर्मानुरूप फळ । तरी तुज कां भजती विवेकी सकळ । ह्मणोनि ह्मणसी ह्मणे मेघनीळ । तरी मी शरणरक्षक शरणागतांचा ॥ ९९ ॥ जे मज रक्ष ह्मणती । त्यांस देतों मी निज गती । मृत्युकाळापासुनी मी श्रीपती । रक्षितों सहज कल्पवृक्षस्वभाव ॥ १३०० ॥ आतां कल्पवृक्ष अज्ञ । तूं करुणासमुद्र सर्वज्ञ । शरण न येती त्यांसही कां न करिसी अभिज्ञ । कीं शरण या मातें ह्मणोनी ॥ १ ॥ न मागतां नेदी कल्पवृक्ष । शरण न येतां न रक्षिसी तूं अंबुजाक्ष । हा सहज गुण तुझा वर्णिती दक्ष । परि दयाळू सर्वही तुज ह्मणती ॥ २ ॥ जरी आपणास ते येती शरण । यास कांहीं न रचिसी कारण । तरी तूं सुहृद् भूतांचा आपण । सुहृद् न होसी यास्तव ॥ ३ ॥ ऐसें ह्मणेल पार्थ । ह्मणोनि ह्मणतो समर्थ । कीं मी सुहृत्सख यथार्थ । दुर्हृद् नव्हे कोणाचा ॥ ४ ॥ वेद शास्त्र पुराणें अवतार । प्रगट करोनि वारंवार । शरण आले त्यांचा केला उद्धार । व्यासरूपें चरित्रें तीं कथिलीं ॥ ५ ॥ कीं पुराणाचें करावें श्रवण । आणि मज यावें शरण । मग त्यां वेदांतरहस्य विवरण । गुरुरूपें करावें तयातें ॥ ६ ॥ ह्मणोनि मीच भगवंत । व्यासरूपें वेदांताचा सिद्धांत । ब्रह्मसूत्ररूपें बोलिलों तो वेदांत । तारक जनां सर्वांचा ॥७॥ पंचदशाध्यायांत ह्मणोनी । "वेदांतकृद्वेदविदेव चाहं" या श्लोकें करोनी । व्यास मीच ह्मणेल यावरोनी । सुहृत्सखा सर्वां भूतांचा ॥ ८ ॥ मज शरण यावें ह्मणोनी । पुराणें केलीं चरित्रें करोनी । निर्दयत्व दोष या गोष्टीवरोनी । गेला माझा ॥ ९ ॥ राजा अन्नसत्र निर्माण । न

करितां गेले क्षुधेनें प्राण। तरी त्यांच्या हत्येचें कारण। राजा होतो॥१३१०॥ तो अन्नसत्र करी। त्यांत न जेविती एक दोघे जरी। आणि मरती क्षुधेनें तरी। काय करावें राजानें॥ ११॥ तैसे आत्मघातक नर। जरी पुराणश्रवणीं न होती तत्पर। निर्दय न ह्मणावा सर्वेश्वर। तो सुहृद सखाच सर्वांचा॥ १२॥ आतां बुद्धि प्रेरूनि ते नर। करावे श्रवणतत्पर। तरी सर्वसम सर्वेश्वर। सर्वांस त्याणें तारावें॥ १३॥ मोक्ष सकळांस द्यावा। तरी नाश होणार स्ववैभवा। स्वस्वरूप स्ववैभवा देवाधिदेवा। न नाशवे सर्वथा कीं तें अभंग॥ १४॥ कीं जरी नासे ब्रह्म। तरी नव्हे प्रपंचाचा उगम। जीवांवांचूनि हें स्थावर जंगम। उपजेल कां॥ १५॥ न उपजतां जग। ईश्वरवैभवाचा भंग। जीव सर्व मुक्ति पावती मग। जग हें कोणा कारणें॥ १६॥ न उपजे विश्वद्रुम। जरी नासे याचें बीज निर्गुणब्रह्म। तें अव्यय बीज परम। सृष्टि स्थिति संहाररूप वृक्षाचें॥ १७॥ जें बीज तो वृक्ष हें प्रसिद्ध। ह्मणोनि सुहृदपण आपलें सिद्ध। करावया बोलतो उत्तरार्ध॥ या श्लोकाचें॥ १८॥ ॥ उत्तरार्ध॥ प्रभवः प्रलयःस्थानं निधानं बीजमव्ययम्॥ ॥ टीका॥ प्रकर्षे पुनः पुनः उद्भव। तो प्रपंचाचा ह्मणावा प्रभव। तो मीच कीं बीजचि संभव। ह्मणावा वृक्षाचा॥ १९॥ तैसाच पुनः पुनः प्रकर्षे लय। त्यास ह्मणावें प्रलय। तो प्रलयही मीच कीं स्वकल्पनामय। मीच होतों तो लय पावलों स्वस्वरूपीं॥ १३२०॥ किरणचि जेव्हां मृगतोय। तेव्हां किरणचि त्याचा उद्भव लय। किरणचि ह्मणोनि निश्चय। मनुष्यदृष्टि स्थितिकाळीं॥ २१॥ ह्मणोनि स्थान ह्मणिजे स्थिति। तेंही मीच ह्मणे श्रीपती। कीं किरण बीजच स्वयें जे रीती। मृगजळरूपें भासते॥ २२॥ किरणींचि उत्पत्ति स्थिति लय। मृगजळरूपें पावोनि स्वयें अव्यय। प्रतिदिनीं होय जाय। सृष्टि स्थिति संहार मृगजळाचा ये रीती॥ २३॥ बीज होऊनि अव्यय। बीज होऊनि अद्वय। मृगजळ उपजोनिही न घडे व्यय। किरणाचा इतरा बीजासारिखा॥ २४॥ उगेंचि मृगजळाचें बीज। किरण ह्मणतां होतो उपज। इतरा बीजाचें नासे रूप निज। हें यथास्थित तेज सूर्याचें॥ २५॥ बीजनाशें होतां अंकुर। तेज शाश्वत होतांही मृगनीर। ह्मणोनि मृगजळाचें निधान ह्मणती चतुर। प्रकाशास सूर्याच्या॥ २६॥ जैसा घट जळाचें निधान। निधान ह्मणजे ज्यांत ज्याचें स्थापन। तरी घटांत घालावें टाकावें जीवन। घट तों न नासे बीजासारिखा॥ २७॥ परि घटा जळा ऐक्य न घडे। आणि घट

बीजत्वें न सांपडे । ज्या दृष्टांतीं साम्य पडे । इतकेंही तो मृगजळ किरणांचा ॥ २८ ॥ मृगजळ जैसें किरणीं । उत्पत्ति लय पावे मृषा पाणी । नाश न पावे कोणे क्षणीं । ह्मणोनि जैसें किरण निधान मृगजळाचें ॥ २९ ॥ परि घटांतूनि न निघतांही पाणी । प्रतीतीस ये तैसें किरणीं । प्रत्यया न ये लयानंतरक्षणीं । नाहीं ह्मणावें तरी उदय पावे तें ॥ १३३० ॥ असोनि नये प्रत्यया । तेव्हां निधान केवीं ह्मणावें तया । तेव्हां मृगांबुबीजचि ह्मणावया । योग्य होय किरणांतें ॥ ३१ ॥ कीं बीजांत वृक्षाचा प्रत्यय । नसोनिही वृक्ष असे हा निश्चय । प्रत्यय नये तरी मृगांबूदय । किरणीं होणार बीज यालागीं ॥ ३२ ॥ तरी अंकुर होतां नासे बीज । न दिसे त्याचें रूप निज । किरण जळभासाहूनि पूर्वी होतें सहज । तैसें मृगजळ उपजतां ॥ ३३ ॥ नव्हे निधान एका विचारें । नव्हे बीज एका प्रकारें । निधानही होय बीजही होय निर्धारें । त्याच्या एक एका गुणाच्या ॥ ३४ ॥ प्रत्यया नये परि असे । किरणीं जेव्हां जळभास न दिसे । कीं प्रगट होतां दृष्टीस गवसे । यास्तव किरण निधान मृगजळाचें ॥ ३५ ॥ आणि बीजवृक्षन्यायें किरणापासुनी । मृगजळ उपजे यावरूनी । किरण बीज होय परि न नासती ह्मणोनी । बीज अव्यय ऐसें ह्मणावें ॥ ३६ ॥ सुचे इत्यादि निर्णय । ऐसें वचन बोले करुणालय । कीं निधान बीज अव्यय । मी या जगाचें अर्जुना ॥ ३७ ॥ कीं मज माजी लय पावोनी । प्रपंच निघे मजपासूनी । याचें निधान मी ह्मणोनी । ह्मणतों यास्तव ॥ ३८ ॥ कीं पेटींत धन रिघतां न दिसे । दिसे जेव्हां त्या पेटींतूनि तें निघतसे । जे चतुर देखती ऐसे । ते पेटी ह्मणती निधान त्या धनाचें ॥ ३९ ॥ तैसा मज माजी लय । मजपासूनि या जगाचा उदय । तेव्हां निधान मी अद्वय । या जगाचा होय कीं ॥ १३४० ॥ परि जालिया जगाचा लय । जों न होय मायेचा उदय । तोंवरी जगाचा नसे प्रत्यय । किरणीं मध्यान्ह टळतां जैसा मृगजळाचा ॥ ४१ ॥ तेव्हां प्रत्यय नसोनी । उपजे मागुती मजपासुनी । प्रत्यय नसोनि बीजामधूनी । वृक्ष निघे जे रीती ॥ ४२ ॥ ह्मणोनी मी अद्वय । बीज प्रपंचाचें जगन्मय । परि इतर बीज नासे मी अव्यय । नाशरहित बीज या जगाचें ॥ ४३ ॥ एवं बीज आणि निधान । जगाचा लय आणि उदयाचें स्थान । आणि नव्हे अन्या निधाना बीजासमान । अव्यय निधान अव्यय बीज ॥ ४४ ॥ इतर बीजही नाशरहित । कीं फळीं प्रगटे निश्चित । परि सद्य असे नाश पावत । तैसें नव्हे बीज प्रपंचाचें ॥ ४५ ॥ आणि इतर बीज नासे विटे । तरी अंकु-

र होणें पुनः खुंटे । प्रपंचबीज न विटे न फुटे । न खुंटे उद्भव प्रपंचाचा ॥ ४६ ॥ बीज नासे जयाचें । उपजणें खुंटे तयाचें । तेव्हां सृष्टि स्थिति संहार होणें जगाचें । न चुके कदापि ॥ ४७ ॥ समर्थ ईश्वर तथापी । ऐसें न करूं शके कदापी । कीं प्रपंच आपल्या स्वरूपीं । न उपजे हा भाव या अर्धें सूचवी ॥ ४८ ॥ प्रपंच जीवमूळ । ते मुक्ति पावतां सकळ । कां उपजे प्रपंच माया मृगजळ । आणि तो तों सर्वथा उपजणार ॥ ४९ ॥ कीं बीज त्याचें अव्यय । बीज तो अंकुर हा निश्चय । याकारणें न मागतां करूणालय । मुक्ति नेदी सर्वां जीवांसी ॥ १३५० ॥ एवं अनादि जैसे जीव । अनादि जैसा देवाधिदेव । तैसें न मागतां मुक्ति नेदी तो स्वयमेव । हेंही अनादि ॥ ५१ ॥ मुक्त करावे सकळ । ऐसें सर्वांवरी कृपाजळ । सर्वदा वर्षे मेघनीळ । परि पालथे घट जनाचिया मुमुक्षेचे ॥ ५२ ॥ आतां ईश्वरें शक्तीकरूनी । मुमुक्षा त्यांस उपजवूनी । मोक्ष द्यावा तरी कोणास सोडोनी । कोणास द्यावा ॥ ५३ ॥ सर्वांस द्यावा जरी । प्रपंचाचि नव्हे त्या उपरी । तो प्रवाह खुंटे तरी । कीं बीज नासे जरी त्याचें । ५४ ॥ ह्मणोनि मोक्षाची अपेक्षा । ते अपेक्षा ह्मणावी मुमुक्षा । तीवांचूनि कोणी न पावे मोक्षा । अनादि सहज निर्वाह हा ऐसा ॥ ५५ ॥ आणि दयावृष्टि सर्वांवरी सम । वर्षे अनादि सहज गुण सर्वोत्तम । मेघजळेंचि मोतीं उत्तम । विषयवेलता[2] वाढे जळें घनाचिया ॥ ५६ ॥ मुक्त्यपेक्षा ह्मणावी मुमुक्षा । विषयभोगापेक्षा ह्मणावी बुभुक्षा । फळ दे ईश्वर जैसी अपेक्षा । इतकेंचि सहज अनादि कृपाळुत्व ईश्वराचें ॥ ५७ ॥ हो सकळांचें कल्याण । ह्मणोनि अवतार वेद शास्त्र पुराण । करोनि तरणोपाय निर्माण । सुहृत्सर्वांचा[3] अपेक्षा मात्र सर्वांची पुरवितो ॥ ५८॥ या भावें सुहृद आपण । ह्मणे पूर्वार्धेंकरून । सर्वांस मोक्ष कां नेदी तरी आपण । अव्यय बीज प्रपंचाचें ह्मणे उत्तरार्धीं ॥ ५९ ॥ होणें न चुके प्रपंचवृक्षा । ह्मणोनि मोक्ष नसे विना मुमुक्षा । भजतां पुरवणें ज्याची जैसी अपेक्षा । सहज दयाळुत्व इतकेंचि ईश्वराचें ॥ १३६० ॥ एवं आपण सुहृद सर्वांचा । हा शब्द उत्तरार्धें केला साचा । आतां यापुढें वाचा । सुहृदपण विवरणाची ॥ ६१ ॥ कीं पार्थ ह्मणेल जी यदुपती । जे तुह्मी पुराणें न जाणती । त्यांस कृपाळू तूं कोणे रीती । सुहृदपण दाविसील आपलें ॥ ६२ ॥ आणि तुमचा सुहृत्सखा भर्ता । तुह्मां सकळांचा पालनादि कर्ता । मी आहें ऐसी वार्ता । केवीं वि-

१ श्लोकार्धानें. २ विषयाची वेल. ३ सर्वांचा सखा; मित्र.

दित करिसी तयांसी ॥ ६३ ॥ या कारणें यापुढें श्लोक । बोलों पाहे तो उत्तमश्लोक । कीं जे वेद शास्त्र पुराणविमुख लोक । त्यांस पाळितों आणि प्रगट करितों ईश्वरत्वही ॥ ६४ ॥ भाव कळे ये रीतीचा । आणि सर्वात्मभाव आपला समजे साचा । अर्जुनातें ऐसी वाचा । बोलतसे या श्लोकीं॥६५॥

॥ श्लोक ॥ तपाम्यहमहं वर्षं निगृण्हाम्युत्सृजामि च ।

॥ टीका ॥ अर्जुना मी पर्जन्यवृष्टी । करितों तेव्हां सर्व सृष्टी । सकळ भोग भोगिजे या दृष्टी । इहलोकीं विषय दिसती ॥ ६६ ॥ सकाम वेदशास्त्र पुराणें । ऐकोनि जे यजिती स्वर्गादिफळाकारणें । उरले ते इहलोक विषयचर्वणें । कृतकृत्य होती ॥ ६७ ॥ तरी मी सुहृत्सखा भर्ता । अपेक्षानुरूप सुखकर्ता । जे जागती इहलोकमात्राची वार्ता । त्यांस वृष्टिद्वारा सुख मीच करितसें ॥ ६८ ॥ कीं सूर्यकिरणद्वारा । मीच तपतों आणि मेघधारा । मीच वर्षतों त्या मज ईश्वरा । तर्कें समजती ते ऐसें मी करितों ॥ ६९ ॥ कीं किरणरूपें मी तपतों । मेघरूपें मी वर्षतों । मागुती वृष्टि ओढोनि धरितों । मागुती सोडितों वृष्टीतें॥ १३७० ॥ अगा नित्य सूर्याचा उदय अस्त । आणि नित्य मर्यादा न लंघिती सागर समस्त । इत्यादि माझें शासन ऐसें नेमस्त । लोक नेणती नियत ह्मणोनी ॥ ७१ ॥ नियत उदयास्त पावे दिनकर । नियत मर्यादा न लंघिती सागर । ह्मणोनि यांचा नियंता ईश्वर । ऐसें कळेना जनातें ॥ ७२ ॥ वर्षाकाळीं नियत वृष्टी । असती आणि पिकती नियत सृष्टी । तरी न दिसे तें तर्काच्याही दृष्टी । ईश्वर एक आहे ऐसें जनातें ॥ ७३ ॥ हें कळावें जना । ह्मणोनि वृष्टि अवतारितों अर्जुना । तेव्हां मज जगज्जीवना । स्मरती लोक ॥ ७४ ॥ कोण उपजवी घन । कोण वर्षवी जीवन । जरी नसे जगज्जीवन । विश्वंभर भर्ता जगाचा ॥ ७५ ॥ आकाश नुसतें पोकळ । तेथें मेघ येती सजळ । त्या जळें जीवित्व सफळ । हें कर्तृत्व ईश्वराचें जन ह्मणे ॥ ७६ ॥ शास्त्रें पुराणें नेणती । सुहृत्पण ऐसें त्यांहीप्रती । दावितों आणि तर्कें मज समजती । ऐशा प्रकारें वर्षतों ॥ ७७ ॥ ते इहलोकसुखचि इच्छिती । मी तितकेंचि देतों त्यांप्रती । परि अर्जुना तुझी मती । एक विषमत्व येथें मजवरी स्थापील ॥ ७८ ॥ कीं सुहृत्सर्वांचा सम । परि स्वयें भक्तांस लभ्य सर्वोत्तम । इतरांस अन्नादि मात्र देतां विषम । कैसा नव्हे ॥ ७९ ॥ ऐसें ह्मणसी ह्मणोनि भाव । दावी परिहार याचा बोलतां देव । कीं विषम नसोनि देवाधिदेव ।

---

१ पाऊस पाडून. २ ज्याच्या नियमाचा कधींही भंग होत नाहीं असा.

विषम फळ मी देतसें ॥ १३८० ॥ मीच मुक्तांची मुक्ती । मीच विषयासक्तांची भुक्ती । वैषम्यपरिहारयुक्ती । ऐसी बोलतो या उत्तरार्धे ॥ ८१ ॥

॥ उत्तरार्ध ॥ अमृतं चैव मृत्युश्च सदसच्चाहमर्जुन ॥ १९ ॥

॥ टीका ॥ अमृत मीच साच । आणि मृत्युही मीच । अप्रपंच प्रपंच । सर्वही मी ॥ ८२ ॥ कीं भक्तांस अमृत । अभक्तांस मृत्यु निश्चित । दोन्ही दोनी मीच भगवंत । कीं सत् बरें असत् वाईट सर्वही मीच ॥ ८३ ॥ सुस्थळास मार्ग नीट । कुस्थळास आड वाट । परि वाट आणि स्थळें दोनी निपट । भूमीच ते ॥ ८४ ॥ त्या दोहींसही सम । भूमि सर्वथा नव्हे विषम । त्याच्या करणीनें उत्तमाधम । फळें ते पावती ॥८५॥ मीच मोक्ष अमृत । जे मुमुक्षु पावती निश्चित । मृत्युही मीच भगवंत । मुमुक्षु विषयासक्त पावती ॥ ८६ ॥ याकारणें बरें वाईट । दोनीही मीच निपट । एकचि तंतु एकचि पट । राजहंस कावळे विणले तंतूच तो ॥८७॥ अमृत मृत्यु मी जेव्हां केवळ । तेव्हां मीच भक्तां अभक्तांचें फळ । ह्मणोनिया अर्धे मेघनीळ । ऐसें बोलिला ॥ ८८ ॥ ते अपेक्षानुरूप फळ पावती । हे सूचना संज्ञारूपें अर्जुनाप्रती । येथवरी बोलिला आतां जगत्पती । स्पष्ट बोलतो येथुनी ॥ ८९ ॥ परि अमृत मुमुक्षु इच्छिती । तें उचित देणें त्यांप्रती । मृत्यु तों कोणी न मागती । तो मृत्यु सकामास कां देतसे ॥१३९०॥ अर्जुन ये रीती मनीं । शंका मानील ह्मणोनी । अपथ्य पथ्य इच्छितां दोहीं करूनी । रोग आरोग्य पावती न मागतां ॥ ९१ ॥ आणि आरोग्याची अपेक्षा । तैसी मुमुक्षूची मुमुक्षा । पथ्यें आरोग्यबोधें मोक्षा । मुमुक्षु पावती अमृत तें ॥ ९२ ॥ तैसी त्यांस मृत्यूची अपेक्षा । नसे जे ओंवती सकामपक्षा । ह्मणोनि मुमुक्षु फळसाम्य अंबुजाक्षा । बोलतां नये सकाम फळ मृत्यूतें ॥ ९३ ॥ कीं ते अमृत इच्छिती । हे कांहीं मृत्यूतें न मागती । अमृत मृत्यु दोनी गती । अपेक्षानुरूप हे रीती घडेना ॥ ९४ ॥ आतां अपथ्य रोगाचें मूळ । आणि आरोग्य पथ्याचें फळ । मृत्यु सकाम पावती सकळ । अमृत पावती स्वभक्त ॥ ९५ ॥ याप्रकारें मी सम । फल देतांही अधम उत्तम । परंतु इच्छा पाहतां विषम । कीं न इच्छितां मृत्यु देतसें ॥ ९६ ॥ मोक्ष इच्छेवांचूनि नसे । मृत्यु इच्छेवांचूनि दिसे । तरी याही वैषम्यास असे । परिहार कांहीं ॥ ९७ ॥ भक्तीवांचूनि मुक्तीही भक्त । न अपेक्षिती तथापि होतीच मुक्त । याच्या साम्यें युक्त । मृत्यु न इच्छितां

---

१ श्लोकार्धानें.

मृत्यु, बोलणें सकामातें ॥ ९८ ॥ न इच्छितां मृत्यु त्यांला । न इच्छितां अमृत यांला ।'अपथ्य पथ्य सेवी तयां उभयांला । रोग आरोग्य न मागतांही ॥ ९९ ॥ ह्मणोनि जे सकाम । त्यांस पुनः पुनः मृत्यु ह्मणोनि मेघश्याम । आदीं बोलतो विश्वाभिराम । या दों श्लोकीं ॥ १४०० ॥

॥ श्लोक ॥ त्रैविद्या मां सोमपाः पूतपापा यज्ञैरिष्ट्वा स्वर्गतिं प्रार्थयंते ।
ते पुण्यमासाद्य सुरेंद्रलोकमश्नंति दिव्यान्दिवि देवभोगान् ॥ २० ॥
ते तं भुक्त्वा स्वर्गलोकं विशालं क्षीणे पुण्ये मर्त्यलोकं विशंति ।
एवं त्रयीधर्ममनुप्रपन्ना गतागतं कामकामा लभंते ॥ २१ ॥

॥ टीका ॥ वेदविद्या अत्राविया तीनी । ऋग्वेद यजुर्वेद सामवेद ह्मणोनी । तिहीं वेदमंत्रीं मातें यजूनी । प्रार्थिती स्वर्ग ॥ १ ॥ करूनि सोमवल्लीरसपान । होती यज्ञें निष्पाप पावन । इंद्रादिरूपें मी जगज्जीवन । त्या मातें अग्निमुखें ते यजिती ॥ २ ॥ स्वर्ग परम पुण्यलोक । पुण्येंच पावती पुण्यश्लोक । यज्ञ करूनि ते याज्ञिक । त्या स्वर्गास पावती ॥ ३ ॥ पुण्यें सुरेंद्रलोक तो स्वर्ग । त्यातें पावोनि देवांचे दिव्य भोग । भोगिती ज्या भोगाचा योगयोग । घडे परम पुण्यें करोनी ॥ ४ ॥ तो स्वर्गलोक विशाळ । भोगोनि ते नियतकाळ । तें पुण्य सरतां तत्काळ । मृत्युलोकीं गर्भवासीं प्रवेशती ॥ ५ ॥ ऐसे वेदत्रयाचे धर्म । त्यांतें शरण तेचि करिती काम्य कर्म । ते न जाणती आत्मा ब्रह्म । जाणें येणेंचि[1] ते पावती ॥ ६ ॥ हे इतर देवता यजिती । आणि मातें यजिती ह्मणे श्रीपती । त्यांची ही दैवी प्रकृती । ऐसें सूचवी ॥ ७ ॥ कीं स्वर्ग सर्वदेवतारूपें ईश्वर । स्वयमेव यज्ञभोक्ता फलदाता परात्पर । ऐसें जाणोनिही विषयतत्पर । ह्मणोनि काम्यें इतर देवता यजिती ॥ ८ ॥ ज्यांचा ऐसा नाहीं भाव । यजिती । स्वतंत्र मानूनि देव । ते सकळ असुरस्वभाव । नरकास जाती ऐसें स्पष्ट षोडशीं बोलेल ॥ ९ ॥ यालागीं स्वर्ग उत्तमा गती । हे निष्पाप सोमपानीं ह्मणे श्रीपती । आतां मृत्युलोकास मागुती येती । हा सहज गुण काम्यकर्मांचा ॥१४१०॥ एवं कर्म स्वर्गाकारणें करूनी । मृत्युलोकास पावती पुन्हा ह्मणोनी । अपथ्य भक्षितां रोग यावरूनी । काम्य इच्छितां मृत्यु हें सूचवी ॥ ११ ॥ आतां गोड ह्मणोनीच अमृत । सेविती परि तें अमृत निश्चित । अमर करीच गुण हा नियत । अमृताचा ॥ १२ ॥ भक्त माझे ये रीतीं । केवळ गोडच मी ह्मणोनि भजती । कांहींच मज न मागती । परि माझा सहज गुण मी करितों

१ मृत्यु. २ पुनर्जन्म.

॥ १३ ॥ जैसें न इच्छितां सकाम पावती मरण । कीं काम्य उपासनेचा सहज गुण । तैसें भक्तांचें सकळ कल्याण । न इच्छितां करावें गुण माझा ॥ १४ ॥ ह्मणोनि वर्णोनि आधीं सकाम । आतां मोक्षाविषयीं निष्काम । ते स्वभक्त सगुण मेघश्याम । बोलतसे या श्लोकीं ॥ १५ ॥

॥ श्लोक ॥ अनन्याश्चिंतयंतो मां ये जनाः पर्युपासते ।
तेषां नित्याभियुक्तानां योगक्षेमं वहाम्यहम् ॥ २२ ॥

॥ टीका ॥ अगा अर्जुना जे अनन्य । ह्मणजे मज वेगळें नलगे ज्यांस अन्य । कीं शाश्वत मोक्षही न इच्छिती ते धन्य । तेव्हां नश्वरें पदार्थ इच्छिती ते काय ॥ १६ ॥ माझे चरण लागतां गोड । ज्यांची मुमुक्षाही जाली रोड । माझ्या चिंतनाचेंचि कोड । सर्वदा जयांसी ॥ १७ ॥ ज्यांस ऐसें माझें भजन । मज वेगळें कांहीं न इच्छिती जे जन । परि मी सकळ सुखदाता भवभंजन । योगक्षेम वाहतों तयांचा ॥ १८ ॥ अर्जुना ऐसे माझे भक्त । ते ह्मणावे नित्याभियुक्त । सर्वदा सर्व भावें युक्त । नित्याभियुक्त ते ह्मणावे ॥ १९ ॥ माय बाप गुरु दैवत । भुक्ति मुक्ति मीच भगवंत । वाटतो मजविरहित । मुक्तीही नलगे जयांला ॥ १४२० ॥ मुमुक्षु कैवल्यातें अपेक्षिती । हे त्यांतेंही उपेक्षिती । स्वार्थ भक्तीचा लक्षिती । कैवल्यांत कैंचा तो स्वार्थ ॥ २१ ॥ माझेंचि त्यांला प्रेम । अन्य कांहींच नलगे हा नेम । मज अगत्य त्यांचा योगक्षेम । सर्वविषयीं वाहणें ॥ २२ ॥ अगा करोनि पुण्याच्या कोटी । उपजावें भाग्यवंताच्या पोटीं । मग कोड कौतुकासाठीं । प्रार्थणें नलगे तयातें ॥ २३ ॥ पोटीं उपजतांच वाटे गोड । स्वभावेंच त्याचें पुरवी कोड । जतन करी जैसा तळहातींचा फोड । न प्रार्थितां ॥२४॥ गर्भ राहतां पोटीं । चिमणी त्या आंडियांसाठीं । तृण कापुसाची मृदु गोमटी । शेज करितां ते प्रार्थिती काय ॥ २५ ॥ सहज संतानाची माया । पोटासच यावें ते भोग द्यावया । भक्तचि व्हावें धनंजया । मग दया मागणें लागेचना ॥ २६ ॥ जरी त्यांस नाहीं कांहीं अपेक्षा । मज कोणे अंशीं त्यांची न करवे उपेक्षा । त्यांस नाहीं मुमुक्षा । परि मी कैसें गर्भवासी त्यां घालूं ॥ २७ ॥ सर्पास भीना बाळ । मुष्टि धरूं धांवे व्याळ । परंतु माता उचलोनि तत्काळ । तोंड ठेची सर्पाचें ॥ २८ ॥ न मागतां देतों ज्ञान । न सांगतां नाशितों अज्ञान । न प्रार्थितां शाश्वतसुख निधान । मोक्ष देतों ॥ २९ ॥ पूर्वी आपणास जें नव्हतें । आणि तें प्राप्त

१ ज्याचा अवश्य नाश व्हावयाचा तो. २ कौतुक

होतें । ऐसें प्राप्त होणें तयातें । योग ह्मणती ॥ ३० ॥ कीं त्या अर्थाचा आणि आपला । प्राप्त होतां योग जाला । योग ह्मणोनि त्याला । ह्मणावें हा अर्थ योग शब्दाचा ॥ ३१ ॥ भक्त सर्वत्र उदास । परि जे समयीं जें व्हावें त्यांस । तें मी पुरवीं जगन्निवास । योग वाहतों त्यांचा ये रीती ॥ ३२ ॥ आतां प्राप्त जालें जें नव्हतें । जतन करावें तयातें । ह्मणावें त्या अर्थपरिपालनातें । क्षेम ह्मणोनी ॥ ३३ ॥ एवं नाहीं जें जें तें देतों । याप्रकारें योग वाहतों । दिधलें तें मीच जतन करितों । क्षेम वाहतों ये रीती ॥ ३४ ॥ आंगडीं टोपी शिदोरी । बाळास पाहिजे जे जे परी । तें संपादूनि खांदिया वरी । वाहे जतनही करी पिता जैसा ॥ ३५ ॥ माझ्या भक्तांतें अर्जुना । अपेक्षा मोक्षाचीही असेना । परि योगक्षेम मज त्यांचा कृपावना । सहज स्वभावें वाहणें ॥ ३६ ॥ होऊनि गुरुरूपें प्रगट । आत्मसाक्षात्कार अति उत्कट । देतों आणि तंतुरूपें जगपट । चराचर प्रतिमासहित मी दिसतों ॥ ३७ ॥ नव्हतें तें दिधलें ज्ञान । त्याणें हरिलें अनादि अज्ञान । योग वाहतों मी कृपानिधान । ये रीती तयांचा ॥ ३८ ॥ क्षेम त्याचें परिपालन । कीं तें ज्ञान विज्ञान होय जतन । तेंही मीच करुणाघन । वाहतों त्यांचें ॥ ३९ ॥ कीं पूर्वसंस्कारें त्यांची मती । क्षण पावतां स्वरूपाची विस्मृती । जागी करितों मी जगत्पती । स्वस्वरूपीं बुद्धीतें ॥१४४०॥ अगा ते विसरती मातें । कीं पूर्वसंस्कार असे लागला त्यांतें । म्यां नित्यमुक्तें भगवंतें । विसरावें कैसें तयाला ॥ ४१ ॥ समर्थासि दुर्बळ जन । जरी कदन्न वाढी भोजन । न करी सभाग्य सधन । वाणी दिव्यान्नाची तयातें ॥ ४२ ॥ अगा मी स्वयें जालों सर्व सृष्टी । तों पूर्वसंस्कारें जडत्वदृष्टी । क्षण पाहे तों मी वृष्टी । करितों करुणामृताची ॥ ४३ ॥ तेव्हां तंतु जैसा पटीं । कीं मृत्तिका मात्र जैसी घटीं । कीं सुवर्ण कटक कटिसूत्र मुगुटीं । पाहे जडीं ये रीती मातें एकत्वें ॥ ४४ ॥ त्यांस माझें प्रेम । मज त्याहूनि अधिक त्याचें प्रेम हा नियम । नवल काय जरी योगक्षेम । वाहतों त्यांचे ॥ ४५ ॥ योगक्षेम वाहतों ह्मणोनी । बोले या भावें करूनी । कीं नव्हतें तें ज्ञान देऊनी । बिंबवितों करितों जतन तें ॥४६॥ अन्नवस्त्रादि पदार्थ । यांचें योगक्षेम वाहतो इतकाच अर्थ । कोणी करिती तरी गजांतलक्ष्मी देतो समर्थ । तो पादरक्षांची चिंता वाहतो ह्मणणें हें काय ॥ ४७ ॥ लोटे अमृताची सरिता । अमर करी तत्त्वता । ते हरी तृषेची चिंता । ह्मणणेंचि नलगे ॥ ४८ ॥ जो करून देतो विवाह । तो हळदीचा न करील काय निर्वाह । ज्ञानें नाशी अवघा

अज्ञानप्रवाह । अन्नवस्त्रादि नेदील तो काय ॥ ४९ ॥ ज्यास सर्वेश्वराचें प्रेम । तो त्याचें अन्नवस्त्र योगक्षेम । मी वाहतों म्हणोनि करितों म्हणे नियम । भुज उभारोनि दोहीं दळांत ॥१४५०॥ राजा तुष्टला दुर्बळावरी । तो त्याच्या लंगोटीवाकळांचा निर्वाह करी । आणि तें जतन करावयाचा मजवरी । भार असे ऐसें म्हणतसे ॥ ५१ ॥ कुटुंबनिर्वाह भक्तांचा । अथवा कुटुंबनिर्वाह अभक्तांचा । उभयत्रही रांधा पूर्वकर्माचा । संतुष्ट भक्त असंतुष्ट अभक्त इतकेंचि ॥ ५२ ॥ प्रारब्धें यावदायुष्य । सुखदुःख पावे भलता मनुष्य । याचें पाहोनि भविष्य । पूर्वीच निर्वाह केला ईश्वरें ॥ ५३ ॥ भक्त भजेल मातें । जें ज्याकाळीं पाहिजे तयातें । तें आदींच निर्मिलें भगवंतें । योगक्षेम वाहणें हा किती ॥ ५४ ॥ जें जे समयीं अपेक्षित । तें पूर्वींच करून राहिला भगवंत । प्रारब्धीं नसेल तेविषयीं अत्यंत । सहनशील करी तयांतें ॥ ५५ ॥ राज्य टाकूनि वनवास । राजे करिती तयांस । कां नेदी जवन्निवास । दिव्यान्नवस्त्र दिव्य शय्या ॥५६ ॥ सर्वात्मभक्ति त्यांला अपेक्षित । त्या गोष्टीचा भार वाहतो भगवंत । आणि ज्याविण न चले अत्यंत । तें दे अथवा शक्ति दे ॥ ५७ ॥ देह न सोसी कदन्न । त्यांच्या प्रारब्धीं पूर्वींच निर्मी सदन्न । अथवा पर्ण भक्षूनि भक्तिसंपन्न । तैसेंच दृढ शरीर त्यांचें तो करी ॥५८॥ ज्ञान देऊनि योग वाहे । तें विंबे ऐसें क्षेम वाहताहे । तो शरीर योगक्षेमही पाहे । कीं स्वच्छ शरीर तरी तें ज्ञान विंबतें ॥ ५९ ॥ भक्तांचें ओझें सकळ । वाहतो भक्तवत्सल । परि योगक्षेमशब्दें दृष्टफळ । इतकेंचि नव्हे ॥१४६०॥ प्रस्तुत इतर देवतांचे सकाम । पावोनि स्वर्ग देवांचें धाम । पुनः मृत्युमुखीं पडती म्हणे मेघश्याम । आणि स्वभक्त योगक्षेम म्हणे मी वाहतों ॥ ६१ ॥ योगक्षेम या प्रकरणीं । ऐसा वर्णावा निपुणीं । कीं जन्ममरणवार्ताही श्रवणीं । पडों नेदी भक्तांचिया ॥ ६२ ॥ ज्या ज्ञानें खुंटे जन्ममरणप्रवाह । त्याचा योग आणि त्याचा क्षेमाचा निर्वाह । विझे अनादि तापत्रयाचा दाह । तेथें क्षुधा तृषा दाहशांति न घडे काय ॥ ६३ ॥ एवं इतर देवता यजिती । ते पदें पावोनिहि मृत्यु पावती । ते काय मृत्यु आपणातें अपेक्षिती । तथापि मृत्यु अभक्तां इतर भक्तांतें निश्चित ॥ ६४ ॥ आणि आपणावांचुनि अन्य । न अपेक्षिती कांहीं अनन्य । ते मोक्षामृत न इच्छिती जरी धन्य । तथापि योगक्षेम त्यांचा मी वाहतों ॥ ६५ ॥ एवं अपेक्षानुरूप सर्वोत्तम । फळ देऊनिही विषम । दिसे तरी विषम नव्हे सर्व सम । प्रसंग ऐसा ॥६६॥ तरी मुमुक्षूंस मोक्षाची मुमुक्षा । त्यांस अमृत देणें

उचित अंबुजाक्षा । परि सकामास मृत्यूची तों अपेक्षा । नसोनि कां मृत्यु देतो ईश्वर ॥ ६७ ॥ हे अपेक्षिती स्वर्गादि गती । आणि मृत्यु न मागतां पावती । रोग न इच्छिती आणि अपथ्य करिती । परि रोग फळ त्याचें वस्तुस्वभाव ॥ ६८ ॥ न इच्छितां मृत्यु ये रीती । न इच्छितां अमृत ही भक्तांची गती । ह्मणोनि योगक्षेम मी वाहतों श्रीपती । न इच्छितां अमृत देतों हा स्वभाव माझा ॥ ६९ ॥ वैषम्यपरिहार ऐसा करी । प्रसंग ऐसा आला येथवरी । तों शंका उपजली याउपरी । वैषम्य मागुती लागेल ॥ १४७० ॥ कीं सर्व आपणचि ह्मणतो । आणि इतरदेवताभक्तांस इतर फळ देतो । आणि योगक्षेम वाहतो । स्वभक्तांचा ॥ ७१ ॥ काय नव्हे हा सर्वदेवता । होय तरी स्वभक्तांतेंचि कां अमृतदाता । इतर योगक्षेमचिंता । कां न वाहे ॥ ७२ ॥ या शंकेचा परिहार । भेदाचा करावा अंगीकार । अथवा फळ एक प्रकार । बोलावें इतर भक्तां स्वभक्तांतें ॥ ७३ ॥ तरी दोनी गोष्टी बोलणें विरुद्ध । उपाधिभेदें फळभेद सिद्ध । ह्मणोनि दृष्टांत सूचवूनि प्रसिद्ध । बोलतसे हा श्लोक ॥ ७४ ॥

॥ श्लोक ॥ येऽप्यन्यदेवताभक्ता यजंते श्रद्धयान्विताः ।
तेऽपि मामेव कौंतेय यजंत्यविधिपूर्वकम् ॥ २३ ॥

॥ टीका ॥ अगा जे इतर देवता यजती । त्यांच्या श्रद्धेनें युक्त असती। तेही मातेंचि पूजिती । परंतु अविधिपूर्वक ॥ ७५ ॥ कीं मी आणि त्या अन्य देवता । एकचि असों तत्त्वता । त्यांच्या यजनें मज अच्युता । यजतीच ते ॥ ७६॥ परि ते विधि चुकती । कीं विष्णुरूपेंचि मातें न पूजिती । नित्य फलप्राप्तीच्या विधीची रीती । हे कीं विष्णुरूपें भजावें मज ॥७७॥ अगा आपलाच देह सगळा । नवद्वारीं न ह्मणवे वेगळा । परि तृप्तीची आणि क्षुधानिवृत्तीची कळा । मुखींच असे ॥ ७८ ॥ अन्नें क्षुधा नासे अन्नें पुष्टी । परि इतकाच विधि याचा दिसे दृष्टी । कीं मुखद्वारानें उदरांत वृष्टी । षड्रसांची करावी ॥ ७९ ॥ मुखें आणि इतर द्वारें । वेगळीं नव्हती ऐक्यनिर्धारें । परि अन्न इतर द्वारीं घालतील अविचारें । ते विधि चुकले ॥ १४८० ॥ चरणीं आणि शिरीं । नसे देह वेगळा परी । शिरोवेष्टन गुंडाळी पायीं जरी । विधि चुकला ह्मणावा तो ॥ ८१ ॥ भूमि एकचि सर्वत्र । परि पिके एकत्र तें न पिके अन्यत्र । मज देवांस चित्स्वरूपीं मात्र। ऐक्य परि उपाधिभेदें उंच नीच ॥ ८२ ॥ लोखंडाचीच बेडी । लोखंडाचेंच शस्त्र तोडी । ऐक्य दोहींचें न सोडी । लोखंड तें ॥ ८३ ॥ परंतु बेडी

नाशपण । हा शस्त्राच्याच आंगीं गुण । मोक्षप्रद ब्रह्म सगुण । ऐक्य जरी देवां सर्वांसी ॥ ८४ ॥ बेडी तुटाया बेडीची । प्रार्थना ते एकत्वें शस्त्रास पावली साची । परंतु न तुटतां बेडीनें बेडी त्याची । अविधिपूर्वक जाली प्रार्थना ॥ ८५॥ मुकुंदावांचोनि मुक्ति । इतर देव देईल ऐसी भक्ती । श्रद्धा फळेल ह्मणोनि आसक्ती । धरितांही न फळे कदापी ॥ ८६ ॥ श्रद्धा आस्तिकबुद्धी । फळ होईल ऐसी विश्वासाची समृद्धी । परंतु पुच्छश्रद्धा क्षीरसिद्धी । न करी विना गोस्तना ॥ ८७ ॥ स्तन पुच्छ शृंग कान । सर्वत्र देह गायींचा समान । भेद नसे परि विना स्तन । नव्हे प्राप्ति दुग्धाची ॥ ८८ ॥ मुखीं घातला ग्रास । तो पावेल त्याचा गोरस । परि हात न लावितां स्तनास । दुग्ध कैचें ॥ ८९ ॥ ब्रह्मचि मी सर्वेश्वर । ब्रह्मचि देवता इतर । परि मोक्ष नव्हे विना श्रीधर । मोक्षार्थ अविधिभजन अन्यदेवतांचें ॥ १४९० ॥ इतर देवतांतें भजती । स्वर्गादि गति पावोनिही च्यवती । त्या प्रसंगीं श्रीपती । हा श्लोक ऐसा बोलिला ॥९१॥ कीं पाहतां सर्व वेदसिद्धांत । सर्वही ब्रह्म अद्वैत । तेव्हां जो जें भजे दैवत । तें भजन अपलेंची हें सत्य ॥ ९२ ॥ ऐसें असोनि योगक्षेम । स्वभक्तांचा वाहतो हा नेम । पूर्वश्लोकीं बोलिला सर्वोत्तम । विरोध अद्वैतीं हा आला ॥ ९३ ॥ ह्मणोनि त्याचा परिहार । बोलतां दाखवी ऐसा प्रकार । कीं तें माझेंच भजन हा निर्धार । परि तें अविधिपूर्वक ॥ ९४ ॥ येथें कोणी टीकाकार । जे अंतरीं भजती देवतांतर । ते अविधिपूर्वक ह्मणतां प्रकार । आणिकचि वाखाणिती ॥ ९५ ॥ कीं मोक्षाचा विधि जैसा । तो न घडला त्यांस तैसा । यांत अर्थ साधिती ऐसा । कीं मोक्ष इतरदेवताभजनेंही घडेच ॥ ९६ ॥ परि करिती अविधिपूर्वक भजन । ह्मणोनि मोक्ष न पावती ते जन । जरी मोक्षप्राप्तिविधान । घडे तरी मोक्ष त्यांसही ॥ ९७ ॥ ऐसा बोलती अर्थ । परि विचारितां होतो अनर्थ । बडिवाराच कारणें व्यर्थ । वाखाणिती गीता ॥९८॥ भजतां अन्यदेवतागण । नव्हे मोक्ष या गोष्टीस कारण । जरी निमित्त अविधिपूर्वकपण । बोलतो ह्मणावा ॥ ९९॥ आणि या प्रसंगीं आपणास त्यांस । एकत्व बोलतो जगन्निवास । त्यांतें पूजिलें तिहीं निश्चयें आपणास । पूजिलें ऐसें ह्मणतसे ॥ १६०० ॥ देवांस आपणास नाहीं द्वैत । जैसें मत्स्यकूर्मादि रामकृष्णरूपीं अद्वैत । तेव्हां राम भजतां निश्चित । भजलाच कृष्णातें ॥ १ ॥ कृष्णापासोनि होणार मुक्ती । तेच होणार करितां रामभक्ती । इतर देवता आणि विष्णवैक्याविषयीं युक्ती । ऐसी येथें बोलावी ॥ २ ॥ तेव्हां राम-

भजनीं जे लोक । न करिती मोक्षप्राप्ति विधिपूर्वक । त्यांस मोक्ष न घडे ह्मणतां कृष्णोपासक । अविधिपूर्वक न पावणार हेही मुक्तीतें ॥ ३ ॥ ऐसें असतां भक्त आपले । अविधिपूर्वक भजतांही भले । आणि अविधिपूर्वक रामभक्त वाईट ऐसें बोले । तरी उभय भजन सम बोलतो ह्मणवेना ॥४॥ प्रस्तुत तों अविधिपूर्वक । भजतांही आपले उपासक । अतिश्रेष्ठ आणि इतर देवांचे सेवक । निंदी त्याच अविधीनें ॥ ५ ॥ सप्तमीं चतुर्विध भक्त । त्यांत आर्त अर्थार्थी कामनायुक्त । कां मग तेथें जाले प्रसक्त । अविधिपूर्वकत्व योग्य निंदेसी ॥ ६ ॥ काम्यफळीं जे रत । ते मोक्षप्राप्तिविधि चुकले निश्चित । ऐसें असोनि भगवंत । आर्त अर्थार्थी कामनायुक्तही वर्णी श्रेष्ठत्वें ॥ ७ ॥ आर्त ह्मणजे रोगी । भजे रोगपरिहारालागीं । आणि अर्थ धन त्यातें अर्थी अपेक्षी जगीं । अर्थार्थी सकाम बोलावा ॥ ८ ॥ ऐसे कर्मेंकरून युक्त । तेही उदार ह्मणतो स्वभक्त । आणि सकाम अन्यदेवताभजनीं अनुरक्त । सप्तमींच निंदी तयांतें ॥ ९ ॥ " कामैस्तैस्तैर्हृतज्ञानाः " । या श्लोकीं ह्मणे अर्जुना । करिती अन्यदेवतोपासना । कामें हरिलीं ज्ञानें जयांचीं ॥ १६१० ॥ एवं आर्त आणि अर्थार्थी दोघे कामयुक्त । तैसेच हे सकाम अन्य देवताभक्त । हे कां वाईट आणि स्वभजनीं अनुरक्त । ते कां उदार सर्वकामही ह्मणावे ॥ ११ ॥ दोघेही मोक्षविधि चुकले । दोघेही सकाम जेव्हां भजों लागले । आणि दोघेही आपलेच भक्त जाले । कीं भेद आपणा अन्य देवां असेना ॥ १२ ॥ भजतां सूर्यवंशी राम । भजले कृष्णच मेघश्याम । जरी ऐसें ऐक्य असतें तरी सकाम । स्वभक्त आणि अन्यदेवताभक्त सम होतो ॥१३॥ स्वरूपभेद नसे अथवा नसे उपाधिभेद । रामकृष्णीं ऐसा अभेद । इतर देव आणि ईश्वर यांसी वेद । भेद उपाधिगत बोलती ॥ १४ ॥ अभेदस्वरूपीं तें निर्गुण । ईश्वरोपाधि जीवोपाधि भिन्नपण । ईश्वर तो ब्रह्म सगुण । मोक्षप्रदत्व इतरीं असेना ॥ १५ ॥ या भावें ह्मणतो हरी । कीं अन्यदेवता भजतां मातेंच भजले परी । अविधिपूर्वक कीं मुक्ति तोंवरी । नव्हे जों ईश्वरोपाधियुक्त ब्रह्मीं न भजती ॥ १६ ॥ देवांस मज ऐक्य निर्गुणपणीं । परि अविद्या न नासे निर्गुणीं । कीं सत्य रज्जु लटिका फणी । न नासे नुसत्या रज्जूतें ॥ १७॥ रज्जूविषयीं अज्ञान । त्या अज्ञानें दोरीं सर्पभान । त्या रज्जूचें होतां ज्ञान । त्या ज्ञानें नासे तो सर्प ॥ १८ ॥ निर्गुणविद्या अविद्या दोहींचें प्रकाशक । सगुणविद्योपाधि अविद्यानाशक । ह्मणोनि अन्यदेवतोपासक । मुमुक्षुही विधि चुकले ॥ १९ ॥

मोक्षविधियुक्तही भजती । तथापि मोक्ष नेदी देवता भलती । कीं तेचि मुक्तीतें पावती । जे भजती ईश्वरातें ॥ १५२० ॥ आतां ऐक्य परस्पर । ह्मणोनि सर्व देव आणि सर्वेश्वर । एकचि तेव्हां चराचर । काय असे वेगळें त्याहुनी ॥ २१ ॥ तरी देवचि काय अधिक । श्वान सूकरादि सर्व एक । उपासना कां न करिती लोक । श्वान सूकर गर्दभादिकांची ॥ २२ ॥ ज्ञानी सर्वांसि वंदिती । तरी तें ज्ञान ईश्वराराधनें पावती । मग ते सर्वांभूतीं भजती । " वासुदेवः सर्वमिति " ह्मणोनि सप्तमींही बोलिलें ॥ २३ ॥ धरि मोक्षकारण ज्ञान । तदर्थ श्वानसूकरांचें भजन । करितां मोक्ष पावती जन । हें तों घडेना ॥ २४ ॥ आतां श्वानसूकरादि गण । यांस नाहीं दैवतपण । ह्मणोनि श्वानसूकरादिभक्ती कोणी निपुण । न करिती ऐसें ह्मणावें ॥ २५ ॥ तरी दैवतपण नसे । तथापि भिन्नत्व तों न दिसे । कीं भेद असतां तरी कैसे । वेद सर्व ब्रह्म बोलते ॥ २६ ॥ नसोनिही भेद । असोनिही अभेद । दैवतपण ह्मणोनि वेद । कां हो उपास्यत्वें श्रेष्ठ ह्मणती देवांतें॥२७॥एवं च उपाधिभेदें फलप्राप्तिभेद । उपासने कामा नये स्वरूपाभेद । श्वानसूकरादि नांवें आहुति वेद । न बोलती पुत्रादिकामा यागांत ॥२८॥ सूकराय स्वाहा गर्दभाय स्वाहा । कां स्वर्गादि फळ नेदी याग हा । वेदतात्पर्य तों महा । सर्व ब्रह्म ह्मणोनि एकत्वीं सर्वांच्या॥२९॥एवं उपाधिभेदें फळभेद । ह्मणोनि ईश्वरानुग्रहें मोक्ष बोलती वेद । काय जालें जरी जाला अभेद । सर्वांसही ॥ १५३० ॥ एवं सर्वेश्वरत्व जेथें । वेद बोलती मोक्षप्रदत्व तेथें । ऐक्य असोनिही प्रस्तुत येथें । अन्य भजन अविधिपूर्वक ह्मणे भगवंत ॥३१॥ ह्मणतांच अन्यदेवता । अन्यत्व समजे श्रोता । आणि मातेंचि ते यजिती ह्मणतां तत्त्वता । समजे कीं अभेदही बोले ये रीती ॥ ३२ ॥ एवं च अन्यदेवताभजनीं । भगवद्भजनरूप ऐक्य करुनी । आणि मोक्ष नव्हे आपणावांचुनी । अविधिपूर्वकत्व उपाधिभिन्नत्वें ॥ ३३ ॥ आतां उपाधीही अवघी माया । परंतु विद्याच पाहिजे अविद्या जाया । ह्मणोनि अनादि विद्योपाधि देवराया । भजणें तेंचि मुक्तिप्राप्तिविधिपूर्वकत्व ॥ ३४ ॥ असो बहुत बोलायाचें हें स्थळ । कीं ईश्वरोपाधि आणि ब्रह्म केवळ । तो भगवंत इतर देवोपाधि जळ । सचेतन त्याच्या प्रतिबिंबें ॥ ३५ ॥ बोलों जातां तो विचार । ग्रंथ वाढेल बहु फार । एवं व्यर्थ वेडेचार । मोक्ष इतर देवताभजनीं बोलणें ॥ ३६ ॥ स्वयें अंतरीं अन्य उपासक । आणि आपली टीका वाचोत इतर देवांचेही सेवक । कांहीं चरफड कांहीं प्रतिष्ठा कामुक ।

ते इतरदेवताभजनीं मोक्ष उपपादिती ॥ ३७ ॥ तथापि ते अर्थ । बाधित-
पणें दिसती व्यर्थ । जे हे यथार्थदीपिका पाहती यथार्थ । मध्यस्थरीती मत्सर
टाकोनियां ॥ ३८ ॥ या अन्यदेवताभजनीं कारण । अल्पदृष्टि अद्वैताचें
श्रवण । तत्त्वतां न समजलें ब्रह्म सगुण । सर्व निर्गुण एकतां मोहिले ॥३९॥
ह्मणोनि इतरदेवतांतें भजती । आणि त्या उपास्यदेवांतेंही पावती । पा-
वोनि समग्र भजन फळही च्यवती । ऐसें आतां दों श्लोकीं बोलेल ॥ १६४०॥
त्यांतें ईश्वरोपाधित्व आपलें । आणि तदधीनत्व सर्वां देवांस हें नाहीं कळ-
लें । ह्मणोनि नेणतां च्यवती हें बोलों आरंभिलें प्रथम । या श्लोकीं ॥ ४१ ॥

॥ श्लोक ॥ अहं हि सर्वयज्ञानां भोक्ता च प्रभुरेव च ।
न तु मामभिजानंति तत्त्वेनातश्च्यवंति ते ॥ २४ ॥

॥ टीका ॥ भोक्ता सर्व यज्ञांचा । अगा अर्जुना मीच साचा । कां ह्म-
णसील तरी देवां सर्वांचा । प्रभु मी ह्मणिजे धनी मी ॥ ४२ ॥ "भोक्ता च
प्रभुरेव च" ह्मणोनी । या दों चकारें आणि एवकारें करूनी । "अहमेव"
ह्मणे यावरूनी । दुसरा कोणी सर्वयज्ञभोक्ता प्रभुही नव्हे हा अर्थ ॥ ४३ ॥
सर्व यज्ञ ह्मणतां सर्व । बोलोनि दाविलेच देव । आणि ह्मणे प्रभु अहमेव ।
प्रभु सर्वां देवांचा ह्मणोनी ॥ ४४ ॥ अगा ऐसा मी सर्वेश्वर । सर्वेश्वरत्व
माझें ऐसें जाणती चतुर । मातेंच भजती ते तत्पर । ह्मणोनि न च्यवती क-
दापी ॥ ४५ ॥ जे ऐसें न जाणती सर्वयज्ञभोक्तृत्व नेणती । माझें प्रभुत्व
ईश्वरत्वतत्त्व । तत्त्वेंकरूनी माझें सर्वेश्वरत्व । न जाणती च्यवती यालागीं
॥ ४६ ॥ ऐसें आपणास सर्वयज्ञभोक्तृत्व । ह्मणोनि सर्वांचें प्रभुत्व । ऐसें
तत्त्वें करून नेणती ह्मणतां तत्त्व । सर्वयज्ञभोक्तृत्वीं सूचवी ॥ ४७ ॥
स्वरूपीं सूचवी अद्वैत । उपाधींत दाखवी द्वैत । कीं मुख्य एका यागीं एक
दैवत । अंगभूत देवता आणखीं ॥ ४८ ॥ परि ज्यांच्या नांवें ज्या आ-
हुती । ते त्याच आहुतीतें भक्षिती । एकाच्या आहुति एक भक्षूं न शकती ।
यागीं एका असोनी ॥ ४९ ॥ ज्या जागीं जें नसे दैवत । तें तों नेणेच
त्या यज्ञातें निश्चित । सर्वयज्ञभोक्ता ह्मणूनि भगवंत । भोक्ता सर्वां आहु-
तींचा ॥ १६५० ॥ आणि त्याच्या नांवें आहुती । जरी कोणीही न होमि-
ती । तरी त्या यज्ञाचा भोक्ता श्रीपती । कीं यज्ञ तितका रूप त्याचें ॥५१॥
"यज्ञो वै विष्णुः" ऐसी श्रुती । त्याचें तात्पर्य बोलती । कीं अलंकार तितके
दिसती । नुसतें सुवर्ण ॥ ५२ ॥ एक कटिदोरा अलंकार । त्यांत नाना
कूसरी प्रकार । ते सर्वही सोनें परंतु जे जे आकार । त्या करितां रूप त्या

कटिदोरियाचें ॥ ५३ ॥ नाना देव कुंडें हविर्द्रव्यें मिळवूनीं । यजन होता ह्मणावा यज्ञ ह्मणोनी । ते यज्ञ सर्व हा सर्वेश्वर यावरूनी । मुख्य देवता अंगदेवता यज्ञाच्या सर्व हा ॥५४॥ " तेपि मामेव कौंतेय यजंति ।" ह्मणोनी पूर्वश्लोकीं बोले श्रीपती । तें ऐक्य सर्वां देवांस ये रीती । कीं कार्यासि ऐक्य कारणातें ॥ ५५ ॥ तथापि जें कारण । साधे त्यातेंचि कार्यरूपें सर्वपण । कीं सोनें नव्हे ऐसा कवण । असे अलंकार ॥ ५६ ॥ सरी मुधी कडीं चिं-तांक । जें पहावें तें कनक । परंतु मुगुट नव्हे कटक । कडें मुगुट होईचना ॥ ५७ ॥ देवता सर्व नारायण । परि इंद्रें न ह्मणवें वरुण । वरुण तोही मी इंद्र आपण । न मानी ऐसें ॥ ५८ ॥ करितां ब्रह्मयाचें आवाहन । प्रगट नव्हे सहस्रनयन । अथवा प्रगट नव्हे चतुरानन । आवाहनीं इंद्राच्या ॥ ५९॥ जो सुवर्णविक्रय करी । त्यास मागीतली सरी । सरी नसतां नेदी परी। इतर अलंकार असती त्यापाशीं सुवर्णाचे ॥ १५६० ॥ सरी मागतां कट-दोरा । प्राप्त नव्हे गिराइतका नरा । सोनें मागतां निघे सारा पसारा । नाना नगांचा ॥ ६१ ॥ तैसा सर्वयज्ञभोक्ता सर्वज्ञ । यजितां यजिलें सर्वय-ज्ञ । ह्मणोनि वेद आणि ऋषी सर्वज्ञ । यज्ञ ह्मणती विष्णूतें ॥ ६२ ॥ इंद्रा-च्या आवाहनीं । हरीही नये ह्मणोनी । कोणी ह्मणती तरी तोचि इंद्ररूपें करूनी । प्रगटतो ॥ ६३ ॥ त्याचे पद्मनाभादि देह । ते जगत्कारणाचे लीलाविग्रह । इंद्रादिकांसारिखा आग्रह । नसे देहात्मतेचा ॥ ६४ ॥ परि इंद्राची आहुति वरुण । घेतो ह्मणों शके ऐसा कवण । कीं ऐक्य सर्वां-परि कार्यपण । कडें ह्मणतां कटिदोरा केंवी येतो ॥ ६५ ॥ कारण स्वयें नारायण । तोचि निर्गुणही आणि सगुण । दोनी रूपों कारणपण । एकाच त्याला ॥ ६६ ॥ सुवर्णाचे नग हें खरें । तैसें निर्गुणचि जग पाहतां बरें । परि जग तो न जाला तेव्हां कोणत्या आकारें । सुवर्ण होतें ॥ ६७ ॥ लांव लाटा चतुष्कोण वर्तुळ । सोनें होतें तोही अलंकार नव्हे केवळ । पीत छाया नुसती झळाळ । दिसे कोणा एका आकाराची ॥६८॥ आदीं लाटा अथवा गोळा मग । त्या आकारापासूनि होय नग । तैसें माया शबलतेपासूनि जग । दृष्टांत एकदेशी परि श्रुतिसिद्ध ॥ ६९ ॥ निर्गुणीं आपण निर्गुण । माया योगेंचि ऐसी खूण । तो ईश्वर एवं जो निर्गुण ह्मणे आपण । तोचि निर्गुण सगुण होऊनिही ॥ १५७० ॥ एवं जो जगत्कारण । तोचि स्वयें यज्ञनाराय-ण । त्यातेंचि सर्वयज्ञभोक्तृत्वपण । प्रभुत्व त्यातेंचि सर्व देवांचें ॥ ७१ ॥

---

१ एका दागिन्याची संज्ञा.

एवं जेथें सर्वयज्ञभोक्तृत्व । तेथेंचि सर्वां देवांचें प्रभुत्व । च्यवती याचें न जाणतां तत्त्व । हें तत्त्वतः ह्मणतां तत्त्व ऐसें सूचाविलें ॥ ७२ ऐसें अल्पबुद्धीचें अद्वैतश्रवण । शब्दें ऐकोनि सर्व ब्रह्मर्पण । मोक्ष एका विष्णुभजनाविण । न घडे ऐसें न समजलें तत्त्व ॥ ७३ ॥ ते सर्व ब्रह्म ऐकोनि कानीं । अल्पदेवतोपासना करूनी । च्यवती अगा ह्मणोनी । या श्लोकीं बोलोनि आतां काय बोलतो याउपरी ॥ ७४ ॥ जे दीर्घदृष्टि ऐसें न पाहती । अद्वैत मात्र श्रवणें मोहती । त्यांतें ह्मणे च्यवती ते कोण ॥ ७५ ॥ विष्णूचेही उपासक । ऐसें तत्त्व नेणती कित्येक । इतरदेवतांचे सेवक । नेणतीच कीं ॥ ७६ ॥ तरी येथें च्यवती ह्मणोनी । स्वउपासकही यावरूनी । निंदिले च्यवती या शब्देंकरूनी । स्थळ हें ऐशा संशयाचें ॥७७॥ आणि तत्त्व ऐसें नेणती । ते जेव्हां ह्मणावे च्यवती । तरी आदीं पदें पावती । तेव्हां च्यवती ह्मणावें ॥ ७८ ॥ तरी यातें जे पावती । ते तों कधींहि न च्यवती । आणि च्यवती जे तत्त्वतां ईश्वरत्व नेणती । हें कैसें घडे ॥७९॥कीं भगवद्भजन करी परी । सर्वयज्ञभोक्तृत्व प्रभुत्वखूण नेणे तीं वरी पद पावोनि तोही तरी । च्यवतो ह्मणावा कीं काय ॥ १५८० ॥ इत्यादि शंकेचा परिहार । करावया सर्वेश्वर । बोलतसे यानंतर । हा श्लोक॥१८१॥

॥ श्लोक ॥ यांति देवव्रता देवान् पितॄन्यांति पितृव्रताः ।
भूतानि यांति भूतेज्या यांति मद्याजिनोपि माम् ॥ २८ ॥

॥ टीका ॥ धरूनि भलतें अल्प दैवत । त्यांच्या भजनीं दृढव्रत । ते देवव्रत पावती निश्चित । त्या देवांतें ॥ ८२ ॥ पितरांच्याच पूजनीं रत । ते ह्मणावे पितृव्रत । ते पावती निश्चित । पितृलोकीं पितरांतें ॥ ८३ ॥ जे वेताळादि भूतें । यजती तदर्थ नाना व्रतें । धरिती तेच गति तयांतें । कीं भूतें होऊनि भूतांतें पावती ॥ ८४ ॥ पितरांच्या पावोनि आकृती । पितृव्रत पितृलोका जाती । देवाकृति पावोनि राहती । त्या त्या लोकीं त्या त्या देवांचिया ॥ ८५ ॥ तैसेच माझे भक्तही । मजवांचूनि त्यांस गति नाहीं । देवव्रतादि जैसे कांहीं । देवादिकां पावती ॥ ८६ ॥ कीं जो भजे जयातें । तोचि पावे तयातें । मजही भजे तो मातें । पावे अर्जुना ॥ ८७ ॥ मीच देवादि उपास्यरूप । कीं वेगळें नसे चित्स्वरूप । परि ज्या रूपें भजे त्या रूपासमीप । तो त्यारूपें असतसे ॥ ८८ ॥ मज विषमता नाहीं । कीं मीच त्या रूपें ते लोकही । आणि न च्यवती ऐसा जो कांहीं । लोक माझा तोही मद्रूप ॥ ८९ ॥ परि मी आणि माझा सत्त्व गुण । वैकुंठीं नसे रज

तमपण । ज्ञानेंचि पावती निपुण । मातें वैकुंठलोकीं माझिया ॥ १६९० ॥ " इदं ज्ञानमुपाश्रित्य " ह्मणोनी । चतुर्दशीं या श्लोकें करोनी । बोलेल ऐसें कीं या ज्ञानाचा आश्रय धरूनी । माझें सारूप्य पावेल ॥ ९१ ॥ आणि " आब्रह्मभुवनाल्लोका " या श्लोकीं । अष्टमीं मागें बोलिला कीं । मातें पावोनि कोणीं मृत्युलोकीं । आला नाहीं परतोनी ॥ ९२ ॥ पुनरावृत्तिखूण । एवं आपणास पावती ते ज्ञानी निपुण । अष्टमीं न परतती ह्मणती सूचवी ॥ ९३ ॥ एवं ज्ञानाविण । न पाविजे ब्रह्म निर्गुण अथवा सगुण । तेव्हां भगवदुपासका ईश्वर आपण । ज्ञान देतो गुरुरूपें ॥ ९४ ॥ तेव्हां ते त्यास पावती । पावले ते न परतती । इतर देवांची या गती । उपासना मात्रें ॥ ९५ ॥ येविषयीं उत्तमश्लोक । बोलिला आधींच पूर्वश्लोक । कीं सर्वयज्ञभोक्ता प्रभु मीच एक । हें तत्त्व न जाणती ते च्यवती ह्मणोनी ॥ ९६ ॥ तरी जे आपलें सर्वोत्कृष्टत्व नेणती । तेचि इतर देवादिकांतें भजती । आणि तेचि त्यातें पावोनि च्यवती । तैसे नव्हती स्वभक्त हें या श्लोकीं सूचवी ॥ ९७॥ " मद्भक्ता यांति मामपि " ह्मणोनी । मद्भक्त मातें पावती ह्मणे यावरूनी । ते न च्यवती कीं आपणातें पावोनी । कोणी नच्यवे ऐसें पूर्वीं बोलिला ॥९८॥ आतां सर्वयज्ञभोक्तृत्व । आणि आपुलें सर्वप्रभुत्त्व । जे न जाणती हें तत्त्व । ते च्यवती ऐसें बोलिला ॥ ९९ ॥ तरी सर्वयज्ञभोक्तृत्व । आणि आपुलें सर्वप्रभुत्व । हें न जाणती स्वभक्त त्यांसही हें तत्त्व । कळतें स्वप्रसादें ऐसेंही सूचवी॥१६००॥कीं जे आपणांतें पावती । ते कधींही न च्यवती । हें मागें अर्जुनाप्रती । स्वयें बोलिला॥१॥यावरून तर्क रीती । समजली पार्थाची मती । कीं यातें पावोनि न च्यवती । तेव्हां ते जाणतचि हें तत्त्व ॥२॥ कीं भोजनावांचूनि न घडे पुष्टी । आणि तो पुरुष पुष्ट जेवितां न दिसे दिवसां दृष्टीं । तेव्हां तो रात्रीं जेवीत असेल हे गोष्टी । तर्कें समजावी पुष्टीवरूनी ॥ ३ ॥ ऐसें भगवंताचें प्रभुत्व । आणि सर्वयज्ञभोक्तृत्व । हें त्यास कळलेंचि तत्त्व । " मद्भक्ता यांति मामपि " ह्मणतो जयातें ॥४॥ तर्कें ऐसा समजला अर्जुन । हेंचि पुढिलिया अध्यायांत मधुसूदन । बोलेल कीं " मच्चित्ता मद्गतप्राणा " ऐसे जे जन । त्यांतें मी देतों बुद्धियोग ॥ ५ ॥ " ददामि बुद्धियोगं तं " ह्मणोनी । बोलेल स्वयें यावरूनी । च्यवती जे न जाणती मज तत्त्वें करूनी । ते पूर्वश्लोकीं बोलिला ते अन्यउपासक ॥ ६ ॥ स्वउपासकांस आपण । बुद्धियोग देतों आणि करितों निपुण । ते सर्वयज्ञभोक्ता प्रभु मी सगुण । ऐसें तत्त्व जाणती हा भाव ॥ ७ ॥ जे सगुण तत्त्व ऐसें न जाणती।

अल्पदृष्टी अद्वैत आयकती । सर्वदेव आणि सर्वेश्वर समान मानिती । भजती क्षुद्रदेवतांतें ॥ ८ ॥ मीच ते देव सकळ । चित्स्वरूप एकचि केवळ । परि सर्वयज्ञभोक्ता प्रभु मी एकचि ऐसें निवळ । सगुणतत्त्व त्यांतें कळेना ॥ ९ ॥ सर्वही एक ब्रह्म निर्गुण । ह्मणोनि क्षुद्रदेवतांतें भजती कृपण । तेही मातेंच भजती कीं मज त्यांस एकपण । परि भजन होतें अविधिपूर्वक ॥ १६१० ॥ मनीं धरोनि ऐसा भाव । जें पुढें बोलणार देव । तें सूचवोनि देवाधिदेव । " येप्यन्यदेवताभक्ता " या श्लोकीं तें बोलिला ॥ ११ ॥ कीं अन्यदेवतोपासकें । मातेंच भजती कीं मी आणि ते देव एक । परंतु अविधिपूर्वक । स्वभजन तें ॥ १२ ॥ तें अविधिपूर्वकत्व । हेंच कीं आपलें सर्व यज्ञभोक्तृत्व प्रभुत्व । न जाणती हें न कळतां तत्त्व । च्यवती ते भक्त अन्य देवांचे ॥ १३ ॥ कीं देवांस पावती देवव्रत । पितरांसि पावती पितृव्रत । भूतांतेंचि पावती निश्चित । जे वेताळादि भूतांतें उपासिती ॥ १४ ॥ तैसेंच मातेंही जे यजती । ते मातेंचि पावती । मज पावले ते न च्यवती । यालागीं भजन माझें विधिपूर्वक ॥ १५ ॥ हा भाव दावी नारायण । हें श्लोकत्रयप्रकरण । त्यांत सिद्धांत निर्गलित विवरण । इतकेंची ॥ १६ ॥ कीं सर्व देव आणि सर्वोत्तम । एकचि कीं सर्व निर्गुण सम । परि सर्वयज्ञ भोक्ता प्रभु पुरुषोत्तम । मोक्ष भजनें तयाच्या॥१७॥ तेंचि विधिपूर्वक यजन । कीं त्या हरीचेंचि केवळ घडे भजन । अन्यदेवतांस भजती जन । जे ते त्यांतेंचि भजती परि अविधिपूर्वक ॥ १८ ॥ ह्मणोनि जो भजे जयातें । तो पावे तयातें । तैसेचि पावती मातें । ते न च्यवती भजन विधिपूर्वक ह्मणोनी ॥ १९ ॥ तत्त्व न जाणोनिही जन । करिती आपलेंचि भजन । त्यांस तत्त्व आपलें भवभंजन । दावील ऐसें सूचवी ॥ १६२० ॥ ऐसें विधिपूर्वक भजन आपलें परी । तें कठीण असेल ह्मणोनि अर्जुना मानसीं जरी । तरी तें बहु सुगम ह्मणतो हरी । आतां या श्लोकीं ॥ २१ ॥

॥ श्लोक ॥ पत्रं पुष्पं फलं तोयं यो मे भक्त्या प्रयच्छति ।
तदहं भक्त्युपहृतमश्नामि प्रयतात्मनः ॥ २६ ॥

॥ टीका ॥ अगा जो भक्तीकरूनी । अर्पितो तें अर्पिलें भक्तीनें ह्मणोनी । मी आवडीनें भक्षितों यावरूनी । सुलभ भजन माझें तूं जाण ॥ २२ ॥ अगा निष्काम शुद्ध चित्त ज्याचें । अर्पित पत्र पुष्प फल जल तयाचें । माझें अखंडानंदानुभवत्त्व सावें । याहूनि गोड मज वाटतें ॥ २३ ॥ माझ्या अखंडानंदानुभवीं दया । मी तत्पर जनोद्धार कराया । मज कांहीं अर्पितां

मोक्ष तया । या सुखें तदर्पित त्याचें भक्षितों ॥ २४ ॥ अगा ह्मणे ते "द्वासुपर्णा" श्रुती । "अनश्नन्न्यो अभिचाकशीति" । कीं ईश्वरास अशन ह्मणजे भोजन नाहीं ह्मणती । कीं मी भोक्ता नव्हे विषयांचा ॥ २५ ॥ ज्या इंद्रियाचा जो विषय । भोजन तयाचें हा निश्चय । परि मी अतींद्रिय । इंद्रियेंचि नसती मजलागीं ॥ २६ ॥ मजही दर्शन श्रवण इत्यादि असे । परंतु मीच सर्व आहें ऐसें दिसे । जो विषय सत्यत्त्वें न गवसे । तोंवरी इंद्रिय तयातें न ह्मणावें ॥ २७ ॥ अविद्येनें वाटे सत्य विषय । ते वृत्ति ह्मणावी इंद्रिय । अविद्या जातां चिन्मय । विषय इंद्रियें ज्ञानी देखतो ॥ २८ ॥ परि सूर्य न देखे तम । तैसा अनादि विद्या शबलित मी पुरुषोत्तम । अविद्या नेणें ह्मणोनि हें स्थावरजंगम । सत्य कदापि न वाटे मजलागीं ॥ २९ ॥ मज ऐशिया विषयाचें अशन । नाहीं तथापि शुद्धचित्तजन । भक्तीनें करितां भजन । जें अर्पिती तें मी भक्षितों ॥१६३०॥ अगा तुळसीपत्र आदिकरुनी । भलतें एक गलित पत्र आणुनी । मज समर्पिती तें भक्तीनें अर्पिलें ह्मणोनी । अशन करितों मी तयाचें ॥ ३१ ॥ कीं त्या पत्रीं जो जैसा रस । तो माझाच अखंडानंदानुभव सुरस । तें पत्र वाळलें विरस । परि विरस नव्हे अखंडानंदानुभव माझा ॥ ३२ ॥ कीं शब्द स्पर्श रूप रस गंध । मज यांचा साक्षित्वसंबंध । परि सर्वही स्वस्वरूपानंद । ऐसेंचि वाटे ॥ ३३ ॥ जीवांस हा अनुभव असेना । त्यांस विषयांची असे वासना । त्या वासनेनें मज जगज्जीवना । जडविषयरूपें ते पाहती ॥ ३४ ॥ ते विषय त्या वासनेंकरूनी । फळ अपेक्षूनि अन्यदेवांपासूनी । अर्पिती मातेंचि परि अशुद्ध चित्त ह्मणोनी । मज अर्पिती ऐसें न वाटे ॥ ३५ ॥ कीं ते विषयासाठींच अर्पिती । विषयचि फळ तयाचें पावती । अनुग्रहदृष्टि मी जगत्पती । न पाहें तयांतें ॥ ३६ ॥ एवं तिहीं जें अर्पिलें । तेंही स्वस्वरूपचि देखतों आपुलें । परंतु मी प्रसन्न नव्हे ह्मणोनि नाहींच पावलें । जें तिहीं अर्पिलें मजलागीं ॥ ३७ ॥ जे शुद्ध भक्त माझे अर्जुना । ज्यांस फळवासना असेना । आणि भक्तीनें मज जगज्जीवना । पत्र पुष्प फल जल किमपि अर्पिती ॥ ३८ ॥ त्यांस वांछित नसे फल । मज ते माझें स्वरूपचि वाटे केवळ । ह्मणोनि भक्षितों त्यांचें पत्र पुष्प फल जल । माझा स्वरूपानुभवाचि अशन माझें ॥ ३९ ॥ सर्वही माझा अखंडानंद । परि अर्पितां फळ वासनेनें होतो बंध । ह्मणोनि अभक्तांतें फळसंबंध । होतो यास्तव पावलेंचि नाहीं मातें ॥ १६४० ॥ आणि भक्तें भक्तीकरूनी । अर्पिलें शुद्ध

चित्तें ह्मणोनी । अर्पण फळापेक्षेवांचूनी । आड नसे फळ कांहीं ॥ ४१ ॥ त्याणें तों मज अर्पिलें । आणि फळ तरी कांहीं न इच्छिलें । तेव्हां तें अर्पणचि उरलें । तें तो अखंडानंदस्वरूप माझें मज वाटे ॥ ४२ ॥ कीं मज माझ्या स्वरूपाची प्रीती । आत्मा सर्वांचा प्रिय मी जगत्पती । जे मज आवडीनें भजती । न दिसे भेद माझिया त्यांचिया प्रीतीतें ॥ ४३ ॥ ऐसी माझी ज्यांस गोडी । तिहीं अर्पिलें त्यांचीच मज आवडी । अखंडानंदाच्या परवडी । वाटती पत्र पुष्प फल जल तयांचें ॥ ४४॥ तिहीं जें अर्पिलें पत्र । तें मी आदरें भक्षितों पवित्र । भलतसें पुष्प अर्पिलें तें विचित्र मज वाटे ॥ ४५ ॥ तें पुष्पही मी भक्षितों । कीं माझा अखंडानंदचि मी लक्षितों । आणि पदार्थरूपें यथायोग्य भोग देखतों । भक्षणें नांव त्याचेंचि ॥ ४६ ॥ पुष्पाचा जो परिमळ । घ्राणद्वारा कळतो केवळ । तो भोग भक्षण ह्मणोनि कुशळ । सर्व ह्मणती ॥ ४७ ॥ द्वितीयाध्यायांत होंचि श्रीपती । विषय निराहाराचे ह्मणे परतती । आहारशब्दें इंद्रियांस भोग विषयाचा ह्मणती । हेंचि तात्पर्य वेदाचें ॥ ४८ ॥ ह्मणे " द्वासुपर्णा " श्रुती । " अनश्नन्न्यो-अभिचाकशीति " । कीं अशन न करी जगत्पती । तरी काय उपवास करितो ऐसें ह्मणावें ॥ ४९ ॥ नाहीं करीत अशन । ह्मणजे करीत नाहीं भोजन । अर्थ ऐसा करावा तरी इतर विषयसेवन । घडतें काय ईश्वरातें ॥१६८०॥ एवं अनशन । ह्मणजे अर्थ तो अभोजन । परि इंद्रियद्वारा विषयाचें जितकें सेवन । अशन ह्मणावें तितकेंही ॥ ५१ ॥ एवं विषयसेवन ह्मणावें अशन । विषय न सेवणें अनशन । ऐसी वेदभाषारीती गहन । विचारितां अर्थ सांपडे ॥ ५२ ॥ प्रस्तुत पुष्पाचें भक्षण । या भावें बोलिला कमलेक्षण । कीं पुष्पाच्या भोगाचें जें लक्षण । तेंचि भक्षण तयाचें ॥५३॥ पुष्पें गुंफोनि माळा । अर्पितां भोग होतो गळा । तेंचि याच्या भक्षणाची कळा । चरणीं अथवा शिरीं अवतंस ॥ ५४ ॥ तें गुंफिलें अथवा मोकळें । तें साजूक अथवा वाळलें । भलतसें भक्तीनें अर्पिलें । तें मी माझा अखंडानंद मानितों ॥ ५५ ॥ याच प्रकारें फळ । याच प्रकारें जळ । मज अर्पी भक्तीनें प्रेमळ । तें मी आदरें भक्षितों ॥५६॥ मज पाहिजे प्रेम । मज प्रेमें कांहीं समर्पावें हा त्यास नेम । ह्मणोनि त्याचें भलतसें मी सर्वोत्तम । भक्षितों भोगितों तें यथायोग्य ॥ ५७ ॥ सहज आवडे पोटींचा बाळ । क्षेम देतां अमृत वाटे त्याची लाळ । तैसें प्रेमळाचें पत्र पुष्प फळ जळ । भलतसें मज गोड वाटे ॥ ५८ ॥ ज्याची नसे आवडी । त्याचें अमृतही

नेदी गोडी । प्रीती ज्याची त्याची खरवडी । वाटे ती अमृताची ॥ ५९ ॥ अगा गोड ते क्षुधा । क्षुधितास कांजीही वाटे सुधा । धुंडोनि पाहतां सर्व वसुधा । तों क्षुधा मज सर्वदा प्रेमाची ॥ १६६० ॥ याहूनि सुगम भजनाची रीती । सांगतो आतां जगत्पती । सुलभत्वप्रसंगें पार्थाप्रती । परम आणि प्रथम भागवतधर्म बोलतो या श्लोकीं ॥ ६१ ॥

॥ श्लोक ॥ यत्करोषि यदश्नासि यज्जुहोषि ददासि यत् ।
यत्तपस्यसि कौंतेय तत्कुरुष्व मदर्पणम् ॥ २७ ॥

॥ टीका ॥ अगा तूं जें करिसी । आणि जें तूं भक्षिसी । आणि जें तूं होमिसी । आणि देसी जें तूं ॥ ६२ ॥ तूं होमिसी ज्या होमातें । तूं तपसी ज्या तपातें । तें समर्पी सर्वही मातें । कुंतीसुता ॥ ६३ ॥ ज्यास पाहिजे माझें दास्यपण । त्याणें समर्पावें सर्व कर्म जाण । कीं दास जाला कोणी सेवेविण । हें घडेना ॥ ६४ ॥ मुख्य सेवेचा धर्म । कीं स्वामीचेंचि सर्वदा करावें कर्म । दास्यपणाचें वर्म । आणीक नसे ॥ ६५ ॥ स्वामिकार्याविगळा काळ । क्रमी तो दास फटकाळ । कांहीं स्वामिकार्य कांहीं स्वकार्यपाल्हाळ । तो भाडेकरी दास ह्मणवेना ॥ ६६ ॥ आठ प्रहर साठ घटिका । प्रतिदिवसीं काळ इतका । स्वामिसेवेंतचि वेंचीं तितका । तोचि दास ॥ ६७ ॥ एवं करूनि अष्टप्रहर सेवा । सेवावें दास्यत्वें देवाधिदेवा । तरी त्या सेवेच्या करी हेवा । जगदंबा लक्ष्मीही ॥ ६८ ॥ परंतु सेवा तरी घडे । कीं अगत्य स्वामीस कार्य पडे । तेव्हां सर्वेश्वराचे सेवेस पडे । अवसर कोण ॥ ६९ ॥ तो अवाप्त सकळ काम । त्याचें करावें कोणतें काम । मुक्तार्थ होऊनि निष्काम । सर्व कर्म अर्पावें श्रीचरणीं ॥ १६७० ॥ अर्पितां सर्व क्रियांतें । आणि अर्पितां अवस्थात्रयातें । आठ प्रहर सेवा तयातें । घडे सर्वेश्वराची ॥ ७१ ॥ ह्मणोनि ह्मणतो कीं अर्जुना । सर्व कर्में मज भवभंजना । समर्पी कीं भगवद्भक्त जना । प्रथम भागवत धर्म हाचि भाव ॥ ७२ ॥ ऐसें कर्म अर्पितां सकळ । ह्मणसी काय होईल फळ । तरी मी सर्वात्मा केवळ । त्या मज पावसी ह्मणतो या श्लोकीं ॥ ७३ ॥

॥ श्लोक ॥ शुभाशुभफलैरेवं मोक्ष्यसे कर्मबंधनैः ।
संन्यासयोगयुक्तात्मा विमुक्तो मामुपेष्यसि ॥ २८ ॥

॥ टीका ॥ अगा ऐसा तूं जेव्हां होसी । कीं सर्व कर्में मज अर्पूं लागसी । तेव्हां शुभाशुभ दोहीं फळांपासूनी सुटसी । तुटती शुभाशुभ दोनी कर्मबंध ॥ ७४ ॥ अशुभ पापकर्में बेडी जैसी । शुभ पुण्यफळ बेडीच तैसी ।

सुवर्णाची बेडीच ते कैसी । बरी ह्मणावी ॥७५॥ मज कर्मे अर्पिली सकळ । तयाचें मोक्षचि फळ । कीं दास माझा जाला निर्मळ । मग बंध कैंचा तयासी ॥ ७६॥ जाला समर्थाचा दास । भय कैंचें मग त्यास । संसारबंधप्रयास । नुरती होतां निजदास माझा ॥ ७७ ॥ सर्व कर्मे अर्पी मातें । आठ प्रहर सेवा घडली त्यातें । माझें अनन्य दास्य जोडलें ऐसें जयातें । बंध त्यातें मग कैंचा ॥ ७८ ॥ दिवसरात्रीं साठ घटिका । माझ्याच सेवेंत कंठीं काळ इतका । कीं खाणें जेवणें इत्यादि कर्मकेलाप तितका । मज अर्पितां कर्म त्याचें सकळ सेवा माझीच ते ॥ ७९ ॥ सेवा सर्वदा घडे ज्यास । निजदास कैसें न ह्मणावें त्यास । दास ह्मणावें त्यास । संसारबंधास लावून देऊं मी कैसा ॥ १६८० ॥ एवं च संसारबंध तोंचवरी । कीं सर्वकर्मार्पण मातें न करी । कर्म अर्पूं लागला तेव्हां मजवरी । ओझें पडलें तयाचें ॥ ८१ ॥ कीं जाला आपुला निजदास । त्याची उपेक्षा आणि तद्विषयीं जो उदास । कोण भला ह्मणेल त्या मंदास । जो भला ह्मणेल तोचि मंद ॥ ८२ ॥ भला समर्थ ह्मणिजे तरी । कीं स्वदासाची सर्व पीडा हरी । हा उत्तमोत्तमाचा गुण परी । माझ्या गुणाचाच अंशांश ॥ ८३ ॥ मजपासूनि सद्गुण सकळ । माझेच गुण सर्व सद्गुणांचें मूळ । तो मी सर्वेश्वर केवळ । केवीं उपेक्षूं दासातें ॥ ८४॥ दास्याचें माझ्या हेंचि वर्म । कीं मज अर्पी सर्व कर्म । मुख्य प्रथम भागवत धर्म । सर्व कर्मसमर्पण मजलागीं ॥ ॥ ८५ ॥ एवं सर्व कर्मे मजला । ज्या दिवसापासून अर्पूं लागला । त्याच दिवसापासून संकल्प अमोघ माझा जाला । कीं मोक्ष द्यावाच आतां मी यातें ॥ ८६ ॥ या भावें ह्मणे अर्जुनासी । कीं तूं ऐसा जेव्हां होसी । तेव्हां शुभाशुभ बंधापासूनि सुटसी । ह्मणिजे पावसील तूं मोक्षा ॥ ८७ ॥ आतां ज्ञानें अविद्याग्रंथि सुटे । पुढें गर्भवासा येणें खुंटे । एवं आत्मज्ञानें बंध तुटे । शुभाशुभसंचितक्रियमाणाचा ॥ ८८ ॥ प्रारब्ध सरे भोगें । संचित जळे चित्त चैतन्ययोगें । कर्महेतुप्रकृतिवियोगें । साक्षी होतां बुद्धीस लेप न लागे क्रियमाणाचा ॥ ८९ ॥ हे आत्मज्ञानाचे विलास । यांत आदीं पाहिजे संन्यास । "संन्यस्य श्रवणं कुर्यात्" ह्मणोनि मोक्षार्थि यास । श्रुति ह्मणे ॥ १६९० आणि "त्यागेनैकेन अमृतं" ऐशा श्रुती । एक्या त्यागेंचि मोक्ष ह्मणती । हे दोनी सोडोनि श्रीपती । कर्मार्पणेंचि मोक्ष बोलतो ॥ ९१ ॥ तरी जों संन्यास आणि त्याग न घडे । ज्ञानें अविद्येचें कवाड नुघडे ।

---

१ कर्मांचा खटाटोप, पसारा.

शुभाशुभ कर्मबंधही न विघडे । तों पर्यंत ॥ ९२ ॥ हा क्रम ठेवून एकीकडे । कृष्ण ह्मणे कीं सर्व कर्मार्पण घडे । तरी त्याचा शुभाशुभ कर्मबंध विघडे । तरी काय मोक्ष विना ज्ञानें बोलावा ॥९३॥ या शंकेचा परिहार । कीं हाच संन्यास आणि हाच त्यागप्रकार । आणि याच उपासनेनें सर्वेश्वर । ज्ञानद्वारा देतो मोक्षातें ॥ ९४ ॥ त्यांत सर्व कर्मसमर्पणीं । त्याग सूचवी चक्रपाणी । आणि " संन्यासयोगयुक्तात्मा " हे वाणी । संन्यास सूचवोनि बोलतसे ॥ ९५ ॥ अष्टादशीं सर्वकर्मफलत्याग । श्रीकृष्ण ह्मणेल कीं तोचि त्यागयोग । नव्हे सर्वकर्मफलवियोग । कृष्णीं न अर्पितां हें तृतीयाध्यायांत बोलिला ॥ ९६ ॥ एवं च त्याग सर्वकर्मार्पण । परि तो न घडे संन्यासाविण । काम्यत्याग संन्यासलक्षण । कर्मसमर्पण तो त्याग ॥ ९७ ॥ काम्यकर्में टाकी समूळ । आणि नित्यकर्में लौकिककर्में सकळ । करी आणि अर्पी तेव्हां त्यागफळ । आत्मसाक्षात्कार तो लाहे ॥ ९८ ॥ जो काम्यकर्मीं करी । तो दास नव्हे भाडेकरी । दास न होतां जगद्गुरु हरी । नेदी आत्मसाक्षात्कारातें ॥ ९९ ॥ यालागीं ह्मणतो हरी । कीं "संन्यासयोगयुक्तात्मा " होसी जरी । मातें पावसी तरी । आत्मज्ञानें ॥ १७०० ॥ आपण देह आणि देहासहित । प्रपंच सत्य वाटे हें विपरीत । या विपरीतभावापासूनि सुटणेंचि अत्यंत । नाश अविद्याबंधाचा ॥ १ ॥ एवं विपरीतापासूनि मुक्त । तोचि ह्मणावा विमुक्त । अविद्यानाश आत्मसाक्षात्कारयुक्त । विमुक्त तो ॥ २ ॥ यालागीं जगद्गुरु या वचनीं । ह्मणे मातें पावसी विमुक्त होऊनी । काम्यकर्मत्यागें सर्व कर्मं समर्पूनी । अविद्येपासूनि सूटोंन मातें पावसी ॥ ३ ॥ एवं सर्वसमर्पणत्याग । काम्यत्याग संन्यासयोग । विपरीतभावाचा वियोग । विमुक्तशब्दें बोलिला ॥ ४ ॥ अष्टादशीं आरंभींच पार्थ । संन्यासत्याग या दोहींचा पुसेल अर्थ । तेथें बोलेल समर्थ । तत्त्व ऐसेंच संन्यासाचें आणि त्यागाचें ॥ ५ ॥ तेथें सर्वकर्मफलत्याग । त्यातें ह्मणेल मुख्य त्याग । न घडे नित्य निष्कामकर्मफलाचाही वियोग । ईश्वरीं न अर्पितां ॥ ६ ॥ हा तृतीयाध्यायांत । "यज्ञार्थात्कर्मणोन्यत्र" या श्लोकीं सिद्धांत । कीं बंधातें न करी एकचि ईश्वरार्पित । त्या वेगळीं बंधकें कर्में सकळही ॥७॥ दूरी करणें वस्त्रमळ । साधन न बोलतां बोलिलें जळ । येविषयीं तों स्वयें केवळ । बोलिलाच अध्यायांत तिसरिया ॥८॥ पुढें बोलिजेल हा प्रकार । प्रस्तुत ग्रंथ वाढला फार । कीं अगत्य अगत्य जो विचार । तो संक्षेपें बोलतां विस्तार इतका पावला ॥ ९ ॥ एवंच काम्यकर्म त्यागावें ।

नित्यकर्म देहनिर्वाहादिकर्मही करून अर्पावें । तेव्हां विपरीतभावनेपा- सूनि सुटावें । पावावें वैकुंठनाथातें ॥ १७१० ॥ हा सुगम भजनमार्ग । श्लोकद्वयें बोलिला श्रीरंग । येथें कांहीं शंका तिचा भंग । आतां येथून करी- तसे ॥ ११ ॥ कीं सर्वकर्में अर्पी आपणास । तो तों जाला आपला दास । ह्मणोनि मोक्ष देतो त्यास । या गोष्टीनें विषमता लागली ॥ १२ ॥ कीं दास न्यावे मोक्षा । इतरांची करावी उपेक्षा । हे विषमता लागली अंबुजाक्षा । जनांस आणि अर्जुनास ऐसें वाटेल ॥ १३ ॥ ह्मणोनि याचा परिहार । क- रितो आतां सर्वेश्वर । समता साधूनि भक्तीचा बडिवार । बोलतसे या श्लोकीं ॥ १४ ॥

॥ श्लोक ॥ समोऽहं सर्वभूतेषु न मे द्वेष्योऽस्ति न प्रियः ।
ये भजंति तु मां भक्त्या मयि ते तेषु चाप्यहम् ॥ २९॥

॥ टीका ॥ अगा मी सर्वोत्तम । सर्वांभूतीं सम । धुंडितां सर्व स्थावर- जंगम । कोणीं द्वेषी अथवा कोणी प्रिय असेना ॥१५॥ सागरास एक अप्रिय । अथवा तरंग एक प्रिय । हें काय घडे सम अद्वय । चित्समुद्र जडतरंगीं ये रीतीं ॥ १६ ॥ अगा मीच जड भूतें सकळ । मीच प्रतिबिंबरूपें जीवही केवळ । जीवास हें न कळे त्या न कळण्याचें मूळ । अविद्या अनादी ॥ १७ ॥ भूतें मजमाजीं सकळ । सर्वभूतीं मी केवळ । परंतु जीवास हें अकळ । अविद्येंकरूनी ॥ १८ ॥ ह्मणोनि मजमाजीं भूतें मी सर्व भूतीं । हें रहस्य जीव कोणी नेणती । मी एक आहें ऐसा जगत्पती । न जाणती हेंही ॥ १९ ॥ मी कल्पवृक्षस्वभाव भगवंत । जैशास तैसाच होतों निश्चित । चतुर्थाध्यायांत बोलिलों हा सिद्धांत । "ये यथा मां प्रपद्यंते" या श्लोकीं ॥ १७२० ॥ मी सर्वत्र असें परी । जे न भजती त्यांस दूरी । मी त्यांत ते मजमाजीं हे गोष्टी खरी । परि त्यांस माझें विस्मरण ॥ २१ ॥ ह्मणोनि मज वाटतें ऐसें । कीं मी त्यांत आहें ह्मणों कैसें । आणि ते मजमाजीं आहेत हेंही ऐसें । न वाटे मज ॥ २२ ॥ जे भक्तीनें मातें भजती । मज वाटतें कीं तेच मजमाजीं असती । आणि त्यांमाजीं मी जगत्पती । आहें ऐसें वाटतें ॥ २३ ॥ असोनि उदकीं तृषित । तो नाहींच उदकीं ह्मणावा निश्चित । अन्नांत पुरिला तरी क्षुधित । नाहींच ह्मणावा अन्नांत त्या ॥२४॥ जलसमृद्धींत जल पितो । अन्नसमृद्धींत अन्न खातो । आहे उदकीं अन्नीं ह्मणावा तो । तैसे भक्त मजमाजीं मी भक्तांत ॥ २५ ॥ विषम जनाच्याच कल्पना । कल्पद्रुमीं विषमता असेना । कल्पनानुरूप जना । फळ दे ह्मणा-

वा समचि तो ॥ २६ ॥ सर्व कर्मे मज अर्पिसी । तरी तूं शुभ अशुभ कर्म-बंधापासूनि सुटसी । या प्रसंगीं विषमता लागणार ते ऐसी । कल्पतरुन्यायें परिहरिली ॥ २७ ॥ परंतु तेंचि प्रकरण । ह्मणोनि संशया आणिका एकाचें होतें स्फुरण । त्या शंकापरिहाराचें विवरण । या पुढिलिया श्लोकीं ॥२८॥ "यत्करोषि यदश्नासि" या श्लोकीं अर्जुनातें । ह्मणे समर्पी सर्वकर्मे आपणातें । दुसरिया श्लोकीं ह्मणे त्यातें । "संन्यासयोगयुक्तात्मा" ह्मणोनी ॥ २९ ॥ कीं काम्यकर्मत्याग । तो ह्मणावा संन्यासयोग । एवं ज्यास नसेल कामनेचा रोग । तोचि काम्यकर्मे टाकील ॥ १७३० ॥ तेव्हां समर्पितां कर्मे । मुक्ति ज्ञानें तें ज्ञान या भागवतधर्मे । विचारितां ऐशिया क्रमें । सुगम भजन दुर्गम हें ॥ ३१ ॥ सुगम कर्मसमर्पणें । आणि विवेकें सुगमचि कर्म त्यागणें । परंतु सद्यः विषयाचें भोगणें । परम कठिण त्याग त्याचा ॥ ३२ ॥ कीं काम्य टाकील तोचि जो निष्काम । निष्काम तोचि कीं विषयभोगीं ज्यास न असे काम । हें तों अत्यंत कठिण काम । सद्यः त्यागणें विषयभोग ॥ ३३ ॥ जो न शके टाकूं विषयभोग । तो त्यास आहेच कामनेचा रोग । ऐसियास काम्यत्याग संन्यासयोग । केवीं घडे ॥३४॥ आणि संन्यासयोग हा न घडे । उगाच लागे कर्मार्पणाकडे । तरी ज्ञानद्वारा कैसा उपडे । कंठबंध शुभाशुभा कर्माचा ॥ ३५ ॥ एवं कठिण टाकणें सद्यः विषयभोग । विषयभोग इच्छी तोंपर्यंत न घडे संन्यासयोग । जों नव्हे विषयभोगत्याग । तों हा भक्तियोग साध्य सहसा होईना ॥ ३६ ॥ हे शंका पार्थाच्या मनीं । ते सर्वसाक्षी जाणोनी । असला वाईट गुण भक्ताचा याहीहुनी । तरी तो उत्तमाचि जाण ह्मणतो या श्लोकीं ॥ ३७ ॥

॥ श्लोक ॥ अपि चेत्सुदुराचारो भजते मामनन्यभाक् ॥
साधुरेव स मंतव्यः सम्यग्व्यवसितो हि सः ॥ ३० ॥

॥ टीका ॥ अगा तो पूर्वोक्त । सर्वकर्म समर्पणार भक्त । असला यथान्यायें स्वधर्मे विषयासक्त । तरी तो साधु हें नवल काय तुज सांगूं ॥ ३८॥ जरी तो असेल दुराचारी अत्यंत । आणि त्यास दैवत मीच एक भगवंत । भजे मज आणि अन्यदैवत । न भजे कदापी ॥ ३९ ॥ तोही साधुच मानावा संतीं । कीं निश्चय अत्यंत उत्तम त्याच्या चित्तीं । कीं अनन्य अव्यभिचारिणी अनंतीं । भक्ति त्याची ॥ १७४० ॥ जाली उत्तमाची गृहिणी । पाहतां आहे व्यभिचारिणी । दों पुरुषांशीं रमे जारिणी । ते व्यभिचारिणी पतिव्रता ह्मणवेना ॥ ४१ ॥ ते उत्तमांगना । ऐसें भल्यांच्या वाचेस येइना ।

तैसा मज भजे इतरांसही भजे अर्जुना । तो सदाचारीही साधु न ह्मणवे कदापि ॥ ४२ ॥ न भजे अन्य देवांतें । अनन्यभावें भजे मातें । तो अत्यंत दुराचारी असला तरी त्यातें । साधूच मानावा सज्जनीं ॥ ४३ ॥ पहावें त्याच्या निश्चयाकडे । कीं मजवांचून इतर दैवत नावडे । अनन्यभावें भक्ति माझी घडे । तो अतिदुराचारीही साधु मानावा ॥ ४४ ॥ अगा रोग आहे देहीं । परि अपथ्य टाकोनि आरोग्यकर अत्यंत जें कांहीं । तें औषध निरंतर सेवितो तोही । निरोगी जाला ह्मणोनि उत्तम वैद्य मानिती ॥ ४५ ॥ संसाररोगातें हरी । ऐसें दिव्य औषध मी हरी । मज सेवी आणि विषयरोग वाढवी तीतें न सेवी जरी । विषयवासनारोगनिर्मुक्तचि तो मानावा ॥ ४६ ॥ अगा औषधाविण । निरोगी जाला कोण । माझ्या भक्तीवांचून विषयप्रवीण । चित्त तें शुद्धी कैसें पावतें ॥ ४७ ॥ परंतु जों केला नाहीं दुराचारत्याग । आणि चित्तीं माझा भक्तियोग । न भजे इतरांस तरी संन्यासयोग । साधलाच त्याला ॥ ४८ ॥ कीं काम्य टाकिलें चि असेल जरी । इतर देवांतें न भजे तरी । उरली सद्यः भोगेच्छा दिसे परी । नाशक तीचें माझें अनन्यभजन आरंभिलें ॥ ४९ ॥ परिस हाता आला । तो तेव्हांच कनकसंपन्न जाला । माझें भजन अनन्य लागलें ज्याला। साधु त्याला ह्मणावेंचि ॥ १७५० ॥ कीं कीटकही भ्रमर होतो ध्यातां । सत्त्वशुद्धि तैसी मज सत्त्वोपाधीस भजतां । रजोवृद्धिकारका अन्या त्यजितां । नासेचि वासना तया अनन्यभक्तीची ॥ ५१ ॥ ऐसा स्वभक्त आणि दुराचारी । ज्यास वर्णितो येथवरी । तो जातीनें पापजाती ऐसी वैखरी । वदती कोण्ही तें विरुद्ध ॥ ५२॥ कीं पुढिलिया श्लोकावरी । त्यातेंचि वर्णूनि हरी । त्या पुढिलियाच श्लोकीं मुरारी । तें पापजातीचें वेगळेंच वर्णील ॥५३॥" मामुपाश्रित्य कौंतेय येपि स्युः पापयोनयः " ह्मणोनी । ह्मणेल कीं जे यावेगळे पापयोनी । आणि स्त्रिया वैश्यादिही तरती ह्मणेल यावरुनी । हा दुराचारी सत्कुलप्रसूतचि जाणावा ॥ ५४ ॥ आतां याचा अर्थ ये रीती । कीं दुराचारी आणि जोडे सत्संगती । ते असोनिही दुराचारी मती । त्याची अनन्यहरिभजनीं जरी लागे ॥ ५५ ॥ तरी त्या भजनें कृतार्थ । होणार ऐसा याचा अर्थ । याकारणें ह्मणे समर्थ । कीं तो साधुच मानावा ॥ ५६ ॥ कीं साधुत्व अवलंबाया । विलंब नाहीं उरला तया । तेही गोष्टी धनंजया । आईक ह्मणतो या श्लोकीं ॥ ५७ ॥

॥ श्लोक ॥ क्षिप्रं भवति धर्मात्मा शश्वच्छांतिं निगच्छति ।
कौंतेय प्रतिजानीहि न मे भक्तः प्रणश्यति ॥ ३१ ॥

॥ टीका ॥ अगा चित्तधर्मेंकरून युक्त । ऐसा अतिशीघ्र होतो तो माझा भक्त । कीं जे शांति शाश्वत । तीतें होऊनि विरक्त । अतिशयें पावतो अति शीघ्र ॥ ५८ ॥ हा प्रताप माझ्या भक्तीचा । अर्जुना जे वादी तयां न वाटे साचा । बडबड करिल त्यांची वाचा । कीं हें ऐसें घडों शकेना ॥ ५९ ॥ सूर्य दिवांधाच्या मतें नसे । जन्मांधास काय दिसे । गार्भिणीचे डोहळे कैसे । वांजेस होती ॥ १७६० ॥ मार्ग भक्तीचा ठावा नसे । त्यांस हें सर्व मिथ्या भासे । ते समजाविल्याही समजतील कैसे । हा पंथचि ठावका ज्यांला असेना ॥ ६१ ॥ परंतु देखोनि त्यांची सभा । भुजा आपल्या करूनि उभा । ये विषयीं सुभद्रावल्लभा । प्रतिज्ञा करीं गर्जोनियां ॥ ६२ ॥ अगा निगमरूपिणी । अमोघ ज्याची वाणी । तो मी प्रतिज्ञापूर्वक बोलतों चक्रपाणी । कीं माझा भक्त वांया न जाय कोणी । कदापि कुंतीनंदना ॥ ६३ ॥ कौंतेय ह्मणिजे कुंतीसुत । अर्जुनास या नांवें आळवी अनंत । भाव गहन अत्यंत भगवंत । दावी आळवितां या नांवें ॥ ६४ ॥ कीं दुराचारीही माझा भक्त । न नासे कधीं जरीही विषयासक्त । व्यर्थ सदाचारी आणि विरक्त । भक्त माझा जो नव्हे ॥ ६५ ॥ कीं तूं कुंतीचा सुत । उत्पत्ति तुझी पुरुषांतराचें रेत । कीं तूं न होसी निश्चित । पुत्र आपल्या बापा पंडूचा ॥ ६६ ॥ असोनि ऐसें सारथी । मज भक्तीकरून बैसविलें रथीं । लाळा घोटिती महारथी अतिरथी । दुर्योधनाचे आणि तो ॥ ६७ ॥ उत्पत्ति ऐसी असोनि मद्भक्त । ह्मणोनि मोक्ष आणि जयलक्ष्मीनें होसील युक्त । दुर्योधन मरेल अभक्त । जरी वीर्याचाच आपल्या बापाचिया ॥ ६८ ॥ अभक्त नासे सदाचारी । भक्त तरे जरी दुराचारी । यमुनापुलिनसंचारी । स्पष्ट बोलिला या श्लोकीं ॥ ६९ ॥ दुराचार सत्कुलप्रसूत । त्या भक्ताचे विषयीं ऐसें बोलिला देवकीसुत । आतां कुळें करून नीच बहुत । तेही स्वभक्तीनें तरती ह्मणतो या श्लोकीं ॥ १७७० ॥

॥ श्लोक ॥ मां हि पार्थ व्यपाश्रित्य येऽपि स्युः पापयोनयः ।
स्त्रियो वैश्यास्तथा शूद्रास्तेऽपि यांति परां गतिम् ॥ ३२ ॥

॥ टीका ॥ अर्जुना जे असती पापयोनी । तेही माझ्या आश्रयें करूनी । परमगतीतें पावती यावरूनी । पाहें अधिकार माझ्या भजनाचा ॥ ७१ ॥ चांडाळादि अधमजाती । जरी माझाच आश्रय धरिती । कीं तारक आह्मांस

एक श्रीपतीं । तरी तेही परमगति पावती अर्जुना ॥ ७२ ॥ तैशाच गा अर्जुना स्त्रिया । सत्कुलप्रसूताही मूर्तिमंत माया । असत्य साहस अतिलोभता-दि धनंजया । दुर्गुण जयांचें माहेर ॥ ७३ ॥ दुर्गुण पुरुषासही असती । परि स्त्रिया खाणीच दुर्गुणाच्या दिसती । पति पुत्र पिताही वांचिती । सहज कृत्रिम स्वभाव स्त्रियांचा ॥७४॥ स्त्रिया ऐशा वाईट परी ! मज अनन्यभावें भजती जैरी । त्याही साधुपदवी पावोनि त्वरी । परमगतीतें पावती ॥७५॥ पुरुषांतही कुलीन । वेदीं अधिकार ते वैश्यजन । परि त्यांस लोभ अत्यंत गहन । धनाचे ठायीं ॥ ७६ ॥ सर्वां वर्णांसही प्रिय धन । परि वैश्यांस धनेंचि केवळ जीवन । धनेंचि भोग धनेंचि साधन । धन मेळवावयाचें तयांला ॥ ॥ ७७ ॥ परमलोभिष्ठप्रकृती । वैश्य धनतृष्णेच्या आकृती । तेही जरी अनन्यभावें सुकृती । मज भजती पावतीच परम गतीतें ॥ ७८ ॥ शूद्र केवळ तमोगुणी । वेद न पडे ज्यांच्या श्रवणीं । तेही मज अनन्यभावें जे क्षणीं । भजती पावलेच ह्मणावे परमगतीतें ॥ ७९ ॥ स्त्रिया शूद्र आणि इतर अधम जाती । माझ्या भजनें मुक्ति पावती । ब्राह्मणही नरकास जाती । मज न भजतां वेदशास्त्रसंपन्नही हा भाव ॥ १७८० ॥ सर्व वर्ण गुरुत्व अधिकार । जाणती वेदवेदांत बोलती सार । परि भगवद्भजनावां-चूनि निःसार । सर्व जालें तयांचें ॥ ८१ ॥ भगवद्भजन करिती जरी । तरी त्यांस तो तिळही नसे दूरी । प्राप्ति त्यांस अति लवकरी । हें स्पष्ट बोलतो या श्लोकीं ॥ ८२ ॥

॥ श्लोक ॥ किं पुनर्ब्राह्मणाः पुण्या भक्ता राजर्षयस्तथा ।
अनित्यमसुखं लोकमिमं प्राप्य भजस्व माम् ॥ ३३ ॥

॥ टीका ॥ अगा अत्यंत अधम जाती । माझ्या भजनें वैकुंठास जाती । ब्राह्मण तों परम सुकृती । हे मोक्ष पावती नवल काय ॥ ८३ ॥ नीचयोनि मोक्ष पावती । मज भजतां हें बोलिलों तुजप्रती । ब्राह्मणाची गोष्टी मागुती । बोलणेंचि नलगे ॥ ८४ ॥ कीं त्या पापजाती । ब्राह्मण पुण्यवंत सुकृती । वेदशास्त्रसंपन्न सहजाकृती । काय यांचें आश्चर्य ॥ ८५ ॥ ब्राह्मण सुकृती मद्भक्त । त्यांचें नवल नाहींच होतां मुक्त । तैसेच क्षत्रिय राजर्षि मद्भक्ति-युक्त । काय सांगों हे मुक्ति पावतील ह्मणोनी॥८६॥भजन माझें ऐसें ह्मणो-नी । अर्जुना तुज मागतों पदर पसरुनी । कीं भज मज अनन्यभक्तिकरूनी । अगा अर्जुना ॥ ८७॥ दुर्लभ हा मनुष्यदेह । येथें मोक्षप्राप्तीस नाहीं संदेह । परि साधन नरक दुःखासही देह गेह । मी माझें ह्मणतों शरीर हेंचि ॥८८॥

ह्मणसी भजोंच तूतें परी । विषय भोगूं तारुण्य आहे तोंवरी । तरी अगा एक घडिभरी । शाश्वत राहेल हा भरंवसा याचा असेना ॥ ८९ ॥ अगा हा मनुष्यलोक अनित्य । ह्मणोनि आदीं भज गा मज अगत्य । स्वयें नित्य नसोनिही नित्य । पदप्राप्ति देतो देह हा ॥ १७९० ॥ अगा समर्थ कोण काळापरिस । त्यापासूनि जायाचा हा नरदेह परिस । प्राप्त जाला ह्मणोनि बापा आळस । न करीं सोनें करी लोखंडें आपलीं ॥९१ ॥ परिस पांचभौतिक नरदेह । लोखंडें इंद्रियें मन बुद्धि इत्यादि लिंगदेह । भगवद्भजनें योग दोहींचा संदेह । जगदलंकार हेमचि तो ब्रह्म होणार ॥ ९२ ॥ एके हातीं जयाच्या परिस । एके हातीं लोखंडही असे बहुवस । सोनें करायास करितो आळस । तोचि अभाग्य या लोकीं ॥ ९३ ॥ ज्याचा परिस जायाचा तो काळ । क्षण न लगतां नेतो तत्काळ । ऐसें कळोनिही दरिद्री फटकाळ । तोचि जाणावा जो सुवर्ण न करी लोखंडें आपलीं ॥ ९४ ॥ जायाचा चिंतामणि क्षणभरी । समर्था काळापासूनि हाता आला तरी । त्याणें आपला नाहीं मागितला तोंवरी । परम अभीष्ट तेंचि चिंतावें ॥ ९५ ॥ ह्मणोनि हा मनुष्यलोक अनित्य । परि येथें साधतो आनंद नित्य । ह्मणोनि तुज अर्जुना सांगतों कीं आदीं अगत्य । भज मज अनन्यभावें करोनी ॥९६॥ हें ऐकोन अर्जुन । ह्मणेल कैसें करावें भजन । तरी सर्वकर्मार्पण भवभंजन । पूर्वींच बोलिला ॥ ९७ ॥ सहज कर्म अर्पितां जाला दास । मग निजभक्ति देतो देव त्यास । तोचि स्वयें जगन्निवास । स्वभजन उपदेशितो या श्लोकीं ॥९८॥

॥ श्लोक ॥ मन्मना भव मद्भक्तो मद्याजी मां नमस्कुरु ।
मामेवैष्यसि युक्त्वैवमात्मानं मत्परायणः ॥ ३४ ॥

इति श्रीमद्भगवद्गीतासूपनिषत्सुब्रह्मविद्यायां योगशास्त्रे श्रीकृष्णार्जुनसंवादे राजविद्याराजगुह्योपदेशो नाम नवमोऽध्यायः ॥ ९ ॥

॥ टीका ॥ अगा मन माझिया चरणीं । भक्ति माझी अंतःकरणीं । भक्त माझा तूं होऊनि ऐसा स्मरणीं । राहें माझिया ॥ ९९ ॥ माझ्या यजनाचे प्रकार । करीं आणि मातेंचि करीं नमस्कार । तरी मातेंचि पावसी हा निर्धार । इतकियास कारण तें शेवटीं हें आइक ॥१८००॥ अगा या सर्वांस कारण । तूं होय मत्परायण । मज तारक एक नारायण । धरी ऐसा परम आश्रय माझा विश्वासें ॥ १ ॥ श्रीकांत वासुदेव । तोचि सर्वदेवाधिदेव । भक्त त्याचेच सर्व देव । तोचि एक तारक मजलागीं ॥ २ ॥ मज आश्रय त्यावांचूनी । नसे आणि नसोच ह्मणोनी । ऐसा विश्वास माझा प्रीतीकरूनी ।

ज्यास असतो तो मत्परायण ह्मणावा ॥ ३ ॥ त्या मुकुंदासमान अथवा अधिक । असे ऐसा वाटे देव कोणीएक । तरी ह्याचे तारक मज शेषपर्यंक । ऐसें वाटे किमर्थ ॥४॥ वाटे सर्वांहुनी श्रेष्ठ । तरीच भाव ऐसा वसे उत्कृष्ट । ज्यास न वाटे इतर दैवत अभीष्ट । तोचि मत्परायण हा अर्थ ॥ ५ ॥ ऐसा होय मत्परायण । मग मजमाजी योजो अंतःकरण । ऐसा अंतःकरण योजोनि तूं निपुण । मातेंचि त्या नित्यानंदातें पावसी ॥ ६ ॥ ऐसा अध्याय नवम । अनन्यभक्तीनेंच अर्थ याचा सुगम । व्यभिचारिणी भक्ति ज्याची त्यास दुर्गम । अर्थ अबाधित लागेना ॥७॥ कनकपरीक्षेची कसवटी जैसी। ज्ञानपरीक्षेची कसवटी तैसी । राजविद्या ते या अध्यायांत ऐसी । बोलिला श्रीकृष्ण ॥८॥ ज्ञान त्याचेंच निर्मळ । कीं अनन्य हरिभक्तिच ज्यांला केवळ । जे अनन्यत्वें न धरिती कृष्णपदकमल । ते चावळती राजविद्या वाखाणितां ॥ ९ ॥ निषिद्ध इतरदेवताभजन । भजावा एक श्रीकृष्ण भवभंजन । हें गीतारहस्य विरळ जन । भगवद्भक्त जाणती ॥१८१०॥ वाखाणावयाची गीता । तरी मंगलाचरणीं स्मरावें अनंता । न प्रार्थितां अन्यदेवता । अंतीं समर्पावा ग्रंथ त्यासची ॥ ११ ॥ गुरुवचनें आत्मा कळल्या उपरांतिक । जे योगसिद्धीकारणें नुसत्या निर्गुणाचे उपासक । त्यांस सगुणभजन वर्णनकौतुक । नसेच कांहीं ॥ १२ ॥ जे अपरोक्ष आत्मा कळल्यावरी । " यतो वाचो निवर्तंते " या अनुभवाकारणें वृत्ति बरी । निर्गुणींच योजिती त्यांस कुसरी । न लागतीच सगुण वर्णनाच्या ॥ १३ ॥ " यतो वाचो निवर्तंते " हा अनुभव । आणि सर्वभूतीं दिसे वासुदेव । ऐसें असोनि सगुण देवाधिदेव । सेव्य जया ॥ १४ ॥ तिहींच वाखाणावी गीता । आदि अंतीं स्मरावें एकाच त्या अनंता । ग्रंथ अध्यायावसानीं भगवंता । तया समर्पावा ॥ १५ ॥ आत्मज्ञान जाहल्यावरी । समर्पणादि नियम कां परी । कोणी ज्ञानाभिमानी वैखरी । चाळिती चावळोनि ऐसीही ॥ १६ ॥ तरी ज्ञान जाहल्या वरी । टीका मंगलाचरण हि कां परी । मंगलाचरणादिनेयम जरी । तरी ग्रंथावसानीं समर्पणही करावें तयातें ॥ १७ ॥ " ये तु सर्वाणि कर्माणि मयि संन्यस्य" ह्मणोनी । या श्लोकीं अनन्ययोगेंचि करूनी । ध्याती आणि सर्व कर्में अर्पिती ह्मणेल यावरूनी । अनुभवी भक्तही अर्पितो स्वकर्में ॥ १८ ॥ गुरु शिष्य एक ऐसें ज्ञान जाल्यावरी । गुरुभजन ज्ञानियास मग कां परी । गुरुभजन कर्तव्यच जरी तरी । अनन्य सगुणभजन कर्मार्पणही कां नसावें ॥ १९ ॥ गीता वाखाणावी तरी । कीं भक्ति श्रेष्ठ सर्वांत वाटे जरी । कीं अष्टादशींच ऐसें हरी । स्वयें

बोलेल॥१८२०॥ "य इदं परमं गुह्यं" या श्लोकीं । "भक्तिं मयि परां कृत्वा" ह्मणोनि बोलेल कीं । या गीतेंत थोर ते भक्ति श्रीवत्सांकीं । ऐसी गीता जो वाखाणी माझ्या भक्तांत ॥ २१ ॥ त्यासारिखा प्रिय दुसरा । 'न भूतो न भविष्यति' अगा पांडुकुमरा । ह्मणोन ह्मणेल त्या उदारा । मंगलाचरणीं ईश्वरा समर्पावा ग्रंथ त्यातेंचि ॥ २२ ॥ कीं अर्पी कर्में सकळ । आणि सगुण भजे अनुभवी होऊनि केवळ । न करी अन्यदेवताभजनविटाळ[1]। प्रेमें भजे ऐसी भक्ति हेचि ॥ २३ ॥ ऐसी हे नवमध्यायाची ही टीका । आरंभिली स्मरोनि देवा निष्कलंका । शुद्धसत्त्वोपाधि श्रीवत्सांका । शेषपर्यंकचरणावरी समर्पिली ॥ २४ ॥ टीका समर्पितां पायीं । उचलोनि ठेवी ह्रदयीं । टीकाकारही तोचि शेषशायी । वामन ह्मणे ॥ १८२५ ॥

॥ वामनकृतसंस्कृत श्लोक ॥

यो राजगुह्यमवदन्निजराजविद्यां धर्म्यामृताय उपदिश्य रराज विद्याम् ।
भक्तो न नश्यति कुतोपि समावरोस्तु प्रत्यक्ष एव जगदाकृतिराविरस्तु॥१॥

इति श्रीमद्वामनपंडितविरचितायां यथार्थदीपिकायां नवमोऽध्यायः ॥

---

## अध्याय १०.

॥ श्रीमते भगवते विभूतिपतये सद्गतये श्रीवासुदेवाय नमः ॥ जय जय सकळविभूतिनायक । जयजयाद्वैतविभूतिदायक । जयजयाशेषविभूतिविशेषविधायक । पाहि पाहि ॥ १ ॥ आतां प्रार्थूं श्रीरंगा । कीं जी तूंचि गीता अमृतगंगा । तूतें तुझ्याचि अर्पितों तरंगा । मी काय जाणें तुजविण ॥ २ ॥ गंगेस अर्पावें गंगाजळ । तों तें गंगाचि केवळ । सूर्य जों पाहावा निर्मळ । तों तों दिसे तेजें तयाच्याच ॥ ३ ॥ ज्ञान भक्ति वैराग्याची खाणी । श्रीमद्भगवतगीता तुझीच वाणी । तुझ्याच शब्दें तूतें जी चक्रपाणी । मंगलाचरणींहि स्तवीतसें ॥ ४ ॥ ह्मणीं ग्रंथासी विघ्न बाधी । ह्मणुनी विघ्नहर इतरदेवता वंदूं आधीं । तेही तुझेंचि रूप अद्वैतबोधीं । कीं गंगातीरींचे विहिरे सजळ त्याच गंगेनें ॥ ५ ॥ परि ज्या विहिरियांत वदन । प्रक्षालावें त्यांत धुतां नये वसन । वस्त्रांसि योग्य जीवन । तों स्नान न घडे तयांत ॥६ ॥ एवं च इत्यादि सर्व विहिरे । टाकूनियां बरे बरे । जरी एकाच गंगाजळीं शिरे । तरी कोण कार्य त्याचें न होणार ॥ ७ ॥ तूंचि देवता सकळ । विहिरे मात्र गंगेनें सजल । परि सोडोनि गंगा केवळ । स्नान

---

१ पाण्याचे झरे.

करणें अविधि विहिरियांत ॥ ८ ॥ तूतेंचि यजिती अन्य उपासक । परि ते ऐसे अविधिपूर्वक । हें पूर्वाध्यायांत तूंचि श्रीवत्सांक । बोलिलासी ॥९॥ या गीतेंत वारंवार । देवा तूं बोलिलासि हा विचार । तेंचि गीता वाखाणितां देव इतर । प्रार्थितां लाज मज कैसी वाटेना ॥ १० ॥ वाखाणावी ऐसी गीता । आणि तोंडींच वंदावी क्षुद्रदेवता । तेव्हां गीतार्थ काय बिंबला अनंता । परोपदेशार्थ पांडित्य ॥११॥ सर्वां देवांस आपणास अद्वैत । सत्य परंतु मुक्तिप्रद नव्हे अन्यदैवत । ऐसें बोलसी तूं भगवंत । या गीताशास्त्रीं प्रतिपदीं । ॥ १२ ॥ आतां ज्ञान जालियावरी । तूंचि सर्वदेवता ह्मणूनि जरी । विघ्नहर देवता प्रार्थूं तरी । घट पट काय तूं नव्हसी ॥१३॥ ज्ञानाश्रयें धनार्थी । ब्रह्मभावें धनवंतातें प्रार्थी । प्रमाण देतों एतदर्थी ॥ अद्वैत ॥ १४ ॥ लोळे धनवंताचे पायीं । कीं तूं परब्रह्म सर्वांठायीं । साधी अशा उपायीं । धन साधनापासुनी ॥१५ ॥ या न्यायें देवाधिदेवा । तुज सोडोनि इतरा देवा । प्रार्थूनि मंगलाचरणीं सेवा । विघ्नपरिहारार्थ करणें तयाची ॥ १६ ॥ प्रसन्न ज्याला पृथ्वीपती । तो राजद्वारीं द्वारपाळाप्रती । मार्ग दे ह्मणूनि तूंचि क्षितिपती । कां गौरव ऐसें देईल ॥ १७ ॥ उसावलें अद्वैत । तरी उपास्य तूंचि परमदैवत । ऐसें कळलें निश्चित । या गीता सच्छास्त्रीं ॥ १८ ॥ नवमाध्यायपर्यंत । हेंचि वदलासि अनंत । आतां याही विभूतिअध्यायांत । हेंचि आरंभीं बोलसी ॥ १९ ॥ ह्मणूनि तूतें केलें नमन । आतां त्वद्रूप जे श्रोते जन । सारासार जाणते मात्सर्यहीन । गीतार्थ त्यांप्रति वर्णितों ॥ २०॥ पूर्वाध्यायांत जो एकचि भवभंजन । तोचि मुख्यत्वें बोलिला स्वभजन । तें ऐकता जाला अर्जुन । अतिप्रीतीकरूनी ॥ २१ ॥ देखोनि येविषयीं प्रीती । संतुष्ट जाला श्रीपती । ह्मणूनि त्याच अर्जुनाप्रती । हा श्लोक बोलतो श्रीभगवान् ॥ २२ ॥

॥ श्रीभगवानुवाच ॥ भूय एव महाबाहो शृणु मे परमं वचः ।
यत्तेऽहं प्रीयमाणाय वक्ष्यामि हितकाम्यया ॥ १ ॥

॥ टीका ॥ ह्मणे श्रीभगवान् षड्गुण । कीं अगा महाबाहो तुझें व्हावें परम कल्याण । या इच्छेंकरूनि मागुतीं विवरण । बोलतों आईक तें ॥२३॥ अगा सर्वांत थोर मी भगवंत । हे गुह्य गोष्टी अत्यंत । जे अनधिकारी असंत । न वाटे गोड हें त्यांतें ॥ २४ ॥ ज्यास पित्ताचा ज्वर । त्यास कडु वाटे साखर । तैसा जोंपर्यंत पापाचा भर । तों थोरपण माझें रुचेना ॥२५॥ "न मां दुष्कृतिनो मूढा" या श्लोकेंकरूनी । पापी मूढ मज न भजती ह्मणोनी

सप्तमाध्यायांत तुज बोललों यावरूनी । समज तूं कीं माझें परत्व तेणें तें नावडे ॥ २६ ॥ तैसियास माझें परत्व । मीचि सर्वेश्वर मुक्ति देणार हें तत्त्व । कां मी सांगों ज्याला महत्त्व । साधारण माझें वाटतें ॥ २७ ॥ प्रसिद्ध अद्वैतवाणी । सर्व देव सारिखे हे कहाणी । जो तो सांगे मी चक्र- पाणी । थोर ह्मणतां खवळती ॥ २८ ॥ तूंही असतास तैसा । तरी न सांगतों तुज रहस्यार्थ ऐसा । तुझिया मनीं माझ्या परत्वाचा ठसा । जों जा उमटे तों तों पावतोसि प्रीतीतें ॥ २९ ॥ हा भाव हृदयीं धरुनी । "प्री- यमाणाय" ह्मणूनी । तूं प्रीतीतें पावतोसि ऐसिया पांचा अक्षरीं करूनी । पुन्हा हेंचि निरूपीन ह्मणतसें ॥ ३० ॥ आणि बोलों पाहतों जया वचना । तें साधारण मानिसी ह्मणीं अर्जुना । कीं या श्रवणाची प्रीति माझ्या मना । ह्मणूनी पुन्हा बोलतों ऐसें ह्मणीं मानिसी ॥ ३१ ॥ तरी तुज या श्रवणीं प्रीती । आणि मज हे गोष्टी मुख्यत्वें न वाटती । आणि तुझ्याही हिताची गोष्टी नसती । तरी कां पुन्हा मी बोलतों ॥ ३२ ॥ हें परम अत्यंत वाटतें मजला । ह्मणूनि हें परमवचन मागुती सांगतों तुजला । आणि हा रहस्य जों जों समजला । तों तों स्वहित अत्यंत ॥३३॥ ह्मणुनी "हितकाम्यया" । ह्मणजे तुझिया हिताचे इच्छेनें धनंजया । सांगतों पुन्हा पंडुतनया । स्वम- हिमाच पुढिल्या श्लोकापासुनी ॥ ३४ ॥ सकळ देवां ऋषींचा उद्भव । ज्या पासूनि तो देवाधिदेव । तें हेतुपूर्वक परत्व आपलें देव । बोलतसे आतां या श्लोकीं ॥ ३५ ॥

॥ श्लोक ॥ न मे विदुः सुरगणाः प्रभवं न महर्षयः ।
अहमादिर्हि देवानां महर्षीणां च सर्वशः ॥ २ ॥

॥ टीका ॥ अगा मी निर्गुण ब्रह्म । अनादि मायानदीचा मजपासूनी उगम । होय तें माझें सगुणत्व सर्वांहूनि जें प्रथम । तो प्रभव माझा ॥३६ ॥ प्रकर्षें जो भव । सगुणत्वाचा आविर्भाव तो प्रभव । त्यातें न जाणती कोणींच कीं उद्भव । मजपासूनि सर्वांचा ॥ ३७ ॥ ह्मणूनि माझा प्रभव नेण- ती सुरगण । अथवा महर्षि जे अत्यंत निपुण कीं । सर्वां देवां सर्वां ऋषींचा आपण । मी आदि अनादि ईश्वर ॥ ३८ ॥ मी आदि सर्वांदेवां महर्षींचा यास्तव । माझिया प्रभवातें न जाणती ऋषि देव । कीं ज्यापासूनी ज्या संत- तीचा उद्भव । आदि तया संतानाचे वडील तो ॥ ३९ ॥ परि तो जेव्हां उपजला । उत्पत्ति नव्हती तेव्हां याला । ह्मणूनि त्यांस नाहीं कळला । प्रभव त्या वडिलाचा ॥ ४० ॥ आतां शास्त्रदृष्टीकरूनी । ईश्वरप्रादुर्भाव

कळला ह्मणूनी । तें कळणें नव्हे यावरूनी । कीं मी आदि त्यांची हा हेतु बोलिला ॥ ४१ ॥ प्रभव माझा या लागीं बोलती । कीं मी आदि त्यांची ह्मणे श्रीपती । यावरूनि अवतारप्रादुर्भावाविषयीं अर्जुनाप्रती । न बोले हा श्लोक ॥ ४२ ॥ एवं ईश्वर अनादी । त्याचा प्रादुर्भाव न जाणती देवादी । यास हेतु कीं तो त्यांची आदी । संतति न देखे जन्मादि न पूर्वजाचा ॥४३॥ आतां प्रभव शब्दें जन्म । तो दोष परिहरील उत्तरश्लोकीं सर्वोत्तम । आणि जो अज जगत्कारण पुरुषोत्तम । तोचि महाईश्वर हा इत्यर्थ या श्लोकीं ॥४४॥ वेदीं पुराणीं हा इत्यर्थ । ह्मणूनि बोलतो हाही अर्थ । आणि या जाणण्याचें फळही समर्थ । बोलतसे आतां या श्लोकीं ॥ ४५ ॥

॥ श्लोक ॥ यो मामजमनादिं च वेत्ति लोकमहेश्वरम् ।
असंमूढः स मर्त्येषु सर्वपापैः प्रमुच्यते ॥ ३ ॥

॥ टीका ॥ अगा मी अज अनादि महेश्वर । ऐसें मातें जाणतो जो नर । तो मनुष्यांत परम चतुर । सुटतो सर्व पापापासूनी ॥४६॥ श्लोकांत इतकाचि अर्थ । परि पदोपदीं दाटला भावार्थ । जो समजला पार्थ । भगवत्सन्निधानें करूनी ॥ ४७ ॥ पूर्वश्लोकीं ह्मणे माझा प्रभव । मजपासूनि जाले ते नेणती महर्षि देव । प्रभव ह्मणिजे जन्म आणि येथें स्वयमेव । मी अज ऐसें ह्मणतसें ॥ ४८ ॥ आणि प्रलयानंतर ईश्वरत्व । ब्रह्मीं न दिसे हें तत्त्व । प्रगटतां मागुती शुद्ध सत्त्व । ईश्वरत्व प्रगटलें ॥ ४९ ॥ तरी तोचि त्याचा प्रभव ह्मणिजे जन्म । ऐसें असोनि या श्लोकीं मी अज ह्मणे सर्वोत्तम । तरी अजत्व हें त्याचें परम । कशावरूनी ॥ ५० ॥ ऐशा संदेहाचें स्थळ । ह्मणूनि अजत्वीं हें बोले मेघनीळ । कीं मी अनादि सर्वादिमूळ । या अनादित्वें साधितों अजत्व ॥ ५१ ॥ भाव ऐसा कीं धनंजया । ब्रह्मीं प्रगटते प्रथम माया । तेव्हां मायाशबलता ईश्वरा अव्यया । प्रगट होणें मज घडे॥५२॥ तोचि जन्म मज ह्मणावा । तरी प्रतिसृष्टीच्या आदिकाळीं या प्रादुर्भावा । देखतां उपाधि हा माझा गणावा । अनादि ह्मणोनि ॥ ५३ ॥ अनादित्व जेव्हां सिद्ध जालें । तेव्हां अजत्व माझें साधलें । तेव्हां प्रभव ह्मणूनि या बोलें । जन्म मजला न ह्मणवे ॥५४॥ अत एव " नासदासीन्नो सदासीत् " ऐशा श्रुती । प्रलयीं ईश्वरोपाधि नाहीं ह्मणती । तरी योगनिद्रा माझी ते वाखाणिती । वेद ऋषि व्यासादिक ॥ ५५ ॥ कीं ब्रह्मीं माझा उपाधी । लय पावतो तो न ह्मणवे योगसमाधी । कीं योगीं प्रत्यय स्वात्मबोधीं । प्रत्यक्वृत्तीस उरतसे ॥ ५६ ॥ प्रळयीं ते प्रतीति नसे । तेव्हां मायांशास ठाव न दिसे ।

वटबीजांत वट वसे । तैसी माया अद्वितीयपणें लय पावते ॥ ५७ ॥ तेव्हां योगप्रतीति नाहीं । ह्मणूनी सुषुप्ति ह्मणावी जरी कांहीं । तरी न ह्मणवे नि-द्राही । कीं तो तमोलीन नव्हे उपाधि माझा ॥ ५८ ॥ एवं च तो योग न ह्मणवे । अथवा निद्राही न गणवे । आणि योगनिद्राही बोलवे । एका अंशें करूनी ॥ ५९ ॥ कीं सत्त्वयोगीं ब्रह्ममय । तरी त्याच ब्रह्मीं सत्त्वाचा लय । आणि तेथूनी मागुती उदय । सत्त्वयोगांतूनि निघे जे रीती ॥ ६० ॥ आतां प्रलयानंतर नसे चिच्छक्तीस चित्प्रत्यय । निद्रेसमान भाव होय । निद्राचि ह्मणावी तरी नसे तमीं लय । उपाधीलीन निर्धर्मी चित्स्वरूपीं ॥ ६१ ॥ ह्मणूनि योगनिद्रा । ते समयीं मज जगतरंगाच्या समुद्रा । वेद ऋषि ह्मणती अगा सुभद्रा । कीं जागा होतो उपाधि माझा मागुती ॥ ६२॥ एवं च एक उपाधि नासता । आणि दुसरा उपाधि उपजता । तरी जन्म मज ह्मणों ये-ता । अगा अर्जुना ॥ ६३ ॥ ब्रह्म अनादि जैसें । ईश्वरोपाधीचें अनादित्व तैसें । कीं जधींचे किरण तधींचें मृगजळ ऐसें । अनादि अनादित्व हें माझें ॥ ६४ ॥ ह्मणूनि पूर्वश्लोकीं माझा प्रभव । तो ह्मणावा प्रादुर्भाव । धरूनि पोटीं इत्यादि भाव । ह्मणूनि ह्मणे अगा अज मी अनादि मी ॥६५॥ अज अनादि मी यास्तव । मजपासूनि जन्मले ऋषि देव । ते माझा प्रभव नेणती कीं मजपासूनि सर्व । उपजती मी अज मी अनादि ॥ ६६ ॥ एवं च जो अज अनादि । ज्यापासूनि देव महर्षि जो सर्वांचा आदि । तोचि महेश्वर ऐसें वेदवेदांदि । सर्व ह्मणती ॥ ६७ ॥ ऐसें माझें अजत्व । आणि त्यास हेतु ऐसें माझें अनादित्व । त्यामुळें माझें महेश्वरत्व । जो जाणे ॥ ६८ ॥ असंमूढ तो ह्मणावा । मनुष्यांत थोर तो गणावा । आणि सर्व पापापासूनि सुटला जाणावा । तो पुरुष ॥ ६९ ॥ मूर्ख अज्ञ ह्मणावा मूढ । बहुत अ-विवेकी ह्मणावा संमूढ । अत्यंत विवेकी तो असंमूढ । कीं अतिमूढत्व गेलें जयाचें ॥७०॥ एवं अविद्यायुक्त भलता मूढ । परि मज सर्वांत थोर मानूनि भजे तो नव्हे संमूढ । कीं अविद्याग्रंथि सदृढ । सुटणार त्याची ॥ ७१ ॥ युक्त अविवेकरूनी । आणि न भजे माझें परत्व जाणोनी । तो कधीं न पावे ज्ञान ह्मणोनी । संमूढ अविवेकी ह्मणावा ॥ ७२ ॥ जो मज भजों लागला । असंमूढ ह्मणावें त्याला । कीं ज्ञान होणार ज्याला । कळतां माझें अजत्व अनादित्व महेश्वरत्व ॥ ७३ ॥ अगा मज मानूनि साधारण । करितां वेदांताचें श्रवण । गुरुमुखें कळली जरी आत्मखूण । तरी व्यर्थ होतें तें ज्ञान ॥ ७४ ॥ "श्रुत्वाप्येनं वेद न चैव" ह्मणोनी । द्वितीयाध्यायांत

या चरणेंकरूनी । आत्मा आइकोनि वेगळा जडापासूनी । न जाणती म्ह-णजे गमाविती न धारतां चित्त त्यांत ॥ ७५ ॥ चित्त चित्स्वरूपीं न धारे । तों दीप विझवी पूर्वसंस्काराचें वारें । न जळती पापपुण्यांचे थारे । चित्तीं संचिताचे एकाग्रतेवांचूनी ॥ ७६ ॥ आणि सर्वदा अकर्त्रात्मपण । न स्फुरे कर्मीं उपजे मीपण । त्यांस करीच लेप क्रियमाण । पापपुण्य जोडे नवेंही तयांतें ॥ ७७ ॥ इतकिया अनर्थास मूळ । न कळणें माझें अजत्व अना-दित्व प्रांजळ । आणि जो हें जाणे केवळ । तो सुटे सर्व पापापासूनी ॥ ७८ ॥ कीं सर्व पापें ह्मणजे । पुण्यही पापचि जाणिजे । कीं पुण्यफळरूपही भोग जे जे । तेही हेतु जन्ममरणाचे ॥ ७९ ॥ एवं च सर्वांहूनी आपलें उत्त-मत्व । कळतां प्रसादें आपल्या कळे तत्त्व । त्यास क्रियमाण पाप-पुण्याचें अलिप्तत्व । आणि नाश त्याच्या संचिताचा ॥ ८० ॥ कीं भक्तांचा योगक्षेम । मी वाहतों पुरुषोत्तम । योग ह्मणिजे देऊ-नि आत्मज्ञान उत्तम । क्षेम जतन करणें तयाचें ॥ ८१ ॥ तें ज्ञान जेव्हां जतन जालें । चित्त चिन्मय होतां संचित त्याचें जळालें । अकर्त्रात्मस्मृ-तीनें नाहीं लिंपलें । क्रियमाण पाप पुण्य ॥ ८२ ॥ तो तेव्हां सर्व पापापा-सूनी । सुटलाच जाणावा ह्मणोनी । बोलें पोटीं हा अर्थ धरूनी । कीं “ सर्वपापैः प्रमुच्यते ” ॥ ८३ ॥ सर्व शब्दाचा साकल्य अर्थ । ऐसा सू-चवी समर्थ । अन्यथा सर्व शब्द होतो व्यर्थ । कीं अज्ञ न सुटे संचितक्रि-यमाणापासूनी ॥ ८४ ॥ संचित क्रियमाण । पाप आणि पुण्य जाण । दोन्ही पापचि ऐसी खूण । वेदांतसूत्रीं प्रसिद्ध ॥ ८५ ॥ ब्रह्मसूत्र ॥ तद-धिगमे उत्तरपूर्वार्द्धयोरश्लेषविनाशौ तद्व्यपदेशात् ॥ सूत्रार्थ ॥ त्याचें होतां ज्ञान पूर्ण । उत्तर अघ ह्मणिजे पुढील जें क्रियमाण । आणि पूर्व अघ ह्मणिजे संचित पापपुण्य जाण । सुटका दोहींपासूनी दोंपरी ॥ ८६ ॥ कीं पुढें क्रियमाणरूप । त्याचा अकर्त्रात्मपणें नव्हे लेप । आणि पूर्वील पापपुण्यरूप बंधक पाप । विनाश त्यांचा होय होतां चित्त चिन्मय ॥ ८७ ॥ ऐसा सर्वा पापांपासूनि तोच सुटे । कीं अविद्याबंध ज्याचा तुटे । जन्ममरणाची वार्ता खुंटे । ऐसियाची तेधवां ॥ ८८ ॥ या इतकियास कारण । अज अनादि महेश्वर एक नारायण । जो ऐसें जाणे सुजाण । फळ तो पावे ॥ ८९ ॥ सर्व शब्द ह्मणतां पाप मात्र । संचित पापपुण्य उरलें विचित्र । तेव्हां सर्व शब्द कमलनेत्र । व्यर्थ बोलिला ॥ ९० ॥ उगाच पापापासूनी । तो सुटतो ह्मणोनी । जरी बोलता तरी त्याहीवरूनी । समजताच नाश पाप-

मात्राचा ॥ ९१ ॥ सर्व शब्दें ऐसा अर्थ । बोले येथें समर्थ । ऐसा अर्थ न बोलतां व्यर्थ । सर्व शब्दें ये स्थळीं होणार ॥९२ ॥ एवं विष्णुभजनाविण । मोक्ष नाहीं ऐसें आपण । गीतेंत बोले ब्रह्म सगुण । तें भजनपरत्व समजोनि करितां हें फळ ॥ ९३ ॥ एवं अजत्वें अनादित्वें महेश्वरत्वें आपण । सर्वांत थोर देव ऋषि ते करितों निर्माण । हें बोलिला सर्वज्ञ जगत्कल्याण । सर्वेश्वरत्व आपलें ऐसें येथवरी ॥ ९४ ॥ हें आदिकाळींचें स्वकर्तृत्व । बोलोनि दाविलें स्वश्रेष्ठत्व । आतां स्थितिकाळींही आपलें सर्वेश्वरत्व । सर्व प्रेरकत्वें बोलतो ॥ ९५ ॥ आणि गायत्री सर्वां वेदांची जननी । ते बुद्धिप्रेरकास ध्यावें ह्मणूनी । ह्मणते तरी उपास्य सर्वांचा यावरूनी । बुद्धिप्रेरक आपण ऐसें बोलतो या श्लोकीं ॥ ९६ ॥

॥ श्लोक ॥ बुद्धिर्ज्ञानमसंमोहः क्षमा सत्यं दमः शमः ।
सुखं दुःखं भवो भावो भयं चाभयमेव च ॥ ४ ॥

॥ टीका ॥ अगा अर्जुना जनाची बुद्धि । इच्छी आपुली सुखाची सिद्धी । त्या बुद्धीची समृद्धी । मजपासूनी ॥ ९७ ॥ कीं आपलें हो बरें । आपलें वाईट न हो कोण्याप्रकारें । बुद्धि ह्मणोनि नांव खरें । याच निश्चयाचें ॥९८॥ मग जों जों होय शाहणा । तों तों समजे स्वहितखुणा । मुख्य मोक्षापेक्षा उपजे आपणा । स्वरूपनियतनिश्चयरूपिणी ते बुद्धी ॥ ९९ ॥ जे ऐसी मुख्य बुद्धी । तीची मजपासूनीच सिद्धी । एवं च आपलें बरें हो ह्मणूनिया निश्चयाची समृद्धी । ते बुद्धि सर्वांसही ॥ १०० ॥ ऐसी जे बुद्धि गणावी । ते मजपासूनीच सर्वांस जाणावी । प्रस्तुतीं बुद्धि ते ह्मणावी । कीं मोक्षापेक्षेनें जिज्ञासा ज्ञानाची ॥ १ ॥ बुद्धि देवूनि देतो ज्ञान । ऐसें बोलतो ज्ञानघन । कीं मोक्षप्रद जगज्जीवन । आपण एकचि हा भाव ॥ २ ॥ बुद्धि जनांस मजपासूनी । होतसे अर्जुना ह्मणोनी । आरंभीं प्रथम पदें वदोनी । त्यापुढेंचि ज्ञान मजपासूनी ह्मणतसे ॥३ ॥ मजपासुनी बुद्धि जे मोक्षापेक्षा । होतसे मज भजतां ते मुमुक्षा । मजचिपासूनी त्या दक्षा । ज्ञानही होतसे हा अर्थ ॥४॥ आतां ज्ञान ह्मणिजे जाणणें । प्रथम आपणास आपण ओळखणें । जडनिषेधें देखणें । आपण आपणा ॥ ५ ॥ हें आवरण ज्ञाननाशन । जालें जडव्यतिरेकें आत्मज्ञान । परंतु जडद्वैतनिरसन । जालें पाहिजे अन्वयें करूनी ॥ ६ ॥ व्यतिरेकें नासे जें आवरण । तें प्रथम अविद्यास्फुरण । न कळणें स्वस्वरूपलक्षण । कोण आपण ह्मणोनी ॥ ७ ॥ जैसा न कळतां दोर । दोरीं उपजे सर्प थोर । सर्प भय उपजे घोर । दोर न कळणें मूळ त्याचें

॥ ८ ॥ परि तें आपल्या मूळ कारणाहूनी । जडभ्रांति अज्ञान प्रबळ म्ह-णोनी । संमोह शब्दें करूनी । जड द्वैत बोलावें ॥ ९ ॥ कीं बाल्य तारु-ण्याचें मूळ । आणि बाल्यापरीस तारुण्य जैसें प्रबळ । तैसें जडभ्रांती मो-हाचें अधिक बळ । आवरणाहूनी ॥११०॥ आत्मा न कळे हें अज्ञानावरण । मोह शब्दें त्याचें करावें विवरण । त्याहूनी जें जडद्वैत दारुण । संमोह म्हणावें तें यास्तव ॥ ११ ॥ कीं दोर न कळे हा मोह । परि सर्प भासतां होय संमोह । भयकंपयुक्त देह । होय देखतां मिथ्या सर्पातें ॥ १२॥ ज्या रज्ज्वज्ञानें रज्जु न कळे । त्या मोहें देह सभय होऊनि चळे । सर्प देखतां भय पळे । संमोह या भावें म्हणावें तयातें ॥ १३ ॥ तो जडसर्पसंमोह नासे तरी । कीं आत्मरज्जु कळे जरी । म्हणूनी आधींच म्हणे हरी । तें ज्ञान मजपासूनि म्हणोनी ॥ १४ ॥ हें व्यतिरेकज्ञान । जडनिषेधें आत्मदर्शन । जालें अनात्मत्वभावें जडनिरसन । परि तें द्वैतरूपें वेगळें दिसतसे ॥ १५ ॥ दसोडीच्या रूपें तंतु कळे । तथापि बाळकास पटीं तंतु नाढळे । तोचि तंतु पटीं पटान्वयें डोळे । पाहों लागती दाखवितां ॥ १६ ॥ तो संमोहाचा निरास । असंमोह म्हणावें त्यास । तोही मजचिपासूनि म्हणे जगन्निवास । तिसरिया पदें प्रथमचरणीं या श्लोकीं ॥ १७ ॥ एवं व्यतिरेक अन्वय द्वि-विध । जाला जरी मजपासूनि बोध । तथापि पूर्वसंस्कारें संबंध । सत्त्वास रजतमाचा होतसे ॥ १८॥ रजतमें जों अशांत । शांतीतें न पावे सत्त्व तों-पर्यंत । म्हणूनि दुसरिया चरणीं भगवंत । शांतीही मजपासूनीच म्हणतसे ॥ ॥ १९ ॥ कीं क्षमा सत्य दम शम । मजचि पासूनि होती हा नियम । कीं मोक्षदाता मीच एक पुरुषोत्तम । भाव ऐसा सूचवी ॥१२०॥ क्षमापरा-चा अपराध सोसणें । सत्य यथार्थ बोलणें । दम इंद्रियांचें आटो-पणें । निस्पृह जितेंद्रिय असत्य कां बोलेल ॥ २१ ॥ स्वस्वरूपीं चित्ताचा उपरम । तो मुख्यत्वें म्हणावा शम । ऐसा अर्धश्लोकें पुरुषोत्तम । स्वभजन-फळें बोलिला ॥ २२ ॥ उत्तरार्धें साधारण । फळें पावती करूनि कर्में त्रिगुण । त्यांचें स्वकृतकर्मफळविवरण । मजचिपासुनी म्हणतसे ॥ २३ ॥ पुण्याचें फळ सुख । पापाचें फळ दुःख । त्या भोगाकारणें आणीक आणिक । जन्म घेणें तेंही मजपासूनी ॥ २४ ॥ भोगाकारणें देहोद्भव । भोग सरतां मरण तो त्याचा अभाव । तेथें भय अभय दोन्ही भाव । मजचिपासुनी ॥ २५ ॥ हेतु कांहीं दुःखाचा । देखतां उद्भव होतसे भयाचा । परिहार दे-

१. दशा.

खतां तयाचा । अभय होय ॥ २६ ॥ हे दोन्ही मजचिपासुनी । एवं च सर्वही मजपासूनि ह्मणोनी । मीच एक सर्वांचा ईश्वर यावरूनी । समज अर्जुना हा भाव पूर्वानुसंधानें ॥ २७ ॥ एवं या श्लोकाच्या पूर्वार्धीं । बोलिलास भजनफळसमृद्धी । साधारण कर्मकर्त्ता याचि उत्तरार्धीं । फळप्राप्ति आपणाच पासुनी बोलिला ॥ २८ ॥ आतां सिंहावलोकनरीती । आणखीं स्वभजनफल श्रीपती । या श्लोकीं अर्जुनाप्रती । बोलतसे जें पूर्वश्लोकीं बोलतां राहिलें ॥ २९ ॥

॥ श्लोक ॥ अहिंसा समता तुष्टिस्तपो दानं यशो ऽयशः ।
भवंति भावा भूतानां मत्त एव पृथग्विधाः ॥ ५ ॥

॥ टीका ॥ हिंसा ह्मणिजे परपीडा । ते माझ्या भक्तापासुनी न घडे अगा सुघडा । ज्यांस सर्वभूतीं दिसतसे मी उघडा । ते पीडा न करिती कोणासही ॥१३०॥ ऐसी सद्वृत्तीतें अहिंसा । माझ्या भक्ताच्या मनीं तीचा ठसा । जे मजपासुनींच त्यांच्या मानसा । अहिंसा बाणतसे ॥ ३१ ॥ काया वाचा मनसा । न घडे कधीं जयास हिंसा । हृदयांत त्याच्या दृढ ठसा । ऐसा मजचिपासूनी ॥ ३२॥ सर्वभूतीं मज अनंता । जे पाहती तत्त्वता । ज्यांस स्वदेहपरदेहसाम्यसमता । कां परपीडा ते करतील ॥ ३३ ॥ एवं च ऐसी समता । मजचिपासून गा पांडुसुता । जे भजोनि मज अनंता । सर्वदा तुष्ट ॥३४॥ अंतरीं असंतुष्टि । ते विषयभोगें अपेक्षिती पुष्टी । ते साधाया करिती कष्टी । इतर जीवांतें ॥ ३५ ॥ तरीच माझ्या भक्तांस सर्व सृष्टी । मद्रूप दिसतां अत्यंत तुष्टी । ते कां करितील कष्टी । कोणासही ॥३६ ॥ ज्यांस यथायोग्य सर्व भूतीं । मद्भावें पूजा घडती । कायिक वाचिक मानसिक तपें जोडती । सहजें तयांतचि ॥३७॥ हें त्रिविध तप । सप्तदशीं वर्णिलें अध्यात्मदीप । तें तपही ह्मगे निजानंदस्वरूप । मजपासूनि होतसे ह्मणोनी ॥ ३८ ॥ ऐसें तप मजपासुनि सांपडे । त्याची बुद्धि सर्वदा परहिताकडे । ह्मणूनि त्यांस भूतकृपेंकरूनि घडे । दान तेंही मजपासुनी॥३९॥कीं मी त्यांच्या बुद्धीतें । सन्मार्गी प्रेरूनी देतों सर्वसिद्धीतें । यापरि मजपासूनि समृद्धीतें । पावती मद्भक्त ॥१४०॥ एवं च दानही तयां घडे । कीं बुद्धि लागली भूतदयेकडे । ज्यांच्या ब्रह्मविद्यादानें उघडे । कवाड मोक्षप्राप्तीचें ॥४१॥ ब्रह्मविद्येनें करिती धन्य । त्यांस तुच्छ पदार्थ अन्य । देती धन आणि धान्य । नवल काय तयांचें ॥४२ ॥ ऐसे अहिंसादि गुण । त्यांचें यश जगीं होय पूर्ण । तेंही ह्मणे कमलेक्षण । मजचिपासुनि ह्मणोनी ॥ ४३ ॥ एवं

स्वभक्तींस अहिंसादि गुण । आपण देतों आणि आपण । त्यांच्या कीर्तीनें ही परिपूर्ण । करीतसें सर्व लोक ॥ ४३ ॥ स्वभक्तीकीर्तिघोषें । त्यांच्या अनुभव उद्गाररसपीयूषें। कर्ण जनांचे अशेषें । आपण तृप्त करितों हा अर्थ॥४८॥ जैसा वृक्ष पुष्पित । त्याचा सुवास असे फिरत । सहज वायुगुणें असे भरत । प्राणीं जनांच्या ।। ४६ ॥ तैसा सहज आपला गुण । कीं स्वभक्तकीर्तीनें विश्व संपूर्ण । सुखी करीतसें ऐसें विवरण । येथें श्रीकृष्ण सूचवी ॥४७॥ कीं भूलोकीं त्यांची प्रसिद्धी । तैसीच ब्रह्मलोकीं ही यशसमृद्धी । कीं सनकादिभक्तांचि भक्ति सुखसिद्धी । कौतुकें ब्रह्मलोकींही वर्णिती ॥ ४८ ॥ पाताळीं सर्वज्ञ शेष । करी धन्य ते ह्मणूनी कीर्तिघोष । एवं पाताळापासूनि सत्यलोकपर्यंत अशेष । भक्त वर्णिती भक्ति त्यांची ॥ ४९ ॥ ऐसें त्यांचें यश । मजचिपासूनी ह्मणे हृषीकेश । ऐसा या यश शब्दें निर्देश । सिंहावलोकनें पूर्वोक्त भक्तांचा ॥ ५० ॥ सिंहें पुढें पुढें जावें । आणि परतोनि मागें पाहावें । या रीतीं देवाधिदेवें । यश शब्दपर्यंत वर्णिले भक्त ॥ ५१ ॥ आतां सिंहावलोकनरीती । अयश शब्दें करूनी मागुती । अभक्त साधारण जनाची फलश्रुती । बोलतसे ॥ ५२ ॥ कीं अयश ह्मणजे अपकीर्ती । पापें पापकर्मीं प्रवृत्ती । ते जनमुखीं सरस्वती । बोले तेंही कुत्सित फळ मजचिपासूनी ॥ ५३ ॥ हे भूतांचे भाव । वेगळे वेगळे ते ह्मणे माधव । मजचिपासूनि कीं सहज स्वभाव । ईश्वरत्वाचा अनादी ॥ ५४ ॥ ऐसा सर्वां ईश्वरांचा ईश्वर । मीच भक्तवत्सल रमावर । ह्मणूनि मजपासूनि हे सर्वप्रकार । उत्पन्न होती भूतांचे ॥ ५५ ॥ या पांच श्लोकांवरी आपलें सर्वेश्वरत्व हरी । बोलिला अत एव ह्मणतो याउपरी । कीं मीच सेव्य सर्वां सिद्धांचा ॥ ५६ ॥

॥ श्लोक ॥ महर्षयः सप्त पूर्वे चत्वारो मनवस्तथा ।
मद्भावा मानसा जाता येषां लोक इमाः प्रजाः ॥ ६ ॥

॥ टीका ॥ अगा सृष्टीच्या आदिकाळीं । ब्रह्मा उपजला नाभिकमळीं । त्याच्या मनीं सृष्टीची उकळी । ह्मणोनि प्रथम पुत्र मानस उपजले ॥ ५७ ॥ त्यांत सातजण महाऋषी जाले । चौघे सनकादिक उपजले । चतुर्दश मनु उद्भवले । सृष्टि करावया ॥ ५८ ॥ देव आणि ब्राह्मणादि वर्ण । आणि नाना जातीनीं हें विश्व पूर्ण । त्या सप्तऋषि मनूंचें संतान संपूर्ण । हें अगा अर्जुना या लोकीं ॥ ५९ ॥ हे सर्वही माझे भक्त । माझेचिठायीं मनोभाव ज्यांचा अनुरक्त । त्यांत सनकादि चौघे अतिविरक्त । सृष्टि करणें न ने

तयांतें ॥ १६० ॥ तथापि त्यांच्या बंधूंची संतती । ते त्यांचीही होय कीं ह्म-णूनी श्रीपती । या सर्वांची हे संतति ह्मणे अर्जुनाप्रती । या भावें ॥ ६१ ॥ तत्त्वता पाहतां विचार । सनकादि चौघे विरक्त फार । ज्यांस अनेक जन्म संस्कार । स्त्रीसंतानादि कांहीं नलगे ह्मणोनी ॥६२॥ पूर्वकल्पीं अनेक जन्म । न जिंकितां इंद्रियग्राम । काम अनावर ह्मणूनी श्रम । पावले अपार ॥६३॥ तारुण्यमदाचें बळ । काम करी व्याकुळ । ह्मणूनि या जन्मीं ते समानशी-ल । बालरूपेंचि राहिले ॥ ६४ ॥ तारुण्य देहीं येवों न देती । देहीं कामचि न प्रवेशे ये रीति । बाळचि होउनि ते सुमती । राहिले भयें कामाच्या ॥ ६५ ॥ रोग होऊं द्यावा । मग तो औषधें हरावा । त्याहूनि उपाय बरवा । कीं रोगचि निघों न देइजे स्वदेहीं ॥ ६६ ॥ ऐसा काम देहीं भरावा । मग तो विवेकें परिहरावा । याहूनि उपाय हा बरवा । कीं कामचि निघों नेदी स्वदेहीं ॥ ६७ ॥ ऐसे सनकादि चौघे भक्त । सृष्टिकर्तृत्व मानूनि अयुक्त । सप्तऋषि मनु यांसारिखे आसक्त । नाहीं जाले संतान उत्पन्न करावया ॥६८॥ ऐसें असोनि मनु ऋषि सप्त आसक्त । आणि हे समान लेखिले भक्त । कीं प्रारब्ध दुर्निवार ह्मणूनि युक्त । जाले सृष्टिकर्मांत ॥ ६९ ॥ ज्ञान भक्ति वैराग्य । यां सर्वांसही हे सर्व सभाग्य । परंतु प्रारब्धें केलें भोग्य । संता-नामुळें स्त्रीसंगादिक ॥ १७० ॥ एवं च हे सकळ । माझे भक्त केवळ । ह्मणूनि ह्मणे मेघनीळ । दृष्टि त्यांचिया भावाकडे देउनी ॥ ७१ ॥ एवं हे सृष्टिकर्ते यांचें मूळ । ब्रह्मा तोही आपला बाळ । आणि हे सर्व ही सुमंगळ । आपलेच भक्त ॥ ७२ ॥ ऐसें बोलतां ह्मणे श्रीपती । कीं जगीं हे यांचीच संतती । संतति द्विप्रकार श्रुति बोलती । त्यांतही एक संतति प्रसिद्ध ॥ ७३ ॥ दुसरी शिष्यप्रशिष्यद्वारा । क्रमेंचि आली ब्रह्मविद्या अमृतधारा । ब्रह्मयापासूनि परंपरा । चालली ते या भगवंताचपासूनी ॥ ७४ ॥ कीं ब्रह्मयाचे पुत्र मानस । संतति त्यांची हे प्रजा ह्मणतसे जग-न्निवास । उपदेश प्रथम ज्या ब्रह्मयास । तो याचा गुरुकृतार्थ आपणाच पासुनी ॥ ७५ ॥ त्याणें स्वपुत्रांस केला उपदेश । त्यांच्या मुखें त्यांच्या शिष्यांच्या हृदयांत प्रवेश । ब्रह्मा करी ऐसी परंपरा हृषीकेश । भूमंडळीं सत हे संतति त्यांची ऐसीही सूचवी ॥ ७६ ॥ एवं च ब्रह्मा स्वपुत्र । आणि शिष्यही कृपापात्र । त्याचे मानसपुत्र पवित्र । शिष्य त्याचे ॥ ७७ ॥ त्यां-पासुनी ब्रह्मविद्या । जगीं प्रगटली आद्या । जी करितां नासे अविद्या । संत मुखें या लोकीं ॥ ७८ ॥ एवं च विश्वकर्ता आपण । आणि जगद्गुरुही स्वयें

मी नारायण । जगीं द्विविध संतति जाली निर्माण । परंपरेनें आपणाच पासूनी ॥७९॥ पाहें जगीं प्रजा ह्मणजे संतती । या स्वभक्तांची ह्मणे जगत्पती । ते विविध ह्मणूनि संतति ये रीती । येथें अर्थ ॥ १८० ॥ एवं पूर्वश्लोक पर्यंत । सर्वेश्वरत्व आपलें भगवंत । बोलतां जे जीवन्मुक्त संत । त्यांस उपास्य मीच हें बोलिला या श्लोकीं ॥ ८१ ॥ ते जे हे वेद प्रसिद्ध सिद्ध । ते स्वोपासकाचि ऐसें करितां सिद्ध । विभूति जे ईश्वरत्वीं समृद्ध । हीं रूपें विभूतीचीं ॥ ८२ ॥ आतां विश्व सर्व स्वयें हरी । प्रत्यक्षही योग ऐश्वर देह त्याचाच परी । विशेष ज्ञान सामर्थ्य जेथवरी । तेथवरी त्याची विभूति हा विशेष ॥ ८३ ॥ ऐसियास विशेष आपण । परि हें अद्वैत ज्ञान असाधारण । कीं हें निर्गुण ज्ञानाहुनी सगुण । धर्म्य ज्ञान योगा ऐश्वराचें. श्रेष्ठ राजविद्योक्त ॥ ८४ ॥ त्या योग ऐश्वरामध्यें ही विभूती । आपल्या त्या विशेषें वर्तती । त्या विभूतीचें आणि योगाचें ज्ञान अंतीं । श्रेष्ठ जें ज्ञान बोलिलें सगुण भक्तीचें ।। ८५॥ कीं अष्टादशीं " ब्रह्मभूतः प्रसन्नात्मा " या श्लोकेंकरूनी। " समः सर्वेषु भूतेषु मद्भक्तिं लभते परां " ह्मणोनी । ब्रह्मभूतही भक्ति सर्वभूतीं पावतो ह्मणेल यावरूनी । ब्रह्मभूतासही लभ्य भक्तीतें हें ज्ञान विभूतियोगाचें ॥ ८६ ॥ परि हें ज्ञान दुर्लभ । या ज्ञानें अद्वयज्ञान बिंबणें सुलभ । ह्मणोनि बोलों पाहतो श्रीवल्लभ । फळ विभूतिसहित या योगज्ञानाचें या श्लोकीं ॥ ८७ ॥

॥ श्लोक ॥ एतां विभूतिं योगं च मम यो वेत्ति तत्त्वतः।
सोऽविकंपेन योगेन युज्यते नात्र संशयः ॥ ७ ॥

॥ टीका ॥ अर्जुना पूर्वश्लोकोक्त । जे बोलिलों भक्त । जे ज्ञानी आणि अनुरक्त । चरणीं आपुल्या ॥ ८८ ॥ हे सकळही विभूती । आणि जे पूर्वाध्यायांत योगस्थिती । " पश्य मे योगमैश्वरं " ह्मणूनि तुजप्रती । मी बोलिलों ॥ ८९ ॥ तो योग आणि हे विभूती । सगुण सर्वेश्वराच्या मूर्ति । तें सगुणब्रह्म भलत्यास ह्मणती । उपासक आपल्या उपास्यातें ॥१९०॥ आणि योग ऐसा कीं सर्व ईश्वर । हें युक्तीनेंही बोलों जाणती चतुर । परि तत्त्वतां अनुभवचमत्कार न जाणती ॥ ९१ ॥ मज वेगळें देवतांतर । त्यासी ह्मणती सर्वेश्वर । त्याच्याच विभूति आणि त्याचाच योग ह्मणूनी सादर । वर्णिती ॥९२॥ त्यांस जालें जड चैतन्य ज्ञान । तऱ्ही न पावती समाधान । कीं माझें न करितां अनन्यभजन । मोक्ष नाहीं ॥ ९३ ॥ कीं पंगु काशीच्या मार्गीं पडे । तरी काशीदर्शन त्यासी न घडे । जों माझें पदद्वंद भक्ती-

नें न जोडे । न साधे मोक्ष त्या मोक्षमार्गीही ॥ ९४ ॥ ह्मणूनी . पार्था पूर्व-श्लोकोक्त । विभूति बोलिलों समर्थ भक्त । त्या माझ्याच विभूति ह्मणूनी जाणे सयुक्त । जो कोण्ही ॥ ९५ ॥ आणि पूर्वाध्यायांत । " मत्स्थानि सर्व-भूतानि " इत्यादि मी भगवंत । " पश्य मे योगमैश्वरं " येथपर्यंत । जो योग बोलिलों ॥ ९६ ॥ तो योग आणि हे विभूती । माझीच ह्मणूनी जो सुमती । जाणेल तो अत्यंत प्रीती । धरील माझीच निश्चित ॥ ९७ ॥ कीं ज्याच्या ऐशा विभूति आणि ज्याची ऐश्वर्यस्थिती । तो एकचि उपास्य श्रीपती । सभाग्याचा ह्मणूनि जाणे ॥ ९८ ॥ त्याची आत्मज्ञानाची स्थिती । अनायासें बाणे अचळ योगरीती । जे स्थिति बाणावया श्रमती । भक्ति टाकून निर्गुणोपासक ॥ ९९ ॥ योग आणि विभूती । दोहिंचा धनी मीच श्रीपती । ह्मणूनि जे जाणती । ते उत्तमोत्तम मद्भक्त ॥२०० ॥ येथें " एतां विभूतिं योगं च मम " ह्मणूनि या मम शब्दें सर्वोत्तम । हा अर्थ सूचवी कीं मीच सगुणब्रह्म। या विभूति हा योग आणिकाचा ह्मणती तें न घडे ॥ १ ॥ " एतां विभूतिं योगं च यो वेत्ति । सोविकंपेन योगेन युज्यते "ह्मणे श्रीपति । इतुकेंचि बोलता तरी होती । अर्थसिद्धि न ह्मणतांही ममशब्द॥ २ ॥ आतां शास्त्रदृष्टीच करूनी । विभूति माझ्याच ह्मणूनी । जाणों शकती परंतु भक्ता-सही आत्मज्ञानावांचुनी । योग माझा कळेना ॥३॥ या भावें ह्मणे हरी । कीं योग तत्त्वता जाणे जरी । अविकंपयोगें तरी । तो स्वचित्तें स्वस्वरूपीं योज-तो ॥४॥ स्व स्वरूपीं चित्त योजिती । ऐसे अभक्तही दिसती । परि चित्त-वृत्ति चंचलगती । बाणे नेदी योगातें ॥ ५ ॥ व्यतिरेक अन्वयबोध । जरी जाला करितां तत्त्वशोध । तरी चित्स्वरूपीं चित्तनिरोध । अचळ होतां जीवन्मुक्ती ॥६ ॥ चित्त जाणे चित्स्वरूप । परि योजितां होतसे सकंप । तो अनायासें योग अविकंप । बाणे या विभूति आणि हा योग जाणतां ॥७॥ परि तत्त्वज्ञानें तत्त्वतां । हा योग माझा कळेगा पांडुसुता । तो जरी अपक्व-ज्ञानी जाणता । व्यतिरेकअन्वयबोधाचा ॥ ८ ॥ तरी जाणोनि माझिया योगातें । जो पूर्वाध्यायांत बोलिलों तूतें । पावोनि अविकंप योगातें । पक्व ज्ञानी जीवन्मुक्त तो होतसे ॥ ९ ॥ माझ्या भक्तीवांचूनी । योग सकंप होतो ह्मणूनीं । माझ्या भक्तीकरूनी । अविकंप योग त्यांचा होतसे ॥२१०॥ तो भक्तियोग सांपडे तरी । कीं माझ्याच विभूति पूर्वोक्ता ह्मणूनी जाणे जरी। कीं विभूति माझ्याच ह्मणोनि जाणतां अंतरीं । बोध होय माझ्या सर्वेश्वरत्वा-चा ॥ ११ ॥ जें जें उत्तम आणि थोरपण । तें तें ईश्वरसामर्थ्यलक्षण । त्या

त्यास ह्मणती विचक्षण । विभूति ईश्वराच्या ह्मणोनी ॥ १२ ॥ एवं ब्रह्मादि देवगण । आणि ऋषि मानव समर्थ निपुण । ज्याच्या विभूति तो जगत्कारण । नारायण पिता विधात्याचा ॥ १३ ॥ तो पिता गुरु ब्रह्मयाचा । हे ब्रह्मादि कोणी न जाणती प्रादुर्भाव त्याचा । सर्वांहूनी उपाधि जयाचा । शुद्ध सत्त्व मायारूपें प्रकटे तो ॥ १४ ॥ सृष्टिप्रवाह आणि विद्याप्रवाह । दोहींचा उगम आणि ज्यापासूनी निर्वाह । तो हा श्रीकृष्ण एकचि निःसंदेह । ब्रह्मादि संत या विभूति तयाच्या ॥१५॥ ऐशा पूर्वोक्तप्रकारें ज्या सुमती । जाणे योग आणि विभूती । त्यास कळतें कीं सर्वेश्वर जगत्पती । एकचि श्रीकृष्ण ॥ १६ ॥ ऐशा पूर्वोक्ता विभूती । जाणतां बाणे माझी सर्वोत्तमत्वस्थिती । तो जिज्ञासूही अनन्या अव्यभिचारिणी भक्ति सुमती । करूं लागे ॥ १७ ॥ त्यास मी गुरुरूपेंकरूनी । तत्त्व सांगतों प्रगट होऊनी । मग तो तत्त्व जाणतो त्यावरूनी । पूर्वाध्यायांत बोलिलों तो योग ॥ १८ ॥ तो योग ऐश्वर ज्यास कळला । तो अविकंपयोग मजमाजी योजिला । कीं भक्तांचा योगक्षेम वाहणें मला । लागतसे हें पूर्वाध्यायांत बोलिलों ॥ १९ ॥ भक्तांस आत्मज्ञान देतों । हा योग त्यांचा वाहतों । आणि योग ऐश्वर तत्त्वतां दावितों । त्याणें अविकंपयोग बाणतो वाहतों हें क्षेम ॥ २२० ॥ इत्यादि भावें देव ह्मणे । विभूति जो जाणे । त्यासि अविकंपयोग बाणे । निःसंशय ॥ २१ ॥ कीं चित्त चित्स्वरूपीं न पावे कंप । तो योग जाणावा अविकंप । तेव्हां सकळ दुष्प्रवाहाचा संप । जाला त्याचा ॥ २२ ॥ अष्टांग योग योगी । करिती कष्टती ज्यालागीं । ते योगस्थिति बाणते उगी । अनायासें तयासी ॥ २३ ॥ या प्रकारें हरी । अर्जुनातें बोलिला परी । संशय त्याच्या अंतरीं । कांहीं देखिला ॥ २४ ॥ कीं हा उपदेशकाळ अर्जुनाचा । महिमा ऐकिला विभूतियोगज्ञानाचा । परंतु अद्यापि अविकंपयोगाचा । अनुभव नसे ॥ २५ ॥ जो हे विभूतीचा हा योग जाणे । त्यासी अविकंप योग बाणे । ह्मणूनि जें श्रीकृष्ण ह्मणे । येथें भरंवसा पूर्ण अर्जुनास वाटेना ॥ २६ ॥ कीं विभूतीचा आणि योगाचा । बडिवार वर्णिते श्रीकृष्णजीची वाचा । परि अविकंपयोग बाणेल हा शब्द साचा । न वाटला अर्जुनातें ॥ २७ ॥ कीं क्षुधितास घडे भोजन । तेव्हां अन्नदाता याचें वचन । खरें वाटेल तोंवरी मन । असे संदेहें माखलें ॥ २८ ॥ ह्मणूनि अर्जुनास या शब्दाचा निश्चय । बाणे ऐसें बोलतो अव्यय । कीं येथें नाहीं संशय । अर्जुना कदापी ॥ २९ ॥ एवं च महिमा मात्र । नाहीं बोलिला कमलनेत्र

" नात्र संशयः " ह्मणूनि देवकीपुत्र । तत्त्व हें ऐसें बोलिला ॥२३० ॥ कीं ब्रह्मा आणि त्याचे मानससुत । आणि परंपरेनें जे संतानरूप संत । या विभूति ज्याच्या तो हा भगवंत । ऐसें जाणतां बाणे सर्वेश्वरत्व कृष्णाचें ॥ ३१ ॥ कीं अज अनादि एक सर्वेश्वर । ज्यापासूनि हा सर्व पसर । तो हा श्रीकृष्ण ज्याचे अवतार । मुक्ति या इतुकिया दृढ निश्चयें ॥ ३२ ॥ "यो मामजमनादिं च वेत्ति लोकमहेश्वरम्" या श्लोकीं । याच अध्यायांत बोलिला कीं । अज अनादिपणें मातें जाणे या लोकीं । तो सुटे सर्वा पापा संचिता क्रियमाणापासूनी ॥ ३३ ॥ ज्यास वाटे हा सर्वेश्वर । तोचि मोक्षमार्गी चतुर । होतां याच्या भजनीं तत्पर । हा गुरुरूपें ज्ञान उपदेशितो ॥३४ ॥ मग तो भगवद्रूप चराचर । जैसीं रामकृष्णरूपें तैसीं पाहे सादर । तेव्हां कळतां योग ऐश्वर । परम भागवत तो होय ॥ ३५ ॥ यापरि विभूति आणि योग जाणे । त्यास भगवत्प्रसादें सत्ययोग बाणे । ऐसी ही गोष्टी ह्मणूनि कृष्ण ह्मणे । कीं संशय येथें असेना ॥ ३६ ॥ या भावें ह्मणे अव्यय । कीं येथें नसे कांहीं संशय । परंतु हा भाव धनंजय । समजला नाहीं ॥ ३७ ॥ कीं ब्रह्मा आणि त्याचे मानससुत । सज्ज्ञान आणि गुणवंत भाग्यवंत संत । या विभूति ज्याच्या तो भगवंत । तेव्हां सकळ सृष्टि याजपासूनी ॥ ३८ ॥ ऐसें विभूतिज्ञानें कळे । तेव्हां याच्याच सेवेसि मन वळे । हा भाव विशद नाकळे । अर्जुनातें ॥ ३९ ॥ ह्मणूनि उत्तमश्लोक । त्याच्या भावाकडे करूनि अवलोक । हा भाव स्पष्ट कळावा ह्मणूनि हा श्लोक । बोलतसे या उपरी ॥ २४० ॥

॥श्लोक ॥ अहं सर्वस्य प्रभवो मत्तः सर्वं प्रवर्तते ।
इति मत्वा भजंते मां बुधा भावसमन्विताः ॥ ८ ॥

॥ टीका ॥ अगा मीच सर्वांचा प्रभव । प्रभव ह्मणिजे प्रकर्षे संभव । कीं अलंकाराचा उद्भव । सुवर्णचि कीं ॥ ४१ ॥ एवं जगाचीं कारणें दोनी । एक उपादान एक निमित्त ह्मणोनी । त्यांत अलंकाराचें उपादान सुवर्ण ये रीती करूनी । मी जगाचें उपादान प्रभवशब्दें बोलिला ॥ ४२ ॥ आतां सोनार निमित्तकारण । तैसा जगाचा निमित्तकारणही आपण । ह्मणूनि या श्लोकीं द्वितीय चरण । या अर्थे बोलतसे ॥४३॥ " मत्तः सर्वं प्रवर्तते " ह्मणे हरी । कीं मजपासूनि सर्वही ' प्रवर्त्तते ' हे गोष्टी दुसरी । प्रथम मी सर्वांचा प्रभव ह्मणोनी त्यावरी । पुनरुक्ति परिहरूनी सर्वही मजपासूनी ह्मणतसे ॥४४ ॥ कीं निर्गुण स्वरूपें करूनी । सुवर्णालंकारन्यायें उपादान

होउनी । तोचि मायाशबलित साक्षित्वें सर्व कल्पूनी । निमित्तकारण होतसे ॥ ४५ ॥ आपण निर्गुण स्वरूप । या अनुभवसत्त्वें पद्मनाभरूप । होऊनि आपला सृष्टिकारकत्वप्रताप । चतुर्मुखरूपें नाभिकमळीं निर्मितो ॥४६॥ तो माझा मानसपुत्र । त्याचे मानस पुत्र महर्षि सनकादि मनु पवित्र । ज्यांचें संतान हें चित्रविचित्र । जग समस्त हीं ॥ ४७ ॥ एवं मीच विश्व सारें । आणि मजचि पासूनि याप्रकारें । ऐसें खरें मानूनि आदरें । भक्तियुक्त बुध मज भजती ॥ ४८ ॥ ऐसें मानूनि भजती बुध । ह्मणतां ऐसें न मानूनि न भजती अबुध । ऐसें सूचवीं कीं टाकुनी दुध । शुभ्रत्व साम्यें पिती तक्रा निःसारातें ॥ ४९ ॥ मी ईश्वरचि स्वयमेव । जालों असें सर्व देव । वेद धरूनी हा भाव । भलता देव मीच ह्मणूनि श्रेष्ठत्वें वर्णिती ॥ २५० ॥ त्यावरूनि जो ज्याचा उपास्य देव । तो त्यातेंचि मानितो जगाचा प्रभव । आणि त्याचपासूनि मानितो संभव । सर्वांचा ॥ ५१ ॥ ते अबुध जन । न करिती माझें भजन । मी सर्वांचा प्रभव आणि सर्व मजपासून । ऐसें न मानिती ॥ ५२ ॥ ऐसे ते अबुध । ह्मणूनि तद्विलक्षण बुध । त्यांस वहुत जन्म होतसे हा वोध । कीं मीच प्रभव आणि सर्व मज एकाच पासुनी ॥५३ ॥ "न मे विदुः सुरगणाः प्रभवं" या श्लोकेंकरूनी । "अहमादिर्हि देवानां" ह्मणोनी । पूर्वीं या प्रसंगींच ऐसें बोलोनी । या श्लोकीं यास्तवच बुध मज भजती ह्मणतसे ॥ ५४ ॥ एवं ऐसें जाणोनि भजती ते बुध । तेव्हां ऐसें नेणोनि न भजती ते अबुध । कीं बुध होउनीही न करिती हा शोध । अबुधचि ते लेखावे ॥ ५५ ॥ मीच सर्वांचा प्रभव । मजपासूनि सर्वांचा उद्भव । तेव्हां मीच देवाधिदेव । ऐसें मानूनि बुध तेचि भजती अगा मातें ॥ ५६ ॥ ह्मणूनि ते भक्तिभावें समन्वित । द्विविध जगत्कारण मीच भगवंत । ऐसें मानूनि निश्चित । भजती मातें ॥ ५७ ॥ एवं ब्रह्मा आणि त्याचे मानस सुत । इत्यादि माझ्याच विभूति निश्चित । ऐसें जाणती जगत्कारण भगवंत । मीच मानूनि मज भजती ॥५८ ॥ हें विभूतिज्ञानाचें फळ । श्रेष्ठत्वें माझेंचि भजन आवडे निर्मळ । या भजनें कळे माझा योग अकळ । जो पूर्वाध्यायांत बोलिलों ॥ ५९ ॥ "पश्य मे योगमैश्वरं" ह्मणूनी । पूर्वाध्यायांत बोलिलों तो ज्ञानावांचुनी । न कळे तेंही ज्ञान माझ्या प्रसादेंकरूनी । ते पावती ॥ २६० ॥ हें यापुढें तृतीय श्लोकीं हरी । बोलेल दों श्लोकीं तोंवरी । हे आपणास भजती कोणेपरी । तें आधीं बोलतसे ॥६१॥ यांत पहिल्या श्लोकीं भजनप्रकार । दुसरियांत आपला कृपा करायाचा ।

विचार । बोलेल आतां भजनरीति सर्वेश्वर । बोलतसे ऐसें या श्लोकीं ॥६२॥

॥ श्लोक ॥ मच्चित्ता मद्गतप्राणा बोधयंतः परस्परम् ।
कथयंतश्च मां नित्यं तुष्यंति च रमंति च ॥ ९ ॥

॥ टीका ॥ माझेचि ठायीं त्यांचें चित्त । प्राण त्यांचे मद्गत । मातेंचि बोधिती सतत । परस्परें एक एकातें ॥ ६३ ॥ चैतन्य सर्वत्र निःसंदेह । तथापि चित्तें सचेतन देह । माझे ठायीं त्यांचा ऐसा स्नेह । कीं जिती भजन सुखें ते माझ्या ॥ ६४ ॥ ह्मणतां ते मच्चित्त । अर्थ ऐसा दाखवी भगवंत । कीं सचेतन देह जीवंत । ते भजनें माझियाच मानिती ॥ ६५ ॥ जेव्हां हरपे प्रिय पदार्थ । जिणें तेव्हां वाटे व्यर्थ । माझ्या भजनांवांचूनि कृतार्थ । न मानिती जीवन देहाचें ॥ ६६ ॥ चैतन्य असोनि सर्वगत । चित्त नसे ज्या देहांत । त्यास ह्मणती शव मृत । लोक सारे ॥ ६७ ॥ ऐशा माझ्या भजनाविण । कदाचित् लोटे जरी क्षण । तेव्हां मानिती अवलक्षण । शवप्राय शरीर आपलें ॥ ६८ ॥ ज्यासि ऐसी माझी आवडी । कां व्यर्थ जाईल त्याची घडी[३] । या भावार्थाचें कवाड उघडी । मच्चित्त ऐसें बोलतां ॥६९॥ आतां देहीं असे प्राण । तोंवरी न घडे शवपण । भजन न घडे एक क्षण । तरी प्राण तो असे शरीरांत ॥ २७० ॥ ह्मणूनि ह्मणावें तेव्हांही ते जिती । तरी त्यांचे प्राणही मजमाजी असती । कीं माझ्या आवडींचि निघती रिघती । प्राण त्याचें ॥ ७१ ॥ माझी पडे विस्मृती । प्राणगति ज्यांच्या वाहती । तेव्हां ह्मणावें कीं नसती । मजमध्यें ते प्राण ॥ ७२ ॥ जे अखंड मातें भजती । त्यांचे प्राण मजमध्येंचि वाहाती । ते मद्गत प्राण ये रीती । अगा अर्जुना हा अर्थ ॥ ७३ ॥ विस्मृति जाली देशधडी । भजनांवांचूनि लोटेना घडी । ऐसी निरंतर माझी आवडी । अगा अर्जुना तयांतें ॥ ७४ ॥ भजनावांचूनि लोटे क्षण । तेव्हां निघों पाहे त्यांचा प्राण । जिणें माझ्या भजनाविण । व्यर्थ वाटे ऐसा हा भाव ॥ ७५ ॥ प्रथमचरणीं ऐसी हरी । बोले त्यांच्या भजनरीतीची वैखरी । भजन ऐसें वर्णिलें परी । हें सत्संगावांचूनि असाध्य ॥ ७६ ॥ ह्मणूनि त्यांची सत्संगती । दुसरिया चरणापासुनी संतांचा पती । वर्णितो कीं अगा ते बोधिती[१] । परस्पर एक एकातें ॥ ७७ ॥ एकास पडतां विस्मृती । एक त्यास देती स्मृती । भजनमाहात्म्य बोधिती । परस्परें ऐसें ॥ ७८ ॥ ते मच्चित्त मद्गतप्राण । परस्परें बोधिती सुजाण । हें सर्व आवडीचेंच लक्षण ।

१ वांचतात. २ प्रेत. ३ घटिका.

परि भजनरीती अद्यापि नाहीं वर्णिल्या ॥ ७९ ॥ तें उत्तरार्धें बोले श्रीपती । कीं ते नित्य मातें कथिती । ह्मणिजे कथा माझ्याच सांगती । बोधिती परस्परें ॥ २८० ॥ नित्य मातें कथिती । आणि परस्परें बोधिती । ऐसें ह्मणतां सूचवी श्रीपती । श्रवण कीर्त्तन दोनीही ॥ ८१ ॥ एक कथा करिती । एक त्या श्रवणद्वारा मनीं धरिती । त्या श्रवणें कीर्त्तनें संतोष पावती । आणि रमती तदनुरूप ॥ ८२ ॥ रमणें ह्मणिजे क्रीडणें । शरीर माझ्या आकारें करणें । माझे अभिनय दाखवणें । हेंच रमणें तयांचें ॥ ८३ ॥ गाती नाचती उडती । विविध माझे अभिनय दाविती । ज्या ज्या प्रसंगीं मी जे जे रीती । रमलों दाविती ते भाव ॥ ८४ ॥ रामें वधिला रावण । ह्मणतां मांडिती तैसें ठाण । कीं ते समयीं मनाचें उठाण । तैसेंचि त्यांचें ॥ ८५ ॥ गातां गोपाळचरित्र । तदाकार मन होय पवित्र । तें ठाणें चित्रविचित्र । शरीरेंही दाविती ॥ ८६ ॥ मांडिती त्रिभंगी ठाण । वेणु अधरीं दाविती सुजाण । कीं तेव्हां त्यांच्या मनाचें उठाण । अंतरीं तैसेंचि ॥ ८७ ॥ रासक्रीडा निरूपिती । कोणी कृष्ण कोणी गोपी होती । हात गळां घालुनी नाचती । मंडलाकार परस्परें ॥ ८८ ॥ प्रेमें होती असावध । वर्णिती क्रीडा विविध । कुवलयापीड[1] हस्तीचा वध । वीररसें दाविती ॥८९॥ माजीं[2] वेष्टुनी अंबर । माथां सावरिती केशभार । उचलूनि सव्य सुंदर कर । दापूनि[3] बोलती महामात्रातें[4] ॥ २९० ॥ कीं अरे अरे महामात्रा लौकरी । वाट सोडीं जाणें राजमंदिरीं । हस्ती न काढिसी वाटेंतूनि जरी । तुज हस्तीसहित यमसदनातें पाठवूं ॥ ९१ ॥ हस्ती येतां अंगावरी । भुजदंडें हाणूनी चहूं पायांभीतरीं । निघोनी मुरगळुनी सोंड करीं । पुच्छाकडे निघालों ऐसें मानिती ॥ ९२ ॥ पुच्छ धरूनी वोढिला गज । ऐसें मनीं आठवे सहज । तदाकारें शरीर निज । चेष्टविती ॥ ९३ ॥ पाठीकडे एकास धरिती । पुच्छ ओढिजे ऐसें ओढिती । मनीं ठसावलीं कर्मै दीसती । वधप्रसंगीं कुवलयापीडाचिया ॥ ९४ ॥ पाडोनी तोंडघसीं द्विरदें[5] । उपडोनि दाविती दोन्ही रदें[6] । त्याचें रक्त आणि त्याचा मद । शरीरीं सिंपणें सिंपूनी दाविती ॥९५॥ रंगभूमींत लोटती । नवरस रीति तेव्हां भाविती[7] । प्रेमरसीं निमग्न यादव जाले ऐसें मानिती । स्वयें बुडोनी प्रेमांत ॥ ९६ ॥ कथा माझ्या नित्य करिती । संतोषती आणि रमती । ऐसें बोलतां श्रीपती । इत्यादि रमणें त्यां-

---

१ कंसाचा या नांवाचा गज, जो कृष्णानें मारिला. २ कंबरेस. ३ दटावून. ४ महात. ५ हत्ती. ६ दांत. ७ तालीम.

चें सूचविती ॥ ९७ ॥ हें श्रीगीता सूत्रप्राय । श्रीभागवत याच गीतेचा विशद अभिप्राय । तेथें बहुतां स्थळीं हें प्रमेय । कीं भक्तभाव दाविती हरीचे । ॥ ९८ ॥ एकादशस्कंधीं श्रोता उद्धव । त्याप्रति पूजाक्रम सांगोनि शेवटीं माधव । ह्मणे मज गावें वर्णावें आणि माझे भाव । दाखवावे श्रोतयांतें॥९९॥

॥भा. ए. कं. श्लो. ॥ उपगायन् गृणन्नृत्यन्कर्माण्यभिनयन्मम ।
मत्कथाः श्रावयन् शृण्वन् मौहूर्त्तिक्षणिको भवेत् ॥

॥ टीका ॥ उपगायन् ह्मणिजे गात । गृणन् ह्मणिजे अर्थ निरूपित । नृत्यन् ह्मणिजे नाचत । "कर्माण्यभिनयन्मम" अर्थ याचा ये रीतीं॥३००॥ कीं अभिनय माझ्या कर्माचा । दाखवावा ऐसी भगवंताची वाचा । अर्थ विशद याचा । ये रीती ॥ १ ॥ कीं भगवंतें जें जैसें चरित्र केलें । तैसें स्वशरीरें ठाण मांडूनि दाखविलें । त्यास संस्कृत भाषेंत बोलिलें । अभिनय ह्मणोनी ॥ २ एवं गात निरूपित नाचत । अभिनय माझ्या कर्मांचे दावित । माझ्या कथा ऐकवीत । स्वयेंही आइकाव्या ॥ ३ ॥ कीं कथा करूनि स्वयें सुज्ञ । आणि श्रोतेही कथा कर्त्ते अभिज्ञ । तरी त्यांस कथाश्रवण करवूनि जे रसज्ञ । त्याणें श्रवण करावें ॥ ४ ॥ एवं अभिनय भगवत्कर्माचा । दाखवावा हा शास्त्रार्थ साचा । श्रीभागवतीं भगवंताची वाचा । येविषयीं ऐसी वर्णिली ॥ ५ ॥ स्थळ स्थळीं श्रीशुक । ऐसें बोलिला ते श्लोक । येथें आणितां अनेक । ग्रंथ वाढेल बहु फार ॥६॥ प्रस्तुतीं कथाप्रसंगीं श्रीपती । ह्मणे तुष्यंति आणि रमती । रमणाचा भावार्थ ये रीति । कथानुसंधानें वर्णिला ॥ ७ ॥ आणि "कथयंतश्च मां नित्यं" ह्मणोनी । येथें या नित्य शब्देंकरूनी । सर्वदा करावें ऐसें यावरूनी । सूचवी भगवंत ॥ ८ ॥ आणि "बोधयंतः परस्परं" ह्मणोनी । परस्पर शब्दें श्रवणही सूचवूनी । कथानिरूपण कीर्त्तन श्रवण यावरूनी । सर्वदा करणें भागवत धर्म हा मुख्य । ॥ ९ ॥ ऐशा श्लोकीं त्यांची प्रीती । आणि त्यांच्या भजनरीती । बोलोनि आतां श्रीपती । आपण कृपा काय करितों तें बोलतो या श्लोकीं ॥ ३१० ॥

॥ श्लोक ॥ तेषां सततयुक्तानां भजतां प्रीतिपूर्वकम् ।
ददामि बुद्धियोगं तं येन मामुपयांति ते ॥ १० ॥

॥ टीका ॥ ऐसे जे सदा भजनीं योजले युक्त । नित्य मत्कथा कीर्तन श्रवणनिष्ठ भक्त । प्रीतिपूर्वक भजती अनुरक्त । मी बुद्धियोग त्यांतें देतसें ॥ ११॥ देतों त्यांस त्या बुद्धियोगातें । कीं ज्या बुद्धियोगें पावती ते मातें । कीं प्रीतिपूर्वक तयांतें । सर्वदा भजन माझें घडतसे ॥ १२ ॥ मागें पंचमा-

ध्यायांत । बोलिला ऐसें भगवंत । कीं ईश्वर न करवी सुकृत दुष्कृत । कोणा हातीं ॥ १३॥ तरी सुकृत पुण्य दुष्कृत पाप दोन्ही । करावया लावी बुद्धीतें प्रेरूनी । येथें ह्मणतो मी बुद्धि देतों यावरूनी । पापपुण्य मागुती करवणें लागतें ॥ १४ ॥ हा पूर्वापर विरोध । परिहारायाकारणें स्वयें स्वयंबोध । "भजतां प्रीतिपूर्वकं" ह्मणतां हा बाध । निवारितसे ॥१५ ॥ कीं सुमति आणि कुमती । आपण दोहींची न करवी प्रवृत्ती । तथापि पाहतां आपली रीती । कल्पवृक्षासारिखी ॥ १६ ॥ कीं चतुर्थाध्यायांत स्वमुखेंकरूनी । "ये यथा मां प्रपद्यंते" ह्मणोनी । "तांस्तथैव भजाम्यहं" ऐसें बोलिला यावरूनी । कल्पवृक्षस्वभाव आपला वर्णिला ॥ १७ ॥ कीं जैसे जे भजती । मी त्यांस फळें देतों तैसे रीती । ह्मणूनि ह्मणतो प्रस्तुतीं । "भजतां प्रीतिपूर्वकं" ह्मणोनी ॥ १८ ॥ कीं पुढें करूनी प्रीती । श्रवण कीर्तनें नित्य भजती । मी बुद्धि देतों त्यांप्रती । कल्पवृक्षस्वभावें ॥ १९ ॥ कीं ज्या निमित्तें ज्यास जो भजतो । तें निमित्त मनीं आधीं पुढें करितो । निमित्तावांचूनि कोण प्रवर्ततो । कोणे गोष्टींत ॥ ३२० ॥ प्रथम निमित्ताचा उद्देश । मग तदर्थ प्रयत्नलेश । येथें प्रीतिपूर्वक भजती ह्मणे हृषीकेश । या भावें करूनी ॥ २१ ॥ कीं पुढें करूनि प्रीती । मग मातें ते भजती । कीं प्रीति माझी मागती । कांहीं न मागती आणिक ॥ २२ ॥ कीं तुझ्या प्रीतीचा जिव्हाळा । तो देगा आह्मांस घननीळा । ऐसिया भक्तावरी कळवळा । कैसा नये मज दयाळु कल्पवृक्षासी ॥ २३ ॥ कल्पवृक्ष कल्पिलें देतो । परि दयाळु न ह्मणवे तो । मी परमदयाळु परि मज धरणें लागतो । स्वभाव अगा कल्पवृक्षाचा ॥ २४ ॥ कीं कृपा करूं भजल्याविण । तरी मज लागेल विषमपण । ह्मणूनि दयाळु मी आपण । कल्पद्रुमस्वभाव जालों दाटुनी ॥ २५ ॥ त्यांत कोणी मागती काम्यफळ । कोणी मोक्ष मागती केवळ । परंतु प्रेम मागती ते विरळ । ते हे जे प्रीतिपूर्वक मज भजती ह्मणतसे ॥ २६ ॥ भजनही करिती प्रीतीनें । परंतु प्रीतीचें तत्त्व झांकलें अज्ञानें । कीं रज्जु न कळतां सर्पभानें । झांकला रज्जु असोनि उघडाच ॥ २७ ॥ भलत्यास मुख्य आपली प्रीती । आपणाच कारणें सर्वही आवडती । तो मीच आत्मा जो वेद उपदेशिती । "तत्त्वमसि" ह्मणूनी ॥२८॥ तो सर्वांहूनी आत्मा प्रिय । तोचि आत्मा मी अद्वय । तोचि जाणावा ऐसा निर्णय । वेदीं उपनिषदीं बृहदारण्यकीं ॥ २९ ॥ मैत्रेयी स्त्री याज्ञवल्क्य पती । तो आत्मतत्त्व सांगे तीप्रती । तेव्हां ह्मणे कीं सर्वांची प्रीती । ज्या

प्रिया आत्मयाकारणें ॥३३०॥ तो आत्मा पाहावा । तो आत्मा आइकावा । मनन निदिध्यासें बरवा । अनुभवावा तो आत्मा ॥ ३१ ॥ तेथें याज्ञवल्क्य पती । ह्मणे ऐसें मैत्रेयीप्रती । कीं पतीस पत्नीची प्रीती । आपणाच कारणें ॥ ३२ ॥ पतीकारणें पती । प्रिय न मानी सती । आपणास उभय लोक साधती । ह्मणूनि आत्मनिमित्त प्रीति त्याचीही ॥ ३३ ॥ पुत्र गृह वित्त । सकळही प्रिय आपणाच निमित्त । तो आत्मा जाणावा चित्त । चिन्मय करूनियां ॥ ३४ ॥ एवं प्रिय आत्मा ऐसा । परंतु कोणी नेणती कीं आहे कैसा । देहचि आत्मा ह्मणूनि वळसा । ज्यास त्यास प्रीतीचा ॥ ३५ ॥ अनादिजन्ममरण । यास हेंचि कारण । कीं देहीं वाटे आत्मपण । ह्मणूनी प्रीति देहाची ॥ ३६ ॥ यास अविद्यामूळ । कीं अनर्थ न कळतां आत्मा केवळ । आत्मविद्या माझी निर्मळ । ते त्या अविद्येतें नाशिते ॥ ३७ ॥ माझ्या भजनें ते माझी शक्ति विद्या । प्राप्त होतां नाशी ते अविद्या । ह्मणूनि भजावें मज आद्या । आधीं जगदीश्वरातें ॥ ३८ ॥ त्यांत बहुतेक मागती मुक्ती । विरळ सुज्ञ मागती भक्ती । ज्यांस मुक्तीहूनिही गोड अनुरक्ती । माझिया चरणांची ॥ ३९ ॥ ते हे जे प्रीतिपूर्वक । ह्मणतों भजती अत्यंत सविवेक । कीं प्रीतीचें गुह्य जें आत्यंतिक । तें दे ह्मणूनि मज भजती ॥ ३४० ॥ कीं माझें भजन लागतां गोड । त्यांचें पुरलें मुक्तीचेंही कोड । कीं आत्मप्रीतीकारणें न कळतां रोड । अंग वाटे त्या प्रीतीचें ॥ ४१ ॥ ह्मणती भगवंताची ही प्रीती । भलते स्वकल्याणाकारणें धरिती । सकाम काम्य फलार्थही भजती । प्रीतीनें या परमेश्वरातें ॥ ४२ ॥ त्याहूनि शा- हाणे सुमती । मुक्तीकारणें प्रीति करिती । आपल्या अभीष्टाकारणें भजती । प्रीतीनें लोक रायासही ॥ ४३ ॥ ते रायाची नव्हे आवडी । मो- क्षार्थ भजणें हेही आपलीच गोडी । ते आपली गोडी सोडी । ऐसा तों असेचना ॥ ४४ ॥ एवं आवडी जाल्या दोनी । एक आपली एक देवाची ह्मणोनी । तेव्हां जीवेश्वर अद्वैतानुभवें करूनी । जे प्रीतिभ- क्ति ते अनन्या जाणावी ॥ ४५ ॥ त्या प्रीतिकारणें । ज्यांस माझें भजन करणें । तें प्रीतिपूर्वक भजती ह्मणूनि बोलणें । या अभिप्रायें करूनी ॥४६॥ हे अद्यापि जिज्ञासु ह्मणावे । मुख्य प्रीति न जाणती ऐसे जाणावे । पुढें आत्मज्ञानी होतां मग गणावे । जाणते आत्मप्रीतीचे ॥ ४७ ॥ यालागीं प्रीतिपूर्वक ह्मणूनी । ह्मणे हा भाव हृदयीं धरूनी । कीं प्रीति पुढें करूनी । प्रीतिप्राप्तीकारणें मज भजती ॥ ४८ ॥ ते मुक्तीतेंही न इच्छिती । नि-

निर्भिन्न माझी इच्छिती प्रीति । ते प्रीती अद्वैतबोधें सुमती । जाणती अविद्या नाशांतीं ॥ ४९ ॥ ह्मणूनि प्रीति कळावया । मी त्यांस बुद्धियोग देतों धनंजया । ह्मणे भगवंत गहन अर्थ ऐसिया । बुद्धियोग शब्दाचा ये रीती ॥ ३५० ॥ कीं असेचि दृष्टि स्पर्शली रज्जूस । तरी रज्जु न कळतां जाला सर्पाचा भास । तो रज्जु कळतां होतो निरास । लटकिया भुजंगाचा ॥ ५१ ॥ शेवटीं पाहतां आपली । जे दृष्टि रज्जूतें स्पर्शली । ते आपली दृष्टि आपणातें प्राप्त जाली । दृष्टियोग त्या रज्ज्ववलोकनातें ह्मणावें ॥ ५२ ॥ ये रीति आत्मा जाणावा । तो बुद्धियोग याप्रकारें ह्मणावा । दृष्टियोगासम वाखाणावा । बुद्धियोगही ॥ ५३ ॥ कीं चैतन्यातें स्पर्शली बुद्धी । तेव्हां देहात्मभासादिकांसि बोद्धव्यसिद्धी । मग अनादि अविद्या योगप्रसिद्धी । नानायोनींत होऊं लागली ॥ ५४ ॥ परंतु जों आत्मा न कळे आपला । तों ते बुद्धि नाहींच सांपडली याला । जे स्पर्शली असे आत्मयाला । दृष्टि जैसी सर्पभासकाळीं रज्जूतें ॥ ५५ ॥ रज्जूस स्पर्शली दृष्टी । परि देखते मिथ्यासर्पदृष्टि । सर्प मानूनि द्रष्टा होतो कष्टी । तोंवरी योग होय आपल्या दृष्टीचा ॥ ५६ ॥ होतां सर्पभ्रमनिरास । ते दृष्टि सांपडे जे स्पर्शली आहे रज्जूस । तैसा बुद्धियोग ज्ञानियास । प्राप्त होतो प्रसादें श्रीकृष्णाच्या ॥ ५७ ॥ ह्मणूनि तोचि बोलतो या बोला । कीं मी बुद्धियोग देतों त्याला । जे बुद्धि स्पर्शली असे आत्मयाला । योग तीचा ह्मणिजे प्राप्ति तियेची ॥ ५८ ॥ स्पर्शली आत्मयातें आयती । असते जे त्यांची मती । तिचा योग होतो जातां भ्रांती । अनादि अज्ञानाची ॥ ५९ ॥ बुद्धियोग ऐसा देतों ह्मणे । कीं भगवद्रूप त्यांतें बाणे । ही गोष्टी अर्जुनही जाणे । नवमीं " पश्य मे योगमैश्वरं " ह्मणूनि दावितां ॥३६० ॥ योगी बुद्धियोग देतो ह्मणोनी । ह्मणतां बोले खुणेतें सूचवूनी । कीं त्या बुद्धियोगातें देतों कीं जेणें करूनी । ते मातें पावती ॥६१॥ कीं चराचर सकळ । भगवद्रूप केवळ । त्याज्य मायाभास तोही सुमंगळ । भगवद्देह रामकृष्णादिदेहासारिखा ॥ ६२ ॥ विश्व ऐसें पाहणें । याचेंचि नांव मज पावणें । कीं विश्वाकार होणें । हा योग माझा शरीर माझेंचि ॥ ६३ ॥ नवमाध्यायांत " मत्स्थानि सर्वभूतानी " । येथूनि "पश्य मे योगमैश्वरं" ह्मणोनी । येथपर्यंत तुज बोलिलों त्यावरूनी । विश्वयोग माझा तूं पाहसी ॥ ६४ ॥ तो योग माझा मद्रूप । योग रजतरूप मी शुक्तिस्वरूप । शुक्तिच तो शुक्तीचा प्रताप । कीं रजताकारें आपणास दाखविते ॥ ६५ ॥ एवं बुद्धियोग शब्दें हरी । आत्मसाक्षात्कार बोलोनि

त्यावरी । मातें पावती ऐसी वैखरी । योग आपला ओळखती या भावें बोलिला ॥६६॥ "एतां विभूतिं योगं च" या श्लोकें करूनी । बोलिला जो भाव अंतरीं धरूनी । कीं अविकंपयोगें करूनी । योजिती जे जाणती या विभूतीतें आणि योगातें ॥ ६७ ॥ त्यांत विभूतीतें ह्मणे उगेंच जाणती । आणि योगातें तत्त्वतां जाणती ह्मणे श्रीपती । त्या दों गोष्टींचा विशद अर्थ ये रीती । येथपर्यंत बोलिला ॥ ६८ ॥ कीं ब्रह्मादि माझ्या विभूती । ह्मणूनि शास्त्रश्रवणेंही जाणती । आणि "मच्चितमद्गतप्राण" होउनी भजती । अज अनादित्व माझें जाणोनी ॥ ६९ ॥ मग मी बुद्धियोग देतों त्यांप्रती । तेव्हां ते मज पावती ह्मणिजे योग माझा जाणती । तत्त्वतां योग जाणती ते ये रीती । या क्रमें करूनि हा भाव ॥ ३७० ॥ अध्यायारंभीं तृतीय श्लोकीं । जें उत्तमश्लोक बोलिला कीं । मी अनादि महेश्वर सर्वलोकीं । जो मज ऐसें जाणे तो सुटे सर्व पापापासूनी ॥ ७१ ॥ सकळ पाप संचित क्रियमाण । त्यापासूनि सुटतो तो सुजाण । कीं या क्रमें करूनि मी ब्रह्म सगुण । मज ये रीती पावे ऐसें करीतसें ॥ ७२ ॥ प्रकरण तेंचि येथपर्यंत । अनुसंधानें बोलिला भगवंत । कीं मज थोर जाणोनि भजतां निश्चित । अघटितघटना योग तो जाणती ॥ ७३ ॥ तो तत्त्वज्ञानेंचि जाणे । तेव्हां अविकंप योग बाणे । ऐसें श्रीकृष्ण मागें ज्या भावें ह्मणे । विशद अर्थ त्याचा ये रीती । ॥ ७४ ॥ आतां बुद्धियोग मी देतों त्यांतें । ऐसें या श्लोकीं बोलिलें भगवंतें । बुद्धियोगशब्दांत सूचविलें रूपद्वयातें । ब्रह्मविद्येच्या ॥ ७५ ॥ आणि तें बुद्धिविद्येचें रूपद्वय । नाशी अविद्येचें रूपद्वय । तें हेंही अव्यय । अर्थास्तव सूचवी परंतु धनंजय । समजला नाहीं ॥ ७६ ॥ ह्मणूनि उत्तर श्लोक । बोलों पाहतो उत्तमश्लोक । पूर्वापर विचारवलोक । करावा सज्जनीं येथूनी ॥ ७७ ॥ आणि प्रीतिपूर्वक ते भजती । कीं भक्तिमात्रचि मज मागती । ह्मणोनि सूचवी कीं अनायासें अविकंपयोगस्थिती । त्यांची बाणे ऐसी कृपा मीही करीतसें ॥७८॥ जे मोक्षचि मागती । त्यांसही मीच ज्ञान देतों श्रीपती । परि कृपापात्र हेंचि होती । इत्यादि विशद बोलतो आतां या श्लोकीं॥७९॥

॥ श्लोक ॥ तेषामेवानुकंपार्थमहमज्ञानजं तमः ।
नाशयाम्यात्मभावस्थो ज्ञानदीपेन भास्वता ॥ ११ ॥

॥ टीका ॥ अगा त्यांचीच मज अत्यंत अनुकंपा । अनुकंपा ह्मणजे कृपा । अविकंपयोग त्यांतेंचि सोपा । ऐसी कृपा मी करितसें ज्यांवरी ॥३८०॥ ह्मणोनि त्यांचेंचि दों प्रकारचें अज्ञान । मी नाशितों भवभंजन । या भावें

बोलतो या श्लोकीं वचन । "तेषामेव" ह्मणोनी ॥ ८१ ॥ "तेषामेव" ह्मणिजे त्यांचेंचि तम । आणि अज्ञानजनित जड भ्रम । त्यांचाच मी ना-शितों पुरुषोत्तम । अत्यंत अनुकंपेंकरूनी ॥ ८२ ॥ कीं माझ्याच विभूतीतें आणि योगातें । जे जाणती आणि मोक्षार्थ भजती मातें । आत्मज्ञान मी काय त्यांतें । देत नाहीं ॥ ८३ ॥ परि ते मोक्षाचे ठायीं तत्पर । माझी प्रीति न मागती ते नर । ह्मणोनि मी सर्वेश्वर । ज्ञान मात्र त्यांतें देतसें ॥ ८४ ॥ परि अनुकंपार्थ भक्तांतें । ज्या कृपेनें ज्ञान देणें घडतें मातें । त्या कृपेनें त्यांतें । देत नसें मी ज्ञान ॥८५॥ कीं ते अव्यक्तोपासक योगानिमित्त । अत्यंत श्रमती श्रमतां चित्त । या भक्ताचें सर्वस्व वित्त । मीच अर्जुना ॥ ८६ ॥ ह्मणोनि त्या मुमुक्षूस मोक्षाकारणें । मज लागतें तत्त्वज्ञान देणें । परंतु अविकंपयोगें मजसीं योजणें । बहुत कष्टें तयांसी ॥ ८७ ॥ आतां या प्रस्तुतीं । भक्त बोलिलों तुजप्रती । ज्यांस एकचि मागणें माझी प्रीति । म्यां काय द्यावें तयांतें ॥ ८८ ॥ जिहीं वमनतुल्य टाकिली भुक्ती । भक्तिसुखें नलगे ह्मणती मुक्ती । माझी प्रीतीच मागती । जोस भक्ति ह्मणावें अर्जुना ॥ ८९ ॥ आ-त्मत्वेंचि कळते अनन्य प्रीती । ह्मणोनि मी ज्ञान देतों या रीती । परि ते आप-णानिमित्त न भजती । भजती माझ्याच प्रीतीकारणें ॥ ३९० ॥ मुमुक्षु भजती आपल्या मोक्षानिमित्त । यांचें मजचि कारणें भुकेलें चित्त । माझी प्रीतीच मागती सुव्रत । काय द्यावें मी तयांतें ॥ ९१ ॥ आत्मत्वें माझी अतिप्रीती । म्यां द्यावीच कीं त्यांप्रती । हे तों कल्पवृक्षस्वभावरीती । माझी सर्वांसारखी यांसही ॥ ९२ ॥ परंतु जिहीं मोक्षही । आपणानिमित्त अपे-क्षिला नाहीं । मी त्यांस देईन जें कांहीं । त्यानें उतराई होऊं न शकें ॥ ९३॥ ऐसा अति सुमंगल अमोल्य । गुण माझ्या भक्तांचा अतुल्य । कीं ज्या गुणें केला निर्माल्य । कैवल्य मोक्ष त्यांवरूनी ॥ ९४ ॥ ऐसा त्यांचा दे-खोनि गुण । मी परम सानुकंप होतों अनंतगुण । त्या अनुकंपेंकरूनि त्या चेंचि अज्ञानतमावरण । आणि अज्ञानजनित जडभ्रम नाशितों ॥ ९५ ॥ इतरांची देखोनि मुमुक्षा । ज्ञान देऊनि पुरवितों अपेक्षा । परि भक्त माग-ती त्यांस एकाचि भक्त्यपेक्षा । अनुकंपार्थ देतसें द्विविधा बोधातें ॥ ९६ ॥ "तेषामेव" ह्मणोनि । या वचनीं एव शब्दें करुनी । इतरांस ऐसा दयाळु होउनी । ज्ञान देत नसें जैसा त्यांतेंचि देतों हा भाव ॥ ९७ ॥ आतां कैसें द्विविध अनादि अज्ञान । आणि कैसें त्याचें नाशक द्विविध ज्ञान । कोण्या दृष्टांतें अज्ञान नाशितो भवभंजन । हें त्याच्या वचनीं पहावें ॥ ९८ ॥

" अज्ञानजं तमः" ह्मणोनी । अज्ञानाचें द्विविधरूप या वचनीं ।" ज्ञानदीपे-न भास्वता " या दों दृष्टांतेंकरूनी । द्विविध ज्ञान अज्ञाननाशक बोलतो ॥ ९९ ॥ श्लोकवृत्तानुरूप पदें । मुखांतूनि काढिलीं गोविंदें । परंतु अनु-भवक्रमें विशदें । वाखाणावीं पदें योजुनी ॥ ४०० ॥ ऐसें वाखाणावें कीं पुरुषोत्तम । अज्ञान आधीं नाशी न ह्मणतो तें तम । तम आवरण आणि त्यापासूनि जडभ्रम । तें अज्ञानजनित मग नाशितो ह्मणावें ॥ १ ॥ आव-रणतमनाशास दृष्टांत । "ज्ञानदीपेन" ह्मणे भगवंत । तें ज्ञान नाशी जडभ्रम अज्ञानजनित । तें या " ज्ञानदीपेन भास्वता " या दृष्टांतें बोलतो ॥ २ ॥ तम ह्मणजे अंधकार । तमीं आपणास जाणतो परि न देखे नर । तेथें दीप लागतां स्वशरीर । पाहों लागे दीपें तमाचा नाश ये रीती ॥३॥ ऐसें मूळा-ज्ञानावरण । मज मी नेणें ह्मणतों असोनि आत्मस्फुरण । जडव्यति-रेक ज्ञानदीपें आपणा आपण । पाहे प्रत्यक्वृत्तीनें तोचि नाश आवरण तमाचा ॥ ४ ॥ आतां आत्मा देह विलक्षण । कळला जरी सच्चिदानंद ल-क्षण । तरी जड निराळें अवलक्षण । द्वैत धरूनि असे उरलेंचि ॥ ५ ॥ तेव्हां ज्या सत्तेनें जें दिसे । तें विचारितां तेंचि असे । रज्जूकरितां सर्प भा-से । न दिसे न असे त्याविणें अन्वयबोध हा ऐसा ॥ ६ ॥ करितां जडप-टाचा ऐसा शोध । जडपटप्रकाशक तंतुबोध । होतां जडपट दिसोनि नाहीं ऐसा बाध । जाला जड प्रपंच पट असण्याचा ॥ ७ ॥ एवं प्रपंच सारा पट । चित्स्वरूप तंतूच होय निपट । या ज्ञानास दृष्टांत उत्कट । 'भास्वता' ह्मणोनि बोलतसे ॥८॥ "ज्ञानदीपेन भास्वता" ह्मणजे ज्ञानसूर्येंकरूनी। कीं अन्वयज्ञान विश्वप्रकाशक ह्मणोनी । ज्ञानसूर्य ह्मणे हा भाव धरूनी । श्रीवत्सांकित हृदय कमलांत ॥९॥ रज्जु न कळतां होय साप । परि त्या अज्ञानापरीस अधिक याचा प्रताप । मनीं भय शरीरीं कंप । सर्प करी तैसें न करी अज्ञानरज्जूचें ॥ ४१० ॥ मायानदी सोपी उगमीं । भयानकत्व नाना नद्यांच्या संगमीं । तैसें नेणें ह्मणतो मज मी । याहूनि दुःख देहादिक जड प्रपंचाचें ॥ ११ ॥ यालागीं आवरणनाशक ज्ञानदीप । विक्षेपनाशकाचा सूर्यासम प्रताप । कीं अंधकारीं पाहाया आपलें रूप । दीपचि पुरे ॥ १२ ॥ परंतु पाहावा प्रपंच सारा । दीप न नाशी त्या अंधकारा । ह्मणोनि बोलणें लागलें जगदाधारा । अन्वयबोधास दृष्टांतें सूर्याचिया ॥ १३ ॥ ऐसें द्विविध अज्ञान । मी ना-शितों भवभंजन । देऊनि दों प्रकारींचें ज्ञान । दों दृष्टांतें करूनी ॥ १४ ॥ येथें इतर टीकाकार । न वाखाणिती अज्ञान द्विप्रकार । जैसा तैसा अर्थ

निर्धार । करूनि गेले ॥१८॥ अज्ञानजनित तम । ज्ञानदीपें नाशितों ह्मणतो पुरुषोत्तम । भास्वता ह्मणजे प्रकाशवंत उत्तम । त्या ज्ञानदीपें ह्मणोनि वाखाणिती ॥ १६ ॥ तम शब्दें ह्मणूनि संसार ह्मणती । जो आत्मज्ञानियास न उपजतो ऐसें योजिती । दाटूनि डोळे वटारिती । पीळ घालूनि आपल्या कंठातें ॥ १७ ॥ तरी अज्ञान नाशिल्याविण । अज्ञानजनिताचें कैसें होतें संहरण । ऐसें पुसतां मागुती आणिती विवरण । कीं अज्ञाननाशेंचि नाशतो ह्मणतो ह्मणावें ॥ १८ ॥ तरी अज्ञान नाशितो हाचि अर्थ । ये स्थळीं कां न वर्णावा समर्थ । तम शब्दें संसार वाखाणूनी व्यर्थ । अर्थास्तव मग अज्ञाननाशक कां बोलावा ॥ १९ ॥ आणि ज्ञानदीपें करूनी । नाशितो तम ह्मणोनी । मागुती भास्वता ह्मणोनि या वचनीं । विशेष काय सांपडला ॥ ४२० ॥ ज्ञानास दृष्टांत दीपाचा । तो दीप ह्मणतां प्रकाशवंत साचा । मागुती प्रकाशवंत ह्मणावा प्रकाश त्याचा । कां अधिक शब्द थोडिया अर्थी योजावे ॥ २१ ॥ मिळाली अणीस अणी । ते समयीं गीता उपदेशी चक्रपाणी । थोडिया अर्थास अधिक सुशब्द वाणी । कां त्यांची योजील ॥ २२ ॥ हें असो सकळ । अर्थ यथार्थदीपिकेंत जाला प्रांजळ । आतां क्लिष्टकल्पित अर्थ कां कुशल । अंगीकारिती ॥ २३ ॥ व्यतिरेकें ज्ञानदीपें नाशितों तम । हें आवरण अज्ञानापासूनि उगम । जडभ्रांति अज्ञानापासूनि त्यांतें पुरुषोत्तम । भास्वता ह्मणजे अन्वयज्ञानसूर्यें नाशितों ह्मणतसे ॥ २४ ॥ नाशितों द्विविध आवरण विक्षेप अज्ञान । त्यांस दों दृष्टांतें द्विप्रकार तें व्यतिरेक अन्वयज्ञान । ऐसें अबाधित होतां समाधान । कोण इतर अर्थ बाधित मानील ॥ २५ ॥ आतां ह्मणतो मी अज्ञान नाशितों ह्मणोनी । तरि तो नाशितो कोठें स्वयें असोनी । ऐसी शंका उपजेल हें समजोनी । "आत्मभावस्थो" ह्मणतसे ॥ २६ ॥ आत्मा बुद्धि तिचा भाव । तेथें असोनि मी देव । नाशितों ह्मणूनि स्वयमेव । तोचि ह्मणतो ॥ २७ ॥ बुद्धीचा भाव वृत्ती । तीमाजि जे आत्मप्रत्ययस्फूर्ती । तेचि अर्जुना अमूर्त मूर्ती । माझी सर्वात्मयाची ॥ २८ ॥ तेथूनि नाशितों द्विविध अज्ञान । देऊनि द्विप्रकार दों दृष्टांतें ज्ञान । त्याचेंचि नाशितों ह्मणतो भवभंजन । जे प्रीतिपूर्वक भजती ह्मणोनि पूर्वी वर्णिले ॥ २९ ॥ ऐसी दशमी एकादश श्लोकीं । टीका जे भक्तीपुढें मुक्ति करी फिकी । आणि उपास्य या तिहीं लोकीं । एकचि भगवान् श्रीकृष्ण हें जेथें ॥ ४३० ॥ या अकरा श्लोकीं धनंजय । ऐकता जाला हा निर्णय । कीं सगुणब्रह्म सर्वेश्वर कृष्ण हा नि-

श्रय । आदि सर्वां देवां ऋषींचाही एक हा ॥३१॥ "न मे विदुः सुरगणाः प्रभवं" या श्लोकीं । ऐसें श्रीकृष्ण बोलिला कीं । माझा ईश्वरत्वप्रादुर्भाव या लोकीं । न जाणती देव महर्षि सर्वही ॥३२॥ कीं अज अनादि । आणि त्यां सकळांचा मी आदि.। ह्मणोनि नेणती पुत्रपौत्र ब्रह्मादी । प्रादुर्भाव समय माझा मूळ पुरुषाचा ॥ ३३ ॥ तरी जेव्हां सर्वां देवां ऋषींचेंहीं कारण । हाचि एक नारायण । तेव्हां सेव्य याचेच चरण । तत्त्वविचारें सर्वांसही ॥ ३४ ॥ ऐसें अर्जुन समजला । विभूति आणि योगाचा महिमा ऐकिला । कीं विभूति आणि योगातें जो जाणे त्याला । अविकंपयोगीं योजणें यासि अनायासें ॥ ३५ ॥ तरी विभूति याच्या विस्तारें । ऐकाव्या आणि आदरें । योगही ऐकावा पुन्हा ऐसें पांडुकुमारें । धरिलें मनांत॥३६॥ परि दोन्ही श्रवण तेव्हां सफळ होती । कीं कृष्ण तत्त्वतां वाटे जगत्पती । कीं या अध्यायांत या प्रकरणीं आधीं मजप्रती । "योमामजमनादिं च" या श्लोकीं हेंचि बोलिला ॥ ३७ ॥ तरी कृष्णचि सर्वेश्वर ऐसा । बहुतां प्रकारें बैसला ठसा । तो अत्यंत भक्तिभावें जगन्निवासा । निवेदितसे अर्जुन ॥३८॥

॥ अर्जुन उवाच ॥ परं ब्रह्म परं धाम पवित्रं परमं भवान् ।
पुरुषं शाश्वतं दिव्यमादिदेवमजं विभुम् ॥ १२ ॥
आहुस्त्वामृषयः सर्वे देवर्षिर्नारदस्तथा ।
असितो देवलो व्यासः स्वयं चैव ब्रवीषि मे॥१३॥

॥ टीका ॥ अर्जुन ह्मणे जे परम । प्रकृतिपुरुषापर तें ब्रह्म । जें पूर्ण ज्यास ह्मणती निगम । ब्रह्म तें तूंचि ॥ ३९ ॥ कीं सर्वेही जरी ब्रह्मचि असे । परि न जाणती कोणी ऐसें । ज्यास त्यास अज्ञानस्वप्न दिसे । मी कोण ऐसें कळेना ॥ ४४० ॥ जरी ज्ञान होतां कळलें । तरी तें तुवांचि दीधलें । तैसें तुझ्या उपाधीस कोणी नाहीं बोधिलें । ब्रह्मात्मत्व तुझें स्वतःसिद्ध । ॥ ४१ ॥ प्रकृतीहूनि पर । आपण ऐसें निरंतर । तूंचि अनुभाविसी सर्वेश्वर । तूंचि परब्रह्म देवा यालागीं ॥ ४२ ॥ एवं जें सगुण । त्यातेंचि ह्मणावें निर्गुण । कीं निर्गुण स्वयें आपण । अखंड बोध ऐसा सगुणींच ॥ ४३ ॥ एवं लक्षूनि सगुण । त्याचा अखंडानंदानुभव पाहूनि पूर्ण । ह्मणे तूंचि परब्रह्म निर्गुण । देवाधिदेवा ॥ ४४ ॥ ऐसा सगुणही तूं नित्य निर्गुण । ह्मणोनि वर्णूनि आतां तूंचि सगुण । ह्मणूनि वर्णितो निपुण । गुरुशिष्य साच त्याच भगवंताचा ॥४५॥ "परं धाम पवित्रं परमं भवान्" ह्मणोनि । या सगुण विशेषणें करूनी । सगुण मोक्षस्थानही तूंचि हें मनीं धरूनी । बोलतसे ॥४६॥

सायुज्यमुक्तीचें स्थळ । तूंचि ह्मणोनि बोलिला ब्रह्म केवळ । आतां ज्ञानी सगुणभक्त कुशल । त्यांचें परंधाम पवित्र परम वैकुंठ तूंचि ह्मणतसे ।। ४७ ।। धाम शब्दें अधिष्ठान । बोलतो ह्मणात्रा अर्जुन । तरी परंब्रह्म ह्मणतां तें वचन । याचि अर्थी योजिलें ।। ४८ ।। पर ह्मणजे प्रकृतिकारणाहूनि पर । जैसा सर्पाभासापरता दोर । तें परब्रह्म तूं कीं ज्यांत चराचर । त्याहूनि परता रज्जु सर्पापरता जे रीती ।। ४९ ।। ह्मणतां ऐसें परब्रह्म । जालेंचि अधिष्टानरूपें धाम । निर्गुणोपासक आत्माराम । पावती जया धामातें ।।४५०।। आणि तें न पवित्र अथवा न अपवित्र । निर्गुणोपासकां ह्मणावें पवित्र । ह्मणोनि वैकुंठ शुद्धसत्त्वरूप विचित्र । तें परंधाम पवित्र तूंचि ऐसें ह्मणतसे ।। ५१ ।। कैवल्य पावती आत्माराम । तें परंब्रह्म शब्दें सूचविलें धाम । ज्ञानियां भक्तां वैकुंठधाम । तेंही तूंचि ह्मणोनियां परंधाम शब्दें सूचवितो ।। ५२ ।। रज तम विकार अपवित्र । जेथें नसती कीं शुद्ध सत्त्व जें पवित्र । त्याची रचना जेथें स्वानंदमात्र । अखंडत्वें स्फुरतसे ।। ५३ ।। पवित्र पदार्थ आणीकही असती । परंतु तेथें रज तम दिसती । कीं प्राकृता आकृति तमाची प्रकृती । आणि भासे रजोगुण कार्या इंद्रियांतें ।। ५४ ।। ह्मणोनि हें पवित्र परम । कीं जेथें धुंडितां न सांपडती रज तम । ऐसें परंधाम पवित्र उत्तम । वैकुंठनगर तूं हा अर्थ ।। ५५ ।। आतां परंधाम । जरी वैकुंठाचेंचि नाम । तरी काय अधिष्ठानरूप धाम । जगाचें सगुणपणें नव्हेसी ।। ५६ ।। ऐसें आक्षेपाचें स्थान । ह्मणोनि ह्मणतो अर्जुन । कीं तूं पुरुष जगज्जीवन । जगदीश्वरा ।।५७।। पिंडब्रह्मांडें हीं पुरें सकळ । यांत वास ज्याचा तो तूं पुरुष केवळ । नाना तरंगीं वसे जैसें जळ । ऐसा सर्वांपुरीं वससी पुरुष तूं ।। ५८ ।। परि पुरें शरीरें त्यांत । जीवही वसती अनंत । तरी तूं तैसा न होसी भगवंत । ह्मणूनि शाश्वत तूं ह्मणतसे ।।५९।। कीं पुरें शरीरें त्या पुरीं । अविद्येनें निद्रा करी । स्वप्न प्रपंच परोपरी । साच मानूनि अनुभवितो ।।४६०।। पुरुष शब्दें तोही जीव । परि या अर्थेंकरूनी ज्यांस जीवभाव । त्या सर्वांस अशाश्वतपण तूं देव । शाश्वत वससी या पुरामाजी।।६१।।आणि जीव ते अनेक । फळें शरीरें धरिती लौकिक । तूं पुरुष अलौकिक । ह्मणूनि तूं दिव्य ह्मणतसें ।। ६२ ।। तूं ऐसा ह्मणोनी । ह्मणती सर्वही मुनी । ऐसें दुसऱ्या श्लोकेंकरूनी । भक्तीनें गुंफिली सुमनशब्दमाळा अर्पील ।। ६३ ।। या श्लोकीं पाहतां श्लोक सगळा । भगवत्सर्वोत्कर्षाचा जिव्हाळा । अर्जुनाच्या प्रेमाचा कळवळा । एकचि प्रगट दिसतसे ।। ६४ ।।

व्यासादि सर्व मुनी । वारंवार बोलिले निश्चय करूनी । कीं पूर्ण ब्रह्म हा श्रीकृष्णचि ह्मणोनी । तेंही आटवलें अर्जुनातें ॥ ६५ ॥ स्वमुखेंही करुणार्णव । बोलिला स्वाचिंत्यवैभव । तें आइकतां पांडव । तांडव करीत होता हृदयांत ॥ ६६ ॥ परंतु गीताश्रवण । करावया पसरले दोनी श्रवण । चित्त भगवद्गुणप्रवीण । मौन वाचे ॥ ६७ ॥ तों प्रश्नाचा अवसर । देखताजाला चतुर । बोलतां आधीं प्रेमें अधीर । तूं थोर तूं थोर हेंचि ह्मणूं लागला ॥६८॥ थोर तूंचि एक सर्वेश्वरा । ह्मणूनि ऐसाच मुखांतूनि श्लोक सारा । निघालया श्लोकीं शब्द दुसरा । असेचना ॥ ६९ ॥ बाप प्रेमाचें लक्षण । बाप अर्जुन बोलका सुलक्षण । बाप स्तुतिपात्र कमलेक्षण । ईश्वरेश्वर देवाधिदेव श्रीकृष्ण ॥ ४७० ॥ जितकी करावी स्तुती । तितकी अवघी आरती । श्रेष्ठता हरीची त्याही परती । भागले वेद आणि चतुःपंचषट्सहस्रमुख । ॥ ७१ ॥ एका मुखाचा बापुडा । अर्जुन बोलों जातां जाला वेडा । होऊनि प्रेमा वरपडा । श्लोकभरी हेंचि समग्र बोलतसे ॥७२ ॥त्यांत श्लोक चरणा द्वयवरी । स्वयेंचि ऐसा वर्णिला श्रीहरी । तृतीयापासूनि ऋषींची वैखरी । स्मरोनि तूं ऐसा ह्मणोनि देवा बोलतसे ॥७३॥ " आहुस्त्वामृषयः सर्वे " ऐसें बोलिला पुढिलिया श्लोकीं । आणीक ऐसेंही पुढिलिया श्लोकीं बोलेल कीं । तुझी ही वाणी नेटकी । या गोष्टी बोलतां आइकतों ॥ ७४ ॥ त्यांत या अध्यायाचे आरंभापासूनी । जें बोलिला स्वमुखेंकरूनी । त्याचा मथितार्थ या चतुर्थचरणीं सूचवूनी । अनुवाद अर्जुन करीतसे ॥ ७५ ॥ च० च०॥ आदिदेवमजं विभुम् ॥ अजी तूं आदिदेव । तूं अज देवाधिदेव । तूं विभु समर्थ ऐसें स्वयमेव । वदसी मातें ॥ ७६ ॥ सर्वांचा आदि आणि सर्वांचा देव । ऐसा एक तूंचि देवाधिदेव । "न मे विदुः सुरगणा" या श्लोकीं स्वयमेव । "अहमादिर्हि देवानां" ह्मणोनि बोलिलासि ॥७७ ॥ तरी जो सर्वांचा आदी । तोचि देव त्याचा अनादी । तूं स्व आदि ह्मणोनि ब्रह्मादी । तुज भजती देव आपला मानुनी ॥ ७८ ॥ आणि तूं अज ह्मणजे जन्मरहित । आणि विभु कीं सर्वलोकमहेश्वर तूं अच्युत । " यो मामजमनादिं च " या श्लोकांत । " वेत्ति लोकमहेश्वरम् " ह्मणोनि तूंचि वदलासि ॥ ७९ ॥ कीं जो सर्वांचा आदि आणि देव । तो जन्मरहित देवाधिदेव । आणि सर्वलोकमहेश्वर तो स्वयमेव । ह्मणोनि तूं आदिदेव अज अनादि विभु यापरी ॥ ४८० ॥ ऐसें समग्र श्लोकभरी । कृष्णसर्वेश्वरत्व वर्णिलें या उपरी ।

१ ब्रह्मा, शिव, षडानन आणि शेष.

ऋषि ये रीती बोलती तूतें हरी । तूंही स्वयें बोलसी हें प्रमेय उत्तरश्लोकाचें ॥ ८१ ॥ भूत भविष्य वर्तमान । ज्यांस कालत्रयाचें ज्ञान । ऋषि ह्मणोनि अभिधान । तयां ज्ञानियांचें ॥ ८२ ॥ तरी सर्वही ऋषीश्वर । तूतेंचि ह्मणती सर्वेश्वर । त्याही ऋषींत प्रसिद्ध अत्यंत थोर । त्यांत नारद देवऋषी ॥ ८३ ॥ तरी तो देवऋषि नारद । सर्व शास्त्रीं अनुभवीं विशारद । तोही ऐसेंचि ह्मणतो कीं वरद । सर्वां वरदांचाही सर्वेश्वर कृष्ण ह्मचि ॥ ८४ ॥ तैसाचि ऋषिनामें असित । तैसाच देवल परम विख्यात । किंबहुना श्रीसत्यवतीसुत । वेदव्यास जो वेत्ता सर्वां वेदांचा ॥ ८५ ॥ जो उचलूनि भुज । ह्मणतो कीं आदिदेव अज । विभु परब्रह्म परंधाम सहज । तो हा चतुर्भुज श्रीकृष्ण॥८६॥ऐसें बोलिला अर्जुन । जो व्यासनंदन पांडूचा नंदन। ज्यास प्रत्यक्ष वारंवार दर्शन । स्वपितामह वेदव्यासाचें ॥८७॥हें वचन स्वयें त्या अर्जुनाचें । आणि हें शास्त्र भारत पंचम वेद नाम ज्याचें । आणि हें जगद्वंद्य उपनिषत्सार साचें । श्रीभगवद्गीता पाठ सर्वत्र लोकांसी ॥ ८८ ॥ तेथें ऐसा निर्णय । आदिदेव जगत्कारण अद्वय । तो हा श्रीकृष्णचि ऐसा निश्चय । इतकियापरी या गीतेंत ॥ ८९ ॥ इतर पुराणीं व्यासवैखरी । सन्मार्गी लावावया अनधिकारी । ज्यास त्यास थोर ह्मणे परी । सिद्धांत ऐसा व्यासाचा ॥ ९० ॥ आणि शंका इतरां पुराणीं । कीं मतकर्ते आपणास इष्ट तैसी स्ववाणी । पुराणश्लोकीं मेळवूनि घाणी । केली सकळ पुस्तकांची ॥ ९१ ॥ पुरातन श्लोक काढिती । स्वकृत श्लोक घालिती । सभेंत पुस्तकें काढूनि दाविती । प्रमाणें स्वकल्पितें ॥ ९२ ॥ वेद आणि हे भगवद्गीता । सर्वत्र पाठ पुण्यवंतां । ह्मणोनि येथें काढितां घालितां । न फावे कुमत तस्करांतें ॥ ९३ ॥ येथें व्यासाचा सिद्धांत । अर्जुन बोले आइके भगवंत । तरी अनेक जन्मींचे भाग्यवंत । ते हृदयांत दृढ धरोत हे गोष्टी ॥ ९४ ॥ जो हे गोष्टी धरी मनीं । सिद्धि त्याची काय बोलावी ह्मणूनी । "यो मामजमनादिं च वेत्ति"या श्लोकें करूनी । स्वयें स्वामीच बोलिला ॥ ९५ ॥ कीं अज अनादि सर्वलोकमहेश्वर । मी ह्मणोनि मातें जाणे जो नर । तो सुटे सर्वां पापापासूनि मत्पर । सर्व पापें ह्मणिजे बंधकें कर्में समस्तें ॥ ९६ ॥ सर्वां वेदांचें रहस्य जाणे । तो वेदव्यास ऐसें ह्मणे । त्यासारखें कोण हें जाणे । रहस्य तत्त्व वेदांचें ॥ ९७ ॥ स्मृतिकर्ते ऋषि सकळ । व्यास वेदार्थवेत्ता केवळ । आणि भगवद्वाक्यावरूनि प्रांजळ । सिद्धांत ऐसा गीतेचा ॥ ९८ ॥ हे सिद्धांताची सीमा । कीं सर्व महिमा-

सीमा कृष्णमहिमा । आतां येविषयीं निगमागमा । पुनरुक्तिरूपें कां शिणवावें ॥ ९९ ॥ एवं तूं सर्वेश्वर । ब्रह्मादि ईश्वरांचा ईश्वर । ऐसें बोलती ऋषीश्वर । आणि वेदार्थवेत्ता श्रीव्यास ॥ ६०० ॥ आणि तूं स्वयें देव । ह्मणसी इतर देव मी देवाधिदेव । तूंच हें स्वयमेव । बोलसी प्रत्यक्षही ॥१॥ ऐसें या श्लोकीं बोलिला । तों कांहीं संदेहाचा ठाव देखिला । कीं महिमाच वर्णितो आपला । निश्चय कांहीं नाहीं बोलिलों ॥ २ ॥ ऐकोनि इतकेही निर्णय । अनधिकारियास येविषयीं न बाणे निश्चय । पाषाण अंतरीं ओला न होय । असोनिही अमृतसागरीं सर्वदा ॥ ३ ॥ हे शिकले शब्द शुक । पक्षीही बोलेल काय त्याचें कौतुक । हें अंतरीं ठसावें ज्यास भूक । असेल परम स्वहिताची ॥ ४ ॥ तरी धरूनि स्वहिताची मती । विभूति याच्या आणि योग याचा मागती । मज पुसणें असे या सर्वेश्वराप्रती । यथार्थ मानूनि हें सर्व ॥ ५ ॥ धरोनि ऐसा भाव । आपला अंतर्भाव पांडव । जाळावया जनसंदेहखांडव । बोलतसे हा श्लोक ॥ ६ ॥

॥ श्लोक पूर्वार्ध ॥ सर्वमेतदृतं मन्ये यन्मां वदसि केशव ।

॥ टीका ॥ केशवा हें सकळ । जें ऋषि बोलती आणि तूंही स्वयें केवळ । स्वमहिमा जो वदसि निर्मळ । हें समूळ मानितों मी सत्य ॥ ७ ॥ ऐसी ऋषींची वाणी । आणि जें बोलिला चक्रपाणी । सर्व सत्य मानितें अंतःकरणीं । ह्मणोनि अर्धश्लोकें अर्जुन बोलिला ॥ ८ ॥ आतां त्या सर्वां शब्दांत । याच अध्यायांत । एक गोष्टी बोलिला भगवंत । ते युक्तिसिद्ध अत्यंत अर्जुनातें बिंबली ॥ ९ ॥ कीं सकलजगत्कारण । प्रथम माया प्रगटतां ब्रह्म होतें सगुण । त्याची अभिव्यक्ति कोणी सुरगण । आणि ऋषीही न जाणती ॥ ६१० ॥ कां बापाचा जन्मदिवस । जैसा नाहीं दिसत पुत्रास । तैसी ईश्वराची अभिव्यक्ति कोणास । ठाउकी नसे ॥ ११ ॥ "न मे विदुः सुरगणा" । या अर्धश्लोकें श्रीकृष्ण बोलिला कीं सुरगणा । आणि महर्षीसही अर्जुना । प्रादुर्भावकाळ[1] माझा विदित नाहीं ॥१२॥ आणि "अहमादिर्हि देवानां" ह्मणोनी । ऐसें बोलिला या उत्तरार्धें करूनी । कीं मी आदि देवां ऋषींचाही ह्मणूनि त्रिभुवनीं । कोणी माझ्या अभिव्यक्तीतें[2] नेणती ॥ १३ ॥ जे ऐसी गोष्टी अर्जुनें ऐकिली । ते सर्वां गोष्टींची किल्ली । ते आपणास दृढ बिंबली । ऐसें बोलोनि दाखवितो उत्तरार्धें ॥ १४ ॥

---

१ प्रगटण्याचा काळ. २ स्वरूप.

॥ उत्तरार्ध ॥ नहि ते भगवन्व्यक्तिं विदुर्देवा न दानवाः ॥ १४ ॥

॥ टीका ॥ भगवंता तुझी व्यक्ती । ह्मणिजे तुझी अभिव्यक्ती । निर्गुणीं सगुणत्व होणें हे प्रसक्ती । न जाणती देव अथवा दानव ॥ १५ ॥ ह्मणतां न जाणती देव । त्यांत आले ऋषीही विप्र भूदेव । ऐसें तूं बोलिलासि स्वयमेव । " न मे विदुः सुरगणाः प्रभवं न महर्षयः " ह्मणोनी ॥ १६ ॥ देव ऋषि न जाणती सर्व । हे दैवी संपत्तीचे देव । तैसेच दैवीसंपत्तीचे मानव । न जाणती ऐसेंही सिद्ध जालें ॥ १७ ॥ तरी याहूनि विपरीत । आसुरी संपत्तीचेच अत्यंत । दैवी संपत्तीचे न जाणती तद्विपरीत । जाणत असतील शंका ऐसी वडों शके ॥ १८ ॥ कीं भूचरां जें अगम्य । तें गगनचरां सुगम्य । देव न जाणती सौम्य । तरी दानव क्रूर तद्विपरीत जाणती ॥ १९ ॥ ऐसें संशयाचें स्थळ । ह्मणोनि ह्मगतो अर्जुन कुशळ । कीं तुझी अभिव्यक्ति विश्वाचें मूळ । दानवही न जाणती॥६२०॥ आधीं ब्रह्मादि देव । मग ऋषींचा उद्भव । त्यांपासूनि संभव । दानवादिकांचा ॥ २१ ॥ ते देव ते ऋषि नेणती । तेव्हां दानव बापडे काय जाणती । या भावें श्रीपतीप्रती । दानवही न जाणती ह्मणे पार्थ ॥ २२ ॥ एवं च तूं सर्वांचा आदी । ऐसिया तुझा प्रादुर्भाव जो अनादी । ते व्यक्ति अभिव्यक्ति तुझी ब्रह्मादी । न जाणती पुत्र जन्मदिन जैसा बापाचा ॥ २३ ॥ आतां यानंतरें श्लोक । तो कां बोलिल पुण्यश्लोक । त्याचें निमित्त सुज्ञलोक । आइकोत आधीं ॥ २४ ॥ आपला प्रादुर्भाव । न जाणती ऋषि देव । ह्मणोनि या अध्यायांतचि मागें देवाधिदेव । बोलिला होता ॥ २५ ॥ यांत सकळां कारणांचें कारण । आपण ब्रह्म सगुण । ऐसें सूचवी ते खूण । बाणली दृढ हृदयांत अर्जुनाच्या ॥ २६ ॥ त्याचा प्रस्तुतीं अनुवाद । पार्थे केला विशद । कीं तूं सगुणत्वें स्वच्छंद । प्रगटतोसि ते व्यक्ति तुझी कोणी न जाणती ॥ २७ ॥ कीं तूं सकळांचें मूळ । तुज ते कैसे जाणती सकळ । या भावें बोलतां कांहीं संशयाकुल । चित्त जालें ॥ २८ ॥ कीं कोणासही नाहीं कळला । तरी प्रादुर्भाव जाला कैसा कळों आला । संदेह पडतांच दूर जाला । कीं आपला प्रादुर्भाव आपणचि जाणतो ॥ २९ ॥ यांत निर्गुणत्वीं निर्धर्मता । तेथेंचि सगुणत्वीं सधर्मता । स्पर्शोनि बुद्धीकरूनि तत्त्वता । बोलतसे हा श्लोक ॥ ६३० ॥

॥ श्लोक ॥ स्वयमेवात्मनात्मानं वेत्थ त्वं पुरुषोत्तम ।
भूतभावन भूतेश देवदेव जगत्पते ॥ १५ ॥

---

१ निष्ठा, अनुराग. २सात्त्विक, भोळे.

॥ टीका ॥ जी तूं स्वयें आपणासि आपण । जाणसी कीं सर्वज्ञ सर्वांचें कारण । निर्धर्मी निर्गुणीं हेंही स्फुरण । नसे हें ज्ञान योगें मायेच्या ॥३१॥ तूं निखळ चित्स्वरूप निर्गुण । तेथें जें आपणास जाणणें आपण । हा मायागुणवृत्तियोगें स्फुरण । प्रभव प्रादुर्भाव हाचि मायेचा ॥ ३२ ॥ अकस्मात् किरणीं प्रगटे । त्या जळाभासाचा प्रादुर्भाव न कधीं खुंटे । लीन होउनी स्वयेंचि उमटे । प्रतिदिनीं ॥ ३३ ॥ तैसी सृष्टीच्या आदिकाळीं । माया प्रगटे केवळीं । तरंग चित्समुद्रजळीं । वृत्तिरूप ती करी ॥ ३४ ॥ आपण ब्रह्म निर्गुण । आपण सर्वज्ञ सगुण । ऐसें आपणास आपण । जाणसी सुजाण त्याच मायेंकरूनी ॥ ३५ ॥ ते माया तुझी शक्ती । तुझी शक्तीच तुझी व्यक्ती । त्या शुद्ध मायेची अभिव्यक्ती । तोचि अनादि प्रादुर्भाव सगुणाचा ॥ ३६ ॥ ते तुझी चिच्छक्ति माया देवा । जैसी आमुची बुद्धि देवाधिदेवा । ते मायेंकरूनि आपल्या निर्गुणत्वभावा । तूं जाणसी ॥ ३७ ॥ " आत्मनात्मानं वेत्थ त्वं " ह्मणोनी । अर्जुन ह्मणे ये रीती समजोनी । कीं आत्मा बुद्धि माया तीकरूनी । " आत्मानं वेत्थ " ह्मणजे आपणातें जाणसी ॥ ३८ ॥ परंतु या गोष्टीचा करितां शोध । कांहीं प्राप्त होतो विरोध । कीं आपणास आपण जाणणें हा बोध । ब्रह्मस्वरूप माया न ह्मणवे ॥ ३९ ॥ माया ह्मणतां होते दुसरी । आपणास आपण जाणणें ते सत्ता खरी । ते सत्ता चित्स्वरूपचि परी । प्रत्यय सधर्मता वृत्ति मायेची ॥ ५४० ॥ आतां मायाही अंगीकारावी । आणि जाणणें हे सत्ताच स्वस्वरूपीं उरवावी । तेव्हां माया दावूनि उडवावी । नाहींच ह्मणोनी ॥ ४१ ॥ तरी माया ह्मणूनी । माया शब्दें अक्षरें दोन्ही । ते माया असोनि नाहीं या अर्थेकरूनी । दैवी माया नाम तीचें प्रसिद्ध ॥४२॥ मा ह्मणिजे नाहीं । या ह्मणिजे ऐसी नसोनि भासे जे कांहीं । ते ते कीं मृगजळ न दिसे कोणासही । किरणावांचूनि स्वयें जैसें ॥ ४३ ॥ मृगजळ दृष्टीं पडे । परि किरणावांचूनि कांहीं न सांपडे । कांहीं नसोनि उद्भव तों घडे । प्रतिदिवशीं किरणांत ॥ ४४ ॥ अत एव आपण निर्गुण । ऐशा अखंडाद्वैतानुभवें सगुण । कीं द्वैत धरूनि तो मायागुण । प्रगटेच ना ॥ ४५ ॥ या कारणें मायेंकरूनी । आपणास जाणसी ऐसें बोलणें ह्मणोनी । स्वयमेव ह्मणूनि आधींच या वचनीं । परिहारिले बाध सकळही ॥ ४६ ॥ कीं माया ही वेगळी नसे । आणि वेगळी न दिसोनिही भासे । आहेसी तरी स्वयेंच जाणसी ऐसें । अनुभवी तूतें समजती ॥ ४७ ॥ कीं तूं चित्समुद्रबोधस्व-

रूप । तेथें प्रत्यय धर्म तो माया तरंगरूप । दृष्टी न पाहे तरी दीप । प्रत्यय-रहित प्रकाशरूपें राजतो प्रकाशतो ॥ ४८ ॥ सुषुप्तींत कैंचा प्रत्यय । परि आनंद मात्र उरतो अद्वय । तोचि पुन्हा बुद्धीस घेऊन निश्चय । सुषुप्तिसु-खाचा करीतसे ॥ ४९ ॥ सुषुप्तींत सुखस्वरूपत्व ज्याला । देहादि सर्व द्रष्टृत्वही त्याला । एवं प्रत्यय मायायोगें बोला । त्याच निर्धर्मा प्रत्ययप्र-काशकातें ॥ ६५० ॥ सुषुप्तींत सत्त्वतमीं । प्रलयानंतर ईश्वरोपाधि ब्रह्मीं । योगनिद्रे उपरि जागृति पुरुषोत्तमीं । जैसी सुषुप्त्युपरि जागृति जनातें ॥ ५१ ॥ एवं ऐसी ही शुद्ध माया । आपण निर्गुण ह्मणोनि देवराया । अखंडानुभवीं असतां अज अव्यया । स्वयमेव जाणसी कां न ह्मणावें ॥५२॥ स्वयें जरी निर्धर्म । अनुभवमायायोगें सधर्म । तरी स्वयमेव तूंचि कीं वर्म । सांपडलें अद्वितीयत्वाचें ॥ ५३ ॥ कीं जळीं जळच असतां कैंची । तरंग बुद्बुदांचा आकार साचा । चित्स्वरूपीं विचार वृत्तीचा । इतकाचि ॥ ५४ ॥ आकाश जैसा तैसाच केवळ । असोनि पात्रानुरूप त्रिकोण चतुष्कोण वर्तुळ । कीं यथापूर्व असोनि नानाकार भासे जळ । वाफे नानाकार पावूनी ॥ ५५ ॥ एवं मायावाच्यांश असे । परि पाहतां वेगळी न दिसे । माया सत्यत्वें पदार्थ वेगळा गवसे । तरी दुसरा ऐसें ह्मणावें ॥ ५६ ॥ याकारणें अर्जुन स्ववचनीं । दाखवी हे प्रकार दोन्ही । स्वयमेव ऐसें आधीं ह्मणोनी । मायोपाधींकरूनि जाणसीही बोलिला ॥५७॥ माया आणि स्वरूप । व्यतिरेकें या दोहींचें वेगळें रूप । आणि दोहींचे ऐक्यान्वय अध्यात्मदीप । जाणे तोचि अनुभवी जाणावा ॥ ५८ ॥ बुद्धीनें आत्मप्रत्यय । तेथें बुद्धि वेगळी स्वरूप वेगळें हा अतर्क्य निश्चय । अनुभवातीत अनुभवें जाणे तोचि होय । आत्मवेत्ता ॥ ५९ ॥ दीप दृष्टीतें दिसे । न पाहतां तैसाच असे । परंतु पाहणें हा धर्म न वसे । दृष्टीवेगळा दीपातें ॥ ६६० ॥ निर्गुणास जाणे बुद्धी । निर्गुणचि तिची तीस बोद्धव्य-सिद्धी । परि निजानुभव समृद्धी । हाही धर्म निर्धर्मा लागेना ॥ ६१ ॥ असो हें बोलणें अपार । ग्रंथ वाढतो बहु फार । एवं प्रकरणानुरूप जाला निर्धार । कीं आपणास आपणाचि तूं जाणसी ॥ ६२ ॥ कीं मायेचा नव्हता प्रादुर्भाव । निर्गुणीं नसे ईश्वरत्वाचा अनुभव । तूं आपण आपण जाणसी देवाधिदेव । तोचि प्रादुर्भाव तुझा तूं जाणसी ॥ ६३ ॥ ऐसी हे माया अ-नादी । तीकरूनि तूं निर्मिसी ब्रह्मादी । ह्मणोनि तं अनादि सर्वांचा आदी । जो जाणसी प्रादुर्भाव सर्वां तत्त्वांचा ॥६४॥ तैसी तुझी व्यक्ती । कोणी

न जाणती प्रथम अभिव्यक्ती । पुत्र पौत्र मूळपुरुषाची उत्पत्ती । न जाणती नवल काय ॥ ६५ ॥ पूर्वश्लोकीं ये रीती । बोलोनि या श्लोकीं ह्मणे स्वामी-प्रती । कीं तूतें तूंचि जगत्पती । जाणसी ह्मणोनी ॥ ६६ ॥ याकारणें तूं पुरुषोत्तम । सर्वांचें मूळ सर्वां पुरुषांहूनि उत्तम । कीं सर्वां भूतांचा उगम । तुझ्या कल्पनेपासूनी ॥ ६७ ॥ ह्मणोनि ह्मणे तूं "भूतभावन" । कीं भूतें भाविसी कल्पिसी जगज्जीवन । आणि तूंचि भूतेश ह्मणे अर्जुन । कीं भूतें कल्पूनि तूंचि वर्तविसी ॥ ६८ ॥ आधीं कल्पिलीं पंच भूतें । मग देव मनुष्यादि शरीरें केलीं बहुतें । ह्मणोनि ह्मणावें देवा तूतें । देव देव ह्मणो-नी ॥ ६९ ॥ कीं ब्रह्मादि देवगण । तेही सृष्ट्यादिकर्तें निपुण । परंतु आयत्या मातीचे डेरे रांजण । करिती जैसे कुंभार ॥५७०॥ परि ते न करूं शकती माती । तैसीं भूतें देव न करूं शकती । त्या भूतांतें तूंचि कल्पिसी श्रीपती । ह्मणोनि ते देव तूं देवदेव देवाधिदेवा ॥७१॥ तत्त्वरीतीं करूनी । तूं देवाधिदेव ह्मणोनी । अर्जुन ह्मणे तों मनीं । कांहीं शंकला ॥७२ ॥ कीं हा सर्वांचा आदि ह्मणोनी । थोर ह्मणावा इतरत्र्यांत्रि वरूनी । परंतु पुत्र पौत्र मूळपुरुषाहीहुनी । सभाग्य दिसती ॥ ७३ ॥ तरी हे देव लोकपाळ । एक एक लोक पाळिती विशाळ । ऐशांचाही देव हा गोपाळ । कैसा ह्मणावा ॥ ७४ ॥ तों आठवला श्लोक । "यो मामजमनादिं च" या श्लोकीं उत्तमश्लोक । ह्मणे कीं सर्वलोकमहेश्वर मी एक । ऐसें जाणे तो सुटे सर्वां पापापासूनी ॥ ७५ ॥ ह्मणोनि ह्मणतो कीं तो तूं जगत्पती । ते देव एका एका लोकाचे पती । हे एका ब्रह्मांडांत ऐसे किती । असंख्यात ब्रह्मांडें पती । त्यांचा तूं एक ॥ ७६ ॥ ऐसें जें जें वदे अर्जुन । त्या त्यास प्रमाण भगवद्वचन । तरीच ह्मणे कीं ऋषि आणि तूंही भवभंजन । ऐसेंच बोलसी ॥ ७७ ॥ ऐसा सर्वोत्कर्षरीती । ज्या कारणें विनविला श्रीपती । ते गोष्टी आतां त्याप्रती । बोलतसे या श्लोकीं ॥ ७८ ॥

॥ श्लोक ॥ वक्तुमर्हस्यशेषेण दिव्या ह्यात्मविभूतयः ।
याभिर्विभूतिभिर्लोकानिमांस्त्वं व्याप्य तिष्ठसि ॥ १६ ॥

॥ टीका ॥ आतां देवा तुझ्या विभूती । ज्या विभूतींकरूनि जगत्पती । असती व्यापूनि हे लोक नानारीती । त्या विभूति मजप्रति सांगाव्या ॥७९॥ तूं सर्वजगत्पती । आणि तुझ्याच सकळा विभूती । तरी त्या सांगावयास तूंचि संतांचा पती । योग्य होसी ॥ ५८० ॥ इतरांस कैशा आणि किती । काय कळती तूझ्या विभूती । तूं सर्वां विभूतींचा पती । देव देव ह्मणूनि

आधींच वदलों यालागीं ॥ ८१ ॥ सप्तमाध्यायांत । कांहीं विभूति बोलि-
लाच भगवंत । ह्मणोनि ह्मणतो बुद्धिमंत । कीं अशेषें सांग ह्मणोनी ॥ ८२ ॥
ऐसा प्रश्न केला । तों कांहीं मनीं शंकला । कीं विभूति याच्या जाणूनि
याला । प्रेमें भजतां ज्ञान हा देव देतसे ॥ ८३ ॥ तें तरी आपणास ज्ञान ।
देऊनि नाशिलें अज्ञान । आतां कां विभूति पुसतोसि ऐसें वचन । ह्मणो
बोलेल ॥ ८४ ॥ विभूतिज्ञानाचा तों महिमा । ऐकतां आपणास उपजला
प्रेमा । कीं प्रार्थूनियां पुरुषोत्तमा । विभूति पुसों ॥ ८५ ॥ तरी आत्मत्वें
सकळ । पाहतां हाचि केवळ । परंतु सगुणत्वाचे अंश निर्मळ । याचे
जगीं विभूतिरूपें पाहावे ॥ ८६ ॥ याकारणें विभूती । किमर्थ पुससी ह्मणे
जों श्रीपती । तों आधींच अर्जुन त्याप्रती । बोलतसे हा श्लोक ॥ ८७ ॥

॥ श्लोक ॥ कथं विद्यामहं योगिंस्त्वां सदा परिचिंतयन् ।
कषु केषु च भावेषु चिन्त्योऽसि भगवन्मया ॥ १७ ॥

॥ टीका ॥ योगाघटित सामर्थ्य इश्वराचें । जें "पश्य मे योगमैश्वरं"
ह्मणोनि साचें । नवमीं अर्जुनास दाविलें तें योगैश्वर्य ज्याचें । तो तूं
योगी ह्मणे या श्लोकीं अर्जुन ॥ ८८ ॥ कीं अगा योगिया तूतें चिंतित । मी
असेन कीं मूर्तिमंत भासेन भगवंत । परि ऐसें चिंतित असतां अत्यंत । सा-
मर्थ्य तुझें म्यां कोठें कोठें पाहावें ॥ ८९ ॥ सदा सर्वदा योगरूप । तूं दि-
ससी पटीं जैसा तंतु चित्स्वरूप । परंतु तुझें सामर्थ्य विशेष प्रताप । तूंचि
ह्मणोनि म्यां कोठें कोठें चिंतावें ॥ ५९० ॥ सर्वत्र योगरूपें चिंतित । वि-
शेषें विभूतिरूपें तूं भगवंत । त्या तूतें म्यां प्रेमें अत्यंत । कोणे कोणे भावीं
चिंतावें ॥ ९१ ॥ अगा योगिया मी तूतें । चिंतित असतां चित्तें । कोण
कोणत्या भावाचे ठायीं शरणागतें । तूं चिंतावास भगवंता ॥ ९२ ॥ ऐसें
ह्मणे अर्जुन । या योगिशब्दांत हा भाव गहन । कीं चिंतित असोनि चिंतन ।
विभूतिरूपें म्यां कोठें कोठें करावें ॥ ९३ ॥ योगरूपें चिंतित असोनी ।
विभूतिरूपें गुण विशेष देखोनी । ज्या भावाच्या ठायीं म्यां चिंतावें ते कोण
कोण ह्मणोनी । योगिशब्दें हा भाव दाखविला ॥ ९४ ॥ पुसों जातां वि-
भूती । शंकित जाली अर्जुनाची मती । कीं ह्मणेल श्रीपती । योग सोडूनि
काय पाहसी विशेषें विभूतीतें ॥ ९५ ॥ ह्मणोनि ह्मणे जी योगिया । तूज
योगरूपें चिंतित असोनिही अद्वया । विभूतिविशेष गुण मानूनियां । म्यां
विभूतिरूपें कोठें कोठें चिंतावास ॥ ९६ ॥ यांत योगाचें नाम नसे । परि
योगिया ह्मणतों दिसे । आणि विभूतिशब्दही या श्लोकीं न गवसे । परि

कोठें कोठें चिंतावास ह्मणतां तो अर्थ ॥ ९७ ॥ येथें दोन्ही शब्द पांडव। न बोलोनि बोलिला अर्थास्तव। ह्मणोनि विशेष शब्द आणि विशेष भाव। बोलतसे या श्लोकीं ॥ ९८ ॥

॥ श्लोक ॥ विस्तरेणात्मनो योगं विभूतिं च जनार्दन।
भूयः कथय तृप्तिर्हि शृण्वतो नास्ति मेऽमृतम् ॥ १८ ॥

॥ टीका ॥ जो जनार्दना योग आपला। आणि विभुति विस्तरें सांगें मागुती मला। कीं श्रवण केलें तरी नाहीं पुरला। सोहळा या अमृताचा ॥ ९९ ॥ कीं योगिया योगरूपें तूतें। चिंतित असोनिही विभूतीतें। चिंतावें ह्मणोनि मातें। सादर प्रेमा उपजला ॥ ६०० ॥ पूर्वश्लोकीं हा भाव। माझा समजलाच साक्षी देव। ह्मणोनि ह्मणतो पांडव। कीं योगातें आणि विभूतींतें मज सांग ॥ १ ॥ कीं पुढें करूनि अद्वैत योगरीती। त्यांत मेळवूनि सांग विभुती। अन्यथा ह्मणी माझी मती। योग विसरूनि विभूतिच चिंतील ॥ २ ॥ कीं योगाविण। करितां विभूतींचें स्मरण। पडेल अद्वैतविस्मरण। अनर्थ तेव्हां ॥ ३ ॥ कीं तूं जनार्दन। काळरूपें करिसी जनांचें अर्दन। भेद जन्ममरणबंधन। मग तूं जनार्दन काळ अर्दिसीच ॥ ४ ॥ यालागीं योग आपला। आणि विभूतीही पुन्हा सांग मजला। एवं पूर्वील उपदेश आपणातें समजला। पुन्हा सांग ह्मणतां हें सूचवी ॥ ५ ॥ पूर्वीं बोलिलासि संक्षेप। आतां सांग विस्तारें त्याचेंचि रूप। ह्मणोनि जगदाकारें योगस्वरूप। प्रार्थिला ऐसा ॥ ६ ॥ प्रश्न ऐसा ऐकूनी। योगविश्वात्मकत्व आधीं उपपादूनी। विभूति सांगेल याचें उत्तर देउनी। परम संतोषें या श्लोकीं श्रीभगवान् ॥ ७ ॥

॥ श्रीभगवानुवाच ॥ हंत ते कथयिष्यामि दिव्या ह्यात्मविभूतयः।
प्राधान्यतः कुरुश्रेष्ठ नास्त्यंतो विस्तरस्य मे ॥ १९॥

॥ टीका ॥ श्रीभगवान्षड्गुण। हंत शब्दें येविषयीं हर्षपूर्ण। बहु बरें सांगेन आणि आपण। बहु संतोषलों ऐसें हंत शब्दें सूचवी ॥ ८ ॥ कीं आपला आत्मा आणि विभूती। हीं सर्व दिव्य अलौकिकें तुजप्रती। कुरुश्रेष्ठा सांगेन ह्मणोन श्रीपती। बोलतसे ॥ ९ ॥ योग आणि विभूती। दोन्ही मज सांग ये रीतीं। प्रश्न केला त्यांत श्रीपती। कुरुश्रेष्ठा विभूती। स्पष्ट ह्मणतसे सांगेन ॥ ६१० ॥ आणि कुरुश्रेष्ठा ह्मणोनी। कृपेनें अर्जुनातें आळवूनी। योगही सांगेन ऐसें सूचवूनी। दोन्ही सांगेन ह्मणोनि प्रतिज्ञा करीतसे ॥ ११ ॥ योगिया तूज चिंतित असोनी। ह्मणजे विश्वयोग तुझा

तूंचि ह्मणोनी । मी सदा तुज चिंतित असोनि मनीं । विभूतिरूपें केसा चिंतूं हा प्रश्न ॥ १२ ॥ कीं भगवद्रूप सर्वदा सर्वही पहावें । त्यांत ज्यातें गुणें विशेष देखावें । त्यासही भगवद्रूपें पाहूनि विशेषें मानावें । विभूति ह्मणोनि तरी त्या विभूति कोणत्या ॥ १३ ॥ यालागीं योग आणि विभूती-ही उत्तमश्लोका । सांग ह्मणोनि स्पष्ट बोलिला दुसरिया श्लोका । त्यांत प्रत्युत्तरश्लोकीं विभूतीच एका । सांगेन ह्मणतो श्रीकृष्ण केंवी घडे ॥ १४ ॥ आणि कोठें स्पष्ट कोठें अर्थास्तव । योगही बोलेल देव । तेंही तोचि देवाधिदेव । टीकामुखेंही बोलेल ॥ १५ ॥ तरी या श्लोकीं प्रतिज्ञा करितो । प्रश्न अनुमोदूनि सांगेन ह्मणतो । त्यांत विभूतीच सांगेन ऐसें तो । इतकेंचि कां ह्मणेल ॥ १६ ॥ आतां शब्द थोडे अर्थ फार । हा श्रीगीताश्लोकाचा चमत्कार । ह्मणूनि कुरुश्रेष्ठा ह्मणतां सूचवी उत्तर । कीं योग सांगतचि विभूति सांगेन ॥ १७ ॥ कुरु ह्मणजे कौरवकुळ । योगरूपें भगवद्रूपचि केवळ । हा योग त्यांत विभूति आपली केवळ । तो तूं कुरुश्रेष्ठ अर्जुन ये रीती ॥ १८ ॥ " पांडवानां धनंजयः " ह्मणोनी । पुढें ऐसेंचि बोलेल योग आपला सूचवूनी । कीं विभूतियोगीं दृष्टि देउनी । बोलणें याचि रीतीचें ॥ १९ ॥ सप्तमीं आणि या दशमीं । योगपूर्वक विभूति बोलतो स्वामी । पंचदशींही विभूति बोलेल अंतर्यामी । त्या योगावेगळ्या ह्मणाव्या । ६२० ॥ "रसोहमप्सु कौंतेय" । इत्यादि सप्तमीं विभूतीचा निर्णय । कीं उदकीं रस आणि विभूतिमय । प्रकाश शशिसूर्यांत मी असें ॥ २१ ॥ प्रणव सर्वां वेदीं मी असें । इत्यादि सप्तमीं अमुकियांत अमुकें जैसें । विभूति ह्मणे तैसें । याही दशमांत ॥ २२ ॥ कीं उदक योग आणि रस विभूती । शशिसूर्य योग आणि विभूती ज्योती । तैसे पांडव योग धनंजय सुभद्रापती । विभूति मूर्ति त्यांत भगवंताची ॥ २३ ॥ ऐसें न ह्मणेल पंचदशांत । त्या नुसत्या विभूति बोलेल भगवंत । कीं चंद्र होऊनि औषधींतें असें पाळित । वैश्वानर होऊनि पचवितो अन्नातें ॥ २४ ॥ या दों अध्यायांत विष्णु मी आदित्यांत । वासुदेव मी यादवांत । पांडवामध्यें धनंजय मी ॥ २५ ॥ तैसी या श्लोकीं प्रतिज्ञा करितो । प्रश्नानुरूप विभूति स्पष्ट सांगेन ह्मणतो । आणि विभूति सांगतां अर्थास्तव तो । योगही सांगेल ॥२६॥ तैसाच कुरुश्रेष्ठा या वचनीं । अर्थास्तव योगही सांगेन ह्मणोनी । कुरुश्रेष्ठा या नामें आळवूनी । योगीं विभूति स्पर्शवूनि सांगेन ह्मणतसे ॥ २७ ॥ आणि विभूति पूजार्ह स्थळ । तेथें पूजादि स्पष्ट दिसतो भाव केवळ । योग

सर्वत्र साधारण निवळ । भगवद्रूप ह्मणोनि पाहतांचि असावें ॥ २८ ॥ आणि आरंभीं मध्यें अंतीं । स्पष्ट योगही बोलेल श्रीपती । तैसा या श्लोकीं अर्जुनाप्रति । योग विभूतींत मेळवूनि ह्मणतो सांगेन ॥ २९ ॥ " आत्मविभूतयः " ह्मणोनी । आत्मा आणि विभूति या व्युत्पत्तीकरूनी। आत्मा देहासही ह्मणावें यावरूनी । आपला योगचि देह आपला हा अर्थ ॥ ६३० ॥ देह आपला चराचर । चराचराचें अघटितघटनायोग ऐश्वर । "पश्य मे योगमैश्वरं" ह्मणोनि योगेश्वर । नवमीं बोलिला ॥ ३१ ॥ मज-माजि भूतें सकळ । मी त्या भूतीं नसें केवळ । कीं माळेच्या आश्रयें दिसे व्याळ । परि माळ सर्पी कधींच नसे ॥ ३२ ॥ तरी वस्तुतः माळाचे असे । व्याळ नसेचि यद्यपि दिसे । तरी भूतसमुदायही तुजमाजि तसे । पार्था ऐसें ह्मणसी तरी भूतेंही नसतो मजमाजी ॥ ३३ ॥ तरी दिसतें तें काय आहे । अर्जुना ह्मणसी तरी योग मज ईश्वराचा पाहे । एवं योगैश्वर्य अर्जुनमनीं राहे । कीं रचना अघटितघटना विश्व भगवद्रूप ह्मणावें॥३४॥ एवं आत्मविभूती । सांगेन ह्मणे श्रीपती । कीं आत्मा देह तो योग आणि तुजप्रती । विभूतीही सांगेन ॥ ३५ ॥ एवं जे श्रेष्ठ ज्यांत । ते विभूति त्या योगांत । परि यास नसे अंत । कीं अनंत विभूति अनंत योग आपला ॥ ३६ ॥ विभूतीस नसे अंत । तऱ्हां त्या विभूति ज्यांत त्यांत । त्यांस कें-चा अंत कीं अनंत । योग आपला ॥ ३७ ॥ एवं विभूति आणि योग मि-ळोनी । सर्व आपला प्रपंचविस्तार ह्मणोनी । माझ्या विस्तारास अंत नाहीं ऐसें बोलोनी । मुख्य मुख्य विभूति सांगेन ह्मणतसे ॥ ३८ ॥ सांगतां मुख्य मुख्य विभूती । त्या ज्या ज्यांत ये रीती । ह्मणेल तो योग त्या प्रसंगीं तुज-प्रती । सांगेन ह्मणतसे ॥ ३९ ॥ आतां प्रश्नानुक्रमें देव । उत्तर देतो देवा-धिदेव । "विस्तरेणात्मनो योगं विभूतिं च" या श्लोकें पांडव । पुसताजाला प्रथम योगातें ॥ ६४० ॥ मग पुसताजाला विभूती । ह्मणोनि आधीं जग-त्पती । चैतन्य जड दों परी ख्याती । दोन्ही मिळोनि विभूति आणि योग आपलाचि ॥४१॥ पूर्वार्धीं जडचैतन्यभेद । दावूनि बोलेल आपणासि अ-भेद । उत्तरार्धें जडप्रपंच गोविंद । आपणचि ह्मणोनि विभूतीसह योग बोलतो या श्लोकीं ॥ ४२ ॥

॥ श्लोक पूर्वार्ध ॥ अहमात्मा गुडाकेशः सर्वभूताशयस्थितः ।

॥ टीका ॥ अर्जुना सर्वां भूतांचा आशय । कीं आपलें बरें हो आणि वाईट न हो हा निश्चय । त्या आशयांत मीच आत्मा निःसंशय । जो मी-

पणें राहु चंद्राकृति जैसा स्फुरतसे ॥ ४३ ॥ अगा अर्जुना तुझी आण । तो मीच आत्मा सर्वांचा जाण । त्या आशयावेगळा निवडुनि पाहती सुजाण । राहुवेगळा चंद्र जैसा ॥ ४४ ॥ राहू न दिसे चंद्रावांचूनी । परि चंद्र त्या राहुयोगेंकरूनी । जनदृष्टी हतप्रभ होऊनी । दिसे तें श्यामत्व त्याच राहूचें ॥ ४५ ॥ तैसें अहंस्फुरण । तेंच वाईट त्यांत अमृतकिरण । चैतन्य आहे निरावरण । अविद्येनें अहंरूप बुद्धि ते वाटतसे ॥ ४६ ॥ खड्ग उष्णांत चंचळ । त्याच्या निर्मळपणीं चळे झळझळ । उष्ण न हालतां डळमळ । निर्मळ खड्गीं दिसे उष्णाची ॥ ४७ ॥ तैसें सत्त्व अंतःकरण । निर्मळ जैसा दर्पण । त्यांत चैतन्य निर्गुण । अहंप्रत्ययरूप तयातें वाटतसे ॥ ४८ ॥ त्या मीपणीं आशय । मज सुखचि हो हा निश्चय । परि चित्स्वरूप सर्वभूतीं अद्वय । जें त्या आशयांत सर्वांच्या ॥ ४९ ॥ ते आशय सर्व माया । माया तितकी योग माझा धनंजया । त्या योगीं जीव तितके त्यांवरी दया । करावी विभूति अंशरूप त्या माझ्या हा भाव ॥ ६५० ॥ सावधानपणें करूनिया । विभूति माझ्या पाहें धनंजया । म्हणोनि गुडाकेश नामें तया । आळवी येथें ॥ ५१ ॥ गुडाका म्हणजे निद्रा तिला । जो स्ववश करील त्या पुरुषाला । गुडाकेश म्हणावें कीं ज्याला । निद्रा म्हणिजे स्वहितविस्मृति असेना ॥ ५२ ॥ हे निद्रा झोंप न म्हणावी । निद्रा स्वहितविस्मृति गणावी । गुडाकेशपदवी वर्णावी । त्याची ज्यास विस्मरण नाहीं स्वहिताचें ॥ ५३ ॥ तरी अर्जुन परम चतुर । स्वहिताविषयीं तत्पर । म्हणोनि ये स्थळीं म्हणे सर्वेश्वर । गुडाकेशा म्हणोनी ॥ ५४ ॥ कीं सावधान धनंजया । या माझ्या विभूतीवरी करीं दया । सुख दे पाहूनि त्यांच्या आशया । कीं असें मी त्यांच्या त्या त्या आशयांत ॥ ५५ ॥ आशयांत आत्मा असे तो मी । हें याच भावें म्हणे जगाचा स्वामी । कीं आशय ज्याच्या ज्या कामीं । तो पूर्ण करी मज त्या आशयांत लक्षुनी ॥ ५६ ॥ अगा जो भुकेला । आशय त्याचाच कीं अन्न मिळो मला । तूं अन्न देतां सुख त्याला । जो मद्रूप अंश माझ्या आशयांत ॥ ५७ ॥ उदकाकारणें तृषित । तो उदकचि इच्छी निश्चित । त्या आशयांत मीच भगवंत । तृप्त होतसें जळपानें ॥ ५८ ॥ भोक्तृत्व चिदंशांवाचुनी । न घडे हें त्रयोदशीं पंचदशीं स्पष्ट करूनी । "पुरुषः सुखदुःखानां भोक्तृत्वे" हेतु म्हणोनी । आणि "ममैवांशो जीवलोके" ऐसें बोलेल ॥ ५९ ॥ इत्यादि सर्व काम ।

---

१ प्रभारहित.

ज्या आशयांत तेथें मी आत्माराम। चिदंशरूप माझें धाम। आशयच सर्वा भूतांचा॥६६०॥इत्यादि कोटि कोटि भाव। आशय शब्दात दावी देव। ते आशय पुरवितां मी देवाधिदेव। सुखी होतों सावधान राहें ये विषयीं॥ ६१॥ ह्मणूनि त्यास गुडाकेश। ह्मणे ये स्थळीं हृषीकेश। त्या भावार्थकोटींतूनि लेश। सूचनार्थ वर्णिला ये स्थळीं॥ ६२॥ या अर्धश्लोकीं ऐसा निर्णय। कीं सर्वभूतें आणि त्यांचे आशय। हे माया तेव्हां योग आपला निःसंशय। त्यांत मी आत्मा विभूति जीवत्वें॥ ६३॥ आतां उत्तरार्धी देव। योग माझा मी स्वयमेव। ह्मणोनि ऐसें बोलतो देवाधिदेव। कीं योग विश्व तें आपण हें साधे॥ ६४॥ भूतांस योगपण। साधितां नवमाध्यायांत आपण; बोलिला कीं निर्गुणीं विश्व त्रिगुण। नसोनि असे हा योग॥ ६५॥ नसोनि असे हा योग ऐसें द्वैत। कळतांच होतें अद्वैत। परि ऐसें दिसोनि नसणें अत्यंत। दों प्रकारीं समजावें॥६६॥ कीं स्वयें प्रकाशे सुवर्ण। अलंकार न प्रकाशे त्याविण। जितकें मिथ्या त्याची हे एकचि खूण। खूण दूसरीही ऐसी याच्या ओळखीची॥ ६७॥ कीं कनकीं अलंकाराचे काळ तिन्ही। आदि मध्य अंत ह्मणोनी। त्यांत दों काळीं नसेच मध्यें दिसोनी। नसे सुवर्णावेगळा॥ ६८॥ या दों मिथ्यात्वप्रकारांत। योग सांगतां नवमांत। भूतें मजमाजी परि मी नसें भूतांत। तींही न मजमध्यें हा एक प्रकार निवडिला॥ ६९॥ सर्प रज्जूंत असे। कीं असे ऐसा त्या रज्जूकरितांचि दिसे। परि रज्जु सर्पांत न वसे। कीं नसेच सर्प रज्जूंत॥ ६७०॥ नवमाध्यायांत "मत्स्थानि सर्वभूतानि"। न चाहं तेष्ववस्थितः" ह्मणोनी। "नच मत्स्थानि भूतानि" याहीवरूनी। प्रपंच असोनि नाहीं हें सिद्ध केलें॥ ७१॥ म्यां अव्यक्त मूर्तीनें। केवळ चिन्मात्र वस्तुस्फूर्तीनें। हें व्यापिलें पाहें ह्मणतां स्वप्रकाश अर्जुनें। चैतन्यच असे परप्रकाश्य जड नसे हें देखिलें॥ ७२॥ आतां कालत्रयांतही कनक। एकेच काळीं मुकुटादिक। तेव्हां आदि मध्य अंत ऐसा हा त्रिक। सोनेंचि दाखवी अलंकाराचा॥ ७३॥ या प्रकारीं अलंकार। नसोनि दिसे जो आकार। तो सुवर्णाचा योग हा दुसरा प्रकार। तत्त्व कळायाचा बोलतसे उत्तरार्धें॥७४॥

॥ श्लोक उत्तरार्ध ॥ अहमादिश्च मध्यं च भूतानामंत एव च।

॥ टीका ॥ अगा मी सर्वां भूतांचा आदी। मध्य अंत मी स्वयें अनादी। जैसा पाहतां कटक कुंडलादि। आदि मध्य अंत सोनेंचि॥ ७५॥ एवं च विश्व नसे। मीच असें जें नसोनि दिसे। परंतु चित्स्वरूप मी त्यांत न

गवसें.। लक्षण ऐसें ॥ ७६ ॥ चित्स्वरूप यथास्थित । आणि प्रपंचरूपें असे भासत । त्या केवळपणास पाहतां अत्यंत । माया ह्मणावें लागतें ॥ ७७ ॥ ह्मणोनि ह्मणावी माया । जीस वेद ह्मणती योगमाया । ह्मणोनि विश्वाकार धनंजया । योग माझा तूं पाहें हा भाव ॥ ७८ ॥ योग माझा हा नानाप्रकारें । नवमीं बोलिलों एका प्रकारें । पुन्हा योगही सांग विस्तारें । ह्मणोनि प्रश्न तुझा ॥ ७९ ॥ तरी हा प्रकार दुसरा । योगविस्तार एकसरा । तूं याही विचारदृष्टीं पाहें बरा । कीं जें आदि अंतीं मध्येंही तेंचि कीं ॥ ६८० ॥ अलंकाराचा आदि आणि अंत । सोनें तेव्हां मध्येंही तेंचि निश्चित । तैसा जगासि आदि अंत मी भगवंत । तेव्हां मध्येंही मीच योगरूपें ऐसें मज पाहें ॥ ८१ ॥ एवं च पूर्वार्धीं योगविभूती । बोलिला तें सिद्ध करूनि श्रीपती । आतां त्यांतही विशेष विभूति त्याप्रती । योगपूर्वक बोलतो ॥ ८२ ॥ किमर्थ पुढिल्या श्लोकाची प्रवृत्ती । हें प्रथम बोलणें टीकेची रीती । आतां विभूतीपुढें विभूती । श्लोकप्रवृत्ति पुढें बोलणें लागेना ॥ ८३ ॥ अध्याय पर्यंत । प्रतिश्लोकीं हेंचि निमित्त । कीं अर्जुनें प्रश्न केला त्यावरूनि भगवंत । योग दावूनि विभूति बोलतो प्रथम त्यांत हा श्लोक ॥ ८४ ॥

॥ श्लोक ॥ आदित्यानामहं विष्णुर्ज्योतिषां रविरंशुमान् ।
मरीचिर्मरुतामस्मि नक्षत्राणामहं शशी ॥ २१ ॥

॥ टीका ॥ आदित्य इंद्रादि देव । त्यांत वामनरूपें विष्णु स्वयमेव । ते आदित्यही मी देवाधिदेव । योगमूर्ति परि वामनरूपें विभूति मी ॥८५॥ कीं देवांत त्या माझी गणना । आणि ते इंद्रियाभिमानी अर्जुना । त्यांत उपेंद्र नामें वामना । दैवतपण पायांचें ॥ ८६ ॥ कीं ज्या इंद्रियांचा जो विषय । त्याप्रति नेऊनि पाववितो पाय । त्या पायांचें दैवत तोचि होय । जो गतिप्रद सर्वां जीवांचा ॥ ८७ ॥ पाहतां अर्जुना अगा । गतिप्रदत्व माझ्याच आलें विभागा । कीं स्वर्गा आणि अपवर्गा । कोण देणार मजविणें ॥ ८८ ॥ पाववया संतांचे चरण । सूर्यचि नेत्रांसि कारण । करितां कुत्सितपदार्थनिरीक्षण । काय दुसरा तेथें येतसे ॥८९॥ तैसा स्वर्गापवर्गगती । मी देणार जगत्पती । तेथें विषयादि प्राप्तीच्या गतीप्रती । कोण दुसरा योग्य होतो ॥६९०॥ एवं च देवांत वामन । विभूति माझी जगत्पावन । आतां ज्योति जितकिया थोर लहान । त्या योग त्यांत सूर्य मी विभूती ॥ ९१ ॥ कीं किरण ज्या सूर्याचे । प्रकाशक लोकत्रयाचे । ह्मणोनि तो अंशुमान् ऐसें स्तवाचे । ह्मणे श्रीकृष्ण ॥ ९२ ॥ आतां दैवतांत मरुद्गण । एका उणे

पन्नास त्यांत सुलक्षण । मरीचिनामक तो विभूतिरूपें आपण । वरकड योगरूपें मीच असें ॥ ९३ ॥ नक्षत्रांत चंद्रमा । तो मी विभूतिरूपें कुरुकुलोत्तमा । नक्षत्रें मीच योगरूपें परि महिमा । त्यांत विशेष ह्मणोनि तें विभूतिरूप ॥ ९४ ॥

॥ श्लोक ॥ वेदानां सामवेदोऽस्मि देवानामस्मि वासवः ।
इंद्रियाणां मनश्चास्मि भूतानामस्मि चेतना ॥ २२ ॥

॥ टीका ॥ योगरूपें मीच सकळ निगम । परि गानरूपें वेद साम । कीर्तनप्रिय मी पुरुषोत्तम । माझें विभूतिरूप मी मानितों ॥ ९५ ॥ ह्मणोनि सामवेद मी वेदां सर्वांत । आणि इंद्र मी देवांत । योगरूपें मीच देवही परि त्यांत । विभूतिरूपें मी इंद्र राजा त्या देवांचा ॥ ९६ ॥ मी इंद्रियांत मन । कीं तीं इंद्रियें त्या मनाअधीन । योगरूपें इंद्रियेंही मीच जगज्जीवन । परि विभूतिरूपें त्यांत मी मन असें ॥ ९७ ॥ भूतें चराचरें अर्जुना । त्यांत मी असें चेतना । चेतना चिच्छक्ति कुंतीनंदना । सत्त्ववृत्ती ॥ ९८ ॥ चित्त बुद्धि मनवृत्ती । त्या चेतनेच्याच अगा होती । ते चेतना मी कीं सर्वभूतांची प्रवृत्ती । चेतनेअधीन ॥ ९९ ॥ योगरूपें माझीच मूर्ती । सर्वभूतें परि जीवनकळास्फूर्ती । चेतनेकारितां ह्मणोनि तिची हे कीर्ति । कीं विभूतिरूपें ते मी असें ॥ ७०० ॥

॥ श्लोक ॥ रुद्राणां शंकरश्चास्मि वित्तेशो यक्षरक्षसाम् ।
वसूनां पावकश्चास्मि मेरुः शिखरिणामहम् ॥ २३ ॥

॥ टीका ॥ रुद्र जे कां अकरा । त्यांत शंकर मी पांडुकुमरा । मीच योगरूपें तो वृंद सारा । परि विभूतिरूपें शंकर मी त्यांत ॥१॥ यक्ष आणि राक्षस । अध्यक्षपण यांचें कुबेरास । तो वित्तेश मी विभूतिरूपें आणि त्यांस । योगरूप माझें तूं जाण ॥ २ ॥ वसुदेवांचा गण । त्यांत पावक अग्नि आपण । ते वसूही मीच कवण । योगरीति मजवेगळा वाढेल ॥३॥ नाना शिखरें ऐसे पर्वत । योगरूपें मीच भगवंत । परि विभूतिरूपें त्यांत । कनकाद्रि मेरु मी आहें ॥ ४ ॥

॥ श्लोक ॥ पुरोधसां च मुख्यं मां विद्धि पार्थ बृहस्पतिम् ।
सेनानीनामहं स्कंदः सरसामस्मि सागरः ॥ २४ ॥

॥ टीका ॥ पुरोहित सर्वांस असती । ते योगरूपें मीच योग मायापती । परि विभूतिरूपें मी बृहस्पती । पुरोहित देवांचा पुरोहितां सर्वांत ॥ ५ ॥ जगीं उदंड सेनानायक । ते योगरूपें मीच असें जगन्नायक । परि देवांचा सेनाधिपति स्वामी कार्तिक । विभूतिरूपें असे तो मीच ॥ ६ ॥ प्रवाहरूपें

न वाहे सागर । ह्मणोनि तो ह्मणावा सरोवर । योगरूपें सरोवरें सर्व मी ईश्वर । त्यांत समुद्र विभूतिरूपें मी असें ॥ ७ ॥

॥ श्लोक ॥ महर्षीणां भृगुरहं गिरामस्म्येकमक्षरम् ।
यज्ञानां जपयज्ञोऽस्मि स्थावराणां हिमालयः ॥ २५ ॥

॥ टीका ॥ महर्षि सर्व योगरूपें मीच असें । परि भृगु मी विभूतिरूपें त्यांत वसें । आणि वाचा चतुर्विधा मीच उल्लसें । परि एकाक्षर ओंकार विभूतिरूप ॥ ८ ॥ सकळ यज्ञ मी अर्जुना । कीं सर्व योग माझा जो मजवेगळा असेना । परि जपयज्ञासम कोणी दिसेना । विभूतिरूपें मी जपयज्ञ तो ॥ ९ ॥ अगा उपाधि जीवांचा । शब्दरूप चारी वाचा । त्यांत थोर चाळा अहंपणाचा । कीं मी माझें मज अमुकें पाहिजे ॥ ७१० ॥ अखंड कल्पनेच्या घडामोडी । ते पश्यंती वाचा न राहे घडी । जपकाळीं तिची उडी । मंत्रावरी पडतसे ॥ ११ ॥ कल्पना संसाराचें मूळ । जीकारितां चिदंश केवळ । जीवत्व पावला कीं सत्त्वसागरीं कल्लोळ । सर्वदा राजस तामस कल्पनेचे ॥ १२ ॥ नारायणाचा मंत्र जेधवां । पश्यंतीमध्यें आटवे तेधवां । चिदंश केवळ पावे विसांवा । संसारकल्पनेपासुनी ॥ १३ ॥ मंत्ररूप जाली कल्पना । ते चित्स्फूर्ति मंत्राग्नींत होमिली अर्जुना । तेव्हां कैवल्यचि फळ यजमाना । जपयज्ञाचिया ॥ १४ ॥ माझिया नामाचे मंत्र । वैखरीस येतां करिती पवित्र । पश्यंतीस जप होतां तावन्मात्र । मंत्ररूप उपाधिच होतो जीवाचा ॥ १५ ॥ पश्यंती मंत्र ह्मणे । बुद्धि आत्मप्रत्ययें तितकेंचि जाणें । तेव्हां समाधिलक्षणखुणे । जवळि जीवोपाधि पावला ॥ १६ ॥ कीं मंत्राचेंही स्फुरण राहे । बुद्धि स्वात्मस्वरूपातेंचि पाहे । तोही अनुभव होत आहे । क्षण अर्धक्षण परि अविद्येनें ओळखेना ॥ १७ ॥ हाच राजा ऐसें न वाटे । तथापि तो जरी घडिघडी भेटे । तरी लौकरीच दरिद्रपण फिटे । कीं हा राजाधिराज कनवाळू ॥ १८ ॥ काय बोलोनि बहुत । जपयज्ञासम यज्ञ नाहीं निश्चित । इतर यज्ञ मीच योगैश्वर्यशरीर भगवंत । परि तारक विभूतिरूप जपयज्ञ मी ॥ १९ ॥ आतां स्थावर ह्मणजे स्वयें अचल । वृक्ष पर्वत पाषाण सकळ । त्यांत मी हिमाचळ । स्थावर योगरूप विभूतिरूप हें त्यांत ॥ ७२० ॥

॥ श्लोक ॥ अश्वत्थः सर्ववृक्षाणां देवर्षीणां च नारदः ।
गंधर्वाणां चित्ररथः सिद्धानां कपिलो मुनिः ॥ २६ ॥

॥ टीका ॥ स्थावरांतही नुसते द्रुम । त्यांत अश्वत्थ मी उत्तम । योग-

रूप वृक्ष त्यांत परम । विभूतिरूप अश्वत्थ ॥ २१ ॥ देव होऊनि ऋषीची पदवी । ऐसे देवर्षि त्यांत नारद गोसावी । विभूतिरूप माझी भावी । योगरूपें मीच इतरही देवर्षी ॥ २२ ॥ चित्ररथ गंधर्वांत उत्तम । तो मी कीं तो विभूतिरूप परम । योगरूप ते गंधर्व आणि स्थावर जंगम । आणि तो चित्ररथ सर्व मी असें ॥ २३ ॥ आतां वहु जन्मांचे अंतीं । जडभरतादि उपजताचि सिद्ध असती । त्या सिद्धांत कपिलमुनि माझी विभूती । आणि इतर सिद्ध योगरूप ॥ २४ ॥

॥ श्लोक ॥ उच्चैःश्रवसमश्वानां विद्धि माममृतोद्भवम् ।
ऐरावतं गजेंद्राणां नराणां च नराधिपम् ॥ २७ ॥

॥ टीका ॥ अगा अर्जुना अश्वजाती । त्यांत उच्चैःश्रवा माझी विभूती । अमृत मथितां क्षीराब्धींत उत्पत्ती । ज्याची तो मी इतर योगरूपें मीच ते ॥ २५ ॥ गजेंद्र थोर थोर त्यांत । मी अर्जुना ऐरावत । योगरूपें सर्व गज मीच भगवंत । परि विभूतिरूपें ऐरावत मी ॥ २६ ॥ मी नरांत नराधिप । राजे माझें विभूतिरूप । योग रूपें जप सर्व मी चित्स्वरूप । नर नराधिप सर्व मी ॥ २७ ॥

॥ श्लोक ॥ आयुधानामहं वज्रं धेनूनामस्मि कामधुक् ।
प्रजनश्चास्मि कंदर्पः सर्पाणामस्मि वासुकिः ॥ २८ ॥

॥ टीका ॥ वज्र मी आयुधां सर्वांत । कामधेनू सर्वां गाईंत । योगरूपें आयुधें गाई मीच भगवंत । विभूतिरूप वज्र कामधेनूही ॥ २८ ॥ सुरत कामनारूप मदन । सर्वांच्या मनीं करी मथन । धीरां गृहस्थांचे देहीं असोनि मन । क्षोभवूं न शके तो त्यांचें ॥ २९ ॥ ऋतुकाळीं स्वस्त्रियांशीं गमन । तेही करिती कीं जालें पाहिजे धर्मसंतान । अगा तो कंदर्प म्हणावा प्रजन । कीं संताननिमित्तकचि जो आहे ॥ ७३० ॥ तो कंदर्प मी आहें । माझें विभूतिरूप तोचि पाहें । योगरूपें वेगळा न राहे । तोही काम मी असें वाप कामाचा ॥ ३१ ॥ बरें अथवा वाईट । सर्वही मीच निपट । वाइटाचें फळ वाईट उत्कट । शासन विधिनिषेधांचें यास्तव ॥ ३२ ॥ ते वाईट पदार्थ अमंगळ । परि योगरूप माझेंचि सकळ । त्यांतही सामर्थ्यादिकें प्रबळ । माझी विभूति तें जाणावें ॥ ३३ ॥ आतां जितके सर्पजाती । त्यांत वासुकी माझी विभूती । वस्तुतः सर्व सर्प मीच योगमूर्ती । आणि ते विभूतीही मीच ॥ ३४ ॥

॥ श्लोक ॥ अनंतश्चास्मि नागानां वरुणो यादसामहम् ।
पितॄणामर्यमा चास्मि यमः संयमतामहम् ॥ २९ ॥

॥ टीका ॥ सर्पांवेगळ्या नागजाती । त्यांत अनंत शेष मी विभूती । विश्व समग्र मी योगमूर्ती । ते नाग मीच विभूतिविशेष मी शेष ॥ ३५ ॥ आतां जलचरांचे गण । मीच योगमूर्ति परि त्यांत वरुण । रसाधिपति तो मी आपण । कीं माझी विभूति तो ॥ ३६ ॥ अर्यमा नामें विख्यात । पितर तो मी सर्वां पितरांत । ते पितरही योगमूर्ति मीच भगवंत । अर्यमाही विभूतिरूपें मी असें ॥ ३७ ॥ मन इंद्रियसंयम । जे मना इंद्रियांचा निग्रह परम । करिती त्यांत मी पुरुषोत्तम । यम त्यांचा अगा असें ॥ ३८ ॥ योगरूपें अगा अर्जुना मी । ते पुरुषही जे ऐसे संयमी । परि विशेषगुणें मी जगत्स्वामी । तो यमचि मी असें ह्मणतसें ॥ ३९ ॥

॥ श्लोक ॥ प्रह्लादश्चास्मि दैत्यानां कालः कलयतामहम् ।
मृगाणां च मृगेंद्रोऽहं वैनतेयश्च पक्षिणाम् ॥३०॥

॥ टीका ॥ प्रह्राद मी दैत्यांत । विभूतिरूपें असें भगवंत । योगरूपें पाहतां अत्यंत । ते दैत्यही मीच आणि विभूति प्रह्रादही ॥ ७४० ॥ आतां चालकांत मी काळ । चालक ह्मणजे पशु चाळी जैसा पशुपाळ । तैसेंच गृह ग्राम देश समग्र भूपाळ । चालक गृहग्रामादिकांचे ॥ ४१ ॥ त्यांत जो श्रेष्ठ बळी । तो त्यांतें शासनें चाळी । गृहपाळ गृहचि चाळी पाळी । ग्रामपाळ चाळी ग्रामातें ॥ ४२ ॥ ऐसे देशपाळ भूपाळ । यां सकळांहि चाळकांत काळ । चालक सर्वांचा विशाळ । तो मी असें ॥ ४३ ॥ काळ जैसा चाळी । तैसे चळती पा कहीं बळी । सप्त द्वीपें चाळिती त्यांतें गिळी । आणि चाळी चहूंकडे तो मी काळ ॥ ४४ ॥ ज्यांस जे चाळिती पाळिती । ते तेही मीच योगमूर्ती । आणि तो काळही मीच परि विभूती । ह्मणावें त्या काळातें ॥ ४५ ॥ आतां मृग पशु वनचर । त्यांत मृगेंद्र सिंह मी परमेश्वर । सर्व मृग मीच योगशरीर । आणि मृगेंद्रही विभूति त्यांत मीचि ॥ ४६ ॥ आतां पक्षियांत । मी गरुड विनतासुत । ते पक्षीही योगमूर्ति मीच भगवंत । विभूतिविशेषें मी गरुडही ॥ ४७ ॥

॥ श्लोक ॥ पवनः पवतामस्मि रामः शस्त्रभृतामहम् ।
झषाणां मकरश्चास्मि स्रोतसामस्मि जाह्नवी ॥ ३१ ॥

॥ टीका ॥ अगा जितकियांस आहे प्लवन[1] । उड्डाणवेगें गमन । त्या स-

[1] उडणें.

वांत मी पवन । विभूतिरूपें आणि योगरूपें ते तों सर्व ॥ ४८ ॥ शस्त्रधारी वीर जे.जे । त्यांत श्रीरामरूप विभूति विराजे । सर्व मीच ते धनुर्धर राजे । योगशरीर माझें सकळही ॥ ४९ ॥ श्रीरामरूप पूर्णावतार । परि योगरूपें पाहतां चराचर । सर्वही समयोग मायापसर । स्वकल्पना उभयरूपीं ॥ ७५० ॥ ऐसें स्वमुखें स्फुट करी । येथें दृष्टि द्यावी बरी । नवमाध्यायांत टीकावैखरी । योगैश्वरप्रकरणीं ऐसीच ॥५१॥ असो तो अत्यंत विस्तार । आतां झषांते ह्मणे मी मकर । झषही मत्स्य मकरही मत्स्य परि अंतर । असें कांहीं जो करी ॥ ५२ ॥ योगरूपें मीच ईश्वर । मकर आणि जलचर । परंतु विभूति माझी मकर । बळादिगुणविशिष्ट ह्मणोनी ॥ ५३ ॥ आतां नदी जळें वाहती । त्यांत भागीरथी माझी विभूती । सकळ नद्या मीच योगमूर्ती । विशेषें विभूतिरूपें गंगा जाह्नवीही ॥ ५४ ॥ ऐसा योग आधीं । बोलोनि अद्वैत बोधी । तेथें विभूतीसी अद्वैत साधी । प्रतिपदीं सूचवूनि योगातें ॥ ५५ ॥ परंतु ह्मणी विभूतीचकडे । अर्जुनाची दृष्टि जडे । आणि ह्मणीं विसर पडे । सर्वात्मयोगाचा ॥ ५६ ॥ ह्मणोनि कालत्रयांत तें कारण । कार्यास त्यास कधीं नये भिन्नपण । हें अघटितघटनायोगलक्षण । कालत्रयविद्यमानत्वें मागें बोलिलें ॥५७॥ "अहमादिश्च मध्यं च" या अर्धश्लोकीं । ऐसें उत्तमश्लोक बोलिला कीं । हीं सर्व भूतें अनेकें एकीं । देखें अर्जुना सागरीं जैसे तरंग ॥ ५८ ॥ परंतु अनादिकल्पकोटी । ऐशाच जाल्या होणारही सृष्टी । येथें या प्रसंगीं न पडे दृष्टी । अर्जुनाची ॥ ५९ ॥ तरी प्रतिकल्प ऐशाच योगरूपा सृष्टि होती । त्यांत आदि अंत मध्यकाळ जाणावें विभूती । ह्मणोनि योग सूचवूनि जगत्पती । विभूति सांगतो या श्लोकीं ॥ ७६० ॥

॥ श्लोक ॥ सर्गाणामादिरंतश्च मध्यं चैवाहमर्जुन ।
अध्यात्मविद्या विद्यानां वादः प्रवदतामहम् ॥ ३२ ॥

॥ टीका ॥ भूत भविष्य वर्तमानीं । प्रपंचसृष्टि जाल्या होणार आतां होती ह्मणोनी । अनेक सर्ग अनादित्वें करूनी । हे अर्जुना ॥ ६१ ॥ त्यांत सर्गा सकळांत । जे आदि जो अंत । आणि मध्य हे तिन्ही मीच भगवंत । तेव्हां मीच ते सर्ग मीच त्रिकाळही ॥ ६२ ॥ हें पूर्वींच तुज सांगितलें । कीं जें आदि ज्याची उत्पत्तीहूनि पहिलें । आणि अंतही कीं नाशानंतर उरलें । तेंचि मध्यें त्याचें रूपही ॥ ६३ ॥ या भावें ह्मणे मी सर्गीं सर्वांचा आदि

१ जलचरांत.

अंत । मध्यें म्हणतां " मध्यं चैवाहमर्जुन " ऐसें म्हणे अनंत । " चैव " शब्दें निषेधी द्वैत । मध्यकाळीं नसोनि जें भासे ॥६४॥ 'मध्यं च' म्हणोनि या चकारें । मध्यही " अहमेव " म्हणोनि या प्रकारें । मध्येंही जें दिसे नानाकारें । तें अहमेव म्हणजे मीच निर्धारें अर्जुना ॥ ६५ ॥ आदि अंतीं सुवर्ण । मध्यें साकार अलंकारपण । परि तेंही सुवर्णचि म्हणतां खूण । द्वैताभासनिषेधांची ॥६६ ॥ आदि अंतीं सागर । मध्यें तरंगाचे आकार । तेव्हांही सागर एवं च म्हणतां चमत्कार । तरंग द्वैतनिषेधाचा ॥ ६७ ॥ ताम्रादि धातु आणि माती । त्यांचीं पात्रें मृत्तिकेच्या घटादिजाती । इतकियांस जें ज्यास आदि अंतीं । तेंचि पात्रादि घटादिरूपें मध्येंही ॥ ६८ ॥ इत्यादि दृष्टांतकोटी । मनीं समजे किरीटी । ऐसा भाव दावोनि पोटीं । " मध्यं चैवाहमर्जुन " म्हणतसे ॥ ६९ ॥ एवं अघटितघटनाचातुर्य । ऐसें आपलें योगैश्वर्य । कीं कारण आदि अंतीं तेंचि कार्य । मध्येंही हा योग आपला ॥ ७७० ॥ या योगांत या तिन्ही विभूती । कीं आदि अंत मध्यही मीच म्हणे मायापती । परि अध्यात्मविद्येवांचूनि या रीती । न कळती ते विद्या मीच सर्वा विद्यांत ॥७१ ॥ अगा कोण विद्या मी नव्हे म्हणसी । कीं चित्समुद्रीं तरंगां त्याणेंचि जाणसी । त्याही मी योगमूर्ति परि त्या विद्यांसी । नये महिमा अध्यात्मविद्येचा ॥ ७२ ॥ अध्यात्म शब्दाचा अर्थ । अष्टमाध्यायांत वदला स्वयें समर्थ । अनुभवें तोचि सिद्ध होतां व्यर्थ । अन्य अर्थ कां बोलावे ॥ ७३ ॥ " स्वभावोऽध्यात्ममुच्यते " म्हणोनी । स्वभाव शब्द अध्यात्म शब्द यावरूनी । कीं स्वभाव म्हणजे आपला भाव ज्ञानी । आपल्यास जाणती तें अध्यात्म ॥ ७४ ॥ मज सभाग्य भजती । ते अध्यात्म जाणती । हें सत्य मी म्हणोनि श्रीपती । अष्टमीं अर्थ सांगे कीं अध्यात्म म्हणजे स्वभाव ॥ ७५ ॥ एवं आपण कोण हें न जाणे । आणि सर्वविद्या जाणतों म्हणे । त्यास भ्रांत म्हणती शाहणे । जो न जाणे आपण आपणा ॥ ७६ ॥ जाति ते आहे द्विजाती । कोण म्हणतां सांगे आडजाती । त्यास भ्रांत सर्वथा म्हणती । विवेकी लोक ॥ ७७ ॥ जाणे सर्व विद्येचिया घडामोडी । आणि सर्व शास्त्रेंही बडबडी । मी विद्यावंत म्हणोनी खडबडी । घडी घडी देहाभिमानें ॥ ७८ ॥ आत्मा देहावेगळा । हेंही शास्त्रें करि गोळा । परि आपणास आपण पाहतो जो डोळा । तो उघडा असोनिही ज्याचा झांकला असे ॥ ७९ ॥ स्पर्शली रज्जूस दृष्टी । आणि सर्प मानूनि होतो कष्टी । तैसा ज्या बुद्धीनें मी जडशरीरसृष्टी ।

आत्मा स्पर्शोनि ह्मणतो तें कळेना ॥ ७८० ॥ एवं अध्यात्मशब्दार्थ । कीं आपला भाव अनुभवणें तोचि यथार्थ । सकळही विद्यायोग त्यांत विभूति ह्मणे समर्थ । अध्यात्मविद्या ॥ ८१ ॥ अध्यात्मावांचूनि अन्य विद्या । त्या सर्वही अविद्या । तथापि योगरूपें मज आद्या । पाहसी तैं विद्या मीच असें तेव्हांही ॥ ८२ ॥ परि अध्यात्मविद्या विभूती । जिणें कळे आत्मस्थिती । तेव्हां सकळ विद्याही वाटती । रूपें मजयोगमूर्तीचीं ॥ ८३ ॥ लोखंडाची बेडी । लोखंडाचेंचि शस्त्र तोडी । लोह योगचि बेडीही परंतु खोडी । वाईट बेडीच्या बरें शस्त्र ॥ ८४ ॥ विभूति ते अध्यात्मविद्या मी परी । प्राप्त होय गुरुरूपें मी भेटें जरी । आणि ते उपदेश करिती तरी । सफळ भेट संतांची ॥ ८५ ॥ तेव्हां शिष्य प्रश्न करी । बोधी गुरुरूपें हरी । स्वहिताकारणें निघे शिष्य वैखरी । तो तेरावा ह्मणोनि गुरु बोले ॥ ८६ ॥ ऐसें प्रकृष्ट जे वक्ते वदती । जयापजय मूळ राग द्वेष ज्यांमध्यें नसती । वाद ज्या गुरुशिष्यांत ये रीती । ते योग मी विभूति माझी तो वाद॥८७॥ कीं स्तनीं लागतां वत्समुख । कामधेनूस वाटे सुख । अनुभवदुग्ध विश्वतोमुख । घे घटघटा शिष्यवर्य ये रीती ॥८८ ॥ ऐसें प्रकर्षें बोलती । ते गुरुशिष्यही मीच विश्वपती । परि श्रेष्ठत्वें दोघेचि दिसती । त्या अध्यात्मवादांत ॥८९ ॥ कीं गुरूची बोधकशक्ती । वादरूपें दाविते अनुभवव्यक्ती । आणि शिष्याची ग्राहकशक्ती अभिव्यक्ती । वादरूपें करीतसे ॥ ७९० ॥ एवं गुरु तोचि बोलूं जाणे । शिष्य तोचि कीं ज्यास बाणे । या उभयश्रेष्ठत्वखुणे । वाद त्यांचाच प्रकट दाखवी ॥ ९१ ॥ ह्मणोनि ऐसें प्रवदती । त्यांत वाद तो माझी विभूती । ह्मणोनि अध्यात्मप्रकरणीं श्रीपती । ह्मणे कीं " वादःप्रवदतामहं " ह्मणोनी ॥ ९२ ॥ इतर वक्ते आणि वाद इतर । मीच योगमूर्ति सर्वेश्वर । परि ऐसा उत्तम वाद परस्पर । तो विभूति माझी ॥ ९३ ॥ पूर्वार्धीं योग वर्णिला । तिसरिया चरणीं अध्यात्म बोलिला । गुरुशिष्यसंवाद निरूपिला । चतुर्थ चरणीं ॥ ९४ ॥ सांगीतला सर्वात्मयोग । त्यास अध्यात्मविद्येचा उपयोग । त्या विद्येचा तेव्हां होय संयोग । कीं प्रश्न उपदेशरूप वाद गुरुशिष्यांचा ॥९५ ॥ सर्वत्र परस्पर संगती । विभूतीस असे ये रीती । परि ग्रंथविस्तार अती । होतो आणि तत्त्वार्थ ऐसाही निवडतो ॥ ९६ ॥ कीं रुद्रांत मी शंकर । ह्मणतां तेथें त्याचा सखा कुबेर । आणि वसूंत पावक वैश्वानर । तो नेत्र त्या शंकराचा ॥ ९७ ॥ इत्यादि ग्रंथ मागलि । ऐसेच पुढीलही बोलेल बोल । वृष्णींत मी वासुदेवें

जेथें ह्मणेल । तेथें पांडवांत धनंजय सखा आपला ॥९८॥ शंकरापुढें सखा कुबेर जैसा । वासुदेवापुढें सखा धनंजय तैसा । शोध करितां ऐसा । ग्रंथ वाढतो ॥ ९९ ॥ टीका ग्रंथ संक्षेपाचा विस्तार । त्याचाही विस्तार करिती वाचणार । ये रीती सूचविला चमत्कार । योजोत चतुर योजेल तेथवरी ॥ ८००॥ एवं च सर्वात्मयोगाच पुढें हरी । अध्यात्मविद्या निरूपण करी । त्यापुढें गुरुशिष्यवैखरी । संवादरूपें वर्णिली ॥ १ ॥ कीं हा योग तेव्हां जाणे । जेव्हां अध्यात्मविद्या बाणे । ते अध्यात्मविद्या पावती शाहणे । गुरु-शिष्यवाद विभूति प्रगटतां ॥ २ ॥

॥ श्लोकपूर्वार्ध ॥ अक्षराणामकारोऽस्मि द्वंद्वः सामासिकस्य च ।

॥ टीका ॥ अक्षरांत मी अकार । कीं विष्णु वाचक हें अक्षर । सर्वां सु-रांत विष्णु जैसा सर्वेश्वर । तैसा अकार अक्षरां सर्वांत ॥ ३ ॥ वरकड अक्षरें सकळ । मी योगशरीरिचि केवळ । परि मी जैसा सर्वां देवांचें मूळ । वेदमूळ ओंकार तन्मूळही हा अकार ॥ ४ ॥ अकार विष्णु आणी । अ-कारच सर्व वाणी । ह्मणोनि वेद बहुधा वर्णी । अकार मी विभूति माझी तो ॥ ५॥ क ह्मणतां त्यांत अकार । ज्या अकारावांचूनि ह्मणवेना ककार । जैसा आत्मस्वरूपावांचूनि कांहीं आकार । बुद्धीस इंद्रियांस न कळे ॥ ६ ॥ आतां पदें अनेक । दोन तीन चार मिळोनि पद एक। त्यांत त्या पदाचा होतो विवेक । व्याकरणीं ह्मणती त्यातें समास ॥ ७ ॥ अनेक त्या समा-सांचीं नांवें । त्यांत द्वंद्वसमास ज्याला ह्मणावें । त्या सर्वां समासांत त्यास गणावें । विभूति ह्मणोनि तो मी ह्मणे श्रीकृष्ण ॥ ८ ॥ एका पदीं दोघे असती । रामकृष्णौ जीवेश्वरौ इत्यादि रीती । इत्यादि पदाच्या समासास ह्मणती । द्वंद्व ह्मणोनी ॥ ९ ॥ कीं तत्त्वदृष्टीं एक पद । व्यवहारें करावे दोन भेद । त्या दों पदांचा अभेद । दिसे ह्मणतां पद एक ॥ ८१० ॥ पद परंपद परात्पर । त्यांत व्यवहार जीवेश्वर । आणि जडचैतन्यव्यवहार । परमपद एकचि मागुती ॥ ११ ॥ एक पदीं पदें दोनी । व्यवहार नव्हतां एकचि ह्मणोनी । व्यवहारकाळीं दोन्ही दिसोनी । एक ह्मणोनि हा भाव ॥ १२ ॥ ब्रह्म एक परात्पर । तेथें व्यवहार जीवेश्वर । पद एक त्यांत बो-लावे दोन्ही प्रकार । जे रीती ॥ १३ ॥ ऐसा सिद्ध होतो तत्त्वार्थ । या स-मासीं ह्मणोनि समर्थ । ज्या दृष्टांतीं साधे परमार्थ । ते दृष्टांतही मी विभूति ऐसें सूचवी ॥ १४ ॥ आतां मागें ऐसें बोलिला अनंत । कीं चालक काळ मी सर्वां चालकांत । उपजवी चाळी पाळी करी अंत । तो काळ सकळां

चाळकांत मी जाण ॥ १५ ॥ तरी चाळकत्वें काळचक्र फिरे । हें प्रलय-काळीं न उरे । संहार करोनि तोही सरे । योगनिद्रा जेव्हां ईश्वराची ॥ १६ ॥ ते काळीं तेव्हां कांहींच नसे । ह्मणोनि बोलती वेद ऐसे । कीं प्रलयचि शेष जें उरतसे । तेंहीं काळचि हें तात्पर्य तेव्हां ह्मणतां वेदांचें ॥ १७ ॥ श्रुति ह्मणे "नासदासीन्नोसदासीत्तदानीं" । "कीं तदानीं" ह्मणजे ते समयीं कांहींच नसे ह्मणोनी । अधिष्ठान आणिक येथें न वदे वेद यावरूनी । अधिष्ठान काळचि मूळ कालत्रयाचा ॥ १८ ॥ श्रुति प्रपंचाचे आधीं वदे ये रीती । आणि अंतीं ऐसें बोले श्रुति कीं । तें एकचि त्यावांचूनि नसती । कार्य कारणें किमपिही ॥१९॥ कांहीं नसती ह्मणे ज्याविण । तें ब्रह्म ह्मणोनि ह्मणावें निर्गुण । तरी"तदानीं" ह्मणजे ते काळीं ह्मणोनि वेद आपण । काळ दुसरा बोलतो ऐसें साधतें ॥ ८२० ॥ यालागीं सर्वज्ञा ईश्वराची वाचा । एथें निर्णय बोले साचा । ते काळीं कांहीं नव्हतें ह्मणे याचा अर्थ ऐसा ॥ २१ ॥ कीं ज्यावांचूनि कांहीं नव्हतें । काळचि ह्मणावें त्यातें । त्या काळीं ह्मणोनि कांहीं प्रलयशेष बोलिलें असतें । तरी त्या काळीं ह्मणतां काळ दुसरा सधतो ॥ २२ ॥ "तदानीं" ह्मणजे त्या काळांत । कांहीं नव्हतें अत्यंत । ह्मणजे काळचि होता ज्यांत । दुसरें नव्हतें किमपिही ॥२३॥ एवं प्रलयशेष जें केवळ । त्यातेंचि ह्मणावें महाकाळ । ज्या काळीं रज्जूंत व्याळ । भासे कालत्रयाचा ॥ २४ ॥ विभूतियोग त्रिकाळरूप । त्याचें मूळ जें प्रलय शेषस्वरूप । होय जाय कालत्रयाचें माप । तें अमोप काळ मी उत्तरार्धे ह्मणतसे ॥ २५ ॥

॥ श्लोकोत्तरार्ध ॥ अहमेवाक्षयः कालो धाताहं विश्वतोमुखः ॥ ३३ ॥

॥ टीका ॥ अगा ज्या काळास नाहीं क्षय । कीं पूर्वी बोलिलों त्या काळाचा क्षय होय । या काळीं ह्मणोनि अक्षय । तो मीच ॥ २६ ॥ कीं लहान थोर मापें सकळ । त्यांतही आकाशचि असे पोकळ । तें मापें नाशतां उरे केवळ । अक्षयाकाश जे रीती ॥ २७ ॥ ज्या त्या मापांत अवकाश । परि घट नाशतां न दिसे घटाकाश । तैसा सृष्टिस्थितिसंहारनाश । तेव्हां सृष्टयादि कालत्रय असेना॥२८॥परि होतां घटाचा नाश । जरी न दिसे घटावृत[1] आकाश । तरी अक्षयरूपें उरला थोर अवकाश । तोचि अवकाश त्या घटमठांचा ॥२९॥ तथापि होतां घटनाश । नाशला दिसे घटाकाश । तैसा घटनाशें थोर अवकाश । न नासे अक्षय तो ह्मणावा ॥ ८३० ॥

१ घटांत असलेलें.

ऐसा सरतां सृष्टिनाशें सृष्टिकाळ । सरतां स्थितिनाशें स्थितिकाळ । सरतां संहारनाशें संहारकाळ । उरे अक्षय काळ तो ह्मणावा ॥ ३१ ॥ त्या काळीं कांहीं इतर । नसे ह्मणोनि "अहमेवाक्षयः कालः" ह्मणे श्रीधर । बीजयोगाचें आणि विभूतीचें निरंतर । दुसरें तेथें नाहीं हें सूचवी ॥ ३२ ॥ सर्वत्र योग बोलोनि त्यांत । अमुक तें विभूति मी ह्मणे भगवंत । येथें स्वयेंचि तेव्हां काळ उरतो अनंत । ह्मणोनि उगाच अक्षयकाळ ह्मणतसे ॥ ३३ ॥ तरी आतांही तो असे । परि त्रिकाळरूपें विश्वरूप भासे । ऐसें बोलोनि दाखवीतसे । चतुर्थ चरण ॥ ३४ ॥ "धाताहं विश्वतोमुखः" ॥ ॥ टीका ॥ जो जें धरितो त्या पदार्थाचा धर्ता । जो धर्ता तो ह्मणावा धाता । "धाताहं विश्वतोमुखः" ह्मणे विश्वभर्ता । कीं धरितों कालत्रयरूप हें विश्व ॥ ३५ ॥ विश्वतोमुख काळ तीन्ही । कोठें उत्पत्ति कोठें स्थिति कोठें संहार ह्मणोनी । तो काळ मीच धरितों जो यांतें गिळूनि । प्रलयशेष अंतीं उरतसे ॥ ३६ ॥ तो मीच केवळ । अक्षय प्रलयशेष काळ । सर्वात्मयोगाचें आणि सर्वा विभूतींचें मूळ । अक्षय काळरूपें मज जाण ॥३७॥ आतां विश्वतोमुखाचें स्पष्ट निरूपण । आणि इतरां विभूतींचेंही विवरण । प्रसंगें नरास सांगतो नारायण । या श्लोकीं ॥ ३८ ॥

॥ श्लोक ॥ मृत्युः सर्वहरश्चाहमुद्भवश्च भविष्यताम् ।
कीर्तिः श्रीर्वाक्च नारीणां स्मृतिर्मेधा धृतिः क्षमा ॥ ३४ ॥

॥ टीका ॥ अगा मृत्यु जो सर्वांतें संहारी । तो मृत्यु मीच असें हरी । आणि उद्भव ज्यांस होणार याउपरी । त्यांचा उद्भवकाळ त्यांहूनि पूर्वीच मी असें ॥ ३९ ॥ एवं मृत्यु संहारकाळ । उद्भवसृष्टिकाळ । दोन्ही मी ह्मणतां स्थितिकाळ । मध्यभागीं आलाच तोही ॥ ८४० ॥ "विश्वतोमुख" पांडुसुता । काळ ऐसा त्याचा धर्ता । धाता विश्वतोमुख ह्मणोनि तत्त्वता । पूर्वश्लोकीं या भावें बोलिलों हा भाव ॥ ४१ ॥ आतां नारीमाजी विभूती । कीर्ति श्री वाचा स्मृती । त्या चार्‍ही आणि मेधा धृती । आणि क्षमा ऐशा या सात ॥ ४२ ॥ कीर्ति भली ह्मणोनि प्रसिद्धी । श्री ह्मणजे धन धान्य सौंदर्यादिकांची समृद्धी । वाचा संतांस संमत वक्तृत्वसिद्धी । स्मृति स्मरण उत्तम गोष्टींचें ॥ ४३ ॥ मेधा प्रज्ञा[1] तीक्ष्ण । धृतिधारणालक्षण[2] । कीं जें उत्तम सुलक्षण । धारणा हे बुद्धींत त्याची ॥ ४४ ॥ क्षमा ह्मणावी ऐसी । कीं समर्थ होऊनि अपराध सोसी । या मी ह्मणे अर्जुनासी ।

१ ज्ञान, शहाणपण. २ ग्रहण करण्याचें लक्षण.

